अस्तरावरील पाषाण चित्रात राजा शुद्धोदनाच्या दरबारातील दृष्य आहे. त्यात तीन ज्योतिषी बुद्धाची आई, मायाला स्वप्नाचा अर्थ समजावून सांगत आहेत. इ.स. दुसऱ्या शतकातील नागार्जुन-कोंडा येथील एका शिलात कोरलेल्या या प्रसंगात खालच्या बाजूला बसलेला राजचिटणवीस स्वप्नाचा अर्थ लिहून घेत आहे. भारतीय लेखन कलेचा शिल्पबद्ध पुरावा देणारे हे अत्यंत पुरातन शिल्प असावे असा अंदाज आहे.

राष्ट्रीय संग्रहालय, नवी दिल्ली, यांच्या सौजन्याने -

Tistekathacha Vrittant (तिस्तेकाठचा वृत्तांत) :
Marathi translation by Vilas Gitay of
Devesh Ray's Akademi Award winning novel
*Tistaparer Brittanta* in Bengali
Sahitya Akademi, New Delhi (1998). Rs. Three Hundred


First Edition : 1998

**Published by :**
Sahitya Akademi

**Head Office :**
Rabindra Bhavan, 35, Ferozeshah Road, New Delhi 110 001

**Sales Department :**
Basement in 'Swati', Mandir Marg, New Delhi 110 001

**Regional Offices :**
172, M. M. G. S. Marg, Dadar (East), Mumbai 400 014
Jeevan Tara, 23A/44X, Diamond Harbour Road, Calcutta 700 053
Guna, 304-305, Anna Salai, Teynampet, Chennai 600 018
ADA Rangamandira, 109, J. C. Road, Bangalore 560 002

ISBN:81-260-0372-3

मूल्य 300 रुपये

**Printed by** :
New Age Printing Press
Bhupesh Gupta Bhavan, 85, Sayani Road, Prabhadevi,
Mumbai 400 025.

# अनुक्रम

## आदिपर्व

## गयानाथाची जोतजमीन

## वनपर्व

# बाघारूचे निर्वासन



## चरपर्व

# नितांईचा वास्तुत्याग व बी. एस्. एफ्. चा सीमात्याग

## वृक्षपर्व

# बाघारूचे पुनरागमन

## मिरवणूकपर्व

## उत्तरखंडाची स्वतंत्र राज्यासाठी मागणी

## अन्त्यपर्व

# मदारीच्या आईचे स्वतंत्र राष्ट्र

## परिशिष्ट

# एक

# बाजाराच्या वाटेवर

एकाच बाजाराकडे एकाच वेळी दोन माणसं दोन साईनबोर्डस् घेऊन चालली आहेत, असं दृश्य फारसं दिसत नाही.

एक साईनबोर्ड आहे बराच लंबा - चौडा, मोठा, नवीन. सरकारी साईनबोर्डस असतात तसा, सरकारी मोहर असलेला, पिवळ्यावर काळी अक्षरं रंगवलेला - 'कृत्रिम गो - प्रजनन केंद्र' इत्यादी इत्यादी. तो बोर्ड नेताना त्या माणसाला बरेच कष्ट होताहेत - एकदा तो बोर्ड झुलवीत नेतो, पण त्यामुळे बोर्ड रस्त्यावर आपटतो. एक-दोनदा तो बोर्ड बगलेतही घेऊन पहातो. शेवटी डोक्यावर घेतो. तेच सर्वात अधिक सोयीचं वाटतं. एका हाताने डोक्यावर साईनबोर्ड धरलेला, आणि दुसऱ्या हातात नायलॉनचे जोडे झुलताहेत - मागचा झरा पार करताना ते काढावे लागले होते. पुढे आणखी तीन-चार वेळा फेरीबोटीतून नद्या पार करायच्या आहेत. नायलॉनची पँटही त्याने गुडघ्यापर्यंत नीट मुडपून घेतलीय - जणू त्या नद्यांच्या पाण्याचा त्याला अंदाज आहे.

दुसरा एक माणूस एक छोटा साईनबोर्ड घेऊन चाललाय. सोईनबोर्ड आहे काळ्यावर पांढरी अक्षरं रंगवलेला. पण तो फार जुना असावा, असं वाटतं. त्यावरही सरकारी मोहर आहे. बऱ्याच मोठमोठ्या अक्षरांत त्यावर लिहिलंय, 'संक्रमण छावणी.' त्या माणसाने बोर्ड थैलीसंगे बांधून पाठीवर घेतलाय् आणि विडी ओढीत-ओढीत चाललाय. बिडी नसेल, तर दुसऱ्या हाताचं करायचं काय? धोतर त्याने गुडघ्यांच्याही वर मुडपून घेतलंय्- नद्या-नाले-चिखल-वाळू पार करताना मुडपतात, तसं. त्याच्या पायातल्या निळ्या पट्ट्यांच्या हवाई चपलांचा सोल फक्त पायांच्या बोटांजवळ थोडासा शिल्लक राहिलेला आहे. मोठ्या साईनबोर्डचा डडंग-डंग-डडंग डंग असा आवाज येतो, पण हा भाग इतका निर्जन आहे, की आवाज मोठा असला तरी वातावरणात पसरून विरून जातो.

आसपासच्या परिसर निर्जन आहे, फक्त याच रस्त्याने लोक रांगेने चालले आहेत.

आज क्रांतिहाटचा बाजार. हायवेवर उतरून काही काहीजण रिक्षाही करतात. त्यानंतर रिक्षावाल्याबरोबरच रिक्षा ढकलीत - ढकलीत छोट-छोटे नाले पार करतात. रिक्षावाले फेरीबोटीत माल भरून देतात. पलीकडच्या तिरावरही अलीकडे रिक्षा असतात. ज्यांच्याकडे खूप माल असतो, त्यांना तर रिक्षाची गरज पडतेच. कपडे, बनियन, लुंग्या, शर्ट, पँट विकणारे दुकानदार सायकलच्या पुढे-मागे माल बांधून वेळ मारून नेतात, पण बटाट्यांच्या किंवा ॲल्युमिनियमच्या भांड्यांच्या दुकानादारांचा रिक्षा नसेल, तर अधिक खर्च होतो, कारण एका रिक्षात मावला असता, तेवढा माल अनेक हमालांच्या डोक्यांवरून न्यावा लागतो.

पण बरेचसे लोक डोक्यावर किंवा खांद्यावर माल घेऊन पायीच बाजाराकडे जातात. बसमधून हायवेवर उतरून, बसच्या टपावरून माल उतरून, रिक्षामधून काही मैल दूर जाण्याची सोय असते. पण जे लोक दक्षिणेकडच्या चकमौलानीहून किंवा उत्तरेकडच्या हायहायपाथाहून वाड्या-जंगलांमधून, नद्या-नाले पार करीत - करीत, पाठीवर किंवा डोक्यांवर माल घेऊन; किंवा गुरं-बकऱ्या हाकीत-हाकीत रस्ता कापीत येतात, त्यांना या पक्क्या रस्त्यावरच्या रिक्षांची गरज काय? त्या छोट्या, अरुंद रस्त्याला जणू अचानक काही तासांनी पूरच येणार असल्यासारख्या एखाद्या वरून उतरणाऱ्या पहाडी नदीचा वेग येतो. कुणीही एकमेकांकडे पहात नाही, बोलतही नाही. वेगाने चालत असल्याने किंवा ओझं वहात असल्याने माणसांच्या निःश्वासांचा आवाज येतो. आसपासच्या प्रदेश इतका निर्जन आहे, की माणसांच्या श्वास घेण्याचे-सोडण्याचे जवळजवळ निःशब्द आवाजही एकमेकांत मिसळत नाहीत, वेगवेगळेच रहातात.

पण, बाजार भरण्याची वेळ जवळ आलेली असल्यामुळे असो वा हा रस्ता पक्का असल्यामुळे असो, गर्दी पळत असली, तरी दाट असते. इतकी माणसं एकाच वेळी एकाच दिशेने जाताहेत यातच त्यांच्यामध्ये बरचंस साम्य दिसतं. त्याशिवाय, एका माणसाच्या डोक्यावर एक मोठमोठ्या अक्षरात लिहिलेला साईनबोर्ड आणि दुसऱ्याच्या पाठीवर एक खूप जुना छोटा साईनबोर्ड जणू एखादा झेंडा किंवा कापडी फलक एखादी मिरवणूक तयार करतात, त्याप्रमाणे या गर्दीला आणखीच एक करू पहातात.

या रस्त्यावरची जी गर्दी या दोन साईनबोर्डसमुळे एका सूत्रात बांधली गेलेली आहे, तिच्यातून हॉर्न आणि घंटा वाजवीत-वाजवीत रिक्षा आणि सायकली जातात खऱ्या, पण त्या गेल्यानंतर गर्दी पुन्हा पहिल्यासारखी दाट होते. एकजण फक्त एकच छोटी बकरी नव्या दोरीने बांधून घेऊन चाललाय. बकरीला बहुधा आधीचा काही अनुभव आहे म्हणा की भीती वाटतेय म्हणा - ती एक पाऊनही पुढे सरकत नाहीय्. तो माणूसही बऱ्याच निश्चिंत मनाने तिला ओढतोय्. जणू याच प्रकारे चालत चालत आपण अगदी वेळेवर बाजारात पोहोचू हे त्याला ठाऊक आहे. बकरी मधूमधून रस्त्यात फतकल मारते. तो माणूस थांबतो. बकरीला ओढीतही नाही, चुचकारीतही नाही. बकरीच्या मागूनच इकडच्या

छोट्यामोठ्या बाजारांत जाणारा एक चहावाला मुलगा डोक्यावर खोकी घेऊन चाललेला आहे. त्या खोक्यांमध्ये शेगडी, कोळसे आणि चहा करण्याचा सारा सरंजाम आहे. बकरी बसल्याबरोबर तो बकरीच्या बरोबर मागे हळूच एक लाथ मारतो, आणि बकरी काही पावलं पळते. आता त्या मुलाने कुठूनतरी एक काटकी तोडलीय्. त्यामुळे लाथ मारावी लागत नाही. काटकीने योग्य ठिकाणी डिवचल्याबरोबर बकरी थोडी पळते. एक लुंगीवाला माणूस तीन कोंबड्या उलट्या धरून चाललाय. मध्ये एक लहान मुलाच्या डोक्यावर एक बराच मोठा कोहळा आहे. खूप टाइट हाफपँट, जाळीदार बनियन, मोजे आणि केड्सचे बूट घातलेला एकजण रिकाम्याच हातांनी चाललाय. नदी-नाला आला, की प्रत्येकवेळी तो बूट काढतो आणि पार केल्यावर पुन्हा घालतो. इकडच्या न्यावडा नदीच्या पूर्वेकडचे मळ्यातील मजूर फारसे क्रान्तिहाटमध्ये जात नाहीत. क्रान्तिहाटच्या पश्चिमेकडे तर फक्त चहाचे मळेच आहेत. बाजारात मजुरांची थोडी गर्दी होत-ते बहुधा कुठेतरी जाऊन परतत असतात, नाहीतर बाजारात त्यांनी कुणालातरी भेटायचं ठरवलेलं असतं. पातळ अशा नायलॉनच्या बनियनमधून त्यांच्या शरीराचा वर्ण चमकत असतो. केसांना खूप तेल लावलेलं. एकजण अगदी कॅप्टनच्या ऐटीत चाललेला. जवळच्या पिंजऱ्यात बदकांचा एक थवा. एक वळणाजवळ एकीकडे एक बांबू आणि एक गाठोडं. एकाजणाच्या डोक्यावर दहाएक शेर ताग. चिटाचा हाफशर्ट, चेकची लुंगी, रबरी पंपशू, खांद्यावर गमळा, गळा, मान, पाठ, कंबर या भागांवर चांगलीच चरबी जमलेली. हा जोतदार असणारच, पण व्यापारीही असावा बहुधा. बहुधा बैलगाडीतून आपल्या माणसाबरोबर विक्रीचा माल आधीच पाठवलेला असावा. नाहीतर हा विक्रीसाठी नव्हे, खरेदीसाठी चालला असावा. किंवा बहुधा केवळ बाजार आहे म्हणून वस्तूंचे बाजारभाव काय आहेत हे पाहाण्यासाठी चालला असावा, खरेदी-विक्री काहीही करायची नसावी. एक मुलगी केळीच्या पानांमध्ये मासे घेऊन चालली आहे - दिवसभर मासे धरून आता बाजारात ते विकण्यासाठी चालली आहे. मध्यम आकाराचा एक गोऱ्हा बऱ्याच वेळपासून येतोय्. गळ्यात नवीन दोरी आहे. म्हणजेच बाजारात विक्रीसाठी चाललाय. पण गुरांचा बाजार तर सकाळपासूनच बसतो. गुरांची खरेदीविक्री करणारे दिवसभर बाजारात फिरतात, गुरांची किंमत ठरवतात, आपण पसंत केलेलं जनावर दुसऱ्या कुणी विकत नेऊ नये म्हणून गुरांवर नजर ठेवतात. बाजाराच्या शेवटी येतात चोरलेली गुरं. ती किमतीनेही स्वस्त असतात. बरेचदा अशा गुरांना बाजारापर्यंतही न्यावं लागत नाही-वाटेतच त्यांची विक्री होऊन जाते. चोरीच्या गुरांच्या विक्रीसाठी क्रान्तिहाटचा बाजार हा खूप सोयीचा ठरला असता. पूर्वेला हायवेपासून दाह मैल आत आहे, त्यात मध्ये एक कालवा, कालव्यात एक नाव पश्चिमेकडे विशाल आपलचांद फॉरेस्ट, चहाचे मळे, पहाडी चढ, बागराकोट कोळशाच्या खाणी अगदी शेभक ब्रिज पर्यंत-कुठलीही बॉर्डर पार करून मयनागुडीच्या रस्त्याने जनावर या बाजारात आणलं, की झालं! पण त्यानंतर? हे चार

कालवे-एका नावेने कसे पार करायचे? त्यामुळे चोरीचा माल बाजारात येत नाही. एखादा इसम चोरलेलं जनावर इकडून-तिकडून आणून, फॉरेस्टमध्ये बांधून ठेवून, संधी मिळाली, की बाजारात आणून विकून टाकतो.

आता या रस्त्याने चालले आहेत, ते बाजाराच्या शेवटच्या टप्प्यातले लोक. असं म्हणतात —

'पहिल्या टप्प्यात विकतात दुकानदार,
मधल्या टप्प्यात विकतात देउनिया,
शेवटच्या टप्प्यात विकतात गृहस्थ'

बाजाराच्या सुरुवातीलाच, पहिल्या टप्प्यात व्यावसायिकांची मोठी-मोठी खरेदी विक्री होऊन जाते. तेव्हाच बाजारातले त्या दिवसाचे दर-भाव ठरतात, ताग-तंबाखू काय दराने विकायची हे ठरतं. आजकाल धान्यं-डाळी यांची काही मोठ्या प्रमाणावर विक्री होत नाही. त्यांचे भाव आणि त्या भावांचे चढ उतारही या बाजारावर अवलंबून नसतात. मोठमोठ्या प्रमाणावरही खरेदी विक्री झाली, की बैलगाड्यांतून, किंवा आजकाल कधीकधी येणाऱ्या ट्रकमधून दिवसभर माल जात रहातो.

बाजाराच्या मधल्या टप्प्यावर येतात जोतदार-देउनिया -- ते संसारासाठी लागणाऱ्या वस्तूही खरीदतात, शेतीबाडीसाठी लागणाऱ्या वस्तूही घेतात. तसंच संसार आणि शेतीबाडीसाठी लागणाऱ्या वस्तूंची विक्रीही करतात. आणि बाजाराच्या अगदी शेवटच्या टप्प्यात गृहस्थ लोक चिल्लर वस्तू विकण्यासाठी येतात - एखादा कोहळा, एखादं बदक, चार अंडी, एखादी बकरी - असल्या गोष्टी.

आता या रस्त्याने तेच लोक चालले आहेत. चालत असल्याने आपोआप त्यांची लाईन तयार होते. आणि लाईन तयार होते, म्हणूनच आकाशाकडे वळवलेला 'कृत्रिम गो-प्रजनन केंद्र' आणि पाठीवर झुलणारा 'संक्रमण छावणी' चा बोर्ड जणू संपूर्ण रांगेचा परिचय असावा, असं वाटतं. जणू ही संपूर्ण रांग कृत्रिम गो-प्रजनन केंद्रात किंवा संक्रमण छावणीत जाऊन दाखल होणार आहे.

## दोन

# न्यावडा नदीतील नाव

झाडंझुडपं, जंगलझाडी यांच्यामधून जात-जात हा पक्का रस्ता न्यावडा नदीच्या वाळवंटापाशी येऊन संपतो. नदी पार करायला नाव आहे. नावेपर्यंत जायला गुडघ्यापर्यंत असलेलं थोडं पाणी पार करावं लागणार. सगळे लोक साईनबोर्ड मागची रांग मोडून,

पाण्यात धपाधपा उतरून, 'है-है' करीत करीत नावेच्या दिशेने पळत निघतात. शेळीवाला ताबडतोब शेळीला खांद्यावर घेतो आणि त्याने खांद्यावर घेतल्याबरोबर शेळी शेपटी उंचावून लेंड्या टाकते. जणू ती या संधीची वाटच पहात होती. जणू त्या माणसालाही याची कल्पना असावी. त्याने शेळीला खांद्यावर अशा प्रकारे घेतलेलं असतं की लेंड्या त्याच्या अंगाला लागतही नाहीत, बाहेरच पडतात. त्याच्या अंगावर लेंड्या न टाकता आल्यामुळेच जणू शेळी तारस्वराने चित्कार करून त्याच्या खांद्यावरून निसटून जाण्याचा प्रयत्न करते. पण तो माणूस खांद्यावर शेळीचे चारी पाय दाबून धरून उडी मारून नावेत चढतो. साईनबोर्ड घेतलेली ती दोन माणसंही अशी काही नावेकडे पळतात, की जणू ती दोघे साईनबोर्ड विकायलाच चाललेली आहेत, जणू हा साईनबोर्ड विकायचा 'सी न'च आहे!

पण, मोठा साईनबोर्ड नावेत कडेला टेकून ठेवल्यावर आणि छोटा साईनबोर्ड पाठीशी टाकून तो माणूस उभा राहिल्यावर वाटतं, खरोखर ही सारी नाव 'कृत्रिम गो-प्रजनन केंद्र' आणि 'संक्रमण छावणी' आहे.

नावाड्याने नाव घाटापासून आधीच सोडलेली होती. या लोकांच्या ओरडण्यामुळे तो नाव आणखी पुढे वल्हवीत नाही. हे लोक नदीकाठचा चिखल तुडवीत येऊन कसेबसे नावेत चढले आहेत. नावेचा पाय ठेवायचा खालचा तळ भिजलेलाच होता. हे लोक तो आणखी भिजवतात. सगळ्यांना नावेत चढताही येत नाही. पण आता लोक खूप झाले आहेत पाहून नावाडी लग्गीच्या सहाय्याने नाव पुढे नेतो. आणखी थोडं वल्हवल्यावर तर पैलतिरावर जाता येईल इतकी ही छोटी नदी! बहुधा कुठे-कुठे तर ती चालतही पार करता येते. पण सगळ्याच ठिकाणी नेहमीच एकाच खोलीचं पाणी असत नाही. शिवाय वरून छोटामोठा पूरही येऊ शकतो. म्हणूनच लोक नावेतून नदी पार करतात.

नावेत सगळेच उभे राहिलेले आहेत. त्यांच्यात इकडच्या बाजूचा सगळ्यात मोठा जोतदार नौशेर आलम हासुद्धा आहे. वक्फ इस्टेटचा मालक. हजारो बिघे जमीन त्याच्या ताब्यात. डूयार्सचा जेव्हा प्रथम बन्दोबस्त करण्यात आला, तेव्हापासून नौशेर आलम इकडच्या सगळ्या जमिनीचा मालक आहे. खासजमिनीचा कायदा पास झाल्यापासून गेली पंचवीस-तीस वर्षे नौशेर आलमशी सरकारचे कोर्टात मामले चालूच आहेत. अनेक केसेस सुप्रीम कोर्टापर्यंत गेल्या-त्यातल्या बऱ्याच केसेसमध्ये नौशेर आलम जिंकला, सरकार हरलं. त्याशिवाय बऱ्याच जमिनींमध्ये दहा ते वीस वर्षं इंजंक्शन झालंय. इंजंक्शनचा निकाल लागत नाही. तोपर्यंत त्या जमिनीतलं पीक नौशेर आलमच्याच ताब्यात जातंय. सर्वांना असं वाटतं, की सरकार आलमच्या जमिनीवरच्या गवतालाही स्पर्श करू शकत नाही. आलमची जमीन कसणारे काही अधियार लोक अधूनमधून त्याचा वाटा देत नाहीत.

किंवा त्यांना सरकारकडून जमिनीचा पट्टा हवा असतो. कधीकधी मिळतोसुद्धा. पण क्वचितच असं घडतं. नौशेर आलम बुटकासा माणूस आहे. पांढरा हाफशर्ट आणि छोट्या मापाचा पायजमा हा त्याचा वेश. हातात छत्री. सगळेच त्याला सलाम करतात. तो प्रत्येकाला नावाने हाक मारून खुशाली विचारतो. इकडच्या छोट्यामोठ्या सगळ्या बाजारांत नौशेर थोडावेळ जाऊन बसतो. सगळ्यांशी भेटी होतात, प्रत्येकाची खबरबात समजते.

नौशेरच्या जवळच, पण जणू थोडं अंतर ठेवून, योगानन्द मंत्री उभा आहे. पहिल्या संयुक्त आघाडीनंतर प्रफुल्ल घोष जेव्हा तीनेक महिन्यांसाठी मुख्यमंत्री झाले होते, तेव्हा योगानन्दही मंत्री होता. बहुधा दोनेक महिन्यांसाठी. त्यानंतर त्याचं नांवच योगानन्द मंत्री असं पडलं. धोतर आणि खादीचा कुर्ता घातलेला योगानन्दही हातात छत्री घेऊन उभा आहे. नौशेर आलम योगानन्दला हाक मारून विचारतो, 'मंत्रीमहाशय, या मोठ्या साईन बोर्डवर काय लिहिलंय?' योगानन्दने ते आधीच पाहिलेलं होतं. तो म्हणाला, 'ते हरियाणाच्या वळूंचं...'

'असं होय!' नौशेरच्या लक्षात येतं. या भागात त्यानेच प्रथम 'कृत्रिम गो-प्रजनन' सुरू केलं होत तेही काही वर्षांपूर्वी आता तर त्याच्या गोठ्यात हरियाणाच्या बेण्यापासून तयार झालेलीच गुरं आहेत. बसमधून जाता जाताही फॉरेस्टजवळच्या जमिनीवर म्हशींच्या आकाराच्या गायी चरताना पाहून लोक म्हणतात, 'नौशेरच्या गाई!' नौशेर पुन्हा विचारतो, 'आणि त्या माणसाच्या पाठीवरच्या बोर्डवर काय लिहिलंय हो मंत्रीमशाई?'

योगानन्द म्हणतो, 'उद्यापासून तर इथंच संक्रमण छावणी उभी रहाणार.'

'असं होय!' नौशेरच्या लक्षात येतं. तो थोडावेळ गप्प रहातो. त्यानंतर जणू स्वत:शीच म्हणतो, 'संक्रमण छावणीत रहायला जमीन दिली आणि पशु-इस्पितळानं बैल दिले, तर मग आमच्याकडं आबादी-आबादच झाली म्हणा की!' काही-काहींना हे ऐकू येतं, काही-काहीजण हसतातही. नौशेरला या दोन्ही साईन बोर्डांचा प्रकार समजलाय म्हणूनच तो हे बोलला. त्याच्या बोलण्यात कुठलाही कठोरपणा किंवा तिरकसपणा नव्हता. लांबून कुणीतरी नौशेरची नजर वेधण्याचा प्रयत्न केल्याबरोबर नौशेरची त्याच्यावर नजर पडते, आणि लांबूनच सलाम करून नौशेर त्याला विचारतो, 'काय, बीबी आली का इस्पितळातून घरी?' तो माणूस हसून मान हलवतो. 'छान, छान!' म्हणून नौशेर आपल्या जवळ उभ्या असलेल्या माणसाशी बोलण्यासाठी तोंड वळवतो.

नौका पैलतिराला लागतो. नौशेरशेजारी उभा असलेला माणूस आस्ते उतरतो, नावेतून उडी मारून नाव हलवीत नाही. मागचे लोकही उतरताना घाईगर्दी करीत नाहीत. नौशेर आस्ते-आस्ते नावेतून जमिनीवर उतरतो. उतरल्यावर नावेकडे पाहून, हसून जणू धन्यवाद देतो, 'म्हाताऱ्यांनो, फार घाई करू नका रे, या, उतरा सगळे!' तो पर्यंत प्रत्येकाने आपापलं सामान उचवलेलं असतं. सगळे एकेक करून उतरू लागतात.

योगानन्द मागच्या बाजूला होता. तो हळूहळू उतरतो. बाजारात त्याला काहीही

खरेदी-विक्री करायची नाहीय. अधूनमधून बाजारात आलं की सगळ्यांशी भेटीगाठी होतात,ख्याली खुशाली समजते, आसपासच्या गावातले बाजारभाव समजतात. आणि गपसप तर नावेतही होते, नावेतून उतरल्यावरही होते.

योगानंदला एक भीती मात्र होती. नौशेर आलमने त्याच्याबरोबर चालणं सुरू केलं असतं, तर योगानंदला दुसरं काहीच करता आलं नसतं. शिवाय बाजारभरच्या लोकांनी पाहिलं असतं, की योगानंद नौशेरबरोबर आलाय. हे काही योगानंदला नको होतं. म्हणून तो नौशेरला उतरून जाण्यासाठी वेळ देतो.

पण उतरल्यावर पहातो, तर नौशेर रिक्शात बसून इकडेच पहात होता. आता नजरही वळवता येणार नव्हती. जवळ गेल्याबरोबर नौशेर म्हणाला, 'काय मंत्रीमशाई, इथं तर एवढी एकच रिक्षा आहे, आपण माझ्याबरोबर येणार, की दुसरीकडं काही काम आहे?'

नौशेरलाही योगानंदबरोबर जायचं नाही की काय? 'नाही. आपण जा, मला आणखी थोड्या वेळाने जायचंय्. खालपाडाहून एकजण येणार आहे इथं!'

'अच्छा, अच्छा!' नौशेरने उत्तर दिल्याबरोबर रिक्शावाला रिक्षा सुरू करतो. नौशेर जणू नेहमीच कायदा पाळून चालतो. आणखी एखादी रिक्षा असती तर तो योगानंदसाठी थांबला नसता. पण म्हणून योगानंदला तो बळजबरीने आपल्या रिक्षात बसवणार नाही. त्याच्याबरोबर रिक्षात जाणं योगानंदला गैरसोयीचं वाटतंय हे सुद्धा जणू नौशेरच्या लक्षात येतं. पण त्याने हाक मारल्यावर तर योगानंद नाही म्हणू शकणार नाही. म्हणून तो बोलताना एक पळवाट ठेवतो- योगानंदला यायचं नसेल, तर तो येणार नाही. पण फक्त एकच रिक्षा आहे हे पाहूनही नौशेर आलम तिच्यातून जाऊ शकत नाही. कधीकाळच्या तीनेक महिन्यांच्या सरकारमध्ये दोनेक महिने मंत्री असलेल्या योगानंदसाठी त्याला थांबायलाच हवं. या घाटापासून चालत जाण्यासाठी पायवाट आहे, परंतु या तिरावर मात्र गर्दी दाट होत नाही. या बाजूच्या नाना वाड्यांमधले, गावांमधले लोक बाजाराकडे चालले आहेत. मोकळ्या मैदानातूनही अनेकजण चाललेले दिसतात. नाना रस्त्यांनी, नाना शेता-मैदानांतून, सगळीकडून जणू सर्वांनाच आता लगबगीने बाजारात पोचण्याची घाई आहे. 'गो-प्रजनन' आणि 'संक्रमण छावणी' चे बोर्ड घेतलेले दोघेजणही कधीतरी त्या गर्दीत मिसळून लगबगीने बाजाराच्या दिशेने जातात.

## तीन

# सत्यमेव जयते

'संक्रमण छावणी'चा बोर्ड पाठीवर झुलवीत, थोडं पुढं जाऊन, आपली जीप आलीय की नाही हे प्रियनाथ पहातो. जीप काही आलेली नाही. संध्याकाळपूर्वी ती इथं

येणारही नव्हती. त्यामुळे रस्त्याकडेच्या एका मिठाईच्या दुकानाच्या बेंचजवळ साईन बोर्ड आणि पिशवी खाली उतरवून ठेवून तो बेंचवर बसला. त्याच्यामागे चितेच्या साइझच्या दोन भट्ट्या माणूस तळता येईल इतक्या मोठ्या कढयांत शेव तळून ती शेजारच्या मोठ्या टोपल्यांत टाकली जात होती. ती टोपलीही इतकी मोठी, की मांडी घालून एका माणसाला सहज तिच्यात बसता येईल. ती टोपली एका मोठ्या कुंडीवर ठेवलेली होती. त्यामुळे ज्यादा तेल गळून जात होतं. तळलेल्या शेवेचा वास येत होता भट्टीच्या मागे चौदा वर्षांचा एक मुलगा उघड्या अंगाने चहा करीत होता. प्रियनाथ त्याला उद्देशून म्हणाला, 'दादा, दोन प्लेट शेव, एक चहा!'

उद्यापासून चहा-शेव प्रियनाथ स्वत:च्या पैशाने खाणार नाही. उद्या कशाला, आजच, थोड्या वेळानंतर बाजारात दवंडी दिल्यावर त्याला स्वत:च्या पैशाने चहा-शेव-सिगारेट घ्यावी लागणार नाही. बहुधा हा दुकानदारच त्याला हाका मार-मारून खाऊ घालील. आजकाल तर घोषच खूप जमीन विकत घेताहेत. आत्ता जाऊन हा साईन बोर्ड दाखवला, तर आत्ताची चहा-शेवसुद्धा मोफत होऊन जाऊ शकेल. पण असं तो कशासाठी करील? तो तर सरकारी माणूस आहे. सेटलमेंटचा प्यून. त्याला दोन-तीन दुकानदार बोलावतील, दोन-तीन जण त्याच्या मागे-मागे फिरतील, तेव्हा कुठे तो एखाद्याकडून घेतला तर चहा घेईल.

उद्यापासून इथे संक्रमण छावणी उभी राहील. ही बातमी इथल्या सर्वांनाच ठाऊक आहे. फॉर्म 'ए' ची जाहिरात आधीच प्रसिद्ध झालीय, कलम ५६ नुसारची नोटिसही जारी केली आहे. आपापल्या कागदपत्रांसह उल्लिखित 'मौजा' मध्ये हजर व्हावे' म्हणून.

आजच्या बाजारात एक दवंडी द्यावी लागणार. त्यासाठीच प्रियनाथ पुढे आलाय. साहेब त्याला म्हणाले होते, आमच्याबरोबर जीपमध्येच चला, आम्हीच जरा आधी निघू. पण साहेबांच्या जीपमधून आल्यास प्रियनाथला बसने येण्यासाठीचा टी.ए. मिळाला नसता. साईन बोर्ड आणल्याबद्दल त्याला रिक्षाभाडं म्हणून एक रुपया मिळणार, तोही मिळाला नसता. आणि बाजारात दवंडी देण्याबद्दल तीन रुपये अशी एकूण पाचेक रुपयांची रक्कम बुडाली असती. म्हणूनच तो ज्या रस्त्यावर बसने उतरून पायी आलाय, त्याच रस्त्याने साहेबलोक सरळ पुढे जाऊन, डावीकडे वळून, एकूण वीसेक मैलांची चक्कर मारून इथे येतील.

शेवेच्या तेलाने प्रियनाथची बोटं भिजली. ती त्याने डोक्याला पुसली. त्यानंतर हातावर हात घासले. तो अगदी रस्त्याजवळ बसला होता. जे फक्त चहा पिऊन चालू लागतात. क्वचित शेव घेतात, तेच इथं बसतात किंवा उभे राहतात. यानंतर मधल्या रांगेत जे बसतात, ते चहा पितात, शेव खातात, जिलेबीही खातात. त्यांच्यासमोरच एका

उघड्या टोपलीत जिलेबीचा डोंगर, आणि जवळ मोठमोठ्या डब्यांमध्ये फरसाण. आणि जे मिठाई खाणारे-खिलवणारे आहेत, ते दुकानाच्या अगदी आतल्या बाजूला बसले आहेत. तिथे टेबल-खुर्च्यांच्या रांगा आहेत. आतल्या या जागीच तर मोठमोठ्या बाजारांतली खरी खरेदी-विक्री होते. फक्त बाजारातल्या वस्तूंचीच खरेदी विक्री नव्हे, तर पुढच्या वर्षी कोणती जमीन कोण विकणार, ती कोण खरीदणार, ही सगळी बोलणी इथूनच सुरू होतात. उद्यापासून छावणी उद्यापासून लोक प्रियनाथला घेऊन आत बोलण्यासाठी नेणार आत बेलं, तरी पलीकडील भिंत पाडून आणखी आत नेऊ पहाणार उद्यापासून? आपली बॅग आणि साईन बोर्ड हातात उचलून घेऊन पुन्हा एकदा दुकानात पाहून प्रियनाथ विचार करतो-आत्ता, ही दवंडी झाली की लोकांचं 'दादा', 'दादा' म्हणणं सुरू होईल. नाही, आज नाही. आज दवंडी दिल्यानंतर इथं येऊन, इथं बसून, सगळ्यांसमोर तो पुन्हा दोन प्लेट शेव आणि एक कप चहा घेऊन उठून जाईल. बाजारातल्या लोकांना जरा बघू दे सेटलमेंटचा प्यून स्वत:च्या पैशांनीच चहा-शेव खातो, खाऊ शकतो.

आता प्रियनाथ पिशवी खांद्याला अडकवतो आणि साईनबोर्ड हातात झुलता असा घेतो. त्यानंतर रस्ता तिरपा पार करून बाजारात प्रवेश करताना एक काठी उचलून घेतो.

या बाजूला तात्पुरती उभारलेली दुकानं आहेत. काही काही दुकानांवर ताडपत्रीचं छप्पर घातलेलं आहे, काही-काही दुकानांवर पत्र्याचं; आणि बऱ्याचशा दुकानांवर प्लॅस्टिकच्या कापडाचं. त्यातूनच माल बांधून येतो. तीच कापडं छप्पर म्हणून माथ्यावर टांगली जातात. इथल्या बऱ्याचशा दुकानांत कपडे आणि बनियन विकायला ठेवले आहेत-प्लॅस्टिकच्या पिशव्यांमधून, किंवा पुठ्ठयाच्या बॉक्समधून. या दुकानांच्या अगदी मागेच खुला बाजार आहे. त्या खुल्या बाजाराच्या तोंडाशी उभा राहून प्रियनाथ काठीने पत्र्याचा साईनबोर्ड वाजवतो. काहीतरीच, 'टॅप-टॅप' असा आवाज होतो. म्हणून प्रियनाथ पुन्हा एकदा पत्रा वाजवतो. यावेळी समोरचे आणि बाजूचे दुकानदार डोळे वर उचलून पहातात. 'उद्यापासून क्रान्तिहाटच्या बाजारमैदानावर सेटलमेंटची संक्रमण छावणी बसणार आहे. कागदपत्रांसहित सगळ्यांनी योग्य 'मौजा' मध्ये योग्य वेळी हजर रहावे.' 'रहावे' हा शब्द 'रहावे ऽऽऽ' असा बराच ताणून संपवतो प्रियनाथ. नंतर थोडा पुढे जातो. दोन पावलं गेल्यावर त्याला आठवतं, की 'ऑपरेशन लीज' ची माहिती सांगायची राहिलीच. पुढच्या ठिकाणी सांगेल. पण काही केलं तरी ही गोष्ट त्याच्या लक्षात रहात नाही. 'हलका' म्हणजे जोतदाराचा मामला. कुणी त्याच्या जमिनीत 'बर्गा' केलंय त्याची यादी सेटलमेंटकडे कशी असावी? प्रियनाथने जलपाइगुडी शहराच्या दक्षिणेला सात मैल अंतरावर पाचेक बिघे जमीन विकत घेऊन 'आधि' मध्ये बारा वर्षांसाठी दिलीय घरी त्यामुळे

सहा महिन्यांचा भात येतो. त्याच्या 'आधियारा'लाही काही रेकॉर्ड करावं लागणार की काय?

कापड दुकानांच्या ओळींमधून प्रियनाथ सरळ पश्चिमेकडे निघाला होता. मध्ये एका चौकानंतर डावी-उजवीकडं मसाल्याची दुकानं. तिकडून एकजण एका बुटक्या घोड्यावर बसून येत होता. घोड्यावर बसलेला असूनही त्या माणसाचं डोकं दुकानांच्या छतांपर्यंत पोचत नव्हतं; तो बहुधा फॉरेस्टमध्ये किंवा नदीच्या खूप आतल्या एखाद्या बेटावर रहात असावा. घोड्याशिवाय प्रवासाचं दुसरं साधन नाही. प्रियनाथ बाजूला सरून घोड्याला जाण्यासाठी रस्ता देतो. पण बाजूला सरल्यावर घोड्याचा चेहरा जवळून पाहिल्यावर प्रियनाथला अपमानित झाल्यासारखं वाटतं. त्याला वाटतं, खरं तर घोड्यानेच आपल्याला रस्ता द्यायला हवा होता, नाहीतर मग आपल्याला गुरांनाही रस्ता करून देण्यासाठी रस्त्याकडेला उभं रहावं लागणार! त्यामुळे घोडा संपूर्ण पुढे जाण्याआधीच प्रियनाथ आपल्या 'संक्रमण छावणी' बोर्डाने घोड्याच्या मागे एक धक्का मारून रस्त्यावर उतरतो. बोर्डाच्या धक्क्याने, प्रियनाथच्या बाजूला असलेला घोड्याचा मागचा उजवा पाय दुमडला जातो आणि घोडा वादळात दुकानाचं कापडी छत खाली यावं, तसा तो खाली बसतो; पण पुन्हा उठून पुढे जातो आणि डावीकडच्या एका दुकानासमोर उभा रहातो. 'धुत्' म्हणून रस्त्यावर येता येता प्रियनाथला दिसतं, की घोडेस्वाराने एका काठीला बांधलेली पिशवी दुकानदारापुढे केलीय. घोड्यावरून न उतरताच तो बाजार करतोय!

मसाल्याची दुकानं संपल्यावर बाजार उजवी-डावीकडे पसरलाय. तिथं थांबून प्रियनाथ पुन्हा काठीने साईन बोर्ड वाजवतो. आवाज इतका 'टॅप-टॅप' असा बद्पणे येतो की प्रियनाथ सुद्धा एकादा साईन बोर्ड वर उचलून नीटपणे पत्रा पारखतो-जणू स्वत:च्या कर्माकडे पहावं, त्याप्रमाणे. बाजारात दवंडी द्यायचं काम 'संक्रमण छावणी' चा बोर्ड वाजवू-वाजवून करताना त्याने तो पत्रा जवळजवळ फाडत आणलाय. नंतर तो पत्रा आणखी फाटेल या भीतीने प्रियनाथ त्यावर अधिक जोराने काठी मारू शकत नाही. एकादा डावी-उजवीकडे पाहून पत्र्यावर हळूच एकदा काठी मारून तो ओरडला, 'उद्यापासून क्रान्तिहाट मैदानावर सेटलमेंटची संक्रमण छावणी उभी रहाणार आहे. आपण गटा-गटांनी सहभागी व्हावं'

अचानक प्रियनाथची दवंडी ऐकून पान आणि सुक्या तंबाखूचे दुकानदार माना वर करून त्याच्याकडे पहातात. बाजारात तर नाना प्रकारचे लोक येतात. जुन्या बाजारात भिकारी-वेडेसुद्धा ओळखीचे होऊन जातात. दुकानदार आपल्याला नवीन भिकारी किंवा वेडा समजतील, या भीतीने प्रियनाथ बोर्डावरची अक्षर त्यांना दिसतील, अशा पद्धतीने बोर्ड वळवतो. खांद्यावर पिशवी आणि समोर साईनबोर्ड. लोकांना त्यामुळे आणखीच संशय येण्याचा संभव. त्यामुळे प्रियनाथला पुन्हा एकादा साईनबोर्ड नीट पहावा लागतो.

नाही. सरकारी मोहर रंगवलेली आहे 'सत्यमेव जयते'. थोडी अस्पष्ट झालेली असली, तरी वाचता येतेय. 'सत्यमेव जयते' शी कुणी खेळ करीत नाही.

## चार

# ढोलाऐवजी माईक

प्रियनाथ तर आता ही दवंडी देणं बंद ठेवून, परत जाऊन आपली रहाण्याची जागा ठीक आहे की नाही हे पाहून, साईनबोर्ड तिथे टांगूसुद्धा शकतो. त्याच्या नव्या ऑफिसरशी त्याची अजून पूर्ण अशी ओळख झालेली नाही. हा ऑफिसर अगदीच नवीन आलाय. विशेषत, 'ऑपरेशन बर्गा' साठीच सरकारने त्याला पाठवलंय. पण सी.पी.एम्. नव्हे, नक्षल. आधी तो नक्षलवादी होता, नंतर ऑफिसर झालाय. जोतदार पाहिला की संतापतो जोतदार आपल्या शेतीची नोंद करायला आला की म्हणतो, हात दाखवा. जोतदाराचा हात किती कठीण आहे, हे पहातो. इथल्या कँपमध्ये ऑफिसर स्वत:च रहाणार. आपल्या घरी रहाण्यासाठी येण्याबद्दल कितीतरी जण त्याला विनंती करायला गेले होते. चहाच्या मळ्यांच्या मालकांनीही त्याला मळ्यातल्या बंगल्यात रहाण्याची विनंती केली होती. इकडची हीच पद्धत आहे. पण साहेबाने कुणाचंही ऐकलं नाही. इथं येऊन जर त्याला समजलं की दवंडी दिली नाही; तर प्रियनाथ पकडला जाणार. कुठल्याही बाजारात प्रियनाथ कुणालाही कधी दवंडी द्यायला बोलावीत नाही. काहीतरी व्यवस्था करायला हवी.

आणखी उशीर करण्यात काही अर्थ नाही. किराण्याची दुकानं कुठं असतील याचा अंदाज घेण्याचा प्रियनाथ प्रयत्न करतो. मिठाईच्या दुकानाच्या जवळच्या मोठ्या दुकानाबाहेर पत्र्याच्या डब्यांचा एक मोठा ढीग दिसला होता. तिथून एक टिनाचा डबा मागून आणला, तर ताबडतोब साऱ्या बाजारात एकदा दवंडी देता येईल. प्रियनाथ त्या दुकानाकडे जाण्यासाठी मागे वळला.

पण बाजारातून बाहेर पडण्याच्या सुरुवातीलाच दिसतं, की डावीकडच्या एक उंचशा मैदानावर मदेशियांची एक टोळी नाचतेय. एक जण ढोल वाजवतोय आणि मुलींचं एक दल एकमेकींच्या कमरेभोवती हात घालून नाचतंय. त्यांना हा बोर्ड दाखवून ढोल मागता येईल का, असा प्रियनाथ तिथं थांबल्या-थांबल्या विचार करतो. तसं झालं, तर मग त्या ढोलवाल्यालाच दवंडी द्यायला सांगावं लागेल, आणि आपले पैसे बुडतील. पण जर म्हटलं की मी सेटलमेंटचा प्यून आहे, थोडावेळ ढोल द्या, दवंडी दिल्यावर परत देतो, तर? ते मदेशिया लोक नक्कीच चहाच्या मळ्यात काम करणारे असावेत. त्यामुळे सेटलमेंटच्या प्यूनची फारशी पर्वाही करणार नाहीत. पण त्यापेक्षा मोठी गोष्ट म्हणजे त्यांना

समजावता आलं पाहिजे-'तुमचा ढोल द्या, मी दवंडी देईन.' ढोलवाला नको, पण त्याचा ढोल तेवढा पाहिजे-अशी अवघड गोष्ट समजावून सांगण्यासाठी बरंच हिंदी बोलावं लागणार-'तोमको ढोलठो दाओ, हम ढोलाई देगा'-यावर एवढ्या सगळ्या मदेशिया मुली बराचवेळ हसणार. प्रियनाथ किराणा-दुकानदाराच्या दुकानाकडे निघतो.

आता बाजार जणू या रस्त्याच्या आसपासच विसरून बसला आहे. त्यांची जीप येऊन गेली की नाही हे एकदा प्रियनाथ वळून पहातो. त्यानंतरही तो त्या मारवाड्याच्या दुकानाकडे निघाला. गेल्यावर दिसला की त्याचा अंदाज चुकला होता. बाहेर फक्त केरोसीनच्या बाटल्या होत्या. दुकानदार केरोसीनचा व्यापारी होता. शर्मा नावाचा.

'अच्छा, इथं किराण्याचं दुकान कुठं आलं?

'याच रस्त्याने जाऊन उजवीकडं वळा'

प्रियनाथ पुढे जाऊन उजवीकडे वळला. तिथे किनाऱ्याचं दुकान होतं. बरेच पत्र्याचे डबे होते. प्रियनाथला हायसं वाटलं.

'दादा, एक पत्र्याचा डबा देता का?'

'कशाचा पाहिजे-डालडाचा की बिस्किटाचा?'

'एक असला तरी चालेल.'

'फुल साइझ सात रुपये, हाफ साइझ चार रुपये'

'आँ? नाही, म्हणजे मी परत करून जाईन.'

'परत देऊन जाणार? पाहिजे कशासाठी?'

'उद्यापासून इथं संक्रमण छावणी उभी रहाणार-हलका कॅम्प-'

'कसला कॅम्प?'

'सेटलमेंटचा.'

प्रियनाथचं बोलणं संपण्याआधीच दुकानदार म्हणला, 'त्याची काही आम्हाला गरज नाही. तुमचं काम होणार नाही.' प्रियनाथ थोडा चकितच होतो. बाजूला सरकून उभा रहातो. एवढं दुकान चालवतोय हा माणूस आणि इथं जमिनजुमला केलेला नाही! की हा माणूस मालक नसावा, त्याचा नोकर असावा? 'तुमचे मालक कोण?' असं विचारावं असं एकदा प्रियनाथला वाटतं. तो मागे जाऊन त्याच्याकडे पहातो, पण प्रश्न विचारायचं धाडस होत नाही. आणखी काही वेळ थांबून, 'दवंडी दिलीय' असं साहेबाला सांगण्याचा निर्णय त्याला घेतलाच पाहिजे. त्यानंतर जर साहेबाला संशय आला, तर पुढचं पुढं पहाता येईल. आता साईन बोर्ड टांगून खोली ठीकठाक करायला हवी.

हाट-कमिटीच्या ताब्यात कुठल्याशा सहकारी संस्थेच्या तीन खोल्या होत्या त्यातल्या दोन खोल्या कँपसाठी मिळाल्या आहेत. प्रियनाथ आता त्या खोल्या शोधायला निघाला. जाता-जाता त्याला वाढलं, उगाचच तो आतापर्यंत भीत होता. आल्या आल्या

'दवंडी दिली की नाही?' विचारायला साहेबाला दुसरं काही काम नाही की काय? दोन ठिकाणी साईनबोर्ड वाजवून तो ओरडलाय की! हाट कमिटीच्या खोल्या कुठं आहेत हे मिठाईच्या दुकानातच विचारावं, असा विचार करून तो मिठाईच्या दुकानात शिरतो आणि त्याच वेळी त्याला माईकवरून धीरगंभीर आणि शान्त आवाजातील आवाहन ऐकू येतं, 'भाग्याचं चक्र तर सतत फिरत असतं. आज जो राजा, तो उद्या फकीर. आपण भाग्याच्या हातातील बाहुली आहोत. पण भाग्य काही नेहमी वाईटच नसतं. चांगलही असतं. पुरुषाचं भाग्य देवांनाही ठाऊक नसतं. स्त्रियाचं भाग्य ही देवांना ठाऊक नसतं. पण कर्म केल्याशिवाय आपल्याला भाग्याचं फळ मिळत नाही. कर्म आपणाला करावंच लागतं. पाच रुपये नाही, दहा रुपये नाही, फक्त एक रुपया देऊन लॉटरीचं एक तिकिट विकत घ्या. दर आठवड्याला सोडत. कुणी सांगावं, या वेळी आपल्या तिकिटालाच एक लाख रुपयाचं फर्स्ट प्राइझ मिळेल! एक रुपयाच्या बदल्यात एक लाख रुपये! पण एक रुपया देऊन आपणास तिकिट विकत घ्यावंच लागणार! दुसऱ्याने काढलेल्या तिकिटावर काही आपल्याला बक्षीस मिळणार नाही! या, एक रुपया देऊन एक तिकिट विकत घ्या!'

दुकानदाराने सांगितलं, बाजाराच्या अगदी मागच्या बाजूला हाट कमिटीची शेड आहे. तिकडे जाण्याआधी प्रियनाथ लॉटरीच्या तिकिटांच्या रिक्षाकडे जातो. त्याला पाहिल्याबरोबर रिक्षातला मुलगा माईकवरच म्हणतो, 'या दादा! किती तिकिटं पाहिजेत?'

'नाही, असं पहा दादा, जरा दुसरं एक काम आहे तुमच्याकडं!'

'काय बोलायचंय, बोला. कामही बोला, तिकीटही घ्या. फक्त एक रुपयात-'

मुलगा हे सारं माईकवरच बोलत होता. पण प्रियनाथचा आवाज माईकवर ऐकू जात नव्हता. त्यामुळे प्रियनाथला थोडंसं चमत्कारिक वाटत होतं. तो घाईघाईने म्हणाला, 'म्हणजे, उद्या तर इथं संक्रमण छावणी रहाणार आहे. हलका कॅम्प-'

'कोणता कॅम्प?'

'हलका कॅम्प. सेटलमेंटचा. जमीनजुमल्याची मापामापी होईल. कुठली जमीन कुणाची-असं सगळं. त्यानंतर कोणत्या जमिनीवर कोण शेती करतंय ते सगळं रेकॉर्ड होणार. हे जरा माईकवर सांगितलंत तर सगळ्यांना समजेल.'

'म्हणजे काही कल्चरल फंक्शन होणार की काय?'

'काय? फंक्शन?'

'हो, म्हणजे, कुणी आर्टिस्ट येणार आहे का?'

'अरे नाही नाही, हे तर सरकारी काम आहे, कायद्याचं काम आहे, फंक्शन नाही.'

'मग सगळ्यांना कशासाठी सांगायला पाहिजे?'

'सांगितलं ना - जमीनजुमल्याची मापामापी होणार, नोंदी होणार, ऑपरेशन बर्गा!

'हा तर सगळा पार्टीचा कारभार सर, आम्ही कुठल्याही पार्टीबिर्टीत नाही, दादा!

एका तिकिटाची किंमत फक्त एक रुपया, पण त्याच्या बदल्यात तुम्हाला एक लाख रुपये मिळू शकतात-' मुलगा त्याच आवाजात घोषणा करीत रहातो. त्यानंतर थांबून, अचानक प्रियनाथकडे पाहून विचारतो, 'फंक्शन नसू द्या, पण लोक तर येणार ना?'

'लोक तर येणारच. सगळ्यांना समजावं म्हणूनच तर तुम्हाला जरा माईकवर अलाऊन्स करायला सांगितलं!'

'ते करतो मी. पण उद्या तुम्ही मला चान्स द्यायला हवा. तिकीट-विक्री करीन.'

'नक्की-नक्की! आपण अगदी उद्या सकाळपासूनच या!'

'तर मग सांगा, कुठला कॅम्प?'

'हलका!'

'हलका? हे काय नांव झालं दादा! एखादं इंग्लिश नांव दिलंत तर—'

'कशाचं?'

'या फंक्शनचं.'

'ते आपण कसं काय देणार? हे तर गव्हर्नमेंटचं काम आहे. ते ''हलका कॅम्प'' असंच म्हणतात.'

'असं होय! मला वाटलं हा काही नवीन प्रकार आहे की काय! गव्हर्नमेंटच्या सुद्धा कितीतरी नवीन-नवीन योजना असतात, तर सांगा, काय सांगायचं माईकवरून? भाइयों और बहनों, तकदीर एक चीज़ और तकदीर का खेल और एक चीज़!' मुलगा हिन्दीतून लॉटरी तिकिटांची विक्री सुरू करतो. प्रियनाथ जरा वाट पहात थांबतो. मुलाचं बोलणं थांबल्यावर म्हणतो, 'माईकवर असं सांगा-उद्यापासून इथे क्रान्तिहाटात सेटलमेंटचा हलका कॅम्प बसणार आहे. अधियारीचं रेकॉर्डही तयार केलं जाणार आहे. आपण सगळे कागदपत्र घेऊन उपस्थित रहावं.'

'हत् दादा! हे तर अगदी पोलिसांच्या घोषणेसारखं वाटतंय! सगळ्यांना वाटेल आम्ही सरकारी माणसं आहोत. कुणीही तिकिटं विकत घ्यायला येणार नाही!'

'नाही, अगदी त्याच शब्दांत सांगितलं पाहिजे असं नाही. जरा वेगळ्या शब्दांत सांगितलं तरी चालेल. जरा हे बघून घ्या.' प्रियनाथ आपल्य हातातली नोटीस की जाहिरात पुढे करतो. तो मुलगा दोन-चार ओळी वाचून ती उलटी करतो. मागे कागद कोरा. पुन्हा छापलेला मजकूर पहातो. पुन्हा कागद उलटतो. 'हे मलाच काय, माझ्या मामालाही न समजणारं आहे!' प्रियनाथ लगेच म्हणतो, 'हे सगळं तुमच्या बोलण्यात मिसळून सांगा ना दादा माईकवर जरा-उपकार होतील-' मुलगा थोडं थांबून काहीतरी विचार करतो. त्यानंतर त्याच आवाजात बोलत जातो- 'जीवनात कितीतरी घटना घडत असतात. सतत काहीना काही घडत असतं. आत्ताच आमच्या एका दादांनी आम्हाला एक नवीन गोष्ट सांगितली. हलका, हलका कॅम्प. उद्या सकाळी म्हणे या क्रान्तिहाटात एक हलका कॅम्प

उभा रहाणार आहे. आपण सारे नक्कीच त्या कॅम्पमध्ये याल. फिराल. पहाल. यापूर्वी कधी आम्ही 'हलका कॅम्प' हे शब्द ऐकलेले नाहीत. त्याचप्रमाणे उद्याच्या खेळानंतर जेव्हा आपल्या दारी तारवाला येईल आणि म्हणेल, ''आपल्याला पश्चिमबंग लॉटरीचं फर्स्ट प्राइझ मिळालंय,'' तेव्हा आपणही म्हणाल, एखाद्याला लॉटरी लागते हे पहिल्यांदाच समजलं. म्हणूनच म्हटलं, की जीवनात सतत काही-ना-काही नवीन घडत असतं. उद्याचा 'हलका कॅम्प' नवीन आहे. त्याचप्रमाणे आपलं फर्स्ट प्राइझ नवीन. पण एक किमान एक तिकिट तर आपणाला घ्यायलाच हवं. काय दादा, चालेल ना असं?'

'हो, हो, हे तर खूपच चांगलं बोलताहात. पण हलका हा काही नवीन प्रकार नाही. हे-'

'अच्छा अच्छा, ते मॅनेज करतो मी.'

'आणखी एक. 'म्हणे' हा शब्द वापरू नका.'

''म्हणे? म्हणजे? 'म्हणे' हा शब्द वापरणार नाही!'

आता असं वाटू लागलं की माईकवर एखादं नाटक चाललंय. किंवा भांडणही असू शकतं. दोनेक माणसं मान वळवून पहातात, एकजण पुढेसुद्धा येतो. 'या दादा, फक्त एका रुपयाच्या बदल्यात लाख रुपये.' पण तो माणूस तिकिट विकत न घेता तोंड उघडं ठेऊन उभा रहातो. मुलगा आता आपल्याकडे पहात नाही हे प्रियनाथ बघतो. 'या, पश्चिमबंग लॉटरी'-मध्येच प्रियनाथ म्हणतो, ' हे तुम्ही म्हणालात ना की ''म्हणे हलका कॅम्प उभा रहाणार'', त्याऐवजी म्हणा ''हलका कॅम्प उभा रहाणारच!'' मुलाने काही उत्तरही दिलं नाही. प्रियनाथला भीती वाटली, की मुलगा म्हणेल, 'आता मी माईकवर ते काहीही सांगणार नाही.' म्हणून, घाईघाईने 'ठीक आहे' म्हणून तो बाजूला सरकतो. मागून तो मुलगा म्हणतो, 'आम्ही सांगतो; पण आमची रिक्षा उद्या आपल्या कॅम्पमध्ये आल्यावर पोलिसांचा त्रास नाय पाहिजे!'

'अरे नाही नाही, आपण माझ्याकडं या ना! मी तर असणारच तिथं.' प्रियनाथ हाटकमिटीच्या ऑफिसकडे जायला सुरुवात करतो. मागच्या माईकवरून ऐकू येतं, 'जीवन म्हणजे पद्मपत्रावरचं पाणी. पण जे व्हायचं असतं ते काही-'

कॅम्प म्हणजे उद्या इथं तर काहीच नाही. के.बी.चं (खानापूरी बुझारत-म्हणजेच 'लॅण्ड सर्व्हे' चं) काम असणार खेड्यात. जाऊ द्या, येऊ द्या त्याला!

मुलगा खरोखर माईकवर कॅम्पबद्दल सांगतो की नाही ते ऐकण्यासाठी प्रियनाथ थोडं पुढं गेल्यावर थांबतो. नाही सांगितलं, तरी त्याचं काही नुकसान नाही. सांगितलं, तरी काही नाही. कॅम्पमध्ये लोकांची गर्दी झाल्यावर लॉटरीची रिक्षा का बरं येणार नाही? आपोआपच येईल. त्यासंदर्भात प्रियनाथलाही काही करायचं नाही. मुलगा एकदा तरी कॅम्पबद्दल सांगतो की नाही ते ऐकून तो हाटकमिटीची शेड शोधायला निघेल.

'किती पाहिजेत दादा?'

'तू सांग ना किती!'

'तू सांग!' माईकमधून मदेशिया तरुणीचा आवाज येतो.

'हे बघ, ऐक. तू डोळे झाकून घे. उसके बाद ई टिकटपे हाथ लगा दे! ज्या तिकिटाला हात लावशील, ते मी विकत घेईल. ले, आंख बंद कर!' खळखळून हसणंही माईकमधून ऐकू येतं. चहाच्या मळ्यात काम करणाऱ्या, दारु थोडी चढलेल्या मजूर पती-पत्नींचा हा संवाद. 'हे पहा, लॉटरीचं तिकिट विकत घेतानाही लॉटरी होतेय. डोळे बंद करून ज्या तिकिटाला स्पर्श होईल, ते तिकीट हे विकत घेतील' असं म्हणून मुलगा थांबतो. 'हं, या, डोळे बंद करा.' पुन्हा माईकवर खळखळून हसणं ऐकू येतं.

पाच

# प्रियनाथचा साहेब व हाट - कमिटी

प्रियनाथला दुरूनच हाट-कमिटीच्या शेडजवळ जीप थांबलेली दिसली. साहेब आले आहेत. तो चालण्याचा वेग वाढवतो. पण वेगाने चालण्यात त्याच्या सँडल्समुळे अडथळा येतो. कसंही चाललं, तरी टाचेमागील सोलचा भाग फर-फर करू लागतो. त्यापेक्षा वेगाने चाललं, तर सँडल्स अडकतात. तेव्हा बोटांखालचा सोलचा भागही बाहेर येऊ पहातो. सँडल्सच्या पट्ट्या सोलपासून वेगळ्या होऊ नयेत, म्हणून प्रियनाथने त्यांना सेफ्टीपिना लावल्यात खऱ्या, पण सेफ्टीपिनसहित पट्ट्या उखडल्या जाण्याचाही संभव आहेच. तेव्हा तशीच घाई असेल, तर सँडल्स पायातून काढून हातात घेतलेल्याच ठीक असतात. पण असं करायची वेळ यावी, एवढं अंतर काही सध्या चालायचं नाहीय. त्याने सगळं नियमानुसारच केलं आहे, तेव्हा आता धावपळ करण्याची गरज काय? पण आपल्या सँडल्समुळे प्रियनाथ जोराने चालू शकत नाही, तरीही त्याच्या पावलांमध्ये वेग संचारतो. त्यामुळे प्रियनाथचा कमरेपासून वरचा भाग चालताना पुढे येतो आणि पावलं मागे रहातात. त्यामुळे गुडघ्यांवर ताण पडतो.

प्रियनाथचा साहेब मैदानात एका खुर्चीवर बसलेला होता. त्याच्या समोर, पण थोड्या दूर अंतरावर जीप उभी होती. प्रियनाथ मागच्या बाजूनेच म्हणतो; 'सर, आलात?'

साहेब मान वळवून प्रियनाथला पाहून म्हणाले, 'अरे, प्रियनाथबाबू! आपण एकदम माईक-बिईकची व्यवस्था केलीत कुठून?'

प्रियनाथ हसला - 'म्हणजे आपण एवढ्यातच आलात. सर, या खोल्याबिल्या सगळ्या-' म्हणून त्याने व्हरांड्याकडे पाहिलं. वऱ्हांड्यात त्याच्या ऑफिसचे कर्मचारी

आणि इतर दोघे जण होते. व्हरांड्यात जाता-जाताच प्रियनाथला दिसतं, की सगळ्या खोल्या चांगल्या स्वच्छ, नीटनेटक्या आणि धुतलेल्या आहेत; एका खोलीत सगळं सामान जमिनीवर ठेवलेलं आहे.

'काय प्रियनाथदा , आधी सगळा बंदोबस्त करण्यासाठी तुम्हाला पाठवलं होतं, आणि आम्ही येऊन पहातो तर प्रियनाथदा बेपत्ता! शेवटी आम्हालाच सगळं करावं लागलं.' अनाथ म्हणाला. 'पाच मिनिट आधीही मी पाहून गेलो होतो सर, आपण आला नव्हतात, एवढ्यात अचानक आलात!' अनाथच्या प्रश्नाचं उत्तर न देता प्रियनाथ साहेबाशी बोलतो. तीन खोल्या एकामागून एक पाहून प्रियनाथ परत येतो, 'हा तर चांगला पक्का बंदोबस्त झालेला दिसतोय!'

'हे काय? हे सगळं तुम्ही केलंलं नाही? आम्हाला वाटलं तुम्हीच सगळं ठीकठाक करून ठेवलंय!' विनोदबाबू म्हणाले.

'मग तर मला तुम्ही काल सोडायला हवं होतं बाबू! आज तुमच्या आधी बसने निघालो, आणि इथं तासाभरापूर्वी पोचलो!'

'त्यात तुमचे सँडल्स!' आता मागच्या बाजूने ज्योत्स्नाबाबू येऊन म्हणाले, 'आम्हाला तर वाटत होतं, तुम्ही नाही आलात, तरी तुमचे हे सँडल्स बरोबर येऊन पोचतील!

'थांबा , आधी हा साईनबोर्ड लावून घेतो!' म्हणून प्रियनाथ पुन्हा व्हरांड्यातून मैदानात उतरतो.

'ते राहू द्या, तुमचा साईनबोर्ड नंतर लागला तरी चालेल. आता बघा, रात्रीचा स्वैपाक करायला हवा. उद्याचा बाजारही करून ठेवा. परत आल्यावर सगळं नीट लावता येईल,' विनोदबाबू म्हणाले.

'हं चला, मी आणि प्रियनाथबाबू जरा बाजारातून फिरून येतो', म्हणून साहेब खुर्चीतून उठले. जे तीन लोक इतका वेळ मागे उभे होते ते पुढे येऊन म्हणाले, 'जरा आमची विनंती मान्य करणार ना? हे तर आमचं इथलं काम आहे. नेहमी ते आम्हीच करीत असतो.'

'नाही, नाही तुम्ही जेवढं केलंत तेवढं आमच्यासाठी पुरेसं आहे. आम्ही इतकेजण आहोत, सगळं ठीक करून घेऊ. काही अडचण आली तर आपणाला कळवू. आज बाजारचा दिवस, तुम्हालाही काही कामं असतील की तुमची!'

'नाही. ती सगळी झाली आहेत. पण असं आहे, की माझ्या या क्रान्तिहाटमध्ये कुणी बाहेरची पार्टी आली; मग ती सरकारी असो की खाजगी असो, त्यांनी स्वत:च स्वत:चा स्वैपाक केलाय असं कधीही झालं नाही. स्वैपाक मीच करून देत असतो. तो तर माझ्या इज्जतीचा प्रश्न आहे.'

बोलणारा माणूस एक प्रौढ राजवंशी होता. तो बोलताना सुहासने खूप लक्षपूर्वक ऐकलं. किंवा जणू सुहासने त्याला पाहिलंसुद्धा. असे बिस्किट रंगाचे मळकट कपडे त्यांच्यापैकी अनेकांनी घातलेले सुहासने पाहिले आहेत. हे कापड इकडच्या बाजूला तयार होत असावं, की स्वस्त असावं? त्या माणसाच्या बोलण्याचा ढंग पहाण्यासाठी, प्रमाण भाषेत ते आपले शब्द कसे मिसळून देतात ते पहाण्यासाठीच सुहासने त्याला त्याचं म्हणणं न अडवता सांगू दिलं. एकदा सुहासला वाटलं, आज रात्रीसाठी यांचं आतिथ्य स्वीकारून, उद्यापासून स्वत:चा बंदोबस्त स्वत: करावा की काय? त्यामुळे अकारण टेन्शन आलं नसतं. ते सुद्धा खुष झाले असते आणि ऑफिसचे कर्मचारीही खुष झाले असते. पैसा वाचला असता. आपल्या बाजूने थोडा अतिरेकच होतोय, असं त्याला वाटलं. सुहास काही कुणी नीतीवागीश म्हणून त्यांचं आमंत्रण अस्वीकार करीत नव्हता. त्याला तर सरकार जेवणाचा खर्च देतं. तो खर्च न घेता यांच्याकडे जेवता येईल. पण एवढा हंगामा कशासाठी करायचा?

त्याला खरी भीती वाटते ती ही, की या लोकांचं आतिथ्य स्वीकारल्यावर पुन्हा यांचा दबाव तयार होऊ नये. आपल्या एकट्यासाठी स्वैपाकाची व्यवस्था ऑफिसमार्फत करवून बाकीच्यांना त्यांच्या इच्छेप्रमाणे करायची मुभा तो देऊ शकतो. पण असं झालं तरी हे ज्यांच्या - ज्यांच्या घरी किंवा सहाय्याने जेवणार-खाणार, त्यांच्यासाठी सुहासकडून काही सवलती मागणारच.

शेवटी सुहासला म्हणावं लागतं, 'हे पहा, प्रश्न तर आमच्यासुद्धा प्रतिष्ठेचा आहे. जरा आमचं इथलं काम संपू द्या. आम्ही इथं बरेच दिवस कामासाठी रहाणार आहोत. आमचं सगळं काम संपल्यानंतर मग आपण आम्हाला एकदा चांगलं भोजन द्या. पण ही माझी गोष्ट आहे. मी कॅम्पमध्येच जेवणार. आपण या बाकीच्या लोकांशी बोला. ते जसं म्हणतील, तशी त्यांची व्यवस्था होईल. चला प्रियनाथबाबू, जरा बाजारातून फिरून येऊ!' सुहास मागे वळून बाजाराच्या दिशेने चालू लागतो.

मागच्या बाजूने विनोदबाबू म्हणतात, 'सर, अनाथलाही तुमच्याबरोबर येऊ द्या ना, एकटा प्रियनाथ'- याला प्रत्युत्तर न देता सुहास पुढे जातो.

## सहा

# प्रियनाथचा साहेब व बाजारातील नाच

'हा बाजार तर बराच मोठा बाजार आहे, ना?' सुहास विचारतो.

'हो, सर, इकडच्या बाजूचा हा सगळ्यात मोठा बाजार.'

'इथं कशाकशाची विक्री होते - घाऊक विक्री?'

'नक्की तर काही सांगता येणार नाही सर, पण सुकल्या मिरच्यांचे आणि तागांचे डोंगराएवढे ढीग पाहून वाटतं, की त्यांचीच घाऊक विक्री होत असावी - घाऊक व्यापारी सोडून एवढा माल कोण विकत घेणार?'

'सुकल्या मिरच्या?' सुकल्या मिरच्या या बाजूला कुठं तयार होतात? म्हणजे, इकडे सुकल्या मिरच्या इतक्या मोठ्या प्रमाणात-पूर्वी तर कधी ऐकलं नाही!'

प्रियनाथला बाजाराचा थोडा अंदाज आला होता. त्या दुकानांमधून जाणारा मुख्य रस्ता आणि हाटकमिटीच्या खोल्यांची रांग या दोन गोष्टी पूर्व पश्चिमेला होत्या. आता ते उत्तरेकडच्या मैदानातून जाऊन रस्त्यावर पोचणार, तिथून बाजारात प्रवेश करणार. मैदानातून थोडं पुढं गेल्यावर त्यांच्या लक्षात येतं, की घास काही दिसत नाही, अंधार झालाय आणि थोड्या पुढेच बाजारात एक-दोन ढिबऱ्या पेटलेल्या दिसताहेत. तिथे हांडिया नावाची गावठी दारू विकली जातेय. म्हणून साहेबांना घेऊन प्रियनाथ जरा आणखी उत्तरेकडे जातो. वळाल्याबरोबर ढोलाचा आवाज येतो. नाच अजून चाललाय? किती वेळ नाचणार हे लोक?

'नाचताहेत, सर!'

'कोण?'

'चहाच्या मळ्यातले हमाल-मजूर-बाजाराच्या दिवशी पोटभर हाडिया पितात आणि ढोल वाजवीत नाचतात!'

'हो, इथं चहाचे मळे खूप आहेत, ट्राइबल पॉप्युलेशनही-' सुहास वाक्य पुरं करीत नाही. थांबतो. साहेब आणि काही बोलणार आहेत की नाही याची वाट पाहून मग प्रियनाथ म्हणतो, 'हो, सर.'

'थांबा, जरा बघू.' त्यांच्यासमोर तेव्हा नाच चालू. ते नाचणाऱ्यांच्या मागे, डोळे बाजाराच्या दिशेने. नाचणारांची ही तोंडं बाजाराच्या दिशेने. चित्रांत, फोटोंत, सिनेमात असतं, अगदी तसंच दृश्य-एकमेकांच्या कमरेभोवती हात गुंफून, एक मोठी रांग करून, एकाच तालावर नर्तक दोन पावलं पुढं जाताहेत नि एक पाऊल मागे येताहेत, आणि या मागे पुढे होण्यातूच थोडं वळताहेत. असं करीत-करीत ते संपूर्ण वर्तुळ फिरणार आणि फिरत रहाणार. ढोल वाजवणारा या रांगेच्या दोन टोकांच्या मध्यभागी असलेल्या मोकळ्या जागेत आहे. चित्रात, फोटोत, सिनेमात असतो, तसा. सुहासच्या समोर काही अंतरावर बाजारातली दुकानं, टपऱ्या आहेत. त्यांच्यामध्ये प्रकाश आहे. सावल्या हलताहेत. इथं काही-काही झाडंही आहेत. इथं माथ्यावर आकाश आहे. नर्तकांच्या या अर्धवर्तुळावर कधी आकाशातला शेवटचा प्रकाश पडतोय, कधी बाजाराच्या सावल्यांत ते दिसेनासं होतं. नृत्याचं आवर्तन जणू एखाद्या नैसर्गिक घटनेप्रमाणे वाटतं. इतक्या जवळून पहात

असतानाही वाटतं, की ढोलाचा आवाज जणू डोंगर-टेकड्या-जंगल यांच्यामधून आल्यासारखा वाटतो.

'सर, चला ना पुढे, नाच बघा. चेअर घेऊन येतो.'

सुहास जवळजवळ शहारून म्हणतो, 'नको नको, चला, बाजारात जाऊ-'

सुहास पुन्हा चालायला सुरुवात करतो. त्याच्यामागून प्रियनाथ.

## सात

# प्रियनाथचा साहेब आणि बाजारातील माईक

त्या मिठाईच्या दुकानात तीन-चार गॅसबत्त्या. प्रियनाथला दिसतं, त्या लॉटरीच्या रिक्षामध्येही मेणबत्ती आहे. 'या, एका रुपयाच्या बदल्यात लाख रुपये.' सुहास थोडं पुढं जाऊन पहातो, प्रियनाथ लॉटरीवाल्यासमोर जाऊन म्हणतोय, 'आता जरा ते सांगा ना दादा, आमचे साहेब आलेयत.' एवढं सांगितल्यावर प्रियनाथ तिथंच उभा रहात नाही, पळत येऊन पुन्हा सुहासमागे पोचतो. 'आमच्या या बाजारात तर रोज कितीतरी घटना घडतात. हं, किती? दोन? हे घ्या, दादा. उद्या इथं हलका कॅम्प बसणार आहे-'

प्रियनाथ सुहासला म्हणतो, 'सर!'

'बोला!'

'आपल्या कॅम्पचं अलाउन्स करतोय.'

'त्या कॅम्पमध्ये आपण सर्वांनी यावं. आपल्या जमिनजुमल्याचा विचार होईल. पण या अधिकाऱ्यापेक्षाही एक मोठा अधिकारी आहे. तिथे विचार होतो आपल्या भाग्याचा. तिथे ठरते आपली तकदीर. कुणास ठाऊक, तुमच्या भाग्यात काय आहे ते?'

'फक्त एक रुपया देऊन तुम्हाला ते समजू शकेल. कुणास ठाऊक, बहुतेक आपणालाच एक लाख रुपयांचं प्राइझ मिळेल. पण तिकीट न घेता काहीही मिळणार नाही.'

सुहासने उभ्या-उभ्या ऐकलं. त्यानंतर तो हसला-'याला आपण कसं काय पटवलंत?'

'सर, इथं कुणी ढोलवाला नाही असं दिसलं. एवढंच काय, टिनवालाही मिळाला नाही. त्यामुळे नाईलाजाने सर-ते राजी झाले, पण रेट जरा हाय घेतला.'

'घेणारच. माईकवर सांगतोय ना!'

'त्याला दहा रुपयेच पाहिजे होते, पण मी सात रुपयांवर राजी केलं.'

'सात काय फार झाले का?'

'सर, माझ्याकडे तर काही तेवढे पैसे नव्हते. म्हटलं, आपण आल्यावर देऊन टाकीन.'

'विनोदबाबूंकडून आणलेत ना? मग देऊन या-'

'ते तर विसरलोच सर!'

आपल्या बॅगेतून दहाची नोट काढून सुहास म्हणाला, 'आता देऊन या. नंतर विनोदबाबूंकडून घेऊन मला द्या.'

'आपण थोडं थांबा सर, मी देऊन येतो.'

सुहास तिथेच थांबला. त्याच्या समोरच प्रियनाथ लॉटरीच्या रिक्षाजवळ जाऊन थांबला. 'दादा, आमचे साहेब खूप खूश झाले. हे दोन रुपये ठेवा, चहा-सामोसे खा!'

मुलगा माईकवरूनच रागावला, 'चहा-सामोसे खाऊ घालायचे असतील तर आपण आणून खाऊ घाला, आमच्या हातात कशाला पैसे ठेवता?' माईकवर तो इतक्या जोराने बोलल्यामुळे प्रियनाथ चमकतो. मान वळवून पहातो, तर सुहास इकडेच पहातोय.

'अच्छा दादा, अच्छा, एवढे पैसे सुटे करून द्या.'

समोरच्या चहाच्या दुकानात जाऊन, दोन रुपये देऊन प्रियनाथ म्हणाला, 'त्या लॉटरीच्या रिक्षात तीन चहा आणि सामोसे पाठवून द्या.' पैसे देऊन, वीस पैसे परत घेऊन, या सगळ्यामध्ये प्रियनाथने सात रुपये आपल्या खिशात ठेवून दिले. 'दादा, ताबडतोब पाठवून द्या,' म्हणून पळत सुहासकडे जात असताना त्याच्या सँडलचा भाग दुमडून त्याला ठेच लागते. तोल सावरून, चालत-चालत सुहासकडे जाऊन म्हणाला, 'चहा-सामोसे खाऊ घालावे लागले' म्हणून एक रुपया वीस पैसे सुहासला परत दिले. सुहास म्हणाला, 'याचं बिल करू नका. ते सात रुपये घेऊन मला द्या.'

'तुम्ही जरा त्यांना सांगा तर, माझ्या सांगण्यावर ते विश्वास ठेवणार नाहीत.

'नाही, नाही, ठेवतील. आम्ही सगळ्यांनीच येताना माईकवरची घोषणा एकली.'

'सर, इकडून -' प्रियनाथ सुहासला बाजारात शिरण्याचा रस्ता दाखवतो.

## आठ

# बाजारांचे प्रकार

बाजार बसण्याची, गजबजण्याची आणि उठण्याची जणू एक ठरलेली लय असते.

पण ती सगळ्या बाजारांची सारखीच नसते. इकडे च्यांगमारीचा बाजार किंवा बडोदिघीचा बाजार आठवड्यातून एका दिवशी भरतो-घरगुती गरजेच्या वस्तूंच्या खरेदी-विक्रीसाठी. काही काही गावाकडचे लोकही मांडतात. बडोदिघीच्या बाजारातलं मुख्य

गिऱ्हाईक म्हणजे चहाच्या मळ्यातले मजूर त्यांना हव्या असलेल्या वस्तूही त्या बाजारात असतात. पण तो बाजार भरतो दुपारी बारानंतर. मग संध्याकाळनंतर थोड्याच वेळात उठूनही जातो.

ओदलाबाडी आणि लोटागुडीचे बाजार आता बरेच मोठे असतात. ते बसरस्त्याच्या कडेला भरत असल्याने ताबडतोब भरतात आणि उशिरा उठतात. नदीच्या धरणाचं काम चालू असल्याने दोन्ही बाजूंना जवळजवळ वर्षभर माती काढणारे आणि पाथरवट लोक रहातात. त्याशिवाय फॉरेस्टच्या लोकांची संख्याही काही अगदीच कमी नसते. १९६८ सालच्या पुरात ज्या जंगलांतली झाडं पडली होती किंवा वाहून गेली होती, ती सगळी जंगलं सरकारने आता पूर्णपणे साफ करून टाकली आहेत: बहुधा इथं आता नवीन वन तयार होईल. किंवा, सध्या ही जमीन तशीच ठेवतील. त्यामुळे संपूर्ण वर्षभर जंगलात झाडं लावण्याचं काम चालू असतं. गावात विजेसाठी सालाच्या खांबांचीही गेल्या काही वर्षांपासून विक्री होतेय. त्यासाठीही संपूर्ण वर्षभर जंगलांत काम चालू असतं. म्हणूनच आंदोलबाडीचे आणि लोटागुडीचे बाजार खूप मोठे असतात. पण तेही मुळात खरेदी-विक्रीचेच बाजार, व्यवसायाचे नव्हेत. दुपारच्या सुमाराला भरतात, आणि मग चालू रहातात. गेल्या वर्षी लोटगुडीच्या बाजारात पत्र्याची शेड घालून छच्छडियाने सायकलचं दुकान घातलं. ते दुकान तो बाजारांच्या दिवशी, बुधवारी आणि शनिवारी उघडतो. आंदोलाबाडीला तर सायकल आणि रेडीओची दुकानं आधीपासून आहेत. पण कितीही मोठे असले, तरी हे सगळे बाजार गिऱ्हाइकांनुसार चालतात. गिऱ्हाइकांकडं पैसा असला, तर हे बाजार चांगले चालणार. गिऱ्हाइकांकडे पैसा नसला, तर बाजार चालणार नाही. हे सगळे हाट बाजाराप्रमाणे, दुकानांप्रमाणे असतात. पण 'हाट' म्हटलं, की क्रान्तीचा हाट, धूपगुडीचा हाट, चालसाचा हाट. या सगळ्या बाजारात जणू गिऱ्हाईकं नाहीत, दुकानदारही नाहीत, नुसता बाजारच तेवढा आहे. बाजार गजबजतोही बाजाराप्रमाणे. आणि ग्राहक-दुकानदार बाजाराशी आपलं जुळवून घेतात. बाजाराचा भूगोल ज्याला ठाऊक असतो, तो बहुधा गल्ल्यागल्ल्यांमधून फिरून पुन्हाबाहेर येऊ शकतो, पण ज्याला ठाऊक नसतो, तो कुठल्यातरी एका बाजूने बाजारात प्रवेश करू शकला, तरी बाहेर पडताना त्याला रस्ता सापडत नाही. जणू बाजार त्याला गिळून टाकतो आणि नंतर बाहेर ओकून टाकतो.

हा हाट कधी बसतो हे कुणाला समजत नाही. या बाजारापलीकडे एक पक्का असा बाजारही आहेच. त्यात रोजचा बाजार चालतो. त्याशिवायसुद्धा पक्क्या खोल्या, पक्की दुकानं, पक्क्या गुदामात रेशन, मिठाईचं दुकान, औषधाचं दुकान, कापडाचं दुकान, मसाल्याचं दुकान-गोदाम, एफ्. सी. आय्. चं गोदाम, तीन-चार को-ऑपरेटिव्ह संस्था, दोन-तीन किशोर किंवा तरुण मंडळं या सगळ्या गोष्टी रोजच्याच असतात.

धूपगडी हाटाच्या जरा दक्षिणेला पंजाबी ड्रायव्हरांचा एक ढाबासुद्धा उभा राहिला आहे. ओव्हरसिंग रायच्या घराच्या पश्चिमेला आता एक मोठी, उघडी खोली आहे. समोर रांगेने खाटा मांडल्या आहेत. रावणाच्या आकाराची एक भट्टी आहे. त्या शेडच्याच एका कोपऱ्यात बकऱ्या आणि कोंबड्या बांधल्या आहेत. दूर पल्ल्याचे ट्रक्क धूपगुडीहून उजवीकडे वळून आसाममध्ये जातात. ओव्हरसिंग रायने ती जागा भाड्याने देऊन, बांबूच्या कुंपणाने आपलं घर वेगळं करून घेतलंय. त्यानंतर घराच्या उत्तरेकडे दिवाणखाना तयार करून घराचं प्रवेशद्वार तिकडं केलंय. क्रान्ति, चालसा, मेटेली या ठिकाणी ढाबे नसले, तरी ढाब्याच्या आकाराची मिठाईची दुकानं आहेत, ट्रक आहेत. या सगळ्या गोष्टींमुळेच तर हाटवाराचा दिवस वगळताही हे सगळे हाट गजबजलेले असतात

त्यामुळे हाटवार कोणता, कोणत्या वारी हाट बसतो हे समजतच नाही. आधं. या दिवशी दुपारपासूनच बांबूच्या गाड्या यायला सुरुवात होते. अर्थात ट्रक नेहमीच हाटवार गाठून येत नाहीत. पण हाटवाराच्या आधी गुदामं तर भरायची असतात. त्यामुळे हाटवाराच्या आधीच्या दिवशीच, कुण्याएका वेळेपासून फक्त गुरांच्या गाड्यांचा कचकच आवाज येत रहातो. सुमारे चोवीस तास चालणाऱ्या या आवाजामुळेच जणू दुसऱ्या दिवशीचा हाटवार जवळ येतो. आणि तेव्हापासूनच माणसांच्या बोलण्याच्या आवाजाने हळू-हळू वारा जड होतो. जंगलात पाऊस झाल्यावर वारा जसा जड होऊन अंगाला लागतो, त्याचप्रमाणे हे हाट भरण्यापूर्वी माणसांच्या आवाजांनी जड झालेला वारा कानांना लागतो, लागत रहातो. हा आवाज विमानाच्या आवाजाप्रमाणे वाढत रहातो. आधी गुंजन, त्यानंतर हळू-हळू आवाज वाढत-वाढत नंतर कमी होत जातो, शेवटी पुन्हा गुंजन. पण हे काही विमानाच्या आवाजाप्रमाणे फक्त काही मनिटं घडत नाही. चोवीस तास घडत असतं. त्यामुळे गुंजन सुरू झाल्यावर बहुधा लक्षात येतं, किंवा गुंजन ऐकू येण्याइतकं मोठं झाल्यावर लक्षात येतं. त्यानंतर ते गुंजन अखंडपणे चालू रहातं, वाढत रहातं. ते कधी सुरू होतं त्याचं काही चिन्ह दिसत नाही, पण कोण्याएका क्षणी वाटतं, जणू साऱ्या दुनियेतून हाटाचा हा आवाज उठतोय, डोक्यावर विमानाप्रमाणे किंवा जंगलातल्या रातकिड्यांच्या आवाजाप्रमाणे त्यानंतर कुठल्यातरी एका क्षणी ते गुंजन पुन्हा कमी होऊ लागतं. पण ते कमी होऊ लागण्याचा तो क्षण पकडता येत नाही. हळूहळू, खूप वेळापासून कमी होत रहातं. अचानक जेव्हा लक्षात येतं, तेव्हा दिसतं, की त्याआधीच हाट बराचसा रिकामा झालाय, जणू त्या ठिकाणाला आपला रोजचा चेहरा परत मिळालाय. इतका मोठा हाट कधी इतका रिकामा झाला ते समजतच नाही.

या जवळजवळ सगळ्या हाटांचा प्लॅन जणू एकसारखाच असतो. मुख्य रस्त्याच्या दोन्ही बाजूंना रांगेने बांधलेली घरे आणि दुकाने हाट नेहमी या घरांच्या मागच्या बाजूला भरतो. दोन दुकानांच्या मधल्या रिकाम्या जागेतून हाटामध्ये प्रवेश करता येतो. एकाचवेळी

दोन माणसं प्रवेश करू शकणार नाहीत, अशा सगळ्या अरुंद जागांमधून हजारो-हजारो माणसं आत प्रवेश करून बसलेली असतात. गुरांच्या गाड्यांना बाजारात प्रवेश करण्यासाठी रस्ता असतो, तो हाटाच्या मागच्या बाजूला. जी दुकानं मुख्य रस्त्यावर समोरासमोर असतात, ती जणू हाटाला गौण करून, दाबून आपण प्रमुख होऊ पहातात. मिठाईच्या दुकानामध्ये बाहेर तक्तपोशीवर पांढऱ्या चादरीवर जिलब्यांचे डोंगर उभे रहातात. कापडांच्या आणि गमछांच्या दुकानांच्या आत आणि व्हरांड्यात कापड आणि गमछे झुलत असतात. एवढंच काय, सायकलच्या दुकानांतल्या सायकलीही दुकान पार करून रस्त्यावर येऊन पडतात. आणि, या सगळ्या पसाऱ्यामागून माणसांचा एकत्रित आवाज प्रबळ होऊन ऐकू येतो. त्या आवाजातील कुठल्याही एखाद्या ध्वनीला अलगही करता येत नाही, सगळ्याच ध्वनींचा जणू नदीच्या प्रवाहाप्रमाणे ध्वनीचा प्रवाह होऊन जातो. नदीच्या प्रवाहाप्रमाणेच नेपथ्यातील तो आवाजाचा प्रवाह आपल्या कोलाहलाच्या जोरावर एका विशिष्ट अस्तित्त्व बनतो आणि आपल्या आघातांमधून आघातांनी हाटाबाहेरच्या या दुकानांच्या रांगेलाही हाटामध्ये अंतर्भूत करून घेतो. दुकानंही हाटामध्ये मिसळून जातात.

## नऊ

# हा हाट कसा आहे

संध्याकाळनंतर हाटाला स्वत:चा असा चेहेरामोहरा येतो. दिवसभर हाट हळूहळू भरत रहातो, संध्याकाळ झाल्यानंतर तो हवा तसा तुकड्या-तुकड्यांत विभागला जात रहातो. आणि हे तुकडे तयार होतात ते उज्वल अशा प्रकाशकेंद्रांना घेऊन.

आता, या हाटातील घाऊक बाजाराची बाजू जवळजवळ रिकामी झालेली असते. गुरांच्या बाजाराच्या बाजूलाही अंधारच वाटतो. माठ-गाडगी-मडकी विक्रीचा विराट भाग हाटाच्या पश्चिम सीमेला लागून असतो, त्यात आता केवळ गिऱ्हाइकंच नाहीत असं नाही, तर काही काही दुकानदारही उठून गेलेले. भाजीबाजारात गर्दी असते - शेवटच्या टोकाला घर-गृहस्थीला लागणाऱ्या वस्तूंच्या बाजारातही माणसांची गर्दी - नाना प्रकारच्या वस्तू आता इथं स्वस्तात मिळतात. कापडाचोपडांच्या दुकानांतही अजून गर्दी असते, विशेषत: नायलॉनच्या बनियनच्या दुकानांत.

प्रकाश कुठे अधिक आणि कुठे कमी आहे यावरून बाजार काही भागांत विभागता येतो. अगदी उत्तरेला, एका कोपऱ्यात, एका चहाच्या टपरीचं तोंड हाटाच्या दिशेने आहे. तिथे गॅसबत्ती जळतेय. त्या टपरीपासूनच जणू हाट सुरू होतो. पण ती बाहेरून जितकी

स्वच्छ दिसते, तितकी आतून नाही. समोर उभ्या असलेल्या माणसांच्या चेहऱ्याचा आणि कपड्यांचा थोडा - थोडा भाग प्रकाशात दिसतोय; बाकीचा अंधारात मिसळून गेलाय. समोर बरेच बेंच आहेत. त्यांवरही अनेकजण बसले आहेत. त्यांच्या सावल्याही टपरीच्या आतल्या बाजूला पडल्याने आत आणखीच अंधार वाटतो.

त्याच्या समोर अंधाराचा थोडा विस्तार आहे; असं वाटतं, की थोड्या पाण्याच्या पलीकडच्या तिरावर ही टपरी आहे. तो थोडा अंधार पार केल्यावर दोन लांब असे, प्रकाशलेले बोळ आहेत. दोन आहेत की तीन, ते समजत नाही. पण जवळजवळ प्रत्येक दुकानात गॅसबत्ती असल्याने वाटतं, की तिथं बरीच मोठी खरेदी-विक्री चाललीय्. ही सगळी कापडाची दुकानं. सगळाच प्रकाश काही गॅसबत्त्यांचा नाही, थोडा कार्बाईडचाही आहे. गॅसबत्त्यांच्या लालसर प्रकाशाच्या पुंजांमध्ये कार्बाईडच्या निळ्या ज्योती आणि त्या ज्योतींच्या प्रकाशाच्या वृत्तांमुळे पिवळा-लाल-जांभळा असा एक रंगांचा मिलाफ तयार होतो.

या कापडहाटाच्या समकोणात आहे मातीच्या भांड्याचा बाजार - 'हांडिहाटी.' रांगाच्या रांगा पालथ्या ठेवलेल्या घड्यांवर ढिबऱ्या ठेवलेल्या आहेत. - रांगेने; पाण्यामध्ये बेटाची खूण असावी, तशा प्रकारे, थोड्या-थोड्या अंतरावर. ढिबरीच्या प्रकाशाच्या वृत्तात भांड्यांच्या मातीचा लालसर रंग दिसतो. तशीच मातीची अनेक लाल वृत्त दिसतात, एकानंतर दुसरं, दुसऱ्यानंतर तिसरं, अशी खूप दूरपर्यंत, लांब रांगेच्या निर्जनतेत ढिबऱ्यांच्या ज्योती थरथरतात, मातीच्या भांड्यावर लालसर प्रकाशवृत्तं डोलतात, गोल-गोल मापासारख्या सावल्या भांड्यांच्या वर्तुळांवरून घसरतात - जणू अंधार पाण्यासारखा तरळ आहे. त्यामुळे असं वाटतं, की हे दृश्य मुद्दाम तयार केलेले आहे. किंवा हे जणू हाटामधलं दृश्य नाहीय्.

हांडिहाटीनंतर 'गो-हाटा' - गुरांचा बाजार. त्यात अंधारच आहे. मधूनच एखाद्या टॉर्चचा उजेड चमकून जातो. एखादी 'हऽम्बा' अशी साद अंधारातून येऊन अंधारातच विरून जाते; गुरांच्या बाजारातलं काहीच दिसत नाही. पण अचानक येणाऱ्या या 'हऽम्बा' - सादेमुळे वाटतं, तिथे अंधारात, चिखलात पाय रोवून पशुपक्षी, म्हशी, कोंबड्या, बदकं, कबुतरं, बकऱ्या, बकरे आंधळे होऊन उभे आहेत. ते आता अंधारात हळूहळू आंधळे आणि गप्प होऊन रहाणार.

गो-हाटी उजवीकडे टाकून, डावीकडे पुन्हा एका समकोणात वळून, एका माळासारख्या जागेवरून दक्षिणेकडे गेल्यावर लागतो, तो या हाटामधला सर्वात मोठा बाजार - 'पाईकार-हाटी' म्हणजेच घाऊक बाजार. आता माळाचा विस्तार लक्षात येतो. ही जागा कोरडी असल्याने व उत्तरेकडून दक्षिणेपर्यंत माळरान असल्यामुळेच घाऊक बाजारासाठी वापरली जात असावी. या मैदानाच्या मध्यभागी, किंवा कडेला, किंवा शेवटी

कुठेही अधिक प्रकाश असलेली दुकानं किंवा बाजार नाहीत. त्यामुळे या मैदानावर जळत असलेल्या ढिबऱ्या, मेणबत्त्या आणि कंदिलांच्या प्रकाशात वाटतं, की जणू नदीमध्ये दिवे लावलेल्या नौका सोडल्या आहेत. एकाच तीव्रतेचा प्रकाश या सगळ्या माळावर पसरून राहिलाय्. काळसर माती, आणि तिच्यावर बऱ्याचशा लाल मिरच्यांच्या, बटाट्यांच्या टेकड्या. सुकलेल्या लाल मिरच्या आणि बटाटे हेच इथले प्रमुख पदार्थ आहेत असं त्यामुळे वाटतं.

घाऊक बाजारात मिरच्या आणि बटाटे, बटाटे आणि मिरच्या यांच्या ढिगांच्या अधूनमधून कांद्याचेही ढिग दिसतात. प्रत्येक ढिगाभोवती बरीच जागा मोकळी सोडलेली. खरेदीविक्रीसाठी बरीच जागा आवश्यक असते. मध्ये-मध्ये जाड बांबूच्या चार उंच खुंट्यांवर लाकडाचे मोठमोठे तराजू झुलताहेत. एका पारड्यात वजन ठेवलेलं. एक पारडं वाऱ्याने तरंगत असलेलं. मेणबत्त्या आणि ढिबऱ्यांच्या प्रकाशात हे विराट लाकडी तराजू आणि लांब नायलॉनच्या दोऱ्या यांच्या सावल्या झुलत रहातात. घाऊक-बाजाराच्या पूर्वेच्या सीमेवर, हाटाकडे तोंड करून बसलाय तागाचा बाजार-'पाटहाटी.' तागांच्या दुकानांची रांगच इकडे तोंड करून उभी आहे. त्या रांगेच्या मागे बैलगाड्यांची रांग. त्या वाड्यांवर ताग लादलेला. गाडीतूनच विक्री. अजूनही गाड्याच आहेत, आणि गाड्यांच्या मधल्या मोकळ्या जागेतून माणसांची ये-जा चाललेली. त्या गाड्यांच्या चाकांच्या मधल्या जागेतून तिकडच्या बाजूला बसलेल्या माणसांची ये-जा दिसते. पाटहाटीच्या बैलगाड्यांना जास्त करून कंदिलच अधिक बांधलेले आहेत. त्यांना पुन्हा परत जायचं आहे. अधून मधूनच टॉर्च चमकतात.

घाऊक बाजाराच्या दिशेने तोंड करून, पाटहाटीच्या पहिल्या रांगेच्या शेवटी दक्षिणेला, जमिनीवरच विक्रीसाठी नांगर आणि नांगराचे फाळ ठेवलेले. पण संख्येने नांगरच जास्त-फॉरेस्टमधल्या बिनपैश्यांच्या लाकडापासून तयार केलेले - बरेच मोठे, मजबूत नांगर, छोट्या रस्त्यावर चहाच्या मळ्यातून चोरून आणलेल्या सुऱ्या, कोयते, कुदळी, फावडी विक्रीसाठी मांडलेली; त्यांच्याजवळ लोहारांनी तयार केलेले कोयते, कुदळी, हतोड्या - मोठ्या आकाराच्या. पण संख्येने फार नाहीत. आजकाल लोखंडाच्या दुकानात टाटा कंपनीच्या कुदळी आणि फावडी मिळतात.-त्यांचं वजनही अधिक असतं. धारही अधिक असते, किंमतही अधिक असते. त्यांच्यांच जवळ अंधारात काही खुर्च्या, टेबलं, छोटी जाळी लावलेली कपाटं, एवढंच काय, एक आरसा असलेलं ड्रेसिंग टेबलसुद्धा - चकचकीत पॉलिशवरून मेणबत्तीचा प्रकाश परावर्तित होतोय. हाट इथेच संपल्यासारखा वाटतो, पण त्याच्याही पुढे अंधाराल्या मैदानावरून दुर्गंध येतो. नीट पाहिलं, तर लोकही येता-जाताना दिसतात. एफ्. सी. आय्. च्या युरिया आणि मिश्रखताचा हा चोरबाजार. हा मुळात भरतोच संध्याकाळनंतर. थोड्याच वेळात सगळ्या खताची विक्री होऊन जाते.

खताच्या हाटाजवळ तर काही जाता येत नाही. वासावरून त्याची कल्पना येते

तो हाट जणू अंधारात मिसळून गेलाय असं वाटतं. पण तो वास घेत-घेत, त्या अंधाराच्या दिशेने पहात राहिलं, की वाटत राहतं, जणू दूर-दूर अंधकारात, माळरानानंतर, आणखी दूर हा हाट विस्तारत चाललाय. प्रतिध्वनीप्रमाणे, पण सतत असा एक आवाज त्या अंधाऱ्या माळावरून येत रहातो. तो दबला आवाज एकदा कानावर पडला की पडतच रहातो. थांबत नाही. ट्रकमागून ट्रकमध्ये बांबू भरले जात असल्याचा आवाज-टिटागडच्या कागद-कारखान्यांसाठी, बहुधा फॉरेस्ट खात्याकडूनच पुरवठा होतो; पण बराचसा भाग कॉन्ट्रॅक्टर्सकडून. फॉरेस्टमधूनही खरीदतात, शेतकऱ्यांकडूनही खरीदतात. नाहीतर गावाच्या हाटात कधी 'बांशहाटी'-बांबूचा हाट-भरला नसता. कदाचित हा बांबूचा आवाज नसेलही. असा सतत चालू रहाणारा आवाज अंधारातून नाना कारणांनी येऊ शकतो. दिवसाही बहुधा येतो. पण अंधारातच बहुधा अधिक ऐकू येतो. तिस्तानदी कोणत्या दिशेला आहे? किती अंतरावर? तिस्तेच्या पुरामुळे फॉरेस्टमधली काही सालाची झाडं तुटून आडवी होतात. आता अंधारात रातोरात त्यांचे तुकडे होऊन बाहेर येतात. हा आवाज ती झाडं तोडली-कापली जात असल्याचा असेल. किंवा आता, संध्याकाळी, दूरच्या नॅशनल हायवेवरून ट्रक-बसेस जाण्याचा आवाज मातीखालून येतो. किंवा, पहाडावरचा एखादा पूर न्यावडा नदीतून अजूनही वाहात असावा-दोन्ही तटांना धक्के देत, वेगाने. कुठं गडगडत दगड पडताहेत का? की चहाच्या मळ्यातल्या जनरेटरचा आवाज फॉरेस्टमधल्या नदीवरून प्रतिध्वनित होऊन इथपर्यंत येतोय? ढिबऱ्या आणि मेणबत्त्या, गॅसबत्त्या आणि कार्बाईडच्या उजेडात हाटामधल्या माणसांच्या आकार खूप मोठा झालाय. पण अंधारच अधिक आहे. मध्ये-मध्ये प्रकाशाचा स्पर्श आहे, अन्यथा मधल्या रिकाम्या जागेतून क्षितिजाकडे किंवा बेचितपणे आकाशाकडे नजर गेली, तर अंधारच दिसतो. प्रकाशाच्या विविध वर्तुळांमध्येही फक्त उज्वलताच आहे, असं नाही; एखाद्या मदेशिया महिलेच्या पाठीवर बांधलेल्या बाळाचं डोकं डुलतं, तिच्या केसांमधलं एखादं लाल रंगाचं जंगली फूल दिसतं, तिचा काळा चेहरा अंधारात मिसळून गेलेला असतो. एखाद्या तगड्या आदिवासी पुरुषाच्या अंगावरचा पांढरा बनियान दिसतो, एखाद्या राजवंशी रमणीचे हात, गळा, खांदा दिसतात, एखाद्या आदिवासी रमणीच्या पांढऱ्याशुभ्र दातांची ओळ अंधारात चमकते, एखाद्या मंगोलियन वंशाच्या वाटणाऱ्या वृद्धाच्या चेहऱ्यावरील वडाच्या खोडावर दिसतात, तशा सुरकुत्या दिसतात.

## दहा

# हाटाआडचा हाट

हाटाच्या पूर्वेकडून जो रस्ता उत्तरेला वळलाय, त्या समकोणातच तर हा हाट

भरलाय. हाटाजवळच्या, रांगेत असलेल्या दुकानांनी हाटाला रस्त्यापासून बाजूला केलं आहे. बऱ्याचशया दुकानांची तोंडं रस्त्याकडे आहेत. दर दोनेक दुकानानंतर थोडी मोकळी जागा-हाटामधून बाहेर पडण्यासाठी. अशा अनेक मोकळ्या जागा.

अशाच एका मोकळ्या जागेवरून, दुकानांच्या दोन रांगांच्या मध्ये, तागाच्या बाजारात उत्तरेला, एका लांबट जागेवर आहे हाटाआडचा हाट. खूप जवळजवळ, एका रांगेत ढिबऱ्या पेटलेल्या आहेत. या ढिबऱ्यांचा प्रकाश एकीकडे बाहेर पडू शकत नाही, फक्त माणसांच्या चेहऱ्यांवर आणि डोळ्यांवरच प्रकाश पडतोय आणि एका बाजूच्या ज्योतींना कुठलाही आडोसा नाही. जणू वाऱ्याचा झोतामुळे त्या आता विझून जातील, असं वाटतं. सट्टा, जुगार आणि डुगडुगी खेळणं चाललयं. जुगाराची टेबलं जमिनीवर किंवा स्टुलावर रांगेने ठेवलेली आहेत. कुणाचही बोलणं किंवा कुठलाही आवाज ऐकू येत नाही. काही काही माणसं उभी राहून कधी या, तर कधी त्या टेबलाकडे डोकावतात, पण बरीचशी माणसं माना खाली घालून खेळताहेत. जागा जवळजवळ अंधारलेली आहे. कुणीही काहीही पहात नाही. संध्याकाळ झाल्याबरोबर हा बेकायदा हाट बसलाय. खरा हाट उठून जाईल, पण हा हाट वाटेल तितका वेळ चालेल, पण बेकायदेशीर असल्याने त्यात एक प्रकारची घाई येते. सर्वांना जणू सारख्याच घाईत आपले खेळ उरकायचे आहेत.

आणखी एका बाजूला ॲल्युमिनियमच्या डेगच्या आणि ग्लास घेतलेल्या तरुणी आहेत. डेगच्यांवर गमछांची झाकणं आहेत. त्यांच्याकडे आहे गावठी दारू-हाडिया किंवा पचाई. कुणाही दारू चढलेल्या इसमाचा चीत्कार ऐकू येत नाही. सगळ्यांचं बोलणं खूप दबल्या स्वरात, अगदी कुजबुजल्यासारखं, स्वरांच्या जडपणामुळे कोण काय बोलतयं ते नीट लक्षात येत नाही. अतृप्त आकांक्षेप्रमाणे त्यांचे स्वर वाटतात.

कुणीतरी जमिनीवरून उठतो. इतका वेळ जमिनीवर पडलेला होता. उकिडवा बसून, दोन गुडघ्यांवर दोन हातांचा भार देऊन उभा राहू जाताना पुन्हा बसतो. पुन्हा प्रयत्न केल्यावर सरळ उभा राहू शकतो. मान थोडी डोलतेय्. त्यानंतर उभा राहून अंधाराकडे पहात म्हणतो, 'देखले, देख! देऽख देख, भाईमन अउर बहिनमन, देखो, हम खडा उठलेक हो - खऽऽ डा!' उभं रहाण्यासाठी आणि तोल सांभाळण्यासाठी त्याला थोडे कष्ट पडतात. पाय लटपटू नयेत, मान लटपटू नये यासाठी त्याला थोडे कष्ट पडतात. पाय लटपटू नयेत, मान लटपटू नये यासाठी त्याला कमरेत वाकावं लागतं. अंधारात त्याचा अत्यंत एकाकी असा प्रयत्न चालू रहातो - तो ठाम, सरळ आणि पायांत अंतर ठेवून उभा राहतो, मान सरळ; पोट छाती मधून मधून गळून जाऊ पहाते, पण कंबर हलवून त्याला तोल सावरावा लागतो. तोल सांभाळताना एखादा पाय गुडघ्यात वाकून पडू पहातो, पण तेव्हा पोटाचं डोलणं छातीपर्यंत आणून छाती थोडी डोलवून तो कसाबसा उभा रहातो, आणि त्याचबरोबर तो स्थिर मानेने, स्खलित उच्चारांत आव्हान देतो, 'कुन

कहथे मै मातगेलाक? कभी नहीं! हम कभी मतवाले ही नही सकते! एई देख! हम एइ दोनों पाय पर खडा हाय! एइ देख. पक्का देख. हमारा ई माथाठे भी खडा हाय तब? तब भी हम मातवाल? कभी नही! एइ देख, हम पारीड करेगा. रेऽऽडी, वन-टू-थ्री, लेफ्ट राईट'-त्या इसमाला दोनपेक्षा अधिक पावलं टाकता येत नाहीत. तेवढ्यातच तो ठेचकाळून पडतो. जमिनीवर पडून रहातो.

त्यानंतर काही वेळाने तो इसम तळहात गुंडघ्यांवर ठेवून उठतो पण बसत नाही. तो हाडियाच्या रांगेकडे जातो. नंतर एका जागी जाऊन थांबतो. उकिडवा होऊन बसतो. पुन्हा उभे रहाण्यासाठी दोन गुडघ्यांवर दोन हातांचा भार देतो, पण उठू शकत नाही किंवा उठण्याचा प्रयत्नही करीत नाही. तिथूनच अंधाराच्या दिशेने पहात-पहात म्हणतो, 'देख, हम परेड भी करलेक, अभी हमको अउर एक ग्लाश दे. हम तो मातोवाल नाही होलाक, हे डायना, हम जरूर अउर एक ग्लाश पिगा, हे डायना, हमको जरूर-'

ग्लासांमधून हाडिया देणाऱ्या तरुणीजवळ जाऊन तो इसम उभा रहातो. पिणारे लोक त्या इसमाकडे ढुंकूनही पहात नाहीत. त्या तरुणीजवळ जाऊन तो बसण्याचा प्रयत्न करतो. पण पाय वाकवल्याबरोबर त्याचा तोल जातो. तोल सांभाळता न आल्याने धप् दिशी पडतो. जमिनीवर सरळ होऊन बसत पुन्हा त्याच तरुणीकडे हात पुढे करीत म्हणतो,'हे डायना, हम जरूर पियेगा, पैसा ले, दारू दे!' त्या तरूणीने त्याच्याकडे नजर न वळवताच उजव्या हाताने एक धक्का दिल्याबरोबर तो इसम एकदम उताणा पडतो. पुन्हा उठत नाही.

वाऱ्यासारख्या कुजबुजत्या रहस्यमय आवाजात शब्द ऐकू येत रहातात - 'जपानी टेरिलीन, साठ रुपये पँट पीस, सीको घड्याळ' डाव्या तळहातावर ठेवलेल्या एका घड्याळाच्या रेडियमच्या विदेशी प्रकाशात एक आदिवासी हनुवटी चमकते. तो पुन्हा मूठ बंद करतो. प्रकाश बंद होतो; वाऱ्यावर शब्द ऐकू येतात 'जपानी हाँगकाँग, मेड इन् यु. एस. ए.' सट्टा आणि जुगार खेळणारे उकिडवे बसून खेळताहेत. चाक थांबल्यावर, किंवा डुगडुगी उचलल्यावर, किंवा डाव जिंकल्यावर एकदम सगळ्यांचा 'हिस' असा आवाज येतो. पुन्हा दबलेली हिंस्र नीरवता पसरते.

जुगाराच्या बोर्डावर काही दिसत नाही. ढिबरीचा उजेड माणसांच्या चेहऱ्यांवर लखलख करीत होता, दपदप करीत होता, मागे जात होता. हाटाच्या दूरदृश्याप्रमाणे नव्हे, अगदी निकट-दृश्या-प्रमाणे : इतकं निकट की, हात-पायसुद्धा दिसत नाहीत, फक्त चेहरा, किंवा भुवईची रेघ किंवा काळ्या कुळकुळीत नाकाची एक नाकपुडी. सट्टा-बोर्डाच्या ढिबरीच्या उजेडात बोर्डाच्या मालकाचा चेहरा ओळखता येत नाही. नेपाळी, राजवंशी, मेच, कूच, राभा - यांच्यापैकी तो कुणी का असेना, मागून पाहिला की संताळासारखाच वाटतो.

## अकरा

# हाटाची सामाजिकता

मुख्य रस्त्यांच्या दोबाजूंच्या दुकानात गॅसबत्त्या, उजव्या हाताला थोड्याच अंतरावर एक आंतर-राज्य वाहतूक करणारा ट्रक थांबलेला. डावीकडे चहाच्या दुकानांमध्ये गच्च गर्दी. उजवीकडे आणि डावीकडे पाहून सुहास हाटाचा नकाशा जणू पुन्हा एकदा मनातल्या मनात रेखाटतो.

सुहास मिठाई आणि चहाच्या दुकानांच्या दिशेने जातो.

त्या दुकानाबाहेरच्या बेंचवर बसावंसं सुहासला वाटत होतं. पण तिथं आता खूपच गर्दी आहे. वर्तमानपत्रांच्या कागदांच्या तुकड्यांवर जिलेबी आणि शेव. खाणारे मुख्यत: चहाच्या मळ्यातले मजूर पुरुष आणि महिला - इकडच्या भाषेत त्यांना 'मदेशिया' म्हणतात. अनेकजण स्वत:ही खाताहेत, तुकडे करून करून कुशीतल्या मुलांनाही खाऊ घालताहेत.

सुहासला आत जाऊनच बसावं लागलं आणि आतच बसायचं असेल, तर मग अगदी आतल्या भिंतीजवळ बसलेलं चांगलं. मायकाटॉप हायबेंच. समोर बेंचही आहेत, कुठे कुठे घडीच्या खुर्च्याही. सुहास एका घडीच्या खुर्चीवर, इतरांपासून अलग असा बसला. त्याच्या समोरच्या आणि जवळच्या सगळ्याच टेबलापाशी लोक बसलेले होते. सुहासला फक्त एक कप चहा घेण्याची इच्छा होती. तो अगदी बेचव असणार हे त्याला ठाऊकच होतं. पण इतक्या आत बसून फक्त चहाच घेणं योग्य की अयोग्य हे त्याला समजत नाही. पोऱ्या आल्यावर तो त्याला म्हणतो, 'एक कप चहाच द्या, नंतर काही घ्यायचं झालं तर सांगेन.'

पण पोऱ्या लागोलग एका बशीत मिक्स मिठाई घेऊन येतो. पोऱ्या अगदी सुहासच्या तोंडासमोर ती बशी आणून उभा राहिला नसता, तर ही बशी आपल्यासाठीच आहे हे सुहासला समजलंच नसतं. सुहास काही बोलण्याआधीच धोतर आणि बनियान घातलेला एक माणूस समोर येऊन उभा रहातो. सुहासला समजतं, हा दुकानमालक. इतका वेळ बसून राहिल्याने त्याच्या धोतराची गाठ बरीच खाली सरकलीय्. बनियान त्याचं पोट झाकू शकत नाही. खूप तलम धोतर आमि तलम बनियानच्या मधल्या भागात अंगावरचे केस दिसताहेत.

पोऱ्याच्या हातून ती बशी घेऊन मालक म्हणतो, 'पाणी घेऊन ये!' त्यानंतर दोन्ही हातांनी ती बशी सुहासपुढे धरून म्हणतो, 'सर, घ्या सर, माझ्या दुकानातली मिठाई सर कलकत्त्याला जाते. चहाच्या मळ्यांचे साहेब बागडोगराला प्लेन धरायला जाताना इथून

मिठाईचं पॅकेट घेऊन जातात सर. बिकानेर स्वीट्स, सर!'

शक्य असतं, तर सुहास तिथून उठून पळाला असता. पण त्या माणसाच्या बोलण्याने, त्याच्या दुकानाची आणि मिठाईची तारीफ ऐकल्याने सुहासला जर बरं वाटतं. पण तो माणूस त्याच्यासमोर दोन्ही हातांनी इतक्या मिठायांनी भरलेली डिश घेऊन उभा आहे, की त्या पाहूनच मळमळल्यासारखं होतं. सुहास घाईने इकडंतिकडं पहातो. समोरच्या बेंचवर ग्राहक हा प्रकार पहाताहेत हे त्याच्या लक्षात येतं, पण दुकानभर बसलेले मदेशिया आणि शेतमजूर इकडे पहातही नाहीत.

ताबडतोब हा प्रकार संपवण्यासाठी सुहास म्हणाला, 'मी मिठाई खाऊ शकत नाही. आता आपणच आणली आहे, तर अगदी एक तुकडा द्या.'

"अच्छा सर, मी आग्रह करीत नाही. पण आपण चव तर पहायला हवी. रोज एका मिठाईची टेस्ट घेतलीत, तर इथळ्या सगळ्या मिठायांची टेस्ट होऊन जाईल. डिश आण रे!" मालकाच्या आवाजात चांगले चढ उतार आहेत.

डिश म्हणजे किमान दोन. सुहास ताबडतोब हात पुढे करून मालकाला म्हणतो,' हातात द्या - फक्त एकच.'

'हे कसं काय सर, आपल्याला हातात देऊ?'

'मला हाताने खाणंच चांगलं वाटतं.-' सुहास मनातल्या मनात वैतागतो. अचानक त्याला वाटतं, दुकानातून बाहेर पडावं.

बहुधा त्याचा चेहरा पाहून दुकानदाराला अंदाज येतो. तो सर्वात खालची एक लांब, गोल आकाराची, सर्वात मोठी मिठाई बाहेर काढतो. सुहास संदेशकडे बोट दाखवून म्हणतो, "तोच द्या."

'हे काय सर, एवढ्याशाने काय होणार सर, संदेश तर तोंडात घातल्याबरोबर विरघळून जाणार.'

'ठिक आहे, मग हीच द्या.'

दरम्यान पोऱ्या डिश घेऊन येतो आणि ती बेंचवर ठेवतो. त्यात संदेश ठेवून आणखी एका मिठाईला चमचा लावल्याबरोबर सुहास डिश बाजूला घेऊन म्हणतो, 'ऊं ऽ हूं ऽ हूं!'

दुकानदार हे:हे करून हसतो आणि 'सर, चहा पाठवून देतो' म्हणून तिथून निघून जातो.

समोरच्या बेंचवर बसून जे लोक खात होते त्यांच्यापैकी एकजण उठून सुहासला नमस्कार करून बाहेर जातो. सुहासला प्रतिनमस्कारासाठी वेळ मिळत नाही. त्यानंतर हाट-कमिटीचा तोच प्रौढ माणूस येऊन त्याच्या समोरच्या बेंचवर बसतो, 'हाट पाहिलात?'

'आता तर संध्याकाळ झालीय्. बहुधा दुपारी गजबजत असावा हाट.'

'नाही. तशी अजूनही गजबज आहेच. हा तर डूयार्समधला एक मोठा हाट. धूपगुडीचा हाट यापेक्षा खूप छोटा. धूपगुडीचा हाट तर घाऊक हाट असतो.'

सुहासला आठवतं. तो विचारतो, 'अच्छा, इथं मिरच्या फार होतात का? बाजारात तर सुकल्या मिरच्यांचे डोंगर पाहिले!'

पोऱ्या येऊन चहा ठेवतो.

'नाही नाही, इथं मिरच्या होतात कुठं? इथं मिरच्या होत नाहीत. क्रान्तिहाटमध्येही काही वर्षांपूर्वीपासून मिरच्या, किंवा सुकल्या मिरच्या आल्या नाहीत. तेव्हा नारायणप्रसादाचं गोडाऊन होतं शिलिगुडीला.'

'नारायणप्रसाद कोण?'

'तो म्हणजे या तमाम इलाख्याचा, आसामचा, सुकल्या मिरच्यांचा डीलर. उमराच्या सुकल्या मिरच्या मालगाडीतून इथल्या स्टेशनवर येतात.'

'मग तो इथं काय करतो?'

'नारायणप्रसादने तीन वर्षांमागे इथं एक चहाचा मळा विकत घेतलाय्. तो मळा सहा महिन्यांतच बंद झाला. नारायणप्रसादने त्याच्या त्या मळ्याच्या गोडाऊनलाच करून टाकलं सुकल्या मिरच्यांचं गोडाऊन. बस्स्! तेव्हापासून आसाम आणि बाकी सगळ्या ठिकाणांचा मिरच्यांचा घाऊक व्यापार होतो या क्रान्तिहाटात. त्यासाठीच तर क्रान्तिहाट एवढा प्रसिद्ध आहे!'

'आणि तो चहाचा मळा?'

'तो साधारण वर्षापूर्वी उघडला. पण फॅक्टरी तर काही चालू नाही. ग्रीन टी विकून टाकतात. गोडाऊन मात्र सुकल्या मिरच्यांचंच आहे.'

सुहासचा चहा पिऊन झाला होता. त्याने विचारलं, 'आणि बटाटे?'

'या वर्षापासूनच एक कोल्ड स्टोअरेज सुरू झालंय् ओदलाबाडीला.'

'मग त्याचा इथल्या बाजाराशी काय संबंध?'

'ते काही नक्की सांगता येत नाही. इथं एखादं असं थंड गुदाम असाव असं वाटतं.'

सुहास आधीच उठून उभा राहिला होता. आता त्याने हळू हळू बाहेर जायला सुरुवात केली. तेव्हा तो माणूस मागेमागे येऊन म्हणाला, 'माझ्या विनंतीवर जरा विचार करा. त्यात तर काही दोष नाही. माझ्या घरी नातेवाईक आहेत, कुटुंब आहे.'

त्या गृहस्थाच्या आवाजात असा काही जिव्हाळा आणि आर्तता होती, की सुहासला मान वळवून पहावं लागतं. इकडल्या बेंचवरचा एक मोठा लोकांचा गट खाणं झाल्यानंतर उठून पैसे देण्यासाठी उठून चालला होता. जवळजवळ रांगेत तो गट एकच होता हे लक्षात येत होतं. त्या बाजूने बाहेर जाईल. त्यामुळे सुहासला घाईने दुकानातून बाहेर येऊन

दुकानासमोर उभं रहावं लागलं.

तो माणूसही मागे-मागे येऊन थांबला. सुहास तेव्हा त्याला म्हणाला, 'आपण असं बोलल्याने मलाच ओशाळल्यासारखं वाटतं. आम्ही तर इथं रहाणारच.'

तो माणूस दोन्ही हात समोर घेऊन नम्र भावाने मान हलवतो.

प्रियनाथ थोडा दूर उभा होता. सुहासशी आणखी दोन चारजण बोलत असताना प्रियनाथ पुढे होऊन, त्यांच्यामागून म्हणतो, 'सर, मी हे कॅम्पमध्ये ठेवून येऊ?'

सगळेच मान वळवून एकदा प्रियनाथला पाहून येतात. त्यांना नीट पहाता यावं म्हणूनच जणू आपला चेहेरा प्रकाशात राहील असा तो उभा राहतो. यानंतर तर सगळ्यांना त्याच्याशीच बोलावं लागणार आहे.

'आपण जा, मी निघालोच', सुहास प्रियनाथला म्हणाला. त्यानंतर अचानक गर्दी दूर झाली. आता आपण इथून निघून जाऊ शकतो असं सुहासला वाटतं. पण मोकळ्या जागेतून, बाहेर पडण्यासाठी पाऊल टाकताच एक खूप बुटकासा माणूस समोर येऊन, नमस्कार करून उभा राहिला, आणि खूपच मऊ आवाजात म्हणाला, 'माझं नाव नौशेर आलम.'

'आँ!' म्हणून, चकित झालेला सुहास त्याला प्रतिनमस्कार करायला विसरलाच. नौशेर आलम - हे नाव तर जवळजवळ गॅझेटियरमध्ये आलंय्. नौशेर आलमने सरकारला निम्म्यापेक्षा अधिक केसेसमध्ये-अगदी सुप्रीम कोर्टापर्यंत हरवलंय्. उरलेल्या जमिनीवर इंजंक्शन. 'नौशेर आलम' या नावाचा माणूस दिसायला डाकूसारखा असेल असं सुहासला वाटलं होतं, पण प्रत्यक्षात तो असा बुटका; साधारण माणूस निघाला. सुहासचं आश्चर्य कमी होण्याच्या आतच, इतर सर्वांकडे पाहून नमस्कार करून, खूप सहजपणे 'अच्छा, चलतो' म्हणून नौशेर गर्दीतून बाहेर निघून गेला.

## बारा

# शेषहाटीपासून बाजार संपतो

कुणीही, काहीही हाटाबाहेर नसतं, असा एक चरम बिंदू असतो. तेव्हा जे हाटाच्या मार्गावर असतात, अद्याप हाटात पोचलेले नसतात, तेही दूरवरूनच हाटामध्ये प्रवेश करतात. हीच वेळ अशी असते, की तेव्हा हाटाने जणू आपल्या चारही बाजूंच्या अनिर्दिष्ट सीमा मोडलेल्या असतात. हाट वाढण्याच्या आणि गजबजण्याच्या त्या अस्पष्टतेत हाट जणू आणखी वाढत नाही. त्याच वेळी संध्याकाळ उतरते. माणसांच्या पावलांमुळे उडणाऱ्या धुळीत सारं अस्पष्ट होऊन जातं. कुठं-कुठं ढिबऱ्या पेटून लांब, अधिक लांब

सावल्यामुळे हाटातली गर्दी जणू काही क्षण वाढल्यासारखी वाटते. या अवस्थेतच काही क्षणानंतर दिसतं, हाटाच्या या टोकापासून त्या टोकापर्यंत लोकांचे चेहेरे आता बाजाराच्या विपरीत दिशेकडे आहेत. ते बाजाराच्या दिशेने नाहीत-आता माणसांचे आहेत केंद्राच्या विरुद्ध हाट संपला आहे, उठायला सुरुवात झाली आहे. कधीतरी चरम सीमेवर पोचून आता हाट कमी होऊ लागला आहे. माणसांच्या पावलांच्या चिन्हांची दिशा बदलली आहे.

हाटाकडे जाताना माणसं एकमेकांशी जितकं बोलतात, त्याहीपेक्षा अधिक ती हाटाहून परतताना बोलतात. की, हाटाहून परतताना नेहमीच अंधार असतो; माणसं एकमेकांना पाहू शकत नाहीत, म्हणून गप्पा मारीत-मारीत एकमेकांचा अंदाज घेतात: गप्पा मारीत-मारीत रस्ता कापतात. की, हाट संपल्यामुळे त्याचं सरमिसळ समवेत आवाजाचं केंद्रच भंगून जातं आणि त्यांचे तुकडे चारीकडे विखरून पडतात?

हाटाची सुरुवातही दूरच्या माणसांच्या आगमनाने होते. आणि शेवटही दूरची माणसं निघून जायला लागल्याने सुरू होतो. ज्यांना बस धरायची असते, ते सर्वांत आधी हाटातून बाहेर पडतात. ज्यांची बस हाटातूनच निघणार असते, ते त्यांच्या नंतर निघतात. त्यानंतर ज्यांच्या रिक्षा थांबलेल्या असतात, ते लोक उठतात. त्यांच्या शेवटी उठतात, सायकलवर जाणारे. हा संपूर्ण वेळ पायी फिरणारे परतत असतात. पण त्यांची संख्या हळूहळू वाढत-वाढत जाते. आणि दूर-दूर रस्त्यांवरून माणसांचे आवाज इथवर येत येत शेवटी हाटाच्या आसपासच्या गोंगाटात मिसळून जातात. जे सर्वात शेवटी येतात, ते सर्वात शेवटी जातात.

माणसं ज्या प्रकारे बाजारात येतात, त्याच प्रकारे तर परत जातात- मालाचं ओझं घेऊन, पशु-पक्षी झुलवीत किंवा ओढीत. मध्यंतरी किंवा बाज़ारात त्या मालाचं किंवा पशुपक्षांचं हस्तांतर होतं, एवढंच. हळू-हळू संध्याकाळच्या अंधारात पशुपक्ष्यांच्या डोळ्यांसमोरचा सवयीचा प्रकाश बदलतो. सवय नसलेल्या सगळ्याच गोष्टींची पशुपक्षांना भीती वाटते. पण त्या अपरिहार्य अंधारात सवयीची एकमेव गोष्ट असते, ती म्हणजे माणसाचा आवाज आणि स्पर्श. हाटामध्ये येण्या-जाण्याचा मार्ग या पशुपक्ष्यांच्या अनिश्चिततेच्या आवाजांनी गजबजतो, किंवा कबुतरं-बदकं-कोंबड्यांच्या अनिश्चित स्तब्धतेने. 'हम्बा' असं हंबरणं ऐकून कोणतं वासरू विक्री न होता सवयीच्या हातांच्या ओढीने घरी चाललंय्, आणि कोणतं वासरू विक्री झाल्याने नवीन दोरीच्या ताणाने घरी चाललंय हे नक्की थोडंच सांगता येतं?

तो घोडेस्वार आणि त्याचा घोडा आता मोकळ्या हाटातून वळतात. घोड्याचा पार्श्वभाग वादळात डोलणाऱ्या एखाद्या टपरीसारखा डोलतोय् - जणू कुठल्याही क्षणी मोडून पडेल. घोड्यांची शेपूट आता माशा उडवण्यासाठीही फटकारली जाणार नाही, अशी मागच्या दोन पायांमध्ये झुलतेय्, घोडेस्वार आपल्या दोन्ही हातांचा भार घोड्याच्या

खांद्यावर देऊन, आपली मान खाली घालून बसलाय्. त्यामुळे घोड्याची मान लांब होऊन झुलतेय्. तरीही घोडा घासाला मात्र तोंड लावत नाही.

तो घोडा आणि त्यावरचा स्वार आता रिकाम्या हाटाच्या गल्लीबोळांमधून फिरताहेत - जणू अजूनही तिथे हाट भरलेलाच आहे-जणू अजूनही त्याला माणसांमधून वाट काढीत पुढे जायचंय्. पण आता घोडेस्वार आपली भिक्षेची झोळी काठीच्या टोकाला अडकवून पुढे करीत नाही. आता घोड्यालाही मागून धक्का बसल्याने दचकावं लागत नाही. अस्पष्ट चांदण्यात फिरत-फिरत घोडा आणि घोडेस्वार जणू निर्जन हाटाच्या गल्लीबोळांमधून वळणं घेत-घेत, मैदानांमागून मैदानं ओलांडीत वस्तीकडेच चालले आहेत. कदाचित तो घोडेस्वार आंधळा असेल. कदाचित तो घोडा आंधळा असेल. कदाचित घोडा आणि घोडेस्वार दोघांनाही झोप लागली असेल. या घोड्याचं आणि घोडेस्वाराचं खरोखरच एखादं गंतव्यस्थान आहे की नाही, हे आता या मध्यरात्री, रिकाम्या हाटात समजत नाही.

दुपारची आणि रात्रीची सारी दृश्यं आता रात्रीच्या अंधारात छायामूर्ती झाली आहेत. उदाहरणार्थ, नदी, पहाड पर्वत किंवा जंगलाप्रमाणेच या हाट-मैदानाची नैसर्गिक बाजू जोपर्यंत या हाट-मैदात माणसं होती, प्रकाश होता, हलणाऱ्या चंचल सावल्या होत्या, पशू आणि माणसांचे आवाज होते, तोपर्यंत त्याचा विस्तार नव्हता, जणू सारं दृश्य संहत असं होतं. आता, मध्यरात्रीनंतर, या निर्जनतेत, नि:शब्दतेत, हे हाट-मैदान जणू आपल्या नैसर्गिक विस्तारात परत जात आहे - हळू-हळू, एखाद्या सजीव प्राण्याच्या अनिवार्यतेप्रमाणे. या रात्रीत आणि अंधारात संपूर्ण दिवसाची गडबड जणू खोटीच वाटते.

पण हाट अद्याप पूर्णपणे निर्जनही नाही. एवढा पहाड-पहाड माल परत गेला की काय? काही बहुधा शिल्लक आहे, उद्या सकाळी जाईल. ती असंख्य मातीची भांडी. अंधारातून गो-हाटाकडून ऐकू येणारं हंबरणं. संपूर्ण हाटामध्ये, आणि हाटाआडच्या हाटातही इकडे-तिकडे तीन-चारजण पिऊन लास झालेली माणसं पडलेली आहेत - आता अंधारात त्यांच्या अंगांचा तांब्यासारखा किंवा काळा वर्ण मिसळून गेलाय्, त्यांच्या चेहेरेपट्टीची मंगोलियन किंवा ऑस्ट्रिच धार हरवून गेलीय्, त्यांच्या कुरळ्या किंवा उभ्या केसांनी झाकलेल्या डोक्यांचा आकार अंधकारापासून वेगळा करता येत नाही. संपूर्ण रात्रभर त्यांच्यावर अविरतपणे दंव पडत राहील. आतून तापलेली ती शरीरं त्यामुळे थंड होतील. उद्या सकाळी, किंवा रात्रीच कधीतरी, ही माणसं आपली नशा उतरलेली पाहून पहाडांकडे, नद्यांमधल्या बेटांवर किंवा जंगलात परततील.

जेव्हा उगवण्याआधी चंद्र क्षितिजाखाली असतो, किंवा एखाद्या पहाडामुळे चंद्र झाकला जातो, किंवा मैलोनमैल पसरलेल्या फॉरेस्टपलीकडे नदीपार चंद्र असतो, तेव्हा जसा असतो, तसा सारा निसर्ग आता सावल्यांत बुडालेला आहे.

## तेरा

# साहेबाचा आत्मविलाप

सुहास म्हणाला होता, काहीही झालं, तरी स्वैपाक कॅम्पमध्येच करणार. म्हणूनच तर शेवटी ज्योत्स्नाबाबू आणि विनयबाबूंनीही ते स्वीकारलं. हे म्हणजे मंत्र्यांनी एक कुदळ मारून, पराकोटीचे काबाडकष्ट करणाऱ्या मजुरांना उत्तेजित करण्याच्या नावाखाली त्यांचा अपमान करण्यासारखं होतं. ज्योत्स्नाबाबू काही त्याचे कर्मचारी नव्हते. ते होते प्रायव्हेट लॅण्ड-सर्व्हेयर. विनोदबाबूंच्या ओळखीचे गृहस्थ. ते बरोबर असले की काम वेगाने पुढे सरकतं. पार्ट्या त्यांच्याकडून कागदपत्रं तयार करवून घेतात. पण कर्मचाऱ्यांसमोर त्याला जे याप्रकारे एक 'उदाहरण' म्हणून उभं रहावं लागलं यामुळेच सुहासला स्वत:बद्दल एवढं असमाधान वाटतंय्. आणि या प्रकाराची इतकी काही चर्चा झाली, की त्यामुळे त्याला 'नैतिक कर्मसूची 'चा, किंवा 'अंटि-करप्शन ड्राइव्ह' चा चेहरा प्राप्त झाला. जणू सुहास कुणा नैतिकतेच्या किंवा संस्काराच्या प्रयोजनासाठी अशा एखाद्या व्यवस्थेचं प्रतिपादन करीत होता!

पण विकल्पसुद्धा समजू शकत नसल्यामुळे सुहासचं असमाधान वाढतं. तो आज हाट-कमिटीचे जोतदार आणि चहाच्या मळ्याचे मॅनेजर यांच्या घरी किंवा बंगल्यावर पाहुणा म्हणून राहून इथल्या जमिनजुमल्याचं बेकायदा बळकावणं किवा कायदेशीरपणे ताब्यात घेणं किंवा जमीनीचं कायदेशी परिमाण यांच्यासंदर्भात निर्णय करणार की काय? इथंही सुहास एका पेचात पडलाय्-सेटलमेंट ऑफिसर म्हणून येऊन तो इथं भूमि-युद्ध घडवणार की काय? त्याचं काम तर फक्त रेकॉर्ड तयार करणं आहे. रेकॉर्ड करताना एक-दोन ठिकाणी सत्यनिर्धारण करण्यात त्याच्या बुद्धीची किंवा विवेचनशक्तीची किंवा त्याहीपेक्षा अधिक म्हणजे इच्छाशक्तीची गरज पडेल. आता आहे बर्गादार नोंद करण्याचं काम. पण कुणाला रेकॉर्ड करायचं असेल तर तो रेकॉर्ड करील. सुहासला अगदी चांगलं माहीत आहे की जमिनीच्या आधियारीचा ताबा जिथे जोतदारावरच अवलंबून असतो-स्वत:च्या किंवा इतर अनेकांच्या जाणकारीवर नव्हे-तिथे बर्गादार रेकॉर्डिंग करायला जोतदारही येत नाहीत आणि बर्गादारही येत नाहीत. 'ऑपरेशन बर्गा' हा तर एक सरकारी कायदा आहे. इतर कायद्यांप्रमाणेच याही कायद्यात पळवाटा आहेत.

एवढं सगळं ठाऊक असतानासुद्धा सुहास या विभागाच्या संदर्भातले इकडे नकाशे वगैरे पाहून, गरज पडल्यास नवीन नकाशे तयार करवून, सेन्सस रिपोर्ट पाहून इतका तयार कसा झाला?

या मध्यरात्री सुहासलाच आपलं हे द्विधा आचरण दिसलं, त्यामुळे तो बेचैन झाला.

आपला काही अधिकार नाही हे ठाऊक असूनही, आणि या सगळ्या नोंदी करूनही काही समस्या सुटणार नाहीत हे ठाऊक असूनही, जर काही करता आलं, तर करावं यासाठी त्याने आपल्या परीने तयारी केली आहे.

जर सुहासने स्वतःच्या जेवण्याची व्यवस्था स्वतः केली असती आणि ऑफिसच्या कर्मचाऱ्यांनी पूर्वापार चालत आलेली त्यांची पद्धत स्वीकारली असती, तर सुहास वाचला असता का? पण जोतदार किंवा चहाच्या माळ्यांचे मालक काही स्वार्थाशिवाय लोकांना खाऊ घालीत नाहीत. मग तर या कर्मचाऱ्यांनीच आपल्या हातांनी जोतदारांची आणि चहाच्या मळेवाल्यांची काम करवून घेतली असती. सुहासचा सर्वांवर-सरकार-संगटन-कायदा यांच्यावर व स्वतःच्या व्यक्तिगत भूमिकेवर कितीही अविश्वास असो, जोतदार आणि चहाचे मळेवाले आपल्या ओंजळीने पाणी पितील, हे तो कसं मानणार?

पण त्याच्या सदुपदेशामुळे नाइलाज होऊन हे कमी पगार असणारे कर्मचारी त्यांच्या डेली अलाऊन्समधली काही रक्कम बचत करू शकणार नाहीत; तसेच अमुक इतके पैसे मिळणार म्हणून त्यांनी काहीएक अंदाजपत्रकही तयार केलेलं असणार. स्वार्थत्यागासाठी सतत आवश्यक असणारा आदर्शाचा डोस सुहासला मिळणार कुठं? आणि तो देणार तरी कशासाठी? त्यांचं एवढं नुकसान करणं योग्य आहे का? सुहासला तर त्यांच्यापेक्षा कितीतरी अधिक पगार मिळतो. त्याचा डेली अलाउन्ससुद्धा बराच अधिक आहे. त्याला अधिक पगार मिळत असल्याने व घरखर्च अधिक नसल्याने त्याची अधिक बचत होते, म्हणूनच सुहास आपल्या हाताखालच्या कर्मचाऱ्यांपुढे आदर्श म्हणून उभं रहाण्याचा दंभ दाखवतो की काय?

याबरोबर सुहासला आणखी एका संशयात अडकावं लागतं. ज्याप्रमाणे ऑफिसातील कर्मचारी त्याला 'ॲंटि-करप्शन ड्राइव्ह' मध्ये समर्थन देण्यासाठी बांधील असतात, त्याचप्रमाणे, त्याच कारणाने जे आर्थिक नुकसान होईल, ते भरून काढण्यासाठी दुसरी काही व्यवस्था तो करणार की नाही? आता लाच अधिक व्यापक होणार नाही ना? अर्थात्, सुहासच्या ओंजळीने आणखी पाणी पाजण्याचा प्रयत्न तर होणार नाही? तसं झालं तर सुहासला किती ठिकाणी लक्ष ठेवावं लागणार? कोणत्या बाजूला? एका बाजूची मागणी पूर्ण करण्यासाठी सुहासने स्वतःला आणखी किती पेचांत अडकवून घेतलं? व्यक्तिगत नीतिमत्तेसाठीच तो ऑफिससहित अडकून पडलाय की काय? पण हे तर तो ऑफिसर म्हणून त्याचं कर्तव्यच आहे- बेंगॉल सर्व्हिस बुक किंवा फायनान्स डिपार्टमेंट हँडबुकने निर्धारित करून दिलेलं. शेवटी, आपलं व्यक्तिगत नीतिमत्ताजनित आत्मद्वंद्व शांत करण्यासाठी सुहास ब्यूरोक्रॅसीच्या नीतितंत्राचं वस्तुनिष्ठ परिमाण या मध्यरात्री, कडवट मनाने शोधतो आहे की काय? जणू, ऑफिसर म्हणूनच त्याच्या आचार-आचरणावरून सत्-असत्, चांगलं-वाईट काय हे निर्धारित होणार आहे? तो स्वैपाक

करून खाणार म्हणून काय हेसुद्धा स्वैपाक करून खाणार? या कडेकोट व्यवस्थेत सुहास असा कसा काय 'फिट' होऊन जातो? की, साहेबांनी-म्हणजेच ब्रिटिशांनी-तयार केलेल्या व्यवस्थेत अशा प्रकारेच 'फिट्' व्हायचं असतं? सुहासच्या नोकरीतील या पहिल्याच कॅम्पमध्ये?

## चौदा

# फॉरेस्टरचंद्राची आत्मघोषणा

आता हे मैदान थोडं स्पष्ट दिसतंय्. बाजारमैदानावरची छपरं आणि घरं मिळून सावल्यांची एक नाक्षीही तयार झालीय्. ही नक्षी आकाशाच्या पार्श्वभूमीवर हळू-हळू तयार होतेय्. हळूहळू या नक्षीतली कारागिरी वाढतेय्, विस्तार वाढतोय्. झाडंझुडपं नक्षीमध्ये येताहेत. हळूहळू दूरची, अगदी क्षितिजाजवळची झाडंही या नक्षीत येताहेत. आणि त्याहीनंतर येताहेत मोठमोठ्या झाडांचे शेंडे, आता, या संपूर्ण भागाचा अंदाज नाना प्रकारच्या आणि कमीजास्त अंतरावरच्या सावल्यांवरूनच करता येतो. सावल्या इतक्या हळूहळू वाढतात आणि पसरतात, हळूहळू इतकं मोठं अंतर या सावल्यांमधून आभासित होतं, जणू कुठल्याही क्षणी या स्थिर सावल्या चंचल होऊ शकतील, किंवा या स्थिर छायांमधून एखादी चलच्छाया निघून जाऊन छायामय परिस्थितीला जिवंत करू शकेल.

नाना प्रकारच्या सावल्या इतक्या स्पष्ट झाल्या, की खालचा भाग तितकाच अस्पष्ट, अंधकारमय झाला. नाचाचं मैदान, मुख्य-रस्ता आणि हाटामध्ये प्रवेश करण्याच्या नाना वाटांवर अंधार जरा अधिकच गडद झाला. वरती, क्षितिजावर इतक्या नवीन-नवीन सावल्या तयार झाल्या, की सुरुवातीचा अंधार जणू आणखी तळाशी गेला. मैदानामध्ये तो तळ जणू घुसळून निघाला.

अर्थात् आकाशाच्या, क्षितिजाच्या नीरव परंतु द्रुतगतीने बदलणाऱ्या रूपामुळे वाटतं, की तळचा अंधकार बदलतोय. रात्र आणि अंधार तर सर्वांना व्यापूनच रहातात. म्हणूनच त्याच्या एका टोकाशी भोवरा तयार झाला, तर दुसऱ्या टोकाशी पाण्याचा लोंढा येतो, तसा अंधाराचा क्षीणसा लोंढा येतो.

पाण्यात तयार झालेला भोवरा जसा त्या ठिकाणामधूनच पाणी घुसळून काढतो, तसंच अंधारातही झालं. एकप्रकारचा गों-गों असा आवाजही ऐकू येतोय्-पण रात्री तर कितीतरी प्रकारचे आवाज येतात.

ही घुसळण फक्त अंधाराचीच नाही आणि आवाज फक्त रात्रीचाच नाही-हे स्पष्ट करण्यासाठीच जणू अंधार हळू हळू एका कठिण घुसळणीचं स्वरूप धारण करतो - दाट

जंगलात वाघिणीच्या एकटीच्या खेळण्यामुळे झाडाझुडपांत जशी घुसळण व्हावी, तसं स्वरूप. त्यानंतर त्या अंधारातून एका माणसाचे उभे रहाण्याचे प्रयत्न आणि त्यात अयशस्वी होऊन वारंवार पडणं चालू रहातं- नदीच्या प्रवाहात वहात चाललेल्या माणासाच्या गटांगळ्या दिसाव्यात, त्याप्रमाणे. जणू सर्कस दाखवणाऱ्या एखाद्या चतुष्पाद जनावराला दोन पायांवर उभं रहाणं अवघड वाटावं, तसं त्या माणसाला उभं रहाणं अवघड वाटतंय्- किती पराटोकीचे कष्ट होतात त्याला दोन पायांवर उभं रहाताना! पुन्हा नाईलाजाने खाली पडावं लागतं!

असं करीत शेवटी तो माणूस उभा रहातोच. अंगावर जणू अंधाराचं आवरण घेऊन तो उभाच रहातो. त्यामुळे अंधार कमी होत नाही, पण अंधाराच्या दाटपणाच्या छटा थोड्या कमी होतात, त्यांचं तारतम्य कमी होतं. त्यामुळे त्या माणसाची आकृती लक्षात येते- त्याशिवाय तर सगळ्या सावल्याच आहेत. पार्श्वभूमीच्या सावल्यांच्या रेघांमधून अधूनमधून थोडं आकाश दिसतं त्या माणसाने आपल्या डोक्यावर उचललेल्या दोन हातांची दहा बोटं आणि त्याच्या डोक्यावर केस त्यांच्या रेघा मागच्या अंधुक आकाशामुळे गडद दिसतात. तिथेही, बुडणाऱ्या माणसाप्रमाणे, तो माणूस हात हलवतो.

तो माणूस उठून उभा रहिल्यावर गों-गों आवाज येणं बंद होतो. जणू, तो आवाज त्या माणसाच्या उभे रहाण्याच्या प्रयत्नांचाच आनुषंगिक भाग होता आणि उठून उभं राहिल्यावर, उभ्या अवस्थेत टिकून रहाण्याच्या प्रयत्नात त्याने काही आवाजच केला नव्हता.

खूप वेळानंतर, जमिनीकडे पाहून बोलल्यावर गळ्यातून जसा आत्मगत आवाज येतो, तशा स्वरात तो माणूस हाक मारतो, 'हुऽजऽऊऽर.' त्याने ही हाक मारण्याआधी त्याच्या घशातून घडघड असा एक आवाज आला. हाक संपली, तरी आवाज येत राहिला. जोरात आवंढा गिळून त्याने तो आवाज बंद केला. जोरात आवंढा गिळायला गेल्याने त्याला गळ्यामध्ये जो अधिक जोर लावाला लागतो, त्यामुळे त्याची मान त्याच्या छातीवर झुकते, आणि जणू त्याचं डोकं हे डोकं नसून लॉकेट असावं, तसं छातीवर झुलत रहातं.

तो कशीबशी आपली मान सरळ करतो. परत खाली झुलेल, म्हणून मान फारशी हलवीत नाही. मान सरळ ठेवूनच तो हाक मारतो, 'हाऽकिऽम!' दुसरी हाक देऊ शकत नाही. ती दिली, तर पुन्हा डोकं मानेवर झुलायला लागेल - डोकं सरळ ठेवायला हवं. पण ते किती वेळ सरळ ठेवता येणार? ते जेव्हा स्वत:च्याच वजनाने खाली छातीवर झुकू पहातं, तेव्हा मान मागे वळवून, आकाशाच्या दिशेने पहात तो माणूस हाक मारतो, 'साऽहेऽब!'

तो माणूस जणू त्याचा हुजूर-हकीम-साहेब आकाशातून खाली उतरताना पहातो. आकाशातून उतरायला बराच वेळ लागतो ना! पण त्याचा हकीम-लँड सर्व्हेयर-जमिनीवर

उतरल्या-उतरल्या तर काही तो माणूस मान सरळ करून त्याच्याकडे पाहू शकत नाही. त्याला मान सरळ करण्यासाठी थोडा वेळ लागतो. मान सरळ करून तो अंधारात हुजूरांना शोधतो - इकडे-तिकडे, या कोपऱ्यात-त्या कोपऱ्यात, त्यानंतर एका दिशेने सरळ काही पावलं जाऊन, उभा राहून तो म्हणतो, 'हुजूर, मी आलोय्. मी फॉरेस्टरचन्द्र बाघारूबर्मन.'

फॉरेस्टर आपले दोन हात जोडू पहातो. पण कुठल्याही उपायांनी ते जमत नाही. दोन हातांच्या जणू दोन अलग गती, अलग भार. डावा हात वर उठतो, पण उजवा हात उठतच नाही. डावा हात नमस्काराच्या भंगिमेत बराच वर उचलून फॉरेस्टर डोळे आकुंचित करून पहातो, त्याचा उजवा हात नाही. डोळे आणखी बारीक करून, जणू तो पहातो- आपला उजवा हात गेला कुठं? नंतर उजव्या हाताला डाव्या हाताजवळ आणण्यासाठी प्रयत्न करीत रहातो. हळू-हळू उजवा हात वर येतो. इकडं डावा हात पुन्हा खाली जातो. तो तेव्हा दोन्ही हातांना स्थिर करून एकदा डाव्या, तर एकदा उजव्या हाताकडे पहातो. या प्रकारे दोनेकवेळा पाहिल्यानंतर तो अचानक दोन्ही हातांकडे पहातो. या प्रकारे दोनकवेळा पहिल्यानंतर तो अचानक दोन्ही हातांना नमस्काराच्या ठिकाणी ओढून आणतो. कसेबसे दोन्ही हात जुळल्यावर फॉरेस्टर त्या जोडलेल्या हातांकडे पाहून खूप हसतो, जणू दोन्ही हातांचा गोंधळ थांबवून त्याने त्या हातांना आपल्या ताब्यात आणलंय्.

मनातल्या मनात हसत, हातांकडे पहात फॉरेस्टर 'अरे वा!' म्हणतो, पुन्हा हसतो.

आता जोडलेले हात डोक्यापर्यंत वर न उचलता तो डोकंच हातांवर वाकवतो. डोकं सरळ हातांवर वाकत नाही-एका बाजूला झुकू पहातं. पण फॉरेस्टर ते झुकू देत नाही. तो हळूहळू डोकं जोडलेल्या हातांकडे नेऊ पहातो. दोन्ही हात कसेबसे जुळवले आहेत असं वाटतं- बोटं झुलताहेत, मनगटं वरच्या बाजूला. फॉरेस्टर मनगटांवर कपाळ टेकवतो. त्यानंतर हात जोडलेलेच ठेवून तो डोकं सरळ करतो. हळू-हळू सरळ करता-करता अचानक सरळ करतो - जणू मान फिट झाल्यावर 'खट्' असा आवाजही येतो. त्यानंतर फॉरेस्टर बोलू लागतो - 'हुऽजूऽर, मी फॉरेस्टरचन्द्र आलोय्.' एवढं बोलल्याबरोबर त्याची नजर आपल्या जोडलेल्या हातांवर पडते. तेव्हा, जणू फाडून वेगळे करावेत, तसे फॉरेस्टर आपले दोन हात अलग करतो, सरळ उभा रहातो. पुन्हा हसून म्हणतो, 'हुजूर, मी आलोय्. मी फॉरेस्टरचन्द्र. फॉरेस्टरचन्द्र बाघारूबर्मन. पाहून घ्या. माझा चेहरा, माझं शरीर, पाहून घ्या. टॉर्च लावा, किंवा माचिसची काडी पेटवा. पाहून घ्या. वन्-टू-थिरी-'

जणू खरोखर टॉर्च लागला असावा, अशा प्रकारे फॉरेस्टर उभा रहातो. हास्यामुळे त्याचे दोन्ही डोळे बंद झाले आहेत. त्याचे मोठे-मोठे दात दिसताहेत. तो आपलं तोंड फिरवून-फिरवून दाखवतोय्-जणू कुणी त्याचे फोटो काढतंय्. एकदा डावीकडे, एकदा उजवीकडे मान फिरवून, सरळ होऊन फॉरेस्टर विचारतो, 'हजूर, पाहिलंत ना मला? नीट पाहिलंत ना? माझं नांव लक्षात ठेवा हुजूर-फॉरेस्टरचन्द्र बाघारुबर्मन. बापाचं नांव-

पण बापाची गोष्ट सोडून द्या. आधी माझी स्वत:ची कहाणी सांगतो.'

ती कहाणी सुरू करायला जातानाही फॉरेस्टर थांबतो. अचानक दोन्ही तळहातांनी डोळे झाकून घेतो- 'तुमच्या टॉर्चच्या प्रकाशाने माझे डोळे दिपताहेत, हुजूर. तिस्तेच्या बेटातली वाळू चमकावी, तसे डोळ्यांपुढे प्रकाशाचे तारे चमकताहेत. थांबा हुजूर, ही चमक जरा कमी होऊ द्या.'

दोन्ही तळहातांनी डोळे झाकून फॉरेस्टरने काळोख आणखी काळा केला. नीरवता पसरली. त्या नीरवतेत आतापर्यंतचं बोलणंही विरून गेलं. शेवटी त्या नीरवतेतूनच फॉरेस्टरने सुरुवात केली, 'ऐका हुजूर, माझी एक गोष्ट ऐका. नाही, एक नाही, दोन. माझ्या गोष्टी दोन. काय आहेत त्या दोन कथा? एक म्हणजे ही, की तुम्ही जमिनीचे हकिम-सर्व्हेयर. तर, माझं नांव तुम्ही खोडून टाका. माझी थोडी जमीन होती. आपलचांद फॉरेस्टला लागून. मला तिथं पाठवलं गयानाथ जोतदाराने. नांगर-बैल-बियाणं सारं त्याचं. काही वर्षं मी तिथं हालुवा होतो-जमीन कसणारा होतो. आता नाही. माझं नावं खोडून टाका. ती जमीन लिहून द्या गयानाथ जोतदाराच्या नांवाने. बैल ज्याचे, बियाणं ज्याचं, कसणारा ज्याचा, पीक ज्याचं- जमीन तर त्याचीच असायला पाहिजे, हुजूर! तर ती जमीन मी, फॉरेस्टरचन्द्र बाघारुबर्मन, सोडून देतोय्. लिहा- श्रीफॉरेस्टरचन्द्र बाघारुबर्मन याला या जमिनीतून हाकलून दिलं हो ऽ ऽ ऽ!

शेवटची आरोळी संपवून फॉरेस्टर हसतो. हसतामुळे शरीराचा तोल जातो, म्हणून हसता-हसताच तोल सावरतो. हसणं संपल्यावर एक तृप्तिदर्शक आवाज काढून फॉरेस्टर म्हणतो, 'बस्, हुजूर! लक्षात ठेवा. आपलचांदच्या फॉरेस्टरचन्द्र बाघारूबर्मनला त्याचा देउनिया-जोतदार गयानाथ रायबर्मन याने हाकलून दिलं. गयानाथला सगळं शिकायचंय्. म्हणतो, अरे फॉरेस्टर, मला हलुवागिरी - जमीन कसणं-शिकव. हुजूर, मी उद्याच गयानाथला सगळं शिकवीन-नांगर कसा धरायचा, नांगरट का करायची, ते शिकवीन, त्याला शिकवीन - खत घालावं लागतं, चिखल करावा लागतो, पेरणी करावी लागते. सगळं शिकवीन - उद्या सकाळी. बस्, उद्या सकाळपासून गयानाथच जोतदार, गयानाथच हलुवा. मी आता जातो, गयानाथच्या घरी-त्याला हालुवागिरी शिकवायला.'

फॉरेस्टर जाण्यासाठी पाऊल उचलतो. त्यानंतर वळून उभा राहतो आणि म्हणतो, 'पण मला तर दोन गोष्टी सांगायच्या होत्या. एक गोष्ट म्हणजे मी, फॉरेस्टरचन्द्र, आता गयानाथ जोतदार याला मुक्त करीत आहे. लक्षात ठेवा हुजूर, फॉरेस्टरचन्द्र बाघारुबर्मन. इथं तर अनेक फॉरेस्टर आहेत. अनेक बर्मन आहेत. कोणता खरा अन् कोणता खोटा? हुजूर! नीट पहा. ज्या फॉरेस्टरचंद्रच्या डाव्या कुल्ल्यावर आणि पाठीवर उजव्या भागावर वाघाच्या नखांचे व्रण आहेत, तोच फॉरेस्टरचन्द्र अस्स्ल. हं, तर मग दाखवा! सगळ्यांनी कुल्ल्यांवरचं कापड वर करून कुल्ले दाखवावेत. दाखवा रे दाखवा! कुल्ल्यावरचं कापड वर घ्या अन् कुल्ले दाखवा,' फॉरेस्टर नाचल्याप्रमाणे एक गिरकी घेतो आणि खळखळून

हसत जणू त्याच्या चारी बाजूंना अनुपस्थित गर्दीतल्या एकेका माणसाकडे बोट दाखवीत म्हणतो, 'उचला, उचला, कुल्ल्यांवरचं कापड उचला!' एक गिरकी घेऊन झाल्यावर फॉरेस्टर नकारार्थी मान हलवीत म्हणतो, 'कुणीच दाखवू शकत नाही, हुजूर. सगळे कुल्ले झाकूनच उभे आहेत. कारण कुणाच्याच कुल्ल्यावर वाघाच्या नखांचे व्रण नाहीत. पण मी खरा फॉरेस्टरचनद्र बाघारुबर्मन आहे-आदि! मी माझे कुल्ले उघडे करून दाखवतो. थांबा हुजूर. तुमच्या टॉर्च माझ्या डोळ्यांवर मारू नका. हं, रेडी. वन्-टू-थिरी!'

फॉरेस्टर आपले कुल्ले उघडे करतो, आणि जणू खरोखरच टॉर्चचा उजेड पडत असावा, त्याप्रमाणे त्या काल्पनिक उजेडात आपले कुल्ले फिरून-फिरून दाखवतो. एक गिरकी घेतो-जणू त्याच्याभोवती खरोखरच बघ्यांची गर्दी असावी.

गिरकी संपल्यावर सरळ होऊन उभा राहून फॉरेस्टर म्हणतो, 'बस्, हुजूर. यांना समजलं आता, हा बाघारूच खरा फॉरेस्टरचन्द्र आहे. इथं फॉरेस्टर तर अनेक आहेत हुजूर-बर्मनही हुजूर अनेक आहेत. रायबर्मन हा एकटाच आहे. 'तर मी जातो हुजूर! गयानाथला हालुवाकाम शिकवायला जातो. तुम्ही उद्या शेरा लिहून टाका-बाघारूने आपली जमीन गयानाथ जोतदाराला देऊन टाकलीय्. तिथे आता गयानाथ नांगर धरून हालुवा होणार हो ऽ ऽ ऽ.'

'तर मी जातो हुजूर,' बाघारू काही पावलं जाऊन पुन्हा थांबतो, 'हुजूर, एक सिग्रेट ओढून जातो.' डाव्या कानावरून एक सिग्रेट काढून बाघारू ती ओठांत धरतो. विझलेल्या सिगारेटचा एक तुकडा उजव्या कानामागून आगकाडी आणि कानामधून काडीपेटीचा दारू लावलेला एक तुकडा बाहेर काढतो. नंतर सिगारेट ओठांतच ठेवून दबल्या आवाजात म्हणतो, 'साहेबांना वाटेल मला दारू चढलीय्. बघा ना, कशी फस् करून काडी पेटवतो-वन्-टू-थिरी!' पहिल्या झटक्यात काडी पेटली नाही. दुसऱ्या वेळी पेटली. काडी विझू नये म्हणून तो तिला दोन्ही पंजांत आडोसा करतो. काडीच्या उजेडात त्याच्या चेहेऱ्याचं मंगोलियन वळण स्पष्ट दिसतं. सिगारेट पेटवून,काडी फेकून देऊन, नाका-तोंडातून इतका धूर काढतो, की वाटतं, सिगारेट एकाच झुरक्यात संपली. सिगारेट बोटांत धरून बाघारू तिच्या पेटलेल्या भागाकडे पहात रहातो.

## पंधरा

# सर्व्हे पार्टीची यात्रा

**बाकीचे लोक उठल्याची आणि तयार होत असल्याची सुहासला चाहूल लागते. पण अजूनही त्याच्या डोळ्यांवरची झोप उतरत नाही. तो कुशी बदलून झोपतो. पण शेजारच्या खोलीतला आवाज आणखी वाढतो. तिस्तेकाठी सकाळी सहा वाजल्यापासून काम सुरू**

होणार-त्यानंतर आपलचांदच्या दक्षिण किनाऱ्यापासून ते ईशान्येकडे वळणार. इथून दोन-तीन मैल चालत जावं लागणार. आत्ताच उठलं नाही, तर उशीर होईल.

सुहास हा विचार करीत असतानाच दरवाजावर टक्-टक् होते- 'सर!' हा विनोदबाबूंचा आवाज.

'हू!' प्रतिसाद देऊन सुहासला उठावं लागतं. डोळे उघडता येत नाहीत, इतके जवळताहेत. त्यामुळे पायात सँडल्स घालता येत नाहीत. दरवाजा उघडून सुहास बाहेर येऊन पहातो, त्याच्या खोलीसमोर व्हरांड्यात एका मोठ्या बादलीत पाणी आणि शेजारी मग ठेवलाय्.

त्याचं तोंड धुवून होता-होताच प्रियनाथ एक कप चहा आणून सुहासच्या टेबलावर ठेवतो. आता सुहासच्या लक्षात येतं, की त्याच्या पार्टीतले बाकीचे सगळेजण पूर्णपणे तयार झाले आहेत, फक्त त्याच्यासाठीच ते थांबले आहेत. अर्थात् तो लगेच तयार होईल, पण पहिल्याच दिवशी तो सर्वांच्या शेवटी तयार होतोय् या जाणिवेने सुहासला थोडा संकोच वाटतो. पण त्याला कुणी तगादा करीत नाही, तसंच विनोदबाबू किंवा अनाथ-प्रियनाथ यांच्यापैकी कुणीच काही घाई करीत नाहीत. जणू सुहासला उशीर होणार हे त्यांना ठाऊकच आहे. किंवा, सुहास तयार होऊन बाहेर पडल्यावर कामाला सुरुवात होणार-म्हणून त्यांच्यापैकी कुणीच अधीर नाही.

चहा घेता-घेताच सुहास घाईने पाणी घेऊन आला आणि दाढीला साबण लावू लागला. दोन घोट चहा घेता-घेता दोन फटक्यांत दाढी होऊन जाईल, असा त्याने विचार केला. दाढी त्याप्रमाणे झालीसुद्धा, फक्त मिशा कातरायच्या राहिल्या. मिशा घाईघाईत कातरायला गेलं, तर अधिक वेळ लागणार. म्हणूनच सुहास ब्लेड आस्ते चालवू पहातो. पण बोटं जणू ठीक चालत नाहीत. सुहासने ताबडतोब ब्लेड खाली केलं, आणि आरशात आपल्या मिशांकडे पहात विचार केला, रोज या मिशा आपल्याला वैताग देताहेत आणि वैताग देत रहाणार. आत्ता तो या मिशा काढून टाकू शकतो. फार तर विनोदबाबू, अनाथबाबू आणि प्रियनाथबाबू यांच्याच ते लक्षात येईल. बाकी कुणी तर त्याला आधी पाहिलेलंही नाही. परत ऑफिसमध्ये गेल्यावर अशी संधी तर पुन्हा येणारही नाही. आजच तर सगळे मिशावाल्या सर्व्हेयरला पहाणार. मग तर त्याला मिशा काढता येणार नाहीत. शेवटी सुहास ब्लेडने मिशांची खालची लाईन जरा सरळ करतो, आणि वर फक्त ब्लेड हळुवारपणे फिरवतो. तरीही, सवयीप्रमाणे आरशात पहावं लागतं. आणि पाहिल्यावर, छोटी कात्रीही वापरावी लागते. लाईन थोडी ठीकठाक करून सुहास आरशावरून डोळे बाजूला घेतो. विनोदबाबू खिडकीशी येऊन म्हणतात, 'आपण तयार व्हा, मी जरा यांना घेऊन आधी जातो. ज्योत्स्नाबाबू आपणाला घेऊन येतील.'

'माझं तर आवरलंच-' म्हणून सुहास चहाचा शेवटचा घोट घेतो, 'बाथरूम कुठंय्

म्हणे?' म्हटल्याबरोबर त्याच्या लक्षात येतं, की आपण अडचणीत सापडलो आहोत. काल संध्याकाळीही एक-दोनदा वाटलं होतं, पण विचारलं नाही. विनोदबाबू खिडकीपासून दूर गेले आहेत, तिथूनच म्हणतात, 'पायखाना आहे का इथं? बघतो'

याचा अर्थ, हे सगळे अंधार असतानाच उठून मैदानात किंवा झुडुपांच्या आडोशाला जाऊन आले आहेत. आता उशीर झालाय. आता मैदानात जाणं शक्य नाही. पण आता इथून जाऊन दुपारी बारा-एक वाजेपर्यंत काम करायचंय्. तयार न होताच कसं बाहेर पडायचं? दुपारी परत आल्यावरही काही इथं जमिनीतून बाथरूम उगवून आलेला दिसणार नाही! जरा अवघडल्यासारखाच सुहास खोलीतून बाहेर पडतो. त्याच्या बाथरूमसाठी सगळ्या पार्टीला कामासाठी बाहेर पडायला उशीर व्हावा, हे सुद्धा त्याला चांगलं वाटत नाही. त्यापेक्षा विनोदबाबू जे म्हणाले, तेच बरं प्रियनाथबाबू आणि अनाथबाबूंना घेऊन ते पुढे जातील, सुहास ज्योत्स्नाबाबूंबरोबर जरा उशीरा पोचेल. व्हरांड्यात कुणीच न दिसल्याने सुहास जिन्याच्या तोंडाशी येऊन पहातो, विहिरीजवळ विनोदबाबू आणि प्रियनाथबाबू उभे आहेत, आणि ज्योत्स्नाबाबू एका माणसाला काहीतरी सांगताहेत: सुहास काही म्हणण्याआधीच विनोदबाबू म्हणाले, 'सर, पायखाना घाणेरडा झालाय्, आत झुडपं वाढली आहेत, आता मी सांगितलंय्, स्वच्छ करून ठेवतील. आपण-' विनोदबाबू वाक्य पुरं करू शकले नाहीत. तोवर ज्योत्स्नाबाबू त्या माणसाशी बोलणं संपवून परत येऊन विनोदबाबूंच्या बोलण्यानंतर लगेच सुहासकडे पाहून म्हणाले, 'गिरिजाबाबूंना निरोप पाठवलाय्, आपण परत यायच्या आतच सगळं ठिकठाक करून ठेवतील.'

'हो, हो, चला; आपण कामाला निघू, नंतर पहाता येईल,' म्हणून सुहास शर्ट-पॅट घालायला खोलीत जातो. आणि जाता-जाता विचार करतो, अगदीच मैदानात जाण्यापेक्षा जिथं चाललो आहोत, तिथंच सोय असेल. अर्थात् गावभरचे लोक आसपास उभे असताना साहेब मैदानात चाललाय हे कसंतरीच दिसणार. सर्व्हे तर बारा-एक वाजेपर्यंत चालणार बघू सुहास बाहेर येऊन म्हणतो, 'चला, उशीर झाला ना? हे गिरिजाबाबू कोण आहेत?'

'इथल्या हाट-कमिटीचे, काल तुम्हाला भेटलेले, छे, उशीर कसला? बघता-बघता पोचू.'

ज्यांचं निमंत्रण सुहासने कालच संध्याकाळी नाकारलं, त्यांचं आज सकाळीच सहकार्य लागावं, याची सुहासला जरा शरमच वाटते. आता ते दुपारी येऊन कुठं घेऊन जाऊ नयेत, जिथं अॅटॅच्ड्...समोरच तर चहाचा मळा आणि त्यांचा इन्स्पेक्शन बंगला आहे. सुहास मैदानात जाऊ शकत नाही, यातच त्याची दुर्बलता पकडली गेली.

ते सारे पक्क्या रस्त्यावर येऊन उभे राहिले. प्रियनाथने मागून येऊन विनोदबाबूंच्या हाती दोन किल्ल्या दिल्या - कुलूप लावलंय्. त्यानंतर ते दक्षिणेकडे चालू लागतात. सुहास

के. बी. चं (म्हणेच खानापुरी बुझारत - लँड सर्व्हेचं) काम सुरू करतोय. थेट तिस्तेच्या काठापासून जिथं आपलचांद फॉरेस्टची नैऋत्य सीमा आहे, गाजोलडोबा चहाचा मळा आहे. पश्चिमेला तिस्ता गाजोलडोबाच्या थोडं दक्षिणेला खाना नावाची एक छोटी नदी; ती पुढे जाऊन तिस्तेला मिळते. इथूनच १९६८ सालच्या महापुरात तिस्तेचं पाणी घुसलं होतं. त्या पाण्यामुळे गाजोलडोबा चहाच्या मळ्याचा आणि इथल्या आपलचांद फॉरेस्टचा बराचसा भाग पूर्णपणे वाहून गेला होता. त्यामुळे तिथे मॅपिंगचा बराच गोंधळ आहे. म्हणजेच आता तिस्ता कुठून वहातेय्. तिच्यात बेटं वर आलीत की नाही, गाजोलडोबाचा किती भाग नदीत गेलाय् आणि किती पूर्ववत आहे, १९६८ च्या महापुरानंतर गेल्या दहा-पंधरा वर्षांत आधीच्या मॅपच्या अवस्थेत परत आला आहे की नाही, आपलचांदची सदर्न आणि साउथ-ईस्टर्न बॉर्डर कुठे मानायची-या सगळ्यांची जरा मीमांसा करायला हवी. त्यानंतर आपलचांद फॉरेस्टला डावीकडे, उत्तरेकडे ठेवून ते हळू-हळू सरळ ईशान्येकडे आनंदपूर जोतजमिनीपर्यंत पोचतील. इथे मॅपिंगचा गोंधळ कमी, आणि फॉरेस्ट लँडचा तर मौजा मॅप इत्यादी डिपार्टमेंटमधूनच तयार करून देतील, चहाच्या मळ्यांचंही तसंच. त्यामुळे फॉरेस्टला डावीकडे ठेवून या फळीचा सर्व्हे पूर्ण करून, नंतरच्या वेळी पुन्हा राजाडांगाच्या बाजूने वळून, त्याच्या खालच्या फळीने ते नैऋत्येकडे अगदी खालापाडपर्यंत जातील. या प्लॅनप्रमाणेच नोटिस आणि मौजा-जाहिरात देण्यात आलीय.

पक्का रस्ता सोडून ते आता मैदानात उतरले. बांधाच्या कडेकडेने जायचं म्हणून एक रांगही तयार झाली. सर्वांत पुढे अनाथ-त्याच्या खांद्यावर फोल्डिंग सर्व्हे टेबल. त्याच्या बऱ्याच मागे प्रियनाथ-साखळी असलेली पिशवी त्याच्या उजव्या खांद्यावर आहे, पण डाव्या आणि उजव्या-दोन्ही हातांनी ती त्याने दाबून धरलेली आहे; भारामुळे प्रियनाथचं डोकं डावीकडे कळलं आहे. त्याच्या मागे ज्योत्स्नाबाबू-त्यांच्या खांद्यावर एक पिशवी झुलतेय, हातातही एक बोचकं. त्यांची स्वतःची कागदपत्रं पिशवीत, आणि हातात लाल कापडात घडी केलेला 'मौजा' चा एक भाग त्यांच्या मागून सुहास - त्याचे दोन्ही हात रिकामे. मागे विनोदबाबू-त्यांच्याही हातात 'मौजा' च सुहासला त्यांच्यापैकी कुणीही काहीही घ्या म्हणून सांगितलं नाही, सुहासलाही तशी इच्छा नव्हती. कारण यापैकी कुठल्या गोष्टीची आपल्याला गरज पडेल हे सुहासच्या लक्षात येत नाही. फक्त 'मौजा' च्या एक-दोन वह्या तो घेऊ शकला असता. पण यांनी त्या कापडात बांधल्याच आहेत म्हटल्यावर त्या मागण्याचा काही उपाय सुहासकडे राहिला नाही. पण बाकी चारजण, किंवा तीनजण म्हणा कारण ज्योत्स्नाबाबू तर काही त्यांच्या पार्टीतले नाहीत, बराच जड-जड माल वाहून नेत असताना आपण एकटेच मोकळ्या हातांनी चालतोय, याचं सुहासला वाईट वाटतं. ज्योत्स्नाबाबूंनीही काही सामान हातात घेण्याची गरज नव्हती. पण ते या पार्टीबरोबर आहेत

आणि प्रायव्हेट प्रॅक्टिस करताहेत म्हणून त्यांना काही सामान घ्यावंच लागतं. यात त्यांच्या प्रॅक्टिसचीही सोय आहे.

'ज्योत्स्नाबाबू, मला तुमच्या खांद्यावरची बॅग द्या ना'-मागून सुहास म्हणतो.

त्याचं वाक्य पूर्ण होण्याआधीच ज्योत्स्नाबाबू म्हणतात, 'नाही सर, नाही सर, ती तर माझी बॅग आहे,'

अर्थात सुहासला गप्प बसावं लागतं. फक्त एकदा तो मागे विनोदबाबूंकडे पहातो दोन्ही हातात जाडजूड 'मौजा' घेऊन चालताहेत. त्या मौजांचा आकार पाहूनच सुहासला समजतं, की आपल्याला या 'मौजा' हातांनी वाहून नेता आल्या नसत्या, खांद्यावरच लटकवाव्या लागल्या असत्या. आणि स्वतःच्या 'मौजा-वह्या' स्वतः खांद्यावर घेऊन सर्व्हे ऑफिसर उपस्थित झाल्यावर त्याला सर्व्हे करावा लागला नसता.

## सोळा

# गयानाथची नांगरटीची प्रॅक्टिस

नांगराला बैल जोडून, नांगर शेतात उतरवून बाघारू गयानाथला हाक मारतो, 'अहोऽ देउनिया, उठा ना! नांगर जोडलाय!'

गयानाथ उठून, बिछान्यात बसून खोकणं सुरू करतो. हा खोकला झाल्यावर तो थोड्या धापा टाकील, नंतर बिछान्यावरून उतरेल.

बाघारू व्हरांड्यातल्या कोनाड्यात बिडी शोधतो. सापडत नाही. बाहेर येऊन पहातो, तर फटफटी बाहेर आणून ठेवून आता गयानाथचा जावई असिन्दिर उभ्या-उभ्या सिगारेट ओढतोय. 'अहो जावई, सिगारेट द्या ना एक!' स्वतःच्या सिगारेटचा एक मोठा झुरका घेऊन असिन्दिर तीच सिगारेट हात पुढे करून बाघारूला देतो. बाघारू सिगारेट हातातच ठेवून. 'जावयाच्या अंगाला कसा पेट्रोलसारखा वास, अन् त्या म्हाताऱ्याच्या अंगाला बगळ्याचा वास!'

'अंऽ, म्हणतोस काय?'

'काही नही, काही नाही; वासाची गोष्ट!' बाघारू मैदानाकडे पहात, तर्जनी आणि अंगठा यांच्यामध्ये धरून अर्धी सिगारेट ओढतो. पण त्याची बोटं एवढी जाडी आहेत, की जवळ-जवळ अर्धी सिगारेट झाकली जाते. बाघारू ओठांचा चंबू करतो. त्याचे ओठ जाड नाहीत. पांढऱ्या आणि राखाडी रंगाच्या बैलांची जोडी मैदानात नाना दिशांना पहातेय, एकेका दिशेकडे बराच वेळ, याप्रमाणे.

गयानाथ नांगर चालवणार म्हणूनच दोन-दोन बैल जोडले आहेत. बैलच नांगर

ओढणार. म्हातारा फक्त नांगर धरणार. हा सर्व्हे करणारा साहेब नक्षलवाद्यांच्या बाजूचा आहे. 'जो जोतदार आपली शेती दाखवतो; त्याला हा साहेब म्हणतो, ''चालवा, नांगर चालवा,'' त्यानंतर दोन्ही हात दाखवायला सांगतो. ते नरम आहेत की ओबडधोबड हे पहातो, आणि जे जोतदार नांगर चालवू शकत नाहीत, त्यांना कॅन्सल करून टाकतो. आधियाराच्या (कसणाऱ्याच्या) नावाने जमिनीची नोंद करतो.'

म्हणूनच गयानाथ आता हालुवागिरी शिकतोय्. आपलचांद फॉरेस्टजवळ, फॉरेस्टच्या जमिनीला लागूनच त्याची जमीन आहे. तिथे बाघारू अधूनमधून शेती करतो, आणखी 'कुणी-कुणी' करतात. ती जमीन स्वत:ची शेतजमीन म्हणून रेकॉर्ड करताना साहेबाने गयानाथ खरोखर हालुवा आहे की नाही हे पहाण्यासाठी त्याला नांगर चालवायला लावला तर! गयानाथचे हात तसे नरमही नाहीत, गोरेही नाहीत. पण नांगर ओढणार आहेत बैल; आणि बैल ओळखतात, ते बाघारूला. बैलांना तर काही मालक कोण, कसणारा कोण आणि साहेब कोण हे ठाऊक नाही. शेवटी, जर साहेबाने गयानाथला नांगरायला सांगितलं, आणि बैलांनी गयानाथचं ऐकलं नाही, तर? म्हणूनच गयानाथ बाघारूला म्हणतो, 'बैलांची जरा माझ्याशी ओळख करवून दे रे बाघारू, माझा आवाज-बिवाज त्यांच्या ओळखीचा करून दे!'

असिन्दिर म्हणतो, 'एऽ बाघारू, तुझ्या म्हाताऱ्याचं टकुरं फिरलं का काय रे? नांगर ड्राइव्ह करायला निघालाय म्हणे!' हे ऐकूनही बाघारू असिन्दिरकडे वळून पहात नाही. शेताच्या, बैलांच्या दिशेने काही वेळ पहात रहातो, जणू समोर केवळ नांगराला जुंपलेले बैलच तेवढे आहेत. त्यानंतर म्हणतो, 'काय ठाऊक? काल बाजारात त्यांनी ऐकलं की साहेब म्हणे हात दाबून पहातो, अंग दाबून पहातो, डोळे दाबून पहातो, तेव्हा . . . '

बाघारूचं बोलणं संपण्याआधीच असिन्दिर जोरात हसतो, आणि या पहाटेच्या वेळी जरा अधिकच मोठ्या वाटणाऱ्या आवाजात म्हणतो, 'तुझी अन् बैलाची बुद्धी सारखीच! तुझ्या सेंटलमेंटच्या साहेबाचं काय् लगीन व्हायचंय् काय रे - की पोरीचं अंगही दाबून बघणार, गाल दाबून पहाणार?' त्यानंतर असिन्दिरला काहीतरी आठवतं - तो हो: हो: हसत, गयानाथला इंगित करून म्हणतो, 'या म्हाताऱ्याचं अंग दाबलं तर याची जीभ बाहेर येईल, आणि गाल दाबले तर एखाद्या हडकुळ्या माणसासारखी याची हाडं कडाकडा मोडतील.'

गयानाथ दरवाजा बाहेर येतो, खडावा वाजवित विहीरीजवळ जातो. त्याच्या अंगावर धोतराचा सोगा, तोंडावर डोळ्यांवर पाणी फिरवून तो परत येतो. घरातून अंगावर बनियान घालून, धोतर गुढग्यांवर उचलून, पायात खडावा ठेवून, जणू तयार होऊन बाहेर येतो. असिन्दिर त्याच्याकडे टक लावून पहातो. म्हातारा जेव्हा दरवाजाजवळ खडावा काढून अंगणात येतो, तेव्हा असिन्दिर म्हणतो, 'शेतात जायचं कामच काय तुमचं? द्या सोडून!

वकीलबाबांना पाठवून द्या, त्या सर्व्हेयरला काय करायचं ते तो करील, तुम्ही कशाला इथं नांगर ढकलता?'

गयानाथ हसून उत्तरतो, 'का रे भाऊ, हालुवाचा जावई म्हणवून घ्यायची लाज वाटते काय तुला?' त्यानंतर शेताकडे घाईघाईने जात म्हणतो, 'एऽ बाघारू, चल बाबा!'

असिन्दिर मगोमाग येतो. शेतात उतरत नाही. बांधावरूच म्हणतो, 'तुम्हाला ही अक्कल कुणी दिली - तो सर्व्हेयर काय ड्रायव्हिंग लायसन्स देणार का काय तुम्हाला?'

'अरे, काल हाटामधी ऐकलं की साला सर्व्हेयर नक्षलवाद्यांच्या बाजूचा आहे. हात दाबून पहाणार, अंगही दाबून पहाणार . . .'

'अरे, तुम्ही कशाला डोकं खराब करून घेता? सेटलमेंटच्या सर्व्हेयर तुमचे हात बघून जमीन रेकॉर्ड करणार होय? त्याचं तुम्हाला काय पडलंय् एवढं? द्या सोडून, मी जातो कॅम्पात, बघतो!'

'अरे बापा, तू तर तुझ्या जिंदगीत एकही सेंटलमेंट बघितली नाहीस रे बापा! इथं जो नियम असेल, त्याप्रमाणे करावं लागतं. शेतही राहील, आणि मला जरा प्रॅक्टिसही होईल!'

'कसली प्रॅक्टिस?'

'हीच, हलुवागिरीची. जर आज मला नांगरून दाखवायला सांगितलं तर?'

'तुम्हाला कुठं नांगर चालवायला सांगतील?'

'फॉरेस्टच्या जमिनीत -'

'मग तुम्ही इकडं या, मी प्रॅक्टिस करतो, सर्व्हेयर काही म्हणाला तर त्याला सांगा, मी म्हातारा झालोय, म्हणून आता नांगर जावयाच्या हाती दिलाय!' असिन्दिर उभा रहातो.

'अरे, कशाला उभा राहिलास भाऊ?' म्हणून गयानाथ लगबगीने जाऊन बैलांमागे उभा रहातो आणि नांगर धरतो.

असिन्दिर ओरडतो, 'अहो बापू, ते माझ्यावर सोडा, मी नांगरतो.'

गयानाथ एकदा 'हट्' असा आवाज करतो. बैल शेपट्या हलवतात, थोडं मागे वळून पहातात, पण पाऊल काही पुढं टाकत नाहीत; गयानाथ पुन्हा एकदा 'हट्' म्हणतो, पण बैल हलत नाहीत ते नाहीतच. बाघारूने जवळून जिभेने 'टाक् टाक्' असे आवाज काढल्याबरोबर दोन्ही बैल पुढं पावलं टाकतात आणि नांगर ओढू लागतात.

असिन्दिर ओरडतो, 'अहो बापू, ते काम माझ्याकडं द्या ना, मी नांगरतो!'

गयानाथ धमकीच्या स्वरात उत्तरतो, 'एऽ चूप बस बरं आता! तुझं ऐकून माझी जमीन हातची घालवू का काय मी?'

सतरा

# नांगर, बैल आणि मोटारसायकल

आपलाचंद फॉरेस्टला लागून असलेल्या जमिनीसाठीच एवढा झमेला आहे. ही जमीन फॉरेस्टला इतकी लागून आहे, की पाहिल्याबरोबर वाटतं ही जमीन फॉरेस्टचीच, कुणीतरी बहुधा तिच्यावर शेती केली असावी. या फॉरेस्टचा एक भाग यांचाच होता. म्हणजे गयानाथचे वडील पद्मनाथ, पद्मनाथाचे वडील भद्रनाथ यांच्या काळात. भद्रनाथाचं खरं नाव भादई राय. नंतर, पन्नास वर्षांपूर्वी सेटलमेंटच्या वेळी एका सर्व्हेनंबरमध्ये फॉरेस्टची खास जमीनही घुसवली. असं व्हायला नको, होतही नाही. पण झाल्यानंतर त्यांची स्वत:ची जमीन ज्यामुळे फॉरेस्टच्या जमिनीत घुसलेलीत राहील आणि एका खातेवहीतच राहील याची भद्रनाथ राय, पद्मनाथ राय आणि गयानाथ राय हे काळजी घेत आले. त्या काळात जमिनीच्या व्यवहारातलं हलुवा-अधियार लोकांना काही कळत नसे, त्यात ते लक्षही देत नसत. म्हणून सगळ्यांना वाटे, भादई राय यांचीच जमीन फॉरेस्ट डिपार्टमेंटने काढून घेतलीय्. पण तिथे भादई रायने बळकावलेला भाग भादई रायचाच आहे. फॉरेस्ट डिपार्टमेंटचे लोकही कधी शेताच्या जमिनीत सालाची झाडं लावीत नाहीत, किंवा तसं होणार नाही याची भद्रनाथ, पद्मनाथ आणि गयानाथ तीन पिढ्यांपासून काळजी घेत आले आहेत. त्यामुळे, फॉरेस्टची बरीच मोठी जमीनही गयानाथ स्वत:ची म्हणूनच तिच्यावर शेती करतो.

पण यावेळी संकट येण्याची शक्यता आहे. आता सगळ्याच शेती कसणाऱ्या हालुवा आधियार लोकांना जमिनीचे व्यवहार समजतात. त्यात या जमिनीशेजारच्या आनंदपूरच्या व्हेस्ट जमिनीवर राधावल्लभच्या दलाचं अतिक्रमण आहे. ते वकिलांना बोलावतात, मॅप पाडू शकतात, कुठला डाग कुणाचा तेही सांगू शकतात - त्यांनी जर आता सर्व्हेच्या निमित्ताने 'इन्किलाब!' म्हणून झेंडा उभारला तर? म्हणून गयानाथ कुठल्याही गुंत्यात सापडू इच्छीत नाही. नांगर स्वत: चालवून जर ही जमीन आपली आहे हे दाखवावं लागलं, तर तो नांगर चालवून दाखवील.

नांगर चालवीत-चालवीत, एक सरळ रेघ मारीत-मारीत गयानाथ जमिनीच्या दक्षिणेकडून सरळ आपल्या घराच्या दिशेने येत होता. असिन्दिरने आपल्या मोटारसायकलच्या स्टार्टरला किक् मारल्याबरोबर दोन्ही बैल कान उभे करून दचकून थांबतात. गायनाथ धमकीच्या स्वरात ओरडतो, 'ए साल्या जावया, फटफटी बंद कर!' ओरडल्यावर गयानाथचा आवाज एखाद्या रानकोंबड्याच्या आवाजासारखा येतो. असिन्दिर पाय खाली घेऊन हे-हे करीत हसतो, 'ऊठ, ऊठ, नाहीतर तुला फेकून देईन बघ बापू!'

गयानाथ घराकडे पाठ करून डावीकडे वळतो. मागून त्याची मुलगी ओरडते, 'बाबा, चहा देते!'

गयानाथ जमिनीच्या या सीमेकडे येत असताना असिन्दिर अचानक मोटारसायकल स्टार्ट करून अॅक्सलरेटर एकदा पूर्ण फिरवतो. त्या गाँऽऽऽ आवाजाने कान आणि शेपूट उभारून नांगराचे दोन्ही बैल दोन दिशांना पळत सुटतात. गयानाथला नांगर सोडायलासुद्धा फुरसत मिळत नाही, तो जमिनीवर पालथा पडतो.

खांद्यावर जू आणि मागे नांगर घेऊन दोन बैल दोन दिशांना पळताना अडतात. डाव्या बाजूच्या सावळ्या रंगाच्या बैलाचा पाय जरा तिरकाच होता. उजव्या बाजूचा पांढरा बैल हिसडा मारून जवळच्या काठाजवळच्या जमिनीच्या दिशेने पळाल्याने नांगर एका झटक्यात त्याच्या अंगावर पडतो, आणि सावळा बैल वळून पळायला जाताना प्रथम त्याचे पाय कासऱ्यात अडकतात, आणि त्यानंतर पांढऱ्या बैलाच्या विरुद्ध बाजूने बसणाऱ्या ओढीमुळे, जू, कासरा यांच्यासह धाप् करून मातीत पडतो. कासऱ्याने बांधलेल्या त्याच्या गळ्याला ओढ बसते. पांढऱ्या बैलाचा मागचा पाय घसरतो.

गयानाथला पडताना पहाताना बाघारू गयानाथच्या दिशेने एक पाऊल टाकताच वळतो. 'हैऽहैऽ' करीत दोन्ही बैलांना धरायला पळतो. दोन्ही बैल पडले नसते, तर ते त्याला धरता आले असते की नाही देव जाणे! बाघारू आधी सावळ्या बैलाला जुवाची दोरी ओढून बाहेर काढून मोकळं करतो. बैल उभा राहून, कान फडकवीत, जणू आता तो मघाचा आवाज कुठं गेला हे इकडं तिकडं पहात शोधीत रहातो.

सावळा बैल मोकळा झाल्यावर पांढरा बैल नांगर ओढीत-ओढीत वरच्या बांधाजवळ समोरचे दोन पाय उभे करून थांबतो. मागे असलेल्या जुवाच्या आणि नांगराचा भारामुळे त्याला उभं रहाता येत नाही. बाघारू पळत जाऊन त्याची दोरी काढून टाकतो. त्यानंतर दोन लांब दोऱ्या जुवापासून वेगळ्या करायला सुरुवात करतो.

तोपर्यंत गयानाथ तळहात आणि गुडघे यांच्यावर जोर देऊन नीट उभा रहातो. त्याच्या कपाळावर, नाकावर, तोंडावर, बनियानला, गुडघ्याजवळ धोतराला चिखल लागलेला. गयानाथ उभा राहून स्वतःकडेही पहात नाही, बैलांनाही पहात नाही. त्याने जेवढं नांगरलेलं असतं, त्यातूनच एक मातीचं ढेकूळ उचलून ते घराच्या दिशेने फेकतो. ते त्याच्या समोरच चूर-चूर होऊन जातं. तेव्हा गयानाथ, 'साला जावई, तुझ्या गांडीत बांबू खुपसला . . .' म्हणून आपल्या घराच्या दिशेने पळायला सुरू करतो. असिन्दिरने एक्सलरेटर एकदा फिरवून बंद केला होता. त्याच्या हसण्याच्या आवाजाने गयानाथ जमिनीवरच पडलेला होता. त्या तिघांनी सुरू केलेलं हसणं गयानाथ उठून उभा राहिल्यावरही थांबत नाही. गयानाथने ढेकूळ फेकून मारल्यावर तर ते अधिकच वाढतं. गयानाथ त्यांच्या दिशेने धावू लागल्यावर मात्र तिघेजण दगड लागलेल्या कोंबड्यासारखे

वेगवेगळ्या दिशांना पळू लागतात. इतकं पळाल्यामुळे आणि घरात येण्याचा चढ चढल्याने गयानाथला धाप लागली होती. उठल्याबरोबर तो मोटारसायकलला एक लाथ मारतो. मोटारसायकल कणभरही हलत नाही. त्याच्या पायाजवळ एक लाकडाचा तुकडा पडलेला होता; तो उचलून गयानाथ मोटारसायकलवर मारतो, 'अहो, हे काय चालवलंय? चहा थंड होत चाललाय, पिऊन घ्या!' गयानाथची बायको येऊन म्हणते. हे ऐकून गयानाथची मुलगीही बाहेर येते, 'बाबा, तुम्हाला कुणी सांगितलं नांगर धरायला?'

'तुझ्या बापानी सांगितलं. कुठंय साला तो लांडग्याचा पोट्टा, बोकड . . .'

हे ऐकून गयानाथची बायको हसू दाबण्यासाठी तोंडावर पदर धरते. मागे, घरच्या खालच्या बाजूने, शेताजवळून असिन्दिर हात जोडून ओरडतो, 'बापू, मला क्षमा करा, क्षमा करा हो बापू!' पण बोलता बोलताच त्याला हसू फुटतं. असिन्दिरचा आवाज ऐकून गयानाथ रानकोंबड्याच्या आवाजात ओरडतो, 'साल्या, मी नांगर धरताना तू तिकडं फटफटी वाजवतोस्, साल्या . . .'

'क्षमा करा ना बापू! माझं का ऐकलं नाहीत तुम्ही? मी तर वॉर्निंग दिली होती तुम्हाला!' सुरक्षित अंतरावरून असिन्दिर हात जोडतो.

'साल्या, तुझ्या वॉर्निंगची मारली गांड!' चहाचा कप घेऊन गयानाथची मुलगी येऊन त्याच्यासमोर उभी रहाते. ओठांवर पदर ठेवून आणि असिन्दिरकडे पाठ करून. गयानाथने चहाचा कप हाती घेतल्याबरोबर मुलगी व्हरांड्यात पाट टाकून म्हणते, 'बसून घ्या बाबा!' गयानाथने तोवर एक घोट घेतलेला असतो.

पाटावर बसून तो उरलेला राग बाहेर काढतो - ओरडत म्हणतो 'साला, बोकड कुठला, जा की - धर तूच नांगर, मी नाही तोंड देणार सर्व्हेयरला. तुलाच नांगर धरावा लागंल.''

## अठरा

# असिन्दिर नांगर चालवतो

यामुळे असिन्दिरला हायसं वाटतं. तो 'जातो, हो बापू, जातो, मी नांगर धरायला जाणारच होतो!' म्हणून बाघारू जिथं नांगर आणि बैल धरून उभा होता, त्या दिशेने पळतो. त्याच्या दिशेने पहात गयानाथ धोतराच्या सोग्याने तोंडाला लागलेला चिखल पुसतो. त्यानंतर चहाचा घोट घेतो. गयानाथची बायको आणि मुलगी त्याच्या मागे उभ्या राहून पहातात - असिन्दिर बाघारूच्या हातून कासरा घेतो, आणि बाघारू दोन्ही बैलांच्या खांद्यांवर जू ठेवतो. सावळा बैल जरा अडल्यासारखा करीत होता. बाघारूने त्याच्या

गळ्याला खाजवून त्याला निर्भय केल्यावर तो पांढऱ्या बैलाजवळ येऊन उभा रहातो. जणू अजून कुठूनतरी मोटारसायकलचा आवाज येईल - अशा अविर्भावात उजवीकडचा बैल डावीकडे मान वळवून गयानाथच्या घराकडे पहात रहातो. बैल जुंपल्यावर असिन्दिर बाघारूच्या हातून कासरा घेतो आणि म्हणतो. 'आता स्टार्ट दे रे बाघारू!'

'बरं का जावई, नांगर नीट धरा, गुरं घाबरतात' म्हणून बाघारू जिभेने खूप नरम आवाज काढतो.

बैल हलत नाहीत. उलट आवाज ऐकून उजवीकडचा बैल तोंड आणखी वळवतो. बाघारू यावर दोनदा 'टट्टर, टट्टर' असा आवाज करून, समोर जाऊन त्या बैलाच्या शिंगांमध्ये जरा खाजवतो. दोन्ही बैल मान वर करतात. समोर पहातात. त्यांच्या मानेखाली खाजवून बाघारू म्हणतो, 'घ्या जावई, स्टार्ट घ्या!'

असिन्दिर अचूक निर्देश देतो, आणि बैल चालायला सुरुवात करतात. फाळ मातीत घुसतो, नांगारावर असिन्दिरची पकड घट्ट असते. जुवावर समान ओढ पडते. दोन्ही बैलांची मान सरळ होते आणि असिन्दिर जिभेने आवाज करून बैलांची गती वाढवतो. ज्याला आजवर कधीच नांगर धरावा लागला नव्हता, त्याला यामुळे जरा आरामच वाटतो. स्वेदमोचनाचा आराम. सराव नसल्याने असिन्दिरच्या हाताचा दाब समान रहात नाही, थोडा कमी-जास्त होतो. त्यामुळे नांगरही उड्या घेतो. बैलही ठेचाळतात, पण हे फक्त दोनेकवेळा होतं. असिन्दिरलाही आपण हौस म्हणून नांगर चालवतोय असं वाटतं. पण त्याच्या नांगर चालवण्यामुळे जी खोल नाली होते आणि माती दोन्ही बाजूंनी पडते, त्यामुळे त्याच्या अंगचा जोर आणि त्याच्या लातीच्या पुराव्याने नांगरटीचा विषयच बदलतो.

दूरवर धुकं अजून दाट दिसतं. डोळ्यांसमोर ते विरतंय्. समोरच्या बाजूंच्या झाडांच्या शेंड्यांवर कोळ्यांच्या जाळ्यांसारखं धुक्याचं जाळं. चार-पाचजण माणसं फॉरेस्टच्या कडेने जंगलात शिरताहेत. दोनेकजणांच्या डोक्यांवर एकेक बंडल आहे. इथं तर क्षितिजापर्यंत सगळं ओळखीचंच आहे. बाघारूला जरा पाहून हे कोण असावेत हे ठरवावं लागतं. तो असिन्दिरला हाक मारतो - 'अहो जावई, बघा बरं!' असिन्दिर नांगर सोडून आल्यावर बाघारू दाखवतो 'बघा बरं!' तिकडे एक नजर टाकून असिन्दिर पळत निघतो आणि शेतातूनच गयानाथाला म्हणतो, 'अहो जावई, सर्व्हेपार्टी चाललीय् हो सर्व्हेच्या जागी!' बाघारू जाऊन नांगराचा कासरा धरतो. 'आँ?' म्हणून गयानाथ उडी मारून उठतो -'बाघारूऽऽ' बाघारू शेतातूनच पहातो. 'ही चेयर घेऊन पळ! सर्व्हेच्या जागी पळ!' म्हणून गयानाथ पळत विहिरीजवळ जातो. असिन्दिर घाईघाईने जाऊन बाघारूच्या हातून कासरा घेतो आणि म्हणतो, 'कुणालातरी इकडं पाठवून दे जलदी, आणि चेयर घेऊन जा!'

बाघारू पळत पळत माजघरातून मागे गोठ्याकडे जातो आणि ओरडतो, 'एऽ

भोचकू, जा, बैलांना घेऊन ये!' त्यानंतर पुन्हा पळत येऊन पहातो, गयानाथची मुलगी खुर्चीवर बसलेली. 'उठा हो उठा!' गयानाथाची मुलगी उडी मारून उठते. खुर्ची डोक्यावर उलटी घेऊन बाघारू पश्चिमेकडून उतरतो. या बाजूने एक शॉर्टकट आहे. बाघारूच्या अंगावर एका लंगोटीशिवाय काहीही नाही. डोक्यावर खुर्ची उलटी धरलेली, तिचे पाय वरच्या दिशेने. बाघारू खूप घाईघाईने या बांधाने, त्या बांधाने चालायला सुरुवात करतो. त्याला सर्व्हे पार्टीच्या आधी पोचायलाच हवं. चेयर एखाद्या झाडाखाली ठीकठाक ठेवल्यावर सर्व्हेयर बसणार. सर्व्हेयर आहे, चेयर नाही - ही अशक्य अवस्था दूर करण्याची जबाबदारी घेऊन बाघारू आपल्या ओळखीच्या शेतांमधून, झाडाझुडपांमधून, शॉर्टकट घेत-घेत वेगाने जातोय.

गयानाथ कपडे घालून असिन्दिरवर ओरडतो, 'अहो जावई, फटफटी बाहेर काढा, लेट होतोय्, मला सोडून या. भोचकूला पळत येताना असिन्दिर बैलांना सोडून पळत येऊन लुंगी-बनियानमध्येच मोटारसायकल ढकलीत-ढकलीत बाहेर घेऊन जातो, मोठ्या बांधाजवळ गयानाथ घरातून एका विदेशी कापडात बांधलेलं एक छोटं गाठोडं चटईच्या बॅगमध्ये टाकीत बाहेर येतो. ती बॅग असिन्दिर टँकवर ठेवतो. गयानाथ मागे बसतो. गयानाथची बायको आणि मुलगी घाईघाईने बाहेर येतात पण त्याआधीच मोटारसायकल स्टार्ट केल्याचा आवाज येतो. ते मोठ्या बांधावरून हूऽस करून बाहेर जातात.

## एकोणीस

# जंगलाच्या मार्गावर आकाश आणि वारा

चालताना सुहासला समोर ज्योत्स्नाबाबूंकडची प्रायव्हेट आणि पब्लिक ओझी पहावी लागतात आणि मागून विनोदबाबूंचे निश्वास ऐकावे लागतात. प्रियनाथ आणि अनाथ त्यांच्या खांद्यांवरती आणखीच जड ओझी घेऊन पुढे निघून गेले आहेत. त्यांचं टेबल आणि साखळीची बॅग डुलत-डुलत पुढे जात आहे, जणू या भाराच्या ओझ्यामुळेच त्यांच्या पावलांची गतीही वाढतेय्.

भाद्रपद महिना संपत आलाय्. पावसाळ्याचा हा मध्य. आज सकाळी पाऊसही नाही, ढगही नाहीत. त्यामुळे उन्हाचा उकाडा वाढतोय. एवढ्या सकाळही तो जाणवतोय. तो इतक्या वेगाने चालल्यामुळे, की या उन्हाच्या तीव्रतेमुळे, ते काही कळत नाही.

या वृष्टीहीन, स्वच्छ आकाश असलेल्या सकाळी, आता पावसाळा संपला असं एखाद्याला वाटू शकतं. मैदानातलं गवत, झाडंझुडपं, फॉरेस्ट आणि चहाच्या मळ्यातळी सारी झाडंझुडपं काळसर, हिरव्या रंगाची दिसताहेत. गचपण आणि छोटी-छोटी जंगली

झाडंझुडपं पावसाच्या पाण्याने इतकी माजली आहेत, की ती आता उभी राहू शकत नाहीत, आपल्याच वजनाने जमिनीवर लोळू लागली आहेत. ढिगाऱ्याप्रमाणे जणू ती सारी मातीतील पाण्यावर फेसाप्रमाणे आली आहेत. आता, या सकाळच्या उन्हात या सगळ्या झुडुपांवरही जादा झालेलं पाणी झरतं आहे, निथळतं आहे. समोर, जरा उंचावर, फॉरेस्ट सुरू होतं. तळापासून फॉरेस्टवर जलकणांच्या बाष्पीभवनामुळे वाफ दिसतेय, फॉरेस्टमधून, त्याच्या झाडांच्या शेंड्यावरून धक् धक् आगीच्या धुरासारखी, जणू विरळ असे ढगच ओदलाबादीच्या दिशेने तरंगत चालले आहेत - त्याचा अर्थ वारा आता पूर्वेकडूनच वाहतोय. हे कुठलं फॉरेस्ट . . .? याच नावाचा एक चहाचा मळाही आहे. सर्कल मॅप सुहासला बरोबर ठेवता आला असता. 'हे फॉरेस्ट कुठलं?' सुहास विचारतो.

'मालहाटी,' ज्योत्स्नाबाबू त्याच्याकडे न पहाता उत्तरतात.

मालहाटी, मालहाटी. मालहाटी फॉरेस्ट आणि मालहाटी टी इस्टेट.

ते एका उंचवट्यासारख्या उंच, कोरड्या जमिनीच्या भागावरून खाली उतरत होते. समोर पुन्हा चढण आहे आणि बहुधा थोडी समतल जमीन आहे- त्यानंतर फॉरेस्ट. त्या खालच्या जमिनीवर एकजण बैल नांगराला जुंपून जमीन नांगरतोय्. तो माणूस बराच वेळ दिसत रहातो. त्या उंचवट्याच्या माथ्यावर असल्यापासून तर समोरची चढण अर्धी चढून जाईपर्यंत. ती चढण अर्धी चढल्यावर नजर फॉरेस्टवर खिळते. तोपर्यंत प्रियनाथ आणि अनाथ जवळजवळ फॉरेस्टपर्यंत पोचलेले असतात. फॉरेस्टमधल्या झाडांच्या शेंड्यांवर आता ऊन पडलेलं दिसतं. झाडांच्या पानावर किंवा वाऱ्यात कुठेही धुळीचे कण नाहीत, एवढंच काय, आकाशात ढग नाहीत, त्यामुळे उन्हाला जणू झळाळी चढलीय्. झाडांचे शेंडे तिच्यामुळे चमकताहेत. अनाथ आणि प्रियनाथ फॉरेस्टमध्ये शिरले नाहित, फॉरेस्ट डावीकडे ठेवून ते उजवीकडे वळतात. फॉरेस्टच्या जितकं जवळ जावं तितके झाडांची शेंडे अदृश्य होतात. दृष्टी जणू हळू हळू फॉरेस्टच्या शेंड्यांकडून झाडांच्या खोडांकडे खाली उतरत रहाते. त्यानंतर फॉरेस्टच्या लांब सावलीत प्रवेश होतो. त्या सावलीतून पुढे, फॉरेस्टला डावीकडे ठेवून, उजवीकडे वळून, फॉरेस्टच्या अगदी कडेने चालावं लागतं. तेव्हा तर ऊन नव्हतं. पण पावसाच्या पाण्याने, ऊन नसलेल्या फॉरेस्टच्या या भागात जाड गवत अगदी गुडघ्यापर्यंत वाढलेलं. पायाला पाणी लागतं. आणि असं थोडं चालता-चालताच हळूहळू घाम सुकून जातो. आराम वाटतो. श्वास-निश्वासाचा वेग स्वाभाविक होतो. पण त्यानंतर लगेच थोडं पुढे झळाळतं ऊन-जणू शरदाचं आकाश आठवतही नाही. वाटतं, जणू चोहीकडे पाऊस पडतोय, ते लोक फॉरेस्टमधल्या झाडांजवळून चालले असल्याने त्यांच्या अंगाला आर्द्रता भासत नव्हती. उजवीकडे पाहिलं, तर काळसर हिरव्या दाट गवताने भरलेललं मैदान, आणि डावीकडे पाहिलं, तर निश्छिद्र, अगदी अंधारलेलं असं दाट जंगल-झाडांची खोडंही जंगलातल्या शेवाळाने

किंवा वेलींनी झाकलेली.

तेवढ्यात थंडी वाजू लागते, आणि त्या थंडीतही त्वचा तेलकट होते. फॉरेस्टमधून गरम वाफ वहातेय्. एका बाजूने थंडी, आणि एका बाजूने त्या वाफेच्या उष्णतेमुळे येणारा घाम, छाती, पाठ जड होतात. निश्वासही जड होत रहातात.

साल-सेगून-खैर-लाम्पातीची झाडं जणू स्वत:च्या वजनानंच जमिनीत घुसली आहेत. इतक्या पावसाच्या इतक्या पाण्याने या झाडांची पानंही मोठी आणि दाट झाली आहेत - पानांच्या या संभारामुळे सालाची उंच झाडंही उंच वाटत नाहीत.

काही महिन्यांच्या मुसळधार पावसाने सगळं जणू छोटं होऊन घट्ट होतं. दोन्हीकडच्या दाट गवतामुळे पायवाट झाकली गेलीय्. उजवीकडच्या खोलगट जमिनीतून घास आणि जंगल वाढलंय्. छोट्या उंचवट्यावर छोट्या-छोट्या जंगली झाडांचे शेंडे आकाशापर्यंत गेले आहेत. या सगळ्या झाडांच्या शेंड्यावर आकाशाची पार्श्वभूमी आहे. त्यामुळे, आकाशही जणू खूप खाली वाकलंय् असं वाटतं. तरीही, अगदी थोड्या वेळापूर्वी आकाश किती निळंभोर आणि गोल दिसत होतं. एकीकडे घास, गवत, वेली, झुडुपं, गचपण आणि विराट-विराट झाडांचे माथे आकाशात गेलेले, आणि त्यांच्यावर आकाश जणू वाकून आलेलं. झाडं आता मातीच्या तळातून पावसाचं पाणी शोषून वाढताहेत, वाचताहेत. की एवढ्यातच पावसाळ्यानंतरची ही प्रक्रिया सुरू झालीय? यानंतर शरदाच्या उन्हात माती सुकून गेल्यावर, आर्द्रता जाऊन वारा कोरडा झाल्यानंतर, हे सारं गचपण वाळून जायला सुरुवात होईल. पायातळीची माती आता लगेच दबतेय्. हळू-हळू हे पाणी जमिनीत आणखी खोल जाईल- तेव्हा हळूहळू माती कठीण होईल; कठीण होत-होत कुठे-कुठे दगडासारखी होऊन जाईल, पण फक्त कुठे-कुठेच. कारण, फॉरेस्टच्या आतमधली माती सडत चाललेल्या पाचोळ्यामुळे संपूर्ण वर्षभर नरम असते. आता फॉरेस्टमधलं गचपण जणू स्थिर आहे, पण ते उसळणाऱ्या जलाशयाप्रमाणे, लाटांमागून येणाऱ्या लाटांप्रमाणे, मोठमोठ्या झाडांच्या मधल्या जागांमधून दूर-दूर पसरलंय्. त्या गचपणात माणूस बुडून जाईल-बुडाल्यावर परत डोकं वर काढता येणार नाही - खाली वेलींचा प्रचंड गुंता, आणि डोक्यावरचं आच्छादन इतकं दाट.

हे सगळं मिळून असं वाटतं, जणू वरून कुणी झाकण लावलं आहे. आकाशाचा नीलिमा आणि ऊन इतकं प्रचंड असल्याने थोडं खुलं वाटतं खरं, पण ते झाकण अजून निघालेलं नाही. आकाशातून बरसणारं पाणी आणि जमिनीच्या तळचं पाणी - दोन्हीकडे आता साचलेलं पाणी सडत असतं. पाऊस बंद झाल्यावर जमिनीखालचं पाणी झाडंझुडुपं ओढून घेतात. या भर पावसाळ्यात ती प्रक्रिया सुरू झालीय् की काय? वाराही किती अनिश्चित - कधी पूर्वेकडून, तर कधी उत्तरेकडून वहातोय् असं वाटतं. ऊनही तसंच अनिश्चित-कधी हवंहवंसं वाटणारं तर कधी अगदी पोळून काढणारं. सावलीही तशीच-

कधी थंड वाटते, तर कधी बर्फासारखी!

आकाश आणि वारा यांची ही दोन प्रकारची रूपं सर्वात स्पष्टपणे लक्षात येतात. ती भातशेतांत. नवीन रोपांचा कच्चा हिरवा रंग जेव्हा निघून जातो, तेव्हा संपूर्ण भातशेताचा चेहराच जणू फिकट हिरवा वाटतो. वाऱ्याने तर भातशेत डोलतंय-इतक्या नाजूक पानांमुळे भातशेत तर अगदी पाण्याप्रमाणेच असतं. आता हळूहळू शेतातलं पाणी सुकेल. मग माती सुकेल. त्यानंतर माती अगदी कोरडी-कोरडी होईल. आणि पुढच्या तीन महिन्यात या प्रक्रियेबरोबर भातरोपांवरची हिरव्या रंगाची ही शेवटची छटासुद्धा निघून जाईल. वाऱ्यावर भातरोपांचं डुलणं पाहूनच मातीत आणि वाऱ्यात तेव्हा किती रस आहे हे लक्षात येतं. हा रस जितका सुकत जाईल, तितका भांतरोपांचा हिरवा रंग उतरत जाईल. उतरत-उतरत शेवटी आणखी एका रंगाकडे तो झुकेल. तेव्हा भातरोपांचा सगळा रस सुकून दाण्यांतलं दूध घट्ट होईल. तेव्हा भातरोपांचा सगळा रस सुकून दाण्यांतलं दूध घट्ट होईल. दूध जितकं घट्ट होत जाईल, तितकी रोपं पिवळी होत जातील. जितकी पिवळी होतील, तितके भाताचे दाणे तयार होतील. त्यानंतर वारा, माती आणि शरीरातलं सगळं पाणी झरून जाऊन संपूर्ण भातशेत सोनेरी रंगाचं होईल. सोनेरी पिवळं. भातशेताच्या मरणाचा रंग. जितकं सुकेल, तितकं सोनेरी आणि, भात तितका पिकणार, पक्का होणार. त्यानंतर एका क्षणी त्या रसहीन शुष्क पानांच्या तुलनेत दाणा भरलेल्या ओंब्या खूप जड होऊन जातील, भातशेत खाली वाकेल, भातरोपांवरची कणसं जणू मातीत परत जाऊ पहातील आणि मातीत. वाऱ्याने डुलतील. तेव्हा भातशेत वाऱ्याने जलाशयासारखं तरंगित होणार नाही.-

समोरचं फॉरेस्ट संपतं. फॉरेस्टच्या सावलीमधून ते समोर पहातात-गवत आणि झाडाझुडुपांवर तेच आधीचं झळाळतं ऊन. जणू त्या उन्हाच्या आभासानेच आता फॉरेस्टी छायाच्छत्रताही निघून जाते. फॉरेस्ट पार करून ते डावीकडे वळतात-डावीकडे भातशेत.

भातशेतातून त्या उन्हामधून जाताना पावसाळा मागे पडल्यासारखा वाटतो, जणू शरद सुरू झालाय्. उजवीकडे एक गांव. बांबूच्या कुपंणाची रेघ आणि अंगाला अंग लावून उभ्या असलेल्या घरांच्या मागे असलेल्या अंगणावरूनच लक्षात येतं, ही मुसलमानांची वाडी. गोचिमारी. तिच्याजवळून ते आणखी तिरक्या रेषेत जातात. थोड्याच अंतरानंतर तिस्ता नदीवरून येणारा गार वारा. वारा तिस्तेवरून येतोय्-वाऱ्याचा गारवा खूपच ताजा आहे, पण आर्द्र आहे. फॉरेस्टमधळा वारा बाहेर येत होता, तो ही आर्द्र होता, पण फॉरेस्टजवळून येताना त्याच्या तैलाक्त छायेनेही घाम आणला होता, भातशेतातल्या उन्हानेही तो पूर्ण सुकलेला नव्हता, पण अदृश्य तिस्तेच्या एका झलकेनेच तो पुसला गेला. ते सारे आणखी एका अरुंद, पक्क्या रस्त्यावर येतात. त्यांचं दल उजवीकडे वळतं. विनोदबाबू मागच्या बाजूने म्हणतात, 'हाच च्यांगमारी हाटाचा रस्ता, मागे.'

च्यांगमारीही सुहासच्या कॅम्पमध्ये मोडतो. सुहास ज्या कामाची योजना करतोय, त्यात अगदी शेवटी हा भाग घ्यावा लागणार. आता तो जी लाईन सुरू करणार आहे, तिच्यानंतर आणखी एक लाईन असेल च्यांगमारीत, तेव्हा च्यांगमारीहून आदाबाडी, चक मौलानी, दक्षिण चकमौलानी, दक्षिण माटियाली, झाड माटियाली, लाटागुडी आणि उत्तर माटियाली - या मौजांनी काम पूर्ण होताच. हे सारे विभाग मागच्या सेटलमेंटनंतर माल सर्कलमध्ये आले आहेत, त्याच्याआधी होते माटियाली सर्कलमध्ये. सुहास थोडा थांबतो. विनोदबाबू त्याच्याजवळून पुढे जातात. दलाकडे मागे वळून सुहास या रस्त्याने च्यांगमारी हाटाच्या दिशेने पहातो. त्यानंतर पुन्हा वळून दलाच्या मागे-मागे चालतो. थोडं जाताच समोर दिसतं फॉरेस्ट आणि तिस्ताफॉरेस्ट अचानक एका ठिकाणी सपलंय्, तिथून पुढे घास, गवत, चिखल काहीही नसलेल्या भिजलेल्या वाळूच्या मैदानाप्रमाणे नदी. वाऱ्यात पाण्याचं गर्जन. आणखी थोडं पुढे गेल्यावर तिस्तेचा प्रवाह आणि फेस दिसतो. तेव्हा वाटतं, तिस्ता नदी जणू फॉरेस्टला खातेय्-फॉरेस्टच्या कडेला इतकी भग्न जमीन आणि पडलेली झाडं.

## वीस

# तिस्तेकाठी जमिनीच्या सर्व्हेचं आयोजन

सुहासला येताना पाहून सगळी गर्दी उठून उभी रहाते.

दरम्यान प्रियनाथ आणि अनाथ पोचले होते. ते सर्व्हेटेबल एका सालाच्या झाडाखाली उभं करतात. त्याच्यापासून थोड्या अंतरावर एक खुर्ची दिसतेय, रिकामी, तीही झाडाखालीच. त्या टेबल खुर्चीभोवती नाना प्रकारच्या माणसांची गर्दी. थोड्या अंतरावर, आणखी एका झाडाखाली दोन झाडांच्या बुंध्यांना पॉलिथिनची चादर बांधून एक चहाचं दुकान. या बाजूच्या सगळ्या हाटात जो मुलगा चहाचं दुकान लावतो, त्याचंच हे दुकान.

सर्व्हे-पार्टी या ठिकाणी एक पायरी चढून आली. त्याच्या आधी विनोदबाबू आणि ज्योत्स्नाबाबूंनी आपापली ओझी जमिनीवर, सर्व्हे टेबलाजवळ ठेवून दिली. वरती येऊन ज्योत्स्नाबाबू आपली खांद्यावरची झोळी घेऊन गर्दीच्या बाजूला चहाच्या दुकानाच्या दिशेने गेले. हाफशर्ट, धोतर, पायात कॅनव्हासचे पम्पशू अशा वेशातल्या गयानाथने पुढे येऊन नमस्कार केला, 'यावं सर, यावं!' त्यानंतर ती खुर्ची दाखवून म्हणाला, 'बसावं, सर!' बसावं असं सुहासलाही थोडं वाटत होतं. त्याने म्हटल्याबरोबर सुहास या रिकाम्या खुर्चीत बसला असता, तर वाटेल, की सुहास इथं पाहुणा आहे, फार वेळ थांबणार नाही,

गयानाथच यजमान आहे. पण सर्व्हे-पार्टी तर सुहासचीच आहे. शिवाय इथे दुसरी खुर्ची नाही. बसावंसं वाटत असलं, तरी थोड्या वेळानंतर बसणं चांगलं.

विनोदबाबूंचे हात अगदी यंत्रासारखे निश्चित. त्यांनी सुहासला काही विचारलंही नाही. लाल शालूचा बस्ता उघडून त्यांनी मौजा-मॅप सुहासला दिला. त्यानंतर इथलं सर्व्हे टेक्निकल मॅन्युअल उघडून, त्याच्यामध्ये या सेटलमेंटचा कच्चा फॉर्म ठेवून दिला. मौजाच्या एक नंबरच्या डागापासून सुरुवात करतील आणि या जागेच्या मॅपिंगचा एक झमेला आहे. म्हणूनच के.जी. वन इथूनच काम सुरू करतात. वही आणि कंपास हातात घेऊन विनोदबाबूंनी अनाथ आणि प्रियनाथला शोधलं. अनाथला पाहिल्याबरोबर म्हणाले, 'प्रियनाथला बोलाव, ताबडतोब साखळी धरा, आता ऊन आहे, जितकं शक्य आहे तितकं आटोपून घ्या, नदीचं वाळवंट नीट ओळखून घ्या.' विनोदबाबू सुहासजवळ येऊन म्हणाले, 'आपण तर मॅप पाहिलाय. इथं फ्लडसाठी एक नवीन मॅपिंग करायचंय्. मी चेईन टाकतो.'

विनोदबाबूंनी नदीच्या दिशेने पाऊल टाकल्यावर अनाथ येऊन म्हणाला, 'प्रियनाथ तर काही दिसत नाही'. विनोदबाबू त्याच्या बोलण्यावर काही प्रतिक्रिया न देता म्हणाले, 'त्याला काय एवढ्यात वाघाने खाल्लं का? ताबडतोब चेईन धरायला सांगा. पाऊस पडला तर तुम्हाला न् मला पुन्हा एकदा इथल्या कामासाठी यावं लागेल. जास्त दिवस लागले तर त्यात तुमचा माझा काही फायदा नाही; ऑफिसरला तेवढा अलाउन्स मिळेल.'

प्रियनाथ या गर्दीत अशील धरायला गेलाय हे विनोदबाबूंना ठाऊक आहे. वस्ती किंवा मोठ्या जोताच्या कामाला बराच वेळ लागतो, वाटेकरी असतात, त्यांच्या वाट्याला मामला असतो, अशीलच प्रियनाथला शोधून काढतील. इथं तिस्ता नदीचं बदललेलं पात्र आणि सालाच्या झाडांची मापामापी पहायला तर अगदी दुनियाभरचे लोक आले आहेत- मग ते राजवंशी असोत, मदेशिया असोत, की नेपाळी असोत. इकडच्या भागात ज्यांचं अगदी काहीच जमिनीचं काम नसतं, एवढंच काय, फॉरेस्टच्या जमिनीत बेकायदा शेती करायलाही ज्यांना या गाजोलडोबा-सिदाबाडीच्या बाजूला तिस्तेकाठी यावं लागतं, त्यांच्यामध्ये अशील मिळणार कुठं? एक गयानाथ जोतदार आहे, पण तो काही इतर सतरा जणांसारखा चिल्लर अशील नाही. मौजा-मौजा जमिनीत त्याचा कारभार. इथलं काम ठीकपणे पूर्ण झाल्यावर सर्वांना ठोकपणे बहुधा काहीतरी देईल. इथलं काम लवकरात लवकर पूर्ण करून टाकण्यातच फायदा आहे. कुणा देउनियाचा काही मामला आहे का हे पहायलाच प्रियनाथ गेला आहे. नदीजवळून परत येऊन विनोदबाबू हाक मारतात, 'प्रियनाऽऽथ!' त्यांचा आवाज तिस्तेच्या वाऱ्याला आवाजात विरून जातो खरा, पण त्यानेही अगदी सुहासपर्यंत सगळेजण थोडे चमकतात - विनोद - बाबूंच्या आवाजाचा एवढा जोर पाहून. मौजा मॅप उघडून सुहास खुर्चीच्या दिशेने पुढे जातो.

'सर, एक सांगायचंय् सर, म्हणजे विनंती, विनंती होती सर' - तेच गृहस्थ.

'हेच सर, सर्व्हे तर सर रोजच होणार. खूप टाईम तर लागणारच सर, पण रोज-रोज हे टेबल आणि कागदपत्रं आपण, म्हणजे आपण नाही सर, यांनीही वाहून नेणं उचित आहे का सर?'

'त्याला काय उपाय, सर्व्हे करायचा म्हणजे हे सगळं करावं लागणारचं,' मॅपकडे पहात-पहात सुहास खुर्चीसमोर जाऊन उभा रहातो.

'त्याबद्दलच माझी एक विनंती आहे सर. ते माझंच एक काम आहे हे तर आपल्याला मान्यच करायला पाहिजे सर,' सुहास खुर्चीवर बसायला जाताना गयानाथ त्याला थांबवून म्हणाला, 'बसू नका सर, थोडं थांबा!'

सुहास खूप मनःपूर्वक मॅप तपशीत होता. यानंतर या नकाशावरच नवीन नकाशाची लाईन कुठून ओढायला हवी ते ठरवण्याआधी आउटलाईन पाहून घेत होता. अगदी याच सेक्शनची एक एनलार्जड आउटलाईन आखेलेली असती, तर खूप सोयीचं झालं असतं. त्या गृहस्थाच्या बोलण्याने सुहासने चमकून नजर वर केल्याबरोबर चीत्कार झाला, 'एऽऽ बाघारू!' विखरून उभ्या राहिलेल्या गर्दीतून एकजण येऊन उभा रहातो. सुहासच्या दोन्ही हातांत मॅप उघडून धरलेला-निळ्या कागदावर पांढऱ्या रेषांनी रेखाटलेला. आणि हा समोर आलेला माणूसही जणू आणखी एक मॅप-रिलीफमध्ये काढलेला. उठावाच्या नकाशाइतका एखाद्या निष्प्राण वस्तूप्रमाणे समोर येऊन उभा रहातो. त्याच्या माथ्यापासून पायापर्यंत तो सालाच्या उंचच उंच खोडासारखा ओबडधोबड आहे - वर्णशून्य आणि रूक्ष. डोळे दूर कुठेतरी लागलेले - बुबुळं दिसत नाहीत. अंगावर फक्त एक लंगोटी - तिचा रंगही अंगाच्या वर्णात मिसळून गेलेला. गयानाथ असा जोराने ओरडला, की जणू जंगलात रानकोंबडा ओरडावा. आणि तो माणूस येऊन उभा राहिल्यावर लक्षात येतं, की ती हाक त्याच्यासाठीच होती.

'खुर्ची पुसून दे.'

सुहासला पुन्हा त्या हाफशर्ट घातलेल्या माणसाकडे पहावं लागतं.

'ठीक आहे-' म्हणून सुहास खुर्चीत बसतो - म्हणजे खुर्ची याच गृहस्थाने आणवून ठेवलीय- आणि दोन्ही गुडघ्यांवर नकाशा पसरवून धरतो. तेव्हा सुहासच्या लक्षात येतं, की तो खुर्चीवर बसलेला असतानाही तो माणूस खुर्चीचा वरचा भाग, मागचा भाग, पाय हाताने पुसत चाललाय. सुकलेल्या लाकडावर त्याच्या सुकलेल्या हातांच्या घर्षणामुळे खस-खस आवाज येतोय.

'तर-तर हे टेबल, साखळी आणि हे सगळं सामान माझा माणूस योग्य ठिकाणी नीट ठेवून देईल, आणि दररोज आणून देईल. आणि या वह्या आणण्यासाठी एका माणसाला मी सकाळी आपल्या कॅम्पवर पाठवीन.

सुहास पुन्हा तोंड वर करून पहात नाही. आज ज्या भागाचा सर्व्हे करायचाय, त्या भागावर तो खूण करीत रहातो.

'सर, या भागात आमची जरा नाव-प्रतिष्ठा आहे, सर्व्हेयर-ऑफिसर-नेतेलोक यांची आम्ही सेवा करीत असतो. त्याला आपल्याला हेच सांगायचं आहे.'

गयानाथ थांबल्यावर सुहासच्या लक्षात येतं - तो थांबलाय. सुहास नजर वर करीत नाही. पण तो गृहस्थ आहे की निघून गेलाय हे नजर न उचलता समजत नाही.

थोड्याच वेळानंतर सुहासच्या लक्षात येतं की तो गृहस्थ गेलेला नाही. तो एकदा नजर सरळ करून पाहून घेतो- दूरची माणसं आणि त्यांच्यामध्ये हा गृहस्थच तेवढा उभा. सुहासला एकदा वाटतं, त्या गृहस्थाला इथून निघून जायला सांगावं. पण तसं बोलायला जातानाही तो थांबतो. सुहासला जणू थोडा राग येतो, रागवावंसं वाटतं- हे लक्षात येऊन सुहासला स्वतःलाच बरं वाटत नाही. तो गृहस्थ आतापर्यंत तर काही राग येण्यासारखं बोललेला नाही, सुहास उगाच अस्वस्थ का होतोय? सुहास पुन्हा नकाशाकडे पहातो.

'सर-' त्या गृहस्थाचा आवाज. काही क्षण जातात. पुन्हा तो गृहस्थ हाक मारतो, 'सर!'

सुहास मान वर न करताच म्हणतो, 'बोला ना, तुम्ही बोलत रहा, मी ऐकत रहातो.'

'होय सर, आपल्या कामात आम्ही अडथळा आणणं योग्य नाही-'

सुहास मान हलवतो. पण थांबत नाही, हलवीतच रहातो. गृहस्थ पुढे काही बोलत नाहीय हे पाहून सुहास मान हलवीतच रहातो, आणि नकाशाकडे पहात-पहात तो नकाशा इतका आत्मसात करू पहातो, की जणू यानंतर नकाशा न पहाताच तो जमीन ओळखू शकेल.

'आपल्या सोईसाठी सर, एवढी संधी आम्हाला आपण दिलीच पाहिजे-'

थोड्या शांततेनंतर त्या गृहस्थाचा आवाज जणू अभिमानी होतो- 'हा तर सर, आमच्या प्रदेशाचा अपमान!'

सुहासला मनातल्या मनात कौतुक वाटतं- सर्व्हेयर तर असा अधिकारी असतो, की त्याच्याशी अगदी मातृभाषेत बोललेलंही चालत नाही. सुहास नजर उचलून पहातो. नदीच्या वाळवंटात अनाथबाबू साखळीचं एक टोक धरून उभे आहेत, आणि दुसरं टोक नक्कीच तिस्तेच्या वाळवंटातून वनामध्ये गेलंय- विनोदबाबू बहुधा तिकडे असतील.

तो खुर्चीवरून उठतो. तो माणूस अजूनही बसल्या-बसल्या खुर्चीचे पाय पुसतोय. सुहास नदीच्या वाळवंटाच्या दिशेने जातो.

## एकवीस

# झाडाच्या बुंध्यावर मौजा मॅप

अनाथला मागे टाकून सुहास नदीच्या आणखी जवळ जाऊन सरळ उत्तरेकडे पहातो. आता हे वाळवंट काटकोनात उत्तरेकडे गेलंय. सुहास जिथे थांबलाय ती जागा फॉरेस्टच्या मौजा नकाशात जे.एल.नंबर ८७ आणि ८८ ची सिदाबाडी- गोजाबाडी सीमेपासून उत्तरेला, थोडी पूर्वेला अशी आहे. इथेच आता नदी आहे. याच्या सरळ पश्चिमेला या सिदाबाडी-गोचिबाडीचाच एक भाग, आपलचांदचा एक छोटा भाग आणि त्याच्या उत्तरेला या सर्कलमधला सगळ्यात मोठा जे. एल. ८४ नंबर आपलचांद फॉरेस्ट हा भाग होता.

त्याच्या पश्चिमेला ८५ नंबर गाडोलडोबा, आणि त्याच्याही उत्तरेला मौजा हांसखालीचा २१ नंबर जे.एल. या २१ नंबर जे.एल. पासून २४ नंबरची पश्चिम सीमा, ८५ नंबर गाजोलडोबा आणि तो जिथे उभा होता त्याच्याही डावीकडची, सिदाबाडी, गोचाबाडी - साऱ्याच आता तिस्ता नदीमध्ये आहेत. याच्या तळाशी/भागात ८६ नंबरमध्ये आपलचांदचा एक तुकडा होता, तेही मॅपवरून समजू शकतं- जरी आता तो तुकडा दुसऱ्या एका मौजात असला, तरी पण त्याच्याही खाली या ८४ चाच आणखी एक तुकडा होता. म्हणजे आता जो ८२ नंबर उत्तर आणि ८३ नंबर दक्षिण हांसखाली. आणि इथल्या साऱ्या जोतांच्या खालपर्यंत होतं आपलचांद. नाहीतर एकाच जे.एल. नंबरच्या मध्ये इतके जोत कसे काय येतात? मौजा मॅप जमिनीवरच उलगडून धरून त्यावर ओणवा होऊन बसून सुहास मोठ्या हांसखालीच्या २१ नंबरवर, ८५ नंबरवर, ८६ नंबरवर ८७, आणि ८८ नंबरच्या पश्चिम भागावर एकेक फुली मारतो. ८७ आणि ८८ पूर्वेला एक लांब खूण करतो. यानंतर एक रस्ता आहे. सरळ आपलचांदच्या मधून गेलाय. ही नावं जर रद्द झाली, तर एक नवीन आउटलाईन तयार होते. पण नदी तर काही जे.एल.नंबर लक्षात घेऊन वहात नाही. म्हणूनच ८४ नंबरची पश्चिम सीमा त्याला सव्यस्त करावी लागते.

एकेका टिंबाने एकेका गावाचा हिशेब पूर्ण करीत, सुहास मॅप उचलून, सरळ होऊन उभा रहाताच तिस्तेमधून वाऱ्याचा एक जोरदार झपाटा येतो. आणि त्याच्या हातातून एवढा मोठा आणि वजनदार मौजा मॅप एखाद्या कागदाच्या चिठोऱ्यासारखा उडून जातो. 'हे ऽऽऽ' असा चीत्कार करीत सुहास मॅपच्या मागे धावतो. नकाशा तेव्हा जमिनीवर पडतो. अनाथ साखळी फेकून देऊन नकाशा धरायला पळतो. पण त्याने मॅप धरण्याआधीच मॅप पुन्हा वाऱ्याने उडतो, आता सरळ नाही, तर कर्णरेषेत वरती झाडाच्या शेंड्याच्या दिशेने- एखादं विमान उडावं, तसा. तेव्हा सुहास थांबूनच होता, पण अनाथ मॅप धरण्याच्या प्रयत्न करीत होता. मॅप जणू एखाद्या पतंगबाजीत तरबेज माणसाने उडवलेल्या पतंगाप्रमाणे

आणखी वर गेला आणि एका मध्यम आकाराच्या फांदीच्या बेचक्यात अडकून झुलू लागला. आतापर्यंत आळसावलेल्या गर्दीत जणू अचानक प्राण संचारले आणि सगळे मिळून त्या नकाशामागे धावू लागले. सुहासलाही वाटलं, वाऱ्याचा जोर कमी झाल्यावर लगेच मॅप खाली पडेल, पण पडला नाही. म्हणून, वाऱ्याच्या दुसऱ्या झोताने तरी तो खाली पडेल, अशी सगळ्यांना आशा वाटू लागली.

आता सुहास पुन्हा नदीच्या दिशेने मागे वळला. त्याच्या समोर, थोड्या अंतरावर सर्व्हे टेबल. त्याच्यापेक्षाही थोडं पुढे, डावीकडे सगळी गर्दी एका झाडाखाली जाऊन एकत्र झालीय्. सुहास बोटात धरलेल्या पेन्सिलकडे पाहून हसतो. नंतर आपल्या स्वत:च्या मूर्खपणाला पुन्हा एकदा पहाण्यासाठी क्षितिजापर्यंत पसरलेल्या दलदलीकडे पहातो. क्षितिजापलिकडच्या त्या धूसर दलदलीवरून जणू फक्त सतत आणि जोरात वाराच वहात येतोय. 'हेऽऽ बाघारू -' जणू पुन्हा या आरोळीने रानकोंबडा ओरडल्यासारखं वाटतं. सुहास पुन्हा मान वळवून पहातो - झाडाच्या तळाशी गर्दीच्या मागे तोच बुटका, हडकुळा माणूस ओरडतोय. त्याच्या आरोळीमुळे गर्दीत काय हालचाल होते ते सुहासला दिसू शकत नाही. काहीतरी होतंय् एवढंच त्याला कळतं. थोडा पुढे जाताच तो गृहस्थ त्याच्याजवळ येऊन म्हणतो , 'सर, वारा खूप ना, त्यामुळेच!' सुहासला दिसतं, एक माणूस सरसरा झाडावर चढतोय. मघाचा तो खुर्ची पुसणारा माणूसच की काय? तोच असावा.

झाडावर चढणारा तर अशा सहजपणे झाडावर चढत होता की जणू चालण्यापेक्षा त्याला झाडावर चढण्याचाच सराव अधिक असावा. पण, फांदीच्या बेचक्यातून मॅप बाहेर काढल्यावर आता त्याचं काय करावं, हे त्याला कळत नाहीय. मॅप हातात धरून तो उतरू लागला, तर खोडावर घासून मॅप फाटण्याची शक्यता; आणि वरून सोडून दिला, तर तो पुन्हा उडून जाण्याची शक्यता. पण सुहास, तो हाफशर्टमधला गृहस्थ आणि गर्दीतले लोक यांना समस्या समजली असली, तरी झाडावरचा माणूस मात्र ती सोडवण्यासाठी काहीच करीत नाही. तो एका हाताने झाडाला धरून रहातो आणि दुसऱ्या हातात मॅप धरून ठेवतो. वाऱ्यामुळे नकाशा त्याच्या हातात फरफर करीत रहातो.

'हेऽ बाघारू, अरे तोंडात धरून उतर ना, तोंडात धरून उतर!'

अशी काही सूचना येईल हे जणू त्या माणसाला ठाऊकच होतं. ताबडतोब तो माणूस तो इतका मोठा नकाशा हातांमध्ये दाबून धरून सरासरा झाडावरून उतरायला सुरुवात करतो - जणू वाऱ्याच्या वेगाने झाडच तुटून जमिनीवर पडतंय. अगदी फांद्यांवरची पक्ष्यांची घरटी, मुंग्यांची अंडी, एवढंच काय, सापकिरडू यांच्यासहित. तो जमिनीवर उतरण्याआधीच नकाशाच्या एका टोकाचा जमिनीला स्पर्श होतो. लोक नकाशा घेतात, तो माणूस त्याच्या दातांची नकाशावरची पकड सोडून देतो. इतरजण नकाशा घेऊन तो देण्यासाठी सुहासकडे निघतात, पण ते सुहासपर्यंत पोचण्याआधीच तो शर्टमधला गृहस्थ

नकाशा आपल्या हाती घेतो. त्यानंतर तो सुहासकडे जाऊन, नकाशा देऊन म्हणतो, 'गच्च धरा, वारा फार आहे!' जणू नकाशा ही त्याने सुहासला दिलेली भेटवस्तू आहे. नदीजवळ सर्व्हे टेबलजवळ सुहास, या बाजूला गर्दी, पण झाडावर चढलेला तो माणूस गर्दीमागेही दिसत नाही. गर्दी आणि सुहास यांच्यामध्ये जणू तो हाफशर्टवाला गृहस्थ संपर्क स्थापन करतो. पण हा गृहस्थ आहे कोण? कुणीतरी जोरदार असावा हे तर समजतंच आहे. पण याचं नाव काय?

## बावीस

# जंगलामध्ये

फॉरेस्टमधून प्रियनाथ बाहेर येतो, 'सर, जरा तिकडे चला, विनोदबाबू उभे आहेत.'

'हो, चला,' प्रियनाथबरोबर सालवृक्षांच्या वनात शिरता-शिरता सुहास हसून म्हणतो, 'मॅप हातातून उडाला होता.'

'वारा भयंकर ना! माझ्याकडे द्या सर!' प्रियनाथ हात पुढे करून मॅप घेतो. तो शर्टवाला गृहस्थही आपल्याबरोबर येतोय, असं सुहासला दिसतं. एकदा वाटतं, त्याला विचारावं, आपण का येतहात? पण विचारीत नाही. गरज काय? सर्व्हेच्या संदर्भात जेव्हा त्याच्याशी संपर्क येईल तेव्हा पहाता येईल. पण इतका उशीर कशासाठी करायचा? तो गृहस्थ काहीतरी बद-मतलबाने आपल्याबरोबर फिरतोय असं सुहासला वाटतं. तो आपल्या मनातून संशय काढून टाकू पहातो; पण संशय काही जात नाही. याच कारणामुळे जणू तो थांबतो, वळून त्या गृहस्थाकडे पहातो आणि विचारतो, 'आपण इथं खूप दिवसांपासून रहात असाल ना?'

प्रश्न ऐकून प्रियनाथ थांबतो, तो गृहस्थही थांबतो. प्रियनाथ जरा चकित होऊन सुहासकडे पहातो. फक्त काही पावलंच ते आले आहेत, पण जंगलाच्या कितीतरी आत आलो आहोत असं सुहासला वाटतं. तिस्ताही दिसत नाही. त्यांची ती सर्व्हेची जागाही दिसत नाही.

चोहीकडून रेन-फॉरेस्टचा दाट हिरवा वेढा. सालाच्या झाडांच्या खोडांपर्यंत दाट शेवाळ जमलेलं. या सगळ्यात ती दोन माणसं थांबल्याने सुहासला थांबावं लागतं.

प्रियनाथ विचारतो, 'कोण सर?'

सुहास म्हणतो, 'नाही, आपणाला नाही, मी त्यांना विचारीत होतो, आपण इथं खूप दिवसांपासून रहात असाल ना?'

प्रियनाथ नकारार्थी मान हलवून म्हणतो, 'ते तर सर गयानाथ जोतदार.' प्रियनाथचं

वाक्य असं ऐकू आलं, की जणू 'सर' ही गयानाथची उपाधी आहे. हे ऐकून गयानाथ आपले दोन्ही जोडून, ते छातीजवळ घेऊन, मान खाली वाकवून असा उभा राहतो, की जणू इथे फक्त सुहास आणि प्रियनाथ एवढीच माणसं नाहीत, इतरही खूप माणसं आहेत, जणू या झाडांनाही त्याच्या या परिचयाचा अर्थ समजतोय्. नमस्काराचा अविर्भाव तसाच ठेवून गयानाथ म्हणतो, 'हो, मी गयानाथ.' गृहस्थ जणू पहिल्यांदाच आपल्या भाषेत हे बोलला. सुहासच्या चेहऱ्यावर त्याच्या बोलण्याचा काही परिणाम न झालेला पाहून ती 'ओ:! अच्छा!' म्हणतो आणि पाऊल पुढे टाकतो.

पण गयानाथ सुहास आणि प्रियनाथ यांच्या मागेच रहातो, जवळ येत नाही. तिथूनच विचारतो, 'आपण, सर, काही म्हणालात?'

'आपण तर इथं अनेक दिवसांपासून रहात असाल ना?'

'हो, सर. मी तर इथंच रहातो.'

'नाही, ते तर खरंच, पण लहाणपणापासून इथंच रहाता का? म्हणजे, तिस्ता नदी तेव्हापासून अशी जवळच होती का?

'तिस्ता तर सर, अडुसष्ट साल जर बाद करून विचार केला, तर समजा असं म्हणता येईल की, -' सुहासच्या पहिल्या प्रश्नाचं गयानाथ उत्तर देत नाही.

'म्हणजे, अडुसष्टच्या पुरातच सगळं बदललं का?'

'नाही, बदल तर होतोच, नदी म्हणजे काही माणसाने बांधलेली इमारत नाही जशीच्या तशी पक्की रहायला. बदल तर होतोच, व्हावाच लागतो.'

या प्रदेशाचा नकाशा आणि या प्रदेशाचं आत्ताचं स्वरूप यांच्यामध्ये जो बदल दिसतोय, त्यापैकी किती बदल या माणसाने आपल्या डोळ्यांनी पाहिलाय हे खरं तर सुहासला काढून घ्यायचं होतं, पण गयानाथ एकदम तत्त्वज्ञानाच्या पातळीवर जाऊन बोलायला लागल्याने तो बोलणं आणखी वाढवीत नाही. सुहास आणखी काहीतरी बोलेल अशी गयानाथला जणू थोडी आशा होती. त्याचबरोबर रातकिड्यांची किरकिर आणि प्रतिध्वनित होणाऱ्या तिस्तेच्या गर्जनेच्या आवाजामुळे फॉरेस्ट आणखी दाट होतं, नीरवता अधिकच प्रगाढ होते.

गयानाथ जणू स्वगताप्रमाणेच पुढे म्हणतो, 'पण नदीचं एक पक्क असं पात्रही असतं. ती कितीही बदलली, किंवा पात्राने दिशा बदलली, तरी सर शेवटी पुन्हा ठीकच होते. समजा -'

गयानाथ थोडा थांबतो. जणू काय उदाहरण घावं याचा त्याला थोडा विचार करायचाय्. आणि सुहासही निष्कर्ष काढण्याचा प्रयत्न करतो. - गयानाथ आपण काही वर्षांमध्ये केलेल्या निरीक्षणांच्या आधारावर काहीतरी सिद्धांत मांडणार असावा, किंवा मांडतोय्. नदीचं पात्र पूर्णपणे बदलतं, नदी जुन्या पात्रात पुन्हा जात नाही अशी घटना

गयानाथने पाहिली नाही, पण म्हणून ते काही खोटं नाही. सुहासच्या जणू लक्षात येतं, की गयानाथकडून त्याच्या मॅपसाठी जे समर्थन त्याला हवं होतं, ते मिळणार नाही.

याच नीरवतेत ते भिजलेल्या, कुजलेल्या पांनावरून चालत रहातात. सुहास प्रियनाथला विचारतो, 'कुठं?' प्रियनाथ चौकोनाच्या कर्णाप्रमाणे हाताच्या इशाऱ्याने समजावून देतो. त्याच वेळी गयानाथ म्हणतो, 'समजा, हा अड्डुसष्ट्रचा पूरच समजा. तिस्ता तर, समजा, इथून सरळ डावीकडे जाऊन, समजा, तिस्ता आणि धरलाच्या मध्ये जी विस्तिर्ण त्रिकोणी जागा आहे, ती तोडून, पुराने नष्ट करून पुढे गेली. आम्ही असा विचार केला, हे असं झालं, त्यामुळे आता इथपासून पुढे 'धरला' नदीचं पात्र हे तिस्तेचं पात्र होणार. पण तिस्ता तर तिच्या जुन्याच पात्रात परत गेली. अजूनही जातेय, वहातेय्.'

आत्ता थोड्या वेळापूर्वी ज्या जागा मॅपमधून बाद करून टाकाव्यात म्हणून सुहासने त्यांच्यावर फुल्या मारल्या होत्या, त्यांचा विचार करीत सुहास म्हणतो, 'पण आपली तर कितीतरी गावं वाहून गेली.' गावांची नावं त्याला आठवत नाहीत. जे आठवतं, तेच तो बोलतो, 'या फॉरेस्टमधलासुद्धा कितीतरी भाग वाहून गेला. याच्या उत्तरेला हांसखाली.'

'पण सर, नदी म्हणजे हे आलंच. जिचे तीर वाहून जातात आणि नवीन पात्र, नवीन वाळवंट तयार होतं, तिलाच तर नदी म्हणतात. आणि ज्याचं पात्र बदलत नाही, काठ भंगत नाहीत, पाणी वहात नाही, ते झालं डबकं!'

नदीच्या या व्याख्येने सुहास खूपच चमकतो. तो काहीतरी म्हणू पहात होता. पण त्याआधीच गयानाथ म्हणाला, 'पण आपलचांदचा जितका भाग वाहून गेला, तितकाच नवीन तयारही झाला.'

'कुठं?'

'जिथला वाहून गेला होता, तिथेच. नवीन बेट, नवीन जंगल.'

'सर, या बाजूला,' प्रियनाथ डावीकडे वळतो. त्याचबरोबर तिस्तेचं गर्जन जणू वाढतं. एक झुडूप पार करताच समोर काही झाडांच्या मधल्या जागेमधून दिसते, ती तिस्ता. विनोदबाबू एका ठिकाणी एका पडलेल्या झाडाच्या बुंध्यावर बसून वहीत नोंद करताहेत. सुहास वगैरे आलेले पाहून ते उठून उभे रहातात.

## तेवीस

# नदीचा नकाशा काढणे

'सर, आपण मॅप कम्पेअर केलेत?'

'हो, हे पहा. ज्यांच्यावर फुल्या आहेत, त्या जागा बाद होणारच, मग एक

आउटलाईन मिळते खरी, पण फॉरेस्टचं म्हणजे या व्हिलेजचं टोटल एकरेज आवश्यक आहे. त्यामुळे आधीच्या एकरेजेशी त्याची जरा तुलना करता आली असती. हे पहा, माझं डिमार्केशन.' सुहास प्रियनाथकडे हात पुढे करतो. प्रियनाथ मॅप उघडायला सुरुवात करतो. सुहास म्हणतो, 'काळजीने उघडा हं.' त्यानंतर विनोदबाबूंकडे पहात, हसत म्हणतो, 'माझ्या हातातून मॅप उडून गेला होता, तिकडे.' विनोदबाबू थोडं हसल्यासारखं करतात. सुहास तेव्हा स्वत:च हसून म्हणतो, 'एकदम झाडाच्या शेंड्यावर!'

मॅप जमिनीवर उघडला होता. त्या झाडाच्या बुंध्यावर आता सुहास बसतो. विनोदबाबू उकिडवे होऊन मॅपवर फुल्या मारलेल्या जागांवरून बोट फिरवून समजावून घेतात. प्रियनाथ मॅप एका कडेने दाबून धरतो. गयानाथ थोड्या अंतरावरून हे लक्षात येतंय्.

प्रकार काय आहे हे समजावून घेऊन, उठून उभे राहून विनोदबाबू प्रियनाथला म्हणतात, 'प्रियनाथ, चेन जरा डावीकडे सरकवायला सांगा बरं अनाथाला, आणखी थोडी उजवीकडे सरकवा. म्हणजे कर्णासारखी होईल. मग यालाच पॉइंट धरा सर - तिथूनच तुम्ही पाहिलं होतं ना?'

'धरा, तो तर चांगलाच पॉइंट होईल.'

प्रियनाथ साखळी थोडी हलवून, ओरडून काहीतरी म्हणतो. तिस्तेच्या वाऱ्यात ते ओरडणं वाहून जातं. पण त्याच प्रकारे अनाथचाही चीत्कार वहात येतो. विनोदबाबू माप घेऊन म्हणतात, 'हं, ठीक आहे. की आणखी थोडं अंतर सोडून देऊ, सर?'

प्रश्नाचं उत्तर शोधण्यासाठी सुहास एकदम वाळवंटात जाऊन नदीच्या गतीचा अंदाज घेण्याचा प्रयत्न करतो. नदीकडे पहाणं म्हणजेच पैलतिराकडे, निळसर क्षितिजाकडे पहाणं, पण सुहास पहातोय नदीच्या अलीकडच्या तटाकडे, आपल्या पायांच्या तळाशी.

इथे वाळवंट बरंच उभं आहे. आणि अगदी किनाऱ्यावर अनेक झाडं आहेत. ती हलक्या वजनाची झाडं म्हणूनच उभी आहेत. सालाची झाडं असती, तर ती आपल्याच वजनाने उन्मळून पडली असती. हे लोक जिथे उभे होते, तिथून काही हातांच्या अंतरावरच एक मोठं खैराचं झाड आपल्या फांद्या-पानांसहित आडवं होऊन पाण्यात पडलं होतं. पाण्यात पडलेलं असूनही त्याचा सगळा पर्णसंभार पाण्याच्या वरच होता - तळाकडचा थोडासा भाग तेवढा पाण्यात बुडाला होता. सुहासने थोडं वळून पाहिलं. तळाची मातीही निघून चालली होती. तो म्हणाला, 'इकडं हे वाळवंट आणखी नष्ट होणार असं दिसत - आणखी थोडं बाद करणार का?

'सर, आम्ही आता त्यालाच पॉइंट धरून करून ठेवतो. त्यानंतर एकरेज पाहून आणि उत्तरेकडच्या इलकाचा नकाशा पाहून अलाईन्मेण्ट ठीक करता येईल.'

'अच्छा, तसंच करा.' मौजा मॅपवर विनोदबाबू नवीन लाईन ओढीत रहातात आणि

प्रियनाथजवळून संपूर्ण साखळीची लाईन पाहून घेतात.

'गयानाथबाबू, यानंतर ओदलाबाडी चहाचा मळा ना?'

'हो, पण नदी आणि वन, नदी किती वन व्यापणार, किती तसंच ठेवणार, याचा अंदाज कसा करायचा? त्याचा हिशेब मॅपमध्ये कसा करायचा? गयानाथ आपल्या प्रत्यक्षतेला त्यांच्या आनुमानिकतेसमोर उभं करतो. जवळजवळ कोर्टाच्या मताप्रमाणेच त्यांची आनुमानिकता अटळ, न बदलणारी असते. विनोदबाबू यावर काहीच उत्तर देत नाहीत.

तेवढ्यात सुहास दृश्य म्हणूनच पहातो. तिस्तेचा अगदी क्षितिजापासून क्षितिजापर्यंत विस्तार दिसतो. काही वेळ त्या पात्राकडे पहात राहिल्यावर वाटतं, नदीऐवजी ही काठावरची जमीनच पुढे सरकतेय्. पुन्हा डोळे मिटून हा विभ्रम नष्ट करावा लागतो. तिस्तेचा प्रवाह इतका वेगवान आहे, की त्यात कुठल्याही लाटा किंवा खळबळ दिसत नाही - स्टीलच्या पात्याप्रमाणे नदीचा विस्तृत प्रवाह दिसतो. अधूनमधून एखादा लाकडाचा ओंडका वहात जाताना त्याचा वरील भाग पात्रावर दिसतो, त्यावरून प्रवाहाचा वेग लक्षात येतो. पण नदीची गर्जना तिच्या आसपासच्या आवाजांपासून वेगळी करून ऐकता येत नाही. विशेषत: जंगलात उभं राहिलं, की चोहीकडच्या समस्त आवाजांमध्ये नदीच्या गर्जनेचा आवाजही मिसळून जातो. पण नदीच्या आवाजाला आसपासच्या इतर आवाजांपासून वेगळं काढलं, की सिनेमातल्या स्मृतीभ्रष्ट व्यक्तीला पुन्हा पूर्वस्मृती येताना सायरनचा वाढत जाणारा आवाज पार्श्वसंगीत म्हणून देतात, त्या आवाजासारखं तिस्तेचं गर्जनच वाढत-वाढत या सगळ्या आवाजांमध्ये मुख्य होऊन जातो. तेव्हा वाटतं, या परिसर व्यापणाऱ्या आवाजाकडे दुर्लक्ष कसं करता येईल? पण त्या आवाजात अखंड चालू असलेल्या मेघगर्जनेसारखं थोड्या दूरत्वाचं इंगित आहे. पण अवरुद्ध असा गुम्-गुम् आवाज पाण्याच्या तळापासून आणखी जातो. पहाडापासून तळाशी जेव्हा मोठमोठे शिळाखंड एकमेकांवर आपटतात. तेव्हा पाण्याच्या तळामधून जणू तोफेचे गोळे उडाल्याप्रमाणे आवाज येतात. म्हणूनच लोकांनी या आवाजांचं नावही 'तिस्तेची तोफ' असं ठेवलंय्. जलप्रवाहाकडे पहात जेव्हा सुहास हे आवाज ऐकतो, तेव्हा त्याला इतर काहीही दिसत नाही की ऐकूही येत नाही. हे दृश्य आणि हे आवाज जणू त्याला स्तंभित करून टाकतात. तिथे या गढूळ पाण्याचा प्रवाह जणू आधीच खोदून ठेवलेल्या पात्रातून वळाल्यासारखा सहज वळालाय, त्या वळणापासूनच पाणी सुहासच्या दिशेने वहात येतंय्. सुहास आपले डोळे हळूहळू वळवीत त्या वळणापर्यंत नजर टाकतो. त्याच्या दृष्टीला थोडा भ्रम होतो - प्रवाह इतका प्रबळ आहे, की त्याच्याविरुद्ध नजरसुद्धा येत नाही! हा भ्रम नष्ट करण्यासाठी सुहास आधी डोळे मिटतो. त्यानंतर खाली बसतो.

## चोवीस

# नदी आहे की नाही : गयानाथी तर्क

डोळे बंद केल्याबरोबर नदी आणि नदीच्या आवाज-दोन्हीही आसपासच्या पार्श्वभूमीत मिसळून जातात. अशा प्रकारे नदीसमोर बसवून स्वत:ला नदीपासून वेगळं करून घेण्यात किंवा नदीला पुन्हा तिच्या पार्श्वभूमीत विलीन करून अस्पष्ट करण्यात सुहासला निश्चिंती वाटते. तो नदीकडे मागे वळून पहातो. विनोदबाबू नोंदी घेताहेत, गयानाथ त्याच्याकडे पहाताहेत, प्रियनाथबाबू नाहीत.

'प्रियनाथबाबू कुठंयत्?'

'चेन गुंडाळताहेत.'

आता गयानाथ सुहासच्या दिशेने पुढे येतो, 'सर, इथं मापामापीत तुम्हाला काय दिसलं? नदीचे काठ मोडले आहेत का? काय दिसलं मापामापीत?'

सुहास बसल्याबसल्याच म्हणतो, 'तुम्ही जे पहाता हात तेच मलाही दिसतंय्. आम्ही फक्त याची मापं घेऊन, नकाशा काढून ठेवतोय्.'

'तेच तर म्हणायचंय् सर! अडुसष्टच्या पुराच्या वेळी नदी इथे आली, घुसली, ठीक आहे. पण त्यानंतर तिने काठ तोडले नाहीत. आता फॉरेस्टही याच दिशेला, नदीच्या दिशेला, यानंतर वाढणार. . .'

''ते वाढेल तेव्हा वाढेल, आता तर काही वाढत नाहीय् ना? विनोदबाबू आपल्या वहीतून नजर न काढता म्हणतात.

'पण, सर, या पावसाळ्यात तर नदी सगळीकडेच घुसणार. जिथं जाणार ती जागा रद्द समजायची का? मग तर साला तमाम मौजा रद्द समजावा लागणार!' गयानाथ उत्तेजना प्रकट करतो, आणि सभ्य भाषा वापरू शकत नाही. त्याला जणू आणखी काही बोलायचंय्. म्हणूनच सुहास गयानाथला विचारतो, 'म्हणजे तुमचं म्हणणं काय आहे, म्हणजे, तुम्हाला काय सुचवायचंय?'

'नाही सर, मी म्हणतोय, की आपल्या मॅपमध्ये बदल करण्यासारखं तर काहीच नाही. मॅप जसा आहे, तसाच राहू द्या-' गयानाथ वाक्य पूर्ण करीत नाही, पण ते त्याला पूर्ण करायचंय् हे लक्षात येतं.

सुहास विचारतो, 'म्हणजे, आम्हाला असं दिसतंय की गाजलडोबा नाही, हांसखाली नाही, चौऱ्यांशी नंबर नाही, इकडे डाग नाहीत, आणि आम्ही सगळं ठीक आहे असं मॅपमध्ये लिहावं, असंच ना?'

'नाही, नाही, नाही, ते लिहायचं कामच काय सर, काहीही लिहू नका, जसं आहे, तसंच राहू द्या ना!'

'मग तर ते रेकॉर्ड करायला हवं. मी डाग नंबर देणार कुठं, आणि डाग नंबर द्यायला सुरुवात कुठून करणार?'

'फॉरेस्टची जमीन हासिल झालीय, तिथपासून धरा!'

'फॉरेस्टची जमीन हासिल झालीय म्हणजे?'

'म्हणजे, आधी फॉरेस्ट होतं, आता शेती होतेय्, ती तर तुम्ही शेतजमीनच धरणार ना?'

'कोण शेती करतंय्? फॉरेस्टची जमीन तर फॉरेस्टचीच रहाणार. कोण शेती करू देतंय्? याच्या उलटही असू शकतं - आधी शेती होती, आता फॉरेस्ट झालंय्!'

'हो. तसंही होऊ शकतं. पण इथं तर सगळीच जमीन फॉरेस्टची होती; ति ावर शेती व्हायला लागलीय्.

विनोदबाबू आता तोंड वळवून म्हणतात, 'जुन्यापुराण्या गोष्टी काढून काय लाभ? आता इतक्या दूरवर आलेली आम्हाला दिसतेय, त्याची नोंद व्हायला नको?' विनोदबाबू उभे रहातात, नंतर सुहासला म्हणतात, 'आपल्या लक्षात आलं ना सर, - फॉरेस्टच्या जमिनीवर जेव्हा गयानाथबाबू शेती करणार तेव्हा ती शेतजमीन म्हणून दाखवायला हवी, आणि गयानाथबाबूंची जमीन जेव्हा नदीच्या पाण्याखाली जाणार, तेव्हा ती गयानाथबाबूंचीच रहाणार, काय गयानाथबाबू?'

'आपण सीधी बात केलीत बाबू. जमिनीला काही उडून जायगा पंख नसतात, जिथली जमीन तिथेच रहाते - मग तिच्यावर फॉरेस्ट असो वा पाणी असो.

सुहासला समजतंय् की आधी आपल्या आसपास राहून, नंतर मागे-मागे येऊन, आधी थोडं बिचकत, आणि आता बरंच ठामपणे गयानाथबाबूंना काहीतरी सिद्ध करायचंय्. त्यांच्या बोलण्याला कायद्याचा कुठलाही ठोस आधार नसल्याने त्यांचं बोलणं एवढं आडवळणाने चालल्यासारखं वाटतंय्. ते सुहाससमोर बोलताहेत म्हणूनच या प्रकारे बोलताहेत. तो म्हणतो, 'पण यात लाभ काय आपला-म्हणजे आपणा सर्वांचा? आम्ही जर नदी नकाशात काढली नाही, तरी नदी इथंच रहाणार!'

'पण नदी इथून सरकणार सर, आणखी दोन महिन्यांनीच नदी इथून सरकणार.'

'नाही, ती तर सरकणारच, पावसाळ्यात नदी जेवढी असते, तेवढी हिवाळ्यात नसते. पण आपण काय फक्त हिवाळ्यातल्या नदीलाच नदी म्हणणार? पावसाळ्यातली नदीही नदीच असते ना? पावसाचं पाणी जाणारं कुठं?'

'तसं तर सर, आपण सध्या जी आहे, तिलाच नदी म्हणून डिक्लेर करून टाकलं, नोटीस दिलीत, तरी त्यानंतरही नदी सरकू शकते, पाऊस खुष झाला तर घरांमध्येही शिरू शकते, तेव्हा ज्या घरांत नदीचं पाणी शिरलं तीही नदी झाली म्हणणार की काय?' गयानाथचं हे बोलणं ऐकून सुहासला समजतं - उत्तर द्यायला अवघड अशा प्रश्नांकडे

दुर्लक्ष करणं, आणि स्वतःच्या बाजूने ठामपणे वारंवार विधानं करत रहाणं, हा वाद घालण्यातला पेच गयानाथला अनुभवाने चांगला जमतो आहे. गयानाथला बहुधा आपलं म्हणणं मांडता येत नाही हा सुहासचा संशय नष्ट होतो. विनोदबाबू म्हणतात, 'आम्हाला आत्ता जे दिसतंय तेच आम्ही नोंदवतोय. यानंतर अॅटेस्टेशनच्या वेळी म्हणा, तेव्हा तर पाऊस नसेल, तपासणीच्या वेळी म्हणा, चूक झाली तर चुकांची लिस्ट प्रकाशित होईलच. चला सर, आपल्याला उशीर होईल. एकाच ठिकाणी वेळ गेलेला चालणार नाही.'

'ते तर होईलच बाबू, पण सरांना माझं म्हणणं मी इथेच सांगू शकतो-हो की नाही?''

सुहास लगेच म्हणतो, 'नक्की,नक्की! आपण बोला ना, मी तर ऐकतोय आपलं बोलणं!'

गयानाथने आपल्या स्वतःच्या बाजूने होईल, अशा प्रकारे कायद्यातलं विधान सांगितलंय. याचा अंदाज सुहासला येतो. विनोदबाबूही गप्प होतात. तेव्हा गयानाथ म्हणतो, 'माझं म्हणणं तर सरळ आहे सर, आपण जिथं नदी काढलीय, तिथे नदी नाहीय. ते पावसाचं पाणी आहे!'

गयानाथाचं म्हणणं तपासून पहाण्यासाठीच जणू सुहास नदीच्या दिशेकडे वळतो. नदीच्या जरा आणखी जवळ जातो. त्यानंतर वाळवंटात नदी कुठवर पुढं आलीय हे पहातो. त्या रेषेकाठाने तो उत्तरेकडे चालत जातो. मध्येच त्या झाडाचा अडथळा आहे. म्हणून त्या झाडाला वेढा घालून पलीकडे जावं लागतं. गयानाथ आणि विनोदबाबू मागेच रहातात. गयानाथ कायद्याच्या बळावरच बोलू पहातोय हे लक्षात आल्याने सुहासही आपला मुद्दा जरा आणखी पारखून घेण्याचा प्रयत्न करतो. तो वळणापर्यंत पाहातो- त्या वळणाने नदीला बरंच उजवीकडे नेलंय. ही वाळवंटातली रेषा नक्कीच नदी पुरात जिथून पुढे येते. ते दर्शविणारीच आहे. पावसाच्या पाण्याने नदी जर इतकी पुढं येत असेल, तर अशा प्रकारे किनारा वाहून गेला असता? सुहास वाहून गेलेला किनारा पाहात नाही थोडा पाहिला असला, तरी त्याच्या आधारावर, इतका पाऊस होतो, हे त्याच्या कल्पनेकडे आहे. सुहास सरळ होऊन उभा रहातो आणि एकवार तिस्तेकडे पहातो. त्याच्यासमोर एखाद-दुसरं झुडूप आहे. त्या झुडुपांच्या मधल्या जागेतून तिस्ता दिसते. दूर गढूळ विस्तारावर आकाश आणि प्रकाशाच्या विचित्र सन्निपातामध्ये छायाप्रकाशाचाही किती अजस्र विन्यास! त्या विन्यासामध्ये कुठेही स्रोत नाही, भंगणं नाही, आक्रमण नाही, आवाज नाही. तिस्तेचा आवाज ऐकावा अशी सुहासची इच्छा होती. डोळे मिटून तो तिस्तेवर मन केंद्रित करतो. आधी फॉरेस्टमधल्या रातकिड्यांच्या आवाजात मिसळून तिस्तेचा आवाज ऐकू येतो. त्यानंतर हळूहळू रातकिड्यांचा आवाज अलग होतो. अलग होता होता जणू पाण्याच्या तळीचा घोष स्रोतावर येतो. तिस्ता जणू आता जलस्रोताएवजी ध्वनिस्रोत बनून जाते. अविरत ध्वनी. शिळाखंडांचा शिळाखंडांवर आपटण्याचा ध्वनी जमीन भेद करून वरती येतोय. अदृश्य जलगर्भ जिवंत होत रहातो. सुहास डोळे उघडतो.

आवाज बराच विरून जातो.

सुहास परततो. त्याने मनातल्या मनात प्रतिवादाचे मुद्दे पक्के केले आहेत. आता गयानाथाला जे पुरावे सादर करायचे असतील ते त्याने करावेत; अन्यथा सुहासने जे लिहिलं, ते पक्कं!

गयानाथ आणि विनोदबाबू त्याच्याकडेच पहात उभे होते. सुहास त्यांच्याजवळ जाऊन उभा रहातो. दोघांपैकी कुणीच काही बोलत नाही. सुहास म्हणतो, 'नाही गयानाथबाबू, नदी इथपर्यंतच येते.'

गयानाथ आत्तापर्यंत जसा तत्वज्ञासारखा ऐकत होता, तसाच ऐकतो, काही बोलत नाही. पण गयानाथ किंवा विनोद कुणी हलतही नाही. सुहास, 'तर मग चला विनोदबाबू' असं म्हणणार, तेवढ्यात विनोदबाबूच म्हणाले, 'सर माझं म्हणणं असं आहे, की गयानाथबाबू आता एवढी हरकत घेताहेत, तर पुन्हा एकदा पहायला काय हरकत आहे?

'मी सुद्धा त्यासाठीच तर पाहून आलो. ही नदीचीच आउटलाईन आहे. स्पिल एरिया नव्हे.' 'गयानाथबाबूंकडं पुरावा म्हणून काही सर्टिफिकेट असेल तर दाखल करावं' या विनोदबाबूंच्या म्हणण्यावर सुहास एकदा गयानाथच्या तर एकदा विनोदबाबूंच्या चेहेऱ्याकडे पहातो. सुहासनेही असंच बोलायचं ठरवलं होतं, पण तो ते गयानाथबाबू काही म्हणाले, तर त्याला प्रत्युतर म्हणून होता, स्वतःहोऊन नव्हे. विनोदबाबूंनी आधीच का बोलून टाकलं? पुराव्याची गोष्ट एकदा काढली की मागे घेता येत नाही. तरीही विनोदबाबू बोलले कशासाठी? गयानाथबाबू सुहासचं म्हणणं ऐकण्यासाठीच थांबून रहातात. सुहास म्हणतो, 'आपणाकडं काही पुरावा असले, तर सांगा.'

'मला जरा वेळ द्या सर. मला जरा एका ठिकाणी जावं लागेल. नंतर पुरावा देईन. नक्की देईन.'

'हो, आपण जा, पण ताबडतोब या.'

'होय सर. हा अस्सा गेलो आणि अस्सा आलो!'

गयानाथ ताबडतोब सरसर आवाज करीत पाचोळा आणि चिखल यांच्यातून दूर निघून गेला.

## पंचवीस

# दहा वर्षे आधी व नंतर : गयानाथचं जोत

सुहास गयानाथच्या जाण्याकडं पहातोय. गयानाथ अगदीच लहानखुरा, हडकुळा आहे. त्याच्या चालण्यामुळे कुठलाही आवाज होण्याचं कारण नाही. पण गयानाथ जणू त्याहीपेक्षा निःशब्दपणे, एखाद्या वेगाने जाणाऱ्या जनावरासारखा फॉरेस्टमध्ये दिसेनासा

झाला. गयानाथमध्ये एवढी तत्परता असेल असं सुहासला आतापर्यंत वाटलंच नव्हतं. त्याने खूप हळुवार आवाजात विचारलं, 'कोण हे गृहस्थ?'

'गयानाथ जोतदार. रायबर्मन. तीन पिढ्यांपासून. पाहिलं नाहीत? या मौजातली सगळी जमीन तर त्यांचीच. याच्या खालचा मौजाही पूर्वी त्यांचाच होता.

'गयानाथ रायबर्मन,' सुहास जणू कुठल्यातरी स्मृतीतून हे नांव आठवायचा प्रयत्न करतो. हे नांव आपण एखाद्या कागदपत्रात वाचलेलं नाही, रेकॉर्डवर नाही, दाखल्यावर नाही, गयानाथ हे नांव त्याने कुणाच्यातरी तोंडून ऐकलंय. 'याची काय जंगलातही दखल आहे की काय?'

'त्याची घुसखोरी नाही कुठं ते विचारा! हे तर सगळेजण गयानाथचं जोत म्हणूनच ओळखतात! आपण मौजाचं नांवही बदलू शकतो- 'मौजा गयानाथचे जोत' असंही लिहू शकतो.' 'का? ते कशासाठी?' सुहास जरा अन्यमनस्कपणे विनोदबाबूंना म्हणतो खरा, पण त्याच्या बोलण्यात थोडा जोर होता. विनोदबाबू तातडीने म्हणाले, 'नाही सर, असंच म्हणालो!'

आता सुहाससमोर चित्र जणू बरंचसं स्पष्ट होतं. थोडं हसून, नदीकडे बोट दाखवून तो म्हणतो, 'ही त्याची जमीन सगळी?' विनोदबाबू थोडं हसून मान हलवतात. 'तसं असेल तर मग नदीचाही दोष आहे, आपलाही दोष आहे!

गेल्या वेळच्या सेटलमेंटनंतर पंचवीस वर्षांनी ही सेटलमेंट होतेय. दरम्यानच्या काळात अडुसष्टच्या पुरासारखी घटना घडून गेलीय. तिस्ता बंधाऱ्याचं कामही सुरू होणार आहे. हा सर्व्हे तिस्ता बंधाऱ्यासाठीसुद्धा होतोय. तिस्ता बंधारा पूर्ण झाल्यावर नदीचं खूप काही बदलून जाईल. आता, या सर्व्हेमध्ये या मौजाच्या मॅपपासून इथले जुने डाग नंबर बाद होत चालले आहेत. आत्ताचे डाग नंबर नवीनच असतील. म्हणजे नदीने जी जमीन गिळंकृत केली ती नदीचीच संपत्ती होऊन गेली. आता जर दोन चार, आठ-दहा, बारा-चौदा वर्षांनंतर इथं नदीतली बेटं निर्माण झाली, किंवा बंधाऱ्यामुळे वाळवंट आणखी पुढं आलं तर त्यावर गयानाथचा कुठलाही अधिकार रहाणार नाही, त्या जमिनीवर मग हवा त्याला हक्क सांगता येईल आणि सरकारही इच्छा असेल त्याच्याशी त्या जमिनीच्या बंदोबस्त करू शकेल. पण जर नदीची सीमा इतक्या दूरपर्यंत मानली नाही, जुना मौजा मॅपच लागू राहिला, तर पाच-सात, आठ-दहा, बारा-चौदा वर्षांनतरही जर बेटं निर्माण झाली, तर कायद्यानुसार गयानाथ म्हणू शकेल की ही बेटं नाहीत, तर त्याच्या स्वतःच्याच जमिनी आहेत, आणि यावेळच्या सेटलमेंटमध्ये एका जणाच्या नांवे एकच 'खतियान' दिलं जाणार. म्हणजे या नदीच्या तळच्या मातीसाठीही गयानाथ 'हालखतियान' मिळावं म्हणून मागणी करील. सुहास काही पावलं पुढं जाऊन नदीचं वाळवंट पुन्हा एकदा नीट पहातो. यावेळी नदीच्या या भग्नरेषेला आणखी एक व्यक्तिगत संदर्भ चिकटला आहे.

इथे जी जमीन भंगतेय ती आहे फॉरेस्टची. पण आणखी दक्षिणे-दक्षिणेला जी जमीन भंगतेय किंवा भंगलीय ती सारी जमीन आहे गयानाथची. तिस्तेच्या पाण्याच्या तळची माती आता नैसर्गिक रहात नाही, पाण्याच्या तळाचं रहस्य रहात नाही, अंतस्रोत आणि खरस्रोत यांच्यामध्ये जणू कुणी अमानवीय शक्ती रहात नाही. तिस्तेचं पाणी, विशेषतः हे तटाजवळचं पाणी, तिस्तेची माती, विशेषतः ही तटाजवळची माती प्राकृत मानवी शक्ती बनते. झूप झूप करून जी माती पडते, किंवा स्रोताच्या प्रत्येक आघाताबरोबर तिराचा जो तळ रिकामा होत जातो, ती सगळी माती आणि तीरावरची भूमी गयानाथची.

सुहास तिस्तेकडे पहात रहातो. गढूळ पाण्यात फेसाची एक सूक्ष्म पांढरी रेघ डोलतेय. काही हात दूर तिस्तेच्या पहाडाला घासत वहाणाऱ्या प्रवाहाची ओढ इथपर्यंत पोचत नाही. जमिनीवरून एक कुसळ उचलून घेऊन सुहास ते पाण्यात सोडतो, जणू परिचित आत्मीयतेने. त्यानंतर विनोदबाबू म्हणतात, 'तर, त्यांचा जो पुरावा होता तो ते तिथेच देऊ शकले असते, इथे यायची गरज काय होती?'

विनोदबाबू थोडावेळ शांत राहून विह्वळ भावाने म्हणाले, 'हो की सर! आपण म्हणालात, मी सुद्धा आणखी विचार केला नाही.' त्यानंतर पुन्हा म्हणतात, 'आता आपण निघून जाऊ शकतो, ते तिथे येतील!'

'अच्छा, इथंच येऊ द्या, आता गेलेच आहेत तर-' म्हणून सुहास झाडाच्या खोडावर टेकतो, आणि हसून विनोदबाबूंना म्हणतो, 'काय मौजाचं नांव बदलून टाकणार की काय? काय म्हणतात "गयानाथचं जोत"?'

'नाही सर, असंच म्हणालो होतो,' विनोदबाबू जणू कैफियत देतात. पण सुहास पुन्हा म्हणतो, 'नांव काही वाईट दिसलं नसतं-"गयानाथचं जोत", या बाजूला तर अशी नाव' असतात.'

'हो सर, असतात'.

म्हणूनच हे नांव ऐकल्यासारखं सुहासला वाटत होतं की काय? खूप पूर्वी कुणीतरी ऐकवलं होतं, कुठेतरी आठवणीत आहे.- नक्षलबाडी, बुडोचं जोत, मंगलबाडी जोत, काळीचं जोत? त्यादिवशी असं कुठंही जाण्याऐवजी, दहा-बारा वर्षांनी, आता, सुहास बसलाय अशा एका जागी- त्या जागेचं नांव असू शकतं 'गयानाथचं जोत.' तो वाटल्याबरोबर हे नांव देऊ शकेल. देऊ शकतो. गयानाथ गेलाय त्याच्यासमोर मांडण्यासाठी पुरावा आणायला. सुहास आता जोतदाराचा निर्णयकर्ता झालाय. हा तर सुहासचा एक विजयच आहे, खूप मोठा विजय. पण सुहासला हा जय जाणवत नाही. 'गयानाथचं जोत' या एका नावाच्या संदर्भानेच त्याचा सारा जयबोध नष्ट होऊन जातो. तो गयानाथची वाट पहात थांबतो. गयानाथ त्याला बसवून ठेवून निघून गेलाय, पुन्हा परत येतोय, दहा वर्षांपूर्वी त्याना पाहून. गयानाथने पळत पळत आता त्याला सर्व्हेयर

म्हणून मानलं आहे. आता गयानाथ येतोय-त्याच्या हाताने ही नदी, नदीचं पाणी, नदीच्या तळची माती आणि हे जंगल सगळं गयानाथचं आहे असं पटवण्यासाठी. सुहासने ते मान्य केलं नाही, तर तो अपील करील. अपिलावरच्या अपिलावर अपील होईल. तिथे सुहास हा फक्त पायरी असेल. आत्मकरुणेपासून स्वतःला वाचवण्यासाठी सुहास पुन्हा एकदा नदीकडे पहातो. नशीब, तिस्तेला गयानाथची एवढी जमीन मिळालीय- म्हणूनच सुहास किमान जोतदाराचा सर्व्हेयर झालाय. सुहास पुन्हा एक कुसळ नदीच्या पाण्यात सोडतो. 'जोतदारविरोधी मित्रशक्ती', की, 'श्रेणीसंग्रामाची मित्रशक्ती,' पुन्हा 'डाव्या आघाडीचं सरकार कृषकांचं मित्र सरकार,' पुन्हा सुहास कृषकांचा मित्र सर्व्हेयर.' चारीकडे मित्रच. पण ज्याचा मित्र, तोच शोधूनही सापडत नाहीय.

## सव्वीस

# गर्दी आणि गयानाथ

अनेक माणसांच्या पायांच्या दाबाखाली कुजलेली, भिजलेली पानं तुडवली जात होती. त्याचा थोडा हिस्-हिस् असा आवाज येतो. सुहास पहातो, अनेक लोक येताहेत. विनोदबाबू म्हणतात, 'काय प्रकार आहे? इथल्या सगळ्यांनाच घेऊन आला की काय?'

'असंच वाटतंय', म्हणून सुहास विचार करतो, हे सारे आधीपासूनच तयार होते की काय? तसं असेल, तर मग सकाळपासून सर्व्हेच्या ठिकाणी जे इतके लोक जमा झालं होते, ते सगळेच गयानाथचे लोक की काय? जणू गयानाथ कुणी विरोधी बाजूचा माणूस आहे असं मानून सुहास विचार करतो, नदीच्या बाजूची कुणी माणसं नाहीत का?

सुहास पडलेल्या झाडाच्या खोडावरच बसलेला होता. सगळं दल येऊन समोर उभं रहातं. सुहास बसल्या-बसल्याच बघत रहातो. त्याला गयानाथ कुठे दिसत नाही. त्यामुळे जरा संघर्षाचं वातावरण निर्माण होतं. इथं या वनात तर पळून जायला जागा नाही- जंगलही पावसाळ्यातलं. सगळंच दल गर्दी करून समोर उभं रहातं. कारण बसायलाही जागा नाही. त्यामुळे नाईलाजाने गर्दीला काही रांगा करून उभं रहावं लागलंय. आणि गर्दीसमोर एकटा-एकटा सुहास बसलेला- त्याच्या मागे नदी. विनोदबाबू सुहासपासून थोड्या दूर अंतरावर, पण गर्दीच्या समोरच उभे आहेत. इथं अशा प्रकारे उभं रहावं लागल्याने सगळी तोंडं मिसळून गेली आहेत- जणू राष्ट्रीय एकता दाखवणाऱ्या कॅलेंडरवरील चित्रासारखी- तांबूस मोंगोल चेहऱ्याशेजारीच नकटा नेपाळी चेहरा, त्यामागे उभट संताळी चेहरा. सुहास इथे नवीन असल्याने, आणि या प्रदेशाचा परिचय त्याला केवळ नकाशे, आकडेवारी आणि रिपोर्टस् यांच्या माध्यमातूनच असल्याने समोरच्या चेहऱ्यांमधली विविधता त्याचा झटकन लक्षात

येते. अन्यथा पोशाखांमध्ये वगैरे या गर्दीतल्या लोकांमध्ये विविधता इतकी कमी आहे, की हे केवळ माणसांची गर्दीच वाटते. वेगवेगळ्या आदिवासींचा समुदाय वाटत नाही.

पण इतकी माणसं इतकी गर्दी करून या जंगलात सुहाससमोर उभी आहेत, जणू गयानाथ लोक जमा करून त्याला भीती दाखवतोय. सुहास उठून उभा रहातो, त्यानंतर जरा कठोर आवाजात विचारतो, 'गयानाथबाबू कुठंयत?' जणू अचानक सुहासला सावध व्हावंसं वाटतं- या जंगलामध्ये त्याला आणि विनोदबाबूंना असं अलग पाडून गयानाथ काही कपट तर करीत नाही ना? सुहास विनोदबाबूंकडे पहात नाही, पण त्याला समजतं, की त्यांच्याही मनात संशय, अनिश्चितता आहे. आपल्या अगदी पाठीमागेच तिस्ता, तीही पावसाळ्यातली तिस्ता आहे; आणि समोर इतकी माणसं आहेत- तीही आदिवासी माणसं.

पण इतकी अनिश्चितता- अस्थिरता मनात असूनही सुहास समोरच्या या चेहेऱ्यांकडे पहातो- अशा प्रकारच्या चेहेऱ्यांच्या समावेशाचं स्वप्न तो दहा-बारा वर्षांपूर्वी परीकथांच्या संदर्भात किंवा इतिहासाच्या संदर्भात पहात असे. व्यक्तित्व नाही, समष्टीच चेहेऱ्यांच्या या आकारांत आणि रेषांमध्ये, नाक-मुख-डोळे-कान यांच्यामध्ये जणू कोरलेली असावी, असं वाटतं. असा प्रकारे, एक प्रतिपक्ष म्हणून ती आपल्यासमोर येईल असं त्याला ठाऊक तरी होतं का?

'एऽ, सरका, सरका'- रानकोंबड्याच्या आवाजासारखा, या गर्दीमधून आधी गयानाथबाबूंचा आवाज ऐकू येतो. त्यानंतर समोरच्या रांगेतले लोक जरा बाजूला होतात आणि त्या मधल्या जागेतून गयानाथ मागून या बाजूला येताना अडकतो. तो न दिसल्यामुळे एकजण डावीकडे सरकतो, त्यामुळे गयानाथचा मार्ग बंद होतो. गयानाथला कसाबसा मार्ग काढावा लागतो. त्याचा शर्ट गर्दीत कुठेतरी अडकल्याने छातीपर्यंत उघडतो. त्यामुळे गयानाथ आपले कपडे धरून ठेवतो. त्याचे कपडे कुठे अडकले आहेत हे गर्दीत कुणालाच समजत नाही. आणि याच अवस्थेत गयानाथ रानकोंबड्याच्या आवाजात चित्कारतो, 'साल्या चुतियांच्या बच्च्यांनो, साल्यांनो जंगलात येऊन जंगली झालात, मागं काय आहे, काय नाही, काही दिसतं की नाही रे? इथं काय सर्कस होणार आहे का नौटंकी रे?'

तोवर धोतर गयानाथपर्यंत येतं. गयानाथ सुहाससमोर उभा राहून गर्दीला पुन्हा एकदा खच्चून शिव्या देतो. आपल्या बुटकेपणामुळे गर्दीतल्या सगळ्यांचा चेहेऱ्यांकडे पहाण्यासाठी गयानाथला मान खूपच वर करावी लागते व वळवावी लागते, हलवावी लागते. मान इतकी हलवून रागावता येत नाही, किंवा मान हलवीत असताना रागावणं त्याला शक्य होत नाही. म्हणूनच, गर्दीसमोर उभं राहून, मान वाळवून, जमिनीकडे पहात, गळ्यात जोर आणून गयानाथ शिव्या देणं चालू ठेवतो - 'सगळ्यांना इथं यायला कुणी सांगितलं होतं रे? सगळे आले साले भुतावळीसारखे! साल्यांनो, मुंगळ्यांसारखी लाईन करा, लाईनीत इथून निघून जा - जनावरं साली!'

गयानाथच्या पहिल्या चीत्कारानेच सगळे जरा घाबरून गेले होते. पण त्याचे कपडे अडकल्याने सगळ्यांना जणू एक काम मिळालं, आणि ते कुठे अडकले आहेत हे न सापडल्याने काम जरा वाढलं. दरम्यान, आपण पुढे गेलो तर आपल्या अंगावरचे सगळेच कपडे निघून जातील असी गयानाथला भीती वाटल्याने सर्वांनाच जरा मजा वाटली. आता, गयानाथ ओरडत असताना गर्दीतले लोक एकमेकांना धक्का मारीत हसताहेत, पण हसताना याच्या-त्याच्या मागे आपला चेहरा लपवण्याचा प्रयत्न करतात. गर्दीत कुणीच गयानाथला पाहू शकत नाही, आणि गयानाथही गर्दीतून पुढे जाऊ शकत नाही, यापेक्षा मोठी मजा कुठली असणार?

गयानाथ 'ऑऽक् थूः!' असा मोठा आवाज करून थुंकतो. त्यानंतर धोतराच्या सोग्याने तोंड आणि ओठ पुसतो. हे सगळं तो सुहासकडे त्याची पाठ असताना करतो, गर्दीसमोर उभं राहून. त्यानंतर गर्दीकडे पाठ करून सुहासकडे तोंड करून उभं रहाण्याआधी गर्दीतल्या पहिल्या रांगेतल्या माणसांच्या डोळ्यांत डोळे घालून तो फूत्कारतो, 'रेडे कुणीकडचे!'

सुहास बसला होता, तो बसूनच रहातो. तो गयानाथला काहीही विचारीत नाही. त्याने काही विचारण्यासारखंही नाही. त्याशिवाय सुहासला ठाऊक आहे, की थोड्या वेळापूर्वी गयानाथने एकट्या-एकट्याने, हळू-हळू बोलून सुहाससमोर आपली चांगली प्रतिमा उभी केली होती, त्यामुळे त्याला थोडं वजनही प्राप्त झालं होतं. आता जी गर्दी त्याची साक्षी- पुरावा होती, ती दबल्यामुळे त्याचा एवढा प्रयत्न फुकट गेला. पण आता सुहासही त्याला पुन्हा जोर येण्याइतका वेळ देणार नाही. त्याला आपला पुरावा सरळसरळ दाखल करायला हवा. त्याचा पुरावा काहीही असो, त्याला काय म्हणायचं हे सुहासने ठरवलंय- 'आपलं म्हणणं मी ऐकलंय, माझा जो निर्णय असेल, तो ड्राफ्टमध्ये, मसुद्यात असेल. तो पाहून, त्यावर जर तुमचं काही म्हणणं किंवा हरकत असेल तर अर्ज करावा.'

गयानाथ म्हणतो, 'सर!'

'हं, काय आणलंय बघू!' सुहास हात पुढे करतो.

'पुरावा दाखवीन असं आपणच म्हणालात, आता दाखवायचा की नाही हा आपला प्रश्न आहे,' सुहास कायद्याच्या भाषेत म्हणतो.

'सर, मी फक्त दोन जणांना बोलावलं होतं, तर हे सगळेच आले!'

'येऊ द्या ना!' काय दाखवणार द्या बरं!'

'आपण गैरसमज करून घेऊ नका सर.'

'का बरं?'

'हे जंगली लोक जंगलामधून इथं आलेयत.'

'त्यांच्यामुळे माझ्या कामात तर काही अडथळा येत नाही- आपण काय दाखवणार आहात, दाखवा ना!'

'दाखवतो सर, पण मला काही दोष देऊ नका.'

'गुण-दोषांचा तर इथं काहीच संबंध नाही. हा तर कायद्याचा मामला आहे.'

'नाही. हे जंगली लोक इथं आलेयत!

'ठीक आहे. द्या ना काय दाखवायचंय ते!'

'ए ऽ ऽ बाघारू!' पुन्हा रानकोंबड्याच्या आवाजात गयानाथ चीत्कारतो.

गयानाथची हाक ऐकून गर्दीला मागे सारीत एकजण पुढे येऊन उभा रहातो. गर्दीला मागे टाकून तो अधिक पुढे येत नाही. म्हणून गयानाथची हाक ऐकून तोच पुढे आलाय का हे समजत नाही. गयानाथ म्हणतो. 'जा बरं, झटकन जा, मौजाच्या कडेकडेने जा, समजलं?' शांतपणे तो माणूस उत्तर दिशेला, नदीच्या कडेकडेने निघून जातो- त्याच बाजूने थोड्यावेळापूर्वी सुहास गेला होता. तो माणूस असा निघून गेल्यावर काही वेळानंतर सुहासला आठवतं- त्याच माणसाने आधी आपली खुर्ची पुसली होती, आणि हाच माणूस झाडावर चढला होता की काय? पण तो माणूस आहे कोण? गर्दीकडे पाहून सुहासच्या लक्षात येत नाही. इतक्या वेळा गयानाथबाबूंनी त्या माणसाचं नांव उच्चारूनही सुहासला जणू त्याचं नांव समजत नाही, त्याचप्रमाणे इतके लोक समोर गर्दी करून उभे असतानाही तो त्यांच्यापैकी एकही चेहरा ओळखू शकत नाही. किंवा, सगळे चेहरे त्याला सारखेच दिसतात. त्यांना तो वेगवेगळे ओळखू शकत नाही.

तो माणूस निघून गेल्यावर गर्दी जरा पांगते. बरेचजण त्या माणसाबरोबर झुडुपांच्या मागून उत्तरेकडे निघून जातात. बरेचजण या ठिकाणीच बसतात-डावीकडे, आणि काहीजण उभ्या-उभ्या विनोदबाबू, सुहास आणि गयानाथ यांच्याकडे पहात रहातात.

'सर, आपण तर या सगळ्या जिल्हाचा नकाशा पाहिलाय ना?'

'जिल्ह्याचा? हो. का बरं?'

'नाही: असंच. समजा, आपण तर तिस्तेच्या खूप जवळ उभे आहोत. तिस्ता आपल्या पाठीमागेच आहे. आणि या तिस्तेच्या पश्चिमेला वैकुंठपुर फॉरेस्ट. हे सगळंच फॉरेस्ट होतं- अगदी चालसापासून तर बोदागंजपर्यंत.'

'तेव्हा नदी नव्हती?'

'तेच तर म्हणतोय सर, नदी रहाते, फॉरेस्टही रहातं, मौजाही रहातो, काहीही जात नाही-'

## सत्तावीस

# जमिनीचा सर्व्हे : गयानाथी पद्धत

गयानाथ नदीकडे बोट दाखवतो. सुहासला दिसतं, नदीत दूरवर दोन माणसं गवताच्या पात्यांसारखी वहात चालली आहेत. सुहास जवळजवळ ओरडतोच- 'अरे अरे!'

'सोडून द्या सर, तो तर बाघारू आहे!'

'म्हणजे?' विचारल्याबरोबर सुहासच्या जणू लक्षात येतं, 'प्रकार काय आहे?' ती माणसं नदीत उतरली की काय?'

'हो सर. जिथून ती तरंगत चालली आहेत तिथूनच माझा मौजा सुरू होतो.'

'एवढ्यासाठी आपण या पावसाळ्यातल्या तिस्तेत त्यांना नदीत उतरवलंत?'

'तो तर बाघारू आहे सर, आत्ता परत येईल. आणि मी तर फक्त एकट्या बाघारूलाच उतरायला सांगितलं होतं. आणखी कोण उतरलं रे नदीत?' गयानाथ आवाज चढवून विचारतो.

'मोहिनुद्दीन. डोवा-डाबरीचा.'

'अं? मोहिनुद्दिन? तो तर चँपियन पोहोणारा आहे सर! आता पहा-जिथं बाघारू आणि मोहिनुद्दिन नदीत वळताहेत, तिथं वैकुंठपुरचा बोदागंज भाग आणि हे आपलचांद एक झालं होतं. माझ्या म्हाताऱ्या बापाचा म्हणजे माझ्या आजोबाचा, म्हणजे माझ्या वडिलांच्या वडिलांचा मौजा तिथं होता. पण मी इथं काय म्हणतोय की हा जो मौजा आहे तो माझ्या नांवावर लिहा? माझी तर दलील आहे, ठीक. पण इथं तर नदी आहे. तिस्ता नदी. ती नदी तर मी मान्य करतो. पण मग काय इथंही मी नदी मानावी? इथंही मला नदी आहे असं मानावं लागणार?' म्हणून तो काठाच्या तळाशी पाणी दाखवतो- 'इथं नदी नाहीच. पावसाचं पाणी आहे. बाघारू इथं आल्यावर पहा इथे पाणी नाही. ही नदी नाही. इथं आपल्याला डाग नंबर द्यावा लागणार.'

आतापर्यंत सगळी गर्दी नदीच्या काठाशी जमलीय आणि आपले जलतरणपटू पहातेय. सुहासला थोडं अवघडल्यासारखं वाटतं.

गयानाथ त्याला या अशा प्रकारात अडकवणार हे असं सुहासला वाटलंच नव्हतं. की विनोदबाबू आणि गयानाथ यांच्यात काही संगनमत झालेलं होतं? त्या दोन माणसांना सुहाससमोर नदीत उतरवण्यात गयानाथचा काहीतरी मतलबही असू शकतो. जर त्या दोघांचं काही बरंवाईट झालं तर? गयानाथचा मतलब काय आहे? सरकारी ऑफिसर म्हणून त्याला कशाचातरी साक्षीदार बनवायचंय् की काय? पण आता सुहासला येथून निघता येईल का?असं शक्य आहे का? ती दोन माणसं परत येण्याच्या आत?

सुहासच्या डाव्या बाजूला गयानाथ. सुहास त्याला म्हणतो, 'आपण असा वेळ वाया का घालवताय? आमचा आज सर्व्हेचा पहिला दिवस आहे. आमचा ड्राफ्ट प्रकाशित झाला की आपल्याला काय साक्षीपुरावा द्यायचाय तो तो आपण देऊ शकता. त्या दोघांना नदीबाहेर यायला सांगा!

'ते तर येतीलच हो, पण त्यांना वेळ द्यायला हवा. ते काय आता प्रवाहविरुद्ध पोहत येणार? प्रवाहाबरोबर वहात-वहात यावं लागणार.'

सुहासला सकाळपासून कितीतरी वेळा या तिस्तानदीला पहावं लागतंय. अधूनमधून सहजही त्याने तिस्तेकडं पाहिलंय. पण तिस्तेच्या पोटात गेलेल्या गयानाथच्या जमिनीवर गयानाथ जेव्हापासून आपला ताबा असल्याच्या पुराव्याबद्दल बोलू लागला, तेव्हापासून सुहासला वाटतंय, जणू ही नदी खरं तर नदी नाहीय - गयानाथचं जोत आहे. तेव्हापासून तिस्ता जणू दृश्य राहिलेली नाही, त्याच्या या सर्व्हेचं घटनास्थळ बनली आहे. आणि आता तिस्ता नदीचा हा दिगन्तापर्यंतचा विस्तार, ही दोन जवळजवळ अदृश्य वाटणारी माणसं- पाण्यावरच्या फेसाप्रमाणे तरंगता-तरंगता त्यांनी तिस्तेला जणू सर्व्हे मॅपच्या रेषेमध्ये ओढून आणलंय. सुहास पुन्हा म्हणतो, 'त्या माणसांना काठावर यायला सांगा बरं!'

'काठावर या म्हटल्याबरोबर त्यांना कसं बरं काठावर येता येणार, सर? त्यांना प्रवाहाबरोबर तरंगत-तरंगत यावं लागणार. आता मैलभर गेल्यावर, डावीकडे वळावं लागणार. तिथं एक बेट आहे. तिथून पोहत ते इथं परतणार.'

तिस्तेमध्ये त्या दोघांना आता पहाता येत नाहीय, इतकी ती दोघे दूर गेली आहेत हे सुहासला दिसतं. सुहासला त्यांच्या डोक्यांवरचे केससुद्धा दिसत नाहीत. पण त्याच्या मागच्या आणि बाजूच्या गर्दीतलं कुणीतरी बोट दाखवतं- 'अरे तिकडं दिसताहेत पहा,' 'पुढं गेली . . .,' 'बाघारू पुढं आहे बघा', 'है ऽ पाण्याखाली गेले रेऽ' त्यांच्या बोटांच्या दिशेला पाहिल्यावर सुहासला एक-दोनदा दोन काळे बिंदू दिसतात खरे, पण ते इतक्या वेगाने पुढे चालले आहेत, की त्यांच्यावर नजर ठेवता येत नाही. पण एक-दोनदा ते दोघेजण दिसल्यावर ते कधी पुन्हा काठावरती येतील, किंवा येऊ शकतील असं सुहासला वाटत नाही- तिस्तेच्या प्रचंड प्रवाहात ते दोन काळे बिंदू फारच क्षुल्लक दिसतात. 'हे ऽऽ आता दिसत नाहीत,' 'बेट सापडलं वाटतं त्यांना!'

कुणीतरी मदेशिया भाषेत विचारलं, 'दोघांना बेट सापडलं?'

'हो. दोघांनाही सापडलं.'

'आता परत येतील!'

'असे जरा विसावा घ्यायला नको का?'

'शरीर सोडून देतील प्रवाहाबरोबर, थोडं थांबल्यावर शरीर सोडून देतील-'

'विसावा कशाला रे? प्रवाहाबरोबर तर तरंगत गेले?'

'प्रवाहाबरोबर तरंगायला काय जोर लागत नाही का? तरंगायसाठी-'

'हय्, हय्! परत निघाले!'

'कुठं? कुठं?' अनेकजण भुवयांवर आडवे हात धरून पहायचा प्रयत्न करतात. काही क्षणांच्या स्तब्धतेनंतर कुणीतरी म्हणतं, 'नाही रे ऽ, लाकूड चाललंय तरंगत! अन तू म्हणतोस ते दोघं आले होय?' ते दोघेजण बहुधा नदीतल्या एखाद्या बेटावर विश्रांती

घेत असावेत.

गयानाथच तेवढा विश्रांती घेऊ शकत नाही. तो भुवयांवर एकदा उजवा, तर एकदा डावा हात ठेवून कुठल्यातरी एका बिंदूवर त्या दोघांना शोधण्याचा प्रयत्न करतोय. गथानाथने जर एकच हात आपल्या भुवयांवर धरला असता, तर तो इतका बेचैन वाटला नसता. पण एकदा डावा, तर एकदा उजवा हात वर करण्याने आणि खाली करण्याने वाटतं, की जणू तो तिस्तेच्या संपूर्ण विस्तारावर नजर ठेवतोय. आणि, इतक्या वेगाने वहाणाऱ्या विस्तीर्ण प्रवाहाकडे इतका वेळ एकटक पहात राहिल्याने वाटतं, की जणू किनाराच जहाजाप्रमाणे तरंगत चाललाय, आणि गयानाथ डेकवर उभा राहून समुद्रातल्या दूरवरच्या बेटावर कुणालातरी शोधतोय.

सगळे गप्प झाले होते, बहुधा अचेतनही. आणि फॉरेस्टच्या इतक्या आतमध्ये, नदीच्या इतक्या किनाऱ्याशी शांत राहिल्याने ही जागा तिच्या स्वाभाविक स्तब्धतेकडे परत येते. त्या स्तब्धतेत फक्त इतक्या माणसांच्या निःश्वासांचा आवाज तेवढा मिसळतो. त्या शांतपणात तिस्तेवरून वारा येतो, आणि झाडापेडांमधून दाट वनात जातांना जणू शालवृक्षांनाही उपटू पहातो.

'परत यायला निघालेत, 'कुणीतरी खूप दबल्या आवाजात म्हणतं. हे वाक्य अशा प्रकारे उच्चारलेलं असतं, की जणू सर्वांनी त्यावर विश्वास ठेवावा. त्यानंतर शांततेतच नजरेने त्या दोघांचा शोध घेणं चालतं. सुहासही बारीक नजरेने पहातो. पण कुठल्या बाजूला पहावं हे त्याला समजत नाही. फक्त या धूसर सपाट भागावर एखादा काळा बिंदू दिसल्यावरच ते लोक इकडे येताहेत हे सुहासला समजेल.

'हे काय, हे काय, येताहेत-' सुहास बघतो, सगळेच त्याच्या डावीकडे बोटं दाखवताहेत. पहात राहूनही त्याला काही दिसत नाही. प्रवाहाविरुद्ध त्या दोघांना किती अंतर पोहावं लागणार?

सुहासजवळून गयानाथ म्हणतो, 'हं ऽ, आता ते मौवामारीच्या सीमेत घुसले, ना? सुहास म्हणतो, 'आँ?'

तेव्हा गयानाथ सुहासला विचारतो, 'ते येताहेत हे दिसतंय ना?'

'कुठंयत?'

'हे काय डाव्या हाताला', 'गयानाथ आपला उजवा हात दाखवीत म्हणतो, 'आता डाव्या बाजूला हळूहळू मान वळवा, हं, पुरे, पहा!' गयानाथ सुहासला वेळ देतो. मग विचारतो, 'दिसले का?'

सुहास मोघमपणे म्हणतो, 'हो-'

गयानाथ सुहासला आणखी थोडा वेळ देतो. मग विचारतो, 'आता तरी दिसताहेत का, सर?'

'हो, हो, हो' सुहास आपली नजर स्थिर ठेवतो. आता ते दोघेजण इकडे येताहेत. दोन काळे बिंदू नदीच्या पात्रात इकडे येताना दिसताहेत.

'त्या पोहोणाऱ्यांच्या डाव्या हाताला, माझ्या डाव्या हाताला, या साइडला,' म्हणून डावा हात उचलून गयानाथ म्हणतो, 'अठरा नंबर डाग मौवामारी मौजा आणि उजवीकडं, या साइडला पाच नंबर हांसखाली मौजा, दोन्हीही माझेच डाग आहेत. सोळा आणे माझे. तर मौवामारी बाद करा. इथं तर मौवामारी संपली. पण हांसखाली धरा. हांसखाली तर इथं सुरू, इथं ते येताहेत.' दोघेजण पोहोणारे आता चांगले स्पष्ट दिसताहेत. त्यांच्या हातापायांचं हलणं दिसत नसलं, तरी हळू-हळू त्यांच्या डोक्यांचे आणि मानेचे हेलकावे स्पष्ट होताहेत. गयानाथ आपला रानकोंबड्यासारखा आवाज सर्वात वर चढवतो, 'ए ऽऽऽ बाघारू, जरा डावीकडे सरक, सरक,' म्हणून उजव्या हताने सरकण्यासाठी संकेत करतो. गयानाथचा आवाज तिस्तेवरच्या वाऱ्यामुळे झाडांच्या शेंड्यांवर जाऊन आपटतो.

'देऊनिया, या किनाऱ्यावरच्या रंघामालीच्या बांधावर उभे राहून ओरडा, म्हणजे त्यांना ऐकू येईल, इथून ओरडलात तर ते उजवी-डावीकडे करायला सुरवात करतील-' पूर्वबंगालच्या हेलात बऱ्याच उंच आवाजात कुणाचातरी आवाज येतो.

गयानाथ त्याच्याकडे लक्ष देत नाही. तेवढ्यात पोहोणाऱ्यांच्या हातांमुळे उडणारं तिस्तेचं पाणी दिसतं. गयानाथ पुन्हा चित्कारतो- 'सरक, डावीकडे सरक, सतरा नंबरचा डाग धर, धर!' दोघांपैकी पुढे असलेला खरोखरच जरा डावीकड सरकतो, आधी लक्षात येत नाही, पण त्याचं डोकं नक्कीच डावीकडे वळतं- 'तिथं एक पुकुर आहे, फॉरेस्ट डिपार्टमेंटबरोबरच त्याचा आंशिक बंदोबस्त आहे, इथं हत्तींचा कळप पाणी प्यायला आला तर आम्ही काही करीत नाही. हेऽऽ बाघारू, उजवीकडे फीर, उजवीकडे फीर, सरळ ये!'

गयानाथ जणू पोहणारे लोक वळालेले पहाण्यासाठी सुहासला थोडा वेळ देतो. त्यामुळे सुहास अंदाजे माप घेऊ शेकल असं त्याला वाटतं. त्यानंतर म्हणतो, 'इथं सुरू झालं सर, सिदाडोबा, हातिडोबा, बाघाडोबा.'

'गयाडोबा-' आवाज ऐकून सुहासच्या लक्षात येतं, हे नक्कीच ते पूर्वबंगालचं दल असणार. पण हे दल आलं कधी हे तर काही सुहासने पाहिलं नाही. की हे पहिल्यापासूनच तिथं होतं- लपून-छपून?

'साल्यांनो, तुमचा बापडोबा!' गयानाथ सुहासजवळूनच मान मागे वळवून ओरडतो. त्यामुळे हसण्याचा जो आवाज येतो, त्यावरून वाटतं, गयानाथच्या या अचानक रागवण्याने सर्वांनाच मजा वाटली आहे.

## अठ्ठावीस

# गयानाथी पुरावा

आता नदीत कुणाचं फारसं मन नव्हतं. दोन माणसं जवळजवळ आली. गयानाथ म्हणतो, 'आता पहा सर, आपणाला दोन मौजा दाखवले, या मौजाचा किती भाग आपण नदीत सोडणार- हेऽऽ बाघारू, सरळ डावीकडे जा.' बाघारू सरळ डावीकडे चालत रहातो. चालतच रहातो. सुहास गयानाथकडे पाहून म्हणतो-, 'आपण त्याला इकडं यायला सांगा, तुमचा पॉइंट माझ्या लक्षात आलाय.' पण ही जागा सोडून गेल्याशिवाय गयानाथही त्याला सोडणार नाही, हे त्याच्या लक्षात येतं आणि तो म्हणतो, 'चलतो गयानाथबाबू', आणि गयानाथच्या लक्षात हे आणून देण्यासाठी मागे वळून हाक मारतो, 'विनोदबाबू!'

सुहासला मागे येताना पाहून गर्दी पांगलेली होती. विनोदबाबूंचा आवाज आला, 'येस सर!'

'चला, आपण परत निघू.'

'हो सर.'

'पण हुजूर, आपण माझा पुरावा पाहिला नाहीत, अस्सल पुरावा!'

'दाखवलंत की सगळं! आता आणखी कसला पुरावा?' सुहास दोन पावलं सरकतो, गर्दीही सरकते, गयानाथही सरकतो. तिस्तेमध्ये दोन लोक तरंगत रहातात. ते गयानाथ आणि इतरजण विसरलेले पाहून सुहास म्हणतो, 'त्यांना बाहेर यायला सांगा.'

'पण सर, आपण नदी पाहिलीत, माझे डागनंबर कुठं पाहिलेत?'

मागून पूर्वबंगालचा तो कँपू म्हणतो, 'कुंचकीपर्यंत दाखवणार ना?'

गयानाथ शांतपणे उत्तर देतो; 'फक्त तुझ्या खापरपणजोबाचं घर दाखवायचं राहिलंय रे!'

निश्चितपणा, किंवा थंड स्वर किंवा बोलण्यामुळे यावेळी गयानाथ जिंकतो. सगळ्यांच्या हसण्यामध्ये याला अनुमोदनच असतं. आपणही हसू लागलो आहोत हे सुहासच्या लक्षात येतं. गयानाथने तीर चांगला मारला होता.

'एक मिनिट सर, एक मिनिट, एऽ बाघारू इकडं येऊन उभा रहा. इकडे - समोरुन सगळ्यांना बाजूला करून गयानाथ सुहासला ते दृश्य दाखवतो. सुहास आपल्या जागेपासून हलत नाही. मान वळवून पहातो. पाण्यामध्ये गयानाथचा बाघारू उभा. त्याच्या छातीपर्यंत पाणी. हाच माणूस . . ., आणखी एकजण पोहणारा बहुतेक बाहेर आलाय.

बाघारू, आता चालायला सुरुवात कर, सरळ चालत जा,' पाण्यामधून बाघारू एखाद्या दारुड्यासारखा चालू लागतो- ते बहुधा पाण्याचा तळ असमतल असल्याने असेल

किंवा बाघारू थकल्यामुळेही असेल.

मागून आवाज येतो, 'लेफ्ट राइट, लेफ्ट राइट' जणू बाघारूला ऑर्डर देताहेत 'लेफ्ट राइट!'

बाघारू एका ठिकाणी खोल पाण्यात पडल्याबरोबर पोहू लागतो. गयानाथ आपल्या खिशातून कादगपत्रं बाहेर काढून म्हणतो, 'हे घ्या सर, माझं खातं, सोळा आण्याचं खातं.' घडी उघडून सुहास पहातो. या मौजातला जो भाग आता नदीच्या पाण्याखाली आहे, त्याच्या वेगवेगळ्या डाग-नंबरांची वेगवेगळी खाती. तो ताबडतोब म्हणतो, 'ठीक आहे. मी पाहिली.'

'काय पाहिलतं सर?'

'मला जे पहायचं ते पाहिलं!'

'पाहिलंत ना सर, एवढी विशाल नदी, आणि यात कुठं गुढघ्याइतकं तर कुठं छातीइतकं पाणी. इथं येतं ते पावसाचं पाणी. ही काही नदी नाही.'

'ठीक आहे. आपण आपली खाती विनोदबाबूंना दाखवा. मी तर पहिलीच आहेत. त्या माणसाला फुकट इतकं का फिरवलंत? इथून बांबू पाण्यात बुडवला असतात, तरी आपलं म्हणणं समजलं असतं-ही नदी नाही, पाणी आहे.'

'पण सर, आपल्याला तर मॅपप्रमाणे सगळं समजावून सांगायला हवं, म्हणून मौजाच्या अगदी माथ्यापासून सुरू केलं- कुठं माथं आणि कुठं शेपूट हे दाखवण्यासाठी.'

सुहास चालायला सुरुवात करतो. त्याच्याभोवती जमलेली गर्दीही त्याच्याबरोबर चालू लागते. दोनेक पावलांनंतरच सुहासच्या लक्ष्यात येतं, की तो गर्दीमध्ये आहे, आणि गर्दी हलली, तरच त्यालाही हलता येईल. गर्दी हलावी म्हणून तो पुढे जाण्याचा आविर्भाव करतो. तेवढ्यात त्याच्या डावीकडून एकजण घसा खाकरून म्हणतो, 'सर, मला तुमच्याशी काही बोलायचंय.'

सुहास त्या दिशेला पहातो. 'एऽ जागा सोडा, जागा सोडा-' म्हणून कुणीतरी मागून गर्दी बाजूला करतं. त्या मोकळ्या जागेतून एकजण पुढे येऊन उभा रहातो- हडकुळा, कोऱ्या कापडाचा शर्ट, घरी धुतलेलं धोतर, बगलेत छत्री, केस विस्कटलेले, चेहेऱ्यावर देवीचे व्रण, गळ्यात रुद्राक्षाची माळ. तो माणूस त्याच्यासाठी ठेवलेल्या जागेवर येऊन डोळे बंद आणि मान सरळ करून चुपचाप उभा रहातो. ओठांच्या कोपऱ्यात थोडं हसूही दिसतं. मान थोडी हलवून आणि डोळे बंदच ठेवून तो म्हणतो, 'माझं म्हणणं असं आहे की माल ठाण्याच्या क्रान्ति भागात वेगवेगळे कुप्रसिद्ध जोतदार, उदाहरणार्थ हा गयानाथ बर्मन-'

'खबरदार राधावल्लभ!' गयानाथ पुन्हा जमिनीकडे पाहात चीत्कारतो, 'मला जोतदार म्हणायचं असेल तर म्हण, पण 'कुप्रसिद्ध' म्हणू नकोस!'

राधावल्लभ डोळे न उघडता गयानाथच्या दिशेने मान वळवून, थोडं अधिक हसत विचारतो, 'काय म्हणू नको?' त्यानंतर आसापासच्या लोकांच्या दिशेने मान वळवून प्रश्नार्थकपणे तो आपल्या भुवया नाचवतो.

'हं, बोला,' सुहास म्हणतो, 'चला ना, तिकडं जाऊन एकेकाचं म्हणणं ऐकू. असं नुसतं ऐकून काही फायदा नाही, डाग नंबरांप्रमाणे काम सुरू करायला हवं, आपलं म्हणणं सांगा,' सुहास आता बाहेर जाण्यासाठी चालायला सुरुवात करतो. गर्दीही त्याच्याबरोबर चालत रहाते. मागच्या बाजूने राधावल्लभचा आवाड ऐकू येतो- 'आमची त्याला हरकत नाही. पण हे सगळे कुप्रसिद्ध जोतदार, उगाहरणार्थ गयानाथ बर्मन, नगेन मजुमदार, तारानाथ बसू आणि नौशेर अली यांच्या सांगण्याप्रमाणे जर सेटलमेंट होणार असेल, तर आम्ही आमच्या जमिनींचे सर्व्हे होऊ देणार नाही.'

एका माणसाला वेगाने चालता येत नव्हतं. राधावल्लभ जवळजवळ सुहासच्या मानेच्या मागूनच बोलत होता. आपलं म्हणणं संपल्यावर तो थांबतो.

'सगळे कुप्रसिद्ध आणि हा एकटा राधावल्लभ तेवढा सच्चा-सर, या भामट्याचं बोलणं ऐकूं नका,' गयानाथ म्हणतो.

सुहासचं मन द्विधा होतं. यांची जमीन यांनी अतिक्रमण करून मिळवलेली आहे की काय? म्हणूनच तिचा सर्व्हे होऊ देत नसावेत असं तर नाही ना? पण हा विषय काढायचा नसल्याने तो काही विचारीत नाही. आता सरकार अतिक्रमण केलेली जमीन, अनुमतिने मिळवलेली जमीन, बर्गा इ. सगळ्याचीच नोंद करवतंय. फक्त खास जमिनीची जोर दखल जमिनीचं रेकॉर्ड करू नये असा आदेश दिलेला आहे. ही ऑर्डरही बदलेल असं सुहासला वाटतंय. खाजगी जमिनीवरच्या अतिक्रमणाची नोंद का होऊ नये? म्हणूनच साध्या कागदांवर खास जमिनीवर अतिक्रमण करणाऱ्यांची लिस्ट करायचं सुहास ठरवतो.

सुहासला घेऊन चाललेल्या गर्दीतून 'कॉम्रेड', 'कॉम्रेड' असा शब्द दोनेकवेळा ऐकू येतो. पण हे कोण कुणाला म्हणतंय हे सुहासच्या लक्षात येत नाही. राधवल्लभ नक्कीच कुठल्यातरी राजकीय पक्षाचा माणूस आहे. पण नक्की कुठल्या पक्षाचा? काँग्रेस-आय पक्षाचा, की कम्युनिस्ट पक्षाचा? 'सेटलमेंटची साखळी फेकून देईन' असं म्हणण्याचा जोर सरकारी पक्षाचा असल्याशिवाय कुठून येणार? पण 'कॉम्रेड' म्हणजे तर काही काँग्रेस आय् नसणार, जरी तो राधावल्लभशी बोलत असला, तरी म्हणजे इथं बरेच पक्ष आहेत की काय? की काँग्रेस आयच्या लोकांनीही एकमेकांना 'कॉम्रेड' म्हणायला सुरुवात केलीय?

या सगळ्या दलाचा रस्ता अडवून एक माणूस सुहासच्या अगदी समोर येऊन उभा रहातो- नखशिखान्त भिजलेला, सगळ्या अंगावरून पाणी निथळतंय, अंगावरचे कपडे भिजून अंगाला चिकटलेले-एखाद्या भिजलेल्या सालाच्या वृक्षासारखातो समोर उभा. त्याच्या बाजूने गर्दीला पुढे जावं लागतं.

## एकोणतीस

# लोकांची गर्दी

आदिवासी-उपजातींची गर्दी बरोबर घेऊन नव्हें पार्टी वनातून बाहेर येते, तेव्हा इथं, सव्हें टेबल आणि गयानाथची खुर्ची टाकलेल्या ठिकाणी, लोकांची जणू एक सभा जमल्यासारखी वाटते. जमलेले लोक लांबपर्यंत पसरलेले आहेत. ही जागा दलदलीच्या ठिकाणी आहे. पूर्वेकडे उतार, जरा दूर गेलं की चिखल. इथून डांगा जंगलाजवळून सरळ ईशान्येकडं गेलेला. पाहिल्यावर वाटतं, की जणू ही फॉरेस्टचीच सीमा असावी, जणू ही दहा-पंधरा हात जमीन सोडून फॉरेस्ट डिपार्टमेंटने फॉरेस्ट तयार केलंय.

या रस्त्यासारख्या जमिनीवर गवत वाढलंय. सगळीकडे त्यांची उंची सारखी नाही. काही ठिकाणी गवताचं आवरण विरळ, तर काही ठिकाणी दाट आहे. विरळ आवरणाच्या ठिकाणी माती बाहेर आलेली दिसते, तर दाट आवरणाच्या ठिकाणी बसलं, तर गवताला लागलेल्या पाण्यामुळे कपडे ओले होतात. ह्या रस्त्याप्रमाणे डांगाच्या वरचा भागही जणू प्रयत्नपूर्वक स्वच्छ ठेवल्याप्रमाणे दिसतो. दोन्ही बाजूंना-उजवीकडच्या खोलगट जमिनीत किंवा डावीकडच्या छोट्या नाल्याच्या पलिकडे वनातील उंच घासाचं जंगल दाट आणखी उंच झालंय्. या सगळ्या घासवनात वाघ रहातात. हत्तींचे कळपही इथूनच पाणी प्यायला येतात. फॉरेस्टमधल्या नाना ठिकाणांहून सॉल्टलिक-लवण-चाटणं-येऊन या रस्त्याला मिळतात. आता पावसाळा आहे. फॉरेस्टच्या आतच पाणी मिळतं. पण हत्तींचे कळप सवयीमुळे कधीकधी ये-जा करतात. या येण्या-जाण्यामुळे रस्त्याप्रमाणे हा डांगा स्वच्छ रहातो. हत्तींचा कळप उंच घास खातो आणि झुडुपं उपटून टाकून रस्ता साफ करतो. पण हत्तींच्या सोंडेच्या टप्प्याबाहेर एका बाजूला फॉरेस्टच्या आणि एकीकडे जमिनीच्या उतारावर तो उंच घास वाढला आहे. हत्तींच्या कळपाला हा नाला ओलांडताही येत नाही, आणि उतरून खालच्या जमिनीवरही जाता येत नाही.

आता या हत्तींच्या मार्गावर हे लोक उभे राहिले आहेत. आपलाचांदमधून जो रस्ता ओदलाबाडीला जाऊन राष्ट्रीय महामार्गाला मिळतो, त्या पक्क्या रस्त्यावरच एक जीपगाडी थांबली आहे-आनंदपूर चहाच्या मळ्याची. तिच्या थोडं पुढे फॉरेस्ट डिपार्टमेंटची ॲम्बॅसिडर गाडी थांबली आहे. दोन्ही गाड्यांमधल्या बाबूंपैकी काही गाड्यांत बसले आहेत, काही गाड्यांना टेकून बाहेर उभे आहेत. दोन गाड्यांच्या मधल्या जागेत उतारावर पाय पसरून ड्रायव्हर आणि एक गार्ड गप्पा करताहेत. गार्डच्या पाठीवर बंदूक झुलतेय्. दोन गाड्यांच्या उभे रहाण्याच्या जागेपासून फॉरेस्टच्या दिशेने एक असंच लवण-चाटण आत गेलं आहे. त्या वाटेवर एखाद्-दुसरं मोडलेलं झाड सोडता झाडझडोरा नाही,

सामान्य अशी झुडुपं कुठंकुठं दिसताहेत. खूप दूरपर्यंत इतकी घनदाट हिरवी शून्यता पाहता कसं वाटतं? लवण-चाटणाच्या तोंडाशीच मदेशिया लोकांचा एक गट बसलाय्-गोल कोंडाळं करून. त्यांच्यापैकी काहीनी गमछासारख्या रंगीत कापडांचे शर्ट घातले आहेत, काहींनी हाफ् पँटस् घातल्या आहेत. कुणी उघडे आहेत, कुणी सँडो बनियान घातले आहेत-स्वच्छ पांढरे, दोनेकजणांनी नायलॉन बनियान घातले आहेत. अनेकांच्या हातात छोट्यामोठ्या लाठ्या आहेत. दोघाजणांच्या खांद्यावर छोट्या कुदळी आहेत.

हा मदेशियांचा गट खऱ्या गर्दीपासून थोडा दूरच आहे-समोरच्या मॅप-टेबल खुर्चीपासून. जिथून सर्व्हे पार्टी आली, ती जागा तिथून थोड्याच अंतरावर आहे. नेपाळ्यांचा एक गट गल्लीच्या तोंडाशीच उभा होता, तो आता सरकून विरुद्ध दिशेला आला. सकाळी आरंभी लोक नव्हते. तेव्हा चहाचं दुकान जणू खूप दूर आहे, असं वाटत होतं. आता मात्र चहाच्या दुकानाच्या समोर-जवळ दोन्ही बाजूंना माणसांची गर्दी आहे. ज्योत्स्नाबाबू तिथे अगदी जवळच आपला शिरस्ता उघडून बसले आहेत. त्यामुळे सर्वात अधिक गर्दी याच ठिकाणी आहे. रुंद जागेच्या अगदी मध्यभागी शेतकऱ्यांचा एक मोठा गट बसला आहे. ते चहा-बिस्किटं खाताहेत. ते जणू इथं संपूर्ण दिवस थांबण्याची तयारी करूनच आहे आहेत, असं त्यांना पाहून वाटतं.

## तीस

# कृषक समितीचा 'प्रोग्राम'

आपला गट घेऊन राधावल्लभ या गर्दीमध्ये येऊन थांबतो. त्याच्या डाव्या काखेत छत्री आहे, उजवा हात कोपरात घडी घालून डोक्यावर ठेवलेला, उजव्या हातांची बोटं मानेजवळ, दोन्ही डोळे बहुधा झाकलेले-बहुधा कुठलं आजारपण असल्यासारखे, डोळ्यांच्या कोपऱ्यात चिपड्या जमलेल्या.

सकाळी आपलं दल घेऊन सर्व्हेच्या जागी येऊन पोचायला उशीर झाल्याने राधावल्लभला जणू ठीक भूमिका मिळत नाहीय्. एवढंच काय, नीट उभं रहायला जागाही मिळत नाहीय्. सकाळी इथं झेंडा रोवून, इलेक्शन-बूथ सारखं, चटई-वगैरे लावून एखादं ऑफिस उभारायचं असं ठरलं होतं. काळा कोट आणि पांढरी पँट घातलेला वकील इथं यावा, अशी व्यवस्था करायला दोन दिवसांपूर्वीच शहरातल्या पार्टी ऑफिसमध्ये माणूस गेला होता. एक वकील नक्की पाठवू असं शहरातून कळवण्यात आलं होतं. सकाळी इथं येऊन, झेंडा उभारून एक ऑफिस तयार केलं, आणि त्यात एक वकील असला, की आपला जोरही आहे, कायदाही आहे असं लोकांना समजलं असतं.

सर्व्हे सुरू व्हायच्या आधीच घोषणाविषणा देऊन राधावल्लभने एक भाषण द्यायचं, असं ठरलं होत. तो आपल्या भाषणात इथल्या 'कुप्रसिद्ध' जोतदारांची नांवं सांगणार होता, आणि त्यांच्याशी कुठलीही तडजोड होणार नाही, याची ऑफिसरलोकांना जाणीव देणार होता. त्यामुळे कृषक समिती या सर्व्हेविरुद्ध प्रत्यक्ष आंदोलनात उतरायला बाध्य होईल. म्हणजेच या सेटलमेंटला शेतकऱ्यांच्या आणि अधिकारांच्या बाजूने प्रथमपासूनच घेऊन यायला हवं. बाकी सगळ्या भाषणात संपूर्ण दिवसभर इथल्या चहाच्या मळ्यातली जोतदारी, फॉरेस्टची जोतदारी, खास जमिनीवरील अतिक्रमण या विषयांवर सगळे बोलतील पण हळू-हळू, टप्प्या-टप्प्याने. प्रथम फक्त चेतावणी देणार, त्यानंतर घोषणा देणार. हृषिकेश म्हणाला होता, फक्त घोषणा चालणार नाहीत, गाणंही झालं पा जे. 'मग असं करा, तुम्हीच गाणं बसवा आणि म्हणा, चांगलंच होईल- ऑफिसरला क ल की आम्हाला गाताही येतं!'

पण त्या सर्वांना इथं पोचता-पोचता खूप उशीर झाला. भगतचं वासरू काल परत आलं नव्हतं. त्याला शोधून आणल्याशिवाय सर्व्हेच्या ठिकाणी कसं जायचं? वासरु अर्थात शेजारच्याच घराच्या एका गोठ्यात सापडलं. शेजाऱ्याने रात्री ते रस्त्यातून आणून आपल्या गोठ्यात बांधून ठेवलं होतं. पण आता उशीर झालाच आहे, तर जलपाईगुडीहून येणाऱ्या पहिल्या बसने जो कोणी वकील-मुख्तार येईल, त्याला घेऊनच कॅंपवर गेलेलं बरं, असा त्याने विचार केला. त्या बसने कुणीच आलं नाही. हृषिकेश थट्टेने म्हणाला, 'भगतचा कोट मी घालून जातो-वकीलासारखा दिसेन.' भगतला एक काळा कोट आहे- संपूर्ण हिवाळाभर लंगोटीवर तोच काळा कोट घालून भगत वावरतो.

सगळ्या दलासहित जेव्हा ते कॅंपच्या ठिकाणी पोचले, तेव्हा कॅंप पार्टी जंगलामध्ये गेली होती. त्यामुळे त्यांचं झेंडा रोवणंही झालं नाही, घोषणाही झाल्या नाहीत, गाणंही झालं नाही. गयानाथ बाघारूला बोलवायला आला, तेव्हा जणू त्या लोकांना इतका वेळ वाट पाहिल्यानंतर शिकार हाती आल्यासारखं वाटलं. वनात गयानाथबरोबर ऑफिसर एकटा-एकटा काय करतोय? तेही सगळ्यांबरोबर जंगलात शिरले. त्यानंतर तिथेच राधावल्लभने भाषण सुरू केलं, प्रोग्रॅममधल्या भाषणाचा थोडासा भाग, पण तेवढ्यात सगळे बाहेर पडले. भाषण सुरू केलं होतं. पण त्याला बगल देऊन बाकीचे सगळे आपापल्या पद्धतीने वनातून बाहेर पडले. तरीही भाषण पूर्ण झालं नाही. आता सगळ्या दलासहित राधावल्लभ या मूळ जागी पोचला. तिस्तेच्या काठापासून तर ओदलाबाडी रोडपर्यंत ती संपूर्ण जागा राधावल्लभ पहातो- इकडच्या बाजूला मोटरगाड्या, जीपगाड्या, आणि तिकडच्या बाजूला सर्व्हेची टेबलखुर्ची.

त्याचं दल चहाच्या दुकानासमोर येऊन उभं रहातं. एकतर चहाच्या दुकानाजवळ मुलखाची गर्दी, त्यात चरातले लोक त्याच्यासमोरच बसलेले. त्यावर ज्योत्स्नाबाबू-

सर्व्हेयर. त्यामुळे त्यांना पुढे येताच येत नाही. राधावल्लभ चहाच्या दुकानाच्या बाजूला मागे वळून, जमिनीच्या उतारावर सरळ पूर्वेकडे पहात थांबतो. आपल्या बगलेतली छत्री खाली करीत नाही. उजव्या हाताने एकदा डोळे पुसतो. बुद्धिमान इकडं-तिकडं फिरून राधावल्लभच्या मागे येऊन म्हणतो, 'कॉम्रेड, इथंच लेक्चर द्या, इतके लोक आहेत, नीट ऐकतील, चहाही घेतील, कुणीही हलणार नाही, ऐकतील.' बुद्धिमान एवढं बोलून झाल्यावर 'हे-हे' करून हसतो आणि टाळी वाजवतो- जणू त्यानेच या सगळ्या लोकांना इथं आणलंय, आता कॉम्रेड भाषण सुरू करणारच. बुद्धिमानच्या हाकेमुळे राधावल्लभ मागे वळत नाही. रावण एक ग्लास चहा आणून राधावल्लभच्या हाती देतो. त्यानंतर बगलेतून छत्री न काढताच डाव्या हातने खिशात पैसे आहेत की नाही हे पाहातो- पान खायला हवं. मान वळून पहातो- भगत आणि हृषिकेश चहा घेताहेत. हृषिकेश तर कुठेच गप्प बसू शकत नाही.- तिथेच मोठ्या आवाज बोलायला सुरुवात करतो. त्यांच्याबरोबर आलबिशही चहा घेतोय.

चहा घेऊन झाल्यावर आलबिश येऊन राधावल्लभजवळ उभा रहातो. आलबिश भगत पुरोहित आहे. त्यामुळे तो मासमच्छर खात नाही, वाढलेले केस कानांवरून मानेवर रुळत आहेत. कपाळ मोठं आहे. केस नियमित तेल लावून विंचरतो. दाढी ठेवण्याचा प्रयत्न करतोय बहुधा. पण दाढी कमी असल्याने म्हणण्याइतपत वाढलेली नाही. हनुवटीवर थोडीशी वाढलीय आणि मिशा ओठावरून खाली आल्या आहेत. आलबिशचे डोळे आणि समोरचे दात मोठे-मोठे आहेत. बोलताना तो मान पुढच्या बाजूने हलवतो आणि दात बाहेर काढून डोळे नाचवतो. 'ओऽ कॉम्रेड, आता इथच एक लेक्चर हाणा, और लेक्चर झाडके घर को चलो.'

आलबिशकडं तोंड वळवून राधावल्लभ म्हणाला, 'तुझं कायम हेच टुमणं. आपण घरी गेलो; तर इथं काम होईल? आधीच आपण इथं यायला उशीर केलाय. अजून तर मला जे सांगायचंय तेही सांगून झालेलं नाही.'

'मग बोल ना, सांगा ना काय सांगायचंय ते!' म्हणून भगत जरा बाजूला सरकतो. तेवढ्यात बुद्धिमान आणि हृषिकेश येतात. बुद्धिमान म्हणतो, 'कॉम्रेड, इथंच मीटिंग सुरू करून टाका.' हृषिकेश कुठलीच गोष्ट खाजगीत बोलत नाही, मोठ्या आवाजात, आसपास पहात, एका हाताच्या तळव्यावर दुसऱ्या हाताची मूठ आपटीत बोलतो, 'कॉम्रेड, सुरू करून टाका मिटिंग!'

हृषिकेशचा चेहरा रंगेल मागसाचा वाटतो. त्याने पँट आणि नायलॉनचा शर्ट घातलाय. पायात चामड्याचे सँडल्स. मळ्यातल्या एका बाबूकडून शिलाईमशीन मिळवून हृषिकेश ने लोटागुडी हाटात एक शिलाईचं दुकान टाकलंय. सध्या तोच त्याचा प्रमुख व्यवसाय आहे. बँकेचं कर्ज मिळाल्यावर कारागीर आणणार आहे. वीसपंचवीस वर्षांपूर्वी

लोटागुडीच्या खासजमिनीच्यापैकी काही जमीन हृषिकेशच्या वडिलांना मिळाली होती. हृषिकेशचे वडील बऱ्याच दिवसांपूर्वी निवर्तले. ती जमीन अजूनही हृषिकेश आणि त्याचा थोरला भाऊ यांच्यामध्ये अर्धी-अर्धी विभागलेली आहे. तो शेती करीत नाही हे खरं, पण म्हणून काही त्याने कृषक-समिती सोडलेली नाही. कॉम्रेडबरोबर तो सर्व्हे कँपच्या जागी आलाय- कृषक समितीच्या मागण्या घेऊन. एक गाणंही तयार होतं- हौशी रंगमंच आणि गायन ही हृषिकेशची व्यसनंच आहेत. पण आज काही गाणं म्हणण्याची संधी मिळेल असं वाटत नाही. हृषिकेश राधावल्लभला म्हणतो, 'इथं जितकं बोलून झालंय, त्याच्या पुढचं बोला.'

राधावल्लभ विचारतो, 'बोलू?'

बुद्धिमान म्हणतो, 'बोला, बोला; लवकर बोला. सगळे बसल्या-बसल्या चहा घेताहेत, आता बसल्या-बसल्या ऐकतील. बोला.'

## एकतीस

# राधावल्लभचं भाषण

राधावल्लभची चहाच्या दुकानाकडे पाठ होती. तो चहाच्या दुकानाकडे वळला. त्याच्या डाव्या बगलेत छत्री जणू चिकटलेलीच आहे. राधावल्लभने डोळे बंद करून घड्याळ एका बाजूला हलवताच हृषिकेश जवळून म्हणतो, 'बोललेलं रिपीट करु नका, जे बोलून झालंय त्याच्या पुढचं बोला.'

जणू याला प्रत्युत्तर म्हणूनच राधावल्लभ सुरुवात करतो, 'तर, मी असं म्हणालो होतो की आपल्या या माल लोटागुडी- क्रान्ति भागात अनेक कुप्रसिद्ध-'

'हा पार्ट तर होऊन गेला कॉम्रेड!'

राधावल्लभ डोळे उघडतो, 'मला बोलू दे हृषिकेश!'

'बोला, पण रिपीट करू का!'

राधावल्लभ पुन्हा डोळे बंद करतो. थोड्या वेळाने मान हलवून सुरू करतो, 'तर मी असं म्हणालो होत की आपल्या या माल-लोटागुडी-क्रान्ति भागात अनेक कुप्रसिद्ध जोतदार आहेत. शेतकऱ्यांचं शोषण करणं हाच त्यांचा एकमेव हेतू आहे. पण मी असं का म्हणतोय? पहा, आनंदपूर चहा-मळ्याची जोताची जमीनही आहे, चहाची जमीनही आहे. पण हे मालकलोक चहाच्या जमिनीत भाताची शेती करतात आणि भाताच्या जमिनीत चहाची शेती करतात. हे मालकलोक चहाच्या मळ्यातल्या मजुरांकडून भाताची शेती करवून घेतात आणि जमिनीच्या अधियारांकडून चहाच्या मळ्याचं काम करवून घेतात.

पण या शेतकऱ्यांना मजुरांप्रमाणे दरमहा वेतन मिळत नाही. ठेका मजुरी मिळते. आणि मजुरांनाही शेतकऱ्यांना मिळायला हवा, तसा पिकातला अर्धा भाग मिळत नाही. मजुरीची रक्कम मिळते. कंपनीला सगळीकडूनच फायदा होतो- जोतदारीतही फायदा, डिरेक्टरीतही फायदा. आणि मजूर-शेतकऱ्यांचा सगळ्याच बाबतीत तोटा होतो- मजुरीतही तोटा, अधियारीतही तोटा-' राधावल्लभ जणू दम घेण्याची गरज वाटल्यानेच थोडा थांबतो. तेवढ्यात हृषिकेश म्हणतो, 'हे कुठलं लेक्चर देताय कॉम्रेड? ही काही मजूर आणि शेतकऱ्यांची मिटींग नाहीय. सर्व्हेची आहे, जमिनीचा सर्व्हे चाललाय, जमिनीबद्दल बोला,' बहुधा म्हणणं ऐकून, किंवा बहुधा जमिनीच्या विषयावर येणं न जमल्याने राधावल्लभने एक मोठा विराम घेतला होता. आता सुरुवात केल्याबरोबर त्याला एकदम जमिनीच्या विषयावर यायचं आहे- आधीच्या बोलण्याचं सूत्र सोडून.

'आम्हाला कृषक-समितीकडून सगळ्या जमिनीचा बंदोबस्त शेतकऱ्यांच्या भल्यासाठी व्हायला हवा आहे. जे शेतकरी खाजगी जमिनीत कुळं म्हणून काम करताहेत, जोतदारांच्या काठ्या, पोलिसांचे अत्याचार, कज्जेखटले-जेल सहन करातहेत, त्यांच्या सगळ्या जमिनीत बंदोबस्त द्यायला हवा. जे शेतकरी फॉरेस्टच्या जमिनीवर शेती करताहेत, ज्यांनी फॉरेस्टच्या खडकाळ जमिनीवर आपल्या श्रमांनी पिकं उभी केली आहेत, ती सगळी जमीन त्या दखलदार शेतकऱ्यांच्या नांवाने करून द्यायला हवी. पण फॉरेस्टच्या जमिनीत जे जे जोतदार शेती करताहेत, त्यांच्या हातून ती जमीन काढून घेऊन ती हलुवा-अधियारांमध्ये वाटून टाकायला हवी.' राधावल्लभच्या बोलण्यात आवेग येऊ लागला होता-त्याच्या, कृषक-समितीतील प्रत्यक्ष अशा नाना अनुभवांच्या स्मृतींचा आवेग. आणि त्या आवेगामुळे, स्मृतींच्या प्रबळतेमुळे तो थोडासा भरकटतो. तो थोडा थांबतो. तो दम घेण्यासाठी थांबलाय असं वरवर वाटतं खरं, पण त्याच्यासमोर आता दुसरीच समस्या असते, हे त्याचं बोलणं ऐकून लक्षात येतं.

'माझा एक विशेष मुद्दा आहे चरावरच्या शेतकऱ्यांच्या संदर्भात. आपल्याला या तिस्तानदीचा प्रवाह सारखा बदलत असतो. आज तिथं शेतजमीन आहे, तिथं उद्या बेट असलेलं दिसतं. म्हणून जोतदारांचं दल त्यांची जमीन तिस्तानदीत गेली तरी त्यावर आपला ताबा ठेवतं. बेटावरच्या जमिनीवर साधारण शेतकऱ्यांना ताबा मिळत नाही. आणि दुसरीकडं अशी बेटं आहेत, की जी पक्की आहेत, जी नदीत वाहून जाण्याची कुठलीही भीती नाही, कायम जमिनीपेक्षाही ती कायम आहेत. पण सरकारी नियम असा आहे की पन्नास वर्षेपर्यंत एकादा चर (बेट) चर राहिला नाही, तर तो कायम जमीन म्हणून डिक्लेअर होत नाही. ही संधी साधून, ही पळवाट पाहून आमचे पूर्वबंगालमधले हिंदू बांधव येऊन या सगळ्या चरजमिनींवर शेती करताहेत. जिथं पूर्वी नुसतं गवताचं जंगल होतं, वाघांचा वावर होता, तिथं आता भातशेती होते, माळवं होतं, टरबुजं होतात. पण हे

पूर्वबंगालमधले बांधव इथल्या आमच्या राजवंशी लोकांना आणि मदेशियांना आपल्या चर जमिनीला स्पर्शही करू देत नाहीत. जणू या चरजमिनी-'

चहाच्या गाडीजवळ जो एक मोठा गट बसल्या-बसल्या चहा पीत होता, त्यांच्यापैकी एकजण उडी मारून चित्कार करतो, 'ए साल्या साहा, चरमजमिनीचा मुद्दा इथं उकरून काढायला तू कोण आहेस रे?'

इकडून हृषिकेश हुंकारतो, 'खबरदार, लेक्चर थांबवायचं नाही.' हृषिकेशचा चित्कार पूर्ण होण्याआधीच बुद्धिमान घोषणा सुरु करतो, 'इन-कि-लाऽब' आणि इतक्या गर्दीमध्ये नाना ठिकाणांहून हात वर उठतात, काही हातांमध्ये चहाचे ग्लासही आहेत- 'झिऽन्दाऽबाद!'

चहांच्या शेतकऱ्यांच्या गटापैकी एकजण एका उडीत बुद्धिमानसमोर येऊन उभा रहातो- 'साला!' प्रतिआक्रमण करण्यासाठी बुद्धिमान त्याच्यावर जवळजवळ झडप घालतो- 'साला!' पण कुणीही कुणाच्या अंगाला हात लावीत नाही. दोघेजण समोरासमोर, अंगाला अंग भिडलेलं. दुर्गेच्या असुरांसारख्या आविर्भावात एकमेकांकडे डोळे मोठे करून पहात रहातात. जणू कुठल्याही क्षणी मारामारी सुरू होईल.

एवढ्या गडबडीत राधावल्लभ डोळे उघडतो, थोडं हसून उजवा हात वर करून सगळ्यांना म्हणतो, 'आपण शान्त व्हा. या मारामारीने कुणाचं भलं होणार? तर मी असं म्हणत होतो की आपल्या या माल लोटागुडी-क्रान्ती भागात अनेक कुप्रसिद्ध जोतदार-' जो माणूस उडी मारुन बुद्धिमानसमोर उभा ठाकला होता, तो पुन्हा एक उडी मारून राधावल्लभकडे पाहून म्हणतो, 'हं, त्या जोतदार-बितदारांच्याबद्दल काय म्हणायचं ते म्हणा. चरांच्याबद्दल काहीही बोललेलं चालणार नाही. चरांमध्ये जोतदारही नाहीत, अधियारही नाहीत, सेटलमेंटही नाही, पट्टाही नाही.'

राधावल्लभ पुन्हा आपला उजवा हात उंचावतो, 'आपण शांत व्हा. मी असं म्हणत होतो की गेल्या सेटममेंटनंतर आपल्या या माल-लोटागुडी-क्रान्ती भागात बरंच काही घडतंय- पूर येताहेत, चरही तयार होताहेत, फॉरेस्टही होतंय्, जमीनही होतेय, नदी ही होतेय-'

'हं, हे सगळं बोला साहा, फॉरेस्ट बोला, जोतदारही बोला, पण चरबीर काढायचे नाहीत, चरांच्यामध्ये तुमची कृषक-समिती केलेली चालणार नाही.'

'चरांवर जमीनही आहे आणि शेतकरीही आहेत' चराच्या दलापैकी एकजण चित्कारतो.

'खबरदार! कृषक समितीचा विषय काढलात तर जीभ कापून टाकीन!' म्हणून हृषिकेश अचानक उडी मारून त्या दलासमोर उभा ठाकतो. आलबिशने हात लांब करून त्याला थांबवल्यावर तो बसतो.

'साले! कुणाबद्दल बोलणं चाललंय, काय बोलणं चाललंय-काही ऐकाल की नाही? नुस्ते आरडाओरडा करताहेत मघापासून!'

चराच्या दलापैकी ज्याने कृषक-समितीचा विषय काढलेला असतो, त्याच्या डोक्यावर टपली मारून कुणीतरी म्हणतो, 'ठीक आहे. बोला साहा, बोला!'

'मला असं म्हणायचंय, की या वेळची सेटलमेंट शेतकऱ्यांच्या हिताची व्हायला हवी.'

'बरोबर बोललात साहा! त्या जोतदारांना थंडे करा आणि जमिनी खलास करा!'

राधावल्लभ अचानक थांबतो वाटतं, जणू त्याने भाषण संपवलंय. पण भाषण संपण्याचा टप्प्यावर आलेलं नाही. सगळेजण राधावल्लभच्या तोंडाकडे पहातात. राधावल्लभ हसण्याचा प्रयत्न करतो.

राधावल्लभ जोराने हसू शकत नाही. व्रण आणि देवीचे डाग असलेल्या त्याच्या चेहऱ्यावर असंख्य सुरकुत्या दिसतात. त्यानंतर त्याचा खालचा ओठ विस्फारतो. जीभ आणि दात दिसतात. सतत पान खाल्ल्यामुळे त्यांचा रंग वेगळाच दिसतोय. तोंडावर आपला उजवा हात ठेवून तो म्हणतो, 'ही खूप मजेची गोष्ट आहे!' त्याला इतकं हसूं येतं की त्याला पुन्हा तोंडावर व डोळ्यांवर हात धरावा लागतो, 'जोतदार म्हणताहेत, चराबद्दल बोला, आणि चरवाले लोक म्हणताहेत, जोतदारांबद्दल बोला.'

हसण्याचा जोरामुळे राधावल्लभ डोळे झाकून डोकं हलवतो, आणि चरवाल्या लोकांचं दल टाळ्या वाजवतं.

भाषण थांबणं, राधावल्लभचा आवाज खाली येणं, हसाहशी, टाळ्या वाजवणं- यामुळे आलबिशला वाटतं, की भाषण संपलं जणू! तो ताबडतोब एक पान आणून मागच्या बाजूने हात पुढे करून राधावल्लभच्या हातात देतो. पान तोंडात घातल्यावरही राधावल्लभ हसतच रहातो. थांबवलेलं लेक्चर सुरू करणं, पूर्ण हसू हसणं आणि पान चावून एका गालात ठेवणं- यात जो वेळ जातो, त्यामुळे राधावल्लभचं भाषण संपलं असंच सगळेजण समजतात. पुन्हा भाषण सुरू करायचं झाल्यास अगदी सुरुवातीपासून सुरू करावं लागणार.

राधावल्लभ हसू थांबवून पान चावू लागतो.

## बत्तीस

# हृषिकेशचं गायन

हृषिकेश बसला होता, तो पुन्हा उठत नाही. तिथंच उकिडवा बसून रहातो. या मधल्या विरामाची संधी साधून तो चित्कारतो, 'चराच्या जमिनीत जोतदारही नाही,

आधियारही नाही, फक्त गूळ तेवढा आहे - चाटो और चाटो, चाटो और चाटो -'

बोलता-बोलताच तो उठू जाता नाटकातल्या कुबड्या मंथरेप्रमाणे दोन-चार पावलं चालतो. हृषिकेश आता अभिनय करणार हे लोकांना समजतं. ते जरा सावरून बसतात. कुबड काढून हळूहळू चालत हृषिकेश त्या चरवाल्या लोकांच्या दलासमोर जाऊन उभा रहातो आणि त्यांच्यासमोर जीभ लांब बाहेर काढून हात चाटल्याप्रमाणे जिभेसमोर वरखाली करतो. जे उभे होते, ते खाली बसतात. हृषिकेश आपला पार्श्वभाग खूप वर करतो, त्या तुलनेत पाठ खूप खाली, पण तोंड मात्र वर केलेलं, आणि जीभ बाहेर काढलेली. ही हनुमानाची लंकादहन-पोझ. नाटकात एक मोठी शेपटी लावण्यात येते. हृषिकेश आपला उंच केलेला पार्श्वभाग आणखी उंच करून बेतालपणे नाचवू शकतो- एकदा उजवीकडे, एकदा डावीकडे, दोनेकवेळा समोर- यासाठी तो खूप प्रसिद्ध आहे. हृषिकेश आता आपला पार्श्वभाग चरुवा लोकांच्या तोंडापुढे नेऊन अचानक उडी मारून हलवतो. चरुवा लोकांपैकी एकजण हृषिकेशच्या पार्श्वभागावर मारण्यासाठी लाथ उगारतो, पण हृषिकेश पुन्हा त्याच माणसासमोर आपला पार्श्वभाग नाचवतो; सगळ्यांच्या हसण्यामुळे आणि टाळ्या वाजवण्यामुळे या मुकाबल्यात रंग भरतो. त्या माणसाच्या लाथ उगारण्याने नाट्यमयताही येते. हृषिकेश अचानक चेहरा वर करून सगळ्यांना विचारतो, 'सांगा बरं, हे काय चाटतोय् मी? सांगा!'

हृषिकेश हात चाटण्याचा अभिनय पुन्हा आसपासच्या सगळ्यांना फिरून-फिरून दाखवतो, आणि अधूनमधून म्हणतो, 'सांगा बरं, हे काय चाटतोय् मी ?' त्याचं नाचणंही चालूच असतं. शेवटी चरुवा लोकांसमोर एकदा चाटणं दाखवून, पुन्हा एकदा पार्श्वभाग हलवून तो म्हणतो, 'इथं चाटलं तरी गोड, इथं चाटलं तरी गोड, जणू माझ्याजवळ आहे गुळाची ढेप, आणखी? आणखी? सांगा ना आणखी काय?'

हृषिकेश सरळ होऊन गिरकी घेतो, आणि विचारतो. असं फिरता-फिरताच तो गाण्याच्या दुसऱ्या ओळीसाठी यमक शोधतो. प्रेक्षक आणि श्रोत्यांमध्येसुद्धा अपेक्षा तयार होते- एखादी योग्य अशी दुसरी ओळ तयार होईल म्हणून. हृषिकेश फिरत-फिरत पुन्हा तरुवा लोकांच्या दलासमोर येतो.

हृषिकेश सरळ उभा राहून, एक हात कानाजवळ धरून, आणि एका हाताच्या तळव्याने ओठ झाकून चरवा लोकांकडे पहात गळा फाडून गायला सुरुवात करतो-

'ओऽओ माझ्या हलुवा - चरुवा भाई
तुझ्या गुणांना सीमा नाही
तुझी इतक्या जमिनीने भूक भागत नाही
तुझ्या पोटाला सीमा नाही।
ओऽओ माझ्या हलुवा-चरुवा भाई
तुझ्या पोटाला सीमा नाही

तुझ्या गळ्याच्या तळाशी पोट होतं सुरु
ते गुडघ्याच्या तळाशी जाई।'

चारी बाजूंनी टाळ्यांचं समर्थन मिळतं. ह्षिकेश थांबून, सगळ्यांकडे पाहून, डोकं थोडं-थोडं झुकवून अभिनंदाचा स्वीकार करतो. कुरळे केस, पांढरेस्वच्छ दात, गोल गरगरीत चेहरा-हृषिकेश चांगला व्यावसायिक गायकच वाटतो. राजवंशी लोकांच्या पद्धतीप्रमाणे तो गाणं प्रथम एक लांब तान घेऊन सुरू करतो. चरुवा लोकांपैकी एकजण त्याला एक सिगारेट देऊ करतो. ती घेऊन हृषिकेश म्हणतो, 'थँक यू!'

असा गाण्याचा कार्यक्रम सुरु झालेला पाहून सगळे येऊन हृषिकेशला घेरून उभे राहिले होते. बघता-बघता गाणं रंगायला लागतं. त्या गर्दीत राधावल्लभ आणि आलबिशही गाणं ऐकत उभे होते. मागून कुणीतरी आलबिशला काठीने ढोसल्यावर तो मागे बघतो. तो माणूस राधावल्लभकडे निर्देश करून आलबिश आणि राधावल्लभ यांना बाहेर यायला सांगतो. ते दोघेजण 'बघू', 'बघू' म्हणून बाहेर पडत असताना त्यांचा आवाज ऐकून हृषिकेश उभा राहिल्याबरोबर एकजण उठून ह्षिकेशचा हात धरून ओरडतो, 'एऽभाऊ, आता थांबू नकोस. आता गाणं सुरू केलंयस तर ते पुरं करायलाच पाहिजे.' आलबिश आणि राधावल्लभ गर्दीमधून बाहेर गेले, काही बोलले नाहीत हे ह्षिकेशने पाहिलं. तो पुन्हा एकदा सगळ्यांच्या तोंडासमोर आपला लांबवलेला हात फिरवतो आणि एक गिरकी घेतो.

'आऽमी हे काय केलं रे
माझ्या हालुवा-चरुवा भाई
तुझ्यासंगं लगीन करून बसले रे . . .
चारीकडची गर्दी इथे जमते.
'ओऽऽरे माझ्या हलुवा चरुवा भाई
माझ्या पोटाची भूक तर भागली रे
माझी कूस भरली नाही-'

ओटीपोट दाबून धरून, रडक्या स्वरात ह्षिकेश 'माझी कूस भरली नाही' ही ओळ गातो. त्यानंतर पुन्हा सरळ होऊन एक हात डोक्यावर, आणि एक हात कंबरेवर ठेवून कंबर हलवीत हलवीत 'माझी कूस भरली नाही' ही ओळ वारंवार म्हणता रहातो. मग जमिनीवर कव्वालीच्या पोझमध्ये बसून, कव्वालीच्या चालीत द्रुत लयीत गाऊ लागतो, 'माझी कूस भरली नाही,' 'माझी कूस भरली नाही', भोवतालची गर्दी ही त्याच्या गाण्याच्या लयीत टाळ्या वाजवीत वाजवीत द्रुत पासून अतिद्रुत लयीमध्ये जाते. वाढता वाढता सूर अगदी वरच्या पट्टीत जातो आणि एका चित्काराने संपतो. ह्षिकेश उठून उभा रहातो आणि खिशातून मघाची सिगारेट बाहेर काढून ओठांत ठेवतो आणि पेटवतो. त्यानंतर हसून चरुवा लोकांकडे पहात सिगारेटचा धूर सोडतो.

## तेहतीस

# शेतकरी-मजूर : चर्चा

हृषिकेशचं गाणं जेव्हा सुरू झालं, म्हणजेच राधावल्लभचं भाषण थांबलं, तेव्हा आनंदपूरच्या वीरेनबाबूंनी आणि फागू उरांव यांनी राधावल्लभला गर्दीमधून बाहेर आणलं. त्यांच्याबरोबर आलबिश होता. त्यानंतर ते त्या दोन गाड्यांच्या दिशेने चालू लागले. राधावल्लभ म्हणाला, 'इथंच बोलू या ना, आपल्याबरोबर इतक्या दूर गेल्यावर इथं सगळे शोधाशोध करतील.'

'अरे चलो ना! आपण तिकडं बोलत उभे आहोत हे काय इथून कुणाला दिसणार नाही?'

आलबिश डोकं हलवून म्हणतो, 'चलो, कॉम्रेड, चलो, ते म्हणताहेत तर चला.'

सगळेजण लवण-चाटण ओलांडून जाऊन बसतात. थोड्या दूरवर गाडीत फॉरेस्टचे बाबूलोक. लवण-चाटणाजवळ मदेशियांचं जे दल बसलेलं होतं, त्यांच्यापैकी कोणीही इकडं पहातही आणि येतही नाही.

वीरेनबाबूच प्रथम बोलायला लागतात, 'हे पहा राधावल्लभ, सर्व्हे तर सुरू झालाय. आता तर हे नकाशाचं काम रोजच पुढं जाणार. तुमची जमीन तर बहुधा आजउद्याच पडणार. दोनेक दिवसात हे काम मळ्यापर्यंत पोचणार. तर तुम्ही काय करणार-मळ्यांच्या बाबतीत?'

'काही करण्यासारखं नाही असं ठरतंय. आपल्या जोतलँडच्या व्हेस्ट जमिनीत आमचे शेतकरी इतक्या दिवसांपासून शेती करताहेत. आम्हाला सरकारकडून पट्टा हवाय.'

'पट्टा तर आता तुमच्या सेटलमेंटमध्ये होणार नाही, तो तुम्ही हवा असेल तिथून मिळावा असं तुम्ही म्हणा. पण तुम्ही काही तडजोड केली नाहीत तर गडबड होणार.'

'गडबड झाली तर आपलीच सोय. आपलाच फायदा. आपण तर आपल्या मजुरांना सांगितलंय की आम्ही जमीन सोडून दिल्याबरोबर आपण त्यांना बंदोबस्त देणार. त्यावर म्हणालात की ही जमीन सोडून आपले मळे आपण आणखी वाढवू शकणार नाही. म्हणूनच पर्मनंट लेबरही घेऊ शकणार नाही. आपलं काम जर इतकं कमी असेल, तर मळे सोडून द्या ना!'

'ते ही व्हेस्ट करून टाकू? मग काय तुम्ही आम्हाला नोकऱ्याबिकऱ्या देणार? सांगा!' वीरेनबाबू जरा हसून बोलणं सौम्य करण्याचा प्रयत्न करतात. राधावल्लभ गप्प होतो. थोड्या वेळानंतर वीरेनबाबू पुन्हा सुरुवात करतात, 'यावेळची सेटलमेंट तर तुमच्याच बाजूने होणार. आत्ताच काय व्यवस्था करायची ती करून घ्या. यानंतरच्या निवडणुकीत सी.पी.एम. हरली, तर पुन्हा तुम्हाला त्रास. आताच मामला मिटवणं चांगलं.

कंपनीही बेकायदा आहे, राजी होऊन जाईल. आणि सरकार तर आता तुमच्याच बाजूचं आहे. असं ऐकलंय, की हा ऑफिसरही म्हणे नक्षलवादी होता. तोही तुमच्याच बाजूचा आहे. आता काहीतरी बंदोबस्त करून टाकला तर तुमचीच सोय होईल.'

आलबिश जरा मागे बसला होता. तो मान पुढे करून ऐकत होता आणि डोकं हलवीत होता, जणू सगळ्या गोष्टींना त्याची सहमती होती. मधूनमधून 'हो,हो' सुद्धा म्हणत होता. वीरेनबाबूंचं बोलणं संपल्यावर तो अभावितपणे बोलून जातो, 'एऽबाबूंनो, तुम्ही म्हणताय की आम्ही सगळी जमीन सोडून देऊ? आणि मळ्याच्या लोकांनी ही सगळी जमीन घ्यायची? मग आम्ही कुठं जायचं?'

इतका वाकला असल्यामुळेच बहुधा त्याच्या तोंडातून लाळ गळते. पुन्हा-पुन्हा ती लाळ तोंडात ओढून घेत-घेत तो म्हणतो, 'तुमचे मालकलोक इतक्या ठेका मजुरांना रोज कामावर घेतात, पण कुणालाही पर्मनंट नाही करत. इस बागानपर काम है बहुत, इसको और जमीका जरुरत है,' बोलण्याची आलबिशला सवय नाही. त्यात मदेशिया असूनही बंगाली आणि राजवंशी भाषांचं मिश्रण करून वीरेनबाबूंशी बोलायचंच् म्हणून एक अद्भूत भाषा तयार करतो.

अलबिशच्या बोलण्याने संतापून फागू उरांव नावाचा तो मुलगा म्हणतो, 'मालकलोकांचा दोष नाही. मला वाढवायला जमीन नाही, तर पर्मनंट जागा कशा काय तयार करणार मजुरांसाठी?'

आलबिश बऱ्याच जोरात मान हालवून 'हो, हो' म्हणतो, जणू बोलण्यातला मुख्य मुद्दा या फागू उरांवलाच नीट उमगलाय्. पोरगा बऱ्याच रागाने बोलतोय. वीरेनबाबू हात उंचावून म्हणतात, 'फागू, एवढा संतापतोस कशाला, यात तर काही भांडण्यासारखं नाही.' फागू आपली काठी गवतावर हळूहळू आपटीत रहातो आणि चेहरा जरा वळवतो. आलबिशला पुन्हा बोलणं सुरू करायचंय्. खूप प्रयत्नानंतर तो म्हणतो, 'ठीक बात तो, ठीक बात! लेकिन मळ्यातलं काम ज्यादा, फायदा ज्यादा, मुनाफा ज्यादा, तो पर्मनंट मजदूरभी ज्यादा होगा ना? आणि मळे वाढवायचे म्हटलं, तर आम्हाला जमीन नाही! हो की नाही! कंपनीचा हिशेब सांगा-कुठल्या साली किती पर्मनंट लेबर - हांऽऽ' आलबिश पुन्हा लाळ तोंडात ओढून घेतो.

आलबिशच्या बोलण्यानंतर सगळेच काही वेळ गप्प रहातात. इथं जे-जे आहेत, त्या सगळ्यांना मामला इतका चांगला ठाऊक आहे, की मुद्दा काढल्याबरोबर त्यांना समजलं, याचं उत्तर देणं कठीण आहे. कंपनीचा मुद्दा असा आहे की चहाच्या मळ्याचं क्षेत्रफळ वाढवल्याशिवाय नवीन मजूर घेता येणार नाहीत, म्हणून आनंदपूरच्या जो तजमिनीचा जो भाग व्हेस्ट झालाय्, तो आनंदपूर चहा कंपनीच चहाच्या मळ्याचं क्षेत्रफळ वाढवण्यासाठी सरकारकडून लीजवर घेणार. म्हणजेच व्हेस्ट जोतजमीन पुन्हा इंडस्ट्रियल लँड म्हणून जोतदारांकडेच परत जाणार. म्हणूनच, जे शेतकरी त्या जमिनीवर काम

करतील, त्यांना ती जमीन सोडावी लागणार. पण कंपनीचे पर्मनंट मजूर दर वर्षी कमी होताहेत. आधी कंपनीला आपल्या कायम मजुरांची संख्या पाच-सात वर्षांपूर्वीइतकी करू द्या, तेव्हाच तर समजेल समजेल की आणखी नवीन मजुरांची गरज आहे. कंपनी कायम मजुराची नेमणूक करीत नाही. सगळं काम ठेका मजुरांकडून करवून घेते. मग या व्हेस्ट जमिनीतून शेतकऱ्यांचा उच्छेद करण्याचा प्रयत्न कशासाठी?

आलबिशचा मुद्दा विरून जाण्यासाठी जितका वेळ लागतो; तितका गेल्यानंतर वीरेन बाबू म्हणतात, 'पण एक मीमांसा तर तुम्हाला करायला हवी. नाहीतर मळ्यातले मजूरसुद्धा त्यांचा हक्क का सोडतील?'

आपलं तोंड उजव्या हाताने पुसून राधावल्लभ म्हणतो, 'पण चहाच्या मळ्यातल्या मजुरांचे संबंध कंपनीशी आहेत, आणि आमच्या या व्हेस्ट जमिनीचा संबंध, सरकारशी आहे हे तुम्हा सगळ्यांच्या कसं लक्षात येत नाही? आपण आम्हा दोघात उगाच कशाला झुंज लावताहात?'

राधावल्लभच्या प्रश्नावर थोडं चिडूनच वीरेनबाबू म्हणतात, 'एवढं सगळं बोलून काही फायदा नाही राधावल्लभ. मजुरांना कंपनीशी काय करायचं चे मजूर करतील; पण कंपनीला सांगितल्यानेच तर कंपनी म्हणतेय की आम्हाला जमीन द्या, आम्ही मळा मोठा करू, मळा मोठा झाला की मजूरांचा फायदा होईल.'

वीरेनबाबू रागावल्याने राधावल्लभ आणखीच रागावून उत्तरतो, 'हे पहा वीरेनबाबू, आपण म्हणजे तर काही कंपनी नाही ना?'

'नाही; मी तर कंपनीची नोकरी करतो.'

'मग तुम्ही एवढं बोलता कशाला?'

'तुम्ही पण काही राजवंशी नाही राधावल्लभ, मग तुम्हीही राजवंशीच्या बाजूने एवढं बोलता कशाला?'

राधावल्लभ उठून उभा रहातो, 'एऽ आलबिश, चला, यांच्याशी आणखी काय बोलणार? ठीक आहे, आपणाला जे करायचंय ते करा. आता प्रत्येक हाटात दवंडी द्या की राधावल्लभ साहा हा भाटिया आहे, तो कशाला राजवंशी लोकांसाठी जमीन मागतोय? मग वर्गणी काढून, माणसं जमवून एक उत्तरखंड पार्टी तयार करा!'

## चौतीस

# शेतकरी-मजूर : देवाणघेवाण

आपण जरा चुकीचं बोललो हे वीरेनबाबूंच्या लक्षात येतं. पण मीमांसेचं सूत्र शोधल्याशिवाय तर काही उपाय नाही, हेच ते सांगू शकले नाहीत. खरं तर राधावल्लभने

त्यांच्या नोकरीची गोष्ट काढून त्यांचं डोकं भडकवलं होतं. फागूला एक गुद्दा मारून वीरेनबाबू म्हणाले, 'एऽ, जरा त्यांना समजावून परत घेऊन ये; जा; ताबडतोब जा!'

फागू पळत जाऊन राधावल्लभ आणि आलबिशची वाट अडवतो. लवण-चाटणाच्या जवळ असलेल्या गर्दीतलेही दोन-चारजण आता काहीतरी गडबड होणार असं वाटून तिथे येतात. फागू त्यांच्याकडे पाहून धमकावणीच्या स्वरात म्हणतो, 'कुछ नहीं है, दफा हो जाओ!' फागूचं बोलणं ऐकून ते आणखी पुढे येत नाहीत, पण तिथेच उभे रहातात.

फागू राधावल्लभला धरून म्हणतो, 'एऽ कॉम्रेड, चलो, चलो! बातचीतमें ऐसा तो होता ही है! तुमका भी कृषक समिती लाल झंडा, हमका भी मजदूर युनियन लाल झंडा. तो बातचीत तो होनाही चाहिये!'

राधावल्लभचा राग तितका नव्हता. पण त्याला थोडा थकवा वाटत होता. तो म्हणाला, 'अरे भाई, इतकं बोलून काय काम होणार? तुम्ही कुठं आमच्या बाजूने कंपनीला सांगणार की खासजमिनीतून शेतकऱ्यांना हाकलणं चालणार नाही, उलट कंपनीच तुमच्याकरवी आम्हाला हाकलून लावील. त्यानंतर एके दिवशी धनुष्यबाणांनी मारामारी लावून देईल आणि तुम्हीही मारामारी कराल.'

बोलण्याचं सूत्र पकडून आलबिश म्हणतो, 'अरे लागू दे देशिया आणि मदेशियांची फाईट, पुलिस आयेगा बस- फटाफट दोन्ही दालांचे कॉम्रेड ॲरेस्ट!' फागू म्हणतो, 'अरे, छोड दो ये सब बात. कुणाला ठाऊक नाही तुमच्या खासजमिनीत देशिया-भाटिया मदेशिया सब कोई है, चलो-चलो, बात खतम करो!'

राधावल्लभ परत येता-येता म्हणतो, 'हेच तर तुमच्या कंपनीचं संकट आहे, नाहीतर केवढा दंगा झाला असता.'

आलबिश राधावल्लभचं समर्थन करतो - 'तऽर!' मग दोघेहीजण बसतात.

फागू आपला उद्योग सोडीत नाही. तो वीरेनबाबूंना म्हणतो, 'आपण असं काही बोलू नका. ये तो राधा-कॉम्रेडने बोला, आम्ही लेबरसुद्धा म्हणू-खासजमिनीतून शेतकरी लोकांना हटवणं चालणार नाही. और ऊ लोग भी हमका बात बोलेगा. क्या, ठीक है ना राधा-कॉम्रेड?'

राधावल्लभ म्हणतो, 'हां, ठीक तो है लेकिन बोलेगा क्या?'

आलबिश म्हणतो, 'हांऽ, क्या है तुम्हारा मतलब, बोलो!'

फागू वीरेनबाबूंना विचारतो, 'क्यः वीरेनबाबू, ठीक है ना?'

वीरेनबाबू म्हणतात, 'हो. आता तुम्ही ठरवा काय बोलणार ते. जर तुम्ही दोन्ही पक्ष एक होऊन काही म्हणलात, तर सरकारलाही ते मान्य करणं भाग पडेल, आणि तुमच्या सेटलमेंटमध्ये त्याची नोंदही होऊन जाईल.'

फागू म्हणतो, 'तो बोलो, क्या बोलेगा?'

फागू हे कुणाला म्हणतो हे समजत नाही, कारण विषय त्यानेच काढला होता आणि उत्तराची अपेक्षा त्याच्याकडूनच होती. पण आता असं लक्षात येतं की त्याला उत्तर वीरेनबाबूंकडूनच हवं आहे. वीरेनबाबूच त्याचे खरे 'बोलविते धनी', पण त्याच्या प्रश्नाच्या उत्तरात तर काही वीरेनबाबू आपली अट सांगू शकत नाहीत, म्हणून त्याला गप्प बसावं लागतं. जणू या मामल्यावर सगळेच विचार करताहेत, वीरेनबाबू सुद्धा. शेवटी वीरेनबाबू सुरुवात करतात, 'ज्यांनी जमीन कसायला घेतलीय, म्हणजे राधावल्लभची माणसं -'

त्यांना अडवून राधावल्लभ म्हणतो, 'माझी अशी कुणीही माणसं नाहीत वीरेनबाबू, लोक असतात ते भद्रलोकांचे आणि जोतदारांचे. मी तर भद्रलोकही नाही आणि जोतदारही नाही.'

'का? तुम्हाला तर सगळेजण 'बाबू' म्हणूनच हाक मारतात. जाऊ द्या, जे जमीन कसताहेत त्यांना जमिनीतून पूर्णपणे हाकलून लावण्यात येऊ नये हेच पहायला हवं, बरोबर आहे ना?'

'ऐकतोय ना, आपलं बोलणं ऐकतोय्.'

'फागूला काय म्हणायचंय् ते म्हणू द्या. काय फागू?'

'ना, वह तो बोलनाही होगा, जरूर !'

'क्या?' वीरेनबाबू पुन्हा विचारतात.

'हेच, राधावल्लभला हाकालणं चालणार नाही.'

'पण जमीन तर तुम्हालाही पाहिजे ना?'

'हो तर! चहाच्या मळ्यांना खास, मळ्यांना दिली पाहिजे.'

सगळं होईल. पण ते कसं काय होणार ते सांगा.'

'वो तो जरूर बोलना होगा -' म्हणून फागू थांबतो. आणखी थोडं गप्प राहून वीरेनबाबू म्हणतात, 'मग तुमच्या जमिनीचा सर्व्हे होऊ द्या आधी.'

आता राधावल्लभ म्हणतो, 'म्हणजे, आमची जमीन आणि सर्व्हे कशाचा? सरकारची व्हेस्ट जमीन सरकार सर्व्हे करून डाग नंबर देऊन-देऊन जमीन ऑक्युपाय करतंय. डाग नंबर ताडून पाहू. आम्हाला पट्टा देत नाही सरकार. आम्हीही सर्व्हे करू देणार नाही. पट्टा दिला तर सर्व्हे होईल; पट्टा नाही तर सर्व्हेही नाही!'

'वा! सगळ्या जमिनीपैकी किती जमीन कुणा-कुणाच्या ताब्यात आंहे याचा हिशेब करू देणार नसाल तर चर्चा कशी होणार?'

'कौन हिसाब करेगा? हम तो जानताय् किसका कितना जमीन!'आलबिश सुरुवात करतो, पण राधावल्लभ त्याला थांबावून म्हणतो, 'चूप हो भगत, चूप हो. वीरेनबाना

आपली जमीन मापवून घ्यायची आहे. घेऊ द्या ना! ज्याची मापायची असेल त्याची मापू द्या!'

'राधावल्लभ, ऐका. कुणाच्या ताब्यात किती जमीन आहे हे पहायलाच हवं. त्यामुळे कंपनीही सरकारला सांगू शकेल की तुमच्या कायद्याप्रमाणे शेतकऱ्यांना पट्टा द्या. पट्टा दिल्यानंतर मग जी जमीन शिल्लक राहील ती जमीन मळ्यासाठी कंपनी लीजवर घेईल. फागूसुद्धा तेच म्हणेल. काय फागू?'

'जरूर. हम बोलेगा पट्टा दो, उसके बाद कोम्पनीको दो!'

'म्हणजे, वीरेनबाबू, आम्ही दोन बिघे जमीन स्वत:च्या ताब्यात ठेवून बाकीची जमीन आपल्याला देऊन टाकावी, असं आपलं म्हणणं आहे का?'

'सरकारचा तर तसाच नियम आहे. नियमाप्रमाणेच तर करायला हवं ना! नाहीतर तुमच्यापैकी एकेकाकडे तर पुरेशी जमीनसुद्धा आहे. हृषिकेश तर शिवणकामाचा व्यवसाय करतो. त्याला जमीन कशाला हवी?'

'या सगळ्या गोष्टी जाऊ द्या. वीस वर्षे जमीन आमच्या ताब्यात आहे. आपण तर आमच्यावर गोळीबारही केला होता. डोक्याला-छातीला न लागता हाताला लागल्या गोळ्या,' राधावल्लभ उजव्या हाताने आपला-डावा दंड दाबतो. डाव्या बगलेत छत्री, 'तो तर काही जमीन सोडण्यासाठी नाही.'

'राधावल्लभ, तुमच्यावर आम्ही गोळाबार केला का? ते सगळं कशाला बोलताहात?'

'ठीक आहे. ठीक आहे. ते राहू द्या. तुमचं जर हेच म्हणणं असेल, तर चर्चा इथंच संपली. आम्ही जमीन सोडणारही नाही, आणि सर्व्हेही करू देणार नाही. व्हेस्ट जमीन तर खासजमीन. खासजमिनीचं खातं वेगळं. तिची पुन्हा मापामापी कशासाठी?'

आपला मूळ प्रस्ताव राधावल्लभने फेटाळलाय हे वीरेनबाबूंच्या लक्षात येतं. तेही म्हणतात, 'वा, वा! तुम्ही खासजमिनीवर अधियारी चालवणार आणि मजुरांना मळ्याच्या जमिनीवर स्वत:चा हक्क मिळणार नाही, असंच ना?'

'ही काही मळ्याची जमीन नाही, सरकारची जमीन आहे. इथं मजुरांचा काहीच हक्क नाही. आपण मजुरांशी आमचा झगडा लावून द्यायला लागलाहात -' राधावल्लभ उठून उभा राहिला होता. त्याच्याबरोबर आलबिशही. फागूसुद्धा उठून उभा रहातो. वीरेनबाबू बसूनच म्हणतात, 'झगडा तर काही आम्ही करायला जाणार नाही - तुमच्या पार्टीची युनियनच जाईल. तेव्हा त्यांच्याशी बोला. मळ्यातल्या वर्कर्ससुध्दा असं म्हणणं आहे की या खासजमिनीपैकी किती जमीन कुणाच्या ताब्यात आहे, याची मोजणी व्हावी.

'ठीक आहे. बोलू. आम्ही जमिनीवरच आहोत. आपण ऑफिसरना घेऊन या. बघू कोण कुणाच्या जमिनीचा सर्व्हे करतो ते -' राधावल्लभ निघतो.

पस्तीस

# शेतकरी व मजूर : वर्गसंघर्ष

बाहेर आल्याबरोबर राधावल्लभ म्हणतो, 'भगत, ताबडतोब जमिनीकडे चला, गडबड होण्याची शक्यता आहे.' त्यानंतर त्या गाण्याच्या कार्यक्रमच्या जागेकडे पहात म्हणतो, 'बुद्धिमानला बोलावून आणा.' राधावल्लभ थांबत नाही. तो विरुद्ध दिशेने चालायला सुरुवात करतो. आलबिश गर्दीच्या दिशेने धावत सुटतो. त्याचं आता वय झालंय्. घाईघाईने-चालताना त्याला त्रास होतो. हृषिकेशच्या गाण्यावर ताल देत च च्या दुकानाजवळ बसलेला बुद्धिमान त्याला दिसतो.

'एऽ बुद्धिमान, उठा!'

त्याच्याकडे न पहाता बुद्धिमान म्हणतो, 'अरे भगत, बस ना जरा! बघ ना साला रिशिकेश काय छान गाणं म्हणतोय - चरूवा लोकांवरचं गाणं!' गर्दीतून हृषिकेशचा तारस्वर तरंगत येतो. भगतला आणखी उशीर करायची इच्छा नसते. तो बुद्धिमानच्या पाठीवर गुडघ्याने उठण्यासाठी प्रहार करतो. आता बुद्धिमान आलबिशच्या चेहऱ्याकडे बघतो, आलबिश हाताने खूण करून त्याला उठायला सांगतो.

सुमारे पंधरा वर्षापासून बुद्धिमान कृषकसमितीबरोबर आहे, आणि इथं कृषक समिती म्हणजे खासजमिन ताब्यात ठेवणे, शेती करणे, कर्ज मिळवणे, मामले करणे असंच सारं. नवं सरकार नव्या प्रकारचे कायदे जारी करतं. पण या दखली खासजमिनीचा काहीच निर्णय लागत नाही. बुद्धिमान आजवरच्या अनुभवावरून क्षणात ताडतो. काहीतरी गोलमाल झालाय्. तो ताडकन उडी मारून आलबिशला विचारतो, 'काय झालं?'

'कॉम्रेड तुला जमिनीवर जायला सांगताहेत.'

'का? काही गडबड झाली का?'

'ठाऊक नाही. बाहेर चल.'

आलबिश आणि बुद्धिमान लगबगीने चालायला सुरुवात करतात. बुद्धिमान अचानक थांबून म्हणतो, 'रिशिकेशला बोलावतो-'

आलबिश थांबतो, पण काही विचार करू शकत नाही. हृषिकेशला बोलवायचं म्हणजे त्याचा गाण्याचा कार्यक्रम मध्येच थांबवावा लागणार. त्या अर्थ इतक्या सगळ्या लोकांना ही गोष्ट समजणार. त्याचा अर्थ, गोलमाल तर आणखीच जबरदस्त होणार. पण गोलमाल तर काही अद्याप सुरू झालेला नाही. सुरू होण्याची शक्यता आहे. 'वीरेनबाबू साला धमकीसे बात करता है. कॉम्रेड अकेला है. छोड दो, पहाले चलो तो!'

बुद्धिमान पुढं पाऊल टाकीत म्हणतो, 'चलो, चलो!'

ते लगबगीने चालले. बुद्धिमान बुटका आणि आलबिश डंगाला. दोघेही एकाच गतीने चालतात.

आलबिश बुद्धिमानला म्हणाला, 'साला वीरेनबाबू-'

'कौन वीरेनबाबू?'

'अरे, साला आनंदपूरचा!'

'असं, त्या साल्याने तर जणू आपल्याला हाकलण्यासाठीच नोकरी धरलीय - वकील!'

'कोण वकील?'

'तोच साला वीरेन! वीरेन वकील!'

'हट्! वकील तो कोर्टमें जाता - काला कोट पहनके. वकील असून चहाच्या मळ्यात काय करतोय हा?'

'डोंबल तुझं! एवढा मोठा वकील, पण एकही अशील नाही त्याला! म्हणून चहाच्या कंपनीने नोकरी देऊन त्याला इकडं बोलवून घेतलंय् - त्याला सांगितलंय्. खासजमिनीतल्या हलुवा - आधियारांना हाकलून लावा. साला मळेवाल्या कंपनीचा ऑफिसर झालाय. काय म्हणतोय साला?'

'म्हणतोय्, की तुम लोग दो बिघा लेके बाकी जमीन छोड दो!'

'कशासाठी?'

'आलबिश रागावून थांबतो : 'अरे, आधी नीट ऐकून तर घेशील? का असंच बडबडत रहाशील?'

'कधी बडबडलो हो? अन् काय बडबडलो?'

'हेच, जब कॉम्रेडका लेक्चरठो-'

'कुठलं लेक्चर? कॉम्रेड तर सदानकदा लेक्चरच देत असतो. झोपेतही म्हणत असतो - कुख्यात जोतदार. . .'

आता अलबिशला हसू येतं, 'अरे, ही गाण्याबजावण्याची सुरुवात - '

'काय? तुम्हाला बोलवून नेलं होतं?'

'हो.'

'कुणी?'

'फागू आणि वीरेन बाबूंनी. तर मी गेलो. उसके बाद, बैठके-बैठके उनके साथ बातचीत सुरू झाली-'

'एकदम बैठके-बैठके? खडे-खडे नहीं?'

ते दोघे हत्तीच्या रस्त्याच्या वळणाशी आले होते, डावीकडे वळल्याबरोबर समोर, उजवीकडे, तो खासजमिनीचा इलाखा सुरू, डावीकडे फॉरेस्ट सुरू. चहाचा मळा खूप दूर.

वळल्याबरोबर जमिनीवर आणि हत्तीरस्त्यावर काही लोक त्यांना दिसतात. सर्व्हेचे लोक. ते दोघे थांबतात. 'साले, चेन टाकताहेत - सर्व्हे करायला लागलेत -'

पण घटनेच्या ठिकाणी मात्र कुठलीच उत्तेजना नाही. सर्व्हेची लांबलचक चेन त्या जमिनीवर मेलेल्या सापासारखी पडलीय्. त्यावर बायका, मदेशिया, मुलं-मुली बसली आहेत. राधावल्लभसमोर काही लोक घेऊन उभा आहे. या जमिनीच्या थोडं वर, काही अंतरावर चहाच्या मळ्यातल्या मजुरांची एक गर्दी आहे - काहीजण बसलेले, काहीजण उभे आणि डावीकडे हत्तींरस्त्याच्या वळणावर सुहास, विनोद बाबू, प्रियनाथ, अनाथ उभे राहून वीरेनबाबू आणि इतर काही जणांशी चर्चा करताहेत.

बुद्धिमान येऊन राधावल्लभसमोर उभा रहातो. दीर्घ असा छातीभर श्वास घेऊन विचारतो, 'काय प्रकार आहे कॉम्रेड?' नंतर निश्वास सोडतो. इतर अंतर चालत आणि पळत आल्याने त्याच्या चेऱ्यावर घाम दिसतोय.

तोवर आलबिशही येऊन पोचलाय. राधावल्लभ डोळे झाकून, हातांची घडी घालून, भाषणाप्रमाणे बोलायला सुरुवात करतो, 'तर, आम्ही आज सर्व्हे ऑफिसरपुढे कृषक-समितीचं म्हणणं मांडणार होतो, तेवढ्यात मला आणि आलबिशला आनंदपूर चहा-मळ्याचे बाबू वीरेनबाबू आणि या युनियनचा फागू उराँव बोलावून घेवून गेले आणि त्यांनी चर्चेचा प्रस्ताव ठेवला. आम्ही चर्चेला बसलो. त्यांनी अद्वातद्वा खूप बोलून घेतलं. ते सगळं सांगण्याचं काही प्रयोजन नाही. असो, वीरेनबाबू म्हणताहेत, की आपल्याला जमीन सोडावी लागणार, दरडोई दोन बिघे जमीन रहाणार आणि ह्या जमिनीची मापामापी होणार.'

यावर चारीकडून लोकांची इतकी कुजबुज सुरू होते, की राधावल्लभला थांबावं लागतं. तो हात वर करून त्यांना थांबवून म्हणतो, 'पण त्यांचंही काही नाही. एवढ्या चर्चेनंतर मी तिथून निघून आलो. पण त्यांचही काही नाही. आम्ही जेव्हा ही चर्चा करीत होतो, जेव्हा ही चर्चा चालली होती, जमिनीवर आमचा कुणीही माणूस नव्हता, सगळे सर्व्हेच्या ठिकाणी गेले होते, रिशिकेष गाणं म्हणत होता, तेव्हा हे साले वीरेनबाबू, आणि कंपनी यांनी लपूनछपून सर्व्हेयरबाबूंच्या हातून इथं, आमच्या जमिनीत चेन टाकली.'

राधावल्लभला दम घेण्यासाठी थांबावं लागतं. त्याच्या गळ्याच्या सगळ्या शिरा टरारल्या आहेत. त्याला संतापाने जेवढं काही बोलायचं आहे, ते सगळं जणू त्याला बोलता येच नाहीय्. म्हणूनच त्याचं तोंड जरा उजवीकडं झुकलंय् - त्याचे श्रोते बरेचसे डावीकडे असले, तरीही. राधावल्लभ धिक्काराच्या स्वरात म्हणतो, 'वीरेनबाबू आनंदपूर चहा कंपनीची नोकरी करतात. चर्चेच्या नावाखाली त्यांनी आम्हाला वनात नेलं, आणि त्या दरम्यान या सर्व्हेयरला चेन देऊन इथं जमीन मापायच्या कामासाठी पाठवलं. तिथे आमच्या पोरी, पोरंसोरं ती चेन दाबून धरून बसली. त्याच वेळी चहाच्या मळ्यातले मजूर तिथं

आले आणि त्यांनी आमच्या मुलींना, पोरांना धमक्या दिल्या, भीती दाखवली. मी इथं येऊन पोचलो, तर मला हा प्रकार दिसला. आपण सगळे तयार व्हा. आम्ही आमच्या ताब्यातील जमीन सोडणार नाही. ही जमीन मापू देणार नाही. चहा कंपनीचं हे कट-कारस्थान उधळून लावा'.

राधावल्लभ आपल्या शर्टच्या बाहिने तोंड पुसतो. राधावल्लभजवळ उभे राहून त्याचं बोलणं ऐकणारे त्याच्याजवळून दूर होतात. मळ्याच्या मजुरांकडे पहात रहातो. अस्वस्थता दाखवणाऱ्या हालचाली करतो. बुद्धीमानला पाहून मजुरांच्या रांगेत बसलेल्या मुलींना-महिलांना हसू येऊ लागतं.

## छत्तीस

# शेतकरी-मजूर : भाषणसंग्राम

बुद्धिमान ज्या उंच बांधावर उभा होता, तो बांध पश्चिमेला जाऊन हत्तीवाटेला मिळतो. तिकडून सुहास याच बांधावरून इकडे येतोय्, एकटा. सर्व्हेयर आणि चेनवाला माणूस तिथेच उभे आहेत. वीरेनबाबूसुद्धा.

सुहास जवळ येताच बुद्धिमान घोषणा देतो, 'खासजमिनीवर अतिक्रमण'-कोरसमध्ये प्रतिसाद येतो, 'सोडणार नाही, सोडणार नाही-.'

'खासजमिनीची मापामापी-'

'नहीं चलेगी, नहीं चलेगी!'

'खासजमिनीचा पट्टा पाहिजे-'

'-कर्ज पाहिजे, खत पाहिजे'

बुद्धिमानकडून राधावल्लभ घोषणा घेतो. हात वर करून म्हणतो, 'शेतकऱ्यांविरुद्ध मळ्यांचे मालक आणि अंमलदारांचं कारस्थान-' ही घोषणा यांना ठाऊक नसल्याने सारे गप्पच रहातात. मागच्या बाजूने एका स्त्रीचा क्षीण आवाज येतो- 'चालणार नाही!' दम घेऊन राधावल्लभच घोषणा पुरी करतो- 'हाणून पाडा!' दुसऱ्या वेळी 'हाणून पाडा' म्हणताना अनेकजण साथ देतात.

दरम्यान बांधावरून उडी मारून सुहास यांच्यासमोर येतो.

घोषणा थांबल्या, तरी सुहास बोलणं सुरू करीत नाही. तेव्हा हे आणखी थोडे शांत होतात. मजुरांची रांगही हळू-हळू पुढे येते. सुहास आवाज न चढवता, थोडं हसून म्हणतो, 'आपली जमीन मापण्यात येणार नाही. आपण चेन सोडून द्या-'

हे सुहास इतक्या थंडपणे म्हणतो, की सगळेच चकित होतात. 'आता काय करावं'

असा भाव त्यांच्या मनांमध्ये येतो. सुहास आसपास पहातो. अनाथबाबू आणि प्रियनाथबाबूंना चेन गुंडाळायला सांगावी की काय, याचा विचार करतो.

पण त्यांच्यापैकी कुणी इकडे मुळीच येत नाहीय.

तेवढ्यात राधावल्लभ डोळे झाकून मान ताठ करतो. तो आवाज चढवीत नाही, पण त्याच्या थकलेल्या चेहऱ्यावर राग, धिक्कार, श्रम- सगळ्यांची स्पष्ट लक्षणं दिसतात. राधावल्लभ म्हणतो, 'आम्हाला सरकारची चेन अडवायची नाहीय. विशेषतः डाव्या आघाडीच्या सरकारची चेन, कारण डाव्या आघाडीचं सरकार हे लोकांचं मित्र असलेलं सरकार आहे. पण ज्यांच्या कारस्थानामुळे ही चेन खासजमिनीत टाकण्यात आली आहे, त्यांचा विचार करायला हवा.'

'हे पहा, कारस्थान-बिरस्थान काहीही नाही. आम्ही आता डाग नंबरांप्रमाणे जमीन मापून जाणार आहोत. म्हणूनच आपल्या जमिनीवर चेन पडलीय. आता ही जमीन मापण्याचा आमचा विचार नाही. आम्ही चेन काढून घेतो, आपण ती सोडून द्या.' विनोदबाबू, अनाथबाबू, प्रियनाथबाबू कुणीच पुढं येत नाही- सुहास मनातल्या मनात थोडं रागावूनच पुन्हा उजवीकडे पहातो. आता जर लोकांनी चेन सोडली, बहुधा सोडलीच आहे, तर ती सुहासलाच गुंडाळून घ्यावी लागणार की काय?

'सर, या विषयावरचं आमचं सगळं सांगणं ऐकल्यावरच तुमच्या लक्षात येईल, की किती मोठ्या कारस्थानात चहा कंपनीने डाव्या आघाडीच्या सरकारला अडकवलंय.'

सुहासला नाइलाजाने थांबावं लागतं. पण राधावल्लभ आपलं बोलणं सुरू करू शकत नाही. मजूरलोक लाल झेंडा उचलून 'झिन्दाबाद!' 'झिन्दाबाद!' अशा घोषणा करीत मोठ्या बांधावरून पुढे येऊ लागतात. त्यानंतर सुहासला उद्देशून, आवाज चढवून ते घोषणा देतात, 'खास जमीनका सेटलमेंट - करना होगा, करना होगा!' 'खास जमीनमें आधियारी- नहीं चलेगा, नहीं चलेगा!' 'वामफ्रंट सरकारका कानून- मानना होगा, मानना होगा!'

बुद्धिमान राधावल्लभला विचारतो, 'कॉम्रेड, रिशिकेशला बोलावू?' 'बोलाव, बोलाव, सगळ्यांना खबर दे!' राधावल्लभ डोळे न उघडता म्हणतो. बुद्धिमान गर्दीतून बाहेर येऊन मैदानातून पळू लागतो- 'हाणामारी होणाार!' पुढे शेतकरी, मागे मजूर आणि मध्ये आहे सुहास. मागच्या बाजूच्या घोषणा थांबल्यावर तो राधावल्लभला म्हणतो, 'हे पहा, मी तर सर्व्हे करायला आलोय. आपल्या जमिनींचे सर्व्हे आम्ही करू नयेत, याबद्दल आता आणखी काय भाषणं आम्ही ऐकणार? फक्त सर्व्हेसंबंधी, किंवा वारसाहक्क- उत्तराधिकार, वाटा यांच्याबद्दल कुणाला काही सांगायचं असेल, तर तेवढं फक्त आम्ही ऐकू शकतो-'

या दलापैकी सर्वांनी एका भागातली खासजमीन आपल्या ताब्यात घेतलीय असा अंदाज सुहासने आधीच केला होता. जवळजवळ प्रत्येकाचीच नक्की काही-ना-काही

जमीन आहे. आता सर्व्हे जमीन पुन्हा व्हेस्ट होणार. त्यामुळे 'जमीन मापू देणार नाही' असा हे आधीच आवाज उठवताहेत. उलट खासजमीन ताब्यात ठेवणारे शेतकरी तर ताबडतोब सर्व्हे करण्याची मागणी करतात. आधी सरकारची ऑर्डर अशी होती, की खाजजमिनीचा सर्व्हे व्हावा आणि दखलदारांची नावं नोंदवण्यात यावीत. नंतर ऑर्डर आली की आता त्याची काही गरज नाही. दुसऱ्या ऑर्डरचं कारण म्हणजे नक्कीच या प्रकारच्या सगळ्या घटना हे असणार.

आतापर्यंत आनंदपूर इस्टेट ऑफिसची कागदपत्रं आणि मौजा मॅप पाहून सुहासची ही समजूतच पक्की होते. चहा कंपनीचा मतलबही सुहासच्या लक्षात येतो. पण या वादविवादात त्याची काहीही भूमिका नाही. उलट तो थोडा बेचैनच होतो- त्याला न सांगता या जमिनीवर चेन टाकून विनोदबाबूंनी पहिल्याच दिवशी असा गोंधळ का निर्माण केला?

जे दल उतारावर येऊन उभं राहिलं होतं, ते जरा शांतपणेच सुहास आणि राधावल्लभमधलं बोलणं ऐकत होतं. सुहासच्या बोलण्यानंतर चहाच्या मळ्यातील मजुरांमध्ये भाषण सुरु होतं- 'साथियों, चा-बागानके लेबरलोग और किशानलोग दुष्मन नहीं हैं। भाई-भाई हैं। साथी-साथी है। एकका दुःख दूसरे को समझना पडता है। नहीं समझा, तो मालिक किसान को और मजदूर को खतम कर देंगे। लेकिन साथियों, हमारी खेतीपर एक खराब काम हुआ हैं- चिया-बागानकी व्हेस्ट लँडपर किसान लोग जबरदखल कायम करता है। इतना-जबरदखल, कि ई गव्हर्नमेंटला सेंटलमेंटभी ऊ लोग होने नहीं देगा। लेकिन वामफ्रंड सरकार जनगणका साथी सरकार है। इसको सब काम ठीक-ठीक करना पडता है। तो हम बोले, कि यहां सरकराका जो ऑफिसर है, ऊ ऑफिसरको तो सरकारका कानून साफ-साफ करना होगा। हमाराई डिमाण्ड है कि ई व्हेस्ट जमीनका पूरा माप करने होगा, और कौनको पास कितना जमीन है उसका लिस्ट बाहर करना होगा। साथीमन, मजूरो और किसांनो दुश्मन नहीं हैं। मजूरकी युनियनला लाल झण्डा लाट पार्टी, और किशान समिती का भी वही झंडा, वही पार्टी। हमलोग साथी है। ऊ ही दफे हमारा डिमांड है कि सब खाशजमीन का तलाश करना होगा, करना होगा। ई ऑफिसर और जोतदारलोगों का जो कलकब्जा होता है, जो कपॅसिटी होता है, वो खतम करना होगा। इन्किलाब ज़िन्दाबाद!' फागू उरांव भाषण संपवून पुन्हा घोषणा देतो, 'इऽन्किऽलाऽब-' पण या घोषणेच्या प्रतिसादात जणू थोडी मजाही मिसळली जाते. मदेशिया स्त्रियांच्या अकारण हसण्यामुळे घोषणेचा आवाज रुणझुणतो, रुणझुणत रहातो. त्यामुळे घोषणेमध्येही एक आदिवासी रंग मिसळला जातो. आदिवासींचं प्रत्येक काम जसं गाण्याशिवाय किंवा नाचाशिवाय होत नाही, तसंच आताही वाटतं, की घोषणा देणारं हे दल काही भांडण्यासाठी आलेलं नाही, या घोषणा देण्याशी त्यांचा जीवनमरणाचा प्रश्न संबंधित नाही.

सुहास राधावल्लभकडे पाठ करून, मळ्याच्या लोकांना म्हणतो, 'आपल्या इस्टेट

ऑफिसरना इथं यायला सांगा.'

'कौन को?'

'इस्टेट ऑफिसर, इस्टेट ऑफिसर- माझ्याशी ज्यांनी तिकडं बोलणी केली, ते!'

फागू हुकूम देतो- 'वीरेनको बोलो, वीरेन है इस्टेट ऑफिसर.'

'ओऽवीरेनबाबू, वीरेनबाबू होऽऽ' हाक मजुरांच्या दलामधून मागे जाते.

राधावल्लभकडे पाहून सुहास म्हणतो, 'हे पहा, इथं तर आम्हाला रोजच सर्व्हे करावा लागणार. काम लवकर झालं नाही, तर आपलीच गैरसोय होणार. पण हा सगळा हंगामा शांत करणं मला जमणार नाही- म्हणजे, हे तर काही माझं काम नाही.'

'काय आपलं काम नाही, सर? वामफ्रंट सरकार लोकांचं मित्र असलेलं सरकार, त्यामुळे-'

'नाही. ते तर बरोबर आहे- पण ज्याचं काम तोच करणार; मी तर उदाहरणार्थ फॉरेस्ट रेंजरचं काम करू शकणार नाही. हे आमचं, म्हणजे सेटलमेंटचं काम नाही.'

'कोणतं काम आपलं नाही, सर?'

'हेच-ही खासजमीन कुणीकुणी कितीकिती ताब्यात घेतलीय- ती त्यांना मिळणार की चहा कंपनीला मिळणार हे तर काही मी ठरवू शकणार नाही.'

राधावल्लभ म्हणतो, 'सर, आपणाला जर आमची जमीन मापायची असेल, तर मापा सर, आम्ही चेन धरून तुम्हाला मापू देऊ. मापणं हेच तर आपलं काम. आम्हालाही सर्व्हे व्हावा असंच वाटतं.'

'हे पहा, या व्हेस्ट जमिनी तर सरकारने डागा-डागांनी मापून मगच ताब्यात घेतल्या आहेत, आम्ही घेतल्याहेत, त्यामुळे या जमिनीचं सर्व्हेचं काम आहे, आमचा मौजा मॅपही आहे, आणि कुणाच्या ताब्यात कुणी किती जमीन ठेवलीय ते रेकॉर्ड करायला सरकारने बंदी केलीय. अनेक ठिकाणी त्याची एक लिस्ट आम्ही घेतलीय. सरकारला हवी असेल, तर ती आम्ही देऊ. तुमची इच्छा असेल, तर तशी एक लिस्ट तयार करून ती आम्हाला देऊ शकता.'

भगत म्हणतो, 'ती आम्ही नक्कीच देऊ सर, आम्हाला तर सरकारशी समझौता हवा आहे सर, पण खासजमीन मापण्याच्या संदर्भात मजुरांचा दावा कशाला सर? या मापामापीत त्यांचा तर काहीच फायदा नाही, सर! वीरेनबाबूंमार्फत कंपनी इथं संघर्ष घडवायचा विचार दिसतोय, सर!'

'आपण मला बोलावलंत?' वीरेनबाबू उंचवट्यावरून विचारतात. खाली उतरत नाहीत. त्यांनी खाली उतरावं असं सुहासला वाटतं, पण खाली कृषक समितीचे लोक असल्याने खाली उतरण्याची त्यांना भीती वाटतेय हे त्याच्या लक्षात येतं. सुहासची अपेक्षा आणि लक्षात येणं यांच्यादरम्यानच्या वेळात राधावल्लभ म्हणतो, 'सर, या वीरेनबाबूंनी

आम्हाला फॉरेस्टमध्ये बोलण्यात गुंगवून, या सगळ्या सर्व्हेयरलोकांशी कारस्थान करून इथं चेन टाकलीय, आणि हेच मळ्यातले मजूर आणि वस्तीवरचे शेतकरी यांच्यात दंगा घडवून आणायचा विचार करताहेत.'

वीरेनबाबू वरून चित्कारतात, 'राधावल्लभ, बी केअरफुल!' हेसुद्धा एखाद्या घोषणेसारखं वाटतं. जणू त्याला प्रतिसाद म्हणून ओरडतात- 'नही चलेगा, नहीं चलेगा!'

सुहास कृषक समितीकडे पाठ वळवून वीरेनबाबूंना धमकावत म्हणतो, 'हे पहा, आपला तर इथं काही इंटरेस्ट नाही, तरी आपण आमच्या कामात इन्व्हॉल्व्ह होऊन लॉ-ॲण्ड-ऑर्डर सिच्युएशन का तयार करताहात?'

'आपल्या कामात कुठल्याही प्रकारे अडथळा आणलेला नाही.'

'इथं जेव्हा चेन पडली, तेव्हा आपण तर यांच्याबरोबर कॉम्प्रोमाइजचा प्रयत्न केला'- आणि याच क्षणी मागच्या बाजूने कृषक समितीचं दल अचानक 'झिंदाबाद' अशी घोषणा देतं आणि हुंकार देत-देत हृषिकेश आणि बुद्धिमान मागच्या बाजूने पळत येतात.

## सदतीस

# शेतकरी-मजूर : आमने-सामने संघर्ष

हृषिकेशने मजेत सिगरेटचा धूर सोडला. पण चरुवा लोकांचं दल उठून उभं राहिलं. त्यानंतर ते हृषिकेशला म्हणाले, 'आता सिगरेट फुंकत बसून चालणार नाही, ताबडतोब पळा! आनंदपूरच्या जमिनीत भांडण जुंपलंय- चला, चला!

हृषिकेश उडी मारून उभा राहिला. एकबार विघळपणे चहुकडे पाहिलं- त्याच्या दलातलं कुणीच नाही. आतापर्यंत गाणं ऐकणाऱ्यांपैकी काहीजण चहाच्या दुकानाजवळ, तर काहीजण सर्व्हेयर ज्योत्स्नाबाबूंसमोर उभे आहेत. अनेकजण सरळ त्या हत्तीवाटेने अगदी लगबगीने उत्तरेला आनंदपूरच्या दिशेने चालले आहेत, जणू इथला गाण्याचा कार्यक्रम संपल्यावर तिथं आणखी मोठा मनोरंजनाचा कार्यक्रम आहे. हृषिकेश काही पावलं आस्ते आस्ते चालतो. पुन्हा आसपास पहातो. आपल्या दलातले कुणीच नाहीत यावर त्याचा जणू विश्वासच बसत नाही. चरुवा लोकांपैकी काही - काहीजण त्याला मागे टाकून पुढे जातात. हृषिकेश मागं वळून एकदा तिस्तेकडे पहातो. ती खुर्ची रिकामी पडलीय, आणि थोड्या अंतरावर ते टेबलही. ज्या गर्दीत आपण इतका वेळ होतो, ती गर्दी आता इथं नाही हे समजायला हृषिकेशला थोडा वेळ लागतो. सिगारेटचा एवढा वेळ झुरका घेतलेला नाही. आता दुकानाकडे पाहून विचारतो. 'अरे,एऽ, काय चाललंय तिकडं?' गर्दीतून एकजण ओरडूनच उत्तर देतो. 'देव जाणे काय चाललंय- बहुतेक तुमच्या

समितीच्या लोकांशी मळ्यातल्या मजुरांची मारामारी होणार असं ऐकतोय.'

'आँ?' अशी एखादी मारामारी होण्याचा संभव आणि शंका तर नेहमीच असते. आता सर्व्हेवरून मारामारी होऊ शकेल. पण हृषिकेशशिवाय मारामारी कशी काय होणार? जितक्या जोराने पळता येईल, तितक्या जोराने हृषिकेश पळू लागतो.कॉम्रेडला तर काही मारामारी करता येणार नाही. आलबिशही मारामारी करू शकणार नाही. बाकीचे सगळे असे-तसेच; त्यांनी काय करायला हवं, हे हृषिकेशशिवाय कुणालाच ठरवता येणार नाही. एक बुद्धिमान तेवढा आहे. पण तो एकटा पडेल. हृषिकेश चरुवा लोकांना मागे टाकून पुढे जातो. 'एऽचला, आम्हीही चाललो!' हृषिकेश थांबत नाही. पळता-पळताच विचार करतो, मळ्यातल्या मदेशियांनी वस्तीत येऊन घरांना आग लावून दिली तर? मग तर . . .! धनुष्यबाण चालवू शकणारे लोक एकत्र करायला किती वेळ लागेल याचा अंदाज घेण्याचा हृषिकेश प्रयत्न करतो. पण कोण किती कुशल, यावर ते अवलंबून रहाणार. आनंदपूर समितीशी मारामारी व्हायची वेळ आली, आणि तो इथं गाणं म्हणत असताना त्याला मुळीच न बोलावता सगळे निघून गेले! आपल्याला हाक मारायला त्यांना वेळ मिळाला नाही? एक हाक मारली असती, तरी चाललं असतं- ''हृषिकेश-नीघ!'' हृषिकेश पळता-पळता ती हाक ऐकण्याचा प्रयत्न करतो. की त्यांनी हाक मारली होती, आपल्याला ऐकू आली नाही? आणि ते समजेल की हृषिकेश येतोच आहे- असं तर झालं नाही? मग तर. . . की कुणाला समजलंच नाही? अचानकच सुरू झालं? पण हृषिकेशशिवाय इतका वेळ मारामारी चालणार नाही? तोवर हृषिकेश आनंदपूरच्या जमिनीपाशी पोचलाय. ही हत्तीवाट डावीकडे वळलीय- ते वळण घेतलं, की आनंदपूरच्या व्हेस्ट जमिनीचा भाग सुरु होता. जमिनीच्या आल्यावर हृषिकेशच्या लक्षात येतं, की आपण इतक्या वेगाने पळतोय, की तिथे पोचल्यावर आपल्याला दम घेता येणार नाही. तो ताबडतोब आपल्या पळण्याचा वेग कमी करतो. त्याबरोबर त्याच्या छाती आणि कानाजवळच्या शिरांच्या दबदब अशा आवाजाने जणू कानांना कुलूप लागल्यासारखं होतं.

वळणाजवळ आल्यावर विरुद्ध दिशेने बुद्धिमान पळत येताना हृषिकेशला दिसतो. हृषिकेशला पाहून बुद्धिमान थांबून ओरडतो, 'रिऽशिऽकेऽश, लऽडाऽईऽ, लऽडाऽई', बुद्धिमान एका उडीत नाली पार करून जंगलात प्रवेश करतो. तो एक फांदी घेऊन पुन्हा उडी मारून नाली पार करतो, तेवढ्यात हृषिकेस उडी मारून जंगलात जातो. तो इकडेतिकडे पहातो, पण त्याला काही उपयोगी अशी फांदी दिसत नाही. तो एका झाडाची खालची फांदीच ओढून मोडतो, पण ती झाडापासून वेगळी करता येत नाही. सगळा जोर लावून तो प्रयत्न करीत रहातो. तेव्हा बाहेरून बुद्धिमान हाक मारतो, 'एऽ हृषिकेश, चल, चल, ही लाठी धर!'

बुद्धिमानचा आवाज ऐकून हृषिकेश नाली पार करून पहातो, तर रस्त्यावर एक

चांगल्यापैकी फांदी ठेवून बुद्धिमान पुढे पळतोय. हृषिकेश फांदी उचलून, एक मोठ्ठा हुंकार देऊन 'रे ऽऽऽ' करीत समोर हत्तीवाटेवरच्या गर्दीच्या दिशेने सुटला. बुद्धिमाननेही हुंकार द्यायला सुरुवात केलीय. त्यांच्या पावलांखाली हत्तीवाट दबदब करतेय. त्या पळण्यात, त्या हुंकारांमध्ये आणि लाठ्यांच्या आविर्भावात समोर बनियन घातलेल्या बुद्धिमानच्या आणि मागे कपडे घातलेल्या हृषिकेशच्या स्नायूंचं नर्तनही दिसतं.

समोर हत्तीवाटेवरच गर्दी आहे- तिथून उजवीकडे जमिनीला उतार आहे. तिथेही गर्दी आहे. पळता-पळता कोण कुठं उभं आहे हे लक्षात येत नाही. पण बुद्धिमान जागा पाहूनच गेला होता, त्याशिवाय कुठलं दल कुठं उभं राहू शकेल हे त्याला ठाऊकच होतं. झगड्यासाठी तयार या धावत येणाऱ्या दोघांसाठी गर्दीचे दोन भाग झाले- मधल्या वाटेतून या दोघांना जाता यावं, म्हणून. पण त्याच्याआधीच प्रथम बुद्धिमान आणि त्यामागे हृषिकेश उतारावरून खाली जातात. समोर अगदी दलदल असेलली जमीन होती, तिच्यावरून उडी मारून दोघे बांधावर जातात. दोनचार बांध ओलांडल्यावर आणखी एक मैदान तोपर्यंत ते गर्दीपर्यंत पोचलेच म्हणायचे. लाठ्या डोक्यांवर उचलून बुद्धिमान आणि हृषिकेश 'साऽला, डोकं फोडून टाकीन, साऽला,' म्हणतात आणि जोराने हुंकार देतात, तेवढ्यात गर्दीतून 'इऽन्किऽलाऽब' अशी घोषणा उठते आणि त्यांच्या आवाजात मिसळून जाते. तयार होऊन सारे सारेजण जणू बुद्धिमान आणि हृषिकेशचीच वाट पहात होते. त्यांचा आवाज ऐकूनच गर्दीने त्यांना जाण्यासाठी जागा दिली होती. ते दोघे मागच्या बाजूने गर्दीत घुसतात, एका उडीत मोठ्या बांधावर चढून समोरच्या मदेशियांच्या दिशेने सरसावतात. त्याबरोबर वीरेनबाबू एका उडीत मदेशियांच्या रांगेत घुसतात. त्यामुळे मदेशियांच्यामध्ये जे समोर होते तेही दोनेक पावलं मागे सरकतात. ते मागे गेल्यावर त्यांच्या जवळपासचे लोकही दोनेक पावलं मागे सरकतात. त्यामुळे मदेशियांची रांगच जणू अस्ताव्यस्त होते. कृषक-समिती जणू याचीच वाट पहात होती. राधावल्लभची आरोळी ऐकू-येते- 'इऽन्किऽलाऽब', तिला 'झिऽन्दाऽबाऽद' असा दीर्घ प्रतिसाद मिळतो. कृषक समिती जणू एखाद्या मोर्च्याप्रमाणेच मदेशियांच्या रांगेवर धावून जाते. मदेशियालोक आधी एक-पाऊल दोन-पावलं करीत, त्यानंतर जवळजवळ पळतच मागे जातात. हे दिसल्यावर राधावल्लभ पुन्हा रणगर्जना करतो- 'इऽन्किऽलाऽब.'

पण त्याला अचानक थांबावं लागतं. मदेशिया लोग मागे पहातात, तर त्यांच्या पाठीमागे असलेल्या एका टेकडीवरून तीन मजुरांनी तीन धनुष्यबाणांनी राधावल्लभवर नेम धरलेला. बुद्धिमान चित्कारतो, 'खबरदार!' हृषिकेश मान वळवून आपल्या दलातील लोकांना ओरडून म्हणतो, 'धनुष्यबाण आणा, धनुष्यबाण आणा!' पण कृषकसमितीला धनुष्यबाण आणण्यासाठी वेळ मिळत नाही. आपल्या दलातल्यांनी धनुष्यबाण आणलेत की नाही हे पहाण्यासाठी हृषिकेश आणि राधावल्लभ मागे वळून शोध घेतात. त्यांना

कुठेच धनुष्यबाण दिसत नाहीत. तिकडे मदेशियांनी धनुष्यांना बाण लावलेले. एकमेव उपाय म्हणजे त्यांनी बाण मारण्याआधी सर्वांनी त्यांच्यावर हल्ला करणे. बुद्धिमान हुंकारतो, 'इऽन्किऽलाऽब.' कृषक समितीचं दल पळायला सुरुवात करतं- आता जणू हिशेब सुरू होतो. तीन बाण सुटले, तर तीन जण मारले जाणार, की कितीजण- तेवढ्यात आलबिश भगत पळत - पळत मागून पुढे येतो आणि मदेशियांसमोर दोन्ही हात वर करून उभा रहातो. कृषक समितीच्या दलातील लोकही आलबिशच्या आविर्भावात उभे रहातात.

आलबिशचे डोळे मोठे झाले आहेत, कपाळावरच्या आठ्यांचं जाळं जणू वाढलं आहे, तोंड उघडं ठेवल्याने त्याचे मोठमोठे दात आणि पान खाल्याने लाल झालेली जीभ बाहेर आली आहे.

समोरच्या टेकडीवर धनुष्यबाण घेऊन उभे असलेले ओरडतात, 'आलबिश, बाजूला हो!' पण भगत बाजूला होत नाही, की काही बोलतही नाही. आलबिश उरांव आहे- मदेशियांच्या एका गोत्रातील एका अंशाचा पुरोहित पण पुरोहित हा पुरोहितच. भगत हा भगतच. कृषक-समिती असली तरीही तो शेवटी भगतच. लालझेंडा असला तरी ही भगतच. दात खात राधावल्लभ बुद्धिमानला म्हणतो, 'बुद्धिमान, घोषणा देऊ नकोस.' तीरकमानवाले भगतवर बाण सोडायला कां-कूं करताहेत, जणू भगत त्यात मरणारच. आता घोषणा दिल्या, तर त्यांना बाण सोडायला प्रवृत्त केल्यासारखं होईल. पण आता त्यांनी बाण सोडले, तर तिनाऐवजी तीस जण मारले जातील हे सुद्धा हृषिकेश आणि राधावल्लभला समजतं. आता पुन्हा धावत जावून त्यांच्यावर हल्ला करता येणार नाही. कृषक-समितीचे लोक ज्या प्रकारे रांगेत उभे आहेत, ती आडवी रांग पहाता त्यांनी बाण मारले, तर तीनजण पडणार. पळता-पळता गोळ्या किंवा बाण लागले, तरी पळणारं दल पुढेच पळंत, पण हे उभे असताना जर एकजण मारला गेला, तर सारेजण मागे पळतील. तेव्हा एकामागून एक पडत जातील. दोन-तीन जणांच्या मृत्यूंनी ते जिंकले असते, आता किती जणांची आहुती देऊन आपण हरणार, याचा हृषिकेश आणि राधावल्लभ विचार करू लागतात. त्यांच्या छातीत धडधडू लागतं. एकेका आवाजाबरोबर जणू एकेकजण मरतोय.

पण आलबिशला एक अंदाज येतो. आपल्या उराँव स्वभावानुसार त्याच्या लक्षात येतं- बाण सोडण्याची वेळ आता निघून गेली आहे- आता बाण सोडले जाणार नाहीत. पण ते-तीरंदाज काही हाताले धनुष्यबाण खाली घेऊ शकत नाहीत- नाहीतर ते हरले असं समजण्यात येईल. आलबिश झटकन मदेशियांकडे पाठ करून, दोन्ही हात वर करून कृषक समितीच्या दलाला ओरडून म्हणतो, 'बैठ जाओ, बैठ जाओ!' राधावल्लभ आणि हृषिकेश सर्वात आधी बसतात. बुद्धिमानला मागच्या बाजूने ओढून ते बसवतात.

आलबिश सोडून कृषक समितीच्या दलातले सगळे लोक खाली बसतात.

## अडतीस

# शेतकरी व मजूर : ऐक्यासाठी संग्राम

शेतात सुहास एकटाच उभा.

नुकतीच लावणी झालेल्या भातशेतात तेव्हा अगदी पोवलोपावली चिखल. रोपं चिखलामध्ये लपून गेलेली. इतक्या लोकांनी हे शेत तुडवलंय की मातीमधलं पाणी वर आलंय. त्या गढूळ, चिखलमातीत पाण्यात काही भातरोपं तरंगताहेत.

सर्व्हेची लोखंडी चेन लांबकचक होऊन पडलेली आहे- तिकडे हिरव्या शेतामधून निघून इकडे या चिखलातून तिकडे हत्तीवाटेपर्यंत.

मोठ्या बांधाखाली सुहास एकटाच ती चेन काढून घेण्यात गुंतलेला होता. त्याच्या बोलण्याच्या दरम्यान दोन माणसं आरडाओरडा करीत आली आणि मग जो गोंधळ सुरू झाला, तो उभ्याउभ्या पाहाण्याशिवाय सुहास काहीच करू शकत नव्हता. सिनेमाप्रमाणे हा सगळा प्रकार पाहूनसुद्धा, त्या लोकांनी धनुष्यबाण त्या म्हाताऱ्या संताळाला पाहूनच खाली घेतले, की धनुष्यबाण केवळ भीती दाखवण्यासाठी उगारले होते, मारण्यासाठी नव्हेत, हे काही सुहासच्या नीट लक्षात आलं नाही.

आजपासून फक्त दहा वर्षांपूर्वी धनुष्य, संताळ, आदिवासी, जमीन, दंगे, बाण- या सर्वांबद्दल सुहास जे काही ऐके, विचार करी, पाही ते सारं आत्ताच त्याच्यासमोर घडून गेलं, घडतंय. पण या घटनांचा अगदी केंद्रबिंदू असूनही त्या दहा वर्षांपूर्वीच्या भूतकाळाची काहीही आठवण त्याला झाली नाही. आदिवासी लोकांच्या इतक्या गर्दीमुळेसुद्धा नाही. दहा वर्षांपूर्वीचं स्वप्न आणि दहा वर्षांनंतरच्या संभाव्य स्मृतीच्या मध्ये वर्तमानात सुहास डावीकडे पहातो- विनोदबाबू, अनाथबाबू, प्रियनाथबाबू हत्तीवाटेवरूनच त्याच्याकडे येताहेत. सुहास पुढे जातो, उडी मारून बांधावर चढतो, आणि त्यांच्या दिशेने जातो. दुरुनच विनोदबाबू विचारतात, 'सर, आपणाला काही त्रास नाही ना झाला?'

'नाही, तसा काही त्रास नाही झाला; आपण चेन टाकलीत, पण इतका वेळ होता कुठं?'

'सर, ज्या प्रकारची मारामारी पाहिली, त्यामुळे इथं थांबण्याचं काही धाडस झालं नाही.'

'नाही, माझ्यासाठी विचारीत नाही; पण ही चेन आता गुंडाळायला हवी आपल्याला. आणि माझ्या लक्षात येत नाही विनोदबाबू, या जमिनीवर चेन टाकायला सांगितलं कुणी?'

'कां बरं सर?'

'ही काही बॉर्डरलाईन नाही, एकदम व्हेस्टेड जमिनीच्या मधला भाग आहे हा. आपण तर काही व्हेस्टेड लँड मापीत नाही, मापायचा प्रश्नही नाही.'

'मी तर पाहिलं नाही सर, काय प्रियनाथ, तुम्ही-' विनोदबाबू म्हणतात. प्रियनाथ उत्तरतो. 'आम्हाला तर डाग नंबर माहीत माहीत नाहीत सर, आम्ही ज्याप्रमाणे लाईन बांधून चेन ओढली होती तशीच ओढतोय.'

अनाथ उडी मारून खाली उतरतो आणि चेन गुंडाळायला लागतो.

सुहास त्या तीनजणांकडे पाहून म्हणतो, 'हे पहा, अशी चूक पुन्हा करू नका. पाहिलंत ना, किती गोंधळ झाला या एका चुकीमुळे?'

विनोदबाबू थोडावेळ गप्प राहून विचारतात, 'आपण काही म्हणालात का सर?'

'नाही. तसं काही असतं तर बोललोच असतो, पण अशी विचित्र चूक होणं म्हणजे संकटाला आमंत्रण!'

'तुम्हाला तर आज जरा डेंजरच होता सर. तर मग आता कॅम्पवर परत जाऊ का सर?'

'हो, चला.'

पुढे-पुढे सुहास आणि मागे-मागे विनोदबाबू चालू लागताच 'सर! सर!' म्हणून मागच्या बाजूने हाका सुरू होतात. सुहास थांबतो. राधावल्लभ, तो म्हातारा संताळ, हाफ-पँटमधला एकजण (तो नक्कीच मळ्याचा असणार), आणि त्याच्याही मागे वीरेनबाबू वरतून या बांधावर उतरून या बाजूला येताहेत. जवळ येऊन राधावल्लभ म्हणतो, 'सर, आम्ही तर तुमच्यासाठी बसलेलो आहोत, सर.'

'का? माझ्यासाठी का?'

'नाही, आपण तेव्हा काहीतरी म्हणालात पहा, त्यामध्ये एक मिसअंडरस्टँडिंग, म्हणजे, ते दोघेजण- हृषिकेश आणि बुद्धिमान-' वीरेनबाबू म्हणतात. सुहासच्या लक्षात येतं, की त्यांना युद्धसमप्तीची घोषणा करायला काहीतरी निमित्त हवंय. म्हणून दोन्ही पक्षांनी ही अशी युक्ती केलीय की सरकारी ऑफिसरच्या सांगण्यानुसार आपण समझौता करायचा, नाहीतर त्यांच्या स्वतःवरच जय-पराजय ठरवण्याची जबाबदारी येईल.

सुहास म्हणतो, 'मी तर माझी चेन काढायला गेलो होतो. आता कॅम्पमध्ये परत चाललोय. तुमचं भांडण मिटलं का? एकी झाली का?'

फागू जरा हसून म्हणतो, 'एकी तर व्हायलाच पाहिजे, किसान और मजदूरका एक पार्टी, एक झंडा. किसान और मजदूरका एकही-'

फागूला थांबवून भगत हत्तीवाटेकडे पहात म्हणतो, 'अरे, आमदार आले, आमदार!'

सगळेच वळून पहातात.

विनोदबाबू म्हणतात. 'आम्ही तर पुढे निघतो सर. आपण-'

सुहास थांबूनच रहातो. आमदार आल्यावर तो कसा काय परत जाणार?

## एकोणचाळीस

# हे शेतकरी की मजूर?

मोठ्या बांधावरून वीरेन्द्रनाथ रायबर्मन आणि आमदार येताहेत- धोतर शर्ट असा पेहेराव असलेल्या आमदारांचं चालणं अगदी लगबगीचं आहे. त्यांच्यामागे गयानाथ गयानाथच्या माग सर्व्हे कँपची खुर्ची डोक्यावर उलटी धरून बाघारू.

आमदार दिसल्याबरोबर सगळे लोक उठून उभे रहातात आणि मारामारी होता होता न झाल्यामुळे जो काही भाव आला होता, तो निघून जातो. त्यांच्याजवळ येताच गयानाथ मागे वळून बाघारूला म्हणतो, 'जा, इकडून जाऊन आधी खुर्ची ठेव.'

बाघारू उडी घेऊन बांधावरून खाली उतरतो, त्या उध्वस्त भातशेतात, त्यानंतर छोट्या बांधावरून पुढे जाऊन पुन्हा मोठ्या बांधावर येतो, या गर्दीजवळ पोचतो. बाघारू गर्दीच्या मागच्या बाजूने घुसायला पहातो, आणि गर्दीचं तोंड आहे आमदाराकडं. त्यामुळे बाघारूला मागच्या बाजूने खुर्ची डोक्यावर घेऊन ढकलाढकली करीत थेट पुढच्या बाजूला गर्दीच्या समोरच्या बाजूला पोचायचंय- तेही आमदार तिथे पोचण्याच्या आतच. इकडं गर्दीच्या मागच्या बाजूने बाघारू ज्याला-ज्याला धक्का देतो. तो-'हेऽऽ' म्हणून चित्कारतो. बाघारूला पुढं जायला जागा मिळत नाही. पण 'एमेलिया' (एम.एल.ए.) ने तिकडून चढायला सुरुवात केलीय. बाघारू आत्तापर्यंत खुर्ची डोक्यावर घेऊन गर्दीत घुसण्यासाठी वाट शोधीत होता, कारण वाट मिळाली नसती, तर लोकांच्या मानेला-डोक्याला खुर्चीचे धक्के लागले असते. पण आता 'देऊनिया' हा 'एमेलिया'ला घेऊन जवळजवळ पोचल्यामुळे करण्यासारखं बाघारूला हाती काहीच रहात नाही. तो खुर्ची डोक्यावर घेऊनच मागच्या बाजूने घुसतो. 'हेऽ', 'हेऽ', 'ए', 'कोण रे?' अशा आवाजांचा गोंधळ होतो. पण त्याचबरोबर सगळ्यांना खुर्ची दिसल्याने सगळेजण बाजूला होऊन त्याला वाट करून देतात. लोक एकदा मागे खुर्चीकडे तर एकदा समोर आमदाराकडे मान वळवतात. बाघारू दोनेक हात अंतरावर असताना आमदार थांबतो आणि दोनेक हात अंतरावरूनच बाघारू खुर्ची डोक्यावरून उतरवून ती आमदारासमोर, जमिनीवर ठेरतो. तसं करताना त्याला ठेच लागते. आमदार दचकून दोन पावलं मागे सरकतो.

'साला, बैलोबा, खुर्चीवर माणूस बसणार, की माणसांवर खुर्ची रेऽ?' खुर्चीच्या पाठीच्या वरच्या भागावर हात ठेवून आमदार उभा रहातो आणि बाघारू त्याने जिथून

खुर्ची खाली ठेवलेली असते त्याच जागी उभा रहातो- उंचच्या उंच, अंगावर फक्त लंगोटी, असा बाघारू जरा उंचीने कमी असता, तरी त्याला वेगळा ओळखता आला नसता, तो दिसलाही नसता. पण हा बाघारू तर एखाद्या जुन्या सालवृक्षासारखाच- इतर सर्वांना झाकूनच त्याला उभं रहावं लागतं. एवढंच काय, त्याची लंगोटीही त्याच्या शरीराशी इतकी मिळून-मिसळून गेलेली, की बाघारू जणू खरोखर एखादा वृक्षच आहे, असं वाटतं. शेतकरी आणि मजुरांच्या गर्दीतही बाघारू विसंगत वाटतो. चहाच्या मळ्यातल्या मजुरांनी अंगावर हाफपँट आणि बनियन असा वेश केलाय. काहींचा नायलॉनचाही आहे. केसांना तेल लावलेलं, भाग पाडलेला. जरा वयस्कर मजुरांनी मात्र हाफशर्ट आणि धोतर असा वेश केलेला. कृषक-समितीच्या दलातले सगळेच काही हृषिकेश नाहीत, एवढंच काय, बुद्धिमानही नाहीत. आलबिशच आहे- त्याने अंगावर लंगोटीच घातली आहे. पण त्यानेही आपल्या कुरळ्या केसांना तेल लावलंय, त्याचे केस मानेवर रुळताहेत. पण एवढा मोठा हा बाघारू- त्याच्या शरीरावरची त्वचा झाडाच्या सालीसारखी, चेहेऱ्यावर, डोळ्यांत काहीच भाव नाही, डोक्यावरच्या केसांचा वेगळा असा रंग नाही. खरोखर तो इथं विसंगतच वाटतो. अगदीच विसंगत.

'हे ऽऽ बाघारू, अरे सरक ना!'

'ए ऽ पहाडा, नीघ इथून!'

'हे ऽऽ'

बाघारू मुळीच हलत नाही- त्याला लोकांचे आवाज ऐकूच येत नाहीत. आपल्या अगदी नाकासमोरच एखाद्या भिंताडासारखा एक माणूस उभा दिसलेला पाहून आमदारही दोनदा खाकरतात, पण काही करू शकत नाहीत. गयानाथ मागून आमदाराजवळ येत, बांधाखालच्या शेताकडे बोट दाखवीत बाघारूला म्हणतो, 'एऽ बैलोबा, तिकडं जाऊन उभा रहा.'

त्याबरोबर बाघारू सरळ चालत जाऊन आमदाराजवळून,गयनाथच्या मागून, एकदोनजणांना धक्के देऊन खाली उतरतो. त्याची अंगकाठीच अशी आहे, की ऐसपैस जागेशिवाय त्याचं चालतच नाही. त्यामुळे, तो निघून गेल्यावर, इतकी गर्दी असतानाही तिथली जागा काही वेळ रिकामी-रिकामी वाटते.

तीच संधी घेऊन सुहास आमदारासमोर येऊन, नमस्कार करून म्हणतो, 'माझ्याकडे इथल्या संक्रमण-छावणीचा चार्ज-'

'अच्छा अच्छा, आपण तर हाटात कॅम्प केलाय, पाहून आलोय मी, इथं काही प्रॉब्लेम नाही ना? ऐकलं की काही मारामारी वगैरे--'

सुहास ताबडतोब, 'नाही, आम्हाला काही प्रॉब्लेम नाही' असं म्हणून, गर्दीकडे चेहरा वळवून म्हणतो, 'यांचे काही प्रॉब्लेम असतील तर हे सांगतील. तर मी निघतो, माझ्या

कॅम्पचे लोक वाट पहाताहेत, त्यांना तर आता इथून पुढं स्वैपाक वगैरे-' 'हो, हो,' आमदार घड्याळ पहातो, 'दोन तर वाजलेच म्हणायचे. मीही इथं फारवेळ थांबू शकणार नाही. मी फुलबाडी वस्तीवर जाणार आहे, मध्ये जंगल, ताबडतोब निघावं लागणार, तिथं एका कल्व्हर्टवरून गोलमाल आहे-'

'मळ्याच्या जीपला बोलावतो,' वीरेनबाबू म्हणतात.

'फुलबाडी वस्तीवर जीपही जात नाही. मध्ये नदी आहे, थोडं चालावंसुद्धा लागणार. आणि आपल्या जीपगाडीतून फार फिरल्यावर मी चालणं विसरून जाईन. आणि मग जर आपण जीप दिली नाहीत तर-?' आमदार हसतो. सुहासला संशय आला होता, की आमदार मुळात जीपच्या शोधातच आला असावा, किमान नदीपर्यंत जीपमधून जाऊ शकला असता. पण आता तर काही जीप घेऊन जात नाही. आमदार असूनही जीप घेत नाही- प्रकार काय आहे?

'पण आपण आमच्या गावात येऊन स्वतःच्या हाताने स्वैपाक करावा, हे काही आम्हाला भूषणावह वाटत नाही...'

'नाही, नाही, ठीक आहे, मी जातो, नमस्कार.'

'अच्छा, नमस्कार.'

आता आमदार सरळ पाहून म्हणतात, 'हे पहा, आमच्या सरकारच्या अमलात किमान आधियार-रेकॉर्ड तयार करण्यासाठीच या छावणीची व्यवस्था केली आहे. जलपाइगुडीत तिस्ता बॅरेजसाठी ही छावणी-वसाहत-अत्यंत आवश्यक आहे. ते परवानगीने होत असेल, तर होवो. पण होवो. पण या सगळ्या मुद्यांवरून नाना प्रकारचे गोंधळ करण्याचे प्रयत्न होताहेत. इथं आपल्यामध्ये काही मारामारी, गोलमाल असेल, तर त्याच्यावर नंतर विचार करता येईल. आता आपण गोंधळ करू नका. काय राधावल्लभदा-'

राधावल्लभ हसतो, डोळे झाकतो, मान खाली करतो. त्यानंतर म्हणतो, 'गोष्ट अशी आहे, आपण आलात हे तर आमचं सद्भाग्य. पण आपण तर काही इथं राहू शकणार नाही. एकदा आमच्याकडं या, बसून सगळ्या समस्या ऐका, मीमांसा करा, म्हणजे आणखी मारामारी होणार नाही.'

'हो, तरमग एकदा तुमच्या सवडीने, आमचं सेशन बंद असताना, आधी ठरवून बसायलाच हवं.'

'आम्हाला तर रोजच सवड आहे. आपण सवड काढून या, आधी कळवा आणि एक संपूर्ण दिवस आणि संपूर्ण रात्र रहा. आलात आणि लगेच गेलात असं करू नका.'

'अच्छा अच्छा, मी येईन. आधी कळवीन'. खुर्चीवरून आमदार आपले हात काढतात, 'काय फागू, मग आम्हाला तर आज आणखी फुलबाडीला जायचंय.' गयानाथ

जवळून सरकतो आणि खाली उतरतो.

'वो तो ठीक बात है, करना होगा!' फागू मान हलवतो.

'पण गोष्ट अशी आहे, की आपणाला बहुधा आणखी एक गोष्ट ठाऊक असलेली चांगली.' राधावल्लभ म्हणतो.

'हो, हो, बोला, बोला,' आमदार एक पाऊल पुढे येतात.

'गोष्ट अशी आहे. की चहाच्या भळ्यात कंपनीने कोणता ऑफिसर नेमावा, त्याचं काम काय असावं हा तर आमच्या चर्चेचा विषय नाही, पण आपण कंपनीशी एक गोष्ट बोला, की इस्टेट ऑफिसरचं काम काय युनियन उभी करणं हे आहे का?'

वीरेनबाबू समोरच होते, आमदाराजवळ. ते अचानक दबल्या आवाजात म्हणतात, 'हायली ऑब्जेक्शनेबल! फागू-'

फागूला प्रकार समजत नाही. तो डोकं हलवतो. आणदार आवाज चढवून, इतरांच्या आवाजांना निष्प्रभ करीत म्हणतात, 'ते तर राधावल्लभदा युनियनलाच ठाऊक; आपण आणि आम्ही तर काही त्यावर बोलू शकत नाही. पण यामुळे जर आपलं नुकसान होत असेल, तर युनियनबरोबर बसायला हवं. आपण आपसात बसू शकता. मी ज्या दिवशी येईन, त्या दिवशीही याबद्दलच बोलू. कसं? जरा थांबून ते पुढं म्हणतात, 'पण आज तर काही मी थांबू शकत नाही; आत्ता निघालो तरी फुलबाडीला पोचेपर्यंत संध्याकाळ होईल.'' 'हो. हो, आणखी लेट करणं ठीक नाही--' राधावल्लभचं म्हणणं मुळात सगळ्यांच्या मताचाच उद्गार असतो. इथल्या अनुभवावरून यात काही दुमत असूच शकत नाही.

## चाळीस

# बाघारूचं जिपारोहण

अनेकजण आमदाराला पुढे येऊ देतात. राधावल्लभ मोठ्या बांधावरून भगतसहित उतरतो. हृषिकेश मात्र मोठ्या बांधावरच उभा रहातो, राधावल्लभबरोबर पुढे जात नाही. फागू आमदाराशेजारूनच चालतो. जरा मागून वीरेनबाबून आहेत. फ़ागूने समजावलं, 'आप कुछ भी सोचना मत. ई तो हमरा घरका मामला, घर में फैसला होगा; क्यों राधादादा?'

राधावल्लभ मागून म्हणतो, 'तू तर खूप विद्वानासारखं बोलतोस हीच अडचण आहे. ज्याला जे समजायचं असेल ते तो समजो. पण आपल्या पार्टीच्या दृष्टीने कोणती गोष्ट बरोबर आहे याचा तुम्ही विचार करायला हवा. तीच सर्वात योग्य गोष्ट आहे.'

'हां, जरूर,' फागू डोकं हलवतो. आमदारासोबत सारेच एका सुरात हसतात.

'नाही. ऐका. हेच जर आज आपल्या पार्टीत दंगा झाला असता, मारामारी-खुनाखुनी झाली असती, पोलीस आले असते, पेपरमध्ये बातमी आली असती- त्याने तर आपल्या सरकारची बदनामी झाली असती-'

'जरूर, लेकिन एई रिशिका माथा गरमागरम. ऊ कहांसे लाठी लेगा और जिंदाबाद देगा, अरे बाबा!' म्हणून फागू हसतो आणि बोलणं थांबवतो.

'हो. नक्कीच रिशिकेशचा दोष आहे. रिशिकेश-' आमदार वकून पहातात, तर ह्रषिकेश नाही. राधावल्लभ हसतो, 'आता बोलता कशाला, एकीकडे रिशिकेश, सगळ्यांकडे लाठ्या, आणि एकीकडे आमचा फागू, सगळं ठीक- यांना जे समजायचं असेल, ते, ते समजोत,' राधावल्लभ वीरेनबाबूंकडे पहातो. आमदार डोळे दुसरीकडे वळवतो, जणू त्याला इंगित समजावून घेण्याची इच्छा नाहीय.

ते हत्तीवाटेवर आले. राधावल्लभ उभा रहातो- 'आम्ही आणखी पुढे जाणार नाही- आपण तर या, तेव्हाच सगळं बोलणं-'

'हो, हो, ठीक आहे. आपण जा. माथं थंड करा. मी येण्यापूर्वी पत्र पाठवीन.'

'आपण काय एकेकटे जाणार की काय फॉरेस्टमध्ये?' मागूनच राधावल्लभ विचारतो. आमदार न वळता हात वर करून म्हणतात, 'नाही, नाही, ते कसं होईल?'- आमदारांनी फागूचा दंड धरलेलाच होता. त्यामुळे वाटतं, की फागूने आणखी काही अंतर त्यांच्याबरोबर चालावं असं त्यांना वाटत होतं. आता न जाऊन करणार काय? जायलाच हवं. वीरेनबाबू जरा मागून-मागूनच येत होते. पण वाटतं, की राधावल्लभ निघून गेल्यावर ते या दलाबरोबर जाताहेत.

फॉरेस्टमधून एक मोठा रस्ता ओदलाबाडीला गेलाय, त्याच रस्त्याकडे ते निघाले होते. त्या रस्त्यावर आनंदपूरची जीप थांबलेली दिसतच होती. गयानाथ जोतदारही जवळच उभा होता. आमदार येताना पाहून तो दोन पावलं पुढं येऊन थांबतो.

त्या वळणावर, जीपगाडी आणि गयानाथबाबू जवळ आल्याबरोबर मागून वीरेनबाबू म्हणतात, 'काय फागू, मळ्याची जीप तर उभीच आहे!'

त्याचवेळी फागू वळून वीरेनबाबूंना म्हणतो, 'हां. कॉमरेडको पहुंचा दो. फूलबाडी बस्ती.' या वळण्यामुळेच फागूच्या दंडावरचा आमदारांचा हात निसटतो.

वीरेनबाबू थोडं हसून म्हणतात, 'तर मग बहादुरला बोलवा.'

बहादुर जीपजवळच जमिनीवर बसलेला असल्याने तो सहज दिसत नाही. तो उठून उभा राहताच वीरेनबाबू म्हणतात, 'वीरेनबाबूंना फूलबाडीला सोडून ये.'

आमदार म्हणतात, 'अरे असे चालतच जाऊ ना, त्यात जीप काही वस्तीपर्यंत जात नाही. मध्ये तर नदी येते.'

गयानाथ जीपच्या समोरच्या सीटकडे बोट दाखवीत म्हणतो, 'बसा, बसा. नदीपर्यंत

गाडीने जा, त्यानंतर हा नदी पार करून देईल- हे ऽ बाघारू!'

गायनाथने बोट दाखवलं, तेव्हा वाटलं, गयानाथ जीपचा मालक आहे, जेव्हा तो बोलला, तेव्हा वाटलं, तो आमदाराचा मालक आहे आणि जेव्हा त्याने बाघारूला हाक मारली, तेव्हा वाटलं, तो बाघारूचा मालक आहे.

गाडी रस्त्याच्या तोंडाशी आल्यावर समोरचं सीट दाखवून वीरेनबाबू म्हणतात, 'हं, बसा! फागूपण जाणार की का?'

'हो, नक्कीच-' आमदार गाडीत चढून ब्रीफकेस मांडीवर घेऊन, जरा बाजूला सरकून फागूला जागा करून देतो. फागू समोरच्या सीटवर बसतो. गयानाथ पुढे येऊन म्हणतो, 'हा माझा माणूसही तुमच्याबरोबर येतोय. आपल्याला नदी पार करवून देऊन, फुलबाडी वस्तीवर सोडवून पुन्हा परत येईल.'

आमदाराने बाघारूला नीट पाहिलंय की नाही समजत नाही. गयानाथ म्हणतो, 'हेऽ बाघारू, मागं बस बरं!'

जीपगाडी स्टार्ट होऊन तयार होती. बाघारू इतका उंच, की जमिनीवरून थेट जीपमध्ये पाय टाकून तो बसू शकला असता. पण पायांची लांबी आणि जीपची उंची यांच्या तुलनेचा त्याला कधीच अनुभव नव्हता. म्हणूनच जीपगाडी त्याला जणू पहाडाप्रमाणे वाटते. मागच्या पायरीवर दोन हातांवर शरीराचा भार देऊन तो आत जाऊ पहातो, पण त्याचं डोकं जीपच्या छतावर आपटतं. आणि तेव्हाच गाडी चालायला सुरुवात झाल्याने बाघारूला ठेच लागते; पण पडता-पडताच ताबडतोब हातांच्या भारावर उठून, पाय उंच करून, उजवा गुडघा रेलिंगवर काढू शकतो. त्यामुळे तो रेलिंगवरच बसतो. डाव्या पायाचा तळवा जमिनीवर घासतोय. कसाबसा तो जीपमध्ये प्रवेश करतो. खडी टाकलेल्या रस्त्यावरून, खड्ड्यांमधून उड्या मारीत, इकडेतिकडे झुकत, जीपगाडी पहाडाच्या उतारावरून जाणाऱ्या एखाद्या शिलाखंडाप्रमाणे चालतच रहाते. शेवटी जीपमध्ये नीट बसून बाघारू मागच्या बाजूने फॉरेस्टकडे पहात रहातो.

अशा प्रकारे तो कधी फॉरेस्ट पहात नाही, फॉरेस्ट नेहमीच प्रथम बाघारूच्या समोर असतं, त्यानंतर तो फॉरेस्टच्या मध्ये, त्यानंतर फॉरेस्ट त्याच्या सर्व बाजूंना : वर-खाली, उजवीकडे-डावीकडे, समोर-मागे-शेवटी फॉरेस्ट त्याच्या शरीराशी मिसळून जातं. तो स्थिर आहे, फॉरेस्ट त्याच्या दोन्ही बाजूंनी सरकतंय. जणू तो फॉरेस्टमध्ये घुसलेला नाहीय, हा काळा रस्ता घुसला आहे. मागे जितक्या दूरवर नजर जातेय, तितक्या दूर काळा रस्ता लांब, अधिक लांब होत चाललाय. बाघारूला झाडांचे शेंडे दिसत नाहीत. आपण या वनाच्या तळाशी एखाद्या पाताळासारख्या वनात चाललो आहोत, असं त्याला वाटतं. पाताळासारखं वन-तिथं झाडांचे शेंडे दिसत नाहीत, फक्त खोडं दिसतात, तळ दिसतो.

हेच का फॉरेस्टरचन्द्र बाघारू-बर्मनचं फॉरेस्ट? यातलं तर तो काहीच ओळखू शकत नाहीय. आपण कधीकाळी या फॉरेस्टमध्ये होतो हे सुद्धा त्याला जणू आठवत नाहीय. तरीही त्याचे डोळे बांधून सोडलं, तर बाघारू कुठल्याशी झाडाला टक्कर न देता या जंगलातून फिरू शकेल. आता जीपच्या मागच्या भागात बसून जंगलाकडे पहाताना, आपण कुठून कुठे चाललो आहोत हेच त्याच्या लक्षात येत नाही.

जीपमधून हे फॉरेस्ट अनोळखी वाटतं. असिन्दिरच्या फटफटीवर मागे बसवलं, तर असं अनोळखी वाटत नाही. हे फॉरेस्ट तेव्हा तर सगळं समोर असतं. म्हणूनच, गाडी थांबल्यावर आधी फागू उडी मारून आणि नंतर आमदार आपली ब्रीफकेस घेऊन उतल्यावरही बाघारू उतरु शकत नाही. हे दोघे उतल्यावर आपणही उतरायला हवं, हा बोधच बाघारूला गाडीच्या वेगामुळे होत नाही. इतक्या तातडीने नदीपर्यंत पोचता येतं? हे जणू फॉरेस्टला ओढून फूलबाडी वस्तीजवळच्या नदीकाठी ओढून आणल्यासारखं वाटतं-नदीकाठच्या ओळखीच्या जंगलामुळे बाघारू आश्वस्त होऊ शकला असता- ते जंगलही जीपच्या अडथळ्यामुळे दिसत नाहीय.

बहादूर अचानक गियर बदलून जीप मागे घेतो. तेव्हा फॉरेस्ट बाघारूच्या समोर, संपूर्ण दिसलं नाही, तरी समोर तोच फॉरेस्टमध्ये शिरतोय- फॉरेस्ट स्थिरच आहे- अशी नेहमीची जाणीव त्याला पुन्हा होऊ लागते.

पण पुढच्याच क्षणी आणखी एका धक्क्यात बहादुर गाडी पुढे नेतो. बाघारू ठेच लागून पडतो. गाडी मागच्या दिशेने वळवून, आनंदपूरकडे जाण्यासाठी उभी करून, बहादुर मान न वळवताच म्हणतो, 'उतरो!'

तेव्हा, बाघारूपासून थोड्या अंतरावर, हातात ब्रीफकेस घेतलेला आमदार आणि फागू उभे. गाडी वळून उभी राहिल्याबरोबर फागू धावत येऊन समोरच्या सीटवर बसतो, तरीही बाघारूचा जीपमधून उतरण्याचा कार्यक्रम संपलेला नसतो. बहादुरचा आवाज आल्याबरोबर तो उभा राहिला होता. डोक्याला टक्कर लागून खाली बसलाय. त्यानंतर सरपटत-सरपटत या मागच्या झापडीपाशी येऊन एक पाय बाहेर काढतो. पण तो पाय जमिनीवर ठेवायच्या आतच जीप हूऽश करून पुढे जाते. फागू मागे वळून 'लाल सलाम!' म्हणून इकड-तिकडे मान वळवतो, पण त्याला आमदार दिसत नाही. तेव्हा रस्ता झाकून बाघारू उभा असतो. मागच्या बाजूने आमदार म्हणतात, 'चला भाऊ, चटकन नदी पार करवून द्या.'

जीपगाडी दिसत नसली, तरी तिचा आवाज येतोय. वाऱ्यावर पेट्रोलचा वास वाहात येतोय. बाघारू चालायला सुरुवात करतो. त्याच्यामागून आमदार बाघारू एका छोट्या फांदीपासून लाठी बनवतो. तिने आसापासची झुडूपं दूर करतो. थोडं वन पार केल्याबरोबर मैदान. मैदान पार केल्याबरोबर नदी. नदी पार केल्याबरोबर फुलबाडी.

## एकेचाळीस

# आईचा बाघारूप्रसव, बाघारूचे व्याघ्रनिधन आणि आमदार व बाघारू यांच्यातील संवादाने अदिपर्वाचा शेवट

काही पावलं गेल्याबरोबर वनाचा गंध साऱ्या शरीरभर भिनतो. रातकिड्यांची किरकिर क्रमश: वाढते. दोघांना एकमेकांच्या निश्वासांचे आवाज ऐकू येतात. जणू त्या दोघांना असं बराच वेळ जंगलात चालत रहायचं आहे.

आमदार मागच्या बाजूने विचारतो, 'तुमचं नाव काय हो?' हातातल्या काठीने झुडुपं बाजूला करीत-करीत बाघारू म्हणतो. 'ती तर फारच शरमेची गोष्ट आहे. बाबू!'

'कुठली गोष्ट?'

'हीच - माझं नांव.'

'छट्! नांवात शरम वाटण्यासारखं काय असतं? नांव तर नांवच असतं.'

'माझं नांव वाढत चाललंय्'.

'काय वाढत चाललंय्?'

'जसजसा टाईम जातोय्, तसतसं माझं नांव सरासरा वाढतच चाललंय्. आता तर इतकं मोठं झालंय् की मलाच कधीकधी संपूर्ण आठवत नाही. गोंधळ होतो.'

'तुझं नाव तरी सांग की! ऐकतोय् मी.'

'सांगतो, एमेलिया बाबू. पण तुम्ही माझं नांव छोटं करून द्यायला हवं. इतर सगळ्यांची नावे छोटी होत चाललेली असताना, माझं नांवही छोटं व्हायला हवं.

बाघारू खूप हळू आवाजात बोलत होता, आणि काठीने समोरचं जंगल दूर सारीत पुढे चालला होता. आमदाराला दिसतं, की जंगलातलं गचपण, त्यातल्या वनस्पती कधीच बाघारूच्या कमरेपर्यंत येत नाहीत. त्याच्या कमरेपाशी त्यांची उंची कमीच आहे. तो जणू मैदानावरून अस्वस्थ आवाजात विचारतो, 'कुणाचं नांव छोटं झालं रे?'

'सगळ्यांचीच नांव छोटी झाली बाबू, माझं एकट्याचंच नांव तेवढं वाढतंय्. उदाहरणार्थ, माझा देडनिया गयानाथ रामबर्मन - त्याचं नांव झालं "गया-जोतदार"-'

आमदार खुक्क करून हसतो. आणि विचारतो, 'आणखी?'

'उदाहरणार्थ, राधावल्लभचं नांव झालं "राधू-लीडर"-'

आमदारला आता आणखी जोरात हसू येतं, 'आणखी?'

'उदाहरणार्थ, तुमचं नांवही छोटं व्हायला लागलंय्. आता ते वाढणार नाही.'

'कसं?'

'आधी तुमचं नांव होतं वीरेनबाबू रायबर्मन, आता झालंय् ''एमेलिया-''

'हट्! ते काय नाव आहे का? ते आहे काम एम्. एल्. ए. या शब्दाला तुम्ही दिलेलं रूप!'

'तेच, तेच म्हणतोय् मी! माणसाच्या कामावरूनच तर त्याचं नांव तयार होतं. माझा तर गोंधळ आहे. हजार प्रकारची कामं, हजार प्रकारची नांवं, कामही बदलतं, त्याचबरोबर नांवही लांब होतं जातं, वाढत जातं. एका कामानंतर आणखी एक काम, एका नांवापुढे आणखी एक नांव!'

आमदार विचारतात, 'पण लोक तर तुला बाघारू म्हणतात ना?'

मान न वळवता, चालता-चालता बाघारू म्हणतो, 'लोक तर मला ''बाघारू'' हे नांव देऊन मोकळे झाले, पण ते नांव मी लावणार कुठं? माझे आणखी एक नांव होतं हे तर काही लोकांना ठाऊक नाही. गयानाथने दिलेलं नांव.'

'गयानाथने नावं दिलंय्?'

'हो. गयानाथनेच मला नांव दिलंय् बाबू, गयानाथ माझ्या आईचा देउनिया, माझा देउनिया, जमिनीचा देउनिया, फॉरेस्टचा देउनिया, तिस्ता नदीचा देउनिया, मताचा देउनिया!' तर अशाच एका निवडणुकीच्या आधी मला म्हणाला, ''हे बघ भाऊ, मतदान करण्यासाठी तुला नांव देतोय् मी.'' तर मी विचारलं, ''काय आहे माझं नावं?' तो म्हणाला, ''फॉरेस्टचंद्र बर्मन. लक्षात ठेव - फॉरेस्टचंद्र बर्मन.'' तर मी लक्षात ठेवलं - फॉरेस्टचंद्र बर्मन. लक्षात ठेवून मत दिलं. गयानाथचं मत. पण त्यानंतर मी एक साहेब पाहिला - पायात गमबूट, डोक्यावर हॅट, एखाद्या सैनिकासारखा फॉरेस्टर साहेब फॉरेस्टमधून चालत होता - जणू एखादा हत्तीच. तर मी माझं नांव बदलून ''फॉरेस्टर'' करून घेतलं. माझं पक्कं नांव नोंदीत आहे फॉरेस्टचंद्र बर्मन. पण मी म्हणतो, फॉरेस्टर चंद्र बर्मन.' आमदार तोपर्यंत बाघारूच्या मागे होता. नीट पहिल्यावर त्याला दिसतं - बाघारूच्या उघड्या पाठीवर आणि मांडीवर नाना जण आहेत - झाडांच्या ढलप्या निघालावर झाडांवर रहातात, तसे.

'मग तुझं नांव संपलं कुठं?'

'तीच तर गोष्ट सांगतोय. मी तर माझं संपूर्ण नांव ठेवलंय् - फॉरेस्टर चंद्र बाघारूबर्मन. बर्मन इथं अनेक सापडतील, फॉरेस्टचंद्रही अनेक दिसतील, रायबर्मनही आहेत. पण फॉरेस्टर चंद्र बाघारूबर्मन हा एकटाच. नांव इतकं लांबलचक झालंय् माझं-'

'पण लोकांनी तर तुझं नांव काटछाट करून टाईट केलंय्!'

'कसं?'

'सगळे तर तुला ''बाघारू'' म्हणूनच हाक मारतात. तूच तुझं नांव लाबलचक

करतोयस्!'

'एऽ एमेलिया बाबू! अरे, बाघारू हे माझं नांव नव्हतं. माणसांनी दिलं-'

'त्याच्याआधी काय होतं?'

'सांगतो ना, फॉरेस्टर चंद्र बर्मन- त्याच्या आधीही होतं एक.'

'त्याच्याआधीही तुझं एक नांव होतं?'

'होतं तर! मी जन्मायच्या आधीही माझं एक नांव होतं.'

'जन्मायच्या आधी?'

'हो, हो, माझी तर आई होती.'

'हो, ती तर असायलाच पाहिजे!'

'तर मी इथल्या चहाच्या मळ्यातल्या लोकांसारखाच एका माणूस. माझी आई नसून कसं चालेल? आई नसती तर आलो असतो कुठून?'

'ते तर बरोबरच आहे. कुठं होती तुझी आई?'

'माझी आईसुद्धा गयानाथचीच होती. त्याच्याकडे काम करी. जेवण करी आणि फॉरेस्टमध्ये जाऊन वाळलेली लाकडं, फांद्या तोडून आणी. आख्ख्या-आख्ख्या फांद्या. आख्खी-आख्खी झाडं. आणून गयानाथच्या खळ्यात ठेवायची. दिवस नाही, रात्र नाही, सतत लाकडं गोळा करीत रहायची. तो लाकडांचा ढीग पहाडासारखा उंच व्हायचा. मग गयानाथ ट्रकमध्ये भरून तो विकून टाकायचा. मी जेव्हा माझ्या आईच्या पोटात होतो, तेव्हा सगळ्यांना समजलं मी येणार, मी येणार-साल्या सगळ्यांनी माझं नांव ठेवलं- ''कुडानियार छोया''-कुऱ्हाडवालीचा पोरगा!'

'तर, हेच तुझं पाहिलं नांव, नाही का?'

'त्याच्या आधी मला नांव असणार कुठून? पण मी आईच्या पोटात मोठा होत होतो आणि पोट मोठं झालं होतं- फाटणार की काय असं, त्याच टायमाला एके दिवशी-' बाघारू वळून आमदारच्या समोर तोंड करून उभा रहातो. 'आईला वेणा सुरू झाल्या. माझा जन्म जवळ आला होता, आणि आई वेदनांनी जमिनीवर या कुशीवरून त्या कुशीवर होत होती-'

बाघारू खालच्या त्याच्या कमरेपर्यंतच्या झुडुपांकडे पहात होता-जणू तिथं त्याची आईच तळमळत होती. स्वत:च्या जन्म पाहीपर्यंत त्याचं तसं पहाणं चालू रहातं. त्याच्यापासून काही हात अंतरावरून आमदार त्या जागेकडे पहात रहातो.

'मी तर बाहेर आलो. आईच्या पोटातून बाहेर आलो.'

पुन्हा त्याला गप्प व्हावं लागतं जमिनीवर आपली श्रान्त आई आणि तिच्या नवजात अर्भकाला पहाण्यासाठी. पहाणं पूर्ण झाल्यावर तो कुजबुजल्या आवाजात म्हणतो, 'मी तर असा रडायला लागलो की झाडावरची पाखरं उडून गेली.' सालाच्या झाडावरून

उडालेले पक्षी पहाण्यासाठी बाघारू डोळे वर उचलून आकाशाकडे पहातो. आमदारही आकाशाकडे पहातो-वाटतं, जणू आकाशातूनच हे वृक्ष, वनस्पती खाली आल्या आहेत. बाघारूला दिसतं, पक्षी आकाशात भराऱ्या मारता हेत. सालाच्या फांद्यावर बसतात, पुन्हा उडतात, भरारी घेतात. त्या पक्ष्यांच्या शिळा ऐकू येताहेत, आणि जमिनीवरून ते बाळाचं रडणं, आसपास रातकिड्यांचा आवाज. एखादी गुप्त गोष्ट सांगावी तसं बाघारू म्हणतो, 'मी रडतोय् अन् पक्षी शीळ घालताहेत, चिवचिवाट करताहेत. पक्षी चिवचिवाट करताहेत आणि मी रडतोय्. पण नाळ कोण कापणार?' बाघारू डोळे वर उचलीत नाही. झाडांच्या तळाशी एका आईशी नाळेने जोडलेलं एक लेकरू अलग होतंय्.

'माझ्या आईजवळ एक छोटी कुऱ्हाड होती - फांदी तोडायला लागते, तेवढी. दिवसभर तर तेच काम करायची ना ती! कुऱ्हाडीला धारही होती चांगली. त्या छोट्या कुऱ्हाडीने नाळ कापली आईने. बस्! कापली.' बाघारू वारंवार आपल्या दंडाकडे आणि छातीकडे पहातो-जणू आत्ताच त्याचा जन्म झालाय्. आत्ताच त्याची नाळ कापलीय्. त्यानंतर जरा हसून तो म्हणतो. 'त्यामुळेच तर सगळे मला म्हणत ''कुडालिया-काटा'' म्हणजे कुऱ्हाडीने (नाळ) कापलेला. बघितलंत ना, जन्माच्या आधीपासून मला नावं होतं- ''कुडालियार छोया, मग ''कुडालिया काटा-''

बाघारू पुन्हा चालत, झुडुपं दूर करीत-करीत बोलू लागतो, 'रावणाच्या जेवढ्या गाई आणि म्हशी होत्या, तेवढ्या गयानाथच्या गोठ्यात. गयानाथचे जसे गाईम्हशींचे गोठे, तसेच माणसांचे गोठे, जमिनीचे गोठे. जणू या पृथ्वीवरची सगळी माणसं गयानाथची नोकर-त्याची आधियार आणि हालुवा, या पृथ्वीवरच्या सगळ्या गाई आणि म्हशी गयानाथच्या स्वत:च्या गोठ्यातल्या गाई आणि म्हशी; तशीच पृथ्वीवरची सगळी जमीन गयानाथच्या मालकीची जमीन. सगळी जंगलं गयानाथच्या मालकीची जंगलं, जंगलांमध्ये जेवढे हत्ती आणि वाघ असतील, ते सगळे गयानाथच्या मालकीचे हत्ती आणि वाघ-

'असाच एक्या दिवशी, मी आपलचांद फॉरेस्टमधून दुपारच्या टायमाला चाललो होतो. कुठून आलो होतो आणि कुठं चाललो होतो ते काही आता आठवत नाही. पण कुठं ना कुठं जात होतो हे नक्की. आपलचांदचं जंगल मला अगदी गयानाथच्या घरासारखंच. इथं त्याची कितीतरी कामं असतात. इथं गयानाथची शेतजमीन आहे. चारण्यासाठी गुरं आहेत. हालुवा आणि गुराखी आहेत. मी सुद्धा आहे. तर आठवत नाही आता-कुठून कुठं चाललो होतो ते. पण अचानक एका सालाच्या झाडाच्या खोडामागून - नाही, जरा क्रमाने सांगायला हवं. माझ्या हातात होती एक लाठी. अशीच एक दीड हात लांबीची काठी-या लाठीपेक्षाही छोटी. मी तर चाललो होतो. एकदा इकडे, एकदा तिकडे अशी गचपणात लाठी चालवित होतो. हे पहा अशी.'

बाघारू उभ्या-उभ्या एकदा उजवीकडे, एकदा डावीकडे वळून नृत्यप्रमाणे स्वत:चं

शरीर डोलावतो. आणि त्या नाचाशी संगती राखून एकदा डावीकडे आणि एकदा उजवीकडे 'अशी, हे पहा अशी' म्हणून हातातली लाठी जंगलातल्या झुडुपांवर मारीत होता. झुडुपांचे शेंडे त्यामुळे तुटून पडत होते. आपण कसे चाललो होतो हे दाखवण्यासाठी तो वेगाने चालतो - जणू पळतोच आहे, असं वाटतं. आमदारापासून बऱ्याच दूर अंतरावरच्या एका झाडामागे तो जातो, त्यानंतर थांबतो. त्यानंतर त्या झाडांच्यामध्ये, दोन पाय फाकवून एखाद्या झाडासारखाच तो सरळ उभा रहातो. क्षणभर तो त्या झाडांपैकीच एक वाटतो. पण दुसऱ्याच क्षणी तो कमरेत वाकून साधारण होत म्हणतो, 'तर, इथून मी असा एका सालाच्या झाडाजवळून जात होतो, तेवढ्यात मागून एक वाघ आला आणि त्याने आपला एक पंजा माझ्या कुल्ल्यावर अन् दुसरा पंजा माझ्या मानेवर ठेवला आणि त्याचं तोंड माझ्या तोंडाजवळ आणलं - बाप रे! काय तो वाघाच्या तोंडाचा वास!' आमदार चालत होता, तो थबकला. बाघारू नाक दाबतो, पुनः पुढच्या क्षणी सरळ होऊन म्हणतो, 'वाघ मला ढकलू पहात होता, खाली पाडू पहात होता, आणि मी दोन्ही पायांवर ठाम उभा रहाण्याचा प्रयत्न करीत होतो. पडलो असतो तर सर्वनाश झाला असता. मागे वळून मी माझी ती दीडहाती लाठी वाघाच्या तोंडात खुपसून त्याला मागे-मागे ढकलू लागलो- कोण कुणाला ढकलू शकतं- वाघ मला की मी वाघाला-' श्वास जणू रोधून बाघारू असा वळतो, की जणू या क्षणी खरोखरच त्याची वाघाशी लढत चालू आहे, आणि आपल्या दोन्ही हातांनी तो वाघाच्या तोंडात घातलेली काठी ढकलतोय, ढकलतोय. फॉरेस्टच्या या अंधुक उजेडात बाघारूची प्रचंड आकृती जणू दुर्गाप्रतिमेतील असुराच्या मूर्तीसारखी वाटते, पण असुराप्रमाणे त्याला पाठ वाकवता येत नाही. दोन्ही हातांवर त्याने शरीराचं सगळं वजन टाकलेलं असतं, 'लाठी जरा ढिली झाली असती तर वाघाने आपले दात माझ्या मानेवर रोवले असते,' आणि दोन्ही पाय तिळमात्र न हलवता, 'मला तर ठाऊक होतं आपलचांद फॉरेस्टची जमीन इथं नरम, कुनतीझऱ्याच्या चिखलामुळे आणि भिजल्या पाचोळ्यामुळे, वाघाला तर काही आपलचांदच्या जमिनीची ही माहिती नव्हती. मला होती. पण माझे पाय थोडे घसरल्यावर मी गुडघे ताठ केले' आणि त्या ताठ पायांच्या दाबाने जणू जमीन कापते, 'वाघ आपलं तोंड इकडं-तिकडं करीत होता,' बाघारू स्वतःचं डोकं उजवी-डावीकडं करून समजावतो, 'पण मला तर काही तसं करता येत नव्हतं, माझ्या गुडघ्यांवर तर इतका जोर पडत होता की ते मोडतील असं वाटत होतं', जणू गुडघ्यांवर जोर पडतोय म्हणून तो कमरेत वाकतो, 'तर, कोण आधी पडणार, मी की वाघ. . . जो आधी पडेल, तो हलणार. मला वाटायला लागलं मी पडणार, माझे गुडघे-उजवा गुडघा जणू मोडल्यासारखा झाला, मी वाघाच्या पोटाला ढुशी दिली, जोरात ढुशी दिली. वाघाने चटकन माझ्या अंगावर ठेवलेले पंजे खाली घेतले, तोंडही खाली घेतलं, लाठी घेतलेले माझे दोन्ही हातही खाली गेले, खाली गेले,' बाघारू कसे ते दाखवतो. 'साला,

माझ्या लक्ष्यात आलं, अरे, वाघाने तर मला सोडून दिलंय-बस्. लक्षात आलं. लगेच सडात् करून मी उडी मारून समोरच्या झाडावर चढून गेलो, चढून गेलो.'

बाघारू उडी मारून झाडाची फांदी धरून झुलत उजवा पाय उचलून फांदीवर ठेवून डावा पाय वर उचलण्याचा अविर्भाव करतो, 'त्यानंतर मी आणखी वर चढत गेलो. एकदम वरती जाऊन खाली पाहिलं,' जरा वाकून, पहाण्याचा आविर्भाव करतो, जणू तळाशी वाघ आहे आणि बाघारू झाडावर बसून हसून बेजार होतोय, त्याचं हसू थांबतच नाही, 'माझी ती दीडहाती लाठी वाघाच्या तोंडात अशी काही गच्च बसली होती, की वाघाला ती तोंडातून बाहेर काढताच येत नव्हती. तो फक्त डोकं इकडंतिकडं हलवीत होता- असं असं,' तोंडात काठी अकडलेल्या वाघाप्रमाणे बाघारू डोकं हलवतो, 'साला मी वरच्या फांदीवरून एखाद्या मोठ्ठ्या वाघासारखी डरकाळी फोडली- गुर्रर्र- साला तो वाघ दातांत अडकलेली काठी घेऊन जे पळाला, जे पळाला, बस, पळालाच!' बाघारू पुन्हा थोडं हसून घेतो.

'बस! वाघ गेला त्याच्या घरी. आणि मी पडलो जलपाइगुडीच्या इस्पितळात- एक दोन महिन्यांसाठी. इकडं माझी शेतीही गेली, नांगरही गेला -' आपण इस्पितळात कस झोपून होतो ते बाघारू दाखवतो. 'तेव्हापासून माझं नाव पडलं बाघारू. वाघा मी हरवलं, सालं माझं नाव पडलं बाघारू. जल्मलेल्या प्रत्येकाचं नांव तर एकॉड (रेकॉर्ड) होतं. वाघाला मी हरवलं त्या जागेचं नांव झालं 'बाघाखोया.' तर, बघा, माझं पूर्ण नांव झालं- कुडानिर छोया, कुडालिया-काटा, बाघारूवा, फॉरेस्टवा, चन्द्र बर्मन.'

बाघारू मागे फिरून आमदाराला रस्ता दाखवीत त्याच्यापुढे चालू लागल्यावर आमदाराला पुन्हा बाघारूच्या पाठीवरचे-कुल्ल्यांवरचे- माड्यांवरचे वाघाच्या पंजामुळे झालेल्या जखमांचे व्रण दिसतात. मान न वळवता बाघारू म्हणतो, 'एमेलियाबाबू!'

'बोला!'

'मला एक छोटंसं नांव तयार करून द्या.'

'तुझं नांव एखाद्या गाण्याच्या ओळीसारखं लांबलचक आहे. मला तर काही गाणी लिहिता येत नाहीत.'

'मला काही गाण्याची ओळ नकोय. ती लांबलचकच असते. मला एक माणसाचं नांव द्या.'

आमदार काहीच उत्तर देत नाही. चालता-चालता बाघारू पुन्हा म्हणतो, 'तुम्ही तर खरे आमदार आहात. बागानिया माणसांना झेंडा देता, वस्तीवरच्या माणसांना जमीन देता आणि मला साधं एक नांव देऊ शकत नाही? हा कुठला न्याय झाला हो, एमेलिया?'

जंगल पार करून आमदार आणि बाघारू बाहेर येतात. इथे सगळीकडे दगडच दगड आहेत. त्यांच्यानंतर नदी- पूल नसलेली.

बाघारू म्हणतो, 'या एमेलियाबाबू, आता नदी पार करायचीय.'

आमदार विचारतो, 'कशी पार करायची?'

बाघारू म्हणतो, 'बसा माझ्या पाठुंगळी.'

आमदार एकदा चारीकडे पहातो. जंगल, दगड, आकाश आणि नदी. बाघारू नदीच्या काठी बसून म्हणतो, 'हं, बसा!'

ब्रीफकेस जमिनीवर ठेवून, चपला काढून त्या डाव्या हातात घेऊन, बाघारूच्या उजव्या खांद्यावरून आमदार पाय टाकतो. डाव्या हाताने डोकं दाबून धरून डावा पायही बाघारूच्या डाव्या खांद्यावरून खाली सोडतो. चपला डाव्या हातातून उजव्या हातात घेऊन, खाली वाकून डाव्या हातात ब्रीफकेस उचलून घेतो. एका हातात ब्रीफकेस आणि एका हातात चपला यांच्यासह तो बाघारूचं डोकं गच्च धरतो. बाघारू विचारतो, 'टाइट बसलात ना?'

'बसलो.'

'उभा राहू?'

'रहा.'

आमदाराला खांद्यावर घेऊन, उभा राहून बाघारूने दोन पावलं टाकताच चपला-ब्रीफकेसनी बाघारूचं डोकं दाबून धरून आमदार ओरडतो. 'पडतेय रे, माझी ब्रीफकेस पडतेय.'

बाघारू मागे येऊन खाली बसतो. आदी चपला जमिनीवर टाकून ब्रीफकेससह आमदार खाली उतरतो, 'अशा पद्धतीने काही मला नदी पार करता यायची नाही!'

'मला गयानाथने सांगितलंय. तुम्हाला पार करवून द्यायला हवं,' बाघारू म्हणतो.

'कसं काय पार करणार? मला पोहोता येतं. पोहत जाऊ? कपडे उतरवून?'

'नको, नको-' बाघारू म्हणतो, 'ओल्या अंगावर परत कपडे कसे काय घालणार? अंग सुकायला वेळ लागेल. माझ्या पाठुंगळी बसा. बसा ना!'

'या चपला? बॅग?'

'माझ्याकडं द्या-' बाघारू एका हातात चपला आणि दुसऱ्या हातात बॅग होतो. पण आमदार बाघारूच्या पाठुंगळी बसू जाता आमदाराचे कुल्ले जमिनीला टेकतात. बाघारू मग जरा उतरणीवर पाठ वाकवून उभा रहातो, आणि आमदार आपले हात मगून त्याच्या गळ्याभोवती घालून त्याच्या पाठुंगळी बसतो, दोन्ही पाय बाघारूच्या कमरेभोवती वेटाळतो.

'ठीक आहे? करू चालायला सुरुवात?'

'हो कर.'

बाघारू चपला आणि बॅग झुगवीत, आमदाराला पाठुंगळी घेऊन पाण्यात उतरताच

आमदार म्हणतो, 'हेऽ बाघारू, शक्य नाही रेऽ'

'का बरं?' बाघारू थांबतो.

'हात निसटताहेत. मला उतरव.' बाघारू पुन्हा नदीच्या काठी, मागे जातो. आमदार त्याच्या पाठीवरून उतरतो. 'स्वतःचं वजन तुमच्या हातांना पेलता येत नाही? मग उभे रहा ना, उभे रहा.'

आमदार सरळ होऊन उभा रहातो.

'चपला आणि बॅग दोन्ही हातांमध्ये टाईट धरा.'

बाघारू दोन्ही हातांनी आमदाराला उतलतो. बाघारूच्या शरीरावर आपला सगळा भार टाकून, चपला व ब्रीफकेससह आमदार बाघारूचा गळा धरतो. धोतर, पंजाबी (शर्ट), चपला, ब्रीफकेस यांच्यासह एक संपूर्ण आमदार जणू विसर्जनासाठी चालवलेली देवमूर्ती- बाघारूच्या खांद्यावर- पाण्याच्या वरती. नदीच्या पाण्यात बाघारूचे गुडघे बुडतात, कंबर बुडते. तेव्हा आमदाराचे कुल्ले आणि चपला-ब्रीफकेस अगदी पाण्याला स्पर्श करण्याच्या बेतात, आणखी दोनेक पावलांनंतर खोल पाणी आहे, तिथं बाघारू पोहायला सुरुवात करील. भारयुक्त होऊन तरंगु लागेल.

पण, आणखी दोन पावलं गेल्यानंतर पाणी कमी व्हायला सुरुवात होईल हे बाघारूला ठाऊक आहे. या नदीचा कुठल्याही झऱ्याशी संबंध नाही, किंवा इथे वरून बर्फ वितळल्यामुळेही पाणी येत नाही, हे बाघारूला ठाऊक आहे.

तसं असलं तरी शेवटी ही नदीच ना! आकाशाशिवाय हिच्यावर कुठलंच आवरण नाही.

ही नदीच असल्यामुळे प्रवाहात आल्याबरोबर त्याचा धक्का बाघारूला जाणवतो.

एखाद्या चालत्या सालवृक्षाप्रमाणे बाघारू नदीच्या मध्यभागी उभा रहातो. त्यानंतर पुन्हा प्रवाह सांभाळून आमदार खांद्यावर पाय ठेवतो.

तिस्तेकाठच्या या वृत्तांताचं आदिपर्व इथं-या नदीच्या मध्यभागी पूर्ण करायला हवं. काही पावलं गेल्याबरोबर पलीकडच्या तिरावर फुलबाडी वस्ती आहे. नदीवर पूल नसला तरीही फुलबाडी वस्ती आणि तिच्या आसापास आणखी इतर वस्त्यांमध्ये, शेतांमध्ये, चहाच्या मळ्यांमध्ये, छोट्या-छोट्या झऱ्यांवर किंवा प्रवाहांवर अनेक ठिकाणी कल्व्हर्टस् आहेत. अधूनमधून नेहमीप्रमाणे दोनेक कल्व्हर्टस् तयार होत असतात. तशाच एका कल्व्हर्टच्या बांधकामाच्या संदर्भात डिपार्टमेंटबरोबर स्थानिक लोकांच्या संघर्षाच्या, गोलमालाच्या संदर्भातच आमदार चालला आहे. त्याचा अर्थ, इंजिनियर, कन्स्ट्रक्टर, ओव्हरसियर, सिमेंटचं मिक्श्चर, लोखंड, वाळू, पर्सेन्टेज, युनियन, शेतकरी-, मजूर, लीडर, ऑफिसर ते आमदार; पुन्हा आमदार ते. . .मीटिंग, मीटिंग- इत्यादी. तिथं तर

पुन्हा एखादं रस्ता नसलेलं फॉरेस्ट किंवा पूल नसलेली नदी मध्ये येत नाही, तोपर्यंत फॉरेस्टर चंद्र बाघारू-बर्मन अवांतर आहे, विसंगत आहे.

पण तो एक दुसराच वृत्तांत आहे.



## बेचाळीस

# आमदार परत आला

क्रान्तिहाटाच्या हाटमैदानावर संध्याकाळ उतरली. रस्त्यावरच्या मिठाईच्या दुकानांमधल्या गॅसबत्त्यांच्या उजेडात मैदानाचा हा किनारा उज्ज्वल दिसत होता. इतर दुकानांमध्येही दिवे पेटले होते. त्यामुळे सुहासच्या व्हरांड्यातून रस्ता, त्यावरची दुकानं प्रकाशमान दिसताहेत. हळूहळू रस्त्याकडेच्या झाडांची खालची पानंही प्रकाशात न्हाऊन निघतात.

सुहासच्या व्हरांड्यातून रस्त्याचा एक भाग दिसत नाही, पण त्यावरचा प्रकाश ल  ात येतो. तो वगळता हाटमैदानाचा बाकीचा भाग अंधारात बुडालेला आहे. संध्याकाळ जितकी गडद होत जाते, तितकंच जमीन आणि आकाशामधलं अंतर वाढतं.

माणसांचं एक दल हाटमैदान पार करून संक्रमण छावणीच्या या खोलीच्या दिशेने येतंय. सुहास व्हरांड्यात बसला होता. इतके लाक एकत्र येताना पाहून सुहासला वाटतं, सर्व्हेच्या संदर्भात काही बोलण्यासाठी ते एकत्र आपल्याकडे येत असावेत. तो मनात ठरवतो, सर्व्हेबद्दल काही बोलायचं असेल तर सर्व्हेच्या वेळी बोलायचं, आणि काही हरकत असेल तर ती लेखी द्यायला हवी असं त्यांना सांगायचं- मग ते सरकारी पक्षाचे लोक असोत वा विरोधी पक्षाचे असोत. कुणाला काहीही चूक काढून टीकाटिप्पणी करता येऊ नये, म्हणून सुहास प्रथमपासून कायदेशीर मार्गानेच वागायचं ठरवतो.

ते दल मैदानाच्या मध्यभागी आल्यावर सुहासला ऐकू येतं- 'आपणाकडे जरा बसायचंय.'

ऐकल्यावरही सुहासच्या लक्षात येत नाही. खुर्चीवरून उठून तो पायऱ्यांच्या दिशेने थोडा पुढे जातो. कोण आहे, हे अंधारात तोवर नीटसं ओळखता येत नाही. त्यानंतर अचानक चालण्याच्या पद्धतीवरून लक्षात येतं, आमदार.

प्रियनाथ आधीच खोलीबाहेर येऊन उभा होता. तो आता कंदील आणून दरवाजाबाहेर ठेवतो. पायऱ्या चढून वर येत-येत आमदार म्हणतो, 'आपणाकडं जरा बसायचंय.'

'या, या!' म्हणून सुहासने प्रियनाथकडे पाहिल्याबरोबर प्रियनाथ आतून एक खुर्ची बाहेर आणतो. तोवर आमदार व्हरांड्यात येऊन दरवाजासमोर उभा राहून बोलतोय.

आमदार खुर्चीत बसतो, आणि आपली ब्रीफकेस शेजारी जमिनीवर ठेवतो. बसल्याबरोबर आमदाराच्या उजवीकडे पायऱ्या, डावीकडे खोलीचा दरवाजा, समोर व्हरांडा आणि त्यासमोर मैदान. नक्की कुठं बसल्यावर सगळ्या गोष्टी आपल्या समोर

येतील हे आमदार जणू सरावानेच ठरवू शकतो.

सुहास प्रियनाथला म्हणतो, 'जरा चहा आणता येईल का, प्रियनाथबाबू?' तो पैसे आणण्यासाठी आपल्या खोलीकडे जातो. प्रियनाथ त्याच्या मागे-मागे जाऊन दरवाजाजवळ त्याला म्हणतो, 'सर, स्टोव्ह पेटवून करून देऊ सर? आपला स्वैपाकही करायचाय'

'ज्योत्स्नाबाबू-विनोदबाबू कुठं आहेत- ठाऊक आहे?'

'जवळपासच कुठंतरी असतील, सर. येतीलच एवढ्यात. अनाथ जरा कांठालगुडी फाट्यावर गेलाय. त्याच्या गावची काही माणसं तिथे रहाताहेत.'

'अच्छा करा चहा!'

'आपण घेणार ना सर?'

'द्या एक कप', सुहास काहीतरी विचार करतो, प्रियनाथ जाण्यासाठी वळल्यावर म्हणतो, 'एवढ्यात स्वैपाक करू नका, ते आले आहेत-'

प्रियनाथ थोडा चकित होऊन विचारतो, 'का बरं सर?'

'ते कशासाठी आले आहेत ते काही समजत नाहीय् ना, माझ्याशीच काही काम असलं तर-'

प्रियनाथ थोडं हसून म्हणतो, 'सर, मग तर आपलं जेवण - झोप कधीच होणार नाही, हे तर चालूच रहाणार.'

प्रियनाथच्या हसण्यावर अनुभवाची एवढी छाप होती, की त्याचं म्हणणं सुहासला मान्य करावं लागतं.

प्रियनाथ परत जातो.

कसं काय तयार व्हावं हे सुहासच्या नक्की लक्षात येत नाही. कदाचित आमदार त्याच्याकडे काही कागदपत्रं देऊन जाईल. सुहास ती ठेवून देईल. त्यानंतर सुहास विचार करतो, तो पावतीही देईल. त्या कागदपत्रांची एक वेगळी फाईल करील. पण इथं तर आणखी इतर कुणी ऑफिसर नाही. तो स्वतःच फाईल ठेवील. जर उत्तर द्यायचं असेल, तर उत्तरही देईल. अशा प्रकारच्या नियम-कायद्यांच्या बेड्यांशिवाय आपण स्वतःला वाचवू शकणार नाही, हे जणू सुहास समजू शकतो. सुहास परततो. प्रियनाथने ठेवलेल्या कंदिलाच्या लाल प्रकाशात जमीन चकचक करतेय. आमदाराच्या खुर्चीच्या पायांवर आणि आमदाराने डाव्या पायावर ठेवलेल्या उजव्या पायाच्या बोटांवर प्रकाश पडतोय. आमदार पाय हलवीत असल्याने व्हरांड्याच्या सीलिंगवर कंदिलाच्या उजेडाने सावली पडतेय आणि प्रकाश होतोय. आमदाराच्या चेहेऱ्याची सावली भिंतीच्या एका कोपऱ्याला थोडा स्पर्श करून बाहेर गेलीय.

## त्रेचाळीस

# जमिनीचा बांध आणि ॲसेंब्लीत डोकं धरणं

आमदार सुहासला विचारतो, 'तुमच्याशी कुणाची वादावादी झाली नाही ना?'

सुहास थोडा दूरच उभा होता. खुर्ची घेऊन तो आमदाराशेजारी बसत नाही. त्याची खुर्ची जिथं होती, तीथेही जात नाही. आपली खुर्ची आणि आमदाराची खुर्ची यांच्यामध्ये, आत्मविश्वासाच्या अविर्भावात उभा रहातो. आमदार त्याच्याकडेच काही काम घेऊन आला असेल, तर तसं आमदाराने आधी सांगावं. आमदाराच्या प्रश्नावर सुहास हसून म्हणतो, 'नाही,' त्यानंतर आणखी काहीतरी बोलायला हवं असं त्याच्या लक्षात येतं.' 'आता माझ्याशी कुणाची काय वादावादी होणार?'

आमदार जरा जोराने हसतात, 'असं तुम्हाला वाटतंय होय? तुमच्याशीच तर वादावादी होणार!'

'का बरं? माझ्याशी कोण कशाला वाद घालणार? जसं दिसेल, त्याप्रमाणे मी नकाशा काढणार- इथं बांध, इथं रस्ता, इथं झाड.'

'या सगळ्या बांधांच्या, झाडांच्या खुणा करता कशाला?' हसत-हसतच आमदार विचारतो.

'आहेत, म्हणून देणार.'

'हंऽ, हीच तर मजा आहे! असं जर नसेल, तर कुणीतरी म्हणू शकतं की या जागेवर झाड नाही.'

'झाड नसेल, तर नाही म्हणणार.'

'नाही, तसं नाही हो, ज्याच्या जमिनीची सीमा समजा या झाडापर्यंत आहे, तो तर म्हणेल इथं झाड नसावं.'

'का बरं?'

'म्हणजे त्याला म्हणता येईल झाड नाही म्हणजे माझ्या जमिनीलाही सीमा नाही.'

सुहास हसतो, 'तसं म्हणू शकतो खरं!'

आणखी खाजगी आवाजात आमदार म्हणतो, 'तर तो माणूस तुमच्याकडे येऊन म्हणेल की नकाशावर झाड दाखवू नका.'

सुहास आणखी हसून म्हणतो, 'हो, तसं म्हणू शकेल!'

तेव्हा आमदार हसून म्हणतो, 'एक बिघा जमिनीवरून अगदी खुनाखुनी होते, हे पाहिलं नाहीत? आणि आपण तर या सगळ्या जमिनीच्या सीमा ठरवता आहात-'

सुहास हसत-हसत आमदाराकडे पहात रहातो. आमदार थोडावेळ शांत राहून

म्हणतो, 'वादावादी तर आपल्याशीच होणार, खूप वादावादी!'

आमदाराचं बोलणं खाजगी सुरात होतं. कारण ते बोलणं खरोखरच खाजगी स्वरूपाचं होतं. या खाजगी बोलण्यातून आमदार आपल्याला समर्थनच तर देत नाही ना? असा विचार सुहासच्या मनात येतो. त्याबरोबर तो सावध होतो- या समर्थनाच्या बदल्यात बहुधा जाण्याआधी आमदार त्याला एखादं व्यक्तिगत आणि पक्षाचं काम करायला सांगेल. खरंच सुहासला समजत नाही आमदार त्याच्याच व्हरांड्यात येऊन बसलाय, ते कशासाठी? ते समजेपर्यंत सुहासला चैन पडणार नाही.

प्रियनाथ काचेच्या ग्लासांत चहा आणून देतो. त्यानंतर, एकदा आमदाराकडे आणि एकदा सुहासकडे पाहून विचारतो, 'एक बिस्कीट देऊ?'

'छा. एक बिस्किट द्या,' आमदार डाव्या हातात चहाचा ग्लास घेऊन उजवा हात पुढं करतो. प्रियनाथ बिस्कीट आणायला जातो. सुहास अगत्याने विचारतो, 'आपल्याला काही खायला आणून देऊ?'

'अरे नको, नको-' प्रियनाथने बिस्कीट आणून दिल्यावर आमदार ते ग्लासातल्या चहात नरम करून खातो. सुहास बिस्कीट घेत नाही. चहाचा घोट घेऊन आमदार विचारतो, 'आपण तर प्रथमच या कामासाठी आलात, नाही का?'

याचं उत्तर देऊनही तो माणूस आपल्याला आवडतोय, की आवडत नाहीय हे सुहासला नक्की समजत नाही. त्या इसमाची (आमदाराची) भाषा अशी- राजवंशी भाषेत चलित बंगाली भाषा तो सहज मिसळतो. बोलता-बोलता, बोलता-बोलता त्याची स्वतःची हीच भाषा तयार झाली आहे. त्या भाषेतच तो सगळ्यांशी, सगळ्या ठिकाणी बोलू शकतो- कलकत्त्यात, आपल्या पक्षात, आणि त्याच्या मतदारासंघातल्या सगळ्या खेड्यांमध्येही. त्या माणसाचं बोलणं ऐकूनच तो बराच कामाचा माणूस वाटतो. आणि खुर्चीत तर तो एकदम एखाद्या शेठजीच्या ऐटीत बसलाय-पायावर पाय टाकून. चहाचा घोट घेऊन आमदार पुढे म्हणतो, 'गावातल्या जमिनीवर तर ताबा हाच कायदा असतो. ज्याचा ताबा त्याची जमीन. समजा आपण जर माझ्या जमिनीवर एक रेघ ओढून ती दुसऱ्या कुणाच्या जमिनीत घातलीत, तर मी दुसऱ्या दिवशी लाठीवाल्यासंहित येऊन त्या जमिनीचा ताबा घेईन- बस-!' बोलणं संपवून आमदार म्हणता, 'तर तुमच्याशी कुणाची वादावादी होत नाही म्हणता? अहो, दररोज वादावादी होणार तुमच्या या मापामापीवरून! तरी आपण तर कडक ऑफिसर आहात. जोतदारांच्या घरी जेवणार नाही, असं सांगून ठेवलंय तुम्ही. जोतदारांना भीती वाटतेय,' आमदार आता खूप जोरजोराने हसतो.

सुहास जणू स्वतःची मर्यादा समजावण्यासाठी म्हणतो, 'आम्ही तर काही प्रॉपर्टी-राइट म्हणजे मालमत्ता कुणाची हे ठरवीत नाही. ते सगळं सिव्हिल कोर्टाचं काम.'

'प्रॉपर्टी राइट म्हणजे तर आपला गयानाथ जोतदार, फॉरेस्ट डिपार्टमेंट आणि

आनंदपूर चहा-मळ्याचा प्रश्न आहे. इतर सगळ्यांचा राईट म्हणजे एका वर्षाची शेती-एका वर्षाचं पीक-बस! कोर्टात जायची आमच्या सगळ्या माणसांना भीती वाटते. तिथं समजा गावातल्या मातब्बर असामी, किंवा पक्षाचे नेते, किंवा आपणासारखे ऑफिसर जो हुकूम देतो, तो सगळे मान्य करतात. किमान तो मानाचा असं त्यांना वाटतं. साधारण माणसाच्या दृष्टीने तर सरकार म्हणजेच सरकारी ऑफिसर-समजा डी.सी.ओ., जे.एल.आर.ओ., ठाण्यावरचा दारोगा आणि आपणासारखे इतर सगळे ऑफिसर. ऑफिसर चांगला नसला तर सरकार बदलतं. संतालडीचा मामलाच पहाना! सगळे इंजिनियरलोक मिळून त्रास देतात.'

सुहासला चटकन जाणवतं, हा माणूस इथला आमदार आहे खरा, पण खरोखरच त्याच्यामागे काहीतरी अनुभव आहे, त्याच्या दृष्टीतून कधीही सामान्य लोक नजरेआड होत नाहीत. आणि म्हणूनच इतका वेळ त्याच्या बोलण्यात सुहासला एवढी घनिष्ठता वाटली होती. त्याच कारणामुळे हा माणूस सुहासजवळ येऊन बसला की काय? सुहासही इथला माणूस नाही, म्हणून त्याच्याशी इथल्या अनुभवांसंबंधीच्या गोष्टींचं आदानप्रदान होऊ शकतं.

सुहास विचारतो, 'आपल्याला तर ॲसेंब्लीत नक्कीच अनेकदा बोलावं लागत असेल.'

'लोकल मामला असेल तर अधूनमधून बोलावं लागतं, आणि एकदोनदा प्रश्न विचारावे लागतात. आमचे इतर सगळे कॉम्रेडलोक आहेत, तेच बोलतात.'

माणूस बोलताना थांबल्यावर सुहास विचारतो, 'आपल्याला ॲसेंब्ली चांगली वाटते?' आमदार गप्प होतो. या प्रश्नाचं उत्तर द्यावं की देऊ नये येतं. की आमदार उत्तराचाच विचार करतोय? असा प्रश्न आधी आमदाराला कधी पडलाही नसेल. किंवा काय बोलावं आणि काय बोलू नये याचा हिशेब त्याच्या मनात चाललाय?

आमदार आवाज न करता थोडं हसतो, 'आपण खूप जबर प्रश्न विचारलात,' पुन्हा थोडं गप्प राहून म्हणतो, 'एक तर खरं-खरं उत्तर देईन, नाहीतर गप्प राहीन,' आणखी थोडं गप्प राहून म्हणतो, 'आपण हा प्रश्न का विचारलात हे मीसुद्धा आपणास विचारू शकतो. पण आपण हे का विचारताहात ते मला ठाऊक आहे, मी बरोबर उत्तरही देईन.'

थोडा वेळ घेऊन आमदार म्हणतो, 'पहिल्यापासूनच सांगतो. खूप झोप येते.'

सुहास हसतो, 'मी तर तेच ऐकतो, ॲसेंब्लीत झोप खूप चांगली होते.'

'हो एअर-कंडिशनिंग असतं ना! आणि कलकत्त्यात काय उकाडा असतो! घामाघूम होऊन ॲसेंब्लीत गेल्यावर इतकं गारेगार वाटतं — चटकन झोपून जावं असं वाटतं. आधी-आधी तर डोळे उघडे ठेवायलाच खूप त्रास व्हायचा. ॲसेंबलीत गेलो की हमखास झोप यायची. नंतर मग मी भाताऐवजी पोळ्या खायला सुरुवात केली.

'ॲसेंब्लीसाठी आहार बदललात?'

'न बदलून करतो काय? आपण तर ढीगभर भात खातो. इतका भात खाऊन ॲसेंब्लीच्या हॉलमध्ये प्रवेश केल्याबरोबर मरणाची झोप येते. आता जरा कमी झालीय. मनात आणलं तरी झोपू शकतो, मनात आणलं तर जागा राहू शकतो. पण डोकं धरण्याचा त्रास मात्र अजूनही गेलेला नाही.'

'डोकं धरतं?'

'हो.'

'भाषणांमुळे?'

'नाही. एअर-कंडिशनिंगमुळे. हॉलमधून बाहेर आल्याबरोबर डोकं धरल्यासारखं वाटतं, अंग गळाल्यासारखं वाटतं आणि छाती थंड वाटते.'

'असं असेल तर मन तिथं जाता कशाला? आपणाला तर काही इतकी मोठमोठी भाषणं द्यावी लागत नाहीत, फार बोलावंही लागत नाही.'

'मला बोलावं लागत नाही, पण आमचे सगले प्रोफेसर कॉम्रेडस् आहे, वकील कॉम्रेडस् आहे. ते चांगलं बोलातात. युनियनचे नेतेही चांगलं बोलतात. त्यांना मी सगळे पॉईंटस् देतो. काय केस आहे ते सांगतो. कोर्टासारखंच अन काय!'

'कोर्टासारखं?'

'हो. तुम्हाला-मला काय कोर्टात जाऊन सवाल करता येतात? त्यासाठी वकील-मुख्तार लागतात. त्यांना कोर्टाचे सगळे कायदे ठाऊक असतात, रिवाज ठाऊक असतात. तसेच ॲसेंब्लीचेही सगळे नियम असतात. कधी कुणी बोलायचं, कुठला मामला मांडायचा, कसं बोललं म्हणजे ते ठीक वाटेल- हे सगळं ज्यांना ठाऊक असतं तेच ॲसेंब्लीत बोलतात.'

'आपणसुद्धा वकील आहात की. मेंबर-'

'ज्यूनियर, ज्यूनियर!' म्हणून आमदार होः हो करून हसतो आणि पुढं म्हणतो, 'आपण माझ्या मतदारासंघातले मतदार नसल्याने मी हे सगळं सांगून टाकलं. माझ्या मतदारांना तर मी सांगतो की मी गेलो नाही तर ॲसेंब्लीचं कामकाजच थांबतं-' आमदार आणखी हासतो. सुहासही त्याच्याबरोबर हसतो, आणि विचारतो, 'मग जाता कशाला तिथं?'

'हे तुम्ही म्हणताय काय?' हसणं कमी करीत-करीत आमदार म्हणतो, 'पार्टी आहे म्हणजे अधिकार पाहिजे, सत्ता पाहिजे. ॲसेंब्लीत ज्या पक्षाच्या सदस्यांचं बहुमत असतं तो पक्ष सत्तेवर येतो. आम्हीही सत्तेवर आहोत. पक्षात असणार पण सत्ता उपभोगणार नाही हे कसं होणार? लग्न करायचं पण बायकोबरोबर झोपायचं नाही असं कसं होणार? ते फक्त हिजडेच करणार.' आमदार प्रचंड हसतो. सुहासला एखाद्या पराजिताप्रमाणे स्मित करावं लागतं.

## चव्वेचाळीस

# आमदाराचं चहापान

आमदाराबरोबर जी माणसं आली होती, त्यांच्यापैकी काहीजण चहाच्या दुकानाकडे गेली आहेत आणि काही पायऱ्यांवर टेकून बसली आहेत. प्रियनाथच्या कंदिलावर इतकी काजळी जमलेली आहे, की त्या कंदिलाशिवाय त्या प्रकाशात काहीच दिसत नाही. पण क्रान्ति हाटासारख्या ठिकाणी एका आख्ख्या आमदाराने अशा अंधारात एका व्हरांड्यात बसून रहावं- ही तर काही सामान्य घटना नाही. पण आमदार आज दुपारीच सर्व्हे कँप पाहून, तिथं सगळ्यांसमोर एक भाषण देऊन, क्रान्तिहाट, आपलचांद फॉरेस्टमार्गे फुलबाडी बस्तीवर गेला होता. पुन्हा संध्याकाळी परत आलाय. त्याच्याबरोबर फुलबाडीची माणसं आहेत. अर्थात आमदाराबरोबर नेहमीच माणसं असतात. पण दुपारी क्रान्तिहाटातून जाऊन पुन्हा संध्याकाळी क्रान्तिहाटाला परत येणं हा काही साधारण मामला नाही. आमदारलोक सतत आडवेतिडवे फिरत असतात. इकडून घुसून तिकडून बाहेर येतात. वीरेनबाबू आमदार फुलबाडीहून मानाबाडी-ओदलाबाडी मार्गे आल्यावर 'टूर' मध्ये तो ही जागासुद्धा पाहून गेला असता, लोकांशी त्याचं बोलणं झालं असतं. ते न करता तो परत आलाय हे आक्रीतच. येऊन पुन्हा व्हरांड्यात का बसलाय? आमदार कधीच एका जागेवर बसून रहात नाही- मीटिंग वगळता. आमदार सतत फिरतच असतात- पायी, किंवा गाडीने, किंवा विमानाने, किंवा ट्रेनने. मिटींगव्यतिरिक्त आमदार एकटा-एकटा बसून आहे. घटनाही त्याने बसून रहाण्याइतक्याच महत्वाची असणार.

अशा प्रकारची एक घटना क्रांतिहाटातच घडेल, आज संध्याकाळी-यासाठी कुणीच तयार नव्हतं. आमदाराने कुणालाच कळवलेलं नाही. जातानाही 'परत येईन' असं सांगितलेलं नव्हतं. सरळ येऊन संक्रमण छावणीत व्हरांड्यात बसलाय, आणि इथल्या लोकांना ही बातमी समजतेय आमदाराबरोबर फुलबाडी बस्तीतून आलेल्या लोकांपैकी जे चहाच्या दुकानाजवळ चहा घेताहेत, त्यांच्याकडून. हाटवाराव्यतिरिक्त क्रान्तिहाटातल्या या चहाच्या दुकानात इतकी सारी अनोळखी चेहेऱ्यांची माणसं एकत्र बसून चहा घेताहेत म्हटल्यावर त्यांच्या गप्पांकडे लोक लक्ष देणारच- आणि त्यातूनच आमदाराबद्दलही ही खबर लोकांना समजते. तेव्हां थेट त्यांनाच काहीजण विचारतात- का आलात, कुठं आहे आमदार, काय प्रकार आहे. . . फुलबाडीच्या फुलझऱ्यावर जो कल्व्हर्ट तयार होत होता, त्याच्यासंदर्भातच काहीतरी गोंधळ आहे. आमदाराने म्हणे रेलिंगला एक लाथ मारली आणि रेलिंग मोडून पडलं. इंजिनियरला धरून इथं घेऊन येणार आहेत.

जे दुकानांत बसलेले होते, ते तर हाटकमिटीच्या खोलीकडे, आता संक्रमण छावणीकडे येण्यासाठी निघतातय, आमदाराच्या पार्टीची लोकांना बातमी देण्यासाठीही

काहीजण धावत निघतात, आणि कुणीकुणी आपापल्या देउनियाला सांगण्यासाठी जातात. गेरूच्या रंगाचा शर्ट घातलेला माणूस पायऱ्या चढून येऊन विचारतो, 'इथं कधी येऊन बसलात?'

'आत्ताच तर आलोय.'

'फुलबाडीहून?'

'हो.'

'तिथं काय लाथ मारून ब्रिज पाडलात म्हणे?'

'नाही, नाही' म्हणून आमदार हासतो.

'तर मग चला बरं, घरी चला, हात-तोंड धुवा, मग परत येऊन बसा, इथं काय मीटिंग ठेवलीत की काय आज?'

'नाही, नाही; मीटिंग कशासाठी ठेवीन?'

'कुणीतरी म्हणालं की मालबाजारहून इंजिनियर येणार आहे-'

'येणार आहे. मला जरा बोलायचंय त्याच्याशी!

रस्त्यावरून एक दल मैदानात उतरतं. त्या दलामागे खूप प्रखर प्रकाश झुलवीत कुणीतरी येतंय. जरा नजरेला सवय झाल्यावर, कळतं, ती गॅसबत्ती आहे. मैदानातल्या लोकांच्या उंच उंच सावल्या व्हरांड्यात आणि खोलीच्या भिंतीवर हळूहळू वर येऊ लागतात. ते सारे लोक, आणि त्यांच्यामागून एकजण एका थाळीत काही कप चहा आणि एका डिशमध्ये मिठाई आणि सामोसे घेऊन येतो, उभा रहातो. गॅसबत्तीवाला मागून पुढे येतो, आणि त्याने गॅसबत्ती व्हरांड्यात ठेवल्यावर लोकांच्या सावल्या व्हरांड्यातून मैदानावर पसरतात. गॅसबत्तीजवळच चहा-मिठाईची थाळी उतरवून ठेवून उघड्या अंगाचा तो मुलगा म्हणतो, 'त्या दुकानातून पाठवलंय, हे -'

तो गेरूच्या रंगाचा शर्ट घातलेला गृहस्थ दरम्यान व्हरांड्यात येऊन, मिठाईची डिश आमदारासमोर धरून म्हणतो, 'घ्या, घ्या ना!' एक सामोसा उचलता-उचलता आमदार सुहासकडे बोट दाखवून म्हणतो, 'साहेबांना द्या.'

तो गृहस्थ थाळी सुहाससमोर नेतो. सुहास मिठाईचा एका छोटा तुकडा उचलतो. तो गृहस्थ थाळी पुन्हा आमदारासमोर धरून म्हणतो, 'तुम्ही खा ना वीरेन! रात्री इथंच रहाणार की काय?'

'अरे नाही, मला उद्या जलपाइगुडीला जायचंय, मीटिंग आहे,' असं म्हणून, एक मिठाई घेऊन ती तोंडात टाकून, हात धोतराला पुशीत आमदार म्हणतो, 'आता काही मी खाणार नाही बरं का,' त्यानंतर, मिठाई गिळून झाल्यावर म्हणतो, 'अरे चहा-बिहा कुठंय?'

गेरूच्या रंगाचा शर्ट घातलेला गृहस्थ मिठाईच्या डिशमधून मिठाईचा एक तुकडा

तोडीत म्हणतो, 'देतो, जरा थांबा', त्यानंतर ताबडतोब येऊन त्या थाळीवर डिश ठेवतो, थाळीत ठेवलेल्या पाण्याच्या भांड्यातून पाणी घेऊन बोटं धुतो, आणि एक कप उचलून आमदाराला देतो. आमदार चहाचा घोट घेतल्याबरोबर म्हणतो, 'एऽहे, हा तर गार होऊन गेलाय-' म्हणून एका घोटात चहा संपवतो.

सुहास जरा बाजूला आपल्या खोलीकडे गेला होता. चहाचा पहिला घोट घेतल्यानंतरचे उद्‌गार ऐकल्यानंतर जणू त्या दोघांमध्ये नागरी अनुभवाचं आदानप्रदान होतं. तो आमदाराला विचारतो, 'काय, चहा घेणार का आणखी एक कप?'

सुहासच्या प्रश्नावर एक इंगित होतं-तो चहा इथं करण्याबद्दल बोलतोय्, दुकानातून मागवण्याबद्दल नाही.

'आपण घेणार असाल तर मीही घेईन' म्हणून आमदार हसतो.

सुहास प्रियनाथच्या खोलीत डोकावतो. प्रियनाथ तेव्हा स्वैपाकाच्या तयारीत असतो, 'प्रियनाथबाबू, आपल्या हातचा चहा तर आम्हाला आवडला बघा!'

'बसा सर, मी देतो करून,' प्रियनाथ भाजी चिरता-चिरता म्हणतो.

'आपण एकटेच स्वैपाक करता-?'

'ते सगळे येतील सर. हे तर माझं ठीकच झालं सर-'

सुहास बाहेर येऊन आपल्या खोलीसमोरच्या खुर्चीत बसतो.

याचा अर्थ, या आमदाराच्या अभिरुची-स्वभावाला कलकत्याचा गुण लागला म्हणायचा! या भागातल्या माणसाच्या सवयींमध्ये सिव्हिक सेन्स आला? कलकत्ता आणि शहरीपणाच्या त्या ओढीनेच हा माणूस एकाच अनुभवाच्या आदान-प्रदानाच्या लोभाने फुलवाडी बस्तीहून येऊन सुहासकडे बसलाय की काय?

मनात हे प्रश्न घेऊन सुहास जरा दुरूनच आमदाराकडे पहातो. आमदार तेव्हा पाय नाचवीत-नाचवीत हासत हासत मैदानामध्ये आणि मागे पायऱ्यांवर उभ्या लोकांसंगे मिसळून जातो.

## पंचेचाळीस

# आमदार आणि गयानाथ

प्रकाश टाकीत रस्त्यावर एक गाडी येऊन थांबते. आवाजावरून समजतं-मोटारसायकल. मोटारसायकल धावताना जेवढा आवाज करते, त्यापेक्षा ती थांबल्यावर अधिक आवाज होतो. तीन-चार वेळा गचके खाऊन मोटारसायकल पुन्हा चालू लागते. आस्ते-आस्ते चालत असल्याने हँडल हलंत आणि उजेड जंगलावर आणि उडवीकडच्या

घरांवर फिरतो-जणू काहीतरी शोधाशोध चाललीय् असं वाटतं. प्रकाश मैदानावर थोडा येतो, पुन्हा वळतो. मोटार-सायकलचा आवाजही कमीजास्त होतो. त्यानंतर लगेच मोटारसायकलचा उजेड येतो. हेडलाईटचा प्रकाश व्हरांड्याला पार करून, गॅसबत्तीच्या प्रकाशावर मात करीत खोलीमध्ये पडतो. पण मोटारसायकल अचानक थांबते. आवाज वाढतो, प्रकाश वाढतो पण मोटारसायकल आणखी पुढे येत नाही. पायरीवरून कुणीतरी म्हणतं, 'रुतली वाटतं!' आमदार म्हणतो, 'बघा बरं कोण आहे ते? ढकलत आणा गाडी!' दोनजण उड्या मारून खाली उतरतात आणि मोटरसायकलच्या प्रकाशाच्या दिशेने धावू लागतात- 'बैलोबाची गाडी चिखलात रुतलीय्. ढकला जरा!' प्रकाश थोडा आवाज वाढवून विझतो.

तेव्हा व्हरांड्यातल्या गॅसबत्तीच्या उजेडात दिसतं, की एकजण मोटारसायकलवर बसलाय, आणि दुसरा एक बुटकासा माणूस समोर उभा राहून आरडाओरडा करतोय्. गयानाथ जोतदाराला ओळखायला-प्रकाशाची गरज नव्हती, त्याच्या आवाजच पुरेसा होता. पायऱ्यांवरून कुणीतरी म्हणतं, 'बस्, फटफटी जोतदार आला!'

याचा अर्थ, आता या गर्दीत फक्त फुलबाडी वस्तीवरचेच लोक नाहीत, तर ज्यांनी गयानाथला सकाळी फटफटीवर बसून सर्व्हेच्या ठिकाणी येताना पाहिलंय्, असे इथलेही काही लोक आहेत. गयानाथचं हे नामकरण याच्याआधी कधी झालं नव्हतं. जावयाच्या फटफटीवर तो डबलसीट साधारणतः बसत नाही, अगदी जलपाईगुडीला जाण्यासाठी बस धरण्यासाठीसुद्धा नाही. पण सकाळी सर्व्हे पार्टी पोचलेली पाहून त्याला डबलसीट यावं लागलं. आणि आता संध्याकाळी असिन्दिरनेच जाऊन त्याला खबर दिली की, आमदार पुन्हा येऊन बसलाय्. एकाच दिवशी दोन-दोनवेळा फटफटीवर बसून त्याच लोकांमध्ये आल्यावर एक नामकरण होतंच. पण हे नामकरण टिकणार की नाही हे फटफटीसंदर्भात गयानाथच्या पुढील वागणुकीवर अवलंबून राहील.

गयानाथ तेव्हा एका हातात धोतराचा सोगा धरून, दुसरा हात नाचवीत असिन्दिरची हजेरी घेत होता-'साल्या, फटफटी घालीन तुझ्या गांडीत! कशाला आणलीस रे या मैदानात? तुला म्हणत होतो ना मी, मला रस्त्यावर उतरवून दे, रस्त्यावर उतरवून दे म्हणून? मैदानात तुझ्या जोरूवा (जारज) बापाने हायवे बांधलाय होय रे ढेमन्या? ''नाही, चला ना, चला ना!'' आता जातो तुझ्या सासुरवाडीला! साला डांगुवा (प्रौढ विधवेचा तरुण मैतर), ढेमना!' पायऱ्यांवर आणि मैदानात बसलेले आणि उभे असलेले लोक यावर टाळ्या वाजवतात.

आमदार ओरडून हाक मारतो, 'अहोऽ गयानाथकाका, या इकडं या! ते लोक ढकलतील गाडी! या!'

त्या हाकेमुळे गयानाथ इकडं यायला सुरुवात करतो, खरा पण दोन पावलं

चालल्याबरोबर मागं वळून पुन्हा चित्कारतो, 'साला ढेमना!' त्यानंतर लगबगीने पुढं येऊ लागतो, जणू ही शिवी देणंच बाकी राहिलं होतं. गयानाथ जवळ आल्याबरोबर कुणीतरी म्हणतं, 'आख्खी फटफटी जाण्याइतकी असिन्दिरची गांड मोठी आहे का हो काका?'

गयानाथ तिकडं पाहून पुन्हा चित्कारतो, 'तुझ्या बापाच्या गांडीत जाईल-'

आमदार ओरडून म्हणतो, 'अहो काका, असे काय आपल्या जावयाला वाकडं-तिकडं बोलताय्?'

गयानाथने तेव्हा पायरीवर पाय ठेवला होता. तो चित्कारतो, 'कोण म्हणतो तो डांगुवा माझा जावई आहे म्हणून? मी त्याला तलाक दिलाय!'

मागे पुन्हा टाळ्यांसहीत चित्कार उठतात. आमदार हो: हो: करून हसतो. तेवढ्यात मोटरसायकलचा दिवा गर्जनेसहित लागतो आणि हूऽस करीत फटफटी व्हरांड्यासमोर येतं. आवाज दोनचार वेळा कमी जास्त करून, हो: हो: करून हसून फटफटी वळवून असिन्दिर रस्त्याच्या दिशेने निघून जातो. असिन्दिरच्या रागाने तरातरा चालत गयानाथ व्हरांड्यात चढून आला होता. आपल्याला इथं बसायला किंवा उभं रहायला जागा नाही हे त्याच्या लक्षात येतं. तो समोरच्या ऑफिसच्या खोलीतही जाऊ शकत नाही आणि जमिनीवरही बसू शकत नाही. बसू शकतो, पण इतर कुणी तसं बसलेलं नाही. त्यापेक्षा मैदानात किंवा रस्त्यावर फिरणंच बरं होतं-आमदाराला एकदा तोंड दाखवून. पण आमदार परत येऊन या संक्रमण छावणीतच कशासाठी बसलाय्, हे गयानाथला ठाऊक असणं आवश्यक होतं. तेव्हा गयानाथला बाघारूची आठवण होते. बाघारू कुठं दिसतो की नाही हे तो एकदा पहातो. असता, तर त्याच्याकडून फुलबाडी बस्तीवर काय झालं याची माहिती काढता आली असती. पण बाघारू कुठंच दिसत नाही. बाघारूची आठवण झाल्याबरोबर गयानाथला वाटतं, की आमदाराला त्याची फुलबाडी यात्रा कशी झाली हे विचारण्याचा आपला हक्कच आहे, कारण आपलाच माणूस नदी पार करून देण्यासाठी त्याच्याबरोबर होता. गयानाथ उभ्या-उभ्याच विचारतो, 'काही गैरसोय तर नाही झाली ना तुमची?'

'का बरं? कसली गैरसोय?' आमदार विचारतो.

'हेच, फुलबाडीला गेलात, पुन्हा परत आलात?'

'त्यात कसली गैरसोय? त्या इंजिनियरला बोलावणं पाठवलंय्. इथंच बसायची सोय आहे, म्हणून बसलोय्.'

'त्याने नीट नदीपार सोडलं ना?'

'कुणी?'

'अहो, तो बैल हो, तुमच्याबरोबर फुलवाडीला आलेला!'

'हो: हो:!, आमदाराला आठवतं, 'बाघारू. बाघारूच ना?' आमदार आठवायचा प्रयत्न करतो.

गयानाथ विचारतो, 'हो: हो: बाघारू. तो परत नाही आला तुमच्याबरोबर?'

'ते काही ठाऊक नाही. आलाही असेल. परतीच्या वेळी तर नाव होती. एक सांगा ना काका-'

'काय?'

'तुमच्या या माणसाचं नावं बाघारू-बर्मनच ना?'

'बर्मन? त्याचा बाप बर्मन!'

'अहो, त्याला एक संपूर्ण नांव, लांबलचक नाव आहे ना?'

'बाघारूला स्वत:चं नावं आहे? तुम्हाला सांगितलं त्याने?

'बरंच काही सांगितलं. त्याला वाघाने धरलं होतं म्हणे?'

'हो. हे सांगितलं त्याने तुम्हाला?'

'त्याने काय एक गोष्ट सांगितली काय्?' कितीतरी गोष्टी सांगितल्या! त्याची जन्मकथा, त्याच्या आईची कथा. तुमचा हा माणूस खूप चांगला आहे काका-'

'बैल!'

'त्याला एखादी आधियारी दिलीत?'

'कुणाला?'

'त्याला.'

'बाघारूला?'

'हो'.

'बाघारूला आधियारी?'

'हो. एवढा कामाचा माणूस-'

'त्याने सांगितलं तुम्हाला? आधियारी देण्याबद्दल?'

'नाही, नाही. मीच म्हणतोय.'

'तो तर बैल आहे. त्याला तर नांगरालाच जुंपायला पाहिजे.'

'म्हणताय काय? इतकी गडगंज जमीन आहे तुमच्याकडं, आणि या माणसाला एक आधियारी देऊ शकत नाही तुम्ही?'

'अरे, तुम्ही तर मलाच आधियार करायचं ठरवलेलं दिसतंय्. मी आणखी दुसऱ्याला कशासाठी आधियारी देऊ? चला, उठा. घरी चला. हात-तोंड धुवा. मग इथं येऊन मीटिंग घ्या. असिन्दिरला इथं फटफटी येऊन यायला सांगतो. गयानाथ विषय टाळण्यासाठी किंवा सामाजिकतेच्या मागणीपोटी व्हरांड्यातून खाली उतरून रस्त्याच्या दिशेने लगबगीने चालू लागतो. आमदार मागून ओरडतो, 'अहो काका ऐका, अहोऽ-'

## सेहेचाळीस

# आमदाराची लाथ

गाडीचा आवाज आधीच आला होता. तो क्रमशः वाढत रहातो. आवाजावरूनच लक्षात येतं, की गाडी काठालगुडीच्या वळणावर इकडे वळाली. त्यानंतर प्रकाश रस्त्यावर पडतो. तो प्रकाश आणि आवाज वाढत रहातो. व्हरांड्यातलं कुणीतरी म्हणतं, 'आले म्हणायचे!'

गाडी थोडी पुढे येते, मिठाईच्या दुकानाजवळ चौकशी करते. आमदाराने फक्त क्रान्तिहाटातील संक्रमण छावणी एवढंच सांगितलं होतं.

गाडी मैदानाच्या दिशेने वळते. हेडलाईटसूचा प्रकाश व्हरांड्यावर पडतो. पण गाडी मैदान पार करून व्हरांड्यासमोर येऊन थांबत नाही. त्याऐवजी ब्रेक लावून फक्त गों-गों करीत रहाते आणि मैदानात उजेड पडत रहातो.

गाडीतून एकेक करीत एकूण पाच माणसं उतरतात. आणि मैदानातून सरळ चालू लागतात. गाडी रस्त्यावर उभी रहाण्यासाठी मागे गेल्यावर त्यांच्यापैकी दोघेजण हात वर करून 'नको' अशी सूचना करतात. गाडीच्या प्रकाशात मैदानातला चिखल-पाणी पाहून ती माणसं काळजीने पावलं टाकीत व्हरांड्याकडे येतात.

ते पाहत-पाहत येत असल्यामुळे त्यांना यायला जरा वेळ लागतो. ते पाचजण कोण-कोण असावेत याचा व्हरांड्यातले लोक अंदाज करतात. व्हरांड्यावर तर एका कोपऱ्यात आमदाराची खुर्ची तर दुसऱ्या कोपऱ्यात सुहासची खुर्ची प्रियनाथही दरवाजात येतो. पायऱ्यांवर बसलेले लोक उठून उभे राहिले. आणि या पांचजणांच्या मागे-मागे आणखी बरेच लोक इकडच्या दुकानांतून येऊन इकडे येताहेत. आतापर्यंत सगळेजण अनेक ठिकाणी विखरून वाट पहात होते. आता सगळे एकत्र होताहेत.

त्या पाचजणांपैकी कुणीतरी एक चित्कारतो, 'अहोऽ वीरेनदा, तुम्हाला काय मीटींग बोलवायला दुसरी जागा मिळाली नाही का, हे चिखलाचं मैदान-?' 'अरे, मणिदा आले की काय?' आमदार ताबडतोब पाय खाली घेऊन सरळ होतो, नंतर उठून व्हरांड्याच्या कोपऱ्यात जाऊन उभा रहातो. आता आमदारच ओरडतो, 'अरे, मणिदा, आपण कुठून येताहात?'

'वाः वाः, तुम्ही जाऊन लाथा मारून सगळे कल्व्हर्टस् मोडू शकता आणि मी इथपर्यंतही येऊ शकत नाही होय?' आता पाचजणांचं दल अगदी जवळ आलंय्. पायऱ्यांवरच्या लोकांनी दूर सरकून त्यांना जागा करून दिलीय्.

आमदार 'हेः हेः' करून हसतो, पण त्या हसण्याचा आवाज जरा वेगळा येतो. तो

वळून प्रियनाथला म्हणतो, 'जरा एखादी सतरंजी-बितरंजी मिळेल का, इथं बसण्यासाठी?' प्रियनाथ खोलीत जातो. सुहासला आपल्या खोलीसमोर खुर्चीवरून उठून उभंच रहावं लगतं. एकदा त्याला वाटतं, आपण आपल्या खोलीत निघून जावं. या मीटिंगशी त्याचा काहीच संबंध नाही. त्याने इथं थांबणही योग्य नाही.

प्रियनाथ खोलीतून सतरंजी आणतो. तो एकटाच ती अंथरण्याचा प्रयत्न करीत असताना आमदार पायरीवरच्या लोकांना म्हणतो, 'जरा मदत करा बरं आपण.' दोघेजण लगबगीने उठून येऊन सतरंजी धरतात. दरम्यान गाडी रस्त्यावर जाण्यासाठी मागे जाऊ लागल्याने मैदान आणि व्हरांड्यात थोडा अंधार होतो. एकजण गॅसबत्तीला पंप मारायला सुरुवात करतो.

आमदाराने काय विचार केला होता, तो खुर्चीत बसून रहाणार आणि इंजिनियर-ऑफिसर बसायला जागा न मिळाल्याने उभे रहाणार? तसं नसतं, तर व्हरांड्यात बसण्याची व्यवस्था करायला त्याने खूप आधीच सांगितलं असतं.

मणीच प्रथम व्हरांड्यात चढतो. 'आम्ही तुमच्यासाठी मालबाजारात बसलोय, आणि तुम्ही इथं मीटिंग घेताय! वा!' मणी खिशातून सिगारेट-काडीपेटी बाहेर काढतो.

'अहो, मी विचार केला होता, ओदलाबाडीला जाऊ. आपण आज मालबाजारात येणार असं ठरलं होतं ना-उद्या जलपाईगुडीला जायचंय ना?' मणी विचारतो.

'त्यासाठीच तर आलो. आल्यावर समजलं, - तुम्ही इथं नाहीत.'

'अहो फुलबाडीच्या त्या जागेवरून गोंधळ चालणारच. माझं तर दोन-तीन महिने येणंच होणार नाही. म्हटलं, तो गोंधळ आजच मिटवून टाकू.'

'तो मिटवा. पण आता तर तुम्हाला सर्कसमध्ये घेतील-तुम्ही लाथेनं कल्हर्टचं रेलिंग पाडून टाकलंत म्हणे?'

पायऱ्यांजवळच्या गर्दीतून कुणीतरी मोठ्या आवाजात म्हणतं, 'सीमेंटऐवजी वाळू वापरल्यावर तर कुणीही ते लाथेने पाडू शकतो. पूल कशापासून बांधला असेल त्याची यावरूनच कल्पना करा.'

मणी सिगारेटचा झुरका घेता-घेता हे वाक्य ऐकतो. त्यानंतर थोड्या वेळाने, सर्वांना ऐकू जाईल अशा आवाजात आमदाराला म्हणतो, 'मला तर वाटलं, तुमचा पाय तुटलाय् म्हणूनच इथं पडून आहात, तुम्हाला न्यावं लागणार. तर हे लोक म्हणाले, ते ठीक आहेत, कल्व्हर्टच तुटला.'

आमदाराला आता हसावंच लागतं. म्हणावं लागतं, 'माझी गोष्ट सोडून द्या. फुलबाडीच्या लोकांशी त्या इंजिनियरची भेट होणं आवश्यक आहे.'

'इंजिनियरांचं तर ऑफिस असतं-'

'ते ऑफिस-बिफिस असू द्या मणिदा, फुलबाडीचे लोक म्हटल्याबरोबर ते म्हणाले

भेटणार नाही!'

'ते तर इथं येताहेत असं म्हणाले, एवढं ओरडता कशाला?' मणी जरबेच्या आवाजात म्हणतो.

'ए चूप, चूप! मीटींग सुरू होऊ द्या!'

'मी मुद्द्याचीच गोष्ट बोलतोय.'

'बघतोय, बघतोय', म्हणत तो गेरूच्या रंगाचा शर्ट घातलेला गृहस्थ येतो, त्याच्यामागे डोक्यावर सतरंजी घेतलेला एकजण येतो. तो व्हरांड्यात येऊन सतरंजीवाल्या माणसाला म्हणतो, 'नीट ताणून अंथरा.' इतकेजण उभे राहिल्याने पायऱ्यांच्या तोंडाशी जरा गर्दी होते. हाट कमिटीचे मेंबर वर चढतात. मणी खाली उतरतो. आमदार खाली उतरतो. आणखी एकजण दोन पायऱ्या चढून म्हणतो, 'नमस्कार मणिबाबू!'

'अरे गयानाथबाबू, आपणही आलात का?'

'यावं लागतं ना? आपल्या क्रांतीहाटाचं आज नशीब उघडलं!'

'ते कसं काय?'

'हेच, आपण सगळ्यांनी त्याला मीटींग घेण्याचं सेंटर बनवलंत, हे नशीबच ना?' म्हणून गयानाथ इंजिनियरांकडे संकेत करतो. ते जरा दूर एका ठिकाणी उभे आहेत. त्यांच्याबद्दल काहीतरी बोललं गेलंय् हे पाहून एकजण थोडं हसून विचारतो, 'काही म्हणालात?'

मणी सिगारेट उचलून 'नाही!' असं म्हणतो.

गयानाथ मणीला म्हणतो, 'अहो मणीबाबू, जरा ऐका! पायऱ्यांवरून उतरून जरा बाजूला उभं राहिल्यावर गयानाथ विचारतो, 'रातच्याला कितीजण रहाणार आहेत? स्वैपाक करायला सांगू?'

'अरे नको, नको, आम्ही लगेच निघणार आहोत, लगेच, तो त्रास घेऊ नका.'

## सत्तेचाळीस

# भाषण आणि चिन्तन

हाट कमिटीची ही सतरंजी इतकी मोठी आहे, की ती सुहासच्या दरवाजापर्यंत गेलीय. रुंदीच्या बाजूने मुडपावी लागलीय. सुहासच्या दरवाजाजवळ, सतरंजीच्या माथ्याशी, दोन खुर्च्या शेजारी-शेजारी मांडल्या आहेत. गॅसबत्ती त्या दोन खुर्च्यांजवळ ठेवलेली. हाट-कमिटीचा एक मेंबर पायरीवरून म्हणतो, 'मणिबाबू, बसा इथंच. आधी सांगून ठेवलं असतंत तर टेबल-खुर्ची आणता आली असती, पण आता तर शाळा बंद

आहे आणि शिक्षक रहातात मानाबाडीला-'

'अरे नाही-नाही, टेबल-खुर्ची कशासाठी? ही तर आपण जनसभेची तयारी करताहात.'

'ही मीटिंग कितीवेळ चालणार? काय वीरेनदा?

'हो, ही मीटिंग नाही, भाषण करण्यासाठी,' म्हणत-म्हणत आमदार व्हरांड्यावर येतात. बूट काढून हातात घेऊन अगदी गॅसबत्तीसमोर जाऊन बसतात. आमदारांमागोमाग सगळेच व्हरांड्यात यायला सुरुवात करतात. प्रत्यकेजण आपापली पादत्राणं काढून हातात घेतो. एक गट जाऊन आमदाराला समोरा, पण व्हरांड्याच्या कोपऱ्याच्या बाजूला बसतो. सगळ्यांनी बसून घेतल्यावर दिसतं, की जागेच्या तुलनेने माणसं संख्येने फार नाहीत. आमदार हाक मारतो, 'मणिदा, या, आता आणखी उशीर नको.'

मणि सँडल काढून व्हरांड्यावर ठेवून येतो. मागून इंजिनियरांपैकी एकजण म्हणतो, 'आवश्यकता वाटली तर आम्हाला हाक मारा. आम्ही इथे आहोत.'

'का बरं? बोलणं होणार आपणाशी, आणि आपण तिथं कशाला थांबता?' आमदार इंजिनियरांकडे राहून म्हणतो, 'तोंड मागं वळवून बोलावं लागणार की काय तुमच्याशी?'

आता इंजिनियर एकेक करून व्हरांड्यावर यायला सुरुवात करतात. त्यांच्यापैकी पहिल्या इंजिनियरच्या पायात नाडी असलेले बूट असल्याने ते खाली वाकून काढावे लागतात. त्याला थोडा वेळ लागतो. मागचे दोघे इंजिनियर उभ्या-उभ्याच सँडल्स काढतात. मणिबाबूंच्या सँडल्यसवळ आपली पादत्राणं ठेवून ते जरा पुढे येऊन, सगळ्यांच्या मागे, भिंतीला टेकून बसतात.

गयानाथ अचानक पायऱ्यांवरून व्हरांड्यावर येतो, त्यानंतर जरा बारीक आवाजात म्हणतो, 'मणिबाबू आणि आमचे आमदारसाहेब, माझा एक प्रश्न होता.' सगळ्यांनी त्याच्याकडे पाहिल्यावर गयानाथ म्हणतो, 'गोष्ट अशी आहे, ही मीटिंग खाजगी आहे की सार्वजनिक आहे? जर इथं प्रायव्हेट मीटिंग होणार असेल, तर मी थांबणार नाही. कसं? नाही, मी आपल्या पार्टीचा माणूस नाही. पण जर आपण सार्वजनिक मीटिंग घेत असाल तर माझी इथं थांबण्याची इच्छा आहे. कसं? मला मणिबाबू आणि आमदार यांची भाषणं ऐकायची इच्छा आहे. कसं-'

गयानाथला थांबवून मणि म्हणतो, 'काय, वीरेनदा?'

आमदार गयानाथला म्हणतो, 'अरे बसा ना, बसा! इथं तर सगळ्यांबद्दलच चर्चा होणार आहे, आपण थांबलात तर चांगलंच होईल. मला सांगता येईल की गयानाथबाबूसुद्धा या मीटिंगला हजर होते. अरे, ज्यांच्या घरात येऊन बसलोय, तेच नाहीत!' आमदार दरवाजाच्या दिशेने मान वळवून म्हणतो, 'काय हो, आपणही या ना!'

सुहास खोलीतून बाहेर येऊन म्हणतो, 'आता मी इथं काय-'

'अरे बसा ना, बसा,' मणी उजवा हात उजवीकडे दाखवून जणू इंजिनियरांच्या बाजूला जागा दाखवतो. सुहास आमदारासमोरून जाऊन इंजिनियरांशेजारी भिंतीला टेकून बसतो.

गयानाथ म्हणतो, 'ठीक आहे. आपण मीटिंग सुरू करा. माझी अनुमती तर आहेच. मी आपल्या चहाच्या व्यवस्था बघून येतो.'

आमदार म्हणतो, 'माझी ब्रीफकेस?' प्रियनाथ ती आतून आणून देतो.

ब्रीफकेस जवळ ठेवून आमदार म्हणतो, 'हे पहा, आता चर्चा सुरू व्हायला हवी. ही चर्चा खरं तर फुलबाडीत होणं योग्य होतं. पण तिथं आमचे असिस्टंट इंजिनियरसाहेब नव्हते. मालबाजाराला त्यांच्या ऑफिसमध्येही मी चर्चा करू शकलो असतो. पण समारोसमोर चर्चेची गरज होती. म्हणूनच मी त्यांना इथं यायला सांगितलं. ते कृपा करून आले आहेत. आमच्या जिल्हा कृषक समितीचे को - ऑर्डिनेटर कॉम्रेड मणी बागचीही आले आहेत. त्यामुळे आता चर्चा होऊ शकते. तेव्हा माझी अशी विनंती आहे, की फुलबाडी वस्तीतील, आणि इथे आता उपस्थित असलेल्या लोकांनीच प्रथम सगळं सांगणं उचित असल्याने, त्यांनी आधी बोलावं. त्यानंतर आम्ही इंजिनियर साहेबांचं सांगणं ऐकू. तेव्हा, फुलबाडीच्या कॉम्रेडस् पैकी कुणीतरी सुरुवात करावी.'

जो गट आमदाराच्या समोर व्हरांड्याच्या कोपऱ्यात बसला होता, त्यातले लोक सावरून बसतात. एकजण समोरच्याला धक्का देऊन म्हणतो, 'ए ऽ नकुल्या, तूच बोल ना!'

तो मान वळवून म्हणतो, 'काकांना बोलू द्या.'

'काका' म्हणून ओळखला जाणारा गृहस्थ मध्यभागी बसलेला होता. तो बसल्या जागेवरूनच, आमदाराकडे पहात, मोठ्या आवाजात सुरू करतो- 'यात एवढं चर्चा करण्यासारखं काय आहे ते मला समजत नाही. या फुलबाडीतल्या फुलझऱ्यावर ब्रिज होणार असं जेव्हा ठरलं, तेव्हापासून हा-ना-तो घोटाळा चालूच आहे. आम्ही चौकशीला गेलो, की सरकारचे लोक म्हणत, "कोण म्हणतंय ब्रिज होणार, आं?" काका एकदा आमदाराकडं, एकदा मणिकडं, आणि एकदा मान वळवून इंजिनियर लोकांकडे पहातो. त्यानंतर पुन्हा सुरुवात करतो- 'कोण म्हणतं ब्रिज होणार? आं कोण म्हणतं? या फुलझऱ्यावर ब्रिज बांधण्यावरून तर गेली तीस वर्षं कितीतरी भानगडी झाल्या. मी वीस वर्षं वयाचा जवान होतो, तेव्हा सगेन दासगुप्त मंत्री होते. आणि तो काय म्हणाला, अरे तेव्हां मालबाजार जनरल सीट होती, काय नाव त्याचं तो आमदार म्हणायचा, झाला बरं का, आता पुढच्या वर्षाच्या आत फुलझऱ्यावर ब्रिज झालाच म्हणून समजा. एकदा तर भानगडच-'

काका बोलताना सगळ्यांकडे मान वळवून पहाताना स्वतःही वळतो, आता त्याचं

तोडं मणीच्याच दिशेने आहे. मणि नवी सिगारेट पेटवून जरा आकसून बसलाय. सिगरेटच्या धुरामागं आपल्या चेहऱ्यावरची अस्वस्थता लपवण्याचा तो प्रयत्न करतो. तो माणूस पुन्हा बोलायला सुरुवात करतो. 'झालं काय, आम्ही तर तेव्हाच पूर्वमंत्र्यांना सगळे मिळून भेटलो आणि म्हणालो, ब्रिज नाही तर मत नाही. हे एकून मंत्री काय म्हणाला ठाऊक आहे? तो म्हणाला, हे काय? ब्रिज झाला नाही? मला तर असं कळवण्यात आलं की ब्रिज पूर्ण झालाय. त्याचे सगळे पैसेसुद्धा देऊन टाकण्यात आले आहेत. तेव्हा आमच्या लक्षात आलं, ते पैसे कुणीतरी खाल्ले. एकदा ब्रिजसाठीचा पैसा असा वाटेला लागला, आता कसला होतोय ब्रिज? बस! शोध सुरू झाला- कुठं बोला ब्रिज? ऑफिसरांनी शोधायला सुरुवात केली जलपाइगुडीच्या कागदपत्रांमध्ये - कुठं गेला ब्रिज? मंत्र्याने शोधायला सुरुवात केली कलकत्त्याच्या कागदपत्रांमध्ये- कुठं गेला ब्रिज? आणि आम्ही शोधायला लागलो इथल्या कागदपत्रांमध्ये- कुठं गेला ब्रिज?, तो माणूस थांबतो. इथं सगळेजण हसण्यासाठी थोडा वेळ घेणार हे त्याला ठाऊक आहे. तो स्वतःला हसून तेवढा वेळ देतो. मणि एकदा आमदाराकडं पाहून घड्याळ्यात पहातो. आमदाराने हे पाहिलं की नाही हे आमदाराच्या नजरेवरून लक्षात येत नाही, पण बोलणारा माणूस मात्र हे पहातो. तो ताबडतोब म्हणतो, 'मणिबाबू, मी वेळ घेत नाही. अच्छा, सोडून द्या ते सगळं. मी सांगत काय होतो, की -'

मागून एक मुलगा आवाज चढवून विचारतो, 'काका, मी सांगू?'

काका पुन्हा सगळ्यांकडे पाहून म्हणतो, 'सांग की रे! मी तर तुलाच सांगायला सांगतो. मी सांगायला सुरुवात केल्याबरोबर मला सगळ्या गोष्टी आठवायला लागल्या. माझ्या वेळी नरेश चक्रवर्ती आणि पटोल घोष हे नेते होते. आणि आता नेते आहेत मणिबाबू आणि आमदार आहेत वीरेनबाबू. आता तूच पुढचं सांग-सांग, सांग!'

काकांचा आवाज जरा वरच्या पट्टीतला. ते हावभाव करून, आवाजाचा चढउतार करून गोष्ट सांगत असताना हळूहळू त्या गोष्टीचं एक वातावरण तयार झालं होतं. एवढंच काय, इथं उपस्थित असलेल्या सुहास, इंजिनियरलोक, प्रियनाथ या भद्रलोकांनाही त्या गोष्टीची ओढ वाटू लागली होती. आमदार अशा आविर्भावात बसला होता, की वाटत होतं ही गोष्ट रात्रभर चालली तरी त्याची हरकत नाही, किंवा आता संपली तरी त्याची हरकत नाही, किंवा फक्त त्यालाच ही गोष्ट कधी संपणार आहे हे ठाऊक आहे. एकमेव मणी बागचीच अधीरपणे वारंवार सिगारेटचे झुरके घेत होता. पण हा इलाखा होता वीरेनचा. वीरेनने इथे बसून असिस्टंट इंजिनियरला बोलावून आणलंय. त्यामुळे काय होणार, काय होणार नाही हे वीरेनच ठरवणार. मणि बागची यानंतर नक्कीच वीरेनला सांगणार आहे, की अशा प्रकारे ऑफिसर्सना हॅरास केलं तर कुणाच ऑफिसरला काम करण्याचा उत्साह वाटणार नाही. पण, वीरेन स्वतः क्रान्तिहाटात बसलेला आहे हे ठाऊक

असूनही असिस्टंट इंजिनियरने सांगितल्याबरोबर मणि त्याच्या गाडीत का बसला - असं वीरेनही त्याला विचारू शकतो हे मणीला ठाऊक आहे. त्यामुळे सगळ्यांची अशी समजूत झाली की पार्टीत मणी हा ऑफिसरांना धार्जिणा आहे. पण अशी शंका असल्याने मणीनेआपली कैफियत तयार केली आहे. वीरेनबाबूंनी आपल्या माणसांसहित क्रांतीहाटात बसून जर इंजिनियरांना बोलावणं पाठवलं, आणि इंजिनियरांनी 'पॅनिकी' होऊन जर मणींचं सहाय्य मागितलं, तर ऑफिसरांचं 'मोरॅल' राखण्यासाठीच मणीला ऑफिसरांबरोबर यावं लागलं. मणीला ठाऊक आहे, की ऑफिसर्स 'डिमॉरलाइझड्' होऊ नयेत. ही त्यांच्या पार्टीत मोठी काळजी आहे, त्यामुळे दोनेक ठिकाणी लोकांचे गैरसमज झाले तरी चालतील. मणीची अशी कल्पना आहे की पार्टीतला हा कल वीरेन समजू शकत नाही. पण म्हणून मणी तर काही वीरेनच्या इलाख्यात नाक खुपसू शकत नाही.

## अठ्ठेचाळीस

# आमदार आणि ऑफिसर : संवादाचा आणखी एक प्रकार

तेव्हा तो मुलगा उठून रहातो आणि बोलायला सुरु करतो,

'कॉम्रेडलोक-!'

आमदार हात वर करून म्हणतो, 'बसल्या-बसल्या बोल हेमेन, बसल्या-बसल्या बोल!'

काका तेव्हा हसून एक हात वर करून हलवतो. पण हसण्यामुळे बोलू शकत नाही. काकांच्या हातवाऱ्यामुळे किंवा आमदाराच्या बोलण्यामुळे हे दल हसू लागतं. त्या दलामध्ये बरीच उत्तेजना संचारलेली असूनही ते हसतं. आणि हेमेन दोन्ही हातांनी तोंड झाकून खाली बसतो.

'अरे, अरे, झालं काय, झालं काय, बोल, हेमेन!' मणी सरळ होऊन बसत म्हणतो. मणीचे दात मोठेमोठे आहेत. त्यामुळे तो काहीही बोलला, तरी ते रागावल्यासारखंच वाटतं. आणि आतापर्यंत कामाच्या बोलण्याची सुरुवातही झालेली नाही यामुळे मणी थोडा बेचैनही होता. इंजिनियर लोकांकडून त्याने घटना ऐकलीय. *पण त्यांची बाजू काही* ऐकलेली नाही. न ऐकताही घटना काय घडली असावी हे तो समजू शकतो. ऑफिसरांच्या बोलण्यातूनच खरी घटना समजेल. वीरेनचा या मामल्याशी कितपत संबंध आहे हे मणीला समजत नाहीय. मालबाजाराला जाऊन वीरेनबाबूंनी इंजिनियरशी बोलणं खरं तर उचित ठरलं असतं. ज्याअर्थी वीरेनने ते केलेलं नाही, त्याअर्थी मणीला वीरेनचं मन आधी

ओळखून हवं. मणीच्या बोलण्यात थोडा बेचैनपणा दिसल्याने या दलाचं हसणं थांबतं. काकासुद्धा हसणं बंद करून म्हणतात, 'अहो, हा तर तोतरा आहे. याला नीट बोलता येत नाही. म्हणूनच उभं राहून भाषण द्यायला बघत होता. भाषण देताना मात्र आमचा हेमेन तोतरं बोलत नाही-' काकांच्या बोलण्यावर पुन्हा लोकांमध्ये हशाची लहर उसळते. पण हेमेन हातांमध्ये लपवलेलं तोंड वर करीत नाही.

'जाऊ द्या, मी सांगतो!' म्हणत जब्बर उभा रहातो. जब्बर हा फुलबाडीच्या सर्वात मोठ्या जोतदाराचा धाकटा मुलगा. जोतदार काँग्रेसचे, जब्बरचे मोठे भाऊसुद्धा सगळे काँग्रेसचेच आहेत. जब्बरने एकोणीसशे सदुसष्ट साली प्रथम सी.पी.आय. मध्ये प्रवेश केला. त्यानंतर दोन वर्षे एकामागोमाग एक पक्ष बदलीत आता तो डाव्या आघाडीत सामील झालाय. टेरिलीनची पँट आणि टेरिलीनचा शर्ट घातलेला जब्बर उठून बोलायला सुरुवात करतो, 'हे पहा, मामला तर सगळ्यांनाच ठाऊक आहे. आमच्या फुलझऱ्यावर कल्व्हर्ट बांधून झाला. पण आम्ही प्रथमपासूनच या ठेकेदाराच्या कामावर संतुष्ट होऊ शकलो नाही. . . आम्ही - म्हणजे माझे बाबा, आणि जगदीशकाकासुद्धा. हा काही राजकीय पक्षाचा मामला नाही. आपल्या सर्वांच्या जिन्हाळ्याचा प्रश्न आहे. ब्रिज पडणार अशी आम्हा सर्वांना भीती वाटत होती. तर, आज आमच्या आमदारासाहेबांच्या पायाच्या आघातानेच ते झालं, हे आमचं मोठंच सद्‌भाग्य म्हणायला हवं, कारण-'

जब्बर बोलत असतानाच त्याला अडवून इंजिनियर लोकांपैकी कुणीतरी म्हणतं, 'थोडं मोठ्याने बोला, ऐकू येत नाहीय्.'

जब्बर हातवारे जितक्या जोरदारपणे करतो, तितक्या मोठ्या आवाजाने तो बोलू शकत नाही. आवाज थोडा वाढवून तो म्हणतो. 'आज आमचं सद्‌भाग्य म्हणायला हवं- आमदारसाहेब फुलबाडीला गेले, आणि आमचा आरोप सत्य आहे की नाही, ब्रिज मोडू शकतो की नाही हे पडताळून पहाण्यासाठी त्यांनी स्वतःच ब्रिजच्या रेलिंगला लाथ मारली आणि ब्रिजचं रेलिंग मोडून पडलं. आम्ही जर नंतर बोललो असतो तर फुलझऱ्याच्या माणसांनी असा आरोप केला असता, की तुम्ही स्वतःच ब्रिज मोडलात. आता, आमचा ब्रिज आम्हीच कसे काय मोडू? या ब्रिजसाठी आमच्या कितीतरी माणसांनी कितीतरी कष्ट सहन केले आहेत-' जब्बरचा आवाज चढल्याबरोबर आमदार हात वर करून त्याला थांबवतात.

'ठीक आहे,' म्हणून जब्बर बसतो. आमदार जणू घसा साफ करण्यासाठी दोन-तीनदा खाकरतात. एक दोनदा तोंडावरून हात फिरवतात. आता ते नक्कीच बोलणार, असं वाटतं. इंजिनियर लोकांचा गटही सरळ होऊन बसतो. मणि नवीन सिगारेट पेटवून, ताठ होऊन बसतो. वीरेनला काय हवं आहे याची मणींला माहिती करून द्यायची आहे. या मामल्यांशी अचानकपणे संबंध आल्याने या मामल्याचा ताबडतोब काहीतरी सोक्षमोक्ष

लागावा असं त्याला वाटतं. वीरेनला सोक्षमोक्ष हवा आहे, की हा मामला भिजत ठेवायचा आहे- हे काही मणीला ठाऊक नाही. आणि आता, या जब्बरचं बोलणं ऐकताना मणीला वाटतं की सब-असिस्टंट इंजिनियरकडून खबर मिळाल्याने अचानक इथं यावं लागलं म्हणूनच असिस्टंट इंजिनियर आपल्याला मामला मिटवायची इच्छा आहे असं मणीला सांगतोय. आजची ही मीटिंग एकदा संपल्यावर हे ऑफिसरच नाना पेच लढवू शकतील. पेचच लढवायचे असतील, तर मग वीरेनलाच आधी पेच टाकू द्या. मणि आपल्या स्वभावाप्रमाणे आतापर्यंत जे कल्पीत आलाय, त्याच्या विपरीत निर्णय घेण्याकडे झुकतो. तोवर आमदाराने बोलण्याला सुरुवात केलीय. गयानाथ, हाट कमिटीच्या मेंबरसह आणि इतर अनेकजण पायऱ्या चढून वर येऊन सतरंजीवर मध्यभागी बसतात- सुहासच्या जवळ, फुलबाडी वस्तीच्या गटाच्या पाठीमागे.

'फुलबाडी वस्तीचे सगळेंच असं म्हणू शकतात की त्यांनी या कॉंट्रॅक्टरच्या संदर्भात मला, सरकारला आणि डिपार्टमेंटला बरीच पत्रं लिहिली आहेत. मी काही त्या सगळ्या पत्रांची उत्तरं देऊ शकलो नाही. पण मी स्थानिक पी.डब्ल्यू.डी.च्या असिस्टंट इंजिनियरच्या ऑफिसला ती सगळी पत्रं पाठवली. ती पत्रं त्यांना मिळाली की नाही, तसंच त्या संदर्भात काय केलं, याचा असिस्टंट इंजिनियरसाहेब खुलासा करतील का?'

असिस्टंट इंजिनियरला अशा मीटिंग्जची सवय नाही, त्याला अशा मीटिंगची थोडी भीतीही वाटते. तो उठून उभा रहातो. आमदार म्हणतो, 'आपण बसा, आपलं बोलणं आम्हाला ऐकू येईल, बसल्या-बसल्या बोला.'

आपलं बोलणं कशाप्रकारे सुरू करावं हे ठरवण्यासाठी इंजिनियरला थोडा वेळ लागतो- सुरुवात 'अध्यक्षमहाशय' ने करावी, की 'बंधूंनो' म्हणून करावी, की 'कॉम्रेडस्' ने करावी? 'कॉम्रेडस्' म्हणून चालणार नाही, कारण इथं सगळ्या पक्षांचे लोक आहेत. बसल्या-बसल्या 'बंधूंनो' म्हणतात का, हेही त्याच्या लक्षात येत नाही. 'अध्यक्ष महाराज' म्हणता येईल, पण ही अध्यक्षांची सभा आहे की आमदाराची सभा आहे? खूप कमी वेळात त्याला हे ठरवायला हवं. तेवढ्यात आमदार त्याला प्रश्न करतो, 'यांचं डेप्युटेशन आणि मी पाठवलेली पत्रं तर आपणाला मिळाली ना?'

'हो. ते काम तर आमचे एस.ए.ई मिस्टर मंडल पहातात. ते सांगू शकतील.'

'त्यांच्याशी तर माझं आधीच बोलणं झालंय. त्यांनीच तर तुम्हाला खबर दिली. तुम्ही ती पत्रं पाहिलीत की पाहिली नाहीत एवढंच सांगा.' आमदार खूप थंडपणे बोलतात; पण फुलबाडीचे लोक ज्या प्रकारे या गोष्टीवर माना हलवतात, त्यावरून वाटतं, की हा मुद्दा खूप आवश्यक आणि महत्वाचा आहे.

यावर इंजिनियर बोलायला सुरुवात करतो, 'खरं तर सरकारी ऑफिसातही एकेका ऑफिसरकडं एकेका कामाचा चार्ज असतो, आपापल्या कामाचा कॉरस्पॉंडन्सही तो-तो

ऑफिसरच पहातो. मला जेव्हा कळवाल, तेव्हा मला समजू शकेल.'

यावर आमदाराला हसू फुटतं. थोडं हसून, त्यानंतर तो म्हणतो, 'आपल्या ऑफिससाठी हा नियम आहे हे चांगलं आहे. ते मला माहीत नव्हतं म्हणूनच सगळी गडबड झालीय. पण वेगवेगळ्या सरकारी ऑफिसांत वेगवेगळे नियम असले की माझ्यासारख्या माणसाची पंचाईत होते.'

'सगळ्याच सरकारी ऑफिसांत सामान्यपणे हाच नियम असतो- एकेक फाईल एकेका ऑफिसरकडे असते. मी तर फुलझरा कल्व्हर्टची फाईल बरोबर घेऊन आलोय.'

'ती तर आज आणलीत, आम्ही सगळे इथं बसलो आहोत, म्हणून आणा. पण तुम्हाला जसे सरकारी ऑफिसचे कायदे माहिती आहेत, तसे मलाही दोनेक माहिती आहेत. मला तर हे सुद्धा ठाऊक आहे की सरकारी ऑफिसातल्या एखाद्या नवीन लग्न झालेल्या महिलेला पत्र आलं, तर तेसुद्धा पहिल्यांदा ऑफिसर वाचतो आणि मग तिला देतो-'

दबलेल्या हसण्याची एक लहर उठतो. गयानाथ जोरजोराने मान हलवतो, जणू अशा गोष्टी त्यालाही खूप ठाऊक आहेत: हाट कमिटीचे मेंबर गुपचूप हसतात, आणि मणी थोडा चकित होऊन वीरेनकडे पहातो.

असेंब्लीत वीरेनने एकदोन भाषणं केली आहेत, पेपरमध्ये आलं होतं. भाषण तर तो चांगलंच करतो. आणि आमदार असूनही सर्वांपेक्षा अधिक श्रम करतो. पण म्हणून काय तो इतका बदललाय?

आपण इंजिनियरांनी सांगितल्यावरून इथं आलो आहोत हे आता मणी विसरतो. त्याला वाटतं, वीरेनमधलं हे परिवर्तन पहाणं हेच त्याचं लक्ष्य होतं.

आमदार म्हणतो, 'तसं असेल तर आम्हाला आपल्या पत्राचं उत्तर का मिळालं नाही हा प्रश्न या मीटिंगमध्ये उपस्थित करण्याची गरज नाही.'

'नाही, ते आपण जरूर बोला. पण आमच्या ऑफिसमध्ये क्लेरिकल स्टाफ आहे फक्त दोनच जण आणि टायपिस्ट आहे फक्त एकजण. टायपिस्ट मॅटर्निटी लीव्हवर गेलीय, रिलीव्हिंग हॅंड अद्याप आलेला नाही. आमचा एक असिस्टंट टायपिंगचं काम करतो. ते सुद्धा तो कोऑर्डिनेशन कमिटीचा मेंबर म्हणून-'

'ते ठीक आहे. पण मी तर आपला इथला आमदार.'

यावेळच्या हशात इंजिनियरही सामील होतो, मणीही हसू लागतो. तेव्हा आमदार म्हणतो,'माझ्या या इलाख्यात जी सगळी कामं चालली आहेत, त्यांच्यासंदर्भात काही माहिती मला मिळवायची असेल, तर काय कुठला ऑफिसर कुठल्या कामाच्या चार्जमध्ये आहे हे आधी विचारून, मग त्याला पत्र लिहावं की काय?'

'नाही, तसं कसं? आपण आम्हालाच लिहा.'

'पण आपण तर माझ्या कुठल्याच पत्राचं उत्तर देत नाही. मी आधीच आपणाला

पत्राने कळवलं होतं की आज मी फुलबाडीचा तो पूल पहायला जाणार आहे. पण तिथं आपले मिस्टर मंडल आहेत असं दिसलं. खरं तर चर्चा आपणाशी करायची होती.'

'ते माझ्या लक्षात आलं नाही. मला वाटलं मंडल यांच्याकडे त्या कामाचा चार्ज आहे, ते असले तरी चालेल.'

'मला तुमच्याशी काही चर्चा करायची असती तर मी तुमच्या ऑफिसमध्ये आलो असतो. पण खरं म्हणजे ही चर्चा त्या ब्रिजजवळच होणं आवश्यक होतं. कारण त्या ब्रिजचं काम काँट्रॅक्टरने नीट केलेलं नाहीय असा आरोप आहे-'

## एकोणपन्नास

# ठेकेदार आणि इंजिनियर

'या सगळ्या कम्प्लेन जर स्पेसिफिक आणि पर्टिक्युलर नसतील, तर डिपार्टमेंटकडून त्यांची चौकशी होणं मुश्किल असतं. त्यामुळे सगळ्या कामाचीच प्रोग्रेस हँपर होणार. काँट्रॅक्टर डिमॉरलाइझ्ड होणार.'

'पुलात काय-काय दोष आहेत हे फुलबाडीचे लोक जर आपणाला सांगू शकले असते, तर तेच नसते का इंजिनियर झाले? पण वारंवार आलेली तक्रार म्हणजे काँट्रॅक्टरने वाळू आणि सीमेंट यांचं मिश्रण योग्य प्रमाणात केलेलं नाही. फुलझऱ्यातून तर पावसाळ्यात मोठा प्रवाह वहातो. असं पातळ मिश्रण वाहून जाणार हे आपल्या कानावर आलं नव्हतं का?'

'हो, आलं होत, पण स्पेसिफिक कंप्लेन नव्हती, म्हणूनच-'

'मिश्रणाचा नमुना आपणापैकी कुणी तपासून पहिला होता?'

'नाही. ते तपासून पाहिलं नाही. पण असं यापूर्वी कुणी तपासून पाहिलं नव्हतं. एखादा काँट्रॅक्टर कशासाठी असं करणार-' सगळ्यांच्या हसण्यात इंजिनियरचा आवाज दबला जातो. इंजिनियर अवघडून गप्प बसतो.

'हे काय म्हणताहात आपण- काँट्रॅक्टर कामात का फसवतात किंवा चोरी करतात ते आपणाला ठाऊक नाही?' मणी खूप हसून सिगारेटचा झुरका घेतो.

काका म्हणतात, 'पावसाळा आला, कुठं एखाद्या फॉरेस्टमधल्या एखाद्या नदीला पूर आला, की बस, टाका दगड! कुणाचे दगड, कोण टाकतात आणि कोण हिशेब ठेवतो, सांगा! एकेक दगड पाण्यात टाकल्यावर ठेकेदाराचे बारा आणे आणि साहेबाचे चार आणे. आणि जे दगड आणलेही नाहीत आणि टाकलेही नाहीत, त्या दगडांचे चौदा आणे साहेबांचे, दोन आणे ठेकेदाराचे.'

'असं असेल तर अवघड आहे.'

'काका, गप्प बसा; पुरावा असेल तर बोला'- आमदाराच्या या बोलण्यावर फुलझरीचा काका हो-हो करीत हसतो, 'हे चांगलं सांगितलंत तुम्ही, मग तर तिस्तामाईकडूनच हिशेब घ्यावा लागणार, की बाई तिस्तामाई, किती दगड मिळाले तुला?'

'मी संध्याकाळच्या सुमाराला फुलझऱ्याजवळ पोचलो. परीक्षा करण्यासाठी मी पायाने कल्व्हर्टला एक लाथ मारली. आपले मिस्टर मंडलही होते. पण संपूर्ण रेलिंग झर-झर करीत पडून गेलं. हाच पुरावा नाही का? आपल्या मिस्टर मंडलं यांनी मला तेव्हा सांगितलं की प्रत्येक ठिकाणी असंच होतं-' आमदार म्हणतो.

मिस्टर मंडल काहीतरी बोलू पहातात, पण इंजिनियर हात उचलून त्यांना थांबवतात- 'बांधकाम सकाळी झालं होतं, आमदारांनी लाथ संध्याकाळी मारली. कुठलंही बांधकाम चोवीस तास पूर्ण झाल्याशिवाय पक्कं होत नाही- मग त्यात कितीही का सीमेंट वापरलेलं असेना. बारा तासांच्या आत पायाने धक्का दिला, तर हिंदुस्थान कन्स्ट्रक्शनने बांधलेलं रेलिंगही ढासळून पडेल-' इंजिनियरला इथं हसण्याची संधी मिळते. इंजिनियर लोकांपैकी इतर कुणाचं हसणं त्याच्या हसण्यात मिसळत नाही खरं, पण त्यांच्या दलात समर्थनाची हालचाल झालेली लक्षात येते. आतापर्यंत आमदार ज्या थंड आवाजात बोलत होता, तोच थंडपणा इंजिनियरच्या आवाजात येतो. त्याच्या बोलण्याच्या सुरावरून वाटतं, की हा विषय त्याच्या माहितीच्या आवाक्याला आहे आणि तो काहीही असंबद्ध बोललेला नाही.

हे संकट आपली वाट पहातंय आणि हा विषय येणारच आमदाराला ठाऊक होतं. या मुद्यावरची चर्चा जितकी पुढं जाईल, तितकी इंजिनियर लोकांना अधिक सोयीची होईल हे आपल्या अनुभवावरून त्याला ठाऊक आहे. आणि हाच आमदार आपल्या कामासाठी वारंवार इथं येऊनच थांबतो. त्याला थांबण्यासाठी इतर अनेक जागा आहेत, पण या जागी येऊन मात्र तो पुरा अडकतो. डोकं थंड ठेवून आमदार म्हणतो, 'हे पहा, विवाद करून याचं विश्लेषण होणार नाही. माझा संशय योग्य की अयोग्य त्याची परीक्षा घेण्याचा, ते पडताळून पहाण्याचा एक नियम आहे. तो नियम आपण सांगा, मी एकतो.'

इंजिनियर थंड आवाजात उत्तरतो, 'या मिक्श्चरचं सॅंपल घेऊन ते स्टेट टेस्टिंग लॅबोरेटरीत पाठवायला हवं. ते रिपोर्ट देतील.'

'या केसमध्ये ते करायला आपण राजी आहात?'

'आम्ही राजी असण्या-नसण्याचा काही प्रश्नच नाही.'

आपण जर हे करायलाच सांगितलंत, तर आम्ही करू- सॅंपल तपासायला पाठवू. पण जोपर्यंत रिपोर्ट येत नाही, तोपर्यंत काम बंद ठेवायला हवं का?'

'काम बंद कशाला ठेवायचं? रेलिंग पुन्हा बांधणार नाही, हेच ना? का? रेलिंगशिवाय तुमची खूप गैरसोय होत का?

'हा ब्रिज तुम्ही घेऊन गेलात तरी आमची किती गैरसोय नाही. आज ना उद्या तो कोसळून पडणारच. मग किती का इन्जुरीज होईनात-' फुलबाडीच्या दलातला एकजण म्हणतो.

आमदार धमकीच्या सुरात म्हणतो, 'फालतू बाता करू नका, जे विचारतोय त्याचं उत्तर द्या!'

दरम्यान इंजिनियरांचं आपसात काहीतरी बोलणं होतं. इंजिनियर म्हणतो, 'आपण फक्त रेलिंगच का म्हणता, प्लॅटफॉर्म आणि रोड यांच्यामध्ये अर्थ-वर्कही व्हायचंय. ते ही होणार नाही. याचाच अर्थ ब्रिजचा वापर करता येणार नाही. शिवाय सँपल फक्त रेलिंगमधलंच घेऊन चालणार नाही, सगळ्या पार्टस्‌मधून घ्यावं लागणार.'

'थांबा. एकेक गोष्ट सांगा. याचा अर्थ रस्ता आणि ब्रिज यांच्यामधल भाग बुजवला जाणार नाही- असंच ना?'

'हो.'

'आपण एकदा काम करून बुजवू शकणार नाही?' फुलबाडीच्या गटाला आमदार विचारतो.

'हो. कॉंट्रॅक्टरने तरी काय, आमच्याकडूनच बुजवून घेतला असता. हे काम आम्हीच करू. पैसा न घेता.'

वीरेन कुठं चाललाय आणि का चाललाय हे काही मणीच्या लक्षात येत नाही. फुलबाडीच्या एक दोन हात लांबीच्या कल्व्हर्टच्या मिश्रणाचं कुठं सँपल पाठवणार, आणि ही संधी घेऊन ऑफिसर आणि ठेकेदार मिळून इकडचं सगळं काम बंद करून टाकणार. शिवाय हा मामला इतक्या दूरपर्यंत कशाला न्यायला हवा हे मणीला समजत नाही. फुलबाडीत त्याच्या पार्टीचे कुणीच लोक नाहीत, हे सरकार आल्यावर झाले आहेत, हे सरकार गेल्याबरोबर तेही जातील. वीरेन इतक्या दूर जातोच कशासाठी? हा तर धोरणाशी निगडित असलेला प्रश्न आहे. पार्टीत नेहमी चर्चा होते, की स्थानिक लोकांना, सरकारी अधिकाऱ्यांना किंवा प्रशासनाला काही निमित्त मिळेल, त्यांच्या हाती कोलीत मिळेल असं कुणीही कधीही काही करू नये. पण, इथं जे चाललंय ते होऊ देऊन, नंतर, म्हणजे, इथून परत मालबाजारला गेल्यावर इंजिनियर आणि वीरेनला घेऊन चर्चा करून मामला मिटवावा, की इथंच ते बोलावं हे मणीला समजत नाही. पण वीरेनशी आधी तर तो काही बोललेला नाही. वीरेन एवढा रागावला का आहे हे त्याला ठाऊक नाही.

तर मग आज रात्री वीरेनशी बोलून, मणी उद्या सकाळी इंजिनियरला यायला सांगू शकेल.

'आणखी एक गोष्ट काय म्हणाला होता?'

'संपल तर सगळ्याच ठिकाणांहून घ्यावं लागेल असं म्हणालो होतो.'

'त्यासाठी संपूर्ण पूलच पाडून टाकावा लागणार की काय?

'नाही, एवढं कशाला? थोडंसं घेतलं तरी चालेल.'

'ते बरोबर होईल का पण?' आमदार सगळ्यांकडे पाहून विचारतो.

## पन्नास

# आमदाराचा राग आणि मीटिंगचा शेवट

'काँट्रॅक्टरच्या बाजूने या गृहस्थांना काही बोलायचंय्'- इंजिनियर त्यांच्यामध्ये बसलेल्या एकाजणाकडे निर्देश करीत म्हणतो.

'हं, बोला, आपण ठेकेदाराकडचे?' आमदार विचारतो.

तो माणूस उभा राहिला होता, म्हणाला, 'हो, सर. आपण सारे या मीटिंगमध्ये जे ठरवाल ते आमच्या मालकांना कळेल, मी उद्या जलपाईगुडीला जाऊन मालकांना सांगेन. पण मला तर इथं खूप काही सांगायचंय्. आपली अनुमती हवीय्.'

'बोला, आपल्याला काय सांगायचंय् ते सांगा,' आमदार म्हणतो.

'आपण तर काँट्रॅक्टरबद्दल इतकं सारं बोललात. सगळेच काँट्रॅक्टर काही सारखे नसतात. माझे मालक मोठे काँट्रॅक्टर आहेत. ते छोटी-छोटी कामं करीत नाहीत. हे या साहेबलोकांना ठाऊक आहे. मणिबाबूंना ठाऊक आहे. आमदारसाहेबांना ठाऊक आहे. पण मामला असा आहे, मी त्यांच्याबरोबर नाना साईटस्वर काम करतोय पाच-सात वर्षापासून. अशी छोटी कामं असली, की मी मालकांना सांगून त्यांच्या नांवाने टेंडर देतो. माझं तर काही सरकारी लिस्टमध्ये नांव नाही. माझ्या मालकांचं टेंडर असलं म्हणजे ते सगळ्यांना समजणारच. आणि रेट खूपच लो होता. कारण मला स्वतःलाच सरकारचं काम ठाऊक आहे. माझे दोन भाऊ आहेत, त्यांनाही ठाऊक आहे. आणखी काही लोक कामाला लावतो. त्यामुळे आम्ही लो रेटमध्ये काम करून देऊन बऱ्यापैकी फायदा मिळवू शकतो. आता झालं काय, की मालकाने आपल्या कंपनीच्या नावाखाली हा गोलमाल चालतोय हे पाहिलं, तर त्यामुळे मालकाचंही नाव बद्दू होईल, मालक मला बरखास्त करून टाकील. अर्थात माझी नोकरी जाणार नाही, कारण मी मालकाच्या विश्वासातला माणूस आहे. पण माझं हे छोटीछोटी कामं घेऊन नफा कमावणं एकदम बंद होऊन जाईल.'
तो माणूस आपलं बोलणं संपवून उभा रहातो. आमदारही त्याच्याकडे पहात रहातो. या माणसाच्या बोलण्याने अवस्था बदलायला सुरुवात झालीय हे लक्षात येतं. आपण ही

संधी घ्यावी असा मणी विचार करतो. सिगारेटचा झुरका घेऊन तो बोलायला सुरुवात करणार, एवढ्यात आमदार म्हणतो, 'ते तुम्ही ऑफिसरलोकांना सांगा. या ब्रिजच्या कामात काहीतरी घोटाळा आहे, हे तर आम्ही त्यांना कधीपासून सांगतो आहोत. पण हे ऑफिसर आमच्या सांगण्याला काही किंमतच देत नाहीत. तेव्हा जाऊ द्या, टेस्ट-बिस्ट होऊन येऊ द्या-'

तो माणूस म्हणतो, 'याबद्दलच मला बोलायचंय्. इतके दिवस बोललो नाही, पण आता तर मी संकटात सापडतोय. म्हणून बोलावंच लागतंय. मी कुणाचं नांव सांगणार नाही. आपणही विचारू नका. मी जेव्हा प्रथम इथलं काम सुरू केलं, म्हणजे साईटवर आलो, तेव्हाच इथले काहीजण येऊन म्हणाले की आम्ही सरकारी पार्टीचे लोक आहोत, आम्हाला तुम्ही पाच पोती सिमेंट दिलं पाहिजे. मी कशा प्रकारे काय करतो हे तर आपण ऐकलंतच. पाच पोती सिमेंट दिल्यावर माझ्या हातात काय पडणार? मी त्यांना म्हणालो, 'भाऊ, अर्धंएक पोतं घ्यायचं असेल तर घ्या, पण इतकं सिमेंट कुठून देणार? पण ते काही राजी झाले नाहीत. त्यांना आपल्या घराबाहेरची जागा विटा-सिमेंटने बांधून घ्यायची होती. त्याला मी राजी झालो नाही म्हणून माझी ही अवस्था झाली. आधी ठाऊक असतं तर देऊन टाकलं असतं. पण पुढं इतकी भानगड होणार हे तेव्हां माझ्या लक्षात आलं नव्हतं. मी आजवर हे सांगितलं नव्हतं. पण आज सांगितलं नसतं, तर माझ्यावर संकट आलं असतं म्हणूनच सांगितलं. . .' तो माणूस खाली बसतो. फुलबाडीच्या लोकांमध्ये चर्चा सुरू होते. पण त्याच्याआधीच मणी आमदाराला हळू आवाजात म्हणतो, 'मी जरा बोलतो! त्यानंतर उठून उभा रहातो.

पण, त्याबरोबरच गयानाथ उठून उभा राहून म्हणतो, 'मणिबाबू, आपण सगळे, म्हणजे आपण, आमदार आणि इंजिनियर माझ्या क्रांतिहाटला आला आहात हे माझं सौभाग्यच. तेव्हा मी तुम्हाला चहा पाजणार. म्हटलात तर इथेच आणायला सांगतो,' 'आणा. चहा पाजणार है तर चांगलंच आहे,' म्हणून मणी हा गयानाथ आणि हाट कमिटीचे मेंबर पायऱ्या उतरुन खाली जाईपर्यंत वाट पहातो. त्यानंतर म्हणतो, 'मी एवढ्यात काही बोलणं उचित ठरणार नाही, मी अचानक इथं आलोय. पण मला वाटतंय की कुठंतरी काहीतरी गैरसमज झाला असावा, नाहीतरी अशी घटना का घडावी? एरवी इतके पूल तयार होतात, रस्ते तयार होतात. जरा आधी सावध झाला असता, तर बहुधा इतका गोंधळ झाला नसता. आमच्या इंजिनियरांनी जर आमच्या आमदारांच्या पत्राचं उत्तर दिलं असतं किंवा त्या दोघांमध्ये संपर्क असता, तर खूप पूर्वीच हा मामला संपला असता. कसं, इंजिनियर साहेब?'

इंजिनियरला इंगित समजतं. तो म्हणतो, 'ही आमची चूक झाली. पण मला वाटलं होतं मिस्टर मंडल-'

इंजिनिअरला थांबवून आमदार अचानक चित्कारतो, 'शेड्युल सीटच्या आमदाराचं ऐकणं ही तुम्हाला आपल्या प्रेस्टिजपेक्षा खालची गोष्ट वाटते, नाही का?'

मणी अचानक दचकून म्हणतो, 'हे काय म्हणताय् वीरेनदा?' आमदार मणीला म्हणतो, 'आपण चूप बसा, आपणाला हे समजणार नाही. आपणाशी तर काही हे लोक असं वागत नाहीत. आपण इंग्रजीत सांगायचं असेल तर इंग्रजीत सांगा. आमदार झालो नसतो तर मलाही हे समजलं नसतं. नाहीतर मालबाजारचा साधा एक असिस्टंट इंजिनिअर, माझं पत्र आधी मिळून सुद्धा तिथं हजर न रहाण्याची हिम्मत कशी दाखवू शकतो? याला जर जलपाइगुडी किंवा धूपगुडीच्या आमदाराने पत्र लिहिलं असतं, तर याने दहा वेळा तिथं जाऊन 'सर', 'सर' केलं असतं, तर होऊ द्या ना, विचार होऊ द्या. जाऊ द्या मिक्स्चर टेस्ट होण्यासाठी. पण त्यात जर दोष निघाला, तर एका गरीब ठेकेदारावर आणि एका शेड्युल-कास्ट मंडलवर त्याचा दोष थापणं चालणार नाही. ती जबाबदारी इंजिनियरांनी घ्यायला हवी.'

याला उत्तर म्हणून इंजिनियर काही बोलू पहातो, पण मणी हात वर करून त्याला थांबवतो. मणी उभाच असतो. वीरेनने गप्प रहावं या एकाच कारणासाठी तो उभा राहिलेला आहे. मणीने इंजिनियरला थांबवलेलं पाहून आमदार पुन्हा बोलू लागतो, 'त्यांना कशाला थांबवता, बोलू द्या ना, आता नवीन काय बोलणार? त्यांनी पाहिलं, ते सगळं टेस्ट बिस्ट म्हटल्यावरही आम्ही घाबरून गेलो नाही; साले त्या ठेकेदाराच्या माणसाकरवी म्हणू बघताहेत की फुलबाडीचे लोकच चोर आहेत म्हणून!'

फुलबाडांची माणसं एका सुरात ओरडतात, 'नाव सांगा, नाव सांगा-आम्ही त्याला बोलावून आणतो. फुलबाडीच्या गटातली दोनतीन माणसं उभी राहून इंजिनियर लोकांवर ओरडू लागतात. मणी त्यांच्या दिशेने हात करून म्हणतो, 'बसा, बसून घ्या.'

आमदाराचा राग त्याच वेळी पराकोटीचा वाढतो, 'काय करणार? ठेकेदारांची चोरी धरली तर आपणाला चोर म्हणणार, इंजिनियरांचा कामचुकारपणा पकडलात, तर आपणाला ठक बनवणार, कायद्याने चालायचं ठरवल्यावर आपणाला बेकायदेशीर वागणारे म्हणतात, उद्याच जाऊन वर्तमानपत्रं रेडिओवर प्रचार करणार-पुन्हा डूयार्स-मध्ये लोकन्यायालन-इंजिनियरांचा विचार?

मणी खाली वळून खूप झटकन काहीतरी म्हणतो, त्यानंतर सरळ उभा राहून ओरडतो, 'ऐका, आपण बसला नाहीत तर ही मीटींग इथेच संपवून टाकीन. बसा, बसा!'

या धमकीने फुलबाडीचे लोक बसल्याबरोबर मणी मोठ्या आवाजात सुरुवात करतो, 'हे पहा, दंगा-हंगामा सुरू व्हावा असं इथं काहीही घडलेलं नाहीय्. इथल्या इंजिनियरांच्या वर्तणुकीमुळे आपले आमदार खूप दु:खी झालेले आहेत. आमदार म्हणजे आपण सर्वांनी

मत दिल्याने निवडून आलेले आपले लोकप्रतिनिधी. त्यामुळे आमदारांचं दु:ख हे आपणा सर्वांचं दु:ख आहे. त्यांचं दु:ख आपण दूर करायला हवं. पण त्यांना तर काही वैयक्तिक कारणामुळे दु:ख झालेलं नाही. देशाच्या एका कामात असा गोलमाल झालाय् म्हणूनच त्यांना दु:ख झालंय्. सरकारी कारभाराचे नियमच वेगळे असतात. त्या नियमांमुळे बहुधा इंजिनियरसाहेबांना वाटलं की छोटे इंजिनियरच सगळं समजावून सांगतील. पण इंजिनियरसाहेबांनी आमदारसाहेबांना भेटणं योग्य झालं असतं. पण या सगळ्या रागावा-रागवीने तर काही आपल्या या प्रदेशाचं काम चालणार नाही. त्यानंतर आपण ठेकेदारांची बाजूही ऐकली. तेही अगदी छोटे ठेकेदार आहेत. ते जर आज कायद्याच्या कचाट्यात सापडले, तर मोठे ठेकेदार त्यांना वाचवायला येणार नाहीत, तेही आपल्यालाच पहावं लागणार. तेव्हा माझा प्रस्ताव असा आहे की, या सभेत तर मोकळेपणाने सगळी चर्चा झाली. आता या एका ब्रिजपायी दिल्ली-बिल्ली करायची गरज नाही. मालबाजाराला एक दिवस आमदार, इंजिनियर, ठेकेदार आणि आपल्या फुलबाडीचे दोन लोक एकत्र बसून सगळं ठरवा. ब्रिजचा एखादा भाग पाडून पुन्हा बांधायचा असेल, तर तो बांधून द्यायला हवा आणि एक-दोन पावसात ब्रिजचं काही नुकसान होतंय की नाही हे पहाण्यासाठीही वेळ द्यायला हवा.

अगदी याच वेळी, गयानाथ आणि त्याच्या हाट-कमिटीचे मेंबर पुढे-पुढे आणि एक मुलगा एक मोठी किटली, एक मुलगा एक घमेलं, दुसरा आणखी एक घमेलं घेऊन पायऱ्या चढून व्हरांड्यावर येऊन थेट सतरंजीच्या मध्यभागी आले. मीटींग जणू संपल्याप्रमाणे झाली. त्या संपलेल्या मीटींगवर दोन्ही हात वर करून मणी विचारतो, 'तर मग हे ठरलं ना? मी सांगितलं ते मान्य आहे ना?'

गयानाथ आणि मेंबर मिळून उपस्थितांना चहाचे ग्लास देतात. किटलीवाला मुलगा ग्लासांमध्ये चहा ओततो. - 'ए, नीट बघ, अंगावर सांडू नकोस.' सगळ्या ग्लासांमध्ये चहा देऊन झाल्यावर दुसऱ्या घमेल्यातून गयानाथ आणि मेंबर प्रत्येकाला एकेक समोसा आणि मिठाई द्यायला सुरुवात करतात.

अशा मिटींग जशा संपतात, तशीच ही मीटीगसुद्धा संपायला सुरुवात होते. विचारपूस, चर्चा, भांडणतंटा, रागावारागवी, समझौता, मेल-मिलाप, या सगळ्या टप्प्यांतून एकप्रकारची तृप्ती जाणवते. अगदी विशेष अशा निमित्ताशिवाय इतक्या रात्री इतकी माणसं एकत्रच एका ठिकाणाहून बाहेर पडताहेत अशा घटना क्रांतीहाटामध्ये फार घडत नाहीत. त्यामुळे, मिटींग संपण्यामध्ये एका नव्या अनुभवाचा आरामही येतो.

गाडी करून मालबाजाराला परत गेलेले मणी, आमदार आणि इंजिनियर, ठेकेदार आणि इथे सुहास यांना मात्र हा आराम वाटत नाही. काही प्रमाणात गयानाथलाही नाही.

एकावन्न

# एका मीटिंगचे तीन परिणाम

चहा-समोसा खात-खात मीटींग संपल्यावर सगळे वेगवेगळ्या गटांत विभागले जातात. क्रांतीहाटाचा गट मालबाजारची गाडी निघून गेल्यावर आपापल्या घरी निघून जाईल. गयानाथ आणि हाटकमिटीच्या सभासदांना आमदार सतरंजी तशीच ठेवायला सांगतो, म्हणजे फुलबाडीच्या लोकांना रात्री तिथे झोपता येईल, आणि सुहासजवळ तो ही मीटींग त्याच्या जागेत घेतल्याबद्दल वारंवार दिलगीर व्यक्त करतो. मिठाईचा दुकानदार गॅसबत्ती घेऊन जाण्यासाठी माणूस पाठवतो. तोच माणूस गॅसबत्तीच्या उजेडात रस्ता दाखवीत आमदार, इंजिनियर आणि मणीबाबूंना जीपगाडीसमोर घेऊन जातो. गाडी स्टार्ट होऊन तयारच असल्याने निरोप घ्यायला वेळ लागत नाही.

गाडी एक-दोन मिनिट चालल्यानंतर इंजिनियर आमदाराला म्हणतो, 'वीरेनबाबू, मी नकळत आपल्या भावना दुखावल्या. खरोखर, आपणाला दुखवायचं माझ्या मनात नव्हतं. आपण मनाला लावून घेऊ नका आणि या ब्रिजच्या मामल्याचा आपण विचार करू नका, ते मी पहातो.'

'आपण आधीच लक्ष दिलं असतं तर एवढा घोटाळा झाला नसता. त्यात लोकल एलेमेंट आहे हे मलाही ठाऊक आहे. आता हेच पहा ना, या जब्बरचे भाऊच कॉंट्रॅक्टरी करतात. इथं काम सुरू झालेलं पहिल्याबरोबर यांनी सगळीकडे ओरडा करायला सुरुवात केली की लोकल कॉंट्रॅक्टरकडेच काम द्यायला हवं, या मीटिंगमध्ये हेच उकरून काढलं असतं त्याने, फक्त त्याला संधी मिळाली नाही, एवढंच. आता हा एवढं बोलला, त्यावर खूप चर्चा होणार.'

'माझ्या लक्षातच आलं नाही सर, बोलता-बोलता बोलून गेलो.'

'अहो, तुम्ही हे बोलायला गेलातच कशाला? नावगाव तर तुम्ही काही सांगाणारच नाही, आणि अशा गोष्टी सर्वांसमोर थोड्याच बोलायच्या असतात?' सब-असिस्टंट इंजिनियर मंडल म्हणतो.

'जाऊ द्या, सोडून द्या. खरं तर हे लोकल इश्यूज वाढू देऊ तितके वाढतात. त्यांच्यात नाना प्रकाराचे इंटरेस्ट असतात. पोलिटिकल इंटरेस्टही काही कमी नसतात. आपण जरा टॅक्टफुली हा मामला हाताळा. वीरेनदा आपल्यावर रागावलेले असले, तर आपण काम करणार कुणासाठी? वीरेनदातरी इतके का रागावले? कुणीही लाथ मारली असती तरी ते रेलिंग ढासळलंच असतं. अजून त्यांचा पाय दुखत असेल-'

'अरे नाही, नाही. मी काय इतक्या जोरात लाथ मारायला गेलो होतो होय? पण

तुम्ही काहीही म्हणा, असं लेचंपेचं रेलिंग कुठल्याच पुलाला नसतं.'

'आपण आता याचा विचार करू नका सर. मी उद्या सकाळी ठेकेदार आणि मंडल या दोघांना घेऊन जाऊन, कशा प्रकारे काय करता येईल ते पाहून येतो. नंतर तुम्हाला कळवतो.'

त्या मीटिंगमध्ये जे लोक फक्त श्रोते आणि प्रेक्षक होते, त्यांची भूमिका समजावून घेण्याचा सुहास प्रयत्न करतो, पण ते त्याला जमत नाही. त्याला सगळी मीटिंग पाहिल्यावर समजतं, ते हे गावातल्या कुठल्याशा छोट्या नदीवर बांधलेल्या कल्व्हर्टमध्ये नियमाप्रमाणे सीमेंट-वाळू-लोखंड यांचं मिश्रण वापरलं होतं की नाही हे आमदाराच्या उद्वेगाचं खरं कारण. आणखी एक कारण म्हणजे त्याचं पत्र मिळून सुद्धा असिस्टंट इंजिनियरऐवजी सब-असिस्टंट इंजिनियर त्याला भेटायला आला, आणि आमदाराला तो 'सर' म्हणाला नाही. जर इंजिनियर फुलबाडीला गेला असता, तर अशा प्रकारची मीटिंग झाली नसती. जर कुठं काही घोटाळा असता, तर इंजिनियरच्या ऑफिसातच तो मिटवून टाकण्यात आला असता. आता होणार आहे, तसा. ज्या नियमांच्या आणि कायद्याच्या गोष्टी इंजिनियर करीत होता, त्या सुहासला पटू शकत नाहीत. त्याचं कारण हेच, की त्याच्या कामात हस्तक्षेप झाला असता, तर त्याच्या रक्षणाची एकमेव व्यवस्था हे सरकारी कायदेकानूनच आहेत. आणि एवढी मीटिंग-बिटिंग असूनही सगळ्यांच्या डोळ्यांसमोरच तर इंजिनियर त्यांच्या कृषक समितीच्या संयोजकाला गाडी करून घेऊन आला. हा माणूस केवळ इंजिनियरांच्या सुरक्षिततेची गॅरंटीच नव्हती, तर आमदाराशी झालेल्या भांडणाचीही मीमांसा करणार तोच होता.

या सरकारी नोकरीत शिरण्यापूर्वी सुहास ग्राम आणि शेतकरी यांच्या जागृतीच्या संदर्भातील संभाव्य पण अनिर्दिष्ट चिंतनात मग्न होता. अनिर्दिष्ट म्हणूनच त्यात अशा सगळ्या अत्यंत वास्तव घटनांना जागा करून देऊ शकत नाही सुहास, की सरकारी पार्टीचा माणूस असल्याच्या संदर्भात कॉंट्रॅक्टरजवळून थोडं सीमेंट वसूल करण्याचा प्रयत्न आणि ठेकेदाराच्या कामावर अशी नजर ठेवणं, घडू शकतं. खरं तर, घटनेच्या पोटात घटना, कार्यकारणभावाची शृंखला असल्याशिवायही असते. आणि त्याच एका घटनेची भूमिका दुसऱ्या भूमिकेवर नेहमीच निर्भरशील असत नाही, कधी-कधी वेगळी व स्वतंत्र होऊन जाऊ शकते, अशा शक्यतेची गोष्ट तर काही सुहासला ठाऊक नाही. म्हणूनच त्याच्या व्यक्तिनिरपेक्ष महत्तर-बृहत्तर कामना-वासनेला ग्रहणच लागलेलं ऱ्हातं. वीरेन्द्रनाथ रायबर्मनसारख्या एका स्थानिक आमदाराशी सरकारी नोकरीतल्या ऐतिह्यवान इंजिनियरांच्या या मुकाबल्यात आमदाराने इंजिनियरांना त्यांच्याच खेळाचे नियम वापरून जवळजवळ पराभूत केलं. टेस्ट हाऊसकडे परीक्षण करण्यासाठी अर्ज झाला, ते सुहासच्या दृष्टीने एक कौशल्य आहे एवढंच. हे कौशल्य आमदाराने शिकून घेतलं आहे हे त्याच्या लक्षात

येत नाही. इतकं परिस्थितिनिरपेक्ष राहिलं, तर सुहासला स्वतःच्याच भोवती गरगरत रहावं लागेल. सुहासने स्वतःभोवती आणखी एक वेढा घालून घेतला.

गयानाथ आपल्या घराच्या अंगणात प्रवेश करता-करताच ओरडतो, 'एऽ बाघारू, एऽ बाघारू!'

गयानाथचा आवाज ऐकून कुणीतरी आतून कंदिल घेऊन येतं. त्या कंदिलाच्या प्रकाशात गयानाथच्या घराची सावली जमिनीवर दूरवर पसरते आणि हेलकावते.

गयानाथची बायको आतून चीत्कारते, 'स्वतःच्या घरावर काय डाका टाकायला आलात की काय?'

असिन्दिर फटफटी ढकलीत-ढकलीत आत नेऊन ठेवतो. तो ओरडतो, 'एऽ, कोण आहे - जरा कंदिल दाखव इकडं. कंदील घेऊन येणारी व्यक्ती उभी रहाते, त्यानंतर त्याला रस्ता दाखवण्यासाठी कंदील उंच धरते.

गयानाथ पुन्हा चित्कारतो, 'एऽ बाघारू, बाघारू!' त्यानंतर अचानक आपल्या अगदी समोर बाघारूला पाहून तो दचकतो. म्हणतो, 'साल्या बैलोबा! उत्तर नाही देता येत? मुका असशील तर 'हम्मा' म्हणून का ओरडत नाहीस? जा, हट इथून, हट!'

बाघारू थोडा दूर सरकतो. पण अजून गयानाथ त्याच्या डोळ्यांकडे पाहू शकत नाही. 'बस तिथं! साला बैल! बस! नुस्ता जंगलातल्या सालाच्या झाडासारखा उभा राहिलाय!'

गयानाथचं बोलणं ऐकून बाघारू बसतो, जमिनीवर. कादचित रात्र असल्यामुळे असेल, बसल्यानंतर बाघारूसमोर गयानाथ जणू आणखी छोटा दिसतो. गयानाथ आपल्या पिचल्या आवाजात ओरडतो, 'काय सांगितलंस रे तू आमदाराला?'

बाघारू उत्तरतो, 'काही नाही सांगितलं!'

'काही नाही? आमदाराला फुलबाडीला नेताना काय सांगितलंस?'

'माझ नाव सांगितलं.'

'फार नाव कमवलंस, नाही का?'

'माझी जलमकथा सांगितली.'

'तू तर साला अवतार निपजलास एक, नाही का? स्वतःची जलमकथा स्वतःच दुसऱ्या माणसाला सांगतोस? आधियारीबद्दल सांगितलंस की नाही, आमदाराला?'

'कशाबद्दल?

'आधियारीबद्दल, आमदार आम्हाला म्हणाला, तूच आधियारी मिळावी असं सांगितलंस. आमदार मला म्हणाला, त्याला एक आधियारी द्या की! साला, जमीन माझी का त्या आमदाराची?'

'मी सांगितलं नाही.'

'सांगितलंस की नाही ते दाखवतो तुला. तू उद्या सूर्य उगवायच्या आत हा तिस्ताकाठ सोडून जा. नागराकाटाला डायना नदीच्या चरावर म्हशींचा गोठा आहे, तिथं रहा. समजलं?'

बावन्न

# बाघारू आणि चंद्र

दुसऱ्या दिवशी, रात्र संपण्याच्या आतच घरातून बाहेर येऊन बाघारू पहातो- प्रकाश पसरायला सुरुवात झालीय, आकाश हिरवंगार आहे, त्यावर चंद्र दिसतो आहे.

बाघारू जमिनीवर उतरतो. चंद्रही त्याच्याबरोबरच तडाक्दिशी उडी मारून आपलचांद फॉरेस्टच्या माथ्यावरून त्याच्या माथ्यावर येऊन पडतो. उडी मारून खाली आल्यावर बाघारूला थांबावं लागतं. चंद्रही आकाशात अडकून पडतो. बाघारू मैदानावरून दक्षिण हांसखालीच्या दिशेने चालू लागतो. चंद्रही त्याच्याबरोबर चालू लागतो. चंद्र नोटेवरच्या वॉटरमार्कसारखा आहे. चारीकडे प्रकाश पसरल्यावर तो दिसणार नाही. आकाश इतकं हिरवंगार आहे, की आता लवकरच उजेड होईल.

तिस्ता बाघारूच्या पाठीमागे आहे. त्याला तिस्तेकाठाहून निघून जायचंय. देउनिया अद्याप झोपेतून उठलेला नाहीय. असिन्दिरजावईही उठलेला नाहीय. उठल्यावर त्यांना दिसेल, बाघारू नाही. बाघारू सकाळी असणार नाही हे त्यांना ठाऊक आहे. ते बाघारूला हाका मारणार नाहीत.

आता बाघारूच्या डोळ्यांसमोरचं दृश्य स्पष्ट दिसू लागलंय. एक बिघा दूरवरचं मात्र स्पष्ट दिसत नाहीय. दूरवरची घरं धुक्यात बुडालेली आहेत. धुकं दूर व्हायला वेळ लागतो. दिवसभर झाडांच्या शेंड्यांपाशी, नदीच्या पाण्यावर काही प्रमाणात धुकं असतंच. हे आकाशाचं धुकं नाही- वनाचं किंवा नदीचं धुकं आहे. सरळ पहात चाललो, तर वाटतं आपण चंद्रप्रकाशात चाललो आहोत, समोर काय आहे ठाऊक नाही. आकाशाकडे पाहून चालल्यास बऱ्याच दूरवर पहाता येतं. बाघारू आकाशाकडेच पहातो.

गोचिमारीपासून हांसखालीपर्यंत बरीच जमीन उताराची आहे- तिन्ही बाजूंची सगळी जमीन चढाची आहे, काही काही ठिकाणी तर चढ खूपच सरळ आहे. या उतारावर हे हिरवं आकाश जणू झाकण आहे. गोचिमारीच्या उताराच्या मधला भाग एखाद्या कढईसारखा आहे. तिथे उतरल्याबरोबर चंद्र एकाच उडीत बाघारूच्या डोक्यावर येतो. चढामुळे आणखी काहीही दिसत नाही. दूर फॉरेस्टमधली झाडं पहाडाच्या अंगावर जंगल असल्यासारखी वाटतात. या खंदकात बाघारू आणि चंद्र समोरासमोर येतात.

बाघारू चंद्राकडे पाहून हसतो. हसून डावीकडे तोंड वळवतो- चंद्र उजवीकडे सरकतो. उजवीकडे तोंड फिरवतो, चंद्र डावीकडे सरकतो. बाघारू एक ढेकूळ उचलतो. ते चंद्राच्या दिशेने फेकण्यासाठी काही पावलं पळाल्यावर चंद्रही थांबतो. थोड्या दूरवर ढेकूळ खाली पडल्याचा 'धुप्!' असा आवाज येतो. मान जरा वर वळवून चंद्राकडे पाहून बाघारू पुन्हा हांसखालीच्या बांधाच्या दिशेने चालायला सुरुवात करतो. चंद्रही त्या दिशेने येऊ लागतो. आता बाघारूला पुन्हा थोडं-थोडं वरती चढावं लागतं. चंद्रही हळू हळू वरती जात रहातो- आणखी थोडा उत्तर दिशेकडे. आता मैदानावरची झाडं दिसू लागतात. फॉरेस्ट जमिनीवरच उतरतंय. तेवढ्यात चंद्र लपून जातो. चंद्र दिसत नसला, तरी कुठेतरी आहे हे बाघारूला ठाऊक आहे. तो हांसखालीच्या बांधावर चढतो. त्याला दिसतं चन्द्र ईशान्येकडे, त्याच्या अगदी समोर आहे. हा हांसखालीचा बांध किंवा हत्तीवाट सरळ आनंदपूर चहाच्या मळ्यात गेली आहे. आपलचांदमधून जो रस्ता ओदलाबाडीकडे जाणारा रस्ता डावीकडे टाकून बाघारू सरळ चालत जातो. चंद्र आणखी डावीकडे, फॉरेस्टच्या माथ्यावर जातो. बाघारू झाडांच्या मधल्या-मधल्या अंतरांतून चंद्र पहातो. फॉरेस्टमध्ये अद्याप अंधार आहे- रात्र संपत आलीय. त्या अंधारामधून आकाश अधिकच हिरवं आणि चंद्र आणखी स्पष्ट दिसतो- सकाळचा अस्पष्ट चंद्र नव्हे, रात्रीचा प्रकाशमान चंद्र. हत्तीवाट सोडून फॉरेस्टमध्ये प्रवेश केला, तर अद्यापही चांदणं दिसेल. फॉरेस्टमधल्या रात्रीच्या आडून चंद्र बराच पुढे जाऊ शकतो. मधून रेल्वेचे रूळ गेले आहेत- ते जणू फॉरेस्टचे दोन भाग करतात. बाघारू उजवीकडे वळतो, उभा रहातो. फॉरेस्टमधल्या रात्रीवर चंद्र आकाशात उजवीकडे आहे. बाघारू रेल्वेरुळांकडे तोंड करून उभा आहे. रेल्वेरुळांवर झाडंझुडपं नाहीत. म्हणूनच थोडा प्रकाश आहे. थोडं अंतर गेल्यावर तो प्रकाश पुन्हा कमी झालाय. रेल्वेरूळ संपूर्ण दिसतील, इतका प्रकाश अद्याप आकाशात आलेला नाही. आकाशाच्या हिरव्या आणि नदीच्या वाळवंटाच्या पांढऱ्या रंगांमध्ये, त्या अंधारानंतर, रेल्वेरूळ जणू संपले आहेत असं वाटतं. वाटतं, तिथं जरा आणखी उजाडलं आहे.

बाघारू ज्याप्रकारे रेल्वेरुळांजवळ थांबलय. त्या पध्दतीने साधारणतः जंगली जनावरं थांबतात- जणू कुठं जावं, हे त्यांना समजत नाही. आपले लांबलांब दोन हात हलवून, फॉरेस्टचा वारा चाळवून बाघारू फॉरेस्टच्या गंध उरात भरून घेतो. एकदा उजवीकडे मान वळवून हत्तीवाटेच्या बाजूने आनंदपूरकडे पहातो. पुन्हा मान वर करून आकाशातल्या चंद्राकडे पहातो. शेवटी उजवीकडे वळून सरळ चहाच्या मळ्याकडे चालू लागतो.

आता, बाघारू जितका मळ्यांच्या दिशेने पुढे जातो, तितकाच चंद्र झाडांच्या फांद्यांमधून तिस्तेच्या दिशेने मागे पडत जातो. आनंदपूर मळ्यात शिरल्यावर बहुधा मान वळवूनही चंद्र दिसणार नाही. आणखी थोडं उजाडलं तर आहेच - जास्त वेळ आकाश हिरवं रहाणार नाही. प्रकाश वाढल्याबरोबर आधी निळं, आणि त्यानंतर पांढरं व्हायला

सुरुवात होईल. तेव्हा वॉटरमार्कसारखा चंद्र दिसणार नाही. बाघारूच्या चालण्याच्या विरुद्ध दिशेला आता चंद्राची गती असल्याने चंद्र तिस्तेवर जाऊन स्थिर होईल. वरती निळसर पांढरं आकाश, खाली तिस्तेचं पांढरंच पाणी- चंद्र तेव्हा कुठं मिसळून जाणार?

आता हे फॉरेस्ट, शेतीवाडी, नदी, हाट, वाडीवस्ती, वाटा, भिजलेलं गवत, वेळूची बनं, चहाच्या मळ्यातल्या फॅक्टरीचे पाईप- या सगळ्यांमुळेच एक नवंच जग तयार झालंय- पुन्हा एका नव्या दिवसासाठी.

त्या नवीन दुनियेत याक्षणी फक्त बाघारू आहे. आणि चंद्र आहे.

## त्रेपन्न

# सकाळ होण्याआधीचा चहाचा मळा

बाघारू, मैदानांतून, शेतांमधून, जंगलामधून जसा एरवी फिरतो, तसाच आताही फिरतो आहे. नदीच्या उथळ पाण्यांतून किंवा फॉरेस्टच्या जंगलातून चालणं वेगळं असतं - अंग ढकलीत ढकलीत चालावं लागतं. बाकीचं चालणं एकाच प्रकारचं असतं- उंच आकाशात पंख पसरून पक्ष्याच्या उडण्याप्रमाणे तरंगत - तरंगत चालणं, पावलांमुळे फारशी धूळ उडत नाही, फार भारही पडत नाही - स्वतःचं वजन वगळताः तिस्तेच्या जबरदस्त ओढ असलेल्या प्रवाहात सालाचे वृक्ष जसे हलके होऊन जातात, त्याचप्रमाणे दूरवर पसरलेल्या या मैदानाच्या ओढीने बाघारूचं उंच शरीर, रुंद छाती-पाठ, लांब हात, मजबूत खांदे आणि दोन्ही पाय निर्भार होतात.

पण मैदानालाही एक ओघ आहे आणि बाघारूही सालवृक्षासारखाच, त्यामुळे त्याचं चालणं मातीशी लयबद्ध होऊन जातं. इतकं, की जणू मातीच चालतेय- फॉरेस्ट, हाट, वाडी-वस्ती यांच्यासह ही मातीच चालतेय. तेव्हा समोरून कुणीही येवो, गती कमी करता येत नाही. एकतर बाघारूला धक्का खाऊन पडावं लागणार, किंवा समोरच्या अडथळ्याला तरी.

बाघारू तर काही रस्त्याने चाललेला नाहीय. रस्त्यात समोर अनेक गोष्टी दिसतात, रस्ताही त्याच्या दोन्ही बाजूंशी मिसळून गेलेला नसतो, रस्त्याच्या दोन्ही बाजू बदलत असतात, रस्ता अलगच रहातो.

पण म्हणून मैदान किंवा जंगलातून जाताना बाघारू काही हत्तींच्या किंवा म्हशींच्या कळपांप्रमाणे समोरचे अडथळे दूर करीत, तोडीत, फेकून देत जात नाही. त्याच्या पावलांचीही एक अचूक अशी शैली आहे. त्याला चालसाच्या पूर्वेला डायना नदीच्या चरात पोचायचं असेल, तर सरळ ईशान्येकडे चालत जावं लागणार. इथून सरळ तिरपं

गेलं, तर अंतर कमी आहे. पण शॉर्टकट घेण्यासाठी बाघारू काही आपला ओळखीचा रस्ता सोडू शकत नाही.

आनन्दपूर चहाच्या मळ्याला एक प्रवेशद्वार आहे. दरवाजाआधी एका मोठ्या नाल्यावर लोखंडाचे पाईप टाकून तयार केलला कल्व्हर्ट आहे. गुरं किंवा वासरं-करडं आत जाऊ शकत नाहीत, पाईपवरून त्यांचे पाय घसरतात आणि पाईपस्मधल्या जागेत अडकतात. गेट बंद असला, तरी माणसांना येता-जाता यावं म्हणून गेटजवळ दोन लोखंडाच्या खुंट्या ठोकलेल्या आहेत. तिथूनच मळ्याला घातलेलं काटेरी कुंपण सुरू होतं.

आनंदपूर मळ्याचा दरवाजा ओलांडल्याबरोबर सकाळ की झाली, हे बाघारूच्या लक्षात येत नाही. आतापर्यंत बाघारू चालत आला, तेव्हा आकाश, प्रकाश, झाडंझुडुपं, वारा सगळं एक होतं, एकमेकांत जणू मिसळून गेलेलं होतं. आनंदपूर मळ्यात सगळंच वेगळं-वेगळं, अलग-अलग दिसत होतं. दोन्ही बाजूंना चहाच्या मळ्यातले वाफे. त्यांच्यावर झाडांचे शेंडे. वाफ्यांच्याभोवती तारेची कुंपणं, त्यांच्यापलीकडे खोल नाली. या नालीमुळे हत्ती वाफ्यांमध्ये घुसू शकत नाहीत. माणसांना ये-जा करण्यासाठी अधूनमधून विटांच्या पायऱ्या, तर कुठे लाकडी पायऱ्या आहेत. दोनेक ठिकाणी पुन्हा माणसांना प्रवेश करण्यासाठी थोडं अंतर असलेल्या लोखंडी खुंट्या.

मैदान, वन पार करून चहाच्या मळ्यात आल्यावर बाघारूला फक्त रंग दिसतात. पत्र्याचं छत असलेल्या बंगल्याच्या छताचा रंग हिरवा आहे, दरवाजाखिडक्यांचा रंगही हिरवाच बंगला आहे बाबूंचा, चारीकडच्या इतक्या हिरव्या रंगामध्येही हा हिरवा रंग नजरेला वेगळाच दिसतो. रस्त्याच्या वळणांवर लाल-पांढऱ्या खुंट्या दूरपर्यंत दिसतात. त्यांना जणू अंतच नाही. एक वळण पार करताना मागे-पुढे पाहिल्याबरोबर दिसतं, चारीकडे रांगेत वळणांमागून वळणं, वळणांमागून वळणं आहेत. आणि वळण म्हणजेच रस्ता, रस्त्यामागून रस्ता. एकाच प्रकारच्या शिरीष झाडांखाली, एकाच प्रकारच्या चहाच्या मळ्यात, एकाच प्रकारच्या रस्त्यात त्यानंतर एकाच प्रकारची वळणं घेत घेत सरळ रस्त्याचाच एक भूलभुलैया तयार होतो. या रस्त्याने कितीतरी लोक जातात. इतक्या घरांमधूनही कितीतरी लोक रहातात. छोट्या-छोट्या व्हरांड्यांची घरं, लांब-लांब व्हरांड्यांची घरं, धाब्याची घरं, पत्र्याची घरं, लाकडाची घरं, मातीची घरं.

आनंदपूरचे लोक अद्याप झोपेतून उठलेले नाहीत, किमान ऑफिस आणि फॅक्टरीच्या रस्त्यांवर आलेले नाहीत. पण गोचाबाडीतून पुढे आल्यावर, सकाळी हांसखालीच्या बांधावर हत्तीवाटेवर, आकाशाचा आणि मातीचा जो रंग होता तो आता बदलतो. शिरीष वृक्षाची छावणी आणि चहाच्या झाडांच्या माथ्यांच्या मध्ये दुसरं काहीही नाही- जागा मोकळी आहे. आकाश नाही, माती नाही; आकाश आणि माती यांच्यामधील

ही जागा रिकामी आहे. आणि चहाच्या मळ्यात ही मधील जागाच तर खरी महत्त्वाची असते. या मधल्या मोकळ्या जागेतूनच प्रकाश पसरतो.

बाघारू त्या पहाटे, दैने-बायें करीत-करीत, मळ्याच्या पूर्व सीमेच्या दिशेने चालत रहातो- बाहेर पडण्यासाठी. पूर्वेच्या गेटमधून बाहेर पडून उजवीकडे वळून मैदानाशेजारच्या बारघरियात जाण्यासाठी. पण एका वळणावरून उजवीकडे पाहून तो वळतो-वाटतं, इकटचं कुंपण ओलांडून तिकडच्या मैदानात उतरता येईल.

पण पुढे गेल्यावर त्याला दिसत, की कुंपण ओलांडावं लागणार नाही, बाहेर जाण्यासाठी रस्ता ठेवलेला आहे- 'व्ही' आकारात दोन लोखंडी खुंट्या रोवून.

बाहेर जाण्याचा रस्ता, इतका पाऊस होऊनही मजबूत आहे. पायवाटेवरही गवत उगवलेलं नाही. रस्त्यानंतर रस्ते, वळणानंतर वळणं, वळणावळणांवर कुंपण असलेले चहाचे मळे, त्यांच्यामध्ये छत्रीसारखी शिरीषाची झाडं, बाघारू बांधांमागून बांध ओलांडून मैदानात उतरतो. या सामान्य उंचीवरून बाघारूला वाटतं, या शेताभोवतीचे बांध हिवाळ्यांतल्या नदीसारखे आहेत, कुठे त्यांची सुरुवात आहे, कुठे वहात चालले आहेत, कुठे अरुंद आहेत, तर कुठे रुंद आहेत.

मैदानात उतल्यावर मात्र तसं वाटत नाही. तेव्हा मैदानाचाच दूरचा एखादा भाग त्याच्यापैक्षा वरती, पुन्हा समोरच्या बांधावरच एक छोटं झाड आहे. मळ्याजवळची जमीन उताराची आहे. त्या जमिनीवर भातशेती चांगली होते. पण त्या जमिनीनंतर बरड जमीन सुरु होते. आता तर चहाचा मळा आणि फॉरेस्ट सुरू होणार, शेतजमीन कमी होणार. शेतीबाडी तिस्तेकाठीच चांगली आहे.

त्या जमिनीच्या काठाकाठाने चालताना बाघारूला दिसतं, समोर आकाश लाल झालंय. बाघारूला आनंद होतो. गोचिमारीला घरातून बाहेर पडता-पडताच सूर्य उगवला असता, तर त्याला सूर्योदय पहाता आला नसता, कारण सूर्य त्याच्या पाठीमागे पडला असता. अर्थात आकाशातला रंगांचा खेळ त्याला पहाता आला असता. पण आता तर त्याच्या अगदी समोर सूर्योदय, हा उतार पार करून गेल्याबरोबर. जणू सूर्योदयासाठीच बाघारू बारघरियाच्या या मैदानात आलाय, अशा पद्धतीने तो उड्या मारीत पुढे जातो.

डांगामध्ये तो उभा रहातो. त्याच्यासमोर बारघरियाचं मैदान-नैऋत्येकडे कान्तदिघी - कुमारपाडापर्यंत कान्तदिघी-कुमारपाडाच्या बाजूनेच सूर्योदय होतो. आता, सूर्याला उजवीकडे ठेवून बाघारूला सरळ उत्तरेला जायचंय. पण सूर्योदयाला सामोरा आलेल्या बाघारूला जणू हलता येत नाही. तो तसाच उभा रहातो. त्यानंतर, जणू एखादी चांगली जागा निवडतो, आणि एका बाभळीच्या झाडाखाली उभा रहातो. त्याच्यासमोर, अर्धवर्तुळाकार मैदानाच्या क्षितिजावर सूर्योदयाची रोजची धारावाहिकता सुरू झालीय.

## चोपन्न

# बाघारू आणि सूर्योदय

कान्तदिघी कुमारपाडाच्या दिशेने चेहेरा करून बाघारू उभा रहातो. त्याच्या पूर्वेला आहे कुमलाई, कुमलाईच्या पूर्वेला आहे माथाचुलका, माथाचुलकाच्या पूर्वेला आहे धुपझोरा. बाघारूला या सूर्योदयाचा भूगोल इथपर्यंतच ठाऊक आहे. तो जिकडं चाललाय, त्या डायना नदीच्या जंगलात तर पूर्व दिशा आहे. त्या सगळ्या पूर्वेकडील ठिकाणांची नावं त्याला ठाऊक नाहीत. सूर्य तर तिकडूनच उगवतो. पूर्वेचा रस्ता तिथून आणखी पूर्वेकडे, आसामच्या दिशेने गेलाय. त्या सगळ्या पूर्वेकडे हाच एक सूर्योदय आहे. आता बाघारू त्याला ठाऊक नसलेल्याच त्या पूर्वेकडे चाललाय, त्यामुळे ज्ञात- अज्ञात अशी सारीच पूर्व दिशा बाघारूसमोर उघडलीय.

कान्तदिघी - कुमारपाडा आणि कुमलाईचं आकाश आता अग्नीच्या रंगाचं झालंय. त्या रंगाने फॉरेस्टमधल्या मोठमोठ्या वृक्षांच्या शेंड्यांना स्पर्श केलाय. इतक्या दूरवरून फॉरेस्ट हिरव्या रंगाचं दिसत नाही, राखी रंगाचं दिसतं. जिथं अग्नीसारख्या रंगाने स्पर्श केलाय, तिथं राखी रंग जाऊन दुसरा रंग दिसू लागलाय. दूरवरून वाटतं, फॉरेस्टमध्ये एकेका वेगवेगळ्या झाडाला जणू आग लागलीय; झाडंपेडं, पाणी - जंगल यांचे रंग अलग - अलग होऊन जातात.

पण सूर्याचा हा आगीसारखा रंग संपूर्ण आकाशभर एकाच प्रकारे पसरलेला नाही. गयानाथच्या घरापासून बाघारूच्या डोक्यावर जे आकाश आलं आहे, 'हिरवं-हिरवं,' त्या आकाशात खूप दूरपर्यंत आगीच्या रंगाचा फाळ गेला आहे आणि त्या आकाशातून जणू हिरवाई उगवून आली आहे.

आकाशाच्या हिरव्या रंगाखाली, कुठे-कुठे काही-काही ढग होते. त्या सगळ्या ठिकाणी आकाशाचा रंग, मेघांचा रंग, प्रकाशाचा रंग मिसळून आणखी नानाप्रकारचे रंग तयार झाले होते.

कुठला रंग कुठं सुरू झाला होता आणि कुठे दुसऱ्या रंगात मिसळला होता, हे दिसतही नव्हतं आणि समजतही नव्हतं. पापणी लवते न लवते एवढ्या वेळात रंगाची छटा बदललीय. आगीसारखा रंग दूर-दूरपर्यंत पसरलाय. अगदी पश्चिमेला तिस्तानदीच्या काठापर्यंत, त्याच्याही पश्चिमेला जलपाइगुडीपर्यंत, त्याच्या पश्चिमेला आजगंजपर्यंत- सगळीकडचं आकाश लालभडक होऊ लागलंय. कुमलाईकडचा रंग जरा फिकट होऊ लागलाय. कुणीतरी जणू हा लाल रंग धुवून टाकू पहातंय. तिस्तेकाठच्या पश्चिमेपर्यंतचा रंग आता फिकट होऊ लागलाय. प्रकाश पसरू लागलाय.

पूर आलेल्या तिस्तेत उडी घेण्याआधी ज्याप्रमाणे बाघारू समोर, आस-पास मान

फिरवून-फिरवून प्रवाहाची दिशा आणि जोर समजावून घेतो, मनातल्या मनात एक नकाशा तयार करतो, त्याच प्रमाणे तो आता उजवीकडे आपलचांदच्या दिशेला पहातो- 'उंच उंच जाडांच्या शेंड्यांना आग लागलीय जणू'- मागे वळून डोक्यावरच्या बाभळीच्या झाडाकडे पहातो- 'पानं कशी सळसळताहेत- जणू बरसात होतीय'- बाघारू आपल्या स्वतःच्या शरीराकडे पहातो - बाघारू पायातळीच्या गवताकडे पहातो- 'गवताची सगळी पाती जणू आरशाची होऊ लागली आहेत-'

प्रकाशाच्या त्या वर्षावात बाघारू उभाच रहातो. इतकं दूर इतक्या वेगाने चालत आल्याने त्याच्या अंगाला घाम येऊ लागलाय. ब्रह्मडांगाच्या एका सीमेवर उभं राहून दुसऱ्या सीमेवर होऊ लागलेला सूर्योदय पहात बाघारू घामेजतो. बारघरियाच्या मैदानावर अगदी याच वेळी तो चढून आला नसता, तर त्याला हा सूर्योदय दिसू शकला नसता. गोचिमारीहून हांसखालीच्या रस्त्यावर गेला असता, तर तो मागे राहिला असता. हत्तीवाटेने गेला असता, तर तिरपा राहिला असता. आनंदपूर मळ्याच्या मधून गेला असता, तर उजव्या कोपऱ्यात राहिला असता. बाघारू या बारघरियाच्या मैदानावर कधी पोचतो याचीच वाट पहात जणू सूर्य उगवायचा आत्तापर्यंत थांबला आहे. त्यामुळे बाघारूला उभ्या-उभ्या सूर्योदय पहायलाच हवा, पहाण्यासाठी उभं राहून घामेजायलाही हवं.

हे असं आसापास पहाताना आणि घामेजताना बाघारूच्या लक्षात येतं- 'अरे, मी मोकळा - मोकळाच उभा आहे की!' खरोखर, तो उघड्या शरीराने उभा असल्याने आपल्या शरीराची भारहीनता त्याला जाणवते. त्याच्या खांद्यावर नांगर नाही- गयानाथचा नांगर. 'माझ्या खांद्यावर झाड नाही- गयानाथचं झाड', बाघारूला गयानाथने हाकलून दिलंय. डायना नदीच्या जंगलात त्याच्या म्हशींचा गोठा आहे- बाघारू तिकडेच चाललाय. पण चाललाय, ते केवळ या शरीरानेच ब्रह्मतलाच्या या सूर्योदयासमोर, निर्वासनाच्या मार्गावर, बाघारूच्या शरीरात - मनात कसा मुक्तीच्या जाणीवेचा संचार होतो! ती जाणीव समजून घेण्यासाठी तो स्वतःच स्वतःच्या शरीराकडे पुन्हा-पुन्हा पहातो.

कुणा अदृश्य आडोशामागून होणाऱ्या या रंगांच्या उधळणीमुळे आणि स्वतःच्या शरीराच्या मुक्तीमुळे बाघारू हसतो. बाघारू तर काही आपल्या अंगप्रत्यंगानी वेगवेगळं काम करू शकत नाही. तो जे काही करतो. ते आपल्या साऱ्या शरीरानेच करतो. बाघारू केवळ ओठांनी हसू शकत नाही, त्यामुळे या रंगांच्या धक्क्यामुळे बाघारूच्या साऱ्या शरीरालाच हसू फुटतं आणि शरीर कंपित होत रहातं- वाऱ्याने हलणाऱ्या शिरीषाच्या वृक्षासारखं. बाघारूचं तर शरीराव्यतिरिक्त काहीही नाही - तेही पुन्हा इतकं भव्य शरीर आहे, की त्याचं फक्त शरीरच आहे म्हटलं, तरी तो तितका सर्वस्वहीन वाटत नाही. एवढं भव्य शरीर रंगीत प्रकाशाच्या स्पर्शाने रोमांचित होत रहातं.

शरीरावरील हे रोमांच तर काही बाघारूच्या परिचयाचे नाहीत. किंवा, जे-जे या रोमांचांइतकं व्यक्तिगत आहे, असं काहीच त्याच्या परिचयाचं नाही. म्हणूनच बाघारू

आपल्या स्वतःच्या शरीराच्या कंपनामुळे स्वतःच हे-हे करून हसतो. असं एकट्यानेच हसलेल्या स्वतःच्या हसण्याच्या आवाजाने बाघारू आणखी हसतो. आणि त्यामुळेही त्याला पुन्हा आणखी हसू येतं. स्वतःच्या हसण्याचा आवाज काही बाघारूच्या फार परिचयाचा नाही.

दोन्ही हातांनी चेहेरा झाकून बाघारू आपलं हसू झाकू पहातो. त्याचे हात इतके कठीण आहेत, की आता त्याला आपली बोटं वळवता येत नाहीत. पण हात असल्यामुळे तळवा आहे, आणि तळवा असल्यामुळे ओंजळ करता येते. चेहेरा झाकण्यासाठी बाघारूने दोन्ही हात उचलल्यावर तळहात प्रकाशाने, प्रकाशाच्या रंगाने भरून जातात, जणू बाघारूने वाकून मैदानातूनच आपल्या ओंजळीत रंग आणि प्रकाश भरून घेतला आहे. आता त्याच्या डोळ्यांसमोर दोन्ही तळव्यांमधून तो रंगीत प्रकाश झरझर करीत त्याच्या शरीरावर पडतोय.

स्वतःच्या हाताच्या ओंजळीतून, स्वतःच्या शरीरावर, पहिल्यांदाच रंग प्रकाश ओततोय बाघारूचं शरीर पहिल्यांदाच जणू त्याचं स्वतःच झालं आहे.

दोन्ही हात डोक्यावर धरून, डाव्या हाताने उजव्या हाताचं मनगट धरून बाघारू आपली पाठ मागे धनुष्यासारखी वाकवतो. कच्च्या बांबूप्रमाणे त्याचं शरीर हलत रहातं आणि त्यामुळे त्याच्या पायाच्या वाटीचे, छतीचे, पोटाचे स्नायू फुलतात. बाघारू आळस देतो. पुन्हा मागे वळून दोन्ही हात डोक्यावर उचलून धनुष्यासारखे वाकवतो, समोरच्या दिशेने खांद्यावर, मानेवर, पाठीवर, बाहूंवर, कमरेवर, छातीवर जे ऊन पडतं, त्याची ऊब, त्याचा स्वाद घेताना बाघारूला खूप छान वाटतं. तो थोडा वळून उभा रहातो- डावीकडे, प्रकाश त्याच्या उजव्या छातीवरून ओटीपोटावर उतरतो. थोडा वेळ त्या अवस्थेत थांबून बाघारू उजवीकडे वळतो प्रकाश त्याच्या उजव्या बरगड्यांपासून तर उजव्या ओटीपोटाला लपेटून घेतो.

उभे राहून, वळून पाहिल्यावर बाघारूला दिसतं, सूर्याचे पहिले किरण तीक्ष्ण रेषेत मैदानाच्या वरील भागाकडून वेगाने सों - सों करीत बाघारूच्या दिशेने धावत येताहेत. बाघारू प्रकाशाच्या दिशेने धावायला सुरुवात करतो, पण तो पोचण्याआधीच प्रकाश सगळीकडे पसरतो. बाघारू जमिनीवर उताणा पडून सर्वांगाला प्रकाश माखून घेत रहातो.

## पंचावन्न

# बाघारूला संगीतलाभ होतो

बाघारियाचं मैदान सोडून बाघारू निपुछापूरच्या दिशेने चालायला सुरुवात करतो. सूर्योदयाच्या दिशेने पहात बाघारू गुणगुणू लागतो. गुणगुणणं थांबवीत नाही. पुन्हा पुन्हा

गुणगणतो, आणि चालता चालता डोलतो :

'उठेन उठेन बेला ठाकुर चिकचिक्यानि दिय्या
उठेन उठेन बेला ठाकुर आगुन-टकटक हय्या
खुलि दिछु देहबाडि छयांका दिय्या जान
जल जाउक, हिम जाउक, खाडाउक शरीलखान!'

कुशीतल्या तान्ह्या बाळाला तेल माखून, सूर्याच्या दिशेने धरून झुलवता-झुलवता आया हे गाणं गातात: 'उठा उठा सूर्यदेवा. . .' बाघारूच्या हातांमध्ये कधीच बाळ झुललेलं नाही. आणि सूर्याच्या दिशेने धरून झुलवण्यासारखं बाळ बाघारूच्या हाती नाही, त्यामुळे बाघारूने स्वतःलाच झुलवावं. जितकं गुणगुणाता येईल, तितकी गुणगुण करो. बाघारू आता आपलं स्वतःचंच बाळ आहे.

बाघारू गाणं थांबवीत नाही. हे गाणं एकदा डोक्यात शिरलं, की बाहेर जायचं नांवच घेत नाही. त्यात आता चालतानाचं डोलणं आणि गाण्याची लय एकमेकांत मिसळून गेले आहेत. चालणं थांबणार नाही, तोयपर्यंत ही गुणगुणही थांबणार नाही. हे झुलणं हे गाणं बाघारूच्या बालपणीच, जन्मवेळीच त्याच्या डोक्यात शिरलंय. त्यानंतर पक्षाची शीळ, जनावरांची तोंड आणि प्रकाश वाऱ्याची गती जशी क्षणात ओळखीची होऊन जाते, त्याप्रमाणे तशी वेळ आली, की लगेच 'ही गाणी या लांबच्या चालण्यामध्ये, आपल्याबरोबर येतात, मुंग्यांसारखी येत रहातात एका रांगेने, एकामागून एक, कुठून येतात आणि कुठे जातात देव जाणे.'

बाघारू चालता-चालता डोलतो आणि डोलता-डोलता गुणगुणतो-

'बेला ठाकुरेर माई गे
सिन्दुर फेल्यान केने, सिन्दुर फेल्यान केने?
ना फेलिछु, जा फेलिछु, कौटो उलटि गेईछे
दावा लालाईछे ताय।'

(सुर्यदेवाच्या आई, कुंकू का सांडलंस? सांडलं नाही, सांडलं नाही, कुंकवाचा करंडा उलटला. म्हणूनच आकाश लाल झालंय.)

बेला ठाकुरेर माई गे
जल ढालिछेन केने, जल ढालिछेन केने?
ना ढालिछु, ना ढालिछु, छोयाक नोहाईछु
माटि भिजेन ताय।

(सूर्यदेवाच्या आई, इतकं पाणी का ओतलंस? पाणी नाही ओतलं, पाणी नाही ओतलं, बाळाला आंघोळ घातली, ह्याच पाण्याचे जमीन भिजलीत.)

'बेला ठाकुरेर माई गे

झांटा झाडिछेन केने, झांटा झाडिछेन केने?
ना झाडिछु, ना झाडिछु, छोयाक शुकाईछु
बाव उठेन ताय।

(सूर्यदेवाच्या आई, सकाळी इतका वारा कसा? इतका गार वारा कसा? पदराच्या वाऱ्याने बाळाच्या अंगावरंच पाणी सुकवतेय, त्यामुळेच वारा येतोय.)

'बेला ठाकुरेर माई गे
घर धोया कईचछिस केने, घर धोया कईचछिस केने?
ना करिछु, ना करिछु, छोयाक छाडि दिम
एगिना धुछि ताई।

(सूर्यदेवाच्या आई, घरदार एवढं धुवून आकाश निळंभोर कसं करता आहात? धुवीत नाहीय. पुशीत नाहीय, बाळाला अंगणात सोडायचंय, म्हणूनच आकाश धुतेय.)

'बेला ठाकुरेर माई गे
छोयाक छाडेन केने, छोयाक छाडेन केने?
मोर छोयाटार छयांक नागिले तोर छोयाटा उठे
छोयाक छाडिछु ताई।

(सूर्यदेवाच्या आई, मुलाला का बाहेर सोडलंस? माझ्या मुलाच्या चाहुलीने तुझा मुलगा उठावा, म्हणून.)

'हेई गे मोर बेटाखान
हेई गे मोर छोयाखान
हेई गे मोर छावा - छोटर घरखान
निन्द भांगि उठी गई छे
हां करिछे, भ्यां करिछे
आर तोर छोयाख़ानेक देखि पुटापुटाईया हासिबार धईरिछे' ।

(माझा मुलगा उठला, त्याची झोप झालीय, जांभई देतोय, रडतोय आणि तुझा मुलगा सूर्याकडे पाहून हसतोय.)

'उठेन उठेन बेला ठाकुर चिकचिक्यानि दिय्या. . .' बाघारूच्या गाण्याबरोबरच आकाशाचा लाल रंग धुवून जातो आणि ते निळ्याशार रंगाचं होतं. आणि कान्तदिघी कुमारपाडा, कुमलाई, माथाचुलकाच्या मागून हा जो सूर्य उगवला आहे, तो आता साऱ्या जगात उगवला आहे, किमान बाघारूच्या साऱ्या जगात उगवला आहे.

त्या जगाच्या एका सीमेपासून दुसऱ्या सीमेकडे बाघारू चाललाय. त्याच्यासमोर आता बारघरियाचा उतार आहे. उतार पार करून जाताना बाघारूच्या शरीराचं डोलणं आणि गाण्याची लय कधी विरून जाते, ते कळत नाही.

गाण्यात बाळ असल्याशिवाय सकाळ नाही. बाळाशिवाय कविता नाही. त्यामुळे आता बाघारू स्वतःच बाळ आहे.

छप्पन्न

# मजुरांचा दैनिक उत्सव

सायरन झाल्यावर निपुछापूर चहा-मळ्याच्या लाइन्सजवळून सगळे बाहेर पडतात. प्रत्येकाच्या खांद्यावर छत्री आहे. काहींच्या खांद्यावर कापडी थैल्या आहेत, छोटी फावडी आहेत, कुदळी आहेत, कोयते आहेत. प्रत्येकजण खांद्यावर जे झुलतंय किंवा अडकवलंय. त्याप्रमाणे चालतोय. ज्यांच्या खांद्यावर फक्त रुमाल आहेत, ते स्वतःला हवं तसं डुलत-डुलत चालले आहेत. ज्यांच्या खांद्यावर कुदळी आहेत, त्यांनाही थोडं डुलता येतंय. पण ज्यांच्या खांद्यांवर कोयते आहेत किंवा सुऱ्या आहेत, ते आपला तो खांदा हलवीत नाहीत.

पुरुषांपैकी बऱ्याच जणांनी हाफ-पँटस् घातल्या आहेत- समोर-मागे खूप शिलाई आणि खिसे. अंगात नाना प्रकारचे गंजीफ्रॉक- गोल गळ्यांचे, कॉलरचे, 'व्ही'कॉलरचे, काहींच्या कॉलरवर नक्षी आहे, छातीवर, पाठीवर डिझाईन आहे. गंजीफ्रॉक्सचे रंगही वेगवगळे आहेत. पण सगळ्यांचेच रंग उडून गेले आहेत. क्वचित एखाद्या गंजीचा रंग ताजा दिसतो. वयस्करांपैकी काहीजणांनी धोतरं नेसली आहेत- गुडघ्यापर्यंत वर उचललेली, वरती बनियन. काहींकाहींनी खाकी हाफ-पँटस्मध्ये हाफशर्ट खोचले आहेत. बरेचजण अनवाणीच आहेत. क्वचित एक-दोन-जणांच्या पायात मोज्यांसह बूट आहेत- चकचकीत. दोनेकजणांच्या हातात छोट्या स्टिक्ससुद्धा आहेत. केडस् असलेलेही काहीजण आहेत. जणू खेळायला निघाल्याप्रमाणे ते चालताहेत. भरपूर तेल लावलेल्या केसांचेही अनेक प्रकार दिसतात- मागे कुरळे, दोन्हीकडे कुरळे, मधून भांग पाडलेले, कपाळावर घेतलेले आणि कडेला वर घेतलेले. पण हे प्रकार केवळ पुढच्या बाजूलाच नाहीत, मागच्या बाजूलाही आहेत. कुणाच्या मानेवर कुरळे केस आहेत, कुणाचे बॉब केल्यासारखे, कुणाचे वाढवलेले, कुणाचे इंग्रजीतल्या 'यू' अक्षरासारखे कापलेले, कुणाचे 'व्ही' अक्षरासारखे कापलेले, कुणाचे दोन्ही कान केसांनी संपूर्ण झाकलेले, कुणाचे अर्धे झाकलेले; दोघांचे मात्र संपूर्ण केस सफाचट कापलेले.

महिलांच्या साड्यांचेही रंग गडद आहेत. साड्या त्यांनी जरा वरती उचलून बांधल्या आहेत. पदर नाही. समोरच्या बाजूला जरा वरती घेऊन पदर छातीवरून खाली घेतलेला. केशरचनांच्यापुढे तर वेशभूषा फिकी वाटते. कुणी अगदी मध्यभागी भांग पाडलेला. कुणी

दोन वेण्या घालून त्या वर बांधल्या आहेत. कुणाचे केस छोटे आहेत, त्यांची मानेवर गाठ मारलेली आहे. जवळजवळ प्रत्येकीने केसांत फुलं माळलेली आहेत. सकाळी प्रत्येकीच्या हाती जी फुलं आली, ती तिने केसांत माळलेली आहेत. दोनेकजणींच्या केसांत मोठमोठी झेंडूची फुलं आहेत. कुणी काल रात्री बंगल्यातून तोडून आणलेली फुलं माळली आहेत. जांभळ्या रंगाची गवताला येणारी फुलंसुद्धा काही काहीजणींनी केसांत माळली आहेत. ही फुलं महिला चालताना हलतात.

महिलांपैकी बऱ्याचजणींच्या पाठीवर झोळ्यांमध्ये बाळं आहेत. बाळांची तोंडं झोळीबाहेर आलेली. चालण्याच्या तालावर ती डोलताहेत. बाळांचे पाय आणि हातही झोळीबाहेर झुलताहेत. बहुधा आयांच्या चालण्यामुळे मिळणाऱ्या झोक्यांमुळे, जवळजवळ सगळीच मुलं झोपली आहेत.

महिलांनी इतक्या रंगीबेरंगी साड्या परिधान केलेल्या असल्याने, दोनेक मध्यमवयीन महिलांनी परिधान केलेल्या पांढऱ्या साड्यासुद्धा रंगीतच वाटतात.

पण स्त्रीपुरुष, म्हातारे-म्हाताऱ्या, तरुण-तरुणी असे भाग करून पाहिलं, तर कुली लाईनच्या रस्त्याने हे सगळेजण सकाळचा सायरन ऐकून कामाला निघाले आहेत, ते त्यांचं समवेत चालणं नीट आकलन होत नाही. आता, हे सायरन ऐकून सकाळी त्या सर्वांचं एकत्र कामाला निघणं हेच सर्वांत महत्त्वाचं बनलय. त्यातून कुणालाही वेगळं काढता येत नाही, सगळे मिळून एक घटना आणि एक दृश्य तयार होतं. पोशाखाबिशाखात, चलनवलनात जर कुणी वेगळं असलं, तरीही ते जणू समग्रताच प्रकट करतं. लगबगीने पावलं टाकायला जाऊन कुणी जवळजवळ डोलत-डोलत चालते, कुणी कंबर अधिक लचकवते, कुणा महिलेच्या केसांच्या झुलण्यामुळे तिच्या चालण्याची लयच वेगळी वाटते, कुणी म्हातारासा माणूस गुडघ्यापर्यंत येणाऱ्या हाफ पँटमध्ये, जमिनीकडे पहाता-पहाता छोटी-छोटी पावलं टाकीत पुढे जातो. या विचित्र चालींतही कामाला पोचण्याची घाई त्यांच्या चालण्यामध्ये जी गती आणते, तीच प्रमुख बनते- ही सगळी विविधता असूनही.

दोनजण एवढ्या गर्दीत नवीन सायकली ढकलीत-ढकलीत घेऊन चालले आहेत. अधूनमधून घंटा वाजवताहेत. सायकलच्या हँडल्सना प्लॅस्टिकची दोरी बांधलेली आहे. हा रस्ता तर सायकलने लवकर पार करता येण्यासारखा आहे, त्यापेक्षा इतरांबरोबर सायकल ढकलीत-ढकलीत कामाच्या ठिकाणी जाणं आणि परतणं काही काळ चालेल. त्यांच्याकडे सायकली असल्याने बाबू त्यांना एखाद्या तातडीच्या कामासाठी पाठवू शकतात. तेव्हा तर सगळा मळा पार करून त्यांना जावं लागत. तेव्हा एकटं-एकटं सायकलवर जाणं खूप चांगलं वाटतं. दोन्ही बाजूंच्या वाफ्यांमध्ये किंवा वाटेवर काम करणारे टक लावून पहातात-कुणी बरं सायकल विकत घेतलीय? ओळखीचे लोक हाकाही

मारतात. महिला खळखळून हसतात. या गोष्टींनी पॅडलवरचा जोर वाढतो. दोन्ही बाजूंच्या दाट हिरव्या चहाच्या रोपांमधून चकचकीत हिरवी सायकल चालते. फक्त त्या रंगासाठी पंचाहत्तर रुपये अधिक द्यावे लागतात. हँडलची प्लॅस्टिकची लाल झालर वाऱ्याने उडते. हँडल्सना लावलेले दोन आरसे चहाचे वाफे वेगाने मागे जाताना दाखवतात. दोन आरश्यांसाठी पन्नास रुपये अधिक द्यावे लागलेले. मागचा लाल प्रकाश आसपासच्या हिरव्या प्रकाशात उजळ दिसतोय. जणू प्रकाश पाहूनच सायकल कुणाची हे ओळखता येईल. चालवायची असेल, तर सायकल अशा प्रकारे चालवण्यातच सुख आहे. पण असं आसपास कुणी नसताना सायकल चालवतानाही कानांना दोन्ही बाजूंनी वाहाणारं वारं लागतं, आणि हे वारं जितकं अधिक लागतं, तितकी गती अधिक वाढते. चालवायची असेल तर सायकल अशी चालवावी, नाहीतर सायरनचा 'भाँऽ' ऐकल्याबरोबर सगळ्यांबरोबर सायकल घेऊन चालत गेलेलंच बरं-जणू सायकलही कामालाच चाललीय्.

सगळ्या जमावातच ट्रॅन्झिस्टर वाजताहेत. चामडी केसमध्ये कुणाच्या खांद्यावर ट्रॅन्झिस्टर झुलताहेत, काहींच्या हातात झुलताहेत, कुणाच्या हातात छोटे ट्रॅन्झिस्टर आहेत, ते त्यांनी कानाला लावलेले आहेत. प्रत्येकाने आपलं आवडतं स्टेशन लावलंय्, विविध भारती, सिलोन, कराची. वेगवेगळी गाणी वाजताहेत. ती गाणी ऐकत, त्यांच्या तालावर हे श्रोते चालले आहेत. काही-काहीजण रेडिओबरोबर गाताहेत. कुणी दोन्ही हात वर करून दोन्ही हातांनी चुटक्या वाजताहेत.

इतकी गाणी एकाच वेळी वाजत असल्याने ती सगळी मिळून एका अर्थहीन कोलहलाचा आवाज वाढत जातो. इतक्या साऱ्या लोकांचं एकत्र चालणं, बोलणं, गाणं, हसणं, चालू असतानाही तो आवाज हळूहळू वाढतो. डोळे झाकून ऐकलं तर वाटतं, एक अर्थहीन, उद्देशहीन कोलाहल मळ्याच्या या वाटेवरून वेगाने चाललाय्. हा आवाज कधी अचानक वाढतो, अचानक कमी होतो.

पण जे या कोलाहालात आहेत, ते आपापल्या आवडीप्रमाणे गाणी ऐकताहेत किंवा ऐकत नाहीत. प्रत्येकजण आपल्या आवडीप्रमाणे, गाणं निवडू शकतोय. एक गाणं संपल्यावर, दुसऱ्या रेडिआवरचं गाणं आवडलं, तर तो थोडं त्या बाजूला सरकतोसुद्धा आणि आपली ही आवड प्रत्येकजण कुठल्या-ना-कुठल्या प्रकारे दाखवताहेतसुद्धा-गाऊन, टाळ्या वाजवून, किंवा चुटक्या वाजवून किंवा आपल्या उल्हासामधून.

पण एवढं सगळं असूनही इतक्या साऱ्या माणसांच्या गर्दीच्या या चालण्यामध्ये सराव आणि रोजची एक लय असते. हा सुट्टीचा दिवस आहे असं कधीही वाटत नाही. कामावर जाण्यापूर्वी अगदी शेवटच्या क्षणापर्यंत आपल्या जीवनाच्या सहजतेचा आस्वाद घेणं चाललं आहे असंही कधी वाटत नाही. चहाच्या मळ्याच्या कामात शेतीच्या कामामध्ये असतो, तसा काही खंड असतो. म्हणूनच मळ्याजवळच या सायकली उभ्या केल्या

जातील, रेडिओ चहाच्या रोपांवर विसावतील. या रंगांतून, गाण्यांतून, तालांवर हे सारे कामावर निघाले आहेत-रोजचं काम, मळ्याच्या भोंग्याबरोबर सुरू होणारं, जणू उत्सवच! कामाला जाणं हा मजुरांचा रोजचाच उत्सव असतो.

## सत्तावन्न

# बाघारू आणि मजूरवर्ग

बाघारू या उत्सवात कुणीच नाही. बारघरियाच्या मैदानातून उतरून निपुछापुरमध्ये प्रवेश करून तो या उत्सवाच्या मार्गावर, उत्सवामध्ये अडकून पडलाय्. बारघरियाचं मैदान निपुछापुरच्याच मळ्याच्या बाहेरच्या जमिनीला लागून आहे. कंपनी या जमिनीपैकी थोडी कूलींनासुद्धा 'आधी' म्हणून कसायला देते. त्या शेतजमिनीला पार करून, तारेच्या कुंपणावरून कूली लाईनमधून जाणाऱ्या रस्त्यावर बाघारू उतरतो. आपण अडकलो आहोत, हे सुरुवातीला त्याच्या लक्षात येत नाही. 'भाँऽ' ऐकून प्रत्येकजण आपल्या चालीने चाललाय्, तसा बाघारूही चाललाय्. पण काही पावलं गेल्यानंतर दोन्ही बाजूंच्या घरांमधून माणसं बाहेर येऊ लागली. आधी ठाऊक असतं, तर बाघारू दूर होऊन उभा राहिला असता, आणि हे सगळे लोक निघून गेल्यावर आपल्या वाटेने गेला असता. पण तोपर्यंत ही गर्दी तयार झाली होती. आणि गर्दी चालते ती आपल्या वेगाने, आपल्या नियमांनी. बाघारूलाही समजतं, आपणही याच गतीने आणि यांच्यासारखीच पावलं टाकीत चालायला हवं. तो दोनेकदा थांबूनही पहातो, पण थांबू शकत नाही. स्वत: विचार करून थांबणं तो शिकलेला नाही. तो जर थांबला असता आणि त्याच्या अंगावरून हे लोक पुढे गेले असते, किंवा सगळ्यांनी ढकलून त्याला बाजूला केलं असतं, तरच बाघारू या गर्दीपासून वेगळा होऊ शकला असता. पण बाघारू स्वत: कुठल्याही घटनेला घडवू शकत नाही, त्याला घेऊन घटना घडतात. जोपर्यंत असं घडत नाही, तोपर्यंत बाघारूला या गर्दीबरोबर, ती जिकडे चालली आहे त्या दिशेकडेच चालत जावं लागतं.

त्यानेही काही झालं नसतं. बाघारू या विचित्र गर्दीत नक्कीच मिसळून गेला असता. बाघारूची उंची जरा कमी असती, तर त्याच्याकडे कुणाची नजरच गेली नसती. किंवा बाघारूचं एवढं मोठं शरीर गर्दीत झाकून गेलं असतं. या गर्दीत सापडून जेव्हा बाघारू गर्दीच्याच वेगाने चालू लागतो, तेव्हा तो जणू गर्दीचा दिशादर्शकच दिसतो. अगदी मागची माणसंही बाघारूचं डोकं पाहूनच दिशा ठरवतात. पण खऱ्या शीडकाठीवरही किमान कापडाचं किंवा रंगाचं जे आवरण असतं, तेही बाघारूला नव्हतं, फक्त एक छोटी लंगोटी त्याच्या कमरेला समोरच्या भागावर बांधलेली. झाडाच्या पानानेसुद्धा त्या लंगोटीपेक्षा

अधिक अंग झाकलं गेलं असतं. त्यामुळे, त्या एकाच दिशेने चाललेल्या गर्दीबरोबर, तिच्या वेगाने चालत असूनही बाघारू त्या गर्दीच्या प्रवाहातल्या एक होऊ शकत नाही. तो प्रवाह बनत नाही, प्रवाहाने वाहून जाणारा एक बनतो-तिस्तेच्या प्रवाहात सालाची झाडं वहात जातात, तसा बायकांचा जो गट बाघारूच्या अगदी मागे होता, त्यातल्या बायका बाघारूला पाहिल्याबरोबर अचानक हसायला सुरुवात करतात. अशा उत्सवाच्या मार्गावर हसणं तर अगदी संसर्गजन्य असतं. पहाता पहाता ते सगळ्यांमध्ये पसरतं. जे जवळपास होते, ते हसण्यामुळे डोळ्यांसमोरच पाहू शकत होते. जरा आणखी नीट पाहाण्यासाठी ते जवळ येऊ पहातात. बायकांच्यामध्ये धक्काबुक्कीच सुरू होते. ही तिला धक्का मारून पुढे जाऊ पहाते. पण जाऊ शकत नाही. बाघारूच्यामागे ज्या पहिल्या रांगेत होत्या, त्या मुळीच आपली जागा सोडीत नाहीत. मागच्या रांगांतून कुणीकुणी क्रमाने त्यांच्यामधून धक्काबुक्की करीत पुढं जातात. पहाता-पहाता बाघारूला घेरून एक वर्तुळच जणू तयार होतं-तेही मुख्यत: बायकांचं.

पाण्यात एखादं ढेकूळ पडल्यावर ज्याप्रमाणे पाण्याचं कंपन चालूच रहातं त्याप्रमाणे या गर्दीमध्ये बाघारूला पाहून हसण्याचं कंपन चालूच रहातं. जे लोक किंवा त्या स्त्रिया बाघारूला नीट पाहू शकत नाहीत, त्याही हसत रहातात. कुणी-कुणी तर्जनीने बाघारूकडे निर्देश करतात. आणि हसणं आणखी दूर-दूर पसरतं. शेवटी बाघारून या संपूर्ण तरीही हळूहळू वाढत जाणाऱ्या गर्दीतलं एक चालतं दृश्य बनतो.

रोज कामावर जाणाऱ्या माणसांच्या गर्दीत सापडल्यानेच जणू बाघारू फारच विसंगत दिसतो. त्याच्या केसांच्या धूळ आणि मातीने जटा झाल्या आहेत. सगळ्या अंगाला मातीचाच रंग आहे. जणू धुळीतून उठूनच तो या गर्दीत सामील झालाय्.

एक माणूस बऱ्याच उड्या मारीत-मारीत चालला होता. टाइट हाफ पँट आणि टाइट गोल गळ्याचा बनियन, पायात मोजांसह केडस्चे बूट, हातात एक स्टिक्. तो मधून मधून ती छडी आपल्या बुटांवर मारीत होता. आणि स्वत:च उड्या मारीत होता. आपल्या काठीचा जणू अधिक चांगला उपयोग त्या माणसाला सुचतो आणि तो बाघारूसमोर येऊन उभा रहातो. त्यानंतर मागच्या दिशेने मार्च करीत असल्याप्रमाणे पावलं टाकीत चालतो. बाघारूच्या संपूर्ण शरीराला तेव्हा गर्दीच्या चालण्याची किंवा पळण्याची गती धक्का देतेय्. त्याच्या शरीरात ती गती संचारल्यामुळे, त्याच्या शरीराचा भारही त्या गतीला क्रमाने वाढवीत रहातो-पहाडावरून घरंगळणाऱ्या दडगाप्रामाणे. समोरच्या त्या माणसाची उंची बाघारूच्या कमरेपर्यंत आहे. तो बाघारूसमोर असा एकेक पाऊल मागच्या दिशेने टाकत असताना, वाटतं, बाघारू जणू एखादी मूर्ती आहे, आणि तो माणूस मूर्ती पहातो आहे, आणि ती पहाण्याच्या उद्देशानेच चो आपल्या हातातली स्टिक उचलून बाघारूच्या डाव्या दंडावर मारतो. तो माणूस उंच असता, तर त्याने बाघारूला स्पर्श करून पाहिला असता,

बुटका असल्याने काठीने स्पर्श करतोय. बाघारूच्या उजव्या दंडावरही तो याप्रमाणे मारून पहातो. त्याने बाघारूच्या पोटात स्टिकने थोडं डिवचल्याबरोबर बाघारूभोवती वर्तुळ केलेल्या स्त्रियांच्या दलातील स्त्रिया कौतुकाने दोन्ही हात एकाच वेळी उचलून ओठांजवळ धरतात-अचानक वाऱ्याने हेलकावा बसलेल्या झाडांप्रमाणे.

केसात फुलं माळलेल्या, रंगीबेरंगी साड्या नेसलेल्या, अशा स्त्रियांचं दल जर रांगेत उभं असेल आणि ते जर एका दिशेने झुकलं, तर त्यांना एकमेकांचे हात धरावेच लागतात. आणि तसे ते धरले, की पायांमध्ये नाचाचा ताल संचारतो. स्वत:ला कळण्याआधीच बाघारूला घेरून असलेल्या स्त्रियांच्या रांगेतील सगळ्याजणी एकमेकांच्या कमरेभोवती हात घालून नाचाच्या तलावर पाय टाकतात आणि मुक्तपणे हसून नाचाला संगत देतात-

'अरे ओ राखवाल, ताडाताडी एशो
पाहाड थेके एक बुनो भालुक नेमे एसे
आमादेर नाचेर सारी भेंगे दिलो'

(अरे हे रखवाल्या, ताबडतोब ये/पहाडावरून एक जंगली अस्वल उतरून आलं/ त्याने आमच्या नाचाची रांग मोडून टाकली.)

या गाण्याच्या संगीताने तो माणूस चटकन बाघारूच्या मागे येतो-बाघारू आणि त्या स्त्रिया यांच्या मध्यभागी. स्त्रियांच्या गाण्याच्या तालावर पावलं टाकीत तो बाघारूच्या मागे-मागे चालतो. एवढ्या उंचपुऱ्या बाघारूच्या मागे तो एवढासा माणूस चालताना तमाशातल्या एका सोंगासारखाच दिसतो. तो माणूस आपली स्टिक बाघारूच्या घोट्यावर मारतो, पाठीवर मारतो, कुल्ल्यांवर मारतो.

त्यामुळे आलेलं हसू झाकण्यासाठी स्त्रिया आपले हात एकमेकींच्या कमरेभोवतून काढतात आणि तोंडावर धरतात. त्यामुळे नाचाची रांग मोडते, गाणं थांबतं आणि त्या माणसाच्या मागे असलेली सारी गर्दी 'हो-हो' करीत हसू लागते. बाघारू तर गर्दीत सापडलेला असल्याने त्याच्या पुढेसुद्धा माणसं आहेतच. तीही मागे वळून पहातात, आणि बाघारू दिसल्याबरोबर एवढ्या कल्लोळाचं कारण काय हे त्यांना समजतं.

आपल्याला घेरून हे लोक हसताहेत, थट्टा करताहेत हे बाघारूच्या लक्षात येतं. त्याला घेरून बायकांचं दल नाचायला सुरुवात करतं. बाघारू थोडं पहातोसुद्धा. तो बुटका माणूस येऊन त्याला डिवचतो. समोरून पुन्हा मागे जातो. पण आता आपण काय काय करावं हे बाघारूला समजतच नाही. बाघारू या गर्दीतून बाहेर पडून पळून जाऊ शकतो. पण जाणार कुठं? या गर्दीच्या आसपास घरं आहेत. या जुलूसातून अलग होऊन तो थांबणार कुठं? जुलूसाबाहेर? जुलूस निघून जाण्याची वाट पहात? पुराने उन्मळून पडलेल्या शालवृक्षासारखा बाघारू जुलूसाच्या प्रवाहात चालत रहातो. - त्याच्याभोवती वर्तुळ करून चाललेल्या गर्दीच्या नाच-गाणं-टाळ्या यांच्या गजरात.

त्याला पाहिल्याबरोबर, अगदी क्षणातच लक्षात येतं, की तो या गर्दीपैकी कुणी

नाही. अगदी रामप्रहरी कामाला निघालेल्या लोकांमध्ये बाघारूचं शरीर फारच नग्न दिसतं. ते त्या जुलूसातल्या लोकांना सवयीचं नाही. म्हणूनच हुल्लड करीत ते स्वतःला बाघारूपासूनन अलग ठेवताहेत.

बाघारूची पावलं चांगली लंबी-चौडी आहेत. काही दशकं वयाच्या एखाद्या वृक्षासारखी बाघारूची पाठ आहे-कुठं शेवाळं, कुठं रूक्ष. पण त्याच्या कण्याच्या आसपासचे स्नायू एखाद्या झऱ्याप्रमाणे नाचताहेत, वर खाली होताहेत-वाटतं, या शरीरात वृक्षाची प्राचीनता असली तरी स्थाणुता नाही. कमरेपासून पायांचे सरळ अवतरण मूर्तीचा आकार धारण करतं-त्यांच्यावर कुठलंही आवरण नसल्यामुळे. जणू, बांधकाम चालू असलेल्या एखाद्या पुलाचे दोन पिलर्स नदीच्या पात्रातून उठून या जुलूसाबरोबर चालले आहेत. पण या जुलूसात चाललेलं हे शरीर या जुलूसापैकी नाही. बाघारूचं शरीर आता बाघारूचं वैरी आहे.

बाघारूला घेरून नाचत-नाचत, गात-गात, बाघारूला डिवचीत-डिवचीत जुलूस एक चढ चढून गेला. बाघारूच्या पुढे आणि मागे इतके लोक होते, की त्याला हा चढ दिसूच शकला नाही. पण पायांच्या स्नायूंना बसणाऱ्या ओढीवरून त्याला तो चढ जाणवला. बाघारू बाजूला होऊ पहात होता; पण हा जुलूस त्याला आपल्याबरोबर ओढीत नेत होता. चढ पूर्ण झाल्याबरोबर त्या जुलूसातलं एक दल उजवीकडे वळालं. फॅक्टरी उजवीकडे आहे. चहाची पानं सुकवण्याच्या शेडस् तिकडे आहेत. बाघारूला घेऊन जुलूस पुढे जातो आणि त्यातील वेगवेगळे गट आपापल्या कामाच्या ठिकाणी निघून जातात. आता बाघारूला दिसतं, आपल्यासमोर आनंदपूर गेटप्रमाणे एक गेट आहे आणि त्याच्या आत चहाचा मळा आहे. सायकली आणि ट्रान्झिस्टर्स घेऊन बाकीचे लोक मळ्यात जातात.

आता त्यांच्यापैकी कुणाचंही लक्ष बाघारूकडे नाही, पण बाघारू मात्र मनाने खाली त्या जुलूसातच अडकलाय. चढावरून बाघारू पहात-पहात खाली उतरतो-तारेच्या कुंपणाआत चहाचा मळा आहे. त्यात अनेक वाटा आहेत, वळणं आहेत, चहाच्या रोपांवर छत्रीप्रमाणे पसरलेल्या शिरीष वृक्षांचे माथे आहेत. मळ्यात नाना रंगाचे कपडे घातलेली माणसं काम करताहेत.

## अठ्ठावन्न

# बाघारू आणि बाबू

दोन्हीकडे चहाच्या मळ्यातील रोपांच्या रांगा, मध्ये रुंद हिरवा रस्ता, बाघारू एकाटाच एखाद्या झाडासारखा उभा रहातो. सारे लोक आता आपापल्या कामाला निघून गेले आहेत, हे त्याच्या लक्षात येतं.

बाघारूसमोर सगळीकडं कामं चाललेली. चहाची रोपं स्त्रियांच्या छातीपर्यंत उंच आहेत. स्त्रिया जणू स्नानासाठी उतरल्यासारख्या दिसताहेत. त्या टुकटुक करीत चहाची पानं तोडून हातातच ठेवतात. हात पूर्ण भरल्यावर खांद्यावरच्या टोपलीत टाकतात. बोटं पुन्हा रोपांवर उतरतात. चाचपडणं नाही. पानं कुठं आहेत, हे त्यांच्या बोटांना ठाऊक आहे. थोड्या-थोड्या वेळाने पुटपुट आवाज. बाघारू आपल्या हातांकडे पहातो. आपल्याला चहाची पानं तोडावी लागली, तर एक तरी पान तोडता येईल का? की एखाद्या बैलाच्या जिभेप्रमाणे त्याची बोटं पानांचा एक झुबकाच तोडतील? उजवा हात डोळ्यांसमोर उघडून, अंगठा वळवून तो मध्ये आणण्याचा बाघारू प्रयत्न करतो. अंगठा वाकत नाही. बाघारू आपल्या अंगठ्याने बाकीच्या चार बोटांना स्पर्श करू पहातो. तो स्पर्श आपल्याला जाणवतो का, हे समजून घेण्याचा तो प्रयत्न करतो.

डावीकडे पुरुषांचं एक दल कोयते घेऊन चहाच्या झाडांच्या फांद्या तोडीत होतं. कोयते सुरीसारखे पातळ आहेत. बाघारूला आपल्या हातात कोयत्याची मूठ धरता येईल का? बाघारू मूठ बांधू पहातो. त्याला मूठ नीट बांधता येत नाही. त्याची बोटं अलगच रहातात. डावीकडे काही पुरुष नालीत उतरून कुदळीने नालीतली भिजलेली माती काढून वर फेकीत होते. कुदळ चालवणं बाघारूला जमत होतं. पावसाळ्यात, जंगलात बंद झालेल्या नालीचा छोटा भाग हळू हळू मोकळा होताना बाघारूने पहिला होता.

तो समोर पहातो. वळणावर काही बाबूलोक उभे आहेत बाबू आहेत म्हणजे बाघारूला इथं एखादं काम मिळवता येईल - नाली साफ करण्याचं किंवा कुदळ-फावडं चालवण्याचं काम. बाघारू बाबूलोकांसमोर पोचतो खरा, पण त्यानंतर त्याला अवघडसारखं वाटतं. तो उंच असल्याने नजर खाली वळवून त्याला बाबूशी बोलावं लागते. ते फार कठीण. बाबूच त्याला विचारतात, 'काय? काही म्हणणं आहे?'

'नाही बाबू,' असं म्हटल्याबरोबर बाघारूला आठवतं, की आपल्याला कुदळ-फावडं चालवता येतं हेच आपल्याला सांगायचं होतं. तो ताबडतोब म्हणतो, 'हो बाबू!'

बाबूंना बहुधा थोडी फुरसत होती. त्यांनी विचारलं, 'काय?'

बाबूलोक बहुधा बाघारूला कधी काही विचारीत नाहीत. कधीकधी एखादा बाबू त्याच्याशी बोलतो, उदाहरणार्थ एमेलियाबाबू. काय माहिती बाबू कुठला प्रश्न विचारतात, याचा अंदाज बाघारूला येत नाही. तो लगबगीने म्हणतो, 'नाही बाबू.'

उत्तर ऐकून बाबूंना आनंद झालेला दिसतो. ते हसतात. जणू त्यांना हेच उत्तर हवं होत. मला चहाची पानं तोडण्याचं, कोयता चालवण्याचं काम येत नाही, असं बाघारूला म्हणायचं होतं. त्यानंतर त्याला म्हणायचं होतं, आपल्याला कुदळ - फावडं चालवता येतं. त्याहीनंतर त्याला म्हणायचं होतं, की बाबूंनी आपल्याला एक कुदळ - फावडं द्यावं.

या तीन गोष्टींपैकी कोणती गोष्ट आधी सांगावी हे बाघारूला सुचतच नाही.

'बाबू, मला चहाची पानं तोडता येत नाहीत.'

ऐकून बाबू चेहरा वर करून पहातात. बाघारू चहाची पानं तोडणाऱ्या स्त्रियांकडे बोट दाखवून म्हणतो, 'त्या बायका पानं तोडताहेत. मला नाही येत ते काम.'

'हूं!' बाबू नजर वळवतात.

'बाबू!'

'हूं!'

'मला फांद्याही कापता येत नाहीत,' म्हणून बाघारू आपला हात त्यांच्यासमोर धरतो. आपल्याला फांद्या कापता येतील, पण कोयता धरता येत नसल्याने ते शक्य नाही, हे कसं सांगायचं बाबूंना? असा विचार बाघारूच्या मनात येतो.

बाघारू गप्प होतो. त्याला आणखी काहीच आठवत नाही. बाघारूची सावली बाबूंवर पडत होती. तो दूर व्हावा याची जणू बाबू वाट पहात होते. तो दूर होत नाही असं पाहून बाबू चेहरा त्याच्याकडे वळवून म्हणतात, 'ठीक आहे, निघा आता!'

'कुठं बाबू?'

'जिथं निघाला होता तिकडं!'

'कुठं बाबू?'

'ते मी कसं सांगणार बाबा? इथं पानं तोडणं, फावडं मारणं ही कामं चालली आहेत, ती तर काही तुमच्यानं होणार नाहीत, तेव्हा निघा.'

बाबूंच्या या वाक्याने बाघारूला पुन्हा आठवतं. त्याला आनंद होतो, आणि तो ताबडतोब म्हणतो, 'मला कुदळ-फावडं चालवता येतं बाबू.' तो कुदळ चालवल्याचा आविर्भाव करून दाखवतो, 'असं, बाबू!'

'हूं!'

'येतं तर चालवा!'

बाघारू क्षणात सरळ उभा राहतो. कुदळ-फावडं चालवणाऱ्यांच्या दिशेने लगबगीने निघतो. जणू त्याच्यासाठी कुदळ ठेवलेलीच होती. ती घेऊन खाली उतरायचं- थोडं अंतर जाऊन तो विचारतो, 'माझी कुदळ कुठंय, बाबूंनी सागितलंय मला, माझी कुदळ?'

तेवढ्यात बाबू त्याला जरा जोरातच बोलावतात, 'इकडं या, तिकडं काय आहे? अरे एऽ!'

तो पुन्हा बाबूंकडे जाऊ लागतो. तो जवळ येताच बाबू रागाने म्हणतात, 'तिथं काय करता? काम चाललंय तिथं. निघा!' बाबू डावा हात उतलून त्याला निघून जाण्यासाठी निर्देश करतात. बाघारूला बाहेर जाण्यासाठी तोच एकमेव रस्ता. बाघारू त्या रस्त्याने जाऊ लागतो- इतकी आज्ञा पाळण्याची शारीरीक सवय! बाबू मागून म्हणतात, 'हा तर बुलडोझरच रे बाबा!'

बाबूंजवळून दूर झाल्याबरोबर बाघारू पुन्हा या गचपणाचा आणि झाडीचाच एक भाग होऊन जातो.

## एकोणसाठ

# छतासाठी पानं

समोर, थोड्या अंतरावर रस्ता संपतो. तिकडे नक्कीच झरा असणार, किंवा गार्डन लाईन. मळ्याची सीमा संपते. झुडुपांच्या मधल्या अंतरातून बाघारू बाहेर जाऊ शकेल.

अचानक गर्दीत सापडून बाघारूला गर्दीबरोबर इतकं चालत यावं लागलंय- अगदी चहाच्या मळ्यातच. नंतर ती गर्दी बाघारूला पुन्हा एकटा सोडून पांगून गेली. त्यामुळेच की काय, चहाच्या मळ्यातल्या या निर्जन भागातही बाघारूला आपण 'लंगोटीवाले' आहोत याची जाणीव होते. शेतात, मैदानात, जंगलात, नदीत, नदीच्या वाळवंटात त्याला कधीही असं वाटत नाही. तिथं तर त्याचं शरीर एखाद्या चाफ्याच्या झाडासारखं असतं. वारा झेलण्यासाठी, फुलांचा वास पसरवून वाऱ्याची जाणीव करून देण्यासाठी उभं. किंवा प्रवाहाची कल्पना देण्यासाठी आडवं पडलेलं. इथं माणसांनी लावलेल्या या चहाच्या रोपांमध्ये मात्र त्याला अवघडल्यासारखं वाटतं.

डावी-उजवीकडे न वळता बाघारू सरळ त्या झुडुपांच्या दिशेने निघतो. त्या जुलूसाने त्याला खूपच उत्तरेकडे आणलंय. इथून बाहेर पडून थोडं दक्षिणेकडे जाऊन त्याला डेमकाझोराच्या रस्त्यावर पोचायला हवं.

समोर येऊन पहातो, तर आणखी एक कुंपण, झाडांचं. बाघारू डोकं खाली करून फळं शोधतो, पण हा काही फळांचा मोसम नाही.

पण बाघारूला या झाडांची मोठमोठी पानं हवी आहेत. तो जिथं निघालाय, तिथं अशी पानं मिळाली नाहीत तर? अशी टिनासारखी पानं पाहिल्यावर बाघारू ती कशी सोडणार? झोपडी बांधायची झाली, तर ही मोठमोठी पानं छपरासाठी म्हणून वापरता येतील. अशी पानं अगदी हाताशी सापडल्यावर बाघारू ती कशी काय सोडणार?

पण एवढी मोठी, मजबूत पानं हाताने तोडता येणार नाहीत. ती कापायला हवीत. कोयता कुठं मिळणार? बाघारू खाली वाकून दगड शोधू लागतो. या पानांच्या फांद्यांमध्ये रस असतो. एखादा चपटा, धारदार दगड मिळाला, तर त्याने ही पानं तोडता येतील. पण असा दगड मिळणार कुठं? इथं दगड येणार कुठून? आला, तरी इथले लोक मळा स्वच्छ ठेवण्यासाठी तो फेकून देणार. कुंपणापलीकडं गेलं, तर कदाचित असा दगड मिळेल.

बाघारू बाहेर जाण्यासाठी जागा शोधतो. पाऊस आणि मातीतला रस यांच्यामुळे झाडं अशी पोसली आहेत, की त्यांचे बुंधे एकमेकांशी घासताहेत. शेवटी बाघारूला बाहेर जाण्यासाठी एक जागा सापडते. कोल्ह्याने तयार केलेली जागा.

बाघारू कुंपणाबाहेर येतो. चारीकडे पहातो. उतारापुढे मोकळं मैदान आहे. त्यात दगड आहेत. मातीची धूप होऊ नये, म्हणून कंपनी दरवर्षी इथं दगड टाकीत असते.

## साठ

# बाघारूचं दगड शोधणं

दगडांवर नजर फिरवीत बाघारू दगड शोधू लागतो. हातात धरता येईल इतका छोटा, आणि पानांचे देठ कापता येतील, असा धारदार दगड. त्याला एक लांबट असा दगडाचा तुकडा दिसतो- लाकडाच्या तुकड्यासारखा, हातात धरता येईल असा. पण चमकतोय. म्हणजे वाळूचा दगड असावा. तुटून जाईल.

त्याच्यावरून नजर हलवून बाघारू इकडे-तिकडे पाहू लागतो, पण नजर पुन्हा त्याच दगडाकडे जाते. एकदा तो वापरून पहायला काय हरकत आहे? नाहीतर नजर पुन्हा पुन्हा त्या दगडाकडेच जात रहाणार.

बाघारू तो दगड उचलून पहातो. एका बाजूला टोक आहे, चपटेपणाही आहे. धार आहे, पण धरायला जागा नाही. दोन्ही हातांनी तो दगड धरतो. झाडाच्या बुंध्यावर मारतो- परीक्षा करण्यासाठी. दगडाचे तुकडे होऊन त्याच्या पायाशी पडतात. बाघारू खाली पहातो. त्याला एक भंगलेली दगडी मूर्ती दिसते. देवीची मूर्ती. पण बाघारू काही झाडाखाली प्रतिष्ठापना करण्यासाठी दगड शोधीत नाहीय, तो शोधतोय फांदी कापण्यासाठी अस्त्र.

खाली तरी आपल्याला हवा तसा दगड सापडेल, म्हणून बाघारू उतारावरून खाली येतो, पण तिथेही त्याला दगड सापडत नाही.

## एकसष्ट

# . . .दगड की धातू

बाघारू पुन्हा झाडाकडे परत फिरतो आणि खाली वाकून दगड शोधू लागतो. तेवढ्यात त्याला वाटू लागतं, आपण उगाचच दगड शोधतोय. या झाडाच्या फांद्या कितीशा जाड असणार? हाताने तोडता येतील की!

तो तळाकडून मळ्याच्या दिशेने, त्यांच्या कुंपण्याच्या दिशेने पहातो. इथून कुंपण आणखी चांगलं दिसतंय. ही चांगली रांगेत लावलेली झाडं आहेत, जंगली झुडुपं नाहीत. कुणी यापूर्वी यांची पानं कापलेली दिसत नाहीत. इथून मुख्यतः पानंच दिसत असल्याने वाटतं, या पानांखाली संसार मांडता येईल. दोन पानं बाजूंना दोन छोट्या बांबूंमध्ये बांधून टाकली, तर कच्च्याबच्च्यांचं घर होईल. 'ऊन लागणार नाही, पाऊस थोडासा लागेल. दोन उभी आणि दोन आडवी लावली, तर एखादी तरणी पोरगी झाकून जाईल.'

त्याच्याबरोबर आणखी दोन पानं उभी जोडली, तर बाघारू कमरेपर्यंत झाकला जाईल. म्हणजे आता बाघारूला तरिका झाडाची सहा पानं कापावी लागणार की काय? एक नाही, दोन नाही, सहा - सहा?

पानांचा आकार पाहून बाघारूला वाटतं, ही पानं कापण्यासाठी कोयता किंवा कुऱ्हाडच पाहिजे. हातांनी ही मला तोडता येणार नाहीत. दगडच हवा. बाघारूला पुन्हा दगड शोधण्यासाठी मागं फिरायला हवं.

बाघारू जरा उदास होऊनच पुढे जातो. तो दगड शोधीत - शोधीत पावलं टाकीत जातो. आपल्याला आता दगड सापडणारच नाही, असं त्याला वाटतं.

बाघारूला लोखंडी पट्ट्यांचं एक बंडल दिसतं. चहाचे बॉक्स या पट्ट्यांनी बांधतात. तो पळत जाऊन ते बंडल उचलतो, पण उचलल्याबरोबर त्याचे तुकडे होऊन खाली पडतात. गंज लागून ते जीर्ण झालेलं होतं.

एखादी तार तरी सापडावी, असं बाघारूला वाटतं. किंवा काचेचा तुकडा तरी.

बाघारू चालत चालत मैदानाच्या मध्यभागापर्यंत येतो. अधूनमधून झुडुपं वाढलेली आहेत. पण माणसाने वापरून फेकून दिलेली, आणि बाघारू पानं कापण्यासाठी वापरू शकेल अशी एकही वस्तू त्याला दिसत नाही. बाघारूच प्रथम वापरू शकेल, असा दगडही दिसत नाही.

बासष्ट

## बाघारूला अस्त्रलाभ होतो

पण शेवटी बाघारूला दगड मिळतो, अगदी त्याच्याचसाठी तयार केलेला दगड. किंबहुना दगडालाच बाघारू सापडतो.

हा दगड सापडायचा होता, म्हणूनच दगड रचून तयार केलेल्या उतारावर दगड सापडला नाही. बाघारू तेव्हा चालताना विचार करीत होता, आता मैदानाच्या दुसऱ्या टोकाला जावं, डेमकाझोरा पार करावा आणि आपला रस्ता धरावा. त्यामुळे त्याला दोनेकवेळा मान वर करून मैदानाचं पलीकडचं टोक नीट पहावं लागतं. त्याचं मन दगड शोधणे, रस्ता शोधणे, मैदान पहाणे आणि मैदानाची पलीकडची सीमा पहाणं यात विभाजित झालेलं असल्यानेच की काय, त्याचा डावा पाय कुठल्यातरी धारदार वस्तूवर पडतो. ती वस्तू त्याच्या पायाच्या मांसात घुसल्यासारखी वाटते. त्यात तो पाय बाघारूचा खरं तर त्याच्या पावलाच्या दाबाने दगडाचे तुकडे होतात! आपल्या तळपायात काहीतरी धारदार घुसलंय, हे जाणवून, वेदनेने खाली बसल्यावरसुद्धा तो आधी जखम पहात नाही,

कुठल्या वस्तूमुळे जखमी झाली, हे पाहू लागतो.

कुऱ्हाडीच्या तोंडाशी असलेल्या पात्यासारखा एक दगड धारदार बाजू वर करून पडलेला होता. बाघारू पाय पहातो. कापलेलं नाही, पण वेदना आहे. बाघारू पायाकडं न पहाता आता दगड हलवून मातीबाहेर काढतो. दोन्ही हातांत तो दगड घेऊन पारखतो. मग उठून उभा रहातो.

पुन्हा त्याला चढ चढून जायचंय. आपल्या शरीराच्या भारामुळे उतार उतरणं बाघारूला सहज वाटत असलं तरी चढ चढणं मात्र थोडं गैरसोयीच वाटतं.

चढ चढल्यानंतर बाघारू पानं निवडायला सुरुवात करतो. बाघारू एक पान निवडतो. आणखी पाच पानं निवडायची आहेत. पानं फांदीच्या अगदी खालच्या भागावर आहेत. जणू त्यांनी बाघारूच्या दिशेने आपल्या माना पुढे केल्या आहेत. फांदीतून पानं ज्या ठिकाणाहून फुटली आहेत, ते ठिकाण कापण्यासाठी सर्वात सोयीचं. बाघारू श्वास पूर्ण घेऊन, संपूर्ण शक्तीनिशी घाव घालतो, आणि पानं तोडतो.

## त्रेसष्ठ

# कुत्र्याला रागावणं

आता बाघारूच्या डोक्यावर 'तरिका'ची पानं आहेत. त्यानंतर, त्यांच्यावर दगड आहे. आतापर्यंत एका हातानेच पानं धरून बाघारू चालला होता. आता, डेमकाझोरा नावाचा झरा आल्यावर, दोन हातांनी ती पानं धरून बाघारू झऱ्यात उतरतो.

डोमकाझोरा झरा एखाद्या छोट्या नदीसारखाच. त्याचे काठ बरेच उंच. डोक्यावर पानं आणि दगड घेऊन बाघारूला काळजीपूर्वक पावलं टाकीत उतरावं लागतं. पाण्यात उतरण्याआधी तो जमिनीवर बसतो. उजव्या पायाने पाण्यात उतरण्याची जागा पारखतो, वळून उभा राहून उजव्या हाताने पानं धरून डावा पाय हळू हळू खाली पाण्यात टाकून वळतो. एकदा पाण्यात उतरल्यावर दोन्ही हातांनी पानं धरून तो हळू हळू पुढे जातो.

त्याच्याकडे जर एखादा गमछा असता, तर ती पानं त्याने बांधून घेतली असती. पण गमछा किंवा दोरी नसल्याने त्याचे दोन्हीही हात अडकतात.

पाणी जर कुठे अधिक खोल असलं, तर संकटच. म्हणून बाघारू दोन्ही हातांनी पानं घट्ट धरून ठेवतो, म्हणजे पाणी खूप खोल असलं, तर पानं समोर उतरवून तो पोहत पुढे जाऊ शकेल.

आता पाणी कमेरपर्यंत येतं. बाघारू एकेक पाऊल पुढे सरकतो. अचानक जर दगड पाण्यात पडला, तर वाकून शोधावा लागेल. किनारा जवळ आलाय. आता पाणी अचानक

खोल होणार नाही. पण पाण्याचा काही भरोसा नाही. कदाचित किनाऱ्याजवळच एखादा खोल खड्डा असायचा.

किनारा येतो. बाघारू आधी पानं आणि दगड किनाऱ्यावर ठेवतो. त्यानंतर स्वतः किनाऱ्यावर येतो. तो उठून उभा राहिल्याबरोबर त्याच्या अंगावरील पाणी निथळून तिथल्या जागेत चिखल तयार होतो. बाघारू दोन्ही हातांनी अंगावरचं पाणी निपटतो. इकडे-तिकडे पहातो. पुन्हा पाणी निपटतो. त्यानंतर पानं आणि दगड डोक्यावर ठेवून, ती दोन्ही हातांनी धरून पुन्हा चालायला सुरुवात करतो.

हाटाला जाणाऱ्या लोकांच्या वहिवाटीमुळे एक छोटा रस्ता तयार झालाय. त्या रस्त्याच्या समोर एक छोटी वाडी दिसतेय. तिथून एखादी दोरी मागून घ्यावी की काय, असं बाघारूला वाटतं. म्हणजे पानं बांधता येतील.

त्या कच्च्या रस्त्यावर एक कुत्रं झोपलेलं होतं. समोरच पत्र्याच्या छपराचं एक मोठं घर. याच घरात जावं, असं बाघारूला वाटतं.

बाघारूच्या पायाचा आवाज ऐकून कुत्रं पडल्यापडल्याच, डोळे न उघडता, एकदा भुंकतं- 'भूः!' त्याच्या भुंकण्याने बाघारूच्या पायांचा आवाज थांबत नाही हे पाहिल्यावर ते पुन्हा भुंकतं- 'भूंः!' बाघारूच्या आवाजामुळे कुत्रं चमकून मान वळवतं. त्यानंतर गगनभेदी आवाजात भुंकून बाघारूवर रागावतं. कुत्रं उठून बाघारूजवळून पुढे जाऊन त्याच्यासमोर जाऊन थांबतं आणि गगनभेदी आवाजात त्याच्यावर भुंकू लागतं. बाघारू त्याच्याकडे दुर्लक्ष करून पुढे गेल्यावर कुत्रं पुन्हा त्याच्यावर भुंकतं. समोर उजव्या बाजूलाच ते मोठं घर. बाघारू त्यात जाणार. पण आधीच्या कुत्र्याच्या भुंकण्यामुळे म्हणा की बाघारूच्या पावलांच्या आवाजामुळे म्हणा, त्या घरातूनच दहा-बारा कुत्री बाहेर येऊन बाघारूला घेरतात आणि अशा सुरात भुंकायला सुरुवात करतात, की जणू वाडीवर दरोडाच पडलाय! कुत्री बाघारूला पाऊल पुढं टाकूच देत नाहीत. आता बाघारूला अंगणात प्रवेश करायचा असेल, तर कुत्र्यांना ढकलूनच पुढे जायला हवं. बाघारू आधीच्याच गतीने पुढे चालत रहातो. बाघारू गती कमी करीत नाही हे पाहून कुत्री समोरची वाट मोकळी करून तीन बाजूंनी त्याला घेऊन भुंकू लागतात. वाडीच्या शेवटी बाबूंची झाडं आहेत. रस्ता तिथून डावीकडे वळलाय. बाघारू त्या झाडांच्या मागे लपल्यावर एकेक कुत्रं गप्प होऊ लागतं, अधूनमधून एखाद्या कुत्र्याचं भुंकणं ऐकू येत. त्यानंतर तेही थांबतं.

बाघारू थांबून, दोन्ही हातांनी डोक्यावरची पानं थोडी दूर करून पहातो, डावीकडे, त्याच्यामागे हायहायपाथाच्या चहाच्या मळ्याची सीमा आहे. नीट लक्षात येण्यासाठी आणखी थोडा वेळ बाघारूला पहावं लागतं. डेमकाझोरा झऱ्याने नक्कीच इथं एक वळण घेतलंय. नदीला डावीकडे राखून हा रस्ता उजवीकडे वळून, पुन्हा डावीकडे जाऊन, चहाच्या मळ्याच्या दिशेने गेलाय. बाघारू आता चहाच्या मळ्यात मुळीच जाणार नाही.

तो रस्ता सोडून मैदानात उतरतो. आता सरळ जाऊन, उत्तरेकडे तो शालबाडीत पोचेल, नाहीतर दक्षिणेकडे फॉरेस्टमध्ये प्रवेश करून फॉरेस्टमधूनच हायवेवर येईल. त्यानंतर हायवेवरूनच चालसा मागे टाकून तो नवीन रस्ता धरू शकेल. पुन्हा फॉरेस्टमधूनही जाऊ शकेल. तेव्हाची गोष्ट तेव्हा पहाता येईल. आता, समोर 'माल' नावाची नदी आहे. त्याच्या आधी पानं आणि दगड बांधून घ्यायला हवेत.

बाघारू चढावर चढतोय. हायहायपाथाचा तो निघुवा डांगा एखाद्या मोठ्या डुकारासारखा दिसतोय. शेपूट जमिनीला टेकवून जणू तो उत्तरेच्या पहाडाकडे धावत सुटलाय-ना घास, ना झाडं, ना शेतं, ना घरं. डुकराच्या डाव्या दिशेने बाघारू चढत होता, मागच्या डाव्या पायाजवळून.

बाघारूची नजर आता पायांकडे होती. लाल रंगाच्या दगडांवरून चढण चढायची होती.

चढ चढून नंतर उजवीकडच्या उतारावरून नदीच्या दिशेने उतरताना बाघारू पायाने दोन-तीन दगड उडवतो, गंमत पहाण्यासाठी. वरून उतरत असल्याने बाघारू अनेक दृश्यं पाहू शकतो- उताराचा शेवट, हिरवाईची सुरुवात, पाण्याची रेखा, चहाच्या मळ्याची सीमा, वाडीतली झाडंझुडुपं. नदीच्या पलीकडच्या तिरावर फॉरेस्टची राखाडी रंगाची भिंत. त्या जंगलाला जणू अंत नाही. मध्ये हायवे आहे, चहाचा मळा आहे, रेल्वेलाईन आहे, नदी आहे, नदीतले चरही आहेत- पण ते सारे फॉरेस्टच्या मध्ये. या फॉरेस्टच्या मध्ये असलेल्याच एका ठिकाणी बाघारूला जायचंय. ती जागा म्हणजे डायना फॉरेस्ट.

## चौसष्ट

# कुत्र्याचा प्रतिसाद

'नदीच्या थोडं वर, उतारावर बाघारू पानं जमिनीवर ठेवतो आणि त्यांच्यावर दगड ठेवतो. नंतर मोकळ्या हातांनी खाली उतरतो. पानं आणि दगड नीट रहातील की नाही हे पुन्हा वळून पहातो. एखादी दोरी किंवा वेल शोधण्यासाठी इकडेतिकडे फिरेल. पानं बांधून घेतल्याशिवाय माल नदी पार करता येणार नाही.

खाली उतरुन वळून पाहिल्यावर बाघारूला एक कुत्रं उतारावर उभं राहून शेपूट हलवताना दिसतं. ते आपलं तोंड इकडे-तिकडे वळवून पहातयं. फॉरेस्टपलीकडे, बाघारूकडे, एवढंच काय, मधल्या नदीकडे सुद्धा.

पण या ठिकाणी कुत्रं आलं कुठून? रस्ता चुकलंय की काय? 'कुत्री रस्ता चुकत नाहीत.' मळ्याकडून आलंय की काय? 'येऊ शकतं, पण आलं कसं? मग काय कुठूनतरी

बाघारूच्या मागे-मागे आलं की काय? 'कुठून?' बाघारूला काहीच समजत नाही. डोक्यावर पानं असल्यामुळे बाघारूला पायासमोरचं सोडून बाकी फारसं काही दिसतंच नाही. पण हे कुत्रं तर एकदाही त्याच्यासमोर आलं नव्हतं. 'एकदाही कसं भुंकत नाही?' ते मागे-मागे येत असेल, भुंकेल कशासाठी? बाघारूने एकदाही मागे वळून पाहिलं नाही का? 'मागं पाहिलं नाही?' शेवटी कधी मागं पाहिलं होतं बाघारूने?

डोमकाझोरा पार केल्यारर, पानं आणि दगड एकदा खाली ठेवून बाघारूने मागे पाहिलं होतं. त्यानंतर पुन्हा तो पुढं निघाला होता. 'चालत येतंय. चालत येतंय.' त्यानंतर काही मागं पाहिलं नव्हतं. त्याच वाडीत कुत्र्यांच्या एका मोठ्या जमावाने बाघारूला घेरलं होतं.

इथपर्यंत विचार करताना जणू बाघारूला दुवा सापडतो. तेव्हाच हे कुत्रं त्याच्यामागे येऊ लागलं की काय? त्यामुळेच बाकीची कुत्री एवढी चिडली होती का? नाहीतर बाघारूला पाहून ती एवढी भुंकली कशाला? बाघारू काही कुणी साहेब नाही, त्याच्या डोक्यावर टोपी नाही, त्याच्याकडे फटफटी नाही, बाघारू तर आपल्या पायांवर चालणारा एक माणूस आहे. कुत्र्याला तर ओळखता येतं. मग तिथं भुंकली कशासाठी? नक्कीच तेव्हा हे कुत्रं मागं होतं आणि वाडीवरची कुत्री आपलं दल सोडलेल्या या कुत्र्यावरच रागावत होती.

- 'तिथं तर एकदाही भुंकलं नाही? त्यांच्यावर का भुंकलं नाही? इथं तर एकदाही समोर आलं नाही? दोन टांगांमध्ये शेपूट घालून माझ्या दोन टांगांमध्ये घुसतंय? मग मी पाहिलं नाही? कोण कुत्रं रागावतंय आणि कोण घाबरतंय ते? कुणास ठाऊक? पाहिलं पण लक्षात आलं नाही.'

स्वतःशीच केलेल्या या गप्पांनंतर बाघारू हायहायपाथाच्या त्या सूअरडांगाच्या तळाहून कुत्र्याच्या दिशेने हात पुढे करून म्हणतो, 'यूऽयूऽ!'

क्षणात कुत्रं सगळ होतं, जणू बाघारू आपल्याला हाक मारतोय ते खरं आहे की नाही याची त्याला परीक्षा घ्यायचीय. सरळ होऊन, शेपूट - कान हलवणं बंद करून ते पलीकडच्या फॉरेस्टकडे मान वळवून पहातं. 'मला शहाणपणा दाखवंतय काय?' चेहरा दाखतंय, बाघारूला. ते पहायला बाघारूला अर्थात चांगलंच वाटतं- कान उभे, मान सरळ, छाती मोठी. 'साला, उडी मारणार!' उडी मारु शकेल. पण पळणार नाही का? बाघारूने अद्याप त्याची पाठ आणि मागचा भाग पाहिलेला नाही.

बाघारू पुन्हा आपला उजवा हात पुढे करतो, 'यू ऽ, यू ऽ!' ही दुसरी हाक ऐकल्यावर कुत्रं हलतं. दोन पावलं खाली येऊन उभं रहातं. दुसरीकडे पहात शेपूट हलवतं. जणू, आता बाघारूनेच पुढं यायला हवंय. बाघारू आणि कुत्रा यांची एकदाही नजरानजर झालेली नाही, त्यांचा एकमेकांना स्पर्श झालेला नाही. अद्याप त्या दोघांना एकमेकांची भाषा समजत नाही. एकदा माहीत करून घ्यायला हवी.

बाघारू कुत्र्याच्या दिशेने जायला सुरुवात करतो.

कुत्रं दुसरीकडे तोंड वळवून उभं रहातं. एक नवीन माणूस त्याच्या दिशेने येतोय आणि तो उभाच आहे ही अनिश्चितता कुत्र्याला असह्य वाटल्यानेच जणू ते मान फिरवतं. पण बाघारू अर्ध अंतर आल्यानंतर ते बाघारूकडे पहातं. आपली शेपूट - कान - मान हलवायला सुरुवात करतं. एकदा पळून जायला रस्ता कुठं आहे हे सुद्धा पाहून घेतं. बाघारू कुत्र्याकडे येतोय. कुत्रं आपली मान बाघारूच्या दिशेने लांब करून दोन पावलं मागं जातं. बाघारू आणखी दोन पावलांतच कुत्र्याच्या अगदी जवळ येऊन पोचतो.

आता बाघारू कुत्र्याला धरू शकतो, पण धरीत नाही. कुत्र्यालाही आता उडी मारून पळून जाता येत नाही. शेपटी पायांत घालून ते कुई कुई करायला सुरुवात करतं. पुढे न जाता, फक्त हात पुढे करून बाघारू त्याची मान धरू जातो, तेव्हा ते कुई कुई करीत थोडं मागे सरकतं. बाघारू सरळ उभा राहून, दोन्ही हात पुढे करून म्हणतो, 'यूऽ, यूऽ!' 'फिसफिस' करतो.

मान खाली ठेवूनच कुत्रं बाघारूचा अंदाज घेऊ पहातं. कुत्र्याला पळून जाता येत नाही. आपल्या बेघरपणाची त्याला प्रथमच जाणीव होते. बाघारूला ते ओळखीत नाही, याची भीती त्याच्या मनात दाटलेली. ते मातीवर आडवं होतं.

आता आपणच पुढे सरायला हवं हे कुत्र्याला जाणवतं- मग बाघारूची किती ही भीती वाटो. ते मातीवर आडवं झालेलं असलं, तरीही आता तोंड पुढं करायला हवं.

कुई - कुई करीत ते दोन पावलं पुढं सरकतं. बाघारू कमरेवर होत ठेऊन उभा आहे. कुत्रं उभं राहून शेपूट हलवतं. बाघारू त्याला स्पर्श करीत नाही. स्पर्श करण्याची वेळ निघून चाललीय हे कुत्र्याच्या लक्षात येतं. तेव्हा ते अत्यंत हळू हळू आपलं तोंड वर उचलतं. शेपूट हलवणं बंद करतं. बाघारूच्या कमेरपर्यंत तोंड उचलतं. मागच्या पायांनी माती उडवतं. कुत्र्याच्या तोंडाकडे हसतंमुखाने पहात बाघारू त्याच्या तोंडाला स्पर्श करतो. तळहात कुत्र्याला ओठांवर ठेवतो.

कुत्रं याचीच वाट पहात होतं. ते आपले ओले ओठ बाघारूच्या तळहातावर घासतं. बाघारूलाही हाच संकेत हवा होता. तो दोन्ही हातांनी कुत्र्याला दोन्ही गालांवर कौतुकाने चापट्या मारतो.

## पासष्ट

# बाघारूला मित्रलाभ होतो

इतका वेळ आपण मान आणि शेपूट खाली घेऊन जमिनीवर लोळत होतो, हे विसरून, क्षणात कुत्रं बाघारूच्या मुठीतून दूर सरून मागच्या दोन्ही पायांवर उभं राहून,

समोरचे दोन पाय बाघारूच्या छातीवर ठेवून आपलं तोंड बाघारूच्या तोंडाच्या दिशेने पुढं करतं. बाघारू आपलं डोकं मागं घेतो. त्याला कुत्र्याच्या अंगाचा वास येतो. कुत्रं आपलं नाक बाघारूच्या गळ्याजवळ नेतं आणि छोट्या-छोट्या श्वासांनी बाघारूचा वास घेत रहातं.

कुत्रं बाघारूच्या छातीवर भार देऊन उभं राहिल्याने बाघारूचे पाय उतारावरून मागे घसरु लागतात. तो कंबर आणि उजवा पाय जरा पुढे सरकवून तोल सावरतो. उद्वेग आणि अनिश्चितता यांच्यातून इतक्या वेळाने बाहेर पडल्याने कुत्रं आता आपलं संपूर्ण समाधान झाल्याशिवाय शान्त होणार नाही.

बाघारू ताबडतोब कुत्र्यांच्या पुढच्या दोन पायांखाली दोन हातांनी आधार देऊन तोल सांभाळू पहातो. नंतर डावा हात कुत्र्याच्या मानेवरील केसांत घालून त्याची करणाऱ्या ध्वनींमधूनही बाघारूच्या श्वासांची उष्णता कुत्र्याला जाणवते.

कुत्रं बाघारूचा डावा बाहू आपल्या दातांमध्ये धरतं, बाघारूला आपल्या दंडावर कुत्र्याला दातांची धार जाणवते, कुत्र्याला उजव्या हाताने जरा दूर करून, तप्त श्वासांनी बाघारू म्हणतो, 'उभा रहा, उभा रहा!' बाघारूला उजव्या पाय जरा सरकवावा लागतो. तेवढ्यात कुत्रं एवढ्या वेगाने आपली मान उजवीकडून डावीकडं वळवतं, की पाय घसरून बाघारू उताणा पडतो. कुत्रंही पडतं, पण ते आपल्या चार पायांवर नीट उभं रहातं. बाघारूच्या मानेच्या दिशेने येऊ लागतं. 'थांब, थांब!' बाघारू म्हणतो, पण ते ऐकत नाही. बाघारू दोन्ही हातांनी त्याची मान धरतो, 'साऽला!' म्हणून पुन्हा सोडून देतो.

कुत्रं बाघारूच्या पायाच्या दिशेने पडतं. बाघारू उठून उभा रहाण्यासाठी प्रयत्न करतो, पण ते आव्हान आहे असं वाटून कुत्रं पुन्हा त्याच्या छातीवर झेप घेतं, आणि बाघारू पुन्हा उताणा पडतो. आता कुत्रं त्याच्या वर.

'साला, थांब म्हणतोय सारखा, पण ऐकत नाही!' बाघारू कुत्र्याला ढकलू पहातो, कुत्रंही आपल्या वजनाने थोडा वेळ बाघारूला दाबून धरतं. बाघारू आपल्या दोन्ही गुडघ्यांना सांडशीप्रमाणे वापरून कुत्र्याला दूर करतो, आणि उताणा पडतो. हाताच्या आणि पायाच्या जोराने त्याला उताणाच ठेवतो. पाय आकाशाकडे करून कुत्रं आपली मान डावी-उजवीकडे वळवीत कुई-कुई करू लागतं. सुटू पहाण्यासाठी अंगाला झटके देतं. 'साला, ऐकत नाहीस काय? रहा आता उताणाच!'

थोड्या वेळानंतर बाघारूने हाता-पायांचा दाब कमी करताच कुत्रं ताडदिशी उभं रहातं. बाघारू डोळे मिटून-पडूनच रहातो.

उठल्यावर कुत्रं काही वेळा आपलं अंग हलवतं. एकदा 'भू : भू :' करून भुंकतं. बाघारू जवळ नसल्याप्रमाणे चुपचाप उभं रहातं. शेवटी बाघारूकडे पहातं. बाघारू इतका अचल पडलेला असतो, की कुत्र्याला संशय येतो. बाघारूला हाक मारण्यासाठी ते नरम आवाजात भुंकतं. तरी ही बाघारू उठत नाहीसं पाहून वास घेत घेत बाघारूच्या हाताजवळ

येतं. हाताचा, वाऱ्याचा वास घेतं. बाघारूचा पाठीचा वास घेतं. 'गुर्रर' आवाज करतं. मागच्या पायांनी माती उकरतं. बाघारूच्या लक्षात येतं, की कुत्र्याने आपल्या पाठीवरचा, वाघाने ओरखडल्याचा डाग ओळखला आहे.

कुत्र्याने आपल्याला चाटायला सुरुवात केल्याचं बाघारूला जाणवतं. त्या चाटण्याने बाघारूला आराम वाटतो.

## सहासष्ट

# निर्वासनाच्या दिशेने

कुत्र्याशी भेट होण्याआधी बाघारू जिकडे चालला होता, त्याच झाडापुडुपांच्या दिशेने आता कुत्र्यासहित जातो. कुत्रं बाघारूजवळून, आपल्या मजेत चाललं होतं. अधूनमधून स्वतःची शेपटी धरण्यासाठी स्वतःभोवती फिरत होतं.

नदी पार करण्यासाठी, पानं बांधायला बाघारूला काहीतरी मिळवलंच पाहिजे. पलीकडे गेल्याबरोबर फॉरेस्ट.

शेवटी त्याला एक मजबूत वेल सापडते. ही वेल तोडायलाच हवी. बाघारू त्या वेलीला लटकून झटके देऊ लागतो. शेवटी ती तुटते, आणि बाघारू तिच्यासह धप्पदिशी जमिनीवर पडतो. वेल त्याच्या अंगावर पडते.

तो पडलेला पाहून कुत्रं भुंकतं. 'साला फुकट भुंकतो नुसता! साला!

उभा राहून बाघारू वेल सरळ करतो. बरीच लांबलचक वेल. उजव्या हाताने तो वेल डाव्या हाताच्या मनगटावर बांधू लागतो. बरीच लांबलचक वेल आहे. बांधून झाल्यावर बाघारू पानांजवळ येतो.

पानांभोवती वेल कशी बांधावी याचा तो विचार करू लागतो. एकदा पानांकडे आणि एकदा वेलीकडे पहात रहातो. वेल कशी बांधायची, ते ठरवतो. नदीच्या प्रवाहाच्या वेगाचाही अंदाज घेतो.

वेलीने बाघारू पानं त्यांच्या टोकांशी आडवी बांधतो. इथं पानांची रुंदी सर्वात कमी आहे. एका टोकाशी गाठ मारुन बाघारू दगडाने वेल तोडतो. आता दुसऱ्या टोकाशी गाठ मारतो.

पानं बांधून झाल्यावर ती डोक्यावर घेऊन तो उभा रहातो. पानं झुलवून पहातो. आडव्या बाजूने आणि उभ्या बाजूने त्याने पानं बांधली आहेत. गाठी दिल्या आहेत. प्रवाहाच्या धक्क्याने ती सुटणार नाहीत.

पानं डोक्यावर घेण्यापेक्षा ती खांद्याला किंवा गळ्यात बांधून नदी अधिक सोपेपणाने

पार करता येईल, असं त्याला वाटतं. तो वेलीने पानांभोवती एक वेढा देऊन, गाठ मारून, ती गळ्यात घालता येतील असं करतो.

बाघारू कुत्र्याला हाक मारतो. 'साल्या, मूर्खा, हकडं ये!' कुत्रा त्याची हाक ऐकत नाही. बाघारू पुन्हा हाक मारतो. ते जवळ आल्यावर उरलेली वेल त्याच्या गळ्याभोवती बांधतो. 'असू दे. कधी उपयोगाला येईल सांगता येत नाही!'

बाघारू आता नदीच्या दिशेने निघतो. पानं त्याने गळ्यात बांधण्याऐवजी आता खांद्यावर घेतली आहेत. नदीजवळ आल्यावर, कुठून नदीत उतरता येईल याचा अंदाज घेतो.

जिथून नीटपणे नदीत उतरता येईल, अशी जागा सापडल्यानंतर तो थांबतो, एका दगडावर उतरतो. तिथून पाण्यात उतरतो. पोहोण्यासाठी उजवा हात हलवता येणार नाही. कारण उजव्या खांद्यावर पानं आहेत. ती पानं तो पाठीवर घेतो. जनपद तो सोडून आलाय. पलीकडे आहे अरण्यपद. त्या अरण्याचा अंत त्याला ठाऊक नाही. तिथेच आहे त्याचं निर्वासन. नदीच्या प्रवाहाचा त्याला धक्का जाणवतो. कुत्रं पाण्यात उतरलं की नाही, हे पहाण्यासाठी बाघारू मागे पहात नाही. पोहोंता पोहोता त्याच्या लक्षात येतं, की ते तर पोहत आपल्यापुढे गेलंय. कुत्र्याचं नांव त्याने ठेवलंय- 'खोकाबोका' - मूर्ख पोरटा. खोकाबोका पोहोताना तोंड उजवी-डावीकडे वळवतोय. बाघारू पोहोत पोहोत पलीकडे, फॉरेस्टमध्ये, आपल्या निर्वासनभूमीत निघून जातो.

## सदुसष्ट

# अर्थनीतीतील काही प्रक्षिप्त

सरकारी फॉरेस्टमध्ये गायी-म्हशी चारण्याची व्यवस्था आहे. त्यासाठी प्रत्येक गायी-म्हशींप्रमाणे काहीएक रक्कम देऊन लायसेन्स घ्यावं लागतं.

थंडीनंतर आग लावून जंगल साफ केलं जातं, कारण त्यामुळे पावसाळ्याआधी नवीन झाडं लावता येतात. काही-काही ठिकाणी मेलेली झाडं कापून बाद करण्यात येतात. काही काही झाडं इतकी मेलेली असतात, की ती कापण्याचा खर्च परवडत नाही. ती जाळून टाकण्यात येतात.

ही आग वगैरे लावून जंगल साफसूफ करण्यात येत असतं, तेव्हाच गुरं चारण्याचं लायसेन्स काढून ठेवावं लागतं. ही लायसेन्सेस बीट ऑफिस देतं. तरीही तिथून पुन्हा रेंज ऑफिसमध्ये जाऊन शिक्का घ्यावा लागतो.

आग लावल्यानंतर सारं फॉरेस्ट कसं सुनं-सुनं वाटतं. खूप दूरपर्यंत दृश्य दिसू

लागतं. एका नदीच्या पैलतिरापासून दुसऱ्या नदीच्या ऐलतिरापर्यंत! फॉरेस्टमधील आगीमुळे पडलेले डाग-राख धुवून जाण्यासाठी पावसाळ्यातील सुरुवातीचे काही दिवस लागतात. पहाता पहाता सारं स्वच्छ होतं.

कधीतरी नवीन गवत उगवायला सुरुवात होते. फॉरेस्टच्या मातीवर कोवळ्या, हिरव्या गवताचं आवरण पसरतं. गवत वाऱ्यावर झुलू लागतं. त्याचवेळी वेगवेगळ्या इलाख्यातल्या गोठ्यांमध्ये गाई-म्हशी येऊ लागतात, गोठे भरू लागतात.

गोठेवाले लोक जवळजवळ संपूर्ण वर्षभर गुरं फॉरेस्टमध्ये चरतात. हिवाळ्याच्या शेवटी, वसंताच्या सुरुवातीला कायद्याप्रमाणे त्यांच्या गुरं चारण्याच्या लायसेन्सची मुदत संपते. त्यांनी आपले गोठे फॉरेस्टबाहेर हलवावेत असं कायदा सांगतो. कारण, तो जंगल साफ करण्याचा काळ असतो. पण गुरं घेऊन बाहेर येणं जवळजवळ अशक्य असतं. पंचवीस पन्नास-शंभर गाईम्हशी घेऊन, फॉरेस्टमधून बाहेर येऊन पुन्हा गावाकडे परत जाणं शक्य असतं का? या सगळ्या गाईम्हशींशी गावाचा काही संपर्कच नसतो. त्यामुळे गोठेवाले या काळात फॉरेस्टमध्येच रहातात. संधी असेल, तर फॉरेस्टमध्ये फॉरेस्टच्याच खुल्या जमिनीवर, किंवा नदीच्या चरावर, किंवा चहाच्या मळ्याच्या मोठ्या मैदानावर ते दिवस काढतात. फॉरेस्टमध्येच चहाच्या मळ्यासारखी मोकळी जमीन असल्यास या काही दिवसांसाठी तिथे प्रचंड असा गायींचा आणि म्हशींचा बाजार बसतो. काही गोठे काही दिवस एकसंगे रहातात. संधी सवड मिळाली तर मालकही अपापले गोठे पाहून जातात. काही खरेदी विक्रीचे व्यवहारी होतात. वर्षानुवर्षे असा क्रम चालत असल्याने आता कोणता गोठा कोणत्यावेळी फॉरेस्टमध्ये कोणत्या ठिकाणी असतो, हे सगळ्यांना ठाऊक असतं.

संपूर्ण वर्षभर ही गुरं अशी फॉरेस्टमध्येच का रहातात?

दोन्ही बाजूंनी त्याची दोन कारणे आहेत. एक कारण फॉरेस्टचं. इतक्या गाईम्हशी चरल्यानंतरही फॉरेस्टमध्ये इतकं गचपण उगवतं की नवीन चाऱ्याचं कुंपण नष्ट होतं, जुन्या झाडांची शरीरं खाक होऊन जातात. अस होतं ते जिथं बारापैकी सात महिने पाऊस असतो, त्या जलपाइगुडीच्या या फॉरेस्टमध्ये. या कारणांमधूनच इतक्या दिवसांत अनेक छोटी - छोटी कारणं जन्मली आहेत. संपूर्ण वर्षभर गाईम्हशी चारायच्या लायसेन्सची फी आहे प्रत्येक गुरामागं दहा ते वीस पैसे. ज्याच्याकडं वीस गुरं आहेत तो दहा गुरांसाठी, ज्याच्याकडं पन्नास आहेत तो पंचवीस गुरांसाठी, ज्याच्याकडे शंभर आहेत तो पन्नासांसाठी लायसेन्स फी देतो. त्यापेक्षा अधिक असलेल्या गुरांसाठी फॉरेस्ट गार्ड, बीट ऑफिसर, आणि अगदी मोठमोठ्या गोठ्यांच्या बाबतीत अगदी रेंज ऑफिसरलासुद्धा पैसे मिळतात. तेव्हा फॉरेस्टमध्ये गुरं चारण्यामागं जसा फॉरेस्ट डिपार्टमेंटचा, तसाच कर्मचाऱ्यांचाही स्वार्थ आहे.

आपली गुरं फॉरेस्टमध्ये ठेवण्याचं एक कारण आहे गुरांच्या मालकांचं. गुरं फॉरेस्टमध्ये ठेवणं खूप स्वस्त पडतं. गुरांच्या केवळ खाण्याचाच खर्च वाचतो असं नाही, तर इतकी गुरं पाळण्यासाठी ज्या प्रमाणात जमीन लागली असती, गोठा बांधायला आणि त्याची निगा राखायला दरवर्षी जो खर्च पडला असता, तो ही वाचतो.

पण या मालकांचीसुद्धा या प्रमुख कारणाआत अनेक छोटी छोटी कारणं आहेत.

फॉरेस्टची जमीन तर सगळीकडे पसरलेली असते. झाडंझुडपं जंगलात, जंगलाबाहेर अनेक ठिकाणी असतात. कुठे कुठे तर फॉरेस्टच्या ब्लॉकपेक्षा मोकळी जमीनच अधिक मोठी असते. गोठ्यांच्या मालकांना अशा ठिकाणचं लायसेन्स मिळवता आलं, तर गुराखी मग नांगर - बैलही घेऊन येतात. ते मग जोतदारांसाठी तिथे शेती करतात. फॉरेस्ट डिपार्टमेंटचे जे लोक इथं असतात, तेही शेतीत मदत करतात, कारण पिकाचा एक हिस्सा त्यांनाही मिळतो.

फॉरेस्टच्या जमिनीवर शेती करण्याची आणखीही एक पद्धत आहे. फॉरेस्टमध्ये 'फॉरेस्ट व्हिलेजर्स' म्हणून एकेका दलाला राहू दिलं जातं. ते लोक पाचोळा, काटक्या आणि थोड्याश्या जमिनीवर रहाण्याच्या आणि शेती करण्याच्या बदल्यात पहारा देतात- पोचर्सची आणि लाकूडचोरांची खबर बीट ऑफिसला देतात. हे लोक इतके गरीब असतात, की गरीब राजवंशी खेड्यांतही यांना रहायला जागा मिळत नाही. पण 'फॉरेस्ट व्हिलेजर्स' बनल्यावर जोतदारांच्या लेखी त्यांचा भाव वाढतो. या व्हिलेजर्सना फॉरेस्ट जमिनीवर कायदेशीर हक्क मिळतो. त्या अधिकाराचा फायदा घेऊन जर त्यांना नांगर आणि बियाणं दिलं- गुराख्यांच्या हातून, आणि त्यांना घराजवळची जमीन कसायला सांगितली, तर ती शेती कायदेशीर होते. जोतदारांनी त्यांचा पिकातला न्याय्य भाग घेतला, तर तोही कायदेशीर ठरतो.

या परिस्थितीकडे दोन पैलूंनी पहाता येतं- फॉरेस्टच्या जमिनीवर जोतदारांची आधियारी, किंवा डुअर्सच्या दाट अरण्यात शेतीचा विस्तार.

नाना प्रकारे ही प्रक्रिया भारतातल्या सगळ्याच वनांमध्ये सुरू झाली आहे. फॉरेस्टमधल्या शेती करण्यायोग्य जमिनीवर फॉरेस्ट डिपार्टमेंट ताबा ठेवू शकत नाही. पोलिसांकरवी या 'जबरदखल' करणाऱ्या लोकांना हाकलून देण्यात येतं, पण पहाता-पहाता गेल्या काही वर्षात वर्तमानपत्रांत 'फॉरेस्ट स्क्वॅटर्स' हा एक शब्दच तयार झालाय.

फॉरेस्टमध्ये गेल्याबरोबर मोठं पीक - असाच जर प्रकार असता, तर फॉरेस्टमध्येच गावं वसली असती. पण इथून पुढे ते आता शक्य नाही. आता फॉरेस्टचा व्यवसाय जोतदारांच्या शेतीच्या व्यवसायापेक्षाही अधिक पटींनी फायद्याचा आहे. ज्या व्यवसायाचा पैसा व्यावसायिकाच्या घरी येत नाही, तो व्यवसाय अर्थहीन. 'काय होणार हे पहाडा-पहाडावर अन जिल्ह्या-जिल्ह्यात जंगलं ठेवून? अरे, माणसांना रहायला जागा नाही, अन

झाडं वाचवा म्हणताहेत! त्यात वर वाघांनाही वाचवायचंय म्हणे! डुकरांनाही वाचवायचंय! वाचवा ना भाऊ, वाचवा! माणसं उचलू-उचलू वाघाच्या तोंडी द्या ना! वाचू द्या तुमची जंगलं अन तुमचे वाघ - हत्ती!'

स्वतःची फॉरेस्टस् वाढवून त्यातली लाकडं विकणं जर कायदेशीर असतं, तर या लोकांनी गव्हा-तांदळाची शेती करणं सोडून लाकडांचाच व्यवसाय केला असता.

अर्थात वनात घुसून नाना प्रकारे बेकायदेशीर जोतदारी करणं हाच या सगळ्या गुरंमालकांचा हेतू असतो असंही नाही. गुरं पाळण्याची अनेक कारणं असतात- दूध विकून बिनकष्टाने दैनिक लाभ असतो. त्याबरोबर कधीकधी अशी बेकायदेशीर जोतदारीही मिळून जाते. बरेचदा मिळतही नाही. पण गुरं जंगलात ठेवायची सोय होते. म्हणून गुरं पाळली जातात. मुद्दा हा, की जंगलाच्या जमिनीवर गुरं ठेवणं हा जसा एक व्यवसाय किंवा रीत आहे, त्याचप्रमाणे जंगलाच्या जमिनीवर जोतदारी- तीही बेकायदेशीरपणे करणं हीसुद्धा एक रीतच आहे. मुळात खूप प्राचीन रीत-आता पुन्हा नव्या प्रकाराने सुरू झालीय, एवढंच. दुसरी अगदीच नवीन रीत आहे- इतकी नवीन, की ती अद्याप रीत म्हणून रुळली आहे असं म्हणता येणार नाही. फॉरेस्टमध्ये जितकं पशूंसाठी खाद्य असतं, तितकं बाहेर मिळत नाही; आणि गुराख्यांच्या पोटातली भूक बाहेर भागत नाही. त्यामुळे गुरं, गुराखी, झाडं-झुडुपं- पशुपक्षी, एवढंच काय, वाघ-हत्तींसारखे प्राणीही एका सुसंगतीत राहू शकतात. ती सुसंगतीच जोतदारीमुळे नष्ट होत चालली आहे.

## अडुसष्ट

# शेतकीशास्त्रातील काही प्रक्षिप्त

ही संगती नष्ट होत चाललीय शेतीच्या आधुनिक पद्धतीमुळे.

फक्त नांगर-बैल असल्याने शेती होऊ शकते, बियाणं असल्यानेही शेती होऊ शकते. पण शेती झाली, पीक उगवलं म्हणजे धान्य पदरात पडलंच, असं नाही. कणसात दाणे तयार होऊन कापणी होईपर्यंत पीक शेतात जपावं लागतं.

फॉरेस्टमधल्या जमिनीत फॉरेस्ट-व्हिलेजर्स आधी नांगर-बैल यांच्याशिवाय शेती करीत. तेव्हा आपल्या दोन हातांनी जेवढ्या जमिनीत ते शेती करू शकत, त्या जमिनीवरचं पीकही धान्य हाती येईपर्यंत जपू शकत. पण नांगर-बैल यांच्या सहाय्याने फॉरेस्टमध्ये केलेली शेती दोन हातांनी राखता येत नाही. मुख्य संकटं दोन दिशांनी येऊ शकतात.

एक: वनातल्या पक्ष्यांनी इतक्या मोकळ्या जागेवर इतकी दाट अशी शेती पाहिलेली नसते. कणसांत दाणा भरला की नाही, हे ते वारंवार खाली येऊन पहातात आणि काही

दिवसांतच सगळं धान्य खाऊन टाकतात. अशी बिनधान्याची झाडं काही दिवसांतच वाकतात आणि पक्षी त्यांच्यातून उडू लागतात.

दोन भाताची रोपटीसुद्धा अग्नीच्या ज्योतीसारखी असतात. आपले किडे ती रोपं स्वतःच आकर्षित करतात. दोन हातांच्या मुठींनी पेरलेल्या धान्याच्या रोपांवर किडे आले, तर ते हातांच्या बोटांनी मारता येतात, पण नांगर- बैल वापरून केलेल्या शेतीत, धान्याच्या रोपांवरचे किडे मारण्यासाठी कीटकनाशक लागतं. ते अलीकडं सहज मिळतंही. देउनिया जोतदाराच्या घरी कीटकनाशक जोलिकॅनमध्ये, प्लॅस्टिकच्या पिशवीत उपलब्ध असतं. भात आणि बटाट्यावरचे कीटक मारण्याव्यतिरिक्त इतर कामांसाठीही जोतदार हे कीटकनाशक वापरतात. घरात वापरतात, बाहेर वापरतात, शिवाय चहाच्या मळ्यात वापरतात. चहाच्या मळ्यात कीटकनाशकांचं गोदामच असतं. चहाच्या पानांची किंमत भात-गहू यांच्यापेक्षा बरीच अधिक असते. चहाच्या पानांवर मारायच्या कीटकनाशकांची किंमतही अनेक पटींनी अधिक असते. आवश्यकतेनुसार फॉरेस्टच्याच मध्ये इकडे-तिकडे विखुरलेल्या चहाच्या मळ्यांमधून ही सगळी कीटकनाशकं आणता येतात, आणली जातात सुद्धा. फॉरेस्टच्या मध्ये नांगर - बैल - बियाणं वापरून केलेल्या शेतीवर ही कीटकनाशकं फवारली जातात. औषध फवारण्याचं प्रमाण अंदाजानेच ठरवलं जातं. नक्की प्रमाण इकडे कुणालाच ठाऊक नाही.

हरीण, हत्ती, गेंडे यांना भाताची रोपं खायला आवडतं. भातरोपांच्या शोधात, कळप करून ते फॉरेस्टच्या बाहेरही जातात. फॉरेस्टमध्ये, आपल्या येण्याजाण्याच्या मार्गाच्या जवळच अशी भाताची रोपं दिसल्यावर तीही येतात- हरणं कळप करून, हत्ती कळप करून, तर गेंडे बहुधा एकेकटे येतात.

कीटकनाशक औषध मारल्यानंतर लगेच जर ते आले, तर मोठ्या प्रमाणात औषध त्यांच्या पोटांत जातं- खाल्ल्या जाणाऱ्या धान्यातून, पानांतून. त्यामुळे हे प्राण्यांचे कळप बनात परत गेल्याबरोबर त्यांच्यावर कीटकनाशकामुळे विषक्रिया सुरु होते. ज्या प्रमाणात विष त्यांच्या पोटात गेलं असेल, त्या प्रमाणात हे प्राणी मरतात. या मेलेल्या प्राण्याचं मांस जे कोल्हे, लांडगे, तरस, गिधाडं खातात, तेही मरायला सुरुवात होते. त्यामुळे अगदी अचानकच एकेका फॉरेस्टमधील एकेका जागी महामारी सुरू होते. आजकाल अशी महामारी पसरू नये म्हणून नाना प्रकारच्या व्यवस्था आहेत; पण त्याही कीटकनाशकांच्या सहाय्यानेच कराव्या लागतात. कीटकनाशकं पोटात गेल्याने प्राण्यांना जी विषबाधा होते, ती दूर करण्यासाठी उपाय नाहीत. त्या प्राण्यांची प्रेतं, जवळ वहाती नदी नसल्यास दूरवर वाहूनही नेता येत नाहीत. अशी नदी असली, तर विष नदीच्या आणखी खालच्या बाजूला जातं, आणि एक गोष्ट म्हणजे, पाऊस खूप झाला, तर विषाची परिणामकारकता कमी

होते, पण कणसांतले दाणे पिकतात, ते पावसानंतरच्या उन्हातच. आणि तेव्हाच कीटकांचं प्रमाण वाढतं, पशुपक्ष्यांचं पीक खाण्याचं प्रमाण वाढतं, आणि त्यामुळे कीटकनाशकही अधिक प्रमाणात फवारावं लागतं.

दक्षिणेकडच्या काही फॉरेस्टस् मध्ये गोठ्यातलं एखादं जनावर वाघ मारून घेऊन गेला, तर गोठेवाले ते मारलेलं जनावर फॉरेस्टमधून शोधून काढीत. वाघ एकाच खेपेत काही ते जनावर - गाय किंवा म्हैस- खाऊन टाकू शकत नाही, नंतर खाण्यासाठी थोडा भाग ठेवून देतो. अशा मेलेल्या जनावरच्या उर्वरित भागात गावकरी मग कीटकनाशक औषध ओतून येत. त्यानंतर मग ते मांस खाल्ल्याने वाघ तर मरेच, कोल्हे-लांडगे-तरसही मरत. आपल्या गोठ्यातील जनावरांना जंगलामध्ये निर्धोकपणे चरता यावं, म्हणून फॉरेस्टमधल्या मांसाहारी प्राण्यांचं कीटकनाशक औषधांच्या सहाय्याने शिरकाण करण्यात येई. १९७६ सालीच केनेथ अँडरसन याने म्हटलंय, 'या प्रकारांमुळेच दक्षिणेकडच्या या सगळ्या वनांमध्ये आज एकही वाघ नाही, एकही कोल्हा नाही, एकही लांडगा नाही की तरसही नाही.'

जलपाइगुडीच्या डुअर्स भागात अवस्था अद्याप तितकी वाईट नाही. पण लक्षणं दिसू लागली आहेत. काही वर्षांपूर्वी सांबरांचा एक कळपच्या कळप एका सॉल्ट-लिकजवळ (लवणचाटणाजवळ) मरून पडलेला आढळला. विषबाधा झाल्यामुळे लवणमृत्तिका चाटता-चाटताच ही सांबरं जीभ बाहेर काढून मृत झाली होती. त्यांची शवपरीक्षाही झाली. पुढे मात्र त्याचं काहीच समजलं नाही.

काही वर्षांपूर्वी फालाकाटाजवळ एक गेंडाही असा विषबाधेमुळेच मेला होता. 'पोचर' लोकांनीच त्याच्यावर विषप्रयोग केला असावा, असं काहीजण म्हणतात.

दोन गेंडे - एक नर आणि एक मादी - नियमितपणे रात्री भात, भाताची रोपं खायला येत. एके दिवशी दिसलं, त्यातला एक गेंडा- नर- मरून पडला आहे. त्याची मादी त्याच्या मृत शरीराजवळ मोठ्या आवाजात चीत्कारत उभी होती. अनेक दिवस ? ती तिथेच उभी होती. सुरुवातीला वारंवार चीत्कारत असे. नंतर अधूनमधून - अगदी गगनभेदी आवाजात. मादीला जंगलात हाकलण्यासाठी आणि नर गेंड्याचं पोस्टमार्टेम करण्यासाठी कलकत्त्याहून विशेषज्ञ आले होते. गेंड्याचं पोट कापण्यासाठी इलेक्ट्रिक करवत, व ती चालवण्यासाठी जनरेटर आणण्यात आला होत. त्या पोस्टमार्टेमचा रिझल्ट अद्यापही समजला नाही.

गेंडा कीटकनाशक औषध पोटात गेल्यानेच मेला असं म्हणतात. ते विष पोचर्सनीच मिसळलं होतं. पशुपक्षी, झाडंझुडुपं, नदीनाले, माणसं यांची जंगलातली संगती नष्ट होत चालली आहे, हे एक सामाजिक वास्तव म्हणून आता लोकांच्या अंगवळणी पडलं आहे.

## एकोणसत्तर

# राजकारणातील काही प्रक्षिप्त

जुन्या जोतदारीच्या नवीन शेतीप्रमाणे, बाथानदारी (जनावरांचे गोठे बाळगणे) सुद्धा नव्याने सुरू झाली आहे.

जलपाइगुडी, डूअर्स आणि दार्जिलिंग पहाडांच्या पायथ्याशी असलेल्या अनेक गावांच्या नांवांमध्ये 'बाथान' (गोठा) हा शब्द आहे. 'गरुबाथान', 'महिषबाथान' ही तर अगदी चांगल्या ओळखीची नांवं. ही नांवं अशी का पडली याबद्दल काही गोष्टी आहेत. या सगळ्या गावांची वस्ती अगदी अलीकडची आहे. त्यामुळे या गोष्टींमध्ये बहुधा आजवरचा इतिहासच आहे.

पण इथलं हे गोठे - गोठे भरून गायीम्हशी पाळणं मुश्किलीने वीस-पंचवीस वर्षांपासून सुरू झालंय. अगदी काटेकोर हिशेब केला, तर पंधरा वर्षांपूर्वीपासूनही म्हणता येईल.

१९६२ मध्ये चीन-भारत युद्ध सुरू झालं, तेव्हा सकाळ-संध्याकाळच्या बातम्यांत वेगवेगळ्या गावांची नांवं सोडता डूअर्सच्या लोकांना युद्ध काहीच समजलं नाही. हायवेजवळ रहाणाऱ्यांना सतत मिलिटरीच्या गाड्या ये-जा करताना दिसत. पण सगळ्यांनाच काही ते दिसू शकलं नाही. तेही भारतातील इतर नागरिकांप्रमाणेच रेडिओवर बातम्या ऐकत, वाचू शकणारे पेपरमध्ये वाचत. ते युद्ध तर काही महिन्यांनी थांबलंसुद्धा.

युद्ध संपल्यावर सगळ्या डूअर्समध्ये नाना घटना घडू लागल्या - वर्षांमागून वर्ष. अरुंद रस्ते रुंद झाले. लाकडी साकव काढून टाकण्यात आले. छोट्या-छोट्या नद्यांवर पक्के पूल झाले. जलपाइगुडीवर तिस्तेचा ब्रिज झाला. आता शिभक ब्रिजवरून हेलपाटा घ्यावा लागत नाही. आणि, शिलिगुडीच्या उत्तरेला दार्जिलिंग पहाडाच्या पायथ्यापासून आसामपर्यंत, हायवेच्या दोन्ही बाजूंना, वनातलं जंगल साफ करून, मिलिटरी कॅम्प उभारण्यात आला. त्या कॅम्पला जणू अंतच नाही. जंगलाचा अंतर्भाग साफ करून पक्की घरं, पक्के रस्ते झाले. अगणित घरं आणि त्यांत रहाणारी अगणित माणसं. फॉरेस्टमधली मोठी-मोठी झाडं तशीच ठेवण्यात आली, त्यांच्या पायथ्याची बाजू साफ करण्यात आली.

फक्त जंगलातच नव्हे, कुठे-कुठे मिलिटरीने शहरांबाहेर नवीन शहरं वसवली. ती सारी शहरं कुठं सुरू होतात आणि कुठं संपतात हे कुणालाच ठाऊक नाही. सगळ्या जागांभोवती कुठे भिंतींची, तर कुठे काटेरी तारेची कुंपणं आहेत. कधीकधी त्या जागांवर विमानं उतरतात. त्याशिवाय गाड्यांची रांग तर लागलेलीच असते. कुंपणं घातलेली अशी अनेक शहरं दार्जिलिंग पहाडाच्या पायथ्याशी, शिलिगुडीच्या उत्तरेपासून, हायवेच्या कडेने

आसामपर्यंत तयार झाली आहेत. पण अशा विस्तृत आणि जवळजवळ सलग अशा नवीन मिलिटरीच्या गावांचा काहीही परिचय स्थानिक लोकांना नसला, तरी अनेक दूरदूरची ठिकाणं त्यांच्या सूत्रामुळे एकत्रित झाली आहेत. कुठे कुठल्या पहाडाच्या आड तोफेच्या गोळ्यांच्या चाचणीमुळे किंवा तोफा चालवण्याच्या सरावांमुळे खूप दूरपर्यंतची जमीन रोजच हादरते. लोकांना आता त्याची सवय झाली आहे. तोफेच्या गोळ्यांच्या आवाजाच्या प्रतिध्वनिशिवाय या भागात इतक्या सामरिक घटनेची काहीच प्रतिक्रिया होत नाही. त्याचं कारण म्हणजे त्या भागात जमिनीच्या प्रमाणात लोकवस्तीचं प्रमाण खूप कमी; आणि वस्तीच्या तुलनेत पहाड-नद्या-जंगल यांचं प्रमाण खूप अधिक आहे. म्हणूनच इतक्या दूर, विस्तृत प्रदेशावर मिलिटरीची शहरं उभी राहिली आहेत. स्थानिक कुठल्याही व्यापारावर त्याची काही प्रतिक्रिया झाली नाही. फक्त, मालबाजार आणि हासिमारा या ठिकाणी जुन्या युनिफॉर्मसची दोन दुकानं सुरू झाली. शिवाय या दोन ठिकाणांबरोबरच इतरही अनेक ठिकाणी पुस्तकां-मासिकांच्या दुकानांची संख्याही खूप वाढली. मालबाजार-हासिमारासारख्या ठिकाणी तर हिंदी-इंग्रजीबरोबर तामिळ, मल्याळम व तेलुगू भाषांतली वर्तमानपत्रंसुद्धा टांगलेली दिसू लागली. वीरपाडा गावी एक प्रचंड डिपार्टमेंटल स्टोअर सुरू झालं.

बिन्नागुडीला तर एक आख्खं कॅन्टोनमेंटच वसलं, फक्त त्याची अधिकृत घोषणा व्हायची राहिलीय असं ऐकिवात आहे- त्याची काही प्रतिक्रिया स्थानिक बाजारावर झाली नाही. म्हणजे बाजारातली विक्री वाढणे, उत्पन्न वाढणे असं काही झालं नाही. फक्त झालं एवढंच, की सगळ्या भाषांतल्या मासिकांवर एकाच नटीची अर्धनग्नावस्थेतील छायाचित्रं दिसू लागली.

इतक्या कॅम्पसना लागणारे खाद्यपदार्थ कॉंट्रॅक्टर्स बाहेरून ट्रकने आणतात. शिलिगुडीला एक डेपो आहे. तिथून कच्च्या भाज्या येतात. मांसाहारासाठी बकरे येतात अगदी बिहारमधून - ट्रकच्या ट्रक भरून. आता किशनगंजच्या पलीकडे एका ठिकाणी आणि तिकडे बालूरघाटला डेपो झालाय. मिलीटरीचा कारभार संपूर्ण देशभर असल्याने देशभरातून इथे मिलिटरी कॉन्ट्रॅक्टर्स आले आहेत. पण स्थानिक लोकांच्या उत्पन्न-खर्चावर त्याची काही खास प्रतिक्रिया नाही.

एक गोष्ट मात्र कॉंट्रॅक्टर्सना स्थानिक पातळीवरच संकलित करावी लागते. ती म्हणजे दूध. मिलिटरी कॅम्पमुळे दुधाची मागणी मात्र प्रचंड वाढली आहे; आणि अगदी आसपासच्या गाव-वाड्यांपासून तर थेट आसाम सीमेपर्यंतच्या वाड्यांमधून दूध संकलित करण्यात येतं. या व्यवसायात राजवंशी-नेपाळी-मदेशिया सारेच लोक उतरले आहेत.

जोतदारांनी तीन-चार वर्षांत किशनगंज - पूर्णियाला लोक पाठवून म्हशी विकत आणल्या आहेत. बहुधा सामाजिक कारणांमुळेच मिलेटरीही गुरं चारण्यासाठी लायसेन्सेस

देण्यात उत्साह दाखवते आहे. पहाता-पहाता फक्त काही वर्षांतच हायवेच्या दोन्ही बाजूंना शिलिगुडीच्या उत्तरेपासून आसामच्या सीमेपर्यंतची फॉरेस्टस गायीम्हशी ठेवण्याच्या गोठ्यांनी भरुन गेली आहेत. कॉंट्रॅक्टरला ज्या किंवा ज्या-ज्या कॅंपस्ना दूधपुरवठा करायचा असतो, त्या कॅंपच्या रस्त्याजवळ फॉरेस्टमध्ये गोठा ठेवावा लागतो- म्हणजे सकाळीच दूध संकलित करून आणता येतं. दूध काढण्याचं कामही यंत्राने करण्यात येतं. डायना नदीच्या पुलाखाली, लॅटरल रोडजवळ, गयानाथचा असाच एक गोठा आहे.

## सत्तर

# निर्वासनभूमी

बाघारूची निर्वासनभूमी टोकं दिगन्तापर्यंत दूर असलेल्या धनुष्याच्या आकाराची आणि नदीच्या एका तिरावरून दिसणाऱ्या दुसऱ्या तीरासारखी धूसर आहे.

कलकत्त्याहून आसामकडे जाणारा नॅशनल हायवे चालसाजवळ दक्षिणेला उतरून, पुन्हा मयनागुडीहून उत्तरेला जातो. जे विशाल फॉरेस्ट या सुमारे पन्नास मैल लांबीच्या 'यू' 'U' च्या विच्छिन्न दोन बाजूंना घेऊन आहे, त्यांना फॉरेस्टच्या मॅपमध्ये नाना नांवं आहेत- उपर - चालसा, नीचा चालसा, ऊपर आणि नीचू तण्डु, डायना रेंज, डायना चर, गरुमारा, खूंटिमारी. फॉरेस्ट-मॅपच्या या नाना नावांमध्ये एक नियम आहे- नावं आधी मोठी व नंतर लहान होत गेली आहेत. या चालसाहूनच एक लॅटरल रोड निघून, ज्या पन्नास मैलांच्या 'U'च्या वरची दोन टोकं जोडून सुमारे सत्तर-ऐशी मैल परिघ असलेला एक मोठा 'ओ' 'O' तयार करतो.

बाघारूची निर्वासनभूमी ज्या धनुष्यासारखी वाकलेली आहे, त्या धनुष्याची हा लॅटरल रोड ही प्रत्यंचा आहे. धनुष्य व प्रत्यंचा यांच्यामध्ये डायना नदी वाहाते. तिच्या पल्याड भूतानचे पहाड. या डायना नदीला तीस्तेसारखे पाड नाहीत. डायनापेक्षा आपलचांदच्या नदीचं पात्र रुंद आहे. या जागी नदी इतकी खळाळत वाहाते, की वाटतं नदीत पाणी नाही, फक्त बुडबुडेच आहेत. बाघारूच्या तिस्तेत फेस नाही, बुडबुडे नाहीत- अगदी अथांग पाणी आहे.

डायनाच्या दोन्ही तिरांवर वाळू आहे. पात्रांमध्ये मोठमोठे दगड आहेत. कुठे कुठे या दगडाभोवती माणसांच्या उंचीचं गवत वाढलंय.

या पहाडांसारख्या दगडांव्यतिरिक्त मग पात्रात अगदी छोट्या-छोट्या आकारांचे दगडगोटे आहेत. पात्रात पाणी कमी असताना ते इंद्रधनुष्यासारखे चमकतात.

पश्चिमेला तिस्ता आहे आणि पूर्वेला डायना आहे. डायनाच्या चरावरच गयानाथचा

गोठा आहे. त्याला इथे गोठा ठेवायलाच हावा. त्याचा कॉंट्रॅक्टर या लॅटरल रोडच्या वरच्या बाजूस, बिन्नागुडीच्या बाजूला दुधाचा पुरवठा करतो. तो तर आपलचांदला ट्रकने जाऊन दूध काढीत नाही. गोठा जर आपलचांदमध्ये असता, तर गयानाथने ओदलाबाडीकडच्या एखाद्या कॉंट्रॅक्टरकडे बंदोबस्त केला असता.

गयानाथने आपल्या गाईम्हशींचा गोठा डायनाच्या चरावर ठेवला आहे, त्याची अनेक कारणं आहेत. चराच्या दोन्ही बाजूंना डायनाचं पात्र आहे. ते पाणी जनावरांना पिण्यासाठी उपयोगाला येतं. चरावर नाना प्रकारचं गवत आहे, घास आहे. गुरांना आपल्या आवडीचं गवत खाता येतं. शिवाय या घासानंतर पुढे जंगल आहे. गुरांना कंटाळा आला, तर ती जंगलातही चक्कर मारून येऊ शकतात. भीती फक्त वाघाचीच असते. पण तेवढी रिस्क व्यापारात घ्यायलाच हवी. लॅटरल रोड जवळच असल्याने त्यावरील गाड्यांच्या आवाजाने वाघ या दिशेला येत नाहीत. शिवाय सकाळी याच रस्त्यावर कॉंट्रॅक्टरची गाडी येते.

## एकाहत्तर

# पक्षी जागे होतात, बाघारू जागा होतो

या इतिहास-भूगोलात निर्वासित बाघारू, आता, कुण्या एका रात्रीच्या शेवटी, पहाट आणि ब्रिज यांच्यामधल्या जागेत. नदीतल्या एका छोट्या उंचवट्यासारख्या वाटणाऱ्या दगडावर झोपलेला आहे.

तीन दिशांनी तीन रानकोंबडे आरवतात आणि रात्र संपल्याची घोषणा करतात. तीन कोंबड्यांपैकी एक आहे बाघारूच्या उजवीकडे, दुसरा डावीकडे, जंगलात. त्या दोघांचं आरवणं एकमेकांत मिसळतं, पण प्रतिध्वनी मात्र मिसळत नाहीत. आणखी एक कोंबडा आरवतो ब्रिजच्या दक्षिणेकडून, चराच्या मध्यभागातून. त्याचं आरवणं हलक्या आवाजातलं असतं, त्यामुळे प्रतिध्वनी येत नाही. त्यामुळे, फक्त तीन रानकोंबड्यांच्या आरवण्याच्या सात-आठ प्रकारच्या आवाजांनी आसमंत अचानक भरून जातो. ते आवाज हळू हळू शांत व्हायला थोडा वेळ लागतो. घासवनात सळसळ सुरू होते आणि ती दूरवर जाते- ती वाऱ्यामुळे असेल, किंवा श्वापदामुळे असेल. रातकिड्यांचा आवाज हळूहळू बंद होतो आणि त्या निःशब्दतेला अधिकच निःशब्द करतो.

काही काही पक्षी पंख हलवून झोप झटकतात, झाडांची पानं सळसळतात. काही पक्षी शीळ घालण्यासाठी घशातून एक स्वगत आवाज काढतात- घशातून उठलेला तो आवाज पुन्हा घशात विरून जातो. म्हशींच्या गोठ्यात एका टोकाकडून दुसऱ्या टोकापर्यंत

म्हशींच्या कान हलवण्याचे, शेपूट हलवण्याचे आवाज येतात.

तो पक्षी जागा होतो- डायना नदीवर, जंगलात, कुण्या उंच फांदीवर त्याने पंख झाडल्याचा मोठा आवाज खाली ऐकू येतो. पक्षी फांदी बदलतो.

खाली बाघारू, एकाद्या दगडासारखाच, दगडावर झोपलेला असतो. पक्षी त्याच्या उशाशी येऊन बसतो. बाघारूच्या विरुद्ध दिशेला, पहाडाकडे तोंड करतो. त्याच्या शेपटीचा बाघारूच्या डोक्याला स्पर्श होतो.

बाघारू जागा होतो, डोळे उघडतो, पण हालचाल करीत नाही. पक्षाची शेपटी बाघारूच्या कपाळाला लागली, गुदगुल्या झाल्या. पक्ष्याची शेपटी बाघारूच्या उजव्या डोळ्याजवळ आहे. बाघारू डाव्या हाताने पक्षाला धरू शकतो, पण धरत नाही.

पक्षी अचानक उडाला, एकदम आकाशात, जणू कुणी दोरी बांधून त्याला वर ओढलं- अगदी सरळ रेषेत. त्यानंतर लगेच तो वनाच्या मध्यभागी निघून जातो- बाघारूच्या डोळ्यांसमोर पक्षी वनात नाहीसा होतो. बाघारू हलत नाही. पक्षी परत येईल. विचार करता-करता पक्षी नदीच्या काठाकाठाने परत येतो. आता जणू पाण्यावर झेप घेऊन, पुन्हा वर येऊन, बाघारूच्या डावीकडे फॉरेस्टच्या दिशेने उडून, त्यात मिसळून जाऊन, पुन्हा अंधारातून बाहेर येऊन, बाघारूच्या दगडाच्या वरतून चक्कर मारून खाली उतरतो. 'साला! जंगलात आसरा शोधतोस! माणूस दिसत नाही का काय तुला?'

## बहात्तर

# नदी जागी होते

बाघारू आता खरोखर जागा होता. अंगाला लागलेली रग नष्ट करण्यासाठी आळोखेपिळोखे देतो. त्याने शरीर शिथिल होतं. बाघारू पहातो, आकाशात एकही तारा नाही. बाघारू हाक मारतो. 'भोखा!'

न पहाताच बाघारूच्या लक्षात येतं, भोखा कुत्रा उठून आलाय, आता त्याच्या पायांजवळच आहे. डाव्या पायांच्या बोटांना त्याला भोखाच्या ओठांचा स्पर्श जाणवतो. बाघारू आपला डावा पाय भोखाच्या पाठीवर ठेवतो. भोखा बाघारूच्या पायाशी मुटकुळं करून बसतो. बाघारू आकाशाकडे पहात खुक करून हसतो. 'साला, आळशी कुठला!'

रात्रीच्या शेवटी आणि पहाटेच्या आधी सर्वांत अधिक गहन अंधार असतो. चंद्रताऱ्यांचा प्रकाश आकाशात मुळीच नसतो. पहाटेचा प्रकाश आलेला नसतो. झाडांच्या छायाकृतीसुद्धा दिसत नाहीत. बाघारू भोखाच्या पाठीवर डावा पाय हलवतो- 'साला, आळशी! भुंकायलाही नको! झोपायला पाहिज! झोप! झोप ना! झोपाळू कुत्रा - झोप!'

बाघारू उठून बसतो. त्याच्या पायाशी पक्षाची दोन पिसं पडलेली असतात. बाघारू ती उचलून घेतो आणि गोठ्याकडे पहातो. गोठ्याकडे पहात असताना त्याच्या कानी नदीच्या प्रवाहाचा आवाज येतो; प्रवाहातल्या दगडगोट्यांचा टुंग टांग असा आवाज येतो. अगदी याच वेळी हा आवाज येतो. रात्री वनातले नाना आवाज कानी येत नाहीत. दिवसाही तेच.

बाघारूने नीट विचार करूनच हा दगड निवडला आहे. यावरून जवळजवळ सगळं दिसतं. पाऊस- ढग वगैरे नसतील तर बाघारू या दगडावरच झोपतो. पाऊस असेल, तर मात्र त्याने समोरच्या जंगलात एका झाडावर मचाण तयार केलंय. त्यावर तो बसतो किंवा झोपतो.

म्हशींकडे पाहिल्यावर त्याला त्यांच्या रवंथ करण्याचा समवेत आवाज येतो. हा आवाज रात्री हळू हळू वाढत रहातो पण इतर आवाजांमुळे ऐकू येत नाही. तो आवाज ऐकताना वाटतं, जंगलात कुठंतरी खड्डा तयार होतोय. तो आवाज राडकिड्यांच्या आवाजाप्रमाणेच जंगलात मिसळून जातो.

गोठा आणखी नीट पहाण्यासाठी बाघारू उठून उभा राहातो. तो छायाकृतीसारखा दिसतो, कारण त्याच्याभोवती आकाश आणि अवकाश यांच्याशिवाय काहीच नाही.

या जंगलात छायाप्रकाश दिवसभर बदलत असतात. त्यामुळेच कालप्रवाह लक्षात येतो.

बाघारू पहातो, गोठा नक्कीच आहे. भोखा भुंकत नाहीय. म्हणजे ठीकच आहे. भोखा झोपलाय म्हणजेच सगळं ठीक आहे. भोखाजवळ जाऊन बाघारू त्याच्या पोटाला पायाचा स्पर्श करतो. कौतुकाने म्हणतो, 'साला, आळशी, झोपाळू कुठला!' भोखा बाघारूचा पाय आपल्या पायांत गच्च धरतो आणि अगाचं मुटकुळं करतो. 'साला, सोड, खाली उतरायचंय!' बाघारू म्हणतो. त्याच्या पायाच्या तळव्याला भोखाच्या पोटावरची लव नरम वाटते आणि घोट्याला त्याची नखं जाणवतात.

पाय सोडवून घेऊन, पक्ष्याची पिसं धरलेला हात डोक्यावर उचलून बाघारू खालच्या दगडावर उडी मारतो. तिथून आणखी खालच्या दगडावर. आकाशात बाघारूची छायाकृती हळूहळू फॉरेस्टच्या अंधारात मिसळून जाते. बाघारूची रात्र संपली. गोठ्यातली जनावरं अजून उठलेली नाहीत. फॉरेस्टमध्ये अंधार अत्यंत गहन आहे.

सर्वात खालच्या दगडावरून एक छोटी उडी घेऊन बाघारू नदीत उतरतो. आता त्याच्यासमोर सगळीकडे आहे पाण्यावरचा फेस, आणि नदीची खळखळ.

बाघारू त्याच्या गोठ्यात शिरतो. म्हशींच्या पाठींना, पोटांना, तोंडांना, शिंगांना स्पर्श करीत-करीत तो पाण्याच्या दिशेने जातो. म्हशी फॉँस-फॉँस असे श्वास सोडून त्याला ओळख दाखवतात. माना वळवतात, कान-शेपट्या हलवतात. म्हशींच्या शेणात

बाघारूचे पाय भरतात. डायनाच्या पाण्याच्या काठाशी येऊन बाघारू थोडा थांबतो.

पाणी असलं, की ते ठिकाण जरा स्वच्छ वाटतं. पाण्यात प्रकाश खेळणारच. आणि डायनाचं फेसाळ पाणी स्वतःच एकप्रकारे प्रकाश फेकतं. बाघारू बारकाईने पहातो. आणखी खालच्या बाजूचा, तिस्तेकाठचा तो माणूस आहे. वरची अशी नदी रोज पहाण्याची त्याला सवय नाही. तिस्ता तर एखाद्या फॉरेस्टसारखी आहे, किंवा आकाशासारखी आहे. डायनाचा सराव होण्यासाठी, तिचं नीट निरीक्षण करण्यासाठी बाघारूला रोजच सकाळी थोडा वेळ द्यावा लागणार.

बराच वेळ पहात राहिल्यावर बाघारूला त्या खळखाटाची, प्रवाहाची सवय होते. बाघारू थोडा हसतो- 'काय नदी आहे ही, डायना! बुडी घ्यायची म्हटली तरी बुडी येता येणार नाही. पण पाणी मात्र वहात असतं रात्रं दिवस, दिवसरात्र!'

बाघारू पाण्यात पाय टाकतो. घोट्यापर्यंत पाणी आहे. बाघारूला प्रवाहाची ओढ जाणवते. बाघारूने पाय टाकल्याबरोबर प्रवाहाचा आवाज थोडा बदलतो. पाण्याची रात्रभरची उष्णता, बाघारूच्या तळपायांतून त्याच्या शरीरभर पसरते. बाघारूच्या पायाच्या स्पर्शाने पाण्यातले खडे थोडे सरळतात. नदीच्या मध्यभागी एका रुंद दगडावर बाघारू उभा रहातो.

बाघारू रोज याच दगडावर उभा रहातो. दगड स्थिर नाही. बाघारूच्या वजनाने डगडगतो. या ठिकाणाहून बाघारूला डायना नदी खूप दूरपर्यंत पहाता येते. अंधारलेल्या आकाशातून बिजलीच्या रेखेप्रमाणे चमकणारी, पांढरा फेस असलेली डायनाची रेखा धावतेय. डायना काही बाघारूची नदी नाही, पण रोज याच ठराविक वेळेला डायनाच्या मध्यभागी उभे राहून डायनाचं निरीक्षण करता-करता बाघारूला तिच्याबद्दल आपुलकी, ओढ वाटू शकते. समोरचं हे जंगल, रस्ता बाघारूला आश्रय देऊ शकतो.

बाघारू दगडावर उभा राहून पाण्यावर झुकतो. त्या फेनराशीमध्ये दोन्ही हात बुडवतो. पाणी उडतं, आणि बाघारूच्या डोळ्यांना, चेहेऱ्याला, छातीला लागतं.

### त्र्याहत्तर

# गोठा जागा होतो

नदीच्या काठानेच बाघारू जरा वरच्या दिशेला जातो. तिथून सगळ्या जनावरांना नीट पाहून घेतो. दुभत्या म्हशींना बाघारूला दगडाच्या पश्चिमेला नेऊन रांगेत उभं करायचंय. दुधाची गाडी आल्यावर गोंधळ होतो. म्हशींनाही हे ठाऊक आहे. एखादा धक्का दिल्याबरोबर कुठं जाऊन उभं राहयचं हे त्यांना ठाऊक आहे. दिवसभर जंगलात कुठं

जाऊन उभं राहयचं हे त्यांना ठाऊक आहे. दिवसभर जंगलात चरल्यानंतर संध्याकाळी परत येऊन त्या आपल्याला हव्या त्या ठिकाणी उभ्या रहातात किंवा बसतात. सकाळीच त्यांची रांग करावी लागते. एकदा दूध काढायचा पंप लावणं सुरू झालं, की शोधाशोध करता येत नाही. ही जागा खूप एसपैस नसल्याने म्हशी अंगाला अंग लावून एकाच ठिकाणी थांबतात, बाघारूच्या दगडाला तीन दिशांनी घेरून. तिथे जंगल नाही. फक्त वाळू आणि दगड आहेत. आणि रस्त्याच्या बाजूला थोडा घास. म्हशी फार विसरू शकत नाहीत.

संपूर्ण रात्रभर म्हशी इतक्या स्थिर बसतात, की त्या जणू दगडी मूर्तीच आहेत असं वाटतं. सकाळचा प्रकाश अद्याप पसरला नसल्याने म्हशी सावल्यांसारखाच दिसतात.

गोठ्याच्या मागच्या बाजूला जाण्यासाठी बाघारूला आधी पाण्याच्या किनाऱ्याने, मग किनारा सोडून हळूहळू वरच्या बाजूला जावं लागतं. तिथून त्याला म्हशी दिसतात. मध्येच एक म्हैस आपली मान आकाशाकडे वळवून, एखाद्या उंच फांदीवरचा पाला खात असल्यासारखा आविर्भावात उभी आहे. बाघारू ओळखतो- ही आहे बुढी. 'साली बुढी झालीय, झोप कमी झालीय.' बाघारू चालता चालता जिभेने आवाज काढतो- 'ट् टर्रर्र, टट् टर्रर!'

चालता-चालताच तो हा आवाज काढीत असल्याने, बुढीने आपल्या आवाजाला प्रतिसाद दिला की नाही हे त्याला कळत नाही. एकेका म्हशीच्या पाठीवर थापटीत बाघारू गोठ्याच्या अगदी शेवटच्या टोकाला असलेला म्हशीजवळ पोचतो. आता तो सगळ्यांना जागं करणार. पण त्या दरम्यानच बुढी आपली मान आणखी ताणते, जणू वरची फांदी तिच्या तोंडात येत नाहीय. त्यानंतर 'आँ ऽऽऽ ग' करून आवाज काढते. ती बाघारूला शोधते. तो न दिसल्याने हाक मारतेय.

बुढीची हाक ऐकून दगडासारख्या म्हशींच्या माना वळतात, उभ्या रहातात. लगेच बाघारू हाक मारतो, 'हे ऽऽऽ, उठ, उठ्, हेट, उठ!' बाघारू शेवटच्या म्हशीला गुडघ्याने डिवचतो, 'हेट्, उठ!' बुढी बाघारूकडे तोंड वळवून हाक मारते, 'आँ ऽऽऽ ग!' बाघारू कुठंय हे बुढीला समजलंय. बाघारू म्हणतो, 'थांब, थांब; आलो, थांब!' त्यानंतर बाघारू बसलेल्या म्हशींना मागून लाथांनी डिवचतो- 'हेंट् हेंट्, उठ्, उठ् टर्रर्र ऽ, टर्रर्र ऽ!' आता म्हशी आपले मागले पाय हलवू लागतात. बाघारू त्यांच्या कानांमात्रे झापडा मारतो. म्हशी उठून उभ्या राहू लागतात. मागचे पाय अर्धे उभे रहाताच समोरचे दोन पाय झटकन सरळ करून त्या उभ्या रहातात. म्हशी उठून उभ्या रहाताच जमिनीवरून त्यांच्या शेणामुताचा वास येऊ लागतो.

अगदी मागची म्हैस उठून चालू लागते. ही म्हैस चालताचालता आता इतर बसून राहिलेल्या म्हशींना उभ्या करील. तिच्या चालण्याच्या धक्क्याने समोरच्या म्हशीही चालतील. पण त्याआधी बाघारू पुढे जाऊन थांबेल. त्यानंतर दुभत्या म्हशींना रांगेने पुढं

सोडेल. इतर म्हशींबरोबर गाभण म्हैसदेखील डुलत डुलत पुढे जाऊ लागते. 'आज वेत होईल की उद्या होईल' अशी तिची अवस्था. सगळ्या म्हशी उठून चालू लागतात. आता बाघारूला पुढं जाऊन उभं राहायला हवं. तो लगबगीने म्हशींजवळून पुढे जातो.

जाता आता दुभत्या म्हशींना इतर म्हशींमधून पुढं जाण्यासाठी वाट करून देतो. बाकीच्या इथंच रहातील. पुढे जाता जाता बाघारू म्हणतो, 'चला, चला, टर्ररं!'

## चौऱ्याहत्तर

# दुधाच्या ट्रकची वाट पहाताना गाणे

बाघारू आता डायना नदीच्या पुलावर आहे- रेलिंगला टेकून उभा. दोन म्हशीही ब्रिजवर चढून आल्या आहेत. पुलाच्या मध्यभागी, शिगं वर करून पूर्वेकडे पहाताहेत- तिकडे आहे बिन्नागुडी. तिकडूनच दुधाचा ट्रक येणार. त्याची वेळ झालीच आहे. बहुधा तो वेळेवरच येतो.

गाडीची वाट पहाणं सोडल्यास आता बाघारूला काहीच काम नाही. त्यामुळे आता तो गाऊ शकतो. त्याची गाणीही आधीच ठरलेली असतात. सूर्योदय सूर्यास्ताप्रमाणे नियमात बांधलेल्या त्याच्या कामांच्यामध्ये ही गाणी एखाद्या सूत्रासारखी तयारच असतात. कामांच्या सलगतेमध्ये त्या गाण्यामध्ये इतका विरह येतो कुठून?

'बाथान बाथान करिसेन मईषाल रे ऽऽ
(ओ तोर) बाथान करिलेन घोर
बाथान हइलेन आउला-झाउला रे ऽऽ
(ओ तोर) बाथान भरा गोबर ।
ओ मोर मईषाल बन्धु रे ऽऽ

बाघारू तान लांबवतो. बाघारू स्वतःच गुराखी आहे, स्वतःच त्याच्या विरहिणी नायिकचं गाणं जाते. गुराखी माणसाच्या विरहिणीचा हा विरह बाघारूचा, बाघारूच जणू गुराखीण आहे. गोठा त्याच्या ओळखीचा, म्हशी त्याच्या ओळखीच्या, गुराखीं तर तो स्वतःच आहे. बाघारू अदृश्य दोताऱ्याच्या साथीवर गातोय-

बाथाने बारोटा मईष
ओ मोर मईषाल ॲकला घूरेन,
घरत मोर एड़ यौवनखान
कापडे बान्धि राखेन
ओ मोर मईषाल बंधू रे ऽऽऽ-'

बाघारू स्वतःच स्वतःची विरहिणी आहे.

बाघारूच्या गाण्याला उत्तर म्हणून खालच्या चरावरून भोखा जोरजोराने भुंकतो. बाघारू गाणं थांबवून हसतो, म्हणतो, 'साला!' बाघारू गप्प झाल्यावर आणखी जोराने भुंकत भोखा ब्रिजवर येतो आणि रस्त्याच्या मध्यभागी, ट्रकच्या वाटेकडे पहात उभा रहातो.

भोखाच्या उभं रहाण्याच्या आविर्भावात संशय आहे. बाघारूही नीट ऐकतो. दूरवरून ट्रक येत असल्याचा आवाज येतोय. आधी बाघारूला ओळखता येत नसे; पण आता जंगलातला आणि कुठला जंगलाबाहेरचा, हे तो लगेच ओळखू शकतो. त्याच्या डावीकडे हृदयपूर वस्ती आहे. तिच्या वरच्या बाजूच्या फॉरेस्टपलीकडून ट्रक येत असल्याचा आवाज येतोय. काही क्षणातच तो इथे पोचेल.

ट्रक येतो आणि थांबतो. भोखा आणि म्हशी थोड्या बाजूला सरकतात. ट्रकमधून पुढच्या बाजूने ड्रायव्हर व मागच्या बाजूने दूध संकलन करणारा माणूस उतरतो.

ट्रक थांबल्याबरोबर एकजण पाईप घेऊन पुढे येतो. आता तर बाघारूने शिकून घेतलंय. त्या माणसाने बाघारूच्या हातात दूध काढण्याचा पाईप दिल्यावरही तो थांबूनच रहातो.

'लेओ, पेट्रोल चलाओ!' तो माणूस म्हणतो.

बाघारू न हलता उत्तरतो, 'माझं पेट्रोल काढा आधी!'

'हो, जरूर, जरूर!' म्हणत तो माणूस पँटच्या खिशातून सिगरेटचं पाकीट काढून, एक सिग्रेट बाघारूला देत म्हणतो. 'अच्छा, तुम्हाला मी एकदा आख्खं पाकीटच देऊन जाईन, म्हणजे तुम्हाला रोज पेट्रोल लागणार नाही.'

ड्रायव्हर म्हणतो, 'चला, जल्दी करा. ही ट्रिप पुरी करताकरताच दहा वाजतात.'

मदतनीस बाघारूपुढे माचिस धरतो. बाघारू सिगरेट पेटवतो आणि झुरका घेऊन धूर बाहेर सोडतो. तेव्हा वाटतं, बाघारूच्या तोंडात एखादी भट्टीच असावी.

ड्रायव्हर म्हणतो, 'तुझा हा झुरका पाहून आमचा तर श्वास बंद होतो बाबा!'

बाघारूचे डोळे आता सिगरेटच्या नशेने बंद झालेले असतात.

### पंचाहत्तर

## शहरातील काही प्रक्षिप्त

इकडे ट्रकच्या क्लीनरचा भोखाशी खेळ सुरू झाला आहे. तो भोखाच्या नाकासमोर काहीतरी हलवतोय, आणि भोखा ते धरायला गेल्याबरोबर ते भोखाच्या पाठीवर

सरकवतोय्. भोखा आपलं तोंड स्वतःच्या पाठीकडे नेण्याच्या प्रयत्नात गोल उड्या मारतोय आणि उड्या मारता-मारता जमिनीवर पडतोय. क्लीनर हो-हो करून हसतोय. त्यानंतर भोखा सरळ होऊन बसतो. क्लीनर ड्रायव्हरला म्हणतो, 'साला, चांगल्या क्वालिटीचा कुत्रा आहे दादा. कुठून मिळवला याला? एक धरुन ठेवायला सांगू का?

'फॉरेस्टमधूनच घ्यायचा तर एखादा वाघबिघ घे. फॉरेस्टमधून कुणी कुत्रं घेत असतं का? मूर्ख!' ड्रायव्हर नदीकडे पहात म्हणतो.

'मला अल्सेशियन पाळायची खूप इच्छा आहे दादा. मालबाजारचा बकुदला म्हणतोय एक देईन म्हणून.'

'कुठून?'

'ते ठाऊक नाही. पण बकुलदा लीडर माणूस. तो कुठल्यातरी चहाच्या मळेवाल्याकडून आणून देईल.'

'तू वाटच बघत बस. बेटा, अल्सेशियन कुत्र्याच्या पिल्लाची किंमत माहिती आहे का तुला?'

'हो, हो, ठाऊक आहे.'

'त्यापेक्षा अधिक आहे.'

'अधिक तर अधिक.'

'तसं चांगलं कुत्रं मिळालं, तर बकुल मित्तिर ते तुला कशाला देईल?'

'मध्यरात्री गाडी घेऊन मळ्यात जायची वेळ आली, तर तुम्ही जाल?'

'कशाला जाऊ? मला अल्सेशियनचीही गरज नाही, जायचीही गरज नाही. तू हे सगळं सुरू केलंस की काय?'

'काय?'

'बकुल मित्तिरबरोबर गाडी घेऊन जातोस? रात्री? गाडी मिळते कुठं तुला?'

'गाडी तर बकुलदाची स्वतःचीच आहे. इतक्या रात्री चालवायला ड्रायव्हर मिळत नाही. मी एकदाच गेलो होता.'

'तुला तर अजून ड्राइव्हिंग लायसेन्स मिळालेलं नाही, तेवढ्यात गाडी घेऊन जातोस रात्री? जाऊ नकोस.'

'बकुलदा म्हणतो, तुला एक अल्सेशियनचं पिल्लू देईन.'

'जेलमध्ये बसून अल्सेशियन पोसणार?'

'का बरं?'

'बकुल मित्तिरने रात्री गाडीवरून मर्डर केसपर्यंत केलीय हे ठाऊक आहे?'

'कोण म्हणालं?'

'तुला कशाला पंचाईत? असं रात्रीबेरात्री जात जाऊ नकोस.'

क्लीनर जरा गप्प रहातो. कुत्र्यावरून विषय इथपर्यंत येईल, असं त्याला वाटलं नव्हतं. म्हणून, विचार करण्यासाठी त्याला गप्प बसावं लागतं. अल्सेशियन कुत्रं न मिळण्याचं दुःख आणि बकुल मित्तिरबरोबर रात्री गाडी चालवण्याचं संकट- या दोनपैकी कशाने तो अधिक चिंतित झाला आहे हे सांगता येत नाही. क्लीनर पोरगं हे बोलणं संपल्याबरोबर ब्रिजच्या दिशेने चालू लागतं. पण काही पावलं जाऊन परत येतं. पोराशी बोलता-बोलता ड्रायव्हर मागे वळून उभा होता. पोरगं त्याच्याजवळ जाऊन विचारतं, 'बकुलदाला तर मी कुठं रहातो हे ठाऊक आहे. तो पाहून गेलाय.'

'काय झालं मग?'

'तो परत आला तर?'

'सांग, मी येणार नाही म्हणून.'

'वा! आधी गेलो होतो ते-'

'सांग, माझ्याकडे लायसेन्स नाही, रोज-रोज येणार नाही.

'मारलं तर?'

'खा मार!'

बकुलदा त्याला अल्सेशियन देणार इथपासून, तर बकुलदा त्याला मध्यरात्री धरून हाणणार, आणि तो मार खाणार हे सत्य पचवण्यामध्ये स्वतःला व स्वतःच्या भोवतीच्या परिस्थितीला या वेळात क्लीनरला उलटं करून पहावं लागतं. बकुलदा त्याला किमान एक झापड मारणारच, हे त्याला ठाऊक आहे. म्हणूनच याच क्षणापासून तो ती झापड खायला सुरुवात करतो. मागून ड्रायव्हर पुन्हा हाक मारतो, 'ए ऽ!'

पोरगं मागे वळून पहातं.

'ऐक!'

क्लीनरला आता पुन्हा जायला हवं. ड्रायव्हर त्याला म्हणतो, 'ऐक. बकुलदा परत आला तर सांग, की लायसेन्स नसताना गाडी चालवल्याबद्दल पोलीस-ठाण्यावरच्या दारोगाने तुला खूप मारलंय, आणि बकुलदाची गाडी चालवतोस का असंही विचारलंय. एवढंच बोल. मग पहा, तो तुला परत नेणार नाही.'

'दारोगाचं सांगू?'

'हो, दारोगाने तुझ्याकडे बकुलबाबूची चौकशी केली असं सांग.'

आता पोरगं दूध काढण्याच्या ठिकाणी जातं. त्याच्या हातात लाल रुमाल होताच. तो एकदा फडकवतो, ते पाहिल्याबरोबर भोखा उडी मारून त्याच्यासमोर येतो. पण क्लीनर पोरगं काही आता भोखाबरोबर खेळत नाही.

## शहात्तर

# दूध काढणे

पहिल्या दिवशी पाईपने दूध काढण्याचा सराव होण्यासाठी बाघारूला तीन-चार म्हशी लागल्या होत्या. नंतर लक्षात आलं, की शिकायला गेलं की गोंधळ होतो. खरं तर त्यात शिकण्यासारखं काहीच नाही. हाताच्या आकाराच्या एक रबरी पोकळी असलेला फुगा. त्याला चार बोटं. बोटांची टोकं उघडी. ती म्हशींच्या थानांना लावायची. ट्रकमधून पंपिंग होत रहातं.

आधी-आधी बाघारू एका म्हशीच्या थानांना पाईप लावून नंतरच्या म्हशींची थानं ओढीत असे, दूध यावं म्हणून. आता तेही करीत नाही. वासरामुळे ते येतं.

पुलाच्या तोंडाशी बाघारू रस्त्याच्या मध्येच बसतो. यामुळे कामात जरा गैरसोय होते. तिकडून जरा चढ चढून म्हशींना यावं लागतं. बऱ्याच म्हशींना ते करावंसं वाटत नाही. काही-काही म्हशी मध्येच वळून मागे जातात. तिकडे कुणीतरी असतं, तर इथं बसून काम करण्यात सोय होती- त्याने खालून म्हशी पाठवल्या असत्या, आणि दूध काढून झाल्यावर बाघारूने पुन्हा खाली पाठवल्या असत्या. भोखाकडून बाघारू थोडं काम करून घेतो हे खरं, म्हशीही भोखाचं ऐकतात. पण कुणी गडबड केली की म्हशी-भोखा यांच्यात प्रचंड काण्ड सुरू होई. म्हणूनच बाघारू भोखाला फारसं बोलावीत नाही. या मोठ्या रस्त्यावर बसून बाघारू जी म्हैस जवळ येईल, तिचं दूध काढून घेतो. त्यानंतर बाकीच्यांना वर घेऊन येतो.

संपूर्ण दिवसभरात या एका दूध काढण्याच्या वेळीच संपूर्ण गोठ्याला एक काम सुरू आणि पूर्ण करावं लागतं. या वेळी दुभत्या म्हशी सर्वात पुढे असतात, एकामागून एक जाऊन आपल्याला दूध देऊन यायचंय हे त्यांना ठाऊक असतं. गोठ्यातल्या वासरांची भूकही यावेळी कमी असते. दूधही त्यांचं पिऊन झालेलं असतं. इतकी थानं. प्रत्येक म्हशीचं थान एकदा चोखलं की चारही वासरांची पोटं दुधाने टम्म होतात.

दूध घेऊन ट्रक सरळ निघून जातो. ड्राइव्हर आणि तो माणूस हात हलवून बाघारूला निरोप देतात. ट्रकच्या मागे क्लीनर पोरगं बसतं. त्याच्याकडे पहात, मान उंच करून भुंकत-भुंकत भोका ट्रकमागे पळतो. त्या पोराचा लाल रुमाल त्याच्या दातांत धरलेला असतो. जणू त्या पोराला भोखाची हाक ऐकूच येत नाही, अशा प्रकारे उदासीनपणे तो तोंड वळवतो. या सकाळच्या प्रकाशात त्याला तो मध्यरात्री झालेला खून आठवतो की काय?

संपूर्ण दिवसभरात हे एकच काम सर्वात महत्त्वाचं व आवश्यक असतं. संपूर्ण

दिवसात याच एका वेळी बाघारूला इतक्या माणसांचे चेहेरे पहायला मिळतात!

बाघारू ब्रिजच्या रेलिंगजवळ बांधलेल्या उंच जागी बसतो. तो या काळ्या कुळकुळीत बांधलेल्या रस्त्यावर आणि पांढऱ्याशुभ्र पुलावर दिवसातून एकदाच येतो. म्हणूनच त्याला वाटतं, आपण जणू खूप 'दूर' आलोय्. जे आपल्या सवयीचं नसतं, तेच तर 'दूर' वाटतं!

## सत्त्याहत्तर

# कुणीच कुणाचं नाही, सगळे सगळ्यांचे. . .

बाघारू आता गुरं घेऊन डायना फॉरेस्टमध्ये आलाय.

त्या बुढीवर बाघारू पहुडलाय बुढी डुलत डुलत चाललीय. बाघारू वरच्या दिशेला, झाडांची पानं आणि त्यामंधून दिसणारं आकाश पहातो. जनावरांबरोबर बाघारूचा वेळ फॉरेस्टमध्ये अत्यंत आळशीपणाने जातो.

बुढी एखाद्या छोट्या हत्तीच्या आकाराची म्हैस. तिचं वय झालंय. ती आता गाभण रहाणार नाही. दूध येत नाही. पण गोठ्यात अशी एखादी बुढी असल्याशिवाय तो गोठा गोठाच नाही. शिंगं उभी. दोन्ही शिगं उभारून ती समोर उभी राहिली की वाटतं, एखाद्या छोट्या आकाराच्या वाघाला शिंगांवर उचलून ती दूर फेकून देऊ शकेल. तिच्या अंगावरची लव लालसर आहे. दोन डोळ्यांमध्ये एवढं अंतर, की वाटतं, त्यामधून डायना वहात जाऊ शकेल. एकदा हां ऽ करून जीभ काढली, की हातभर जंगल साफ करील. हत्तीचा कळप, वाघ किंवा एखादा गुंड हत्ती समोरून आला, तर फक्त ही बुढीच उभी शिंगं घेऊन त्यांच्यासमोर सरळ उभी राहू शकेल. बाघारू पहातो, ती जेव्हा अशी उभी रहाते, तेव्हा तिच्या गळ्याखाली समोरच्या दोन पायांच्या मध्ये इतकी जागा तयार होते, की सगळा गोठाच तिथं एकत्र होऊन स्वतःला बचाव करू शकेल असं वाटतं.

'हा गोठा तर म्हशी विकत घेऊन-घेऊन देउनियाने एकत्र केलाय. या गोठ्यातली कुणीही म्हैस दुसऱ्या कुण्या म्हशीची कुणी लागत नाही. पण पाहिल्यावर वाटतं, सगळ्या जणू बुढीच्या पोरी आहेत.'

गोठ्यात जशी ही बुढी म्हैस आहे, तसेच दोन रेडेही आहेत. आधी पैदाशीसाठी त्यांचा उपयोग होत असे, आता तेही म्हातारे झाले आहेत. पण त्यांना गोठ्यात ठेवावंच लागतं. कधीकधी त्यांचीही गरज पडते. जर फॉरेस्टमध्ये एखादं मोठं सालाचं झाड पडलं असेल, तर त्याला दोरी बांधून ती या रेड्यांच्या गळ्यात बांधली, तर ओढीत-आढीत ते झाड हे रेडे रस्त्याजवळ आणतात. आणि सालाचं एक झाड विकलं, की गोठ्याचं

दूध विकायची गरज पडणार नाही इतके पैसे येतात!

गोठ्यात चार वासरं आहेत. वासरं असायलाच हवीत. नाहीतर म्हशींची थानं लुचणार कोण? म्हशींना पान्हा कसा फुटणार? दूध कसं येणार? ही वासरं ही बहुधा गयानाथने विकत आणलेली असावीत. पण ही जणू सगळ्याच म्हशींची वासरं आहेत.

पण दुभत्या म्हशी याच खऱ्या गोठ्याची शान असतात. पण सगळ्याच म्हशी एकाच वेळी दुभत्या होऊ न देण्याची, एकाच वेळी गाभण होऊ न देण्याचीही काळजी घ्यावी लागते.

म्हशींना गाभण करण्याच्या कामासाठीच एक रेडाही गोठ्यात आहे. 'या साल्याला काही काम नाही. खातो न झोपतो, खातो न झोपतो,' चालता चालता म्हशींच्या मागचे भाग चाटतो, हुंगतो, त्यांच्यावर 'चढायला' बघतो. 'साल्याला फक्त तीनच कामं आहेत- खाणं, झोपणं आणि-!' म्हणूनच बाघारूलाही त्याच्याकडे लक्ष द्यावं लागतं. कधी कुठल्या म्हशीला गाभण करायचं ते ठरवून त्याप्रमाणे त्या रेड्याला 'लावावं' लागतं. या रेड्याला म्हणतात 'वाली पाडा'. आणि एका गोठ्यात एकच 'वाली पाडा' ठेवावा लागतो.

असा हा गोठा- 'कुणीच कुणाचं नाही. सगळे सगळ्यांचे आणि हे सगळंच गयानाथचं.'

## अठ्ठ्याहत्तर

# बाघारूबाडी

-सगळं गयानाथचं. हे डायनाचं जंगल गयानाथचं. हे आपलचांदचं जंगल गयानाथचं. ही डायना नदी गयानाथची. ही तिस्ता नदी गयानाथची, या जमिनी गयानाथच्या, ही बुढी गयानाथची, दुभत्या म्हशी गयानाथच्या, गाभण म्हशी गयानाथला. हा गुराखी बाघारू गयानाथचा-'

बाघारू आकाशापर्यंत उंच गेलेल्या फॉरेस्टकडे पहात विचार करतो. तो बुढीच्या पाठीवर उताणा पडून आहे- त्याचे दोन्ही पाय बुढीच्या पोटावर ड्यांग ड्यांग करीत खाली झुलताहेत. वर दिसणारी झाडांच्या फांद्यांची पानांची नक्षी क्षणाक्षणाला बदलते आहे, त्यांच्यामधून खूप-खूप उंच आकाश दिसतं आहे. बाघारू झाडांच्या पानांकडे पाहून समजतो, की ते 'पोराली बाडी' (जळालेल्या जंगला)च्या दक्षिणेकडून चालले आहेत. बाघारूने उजवीकडे पाहिलं, तर त्याला जळालेल्या वृक्षांची रांग दिसेल. त्यांच्या पलीकडे डायना की बायना नदीचं सुकलेलं पात्र.

'पुराचं पाणी येऊन इथल्या झाडांना मारून गेलंय बहुधा. पाण्यात क्षार होते. त्यामुळे

सगळं वन मातीला मिळालं. त्यानंतर फॉरेस्टच्या माणसांनी आग लावून ती झाडं जाळून टाकली. इथं नवीन माती टाकल्याशिवाय नवीन जंगल उगवणार नाही. म्हणून जाळून टाकलंय. म्हणूनच याला 'पोराली बाडी' म्हणतात-'

पण बाघारू चाललाय. त्या ठिकाणी तर भरगच्च वन आहे.

'गयानाथने मला इथं पाठवलंय. गोठ्याची व्यवस्था पहायला. मला आधियारी नको. मला गोठा सांभाळायला दिलाय. इथं कुणीला मला शोधू शकणार नाही. मीही कुणाला भेटू शकणार नाही. इथं पाठवलंय. अनोळखी ठिकाणी. मला उदास, दुःखी करण्यासाठी पाठवलंय-'

बुढीच्या पाठीवर उताणं पडून जात असताना बाघारूच्या मनात स्वतःबद्दल असे काही विचार येतात, की त्यांना शब्दात कसं मांडावं हे त्याला समजत नाही. पण तो अशा प्रकारे विचार करतो- 'ही बुढी गयानाथची. हा बाघारू गयानाथचा. जंगल गयानाथचं. बाघारू बुढीच्या पाठीवर उताणा पडलाय. झाडं पहातो. आकाश पहातो. डोलतो. बुढीसारखी इतकी रुंद पाठ आणखी कुणाची आहे? कुणाचीच नाही. कुणाचीच नाही.' बाघारू आकाशाकडे पाहून वनातली झाडं पहातो आणि ओळखतो, इथं हरितकी झाडांचं जंगल सुरू झालंय. सगळ्या वनात फक्त इथंच, सुमारे पंचवीस तीस हरितकीची झाडं आहेत. म्हणजेच बेहेड्याची झाडं. या भागाला बाघारूने 'बेहेडेवाडी' असं नांव दिलंय.

'हः गयानाथने मला इथं पाठवलंय- अनोळखी देशात. इथं मी एक घर बांधलंय. बाघारूबाडी. कुठं चाललात? बेहेडेवाडीला. कोणती बेहेडेवाडी? हे काय, पोरालीबाडीच्या दक्षिणेला आणि या मोठ्या गर्जालीबाडी (घासाचं जंगल)च्या पश्चिमेला- नदीचं नांव डायना, ठिकाणाचं नांव नागराकाटा, गावाचं नांव- बाघारूवाडी.'

बाघारू स्वतःशीच खिक खिक करून हसतो, आणि हसताना डावा गुडघा बुढीच्या पोटावर मारतो. बुढी त्यांचं उत्तर म्हणून बाघारूच्या त्याच पायावर शेपटीचा एक फटका मारते.

'साल्या गयानाथला जाऊन सांगेन, देउनिया, तुमचा गोठा आहे, असं पहा- डायना नदीच्या उजवीकडे जे घासवन आहे, त्याच्या पश्चिम बाजूच्या पाहाडावर चढून, उजवीकडे वळा. त्यानंतर विरळ जंगल दिसेल. त्यानंतर बाघारूवाडीचा पहाड. त्यात बेहेडेवाडी, त्यानंतर-'

बाघारू हसून बुढीवर आपली पाठ जवळजवळ नाचवतोच. गयानाथ जर या फॉरेस्टमध्ये बाघारूला शोधायला आला तर? 'साला, कुठं शोधील माझा देउनिया मला, आणि या गोठ्याला?'

हा विचार आल्यावर बाघारूचं हसू थांबायचं नाव म्हणून घेत नाही. कोल्ह्याच्या आवाजासारखा तो ख्यांक ख्यांक करून हसतच रहातो. बाघारू जे पाहू शकत नाही,

ते बोलण्यात व्यक्त करू शकत नाही. म्हणूनच बाघारूला एवढं अनिवार हसू येतं. कारण, तेव्हा तो आपल्या कल्पनेत गया-देउनियाला पहातोय, 'त्या डायना ब्रिजच्या वरती, इकडं पहातो, जंगल; तिकडं पहातो, नदी; या रस्त्यावर पहातो-दगड; त्या रस्त्यावर पहातो-वाळू. आपला गोठा इथंच कुठंतरी आहे हे गया-जोतदाराला ठाऊक आहे. पण ब्रिजवरून उतरण्याचा रस्ता त्याला सापडत नाही. मग शोध ना, शोध! ब्रिजच्या वरती, रस्त्याच्या वरती तुझा गोठा शोध!'

गोठ्याबरोबर बाघारू फिरतोय, आणि गयानाथ आपला गोठा आणि बाघारू या गुराख्याला जंगलात शोधू शकत नाहीत. या कल्पनेतल्या दृश्यामुळे बाघारूचं हसू थांबत नाहीय.

'शोध ना, शोध; शोधून-शोधून बघ, कुठं गेला तुझा गुराखी आणि गोठा,' बाघारू आता आपण चालता झाडांच्या वंनातून चाललो आहोत असं पहातो. चालता झाडाची फळं तोडण्यासाठी तो बुढीला थांबवून तिच्या पाठीवर उभा रहातो. फळं तोडतो. दोन फळं तोंडात टाकतो. त्यांच्या रसाने त्याचं तोंड भरून जातं. त्याला आठवतं. पिकलेल्या चालता वनात हत्तींच्या कळप येत असतो. तो इकडे-तिकडे नजर फिरवतो.

## एकोणऐंशी

# गोठ्यात गृहयुद्ध

बाघारू आपली मान सरळ करतो, तेवढ्यात त्याला त्या पक्ष्याची साद ऐकू येते - 'अ ऽऽऽ क्, क ऽऽ क !' बाघारूला वाटतं, कुणीतरी नक्कलं करतंय बहुधा. तो स्वतः अशी नक्कल करीत असतो, म्हणून त्याला तसं वाटतं. बाघारू पुन्हा एकदा त्या पक्ष्याच्या सादेची नक्कल करतो- 'क ऽऽऽ क्', क ऽऽ क्'. शेवटचा 'क' ऐकू येत नाही, दरीत विरून जातो.

'हे ऽ ई, हे ऽ इ, हे, हे, हे, ऽइ' म्हणत म्हणत बाघारू बुढीच्या पाठीवर सरळ बसतो आणि पोटावर गुडघ्याने ढोसतो. बुढी वेगाने चालू लागते आणि बाघारू डोलू लागतो. बाघारू पुन्हा एकदा बुढीला गुडघ्याने ढोसतो- लवकर चल, लवकर चल, तो 'वाली पाडा'- हल्या त्या गाभण म्हशीला तिकडच्या जंगलात असं ढोसतोय की म्हैस पडणार, आणि पडली की हा तिला खतमच करणार. 'हे, भोखा, भोखा', बाघारू बुढीची शिंगं धरून उठून उभा रहातो. बाघारूच्या डोक्याला झाडाची पानं लागतात. बाघारू ती एकदा उजव्या, तर एकदा डाव्या हाताने बाजूला सारतोय. भोखा खूप पुढे कुठेतरी होता. बाघारूचा आवाज ऐकून भोखा पळत-पळत इकडे येताना तो हल्या त्या गाभण म्हशीला

जंगलात ढोसताना आणि खाली पाडू पहाताना पहातो. भोख त्या दोघांच्या मध्ये जाऊन जोरजोराने भुंकून हल्याला थांबवू पहातो. तेवढ्यात ती गाभण म्हैस पडता-पडता सावरते आणि थोडी दूर जाते.

तोवर बाघारूला घेऊन बुढीसुद्धा बरीच पुढं येते. जंगलात गुरांचा कळप एकाच रस्त्याने असा कधीच जात नाही. इकडेतिकडे विखरून, चरत-चरत जात असतो. म्हणूनच, तिथपर्यंत पोचायला बाघारूला थोडा वेळ लागतो.

बाघारूचा चित्कार, भोखाचं पळत येणं आणि भुंकणं, शेवटी बाघारूचं वेगाने बुढीवरून गाभण म्हशीकडे जाणं यामुळे सगळ्याच म्हशी तिकडे माना वळवून पहातात. 'आँ ऽऽक्,' 'आँ ऽऽक्' असे आवाज काढतात. बुढीला आपलं कर्तव्य लगेच समजतं.

बुढी बाघारूला पाठीवर घेऊन त्या हल्याच्या आणि गाभण म्हशीच्या मध्ये उभी रहातो. बाघारू शक्य तितक्या मोठ्या आवाजात ओरडत रहातो, 'हे ऽई, हेऽऽई, हेऽ, हेट् हेट् हेऽ'. बाघारू तिथे आल्यामुळे धीर येऊन भोखासुद्धा हल्याच्या गळ्याखालपर्यंत जातो. भुकंत-भुंकत एकाच वेळी इतक्या बाजूंनी आक्रमण झाल्याने, त्या गाभण म्हशीला सोडून देऊन हल्या आपली मान दुसरीकडे वळवतो.

बाघारू बुढीच्या पाठीवरून उतरतो, झाडाची एक फांदी तोडतो, आणि 'साला!' म्हणून हल्याच्या पाठीवर मारतो. फांदी तुटते. बाघारू आणखी एक फांदी तोडून हल्याच्या तोंडावर मारतो. हल्ल्या मान आणखी डावीकडे वळवतो. मागे वळून पळू लागतो. बाघारू 'जा ना, जा, जरा जंगली रेड्यांशी जाऊन झुंज घे ना!' म्हणून उभा रहातो.

बाघारू आता त्या गाभण म्हशीकडे येतो. तिला कुठे लागलंय का, जखम झालीय का हे पहातो. तिचे डोळे पहातो. तिच्या मानेखाली खाजवतो. 'ह्य,ह्य.' म्हशीला कुठेही दुखापत झालेली नाहीय.

मामला संपलाय हे सगळ्या म्हशींच्या लक्षात येतं. दरम्यान काही म्हशी बसल्या आहेत, जणू इथं बराच वेळ थांबता येईल असं त्यांना वाटतंय. काही चुपचाप उभ्याच रहातात. काही माती हुंगताहेत, गवत खाताहेत. गोठा परत गोठ्यासारखा झाला आहे. बाघारू जरा पुढे जाऊन पहाण्यासाठी चालत जातो.

## ऐंशी

# गोठ्याकडून समाजसेवा

दुरून येणाऱ्या आवाजावरून बाघारूला समजतं, कुठं तरी झाड कापणं चाललंय्. फॉरेस्टमध्ये आवाज ऐकून त्याची दिशा ठरवणं अवघड असतं. पण, लाकूड कापायचं

असेल तर ते डावीकडच्या जंगलातच करता येईल, हे बाघारूला ठाऊक आहे. तिकडे जंगलात असतो, तसा दगड टाकून तयार केलेला रस्ता आहे. त्यावर पाचोळा साचून तो रस्ता नरम झालाय्. त्यावरून ट्रकगाडी आतपर्यंत येऊ शकते. बाघारू त्याच दिशेने पुढे जातो-काय चाललंय् ते पहाण्यासाठी.

बरंच अंतर गेल्यावर बाघारूला दिसतं की, अनेक लोक मिळून झाडं तोडताहेत. कापलेल्या झाडांची पानं दूर करताहेत. 'हांई-हांई' आवाज, कुऱ्हाडीचा आवाज इथपासून ऐकू येतोय्. बाघारू थांबून, उभ्या-उभ्या पहातो.

तिथं फक्त पानं काढण्याचं काम चाललेलं नाहीय्. संपूर्ण झाड दोरी बांधून नेलं जातं, ते झाडं ओढलं जाताना तो पहातो. तिकडे बहुधा एखादा ट्रक असावा.

पण इतके सगळे लोक बाघारूला पहातात. आधी एकेकजण आपल्या परीने पहातो, आता वारंवार त्याच्याकडे वळून पहातात. बघण्यासारखाच तर मामला आहे. अशा वनात बाघारूसारखा एकटा माणूस! बाघारूची कुणीच म्हैस त्याच्या जवळपास नाहीत्. असती, तर बाघारू कोण आहे हे त्यांना तितक्या दूर अंतरावरून समजलं असतं.

शेवटी, ते इतका वेळ बाघारूला पहात रहातात की, बाघारू तिथे अधिक वेळ उभा रहात नाही. पण परत येण्यासाठी तो वळताच तिकडून हाका मारणं सुरू होतं - 'हेऽई, एऽऽ, अहोऽऽ, ऐका!' त्यांच्या हाकांमध्ये अशी काही गडबड दिसत होती, की थांबणं योग्य नाही असं बाघारूला वाटलं. बाघारूने लगबगीने परतायला सुरुवात केल्याबरोबर, आपल्या मागून कुणीतरी वेगाने पळत येतंय्, असं त्याला जाणवतं. बाघारू पळण्याआधी मान वळवून पहातो आणि, गणवेषावरून ओळखतो, तो माणूस फॉरेस्ट गार्ड आहे. बाघारू थांबतो.

फॉरेस्ट गार्डही बाघारूला थांबलेला पाहून पळणं थांबवून चालायला सुरुवात करतो. बाघारू पूर्णपणे नजरेच्या टप्प्यात आल्यावर गार्ड थांबतो आणि हाताने बाघारूला आपल्याकडे बोलावतो.

लाकूड कापणं चाललेल्या ठिकाणाचे लोक त्यांच्याकडे पहाताहेत. बाघारू गार्डच्या दिशेने पुढे जातो. डायनाच्या या जंगलात आल्यानंतर बाघारूला कधीच इतक्या साऱ्या माणसांसमोर असं विदेशी माणसासारखं उभं रहावं लागलेलं नाहीय्. त्याच्या बरोबर त्याचा गोठा असतोच. सगळे त्याला 'गुरूखी' म्हणून ओळखतात. हे लोक आपल्याला ओळखू शकत नाहीत हे पाहून बाघारूला आश्चर्य वाटतं.

बाघारू गार्डसमोर जाऊन उभा राहिल्यावर गार्ड त्याला विचारतो, 'तुम्ही इथं कुठं आलात?'

'माझा गोठा आहे, इथं.'

'गोठा, कुणाचा गोठा?'

'गयानाथ जोतदाराचा.'

'असं. कुठं आला तुमचा गोठा?'

'त्या वळणाजवळ', बाघारू हाताने निर्देश करतो.

'इथं काय करता तुम्ही?'

'काही नाही.'

'गोठा इथं, तुम्हीही इथं. काहीही नाही?'

'नाही, इकडून लाकूड कापण्याचा आवाज आला, म्हणून-'

'म्हणून काय?'

'पहायला आलो. कोण कापतंय्, काय कापतंय्-'

'रात्री कुठं रहाता? इथंच?'

'डायना नदीच्या चरावर.'

'अच्छा. ठीक आहे'. गार्ड जणू आश्वस्त होतो. 'आज ताबडतोब निघून जा इथून'

'निघून जाऊ? आत्ता?'

फॉरेस्ट गार्ड आकाशाकडे पहातो. 'ताबडतोब जा. ग्रहण लागणार आहे'

'गिराण? आज? आत्ता?'

'हो. आता दुपारनंतर.'

'दुपार तर होऊन गेली ना?'

फॉरेस्ट गार्ड पुन्हा आकाशाकडे पहातो. म्हणतो, 'नाही. अजून थोडा वेळ आहे.'

'नाही. मी आत्ताच जातो. मला उतरायला टाईम लागतो. गिराण लागणार? आ०?'

बाघारूशी गार्डचं बोलणं चाललेलं असताना लाकूड कापणाऱ्यांपैकी एकजण पुढे येतो. त्याच्या कपड्यांवरून लक्षात येतं की, तो कॉंट्रॅक्टर आहे. तो बोलणं ऐकून गार्डला म्हणतो, 'याच्याकडे तर रेडे-म्हशी आहेत.'

'हो. म्हशींचा गोठा आहे.'

'आमची झाडं जरा हलवून द्या ना. लागेल तो पैसा देऊ. काम लवकर होऊन जाईल.' हे ऐकून गार्ड बाघारूला विचारतो. 'काय, करणार?'

'काय?'

'तुझे दोन-तीन रेडे घेऊन ये. ही झाडं जरा ओढून ते सांगतात तिथं नेऊन टाक. पैसे मिळतील. पैसे!'

'आपण म्हणालात गिराण लागणार. मला तर गोठा घेऊन जावं लागणार. डायनाच्या चरावर, खाली.'

'साल्याला घाई झालीय. गिराणाच्या आधी बनातून बाहेर पडायचंय् म्हणे. कापलेली झाडं काय आम्ही इथंच टाकून जाऊ? लाकूड - चोरांनी चोरून नेली म्हणजे? तू लाकूड

चोर तर नाहीस?'

'नाही. मी लाकूडचोर नाही. तर घेऊन येऊ? रेडे?'

गार्ड कॉंट्रॅक्टरला विचारतो, 'काय सांगायचं?' कॉंट्रॅक्टर बाघारूला विचारतो, 'किती दूर आहेत तुझे रेडे?'

'ते काय, त्या वळणावरती.'

'झटकन आणता येतील?'

'हे आत्ता जातो. किती रेडे लागताहेत तुम्हाला?'

'अरे दोन-चार आणलेस तरी पुरे. आमची काही ज्यादा झाडं शिल्लक नाहीत. रेड्यांकडून ओढवून घेऊन त्या बाजूच्या नालीत टाकून दे, त्यानंतर आम्ही तुला पैसे-बिसे देऊन निघून जाऊ. उद्या सकाळीच पुन्हा येऊ. आजची रात्र जरा लक्ष ठेवावं लागेल.'

'असं, इथून ओढून तिथं टाकायचीत काय? ट्रकमध्ये चढवायची नाहीत? मी येतो इथं, थांबा!' बाघारू जाण्यासाठी निघाल्याबरोबर गार्ड म्हणतो, 'तू थांब ना इथं आजची रात्र! लाकडांवर पहारा दे. गोठा घेऊन इथंच थांब. पैसे मिळतील.'

बाघारूला थोडा विचार करावा लागतो. 'नाही बाबू, हे काही मला जमणार नाही.'

'का? पैसा मिळेल ना!'

'नाही बाबू. गिराण लागणार. जंगलात माझ्या गोठ्याचं काय होईल, काय नाही. . .?'

'अरे काय होणार? थांब ना!'

बाघारूला जणू जवळजवळ राजीच व्हावं लागतं. तेवढ्यात त्याला आठवतं की, सकाळी दुधाची गाडी येणार आहे.

'नाही बाबू. मी थांबू शकणार नाही. सकाळी दुधाची गाडी येईल. दूध काढून द्यावं लागेल. मी माझे रेडे आणतो. तुमची झाडं ओढवून देतो. आणतो.' बाघारू वळून गोठ्याच्या दिशेने पळू लागतो.

थोड्याच वेळात त्या लोकांना बाघारू एका रेड्यावर बसून त्या रेड्याशिवाय आणखी दोन रेडे आणि एक म्हैस घेऊन येताना दिसतो. बाघारू सरळ लाकूड कापणाऱ्यांच्या दलामध्ये येऊन उभा रहातो.

'बाबू, दोरी द्या, दोरी.' बाघारू रेड्याच्या पाठीवरून उतरतो. बाकी सारेजण आपलं काम थांबवून बाघारूचं काम पाहू लागतात.

बाघारूने त्या 'हल्या'ला आणलंय्, दोन म्हताऱ्या रेड्यांना आणि एका तगड्या म्हशीला आणलंय्. बाघारू दोरीचं एक टोक आडव्या पडलेल्या झाडाच्या वरच्या टोकाला चांगलं घट्ट बांधतो, आणि दुसरं टोक दोन म्हशींच्या छातीवर. पायांच्या वरच्या बाजूला. फार दूर ओढायचे नाहीत ओंडके. थोड्याच अंतरावरच्या लांब नालीमध्ये फेकायचे आहेत.

दोन म्हशींच्यामध्ये झाडाला जमिनीपासून जरा वर उचलून बांधायचंय्.

बाघारू त्या 'हल्या' शी एका 'बुढ्या'ची, आणि म्हशीबरोबर दुसऱ्या बुढ्याची जोडी करतो. दोन्ही जोड्यांच्या गळ्यात झाडं बांधून देऊन तो 'टर्र्र्र' करीत मागं उभा रहातो. चढउतार, कापलेल्या झाडांची खोडं, खड्डे या सगळ्यांवरून जावं लागतं. बाघारू यांच्या मागे राहून एकेकाच्या मार्गातले अडसर दूर करीत रहातो.

असं गेलं तरीही, दोरीचा फास लावून जे झाड न्यायला आठ-दहा माणसांना अर्धा ते पाऊण तास लागला असता, अशी दोन झाडं बाघारू आपल्या म्हशीरेड्यांच्या जोड्यांच्या सहाय्याने अर्ध्या वेळात, तीही एकाच वेळी दोन्ही, योग्य ठिकाणी नेतो. त्यामुळे दोन खेपांत चार झाडं ओढीत नेल्यावर, संपूर्ण घटना जणू बाघारूच्या नेतृत्वाखाली घडली, असंच दिसतं. इतका काळ बाघारू आणि त्याच्या रेड्याशिवाय हे काम चाललंच कसं होतं?

## एक्याऐंशी

# गोठा परत फिरतो

बाघारू आता आपल्या संपूर्ण गोठा घेऊन, फॉरेस्टची चढाई सोडून नदीकडे लगबगीने उतरत येतो आहे. सगळ्या म्हशींच्या शेवटी, बाघारू बुढीच्या पाठीवर आहे. गुडघे वाकवून बसून तो एकदा डावीकडे, एकदा उजवीकडे, एकदा समोर पहातोय आणि जिभेने आवाज करतोय् -'टर्ऽऽऽ, टर्ऽऽऽ, टर्ऽऽऽ' आणि त्या आवाजाशी संगती राखून सगळ्या म्हशी आणि रेडे जणू एखाद्या सैन्याच्या तुकडीप्रमाणे उतारावरून उतरताहेत. सगळ्यांना लगबगीने न्यायला हवं हे बुढीच्या लक्षात येतं. ती मधूनमधून मान वर करून आवाज करते - 'आँऽऽऽक्, आँऽऽऽक्!' भोका कुत्रा बुढीशेजारून पळत-पळत, डुलत-डुलत असा चाललाय्, आणि बाघारू बुढीच्या पाठीवरून सगळ्या गोठ्याला आदेश देतोय्, 'टर्ऽऽऽ, टर्ऽऽऽ!'

'लगबगीने चला, लगबगीने, गिराण लागणार आहे, गिराण. अंधार होणार, पक्षी सांज व्हायच्या आधी घरट्यात परतणार, वाघ, हत्ती, गेंडा रात्रीच्या आधीच बाहेर पडतील, जंगलात फिरू लागतील, टर्ऽऽऽ, टर्ऽऽऽ!'

बुढी पुढं चालू शकत नाही. समोरच्या म्हशी थांबल्या आहेत. काय प्रकार आहे हे बुढी मान वर करून पहाते. तिची शिंगं धरून बाघारू उभा रहातो. त्यामुळे भोखा भू-भू करून भुंकू लागतो, पण लगेच हळू-हळू चालणं सुरू होतं. गती कमी होते. बाघारू बुढीच्या पाठीवरून खाली उडी मारतो आणि गोठ्याच्या पुढच्या बाजूला धावतो. भोखा

त्याच्यामागे पळतो. सगळ्या म्हशी एकत्र आल्याने रस्ता बंद झाल्यासारखा झालाय. बाघारू बाजूने पुढे जातो.

पुढे जाऊन बाघारू पहातो-जिथून गोठा उजवीकडे वळून फॉरेस्ट आणि नदी यांच्यामधल्या जंगलात शिरणार होता, तिथं एक मोठ्ठा खड्डा पडलाय्. पण त्यामुळे म्हशी थांबत नाहीत. जवळच्या अरुंद वाटेवरून जागरूकपणे पावलं टाकीत, डावीकडच्या दगडमातीच्या भिंतीला अंग घाशीत त्या पुढे जाताहेत. त्यामुळे वेग जरा कमी झालाय्. अनेक म्हशी पुढे गेल्या आहेत. बाकी किती राहिल्याहेत हे बाघारू एकदा मागे वळून पाहून येतो. पुढे गेलेल्या आणि मागे राहिलेल्यांची चुकामूक होऊ नये असं त्याला वाटतं, कारण ग्रहणाचा अंधार सुरू झाला, तर म्हशी इकडं-तिकडं विखरून जातील. 'गिराणाची भीती-मोठी भीती'. बाघारू भोखाला समोरचा रस्ता दाखवून 'यू-यू' म्हणतो. भोखा उडी मारून तो खड्डा पार करतो आणि पलीकडे जातो. 'भोखाला पाहून म्हशींना वाटेल, बाघारू आहे.' बाघारू खड्ड्याच्या दोन्ही बाजूंना पाय ठेऊन उभा रहातो आणि पार होणाऱ्या एकेक म्हशींला हाताने थोडं ढकलतो. त्यामुळेच म्हशींची भीती निघून जाते. म्हशी वेगाने पुढे जाऊ लागतात. मागून बुढीचा आवाज येतो, 'आँऽऽक्!' बाघारू मान वळवून प्रतिसाद देतो 'एई रो, अऽऽ!'

सगळ्या म्हशी-रेडे पुढे जातात. फक्त बुढी आणि बाघारूच आता खड्ड्याच्या अलीकडे. बाघारू एक फांदी तोडून ती पुलासारखी खड्ड्याच्या टाकतो, व त्यावरून वेगाने बुढीला पार करवतो. यात थोडा वेळ जातो. बुढी वेगाने पुढे चालू लागते.

गोठा काही फार पुढे गेलेला नसावा. बाघारू एकदा तारस्वरात चीत्कातारतो, 'हेऽऽ भोखा!' प्रतिसाद म्हणून जवळूनच, फार तर दोन वळणांपलिकडून, भोखाचं भुंकणं ऐकू येतं. आता ते खाली उतरले आहेत. झाड-झडोऱ्यातून नदीसुद्धा दिसू लागलीय्. बाघारू आकाशात सूर्याकडे पहातो. पश्चिम बाजूला डोंगरावर सूर्य आहे, पण गोल नाही. चंद्राप्रमाणे त्याची कोर दिसतेय. 'गिराण लागलं, गिराण लागलं, टर्र्र्र्ऽ, टर्र्र्र्ऽ' बुढी आपला वेग शक्य तेवढा वाढवते.

सूर्याकडे पाहिल्याने बाघारूच्या डोळ्यांसमोर अंधारी पसरते. तो डोळे बंद करतो.

डोळे बंद असतानाच बाघारूच्या एका म्हशीची 'आँऽऽऽ' अशी हाक ऐकू येते. तो डोळे उघडतो. अस्पष्टसं दिसू लागलंय्. 'एक म्हैस हाक मारतेय, आणि भोखा? त्याचा आवाज येत नाहीय्. त्यानेही ग्रहण पाहिलं की काय? शक्य नाही, पुन्हा तीच 'आँऽऽऽ' अशी हाक. समोर बाघारूला दिसतं, भोखा उभा आहे, मान वर करून शेपूट हलवतोय. त्याला भीती वाटलेली दिसत नाहीय्. 'पण, काहीतरी घडतंय्. भोखा असा गप्प का झाला? काय होतंय्.? काय?' अचानक बाघारूचा संशय जागा होतो, 'गाभण म्हैस व्यायला लागलीय् की काय? तीही आत्ताच?'

## ब्याऐंशी

# गोठ्यात जन्म

बाघारू वळण पार करतो. त्याला वाटलं होतं, तेच दिसतं. अगदी व्यायला आलेली गाभण म्हैस दोन पाय फाकवून उभी आहे आणि तिला मध्ये घेऊन बाकीच्या म्हशी तिच्या दोन्ही बाजूंना रांग करून उभ्या आहेत. काही म्हशी बहुधा पुढे उतरून गेल्या आहेत. इथून नदीचं पात्र, पूल, बाघारूचा तो दगड स्पष्टपणे दिसताहेत. आणखी दोन वळणं पार केल्याबरोबर ते नदीत उतरले असते.

सूर्याला ग्रहण लागलंय्. थोड्याच वेळात प्रकाश कमी व्हायला सुरुवात होईल. पण अजून कोल्हे-कोंबडे ओरडू लागलेले नाहीत. कसंतरी करून या गाभण म्हशीला आणखी आणखी दोन वळणं नेता येणार नाही का? किमान नदीपर्यंत?

बाघारू पळत त्या म्हशीकडे जातो. ती मान वळवून मघासारखीच 'आँ ऽऽऽ' करीत असते. बाघारू तिच्या अंगावरुन, गळ्यावरून, तोंडावरून हात फिरवून मागे तिच्या येऊन पहातो- 'आऽऽऽ, वासराचं तोंड दिसतंय, चांदी दिसतेय.' बाघारू आसपासच्या फांद्या-पानं तोडून खाली पसरतो. म्हैस पुन्हा जोरात 'आँऽऽऽ' करते. बाघारू आपल्या दोन्ही हातांनी म्हशीचे मागचे पाय आणखी फाकवतो, आणि तिचा मागचा भाग दोन्ही हात दोन्ही बाजूंना ठेवून धरतो. वासराचं संपूर्ण डोकं दिसतं. छोटं, गोल. मागची फाक आणखी मोठी होऊन वासराचं तोंड आणखी बाहेर येतं. आता बाघारूने सोडून दिलं, तर ते परत जाईल. आपल्याला दोन्ही हातांनी धरता येईल, इतपत वासराचं तोंड बाहेर यावं, म्हणून बाघारू आपली समस्त शक्ती वापरून वासराच्या बाहेर येण्याचा मार्ग आणखी थोडा फाकवू पहातो. डोकं एकदा धरलं, की वासरू ओढून बाघारू बाहेर आणू शकेल.

म्हशीच्या मागच्या दोन्ही पायांवरून रक्त, पाणी, श्लेष्मा वहातोय. बाघारूच्या दोन्ही हातांच्या मनगटांवरून तो तरल पदार्थ कोपरापर्यंत जाऊन टप् टप् मातीवर पडतोय.

एवढ्या गडबडीने बाघारू विचार करतो, 'सगळ्या गोठ्याला खाली पाठवून द्यावं का? इथून लक्ष राहीलच. भोखालाही जाऊ द्यावं त्यांच्याबरोबर. काही काही म्हशी तर गेल्यासुद्धा,'. दोन्ही हातांनी म्हशीचा मागचा भाग फाकवून धरून बाघारू दोन्ही बाजूंना पहातो- अगदी भोखाही गुपचुप शेपूट हलवतोय, बुढीसुद्धा स्थिर उभी आहे. 'सारा गोठा उत्सुक होऊन उभा आहे,' घासही खात नाही, हुंकारही देत नाहीय. 'वासरू होणार आहे. आता गोठा खरा गोठा होणार! आता गोठ्यात वासराचा जन्म होणार. गोठा वाढणार. गोठा चालू रहाणार. वासरू. गोठ्यात वासरू-'

हळू हळू वासराचं डोकं बाहेर येतं. म्हैस 'गों गों' असा आवाज करते. बाघारू उजव्या

हाताने ओढ देतो. सडात् करुन वासराची मान बाहेर येते आणि त्याचं डोकं आणखी झुलतं. सट् सट् करीत वासराची मान - छाती - पाय बाहेर येतात, आणि म्हशीच्या घोट्यापर्यंत लोंबू लागतात. बाघारू उजवा हात पुन्हा आत घालतो. तेव्हा वासराच्या शरीराला खाली उतरायची ओढ मिळालेली आहे. त्याचं सारं शरीर खाली उतरतं. डाव्या हाताने ते जरा धरून बाघारू उजव्या वासराचे मागचे दोन पाय एकाच वेळी मुठीत धरू शकतो. कमरेचं हाड अडकतं, पण तेवढ्यात मागच्या दोन पायांची खुरं बाहेर आली आहेत. एक झटका दिल्याबरोबर वासराचा संपूर्ण मागचा भाग बाहेर येऊन थैलीत झुलत - झुलत खाली घासावर. बाघारू हातांनी वासराला झोपवतो. म्हशीच्या पोटातूनती पिशवी, पाणी, रक्त बाहेर येत रहातं.

## त्र्याऐंशी

# गोठ्यात आणखी एकजण

व्यालैली म्हैस थरथर कापतेय आणि मागे पाहू बघतेय. बाघारू पश्चिम पहाडाकडे पहातो. प्रकाश कमी होऊ लागलाय. गोठ्यालाही असंच काही जाणवलंय की काय देव जाणे. अचानक सगळ्या म्हशी एकाच वेळी 'आँ ऽऽऽ' करतात. जमिनीवर पाय आपटतात. भोखा आकाशाकडे मान वळवून लांबलचक तानेमध्ये ओरडू लागतो. बुढी आपले कान फडफडवू लागते. 'गिराण लागलं रे, माझ्या गोठ्यावर गिराण लागलं.'

बाघारू उशीर करीत नाही. तो आपल्या दोन्ही हातांनी म्हशीच्या पोटामधून त्या रक्त - जलमय पिशवीचा बाकीचा भाग ओढून बाहेर काढतो. त्यानंतर नाळ तोडून वासराला अलग करतो. तोवर वासरू आपले चार पाय खुले करतं आणि मान एकदा वर उचलतं, खाली घेतं. बाघारू 'टर्र', टर्र' करतो. समोरच्या म्हशी चालायला सुरुवात करतात. त्यांची शिंगं उभी आहेत, शेपट्या ताठ आहेत. 'घाबरताहेत काय? भीती? गिराणाची भीती रे, गिराणाची भीती!' बाघारू पुन्हा 'टर्रर्र,' 'टर्रर्र' करतो.

हे सगळं करता-करता बाघारू बुढीच्या गळ्याला एकदा स्पर्श करतो. त्यावरूनच, अजून काहीतरी करायचं आहे हे बुढीला समजतं. व्यालेली म्हैस, वासरु न दिसल्यामुळे 'आँ आँ आँ,' करीत रडते. 'थांब. नंतर रड!' बाघारू दोन्ही हातात झाडपाला तोडून आणतो आणि वासराच्या अंगावरची घाण पुसतो, एकदा घास फिरवून जितकी पुसता येईल, तितकीच. तो दोन्ही हातांनी वासराला उचलून घेतो. वासरू गर्भात होतं, त्याच भंगिमेत बाघारूच्या कुशीत बसतं. जणू बाघारूची छाती हा त्या वासराचा दुसरा गर्भ आहे. बाघारू कुशीत, छातीजवळ वासराला वर उचलून घेतो. बुढीला 'टर्र' करतो. ती

चालायला सुरुवात करतो. तोवर बुढी बाळंतिणीच्या पुढे गेलीय. बाळंतीण म्हैस बुढीच्या मागे-मागे पळता-पळता जीभ बाहेर काढून बाघारूच्या कडेवर असलेल्या वासराचा जितका भाग चाटता येईल, तितका चाटतेय. त्यात बाघारूचा हातही चाटला जातोय.

बाघारू गोठ्याच्या जागी पोचतो. जवळ बुढी. बाघारूच्या कडेवर वासरु. त्याच्या अंगाला अद्याप घास, पानं, देठ लागलेले आहेत. जणू ती सारी जन्मचिन्हं आहेत. बुढीमागे बाळंतीण. ती अद्याप बाघारूच्या कडेवरच्या आपल्या वासराला चाटतेय. तिच्या मागच्या पायांना अद्याप रक्त लागलेलं आहे. वासरामुळे बाघारूच्या हनुवटी, गळा, छाती, पोट यांच्यापासून अगदी दोन्ही हातांपर्यंत रक्त लागलंय. बाघारू आणि म्हशी नदीतल्या दगडावर पोचतात.

## चौऱ्याऐंशी

# पक्षी पर्व : आणखी एका वृत्तांताची सुरुवात

सूर्यप्रकाश हळू हळू कमी होतो. जंगल, पहाड, दगड यांच्या सावल्या बदलत रहातात. अधिकाअधिक दूरवर पसरत जातात. डायनाच्या पात्रातल्या दगडगोट्यांवर प्रचंड दगडाची काळी सावली पसरते.

गोठा आता आपल्या नेहमीच्या जागी आहे, पण कुणीच म्हैस बसलेली नाही. अंगाला अंग लावून, माना लांबवून सगळ्या म्हशी उभ्याच आहेत- जणू इथून त्यांना अजून कुठेतरी जायचंय, जणू त्या अद्याप आपल्या नेहमीच्या ठिकाणी आलेल्या नाहीत.

वासरू त्यांच्यामध्ये उठून उभं रहायचा प्रयत्न करतंय आणि वारंवार पडतंय.

प्रकाश आणखी कमी होतो- जणू अंधकार होत आलाय. सूर्यप्रकाशाच्या अभावामुळे बाघारूला थंडी वाजू लागते. तो सूर्याकडे पहातो- जवळजवळ संपूर्ण सूर्य झाकला गेलाय. अगदी दोऱ्याएवढा परिघाचा भाग दिसतोय. 'गिराण, गिराण.'

सूर्यग्रहण लागल्याने म्हशी माना वर करून 'आँ ऽऽऽ' आवाज करणं सुरू करतात. भोखा डोकं आणि शेपूट खाली वाळवून रडू लागतो.

फक्ती ती नवी बाळंतीण म्हैस आपल्या वासराचं अंग चाटीत रहाते. वासरू मान सरळ करून उठून उभं रहातं. त्यानंतर पाय-मान खाली करून पुन्हा पडतं. पुन्हा सरळ व्हायला सुरुवात करतं. जणू मान सरळ करून थोडं पळाल्याशिवाय त्याचा जन्म पूर्ण झाला, असं त्याला वाटत नसावं.

वनातल्या झाडांवरून पक्षी उडतात. गवतावर काजव्यांची एक ओळ गोल-गोल गिरक्या घेऊ लागते. जंगलातून हरणांचा एक कळप पळत जातो. ग्रहणामुळे अंधार

पडल्याने वटवाघळं बाहेर येतात, उडत इकडून तिकडे जातात. कोल्हे आणि कोंबडे ओरडू लागतात. त्यामुळे भोखा पुन्हा खाली तोंड वळवून रडू लागतो. आवाज जणू माती भेदून खाली जाईल, असं वाटतं. 'गिराण, गिराण; गिराण पुरं झालं, पुरं झालं'- बाघारूच्याच दगडाखाली, गोठ्याच्या मध्ये बाघारू सूर्यग्रहण कधी सुटणार याची वाट पहात उभा आहे.

पहिल्या वेळी बाघारूच्या लक्षात येत नाही. दुसऱ्या वेळाही आवाज तितकासा स्पष्ट येत नाही. पण तिसऱ्या वेळी मात्र एकदम स्पष्ट, जणू बाघारूला ऐकू यावा म्हणूनच तो आवाज तीक्ष्णही असतो. संपूर्ण शरीराने तो पक्षी शीळ घालतो, 'कऽऽक्' 'कऽऽक्!' शीळ देताना शेवटी पक्ष्याला थकवा आलेला जाणवतो. शेवट ऐकूच येत नाही. 'पक्षी जंगलाच्या खूप आत आहे. गिराणाचा अंधार पाहून इतके-तिकडे गिरक्या घेत असावा. त्याचं अंग थरथरत असावं—' बाघारू जणू न पाहिलेल्या त्या पक्ष्याच्या शरीराचं थरथरणं पाहू शकतो. पक्षी पुन्हा गाढ आणि थरथरत्या आवाजात साद घालतो, 'कऽऽक!'

बाघारूचा श्वास अद्याप सामान्य झालेला नाही, घाम अद्याप थांबलेला नाही. हातापायांना लागलेलं रक्त-श्लेष्मा त्याने अद्याप धुतलेला नाही. रक्ताने माखलेले आपले हात तोंडाजवळ आणून बाघारू खूप दबलेल्या स्वरात, आवाज न चढवता पक्ष्याच्या हाकेला प्रतिसाद देतो. एकदा.

पक्षी पुन्हा प्रतिसाद देत नाही. 'चुप झालाय. चुप रहाणार.' बाघारू पुन्हा एकदा साद घालतो, दबल्या आवाजात. त्याच्या थकल्या श्वासाच्या आवाजाने खड्ड्यातला स्वर कापतो. बाघारू गळ्यातून नव्हे, संपूर्ण शरीरानेच साद घालतो, शरीराच्या स्वेदाने, श्वासाने. पक्षी पुन्हा गप्प बसणार.

बाघारू आधी ऐकू शकत नाही. पण दुसऱ्यावेळी ऐकतो. चारीकडून येणाऱ्या आवाजांमधून त्या पक्ष्याची आणखी नरम आवाजातली साद येते- 'कऽऽऽक्,' 'कऽऽक्.' यावेळी त्याला जणू पूर्ण साद घालता येत नाही. साद दिल्याबरोबर आवाज खोल खड्ड्यात विरून जातो.

बाघारू दोन्ही हात तोंडाजवळ आणून, दबलेल्या आवाजात, बुडबुडे काढल्याप्रमाणे वाटणारी ती साद घालतो. पुन्हा एकदा. आणखी एकदा.

दोन्ही हात तोंडाजवळ आणून साद घालता-घालता बाघारू डायनाच्या दिशेने थोडा पुढे जातो. ग्रहणाच्या अंधारात डायनाचा फेस दगडांमधून उसळतोय. बाघारू पाण्यात पाय टाकून साद घालीत थोडा पुढे जातो.

नदी ज्या वळणावर फॉरेस्टच्या अंधारात मिसळून गेलीय. तिथे बाघारू उभा रहातो. डायनाच्या पाण्याच्या आवाजात मिसळून, डायनावरून त्या पक्षाची साद येत रहाते. बाघारू आपले सुकलेलं रक्त लागलेले दोन्ही हात ओठांजवळ आणून दरीत ती साद

घालतो. त्याला शेवटी दम लागतो. बाघारूसुद्धा, जणू त्या पक्ष्याप्रमाणे, पूर्ण साद घालू शकत नाही. पक्षी आणि बाघारू यांच्या साद-प्रतिसादांनी ग्रहणाचा अंधकार भरून जातो. आता लवकरच ग्रहण संपून पुन्हा सूर्योदय होणार.

## पंच्याऐंशी

# वनपर्वाचा शेवटचा अध्याय

सकाळी बाघारू आपला गोठा घेऊन पश्चिमेकडच्या चढावरून पहाडावर आला होता. आता संध्याकाळी पूर्वेच्या उतारावरून उतरून आला. सूर्याला ग्रहण लागल्याने संध्याकाळ जणू दोन वेळा झाली आहे. नदीच्या पात्रातून गोठा घेऊन बाहेर येऊन बाघारू पुन्हा नदीच्या पात्राकडेच परत येतो- दरम्यान त्याच्या गोठ्यात आणखी एका जिवाची भर पडलीय.

कुठेतरी एका बिंदूवर सुरू होऊन कुठल्यातरी एका बिंदूवर संपणारी अशी एकही घटना बाघारूला ठाऊक नाही. निसर्गातही काहीच याप्रमाणे घडत नाही.

बाघारूने पाहिलेल्या साऱ्या घटना त्याच्या आधीही घडत आल्या होत्या, आणि त्याच्यानंतरही घडत रहातील. मानवीय साऱ्या घटना अशाच व्यक्तिनिरपेक्ष असतात.

बाघारूचे सगळेच दिवस हुबेहूब एकसारखे असतात. दिवसांमागून दिवस जाऊन जीवन तयार व्हावं, अशा पद्धतीने काही बाघारू दिवस काढीत नाही. तो तर एक संपूर्ण जीवनच काढतोय. संपूर्ण असं एक जीवन. एक दिवस हा त्या जीवनाचा अगदी तुच्छ असा एक भाग असतो.

बाघारूचा प्रत्येक दिवसच एकेक संपूर्ण असं जीवन असतं. प्रत्येक हावभाव हा वीरत्त्वाचा हावभाव असतो- मग ते नदी पार करणं असो वा दगडावर झोपून रहाणं असो, भोखाशी खेळणं असो वा बुढीच्या पाठीवर उभं रहाणं असो. ते म्हशीचं बाळंतण करणं असो वा पक्ष्याला साद घालणं असो.

भाषा म्हणजेच तर अर्थ. बाघारूच्या दृष्टीने तर कुठलाच अर्थ नाही. बाघारू म्हणजे केवळ जगणं आणि जगणं. बाघारू म्हणजे केवळ जीवन आणि जीवन.

भाषा म्हणजे काही-ना-काही अलंकार. माथ्याच्या केसांपासून तर पायांच्या नखांपर्यंत बाघारूच्या संपूर्ण शरीरावर, मधली एक लंगोटी सोडता, सामान्यतम अशीही वस्त्रं नाहीत. बाघारूसारखी अशी नग्न भाषा इतर कुठं मिळणार?

❑❑❑

## शहाऐंशी

# ब्रिजवर प्रकाश का?

नरेश आपला लाल टॉर्च लावून घड्याळ पहातो. टॉर्चचा प्रकाश भिजलेल्या मातीवर पडतो. त्या प्रकाशाच्या वृत्तात गुडघ्यापर्यंत उघडे पाय दिसतात- चिखल- पाण्याने भरलेले.

नरेश टॉर्च विझवतो. त्या धुकं पडलेलं असतानाच्या अर्धवट, अंधुक उजेडात नरेश आपला विझलेला टॉर्च ब्रिजच्या दिशेने रोखतो- जणू तो टॉर्च नाही, रिव्हॉल्व्हर आहे. तो टॉर्च उलट्या धरलेल्या रिव्हॉल्व्हरसारखा दिसतो- नळी नरेशच्या छातीच्याा दिशेने, आणि टॉर्चचं हँडल आणि घोडा म्हणजे काचेने झाकलेला बल्ब.

नरेश म्हणतो, 'रात्रीचे दहा वाजलेयत, अजून तिस्ता ब्रिजवरचा प्रकाश बंद कसा झाला नाही?

सगळेच तेव्हा तिस्ता ब्रिजच्या दिशेने वळून उभे रहातात. त्यांना दिसतं, तिस्ता ब्रिजवरचा प्रकाश विझलेला नाहीय. आता या क्षणी, नदीपासून आकाशापर्यंत पसरलेल्या धुक्यासारख्या अंधुक प्रकाश फक्त काही माणसं दिसताहेत- ती जणू या धुक्यांत रस्ता चुकली आहेत, किंवा ती सारी एका वाट चुकलेल्या नौकेवर उभी आहेत आणि तीर शोधताहेत. या चरावरची ही माणसं तिस्ताब्रिजवरच्या प्रकाशाकडे पहात उभी आहेत- हा चर तरंगत-तरंगत तिस्ता ब्रिजजवळ जाऊन, धक्क्याने फुटून जाणार अशीच भीती या लोकांच्या मनात आहे. तेवढ्यात, त्यांच्या या चराच्या उत्तर बाजूला तिस्तेचं पाणी धक्का खाऊन, उजवीकडे फिरून, शहराच्या दिशेने घोंघावत जातंय. पण आता त्यांच्या कानी तो आवाज येत नाहीय- पाण्याचा आवाज, कारण गेल्या तीन दिवसांत त्यांना पाण्याच्या या आवाजाची सवय झालीय. आता त्यांना मोठ्या आवाजात बोलावं लागतंय, नाहीतर ऐकू येत नाही. वारा आणि पाणी यांच्या आवाजांत माणसांचा आवाज दबून जातो. बोलताना आवाज चढवून ही माणसं नदीच्या पुराच्या आवाजाला दाबून टाकू पहाताहेत.

कुणीतरी म्हणतं, 'विसरला असेल!'

'संध्याकाळी समजू शकतो विसरणं, आज अगदी मध्यरात्रीपर्यंत कसा विसरला?'

'सिनेमा पहायला गेला असेल,'- आवाजावरून रावणला ओळखता येतं.

'सिनेमाला कसला, सासुरवाडीला गेला असेल साला!' जगदीश बारुई संतापून म्हणतो. सगळेजण हसतात. रावण जगदीशला संतप्त करण्यासाठीच बोलला होता. जगदीशही संतापलाय.

'नीट डोळे चोळून पहा, ब्रिजवर गाडीबिडी आहे, की नाही?' नरेश म्हणतो आणि

मान उंच करून पहातो.

'आवाज येत नाही? ट्रकचा?' जगदीश आता जमिनीवर आडवा बसून बिडी ओठांत धरतो. त्याच्या डोळ्यात मोतिबिंदू झालाय, दिवसाच्या उजेडातही एवढा मोठा ब्रिज त्याला पलीकडच्या झाडीसारखा दिसतो. दिसतच नसल्यावर उगाच उभं राहून फायदा काय? त्यापेक्षा खाली माणसांत बसलेलं चांगलं.

तिथूनच जगदीश म्हणतो, 'काय, काही हालचाल दिसतेय की नाही तिथं?' सगळे जणू जगदीशच्या आदेशाप्रमाणे तिकडे पहातात. नंतर ओरडून म्हणतात, 'हो, हो, दिसतेय.' थोडा वेळ घेऊन, तर्जनी आणि मध्यमा यांच्या मध्ये जगदीश बिडी धरतो. उत्तेजनेमुळे ओढीत नाही. नंतर संतापाने म्हणतो, 'सालों, सूअरके बच्चों, दिसतेय तर सांगता येत नाही का?'

सगळे यावेळही पुन्हा हसतात. जगदीशला डिवचण्यासाठी ते वाक्य गजेन म्हणाला होता, आणि जगदीशही चिडला होता.

'ए जगदीश, तू इकडं येऊन जरा नीट बघ बरं इथून, ब्रिज आहे की नाही ते! मला तर वाटतंय की ब्रिज नाही राव!' हा जगदीशच्या समवयस्क रावणचा आवाज. पण जगदीशच्या मोतिबिंदूवरून चाललेल्या या थट्टेनेही जगदीश चिडत नाही; मनातून संतापला तरी उघड काही बोलत नाही. इतक्या वेळानंतर नरेश पुन्हा आपला टॉर्च उंच करून, ब्रिजच्या दिशेने रोखून,.त्याचा स्विच ऑन करतो. जणू, टॉर्चचा उजेड किती दूर जात असावा याचाच तो आत्तापर्यंत हिशेब करीत असावा.

नरेशला संशय येतो, की टॉर्च बहुधा लागला नाही. तो स्विच बंद करून पुन्हा चालू करतो. पण पुन्हा त्याला तो बंद करावा लागतो.

नरेश पुन्हा टॉर्च ऑन करतो. आता लक्षात येतं, की धुकं आणि वारा इतका आहे, की टॉर्च पेटलाय की नाही हे समजतच नाही. आपल्या टॉर्चचा प्रकाश धुकं-वारा भेदून जाऊ शकत नाही. यात नरेशचा जणू स्वतःकडूनच स्वतःचा जरा अपमान होतो. थोडी शंकाही घेते, कारण या टॉर्चनेच त्याला गेल्या काही दिवसांपासून अधिकार दिला होता, किमान रात्री तरी त्याच्याशिवाय इतरांचं चालत नसे. पण आता डोळ्यांसमोर तिस्ता ब्रिजवर प्रकाश असतानाही, नरेशला मात्र इथला जलमिश्रित वारा आपल्या टॉर्चच्या उजेडाने थोडाही भेदता आला नाही, त्यामुळे त्याच्यावरची इतरांची निर्भरता थोडी कमी होऊ शकते. निताई ओरडतो, 'अरे कोण आहे रे! जा बरं, जरा देउनियाचा रेडिओ घेऊन या!'

जगदिश 'रे-रे' करीत उठून उभा रहातो. हेच, पावसाच्या पाण्याने बॅटरी डाऊन होणार, आता रेडिओवरच तेवढा भरोसा-'

नंतर जगदीश दोन्ही हात समोर हलवीत म्हणतो, 'काय, कुणी गेलं का नाही?

आं? बोलत का नाही कुणी?'

नितांई ओरडतो, 'आता कशासाठी बोलायचं रे? तुम्ही सगळेच घाबरट! ब्रिजवर एवढ्या रात्री प्रकाश आहे, म्हणजे काय लाल सिग्नल दिलाय की काय? रेडिओवर ऐकायला नको? की सिनेमाची गाणी ऐकायची?'

'चुप हरामजाद्या!' जगदीश ओरडतो, 'ऐकायचं असेल तर घरी जाऊन ऐकून ये, इथं कशाला रेडिओ आणायचा? इथं काय आता 'पतिघातिनी सती' लोकनाट्य होणार आहे काय? सगळे साले-'

जगदीश उभा राहिला होता. त्याला सारंच अंधुक दिसत असल्याने तो एकाच दिशेकडे तोंड ठेवून ओरडतो. बोलण्याच्या शेवटी जगदीश बिडीचा जोरात झुरका घेतो, पण बिडी विझली आहे हे त्याच्या लक्षात येतं. तो बिडी फेकून देतो. बिडी पडत नाही, हातालाच चिकटून रहाते. जगदीश डोक्यावर हात फिरवतो, तर बिडी त्याच्या केसांत अडकते. 'तू जा ना नकुल, रेडिओ ऐकून ये, पुराचा सिग्नल ऐकल्याबरोबर निघून ये-' जगदीश म्हणतो.

नकुल म्हणतो, 'इथं उगाच बसून रहाण्यापेक्षा सगळेच जाऊ ना!'

'नको बाबा, आम्ही इथंच थांबून पुलावरच्या प्रकाशाचा प्रकार पहातो,' जगदीश म्हणतो.

'जगदीशची नजर तर फार चांगली आहे!' रावण हळू आवाजात म्हणतो. नकुल निघून जातो. जगदीश आपल्या धोतराच्या गाठीतून दोन बिड्या आणि काडीपेटी काढतो. एक बिडी रावणपुढे करून म्हणतो, 'काय, घेणार? घे!'

रावण बिडी घेतो. जगदीश पुन्हा सगळ्यांमध्ये बसतो. आपली बिडी पेटवतो. काडी रावणपुढे करतो. रावणही आपली बिडी पेटवून येतो.

## सत्याऐंशी

# जगदीशचा राग

हातांच्या मुठींत धरून ते विड्या ओढीत होते. दरम्यान आणखी दोनचारजण जगदीश आणि रावण यांच्या आसपास बसतात. त्यांच्यातलेही दोनेकजण विड्या ओढू लागतात. जोपर्यंत ते तिस्ता ब्रिजवरच्या उजेडाकडे पहात उभे होते, तोपर्यंत वारा आणि पावसाचे थेंब यांचा विचार त्यांच्या मनातच आला नव्हता. पण जमिनीवर उकिडवे बसल्यावर वारा आणि पाऊस यांच्यापासून संरक्षण करण्यासाठी ते डोकं छातीवर झुकवतात. जणू मान आणि पाठ हे शरीराचे भागच नाहीत. जणू, ओझं वहाता-वहाता,

मान आणि पाठ यांच्यामध्ये प्रतिरोध क्षमता आपोआपच तयार झालीय.

नकुल जगदीशच्या घरी रेडिओवरच्या बातम्या ऐकायला गेलाय, त्यामुळे त्यांना वाट पहायलाच हवी. रात्री दहाला तिस्तेच्या पुलावर उजेड पाहिल्यावर रेडिओवरच्या बातम्या ऐकायलाच हव्यात. शिलिगुडी केंद्रावरून प्रसारित होणाऱ्या दिवसातील शेवटच्या बातम्या ऐकल्यावर एकप्रकारे धीर येतो, त्यांच्यामध्ये नवीन काही न सांगितल्यास बरं वाटतं बहुधा नवीन काही संकट येणार नाही असं वाटतं. पण नवीन संकटाची गरजच काय? जुनं संकटच जर आणखी थोडं पुढं आलं, तर तेच यांच्यासाठी मोठं आणि नवीन संकट बनू शकतं.

'काय रे निताई, तुमच्या पार्टीत पुराबद्दल काय सांगितलं- पूर येणार, की येणार नाही?' निताई त्याच्या पार्टीतला या चराच्या पंचायतीचा सदस्य आहे. हा चर दोमोहनी गावाशी जोडलेला आहे. पंचायतीचं ऑफिस तिथंच आहे.

'ते म्हणाले, कॉम्रेड, पूर यायचा असेल तर नक्की येईल, यायचा नसेल तर मुळीच यायचा नाही, गजेन अगदी हळू आवाजात म्हणाला. गजेनला प्रत्युत्तर न देता निताई म्हणतो, 'पार्टी आणखी काय म्हणणार, अं? काय म्हणणार पार्टी? पंधरा दिवसांपासून पाऊस पडतोय, वाराही आहे, डोंगरावरून पूर येतोय. मग पार्टी काय सांगणार?'

'अरे निताई, एवढी मोठी पार्टी तुझी, तुला न विचारता पहाडावरून येऊन पूर इथं कशी काय धडक देणार? बदली करून टाक त्या पूराची, ट्रान्स्फर करून टाक!'

याचं उत्तर शोधण्यासाठी जणू निताई थोडावेळ गप्प रहातो. नंतर म्हणतो, 'मी सांगून आलोय. सांगून टाकलंय मी पार्टीला.'

'काय? काय सांगितलंस?'

'म्हणालो, आमचा चर वाहून जाताना दिसला, तरी आमच्यासाठी मिलिटरी पाठवू नका, कॅम्प उभारू नका, मदत देऊ नका- सांगून टाकलं!'

'रागावतोस कशाला मूर्खा, गप्प बस!' जगदीश जणू गुप्त सल्ला देतो. यावर निताई काहीच बोलत नाही. जगदीश मनात म्हणतो, 'साला निताई, त्याच्या हिताचं सांगितलं.

जगदीश संतापून अचानक मान वळवून थुंकतो- कुणाच्यातरी अंगावर थुंकी पडली, तर जगदीशला आनंदच होईल. त्याला रात्री जवळजवळ दिसतच नाही हे सर्वांना ठाऊक आहे, आणि त्यावरूनच त्याची ते इतका वेळ थट्टा करीत होते. आता तो उट्टं काढायची संधी घेतो. त्याला दिसतच नाही- कुणाच्या अंगावर थुंकी पडली तर त्याला कशी दिसणार?

पण तरीही कुणीच काही आवाज करीत नाही. जगदीशला वाटतं, एक सणसणीत लाथ मारून पहावी- आसपास कुणी आहे की नाही ते समजेल.

जगदीशला असं वाटताच सगळे हो-हो करून हसतात. निताई हसत-हसत ओरडतो, 'अरे नरेश, का रे तुझ्या हातोडीने दणका मारलास?'

नरेशही हसत-हसत ओरडतो, 'मला गजेनने धक्का दिला', पण हसण्याच्या उदेकामुळे तो पुढं बोलू शकत नाही. त्याबरोबरच गजेन ओरडतो, 'मला आषाढूने धक्का मारला.' गजेनचं बोलणं संपण्यापूर्वीच कुणीतरी ओरडतो, 'अरे, सांड मस्तीला आलाय, फुस् फुस् करतोय, थुंकी बाहेर टाकतोय!'

सगळे मिळून ओरडतात, 'गाय आणा, गाय आणा.'

जगदीश संतापाने उठतो, आणि काहीतरी पुटपुटत गर्दीपासून दूर जातो. दूर जाऊनही थांबत नाही, तरातरा चालतच रहातो. वाऱ्याच्या जोराने तो मागे ढकलला जातो, तरी वाऱ्याचा वेग झेलीत पुढे जातो. बाकी सगळे डोकी खाली झुकवून, मान-पाठ वाऱ्या-पावसासाठी उघडी ठेवून बसलेले होते- अगदी दगडासारखे.

रावण त्या गर्दीतून उठतो, नंतर जगदीशच्या दिशेने चालायला सुरुवात करतो. तो एकदा ओरडतोसुद्धा 'एऽ जगदीश!' पण त्यांची हाक वाऱ्यामुळे विरुद्ध दिशेला उडून जाते. रावण पुन्हा हाक मारीत नाही, लगबगीने जगदीशला धरायला जातो. वाऱ्याच्या धक्क्यामुळे त्यांच्यामधलं अंतर बदलत नाही. जगदीशला हाक मारण्यासाठीच बहुधा रावणसुद्धा हात वर करतो. वाऱ्याच्या धक्क्यामुळे त्याचा हात जणू मोडल्यासारखा खाली येतो. ते दोघे जणू या वाऱ्यावादळात, पावसात दोन झाडांप्रमाणे उभे आहेत आणि वारा त्यांना उखडून फेकू पहातोय. रावण पुन्हा हात वर उचलतो, पण पुन्हा वाऱ्याने तो खाली येतो. जगदीश तर काही त्याला पाहू शकत नाही. मग तो हात का वर उचलतोय?

कुणीतरी विचारतं, 'काय, थांबलात, की चाललात?'

'जाऊ दे, जाऊ दे, आपण बसून राहू. रावण चाललाय जगदीशला समजावून परत आणायला. आपण इथं एकत्र बसून राहू. वारा खराब आहे.'

पाऊस आता खूपच जोरात पडतोय, वारा नसता तर सारं शरीर-डोकं भिजून गेलं असतं. पण आता वाऱ्याच्या वेगाने पाऊसही तिरपा पडतोय. त्या पावसाच्या धारांचे बाण इथे बसलेल्या लोकांच्या पाठीवर- मानेवर लागताहेत.

## अठ्ठ्यायऐंशी

# एका नदीमध्ये अनेक नद्या

**असा भणाणा वारा, पाऊस आणि पूर यांच्यामध्येही आकाशातून थोडासा प्रकाश झरतोय- न दिसणारा प्रकाश पण बराच वेळ आकाशाखाली, नदीच्या काठी फिरल्यास**

तो लक्षात येतो. खूप दूरपर्यंत दिसू शकेल असा हा प्रकाश नाही, उलट डोळ्यांसमोर एक पडदा तयार करणारा हा प्रकाश आहे- तो पडदा कुठल्याही प्रकारे भेदता येत नाही. हा प्रकाश असा असतो, की त्यात काहीही स्पष्ट दिसत नाही, पण सगळ्याच गोष्टींची बाह्यरेषा दिसते. सगळ्याच गोष्टींची म्हणजे अर्थातच काही एका विशिष्ट अंतरापर्यंतच्या गोष्टींची.

प्रकाश येतोय आकाशातूनच. गेले तीन दिवस संपूर्ण मेघाच्छादित असलेल्या आकाशातून आधी वारा येऊ लागला, नंतर पाऊस आला. जणू, तीन दिवसांपूर्वी बुधवारी, इथल्या आकाशात वाराच जणू कुठूनतरी ढग घेऊन आला. त्यानंतर त्या ढगांना इकडं-तिकडं हलवून, फिरवून आकाश आणि तिस्ता यांच्यामधलं अंतर वाऱ्याने भरून टाकलं. दिवसा सूर्य दिसत नाही- प्रकाशही अधूनमधून इतका कमी होतो, की अवेळीच संध्याकाळ झालासारखं वाटतं. वरती मेघ आणि खाली नदीत त्याचं प्रतिबिंब- मध्ये वारा अगदी वेगाने पहातोय. या वाऱ्यानेच पाणी वाढतं. हा वारा इथल्या पुराचा वारा नाही. वरती, पहाडांमध्ये कुठेतरी पाऊस सुरू झालाय - मातीच्या तळापर्यंत पोचणारा, नंतर तिथून माती ढिली करून, झाडं उलथवून, दगड ढकलून, नदीला एकदम दुप्पट-तिप्पट करीत खाली उतरणारा पाऊस. आता तर तिस्तेला अगदी उगमापासून शेवटपर्यंत काठांनी बांध बांधले आहेत. पण, पात्रात न मावणारं पाणी शेवटी बांधांनच धडका देतं, आणि थोडी माती उकरून पुन्हा मागे येतं. म्हणूनच बांधापासून लांब-लांब स्पार नदीमध्ये आले आहेत- पाणी सरळ काठाच्या भागांमध्ये जाऊन धडका देऊ नये म्हणून.

पावसाळ्यात तिस्तेत कुठे-ना-कुठे असं होणारच. पहाडांत कुठे पाऊस झालाय यावर हे अवलंबून असतं. इथे, या सपाट, समतल भागात या एका नदीलाच तिस्ता म्हणतात. पण वरती, पहाडांत मात्र तिस्ता काही एकच नदी नाही. कुठून कुठून कितीतरी झरे, कितीतरी नद्या उतरून येऊन तिस्तेला मिळतात.

इतक्या ठिकाणाहून इतके प्रवाह येऊन तिस्तेला मिळत असल्याने तिस्ताही जणू स्वतःला तशीच सोडून देते. एवढंच काय, तिस्ता जिथे केवळ तिस्ताच आहे, अशा या समतल भागातही, पश्चिम काठावरील रोदागंज- रंधामाली- जलपाइगुडी-हलदीबाडी आणि पूर्व काठावरील माल-मेखलीगंज या दोन्ही काठांच्या मध्ये तिस्ता मैलोनमैल विस्कळितपणे पसरलेली आहे. जिला तिस्ता म्हणतात, ज्या जागेला नेहमी तिस्ता म्हणून पाहिलं जातं, त्या संपूर्ण जागेत कधीही पाणी असत नाही. तिस्ता एक नदी नाही, ती आहे एक भूखंड. हिवाळ्यात त्या भूखंडावर शिलाखंड वर आलेले दिसतात, त्यांना घेऊन धाग्यासारखी बारीक पण स्थायी अशी जलरेषा सोनेरी रंगाच्या वाळूला नेहमी ओली ठेवते, आणि भिजलेल्या वाळूवर त्या शिलाखंडांच्या सावल्या सकाळपासून संध्याकाळपर्यंत फिरत रहातात. या भूखंडाच्या एखाद्या अंशावर मैलोमैल पसरलेल्या हिरव्या घासाच्या

विस्तारावर गुरांचे कळप चरत फिरत असतात आणि आकाशाखाली उभे राहून क्षितिजाकडे पहात रवंथ करीत असतात. या भूखंडाच्या एखाद्या भागात नवीन अरण्य उभं रहातं. काशफुलांचा मैलोनमैल पसरलेला विस्तार दुरून पाहिला, तर शरदाच्या उन्हात ते जणू पाणीच आहे, असा आभास होतो.

पावसाळ्यात हे सारं पुन्हा उद्ध्वस्त होऊन जातं. तिस्तेच्या कोणत्या पात्रांतून कधी पाणी वहायला लागेल ते कुणालाच सांगता येत नाही. एखाद्या पावसाळ्यात उजवीकडच्या बाजूने, तर त्याच्या पुढच्या पावसाळ्यात डावीकडच्या बाजूने पाणी वाहू लागतं. शरदात पुन्हा हळूहळू तिस्तेच्या भूखंडाचा नवा चेहरा दिसू लागतो. जिथं प्रवाह नव्हता, तिथे भिजलेल्या वाळूतून स्थायी स्वरूपाचा प्रवाह वहाताना दिसू लागतो. जिथे अनेक दिवस नदी वहात होती, तिथलं पाणी अचानक हिरवं होऊ लागतं, अचानक त्यातले दगड, उंचवटे पुन्हा दिसू लागतात, कुठं मातीचे चर (बेटं) दिसू लागतात. पहाता-पहाता तिथं लोकांची वस्ती उभी रहाते; तिस्तेच्या मोठ्या पात्रातलं अर्ध्यापेक्षा अधिक पाणी अचानक दुसऱ्या पात्रातून वाहू लागतं, नौका चरांमध्ये अडकतात, त्यानंतर नदीमध्येच नदी बदल करते. तिस्ता काही एक नदी नाही. एका नदीमध्येच अनेक नद्या, असं तिचं स्वरूप आहे.

पण फक्त नदीचं पात्र तेवढं बदलतं, असंच काही नाही. भूखंडही सहा महिन्यांत बदलतो. आणि त्यामुळे तर नदीही बदलते. पाण्याच्या तळाशी कुठंतरी शेवाळ, गाळ साचतो अगदी सात आठ इंच उंचीचा थर जमतो. हिवाळ्यातल्या उन्हात तो कठीण होतो आणि पुढच्या पावसाळ्यात त्याचा वापर शेतीसाठी जमीन म्हणून होऊ शकतो. त्याचप्रमाणे, दोन-तीन, किंवा अगदी दहा-पंधरा वर्षांनी जुनी शेतीची जमीन आणि वस्ती पाणी आल्यामुळे झाकून जाते, आणि पाणी निघून गेल्यावर थंडीत एक-दोन झाडांच्या पर्णहीन सुकल्या फांद्या दिसतात, एखाद्या घराचे अवशेष दिसतात.

आता, या पावसाळ्याचे सहा महिने तिस्तेमध्ये प्रवाहांचे योगवियोग तीव्र पण अनिश्चित अशा वेगाने चाललेले आहेत. पाण्याच्या तळाशी, तिस्ता-भूखंडामध्येही तीच गती संचारित झालेली आहे. घनघोर मेघांचं हे नाट्य, पण इतकं गतिमान की त्यामागे काहीही नाट्यसंचालन नाही.

## एकोणनव्वद

# भूगोलाच्या मध्ये इतिहास

वस्ती, मालबाजार-ओदलाबाडीजवळच्या मउवामारीच्या चरापासून सुरू करून खाली हलदीबाडीच्या काशियाबाडीपर्यंत तिस्तेच्या, म्हणजे तिस्ता म्हणून जो भूखंड

ओळखला जातो, त्याच्या एकदम मध्यभागी, अनेक दिवसांपासून लोकवस्ती तयार होते आहे. पण त्या अनेक दिवसांचाही एक इतिहास आहे.

राजवंशी लोक साधारणपणे तिस्तेच्या चरावर वस्ती करीत नसत आणि करीत नाहीत. त्यापेक्षा ते तिस्तेच्या काठाशी, जंगलामध्ये वस्ती करीत. त्याची त्यांना सवय होती. ते जंगल त्यांना शेतीसाठी जमीन देई, आवश्यक ते खत देई, घर बांधण्यासाठी फांद्या-पानं देई.

नदीशी त्यांचा संपर्क अगदी नदीच्या स्वभावाप्रमाणेच होता. जेव्हा जसं वाटेल, तसा. जी नदी इतकी सारखी आणि मोठ्या प्रमाणात बदलते, जी नदी, नदी म्हणता म्हणता मैदान बनते आणि ते मैदान नदीमध्ये अंतर्भूत होतं, त्या नदीला नदीची जागा सोडून देऊन राजवंशी रहाण्यासाठी वनाचा वापर करीत. वापर म्हणजे शोषण नसे. त्यांचा नदीशी संपर्क निसर्गाप्रमाणेच असे. जलपाईगुडीच्या या भागात अत्यंत दाट जंगल नदीच्या काठाशी आहे आणि त्या जंगलाभोवती डोंगर आहेत. राजवंशी समाज आणि तिस्ता नदी यांमध्ये संपर्कच नाही. कारण, संपर्क म्हणजे दोन वेगळ्या गोष्टींमध्ये एक संयोग, असा अर्थ होतो. राजवंशी समाज आणि तिस्ता यांच्यामध्ये संयोग-संपर्क असायला त्या काही दोन वेगवेगळ्या गोष्टी नाहीत!

जेव्हा 'भाटिया' लोक भारत स्वतंत्र झाल्यानंतर इतक्या मोठ्या संख्येने येऊ लागले; की लोकसंख्येचं जुनं प्रमाण बदलून गेलं, तेव्हा खरं तर या संयोगाची गरज होती. या 'भाटियां' च्या मध्ये जे आणखी कट्टर 'भाटिया' होते, ते आपल्या अंगांना पद्मा-मेयना नद्यांचा गंध घेऊन आले. त्यांचा आणि नद्यांचा संपर्क होता आक्रमणाचा, जय-पराजयाचा, अतिक्रमणाचा. या नदीला ते ओळखत नव्हते. त्यांच्या ओळखीच्या ज्या नद्या होत्या, त्या नद्यांचा तळ दिसत नसे, आणि ही (तिस्ता) नदी जणू आपल्या तळच्या रंगीत दगडगोट्यांना झाकण्यासाठीच जणू वहातेय. ते ज्या नदीला ओळखत होते, त्या नदीचा रंग होता काळा, मातीचा रंग होता काळा आणि या नदीचा रंग अगदी उन्हासारखा झळाळतोय. क्वचित कुठे चिखलामुळे बिघडला असेल, तेवढाच. त्यांना जी नदी ठाऊक होती, तिची चतु:सीमा अगदी ठरलेली, चिह्नित होती आणि त्या चतु:सीमेच्या आत माणसांशी नदीची जीवनमरणाची लढाई चालू असे. या नदीची कुठलीही चतु:सीमा नाही-कुठं ती झाडांच्या माथ्यांवर चढलीय तर कुठं झाडं आपली डोकी तिच्यात बुडवून आंघोळ करताहेत. पण, कितीही फरक असला, तरी नदी ही नदीच असते; आणि भाटिया या अनोळखी नदीमध्येच आपल्या अभ्यस्त जीवनाचा अनुषंग शोधतात. पाण्यात, पाण्याचाच गंध त्यांना येतो.

पूर्व बंगालच्या नमशूद्र लोकांनीच प्रथम तिस्तेच्या चरांवर वस्ती केली. अगदी दलबद्ध पद्धतीने. या आधी तिस्तेच्या चरांवरील वनांमध्ये बांबू रोवून, त्या बांबूंवर घर

तयार करून जे दोन-चारजण कधी-कधी रहात, त्यांनी कधीच वस्ती अशी केली नाही. पण, ज्या जमिनीचा ताबा घेण्यासाठी कुणाशीही भांडणतंटे करावे लागणार नाहीत, अशी जमीन या नमशूद्र लोकांना तिस्तेच्या चरांवरच सापडली. आपल्या पसंतीप्रमाणे ते जमीन निवडू शकले. त्यानंतर ते स्वत:च्या वस्तीसाठी आणि शेतीसाठी जमीन तयार करू लागले. त्यांनी राजवंशी लोकांसारखी बांबूंच्या मचाणांवर घरं तयार केली नाहीत, तर उंचवटे बांधून, मातीच्या भिंती बांधून फॉरेस्टमधून छतासाठी बांबू आणून चांगली घरं बांधली. एखाद्या सैन्यदलाप्रमाणे त्यांनी या सगळ्या चरांवर वस्ती केली. सैन्याला ज्याप्रमाणे कुठलंच ठिकाण परदेश वाटत नाही, आणि युद्ध नसेल, तेव्हाही ते कुठल्याही अनोळखी ठिकाणी राहू शकतात, तीच गोष्ट या नमशूद्रांची.

त्यांना भय नक्कीच होतं—. तिस्तेचं भय. पण तरीही नवीन वस्ती आणि शेती करण्याचं आश्वासन होतंच.

पण, १९५० साली तिस्तेला जो पूर आला, तो अगदी महाभयंकर होता. तिस्तेतले चर-बिर सगळे उडून गेले. काठांवरची जंगलंच्या जंगलं उन्मळून पडली. तेव्हाच प्रथम जलपाइगुडी शहरात तिस्तेचं पाणी शिरलं.

तेव्हा सगळ्याच चरांवर काही वस्ती-शेती नव्हती. पूर ओसरून गेल्यावर पुन्हा वस्ती-शेती सुरू झाली. पण या पुरामुळे तिस्तेची अनिश्चितता किती पराकोटीची असते, हेही लोकांना समजलं पाणी इतक्या अचानक आणि इतक्या वेगाने येऊ शकतं याची इथल्या लोकांना कल्पनाच नव्हती.

तेव्हाच प्रथम तिस्तेला थोडं नियंत्रणात आणण्याची व्यवस्था झाली. पन्नास सालच्या पुरानंतर शहराजवळच्या तिस्तेच्या काठाशी भिंती बांधण्यात आल्या. त्यानंतर त्यांची लांबी वाढत राहिली.

त्याच दरम्यान तिस्तेवर दोन ब्रिज तयार झाले एक रोड ब्रिज, आणि दुसरा रेल्वे ब्रिज. १९६८ साली तिस्तेच्या पुराचं पाणी या पुलाशेजारची भिंत तोडून शहरात घुसलं. त्याआधी ओदलाबाडीचं वन उन्मळून पडलं, न्यावडा आणि 'धरला' यांच्यामधील त्रिभुज प्रदेश उखडून पडला, मउवामारीच्या चरापासून बोयालमारीच्या चरापर्यंत सगळ्या ठिकाणी तिस्तेच्या जुन्या पत्रांतून पुराचं पाणी वाहू लागलं. १९६८ चा पूर का आला, त्याच्या कारणासंबंधी अनेक मतं आहेत. या मतांची संख्या पुराशी संबंधित सरकारी खात्यांच्या संख्येवर अवलंबून असते. प्रत्येक खात्याच्या मते काही-ना-काही कारण होतं, एवढं नक्की एक मात्र खरं की काठाशी भिंती बांधल्यामुळे तिस्ता पूर्वीपेक्षा अधिकच अनिश्चित झाली आहे असं दिसून आलं. पण मध्यंतरी सोळा वर्षांचा कालखंड गेला होता, हे सुद्धा लक्षात घ्यायला हवं. (या भिंती १९५२ साली बांधण्यात आल्या होत्या). १९६८ नंतर, वीस वर्षं उलटण्या आधीच, तिस्तेबद्दल आणखी वैज्ञानिक आणि संघटित

उपाययोजना करायचं ठरलं. दरम्यान तिस्ता बॅरेजचं काम पहिल्यांदा पूर्ण झालं. पुराची भीती कायमची असली, तरी तिस्तेचं पाणी पहाडावरून उतरून अचानक समतल भूमीवर येऊन उत्पात होऊ नये, म्हणून तिस्तेच्या अगदी मध्यभागी बॅरेज बांधण्यात आले.

१९५२ आणि १९५४ सालच्या पुरानंतर चरांवर वस्ती केलेले नमशूद्र पुन्हा चरांवरच आले होते. १९६८ च्या पुरानंतरही, पुन्हा या चरांवरच वस्तीसाठी येण्याव्यतिरिक्त या लोकांसमोर दुसरा मार्ग नव्हता. कारण तोपर्यंत, दोन दशकांमध्ये मउवामारीपासून काशियाबाडीपर्यंतच्या तिस्तेच्या चरांवर वस्ती झाली होती. शेतकऱ्यांच्या सहकारी संस्थाही स्थापन झाल्या होत्या, आणि शेतकरी लोकांनी सुरू केलेल्या स्वतंत्र उद्योगांमुळे, भाजीपाल्याच्या उत्पादनामुळे जिल्ह्याच्या अर्थनीतीचा चेहरामोहरा बदलला होता. १९६८ च्या पुराच्या वेळी चरांवरचे शेतकरी हे जलपाइगुडीच्या लोकवस्तीचे मुख्य भाग बनले होते, आणि चरांवरचं पीक आर्थिक जीवनाचा अपरिहार्य भाग बनलं होतं. म्हणूनच, १९६८ च्या पुरानंतर शेतकऱ्यांना चरांवर परत येणं भागच होतं.

पुरामुळे तिस्तेचा भूखंड बदलून गेला होता. या बदललेल्या भूखंडावर त्यांनीही काही बदल स्वीकारून पुन्हा वस्ती केली. तिस्ता जशी स्वत:ला बदलते, तसंच त्यांनीही स्वत:ला बदलवून घेतलंय. पण, १९६८ च्या पुरातही तिस्तेमधून ज्यांचा उच्छेद झाला नाही, त्यांचा आता उच्छेद होणार नाही. १९६८ च्या पुरानेच जणू तिस्तेच्या चरांना आणि त्या चरांवरील शेतकऱ्यांना इथल्या मुख्य भूभागाचा अंश बनवून टाकलंय.

फाळणी झाल्यानंतर पूर्वबंगालमधून आलेले निर्वासित नमशूद्र शेतकरी व उत्तर बंगालमधील पहाडी लोक यांनी तिस्ता नदीला एकप्रकारे जिंकून घेतलं. भूगोलावर इतिहासाने जय मिळवला.

## नव्वद

# चरावरील रहिवासी

तिस्तेचे हे चर मुख्यत्त्वेकरून पूर्वबंगालमधील नमशूद्र शेतकऱ्यांनीच ताब्यात घेतले आहेत व त्यांवर शेती केली आहे. सरकारी कायद्यानुसार चराच्या जमिनीवर साधारण कायदे लागू होत नाहीत. कारण, चराची जमीन अनिश्चित स्वरूपाची असल्याने, सरकार तिला वस्तीची जागा म्हणून मानीत नाही. पण त्यामुळे चरावर रहाणारे लोक कुठल्याही नागरी अधिकारांपासून वंचित होत नाहीत. प्रत्येक सार्वजनिक निवडणुकीत ते मतदान करतात, यावेळी तर त्यांनी पंचायतीत आपले सदस्यही पाठवले आहेत. सरकारी कायद्यानुसारच सरकारी कायद्यांपासून मुक्त असल्यामुळे चरांवर बहुतेक सगळेच

जोतदार, कुणीही कूळ नाही; किंवा सगळीच कुळं, कुणीच जोतदार नाही. जमिनीच्या मालकीमुळे जमिनीवर, शेतीवर, पिकावर कायद्याप्रमाणे वंशपरंपरागत अधिकार तयार होतो, चरावर काही असा अधिकार तयार होत नाही. त्यामुळे देउनिया-जोतदारी असे प्रकार जणू चरावरती चालू शकत नाहीत.

पण एकाप्रकारे असे प्रकार चालतात, हेही खरं. सर्वांची आर्थिक क्षमता समान नसते, तसंच सगळ्याच घरांतील व्यक्तींची संख्या सारखीच नसते. कधी-कधी बऱ्याच जणांना पैसे कर्जाऊ घ्यावे लागतात. काहींना कमी तर काहींना जास्त मुदतीसाठी. अशा वेळी पैसे कर्जाऊ देणाऱ्या एखाद्या देउनियाची गरज पडते. चरांवर हे सगळं कर्ज बऱ्याच प्रमाणात पैशांमध्येच फेडलं जातं; पण काही काही धान्याच्या स्वरूपातही कर्जफेड करतात. काही काही चरांवरचे शेतकरी स्वतः शेती करू शकत नाहीत तिथं ते शेती करण्यासाठी माणसं लावतात. तशी माणसं मिळतातही सहज-नांगरटीच्या, पेरणी-लावणीच्या, कापणीच्या वेळी काम करण्यासाठी राजवंशी लोक येतात, काम करून देतात. साधारणपणे चरांच्या अर्थनीतीत 'आधियारी' (पिकाचा अर्धा हिस्सा देणे) चालत नाही.

या चरांवरती एक आंतरिक लोकशाही चालू आहे - उत्पादनाच्या भूमिकेवर आधारित लोकशाही. राजवंशी लोकांनी कधीही एकजुटीने चरांवर वस्ती केली नाही. म्हणूनच नमशूद्र लोकांनी चर वस्तीयोग्य करून घेतल्यावर राजवंशी तिथे स्वतःचा अधिकारही सांगत नाहीत, व त्यावरून झगडेतंटेही होत नाहीत. फक्त ज्याला 'कायम इलाखा' म्हणतात, म्हणजेच ज्या जमिनीचा सरकार सेटलमेंटामार्फत सर्व्हे करू शकते, त्या कायदेशीर जमिनीवर जेथे नमशूद्र लोकांनी वस्ती केलीय तिथे कधीकधी जुन्या राजवंशी वस्तीशी झगडेतंटे होतात. अशा प्रकारची सर्वांत वाईट घटना घडली होती चौदा-पंधरा वर्षांपूर्वी, तिस्तेकाठच्या झाडमाझग्राम भागात. तेथे आगी लावणे, आगीत जाळणे, सुरामारी करणे असे सारे प्रकार झाले होते. पण चरांवर अशी एकही घटना किंवा सांप्रदायिक दंगा झाला नाही. अगदी सुरुवातीला जरी नमशूद्र लोक चरांवर इतरांना वस्ती करू देत नाहीत असं म्हटलं जात असलं, तरी नंतर, जेव्हा हे चर वस्तीयोग्य व शेती करण्यायोग्य झाले, तेव्हा मुख्यतः तेथे नमशूद्र असूनही राजवंशी लोकांपैकीही बऱ्याच जणांनी नमशूद्रांबरोबर चरांवर वस्ती केली, शेती सुरू केली.

चरांवर सगळ्यांनीच वस्ती करावी, असं ठरलं. अशी परिस्थिती, वातावरण तयार झालं. विशेषतः तिस्तेच्या दोन्ही तिरांवर राजवंशी लोकांची वस्ती आहे. त्या गावांमधून चरांवरच्या लोकांना ये-जा करावी लागते. त्यामुळे एकप्रकारची ओळख-पाळख सर्वांशीच सर्वांची होऊन लागते. स्वातंत्र्यानंतरच त्या पहिल्या धक्क्यात काय व्हायचं ते झालं, पण त्यानंतर तिस्तेच्या चरांवर नमशूद्र आणि राजवंशी यांची मिश्र वस्ती तयार झाली आहे.

त्या वस्तीत बहुधा बऱ्याच भागांमध्ये नमशूद्रच बहुसंख्येने असले, तरी काही-काही ठिकाणी राजवंशी लोक संख्येने अधिक आहेत.

सामाजिक दृष्टीने, किंवा या समस्त चरांवरच्या जन-संगठनाच्या दृष्टीने पहाता नमशूद्र आणि राजवंशी यांचं एकमेकांसमवेतचं जीवनयापन हेच मुख्य आणि महत्वाचं आहे. कोण बहुसंख्य आहे आणि कोण अल्पसंख्य, हा प्रश्न तिथे गौण ठरतो. जगदीश बरुईसारखा महाजन (सावकार) एकेका चरावर नक्कीच आहे, पण चरांवरची शेतकरी कुळंही काही वंशपरंपरागत शेती करीत नसल्याने ती बारुईकडून महाजन (सावकार) पैसे कर्जाऊ घेऊ शकतात, पण धान्य उसनं घेत नाहीत. जनसंगठनाच्या या लोकशाहीमधूनच चरांवरील शेतकऱ्यांच्या भाषेतही पूर्व बंगालची भाषा आणि राजवंशी भाषा यांचं मिश्रण झालंय. अंधारात ती भाषा ऐकली, तर बोलणाऱ्या गर्दीत 'भाटिया' बहुसंख्य आहेत की 'देशिया' हे समजणं अवघडच. जगदीश ज्या भाषेत बोलून आपला राग व्यक्त करतो, त्याच भाषेत रावणही त्याला समजावण्याचा प्रयत्न करतो.

## एक्याण्णव

# फ्लड यायला कितीवेळ-चार तास की सहा तास

पण वाऱ्याच्या वेगामुळे जगदीश पुढे जाऊ शकत नाही, आणि रावणही त्याच्याजवळ पोहोचू शत नाही. बाकीचे लोक इथे गोल होऊन, वाऱ्याच्या झपाट्यांमुळे धार चढलेले पावसाच्या धारांचे बाण पाठीवर-मानेवर-डोक्यावर झेलीत झेलीत पहातात, इथून उठून जाऊनही जगदीश किंवा रावण कुठेच पोचू शकत नाहीत.

पाऊस-वारा यांच्यातून, तिकडून वाऱ्याच्या अनुकूलतेमुळे नकुल पळतपळत जवळ येतो. जगदीश असा एकटा दिसेल, असं त्याला वाटलंही नव्हतं. म्हणूनच जगदीशला न पहाताच तो पुढे येतो. जगदीश नकुलला ओळखू शकत नाही. त्याला वाटतं, पलीकडून दाट धुकं या बाजूला येतंय. आता त्या बाजूने फक्त नकुलच येणार आपल्या जवळ असूनही तो आणखी धुक्यात गेलेला पाहून जगदीश मोठ्याने हाक मारतो. 'हेऽ नकूलऽ.' त्या हाकेत आवाहनाबरोबर धमकी ही होती, किंवा हीच जगदीशच्या आवाजाची खासियत होती. तो बोलताना जरा तोऱ्यात, मोठ्याने बोले. पण यावेळी तो खूपच जोरात ओरडला होता, नाहीतर या वाऱ्यातून त्याचा आवाज रावणपर्यंत आणि त्याच्याही मागे बसलेल्या या लोकांपर्यंत पोचला नसता- 'हेऽनकूऽ!'

नकुल उभा रहातो. जगदीश ओरडतो, 'काय सांगितलं रेडिओवर?'

आता, या चरावर धुक्यात तीन उभ्या मूर्ती आहेत- रावण, नकुल आणि जगदीश.

थोड्या अंतरावर ते दल माना खाली घालून गोल होऊन बसलंय. जगदीशने नकुलला हाक मारल्याबरोबर त्या दलातले दोनेकजण उभे रहातात. नकुल जगदीशकडे वळून सर्वशक्तीनिशी ओरडतो, 'लाल सिग्नल दिलाय, लाल सिग्नल!' वाऱ्यात त्याचं ओरडणं इतकं विस्कळित होऊन उडून जातं, की या लोकांनाच फक्त ते समजू शकतं. इतरांना तो वाऱ्याचाच आवाज वाटला असता.

तीन-तीनजण उभे राहिल्याने वारा त्यांना घेऊन आणखीच उन्मत्त होऊ शकतो. आतापर्यंत जगदीश वाऱ्याच्या विरुद्ध पुढे जाऊ शकत नव्हता, आता वारा त्याला मागून धक्के मार-मारीत पुढे ढकलतो. त्याला आपलं शरीर एकदम हलकं झाल्यासारखं वाटतं- प्रवाहाच्या दिशेने पोहोणाऱ्या माणसाला वाटतं, तसं.

नकुलच्या आरोळीमुळे दलातले सगळेजण उठून उभे रहातात. त्याबरोबर वारा त्यांच्या शरीरांना झोडपू लागतो. त्यामुळे वाऱ्याचा आवाज जणू अनेक पटींनी वाढतो.

आता सगळ्यांना नकुल आणि जगदीशकडे जायचं होतं, पण तेच या सगळ्यांजवळ येऊन पोचले.

नकुल सगळ्यांच्या मध्ये येऊन उभा रहातो. 'म्हणाले, की लाल सिग्नल देण्यात आलाय. सर्वांनी घरातच थांबावं. बांधाजवळ, नदीकाठी जे असतील त्यांनी तत्काळ स्थलांतर करावं. ज्यांनी अद्याप स्थलांतर केलेलं नसेल, त्यांची जबाबदारी सरकार घेणार नाही. चरावर जी माणसं असतील त्यांनी साल्यांनी आज रात्रीच स्थलांतर करून डांगावर निघून जावं. पहाडावरून पूर खाली यायला सुरुवात झालीय, शिबक पहाडाखालचा रेल्वेचा पूल पडून जाण्याची शक्यता आहे- त्यामुळे आसामच्या सगळ्या रेल्वेगाड्या कॅन्सल, कॅन्सल, कॅन्सल-' नकुलचा दम संपतो. पुन्हा वाऱ्याचं गर्जन जोरात सुरू होतं, त्यामुळे त्यानंतर कुणीच काही बोलू शकत नाही. वारा आकाशापर्यंत गर्जत रहातो, गरज-गरज-गरजत रहातो.

नरेश ब्रिजकडे मान वळवून म्हणतो, 'सिग्नल आधीच आलाय, ब्रिजवरचे दिवे रात्रभर चालू ठेवलेयत!'

निताई म्हणतो, 'या ब्रिजबद्दल काही सांगितलं?'

नकुल आधीच्याच आवाजात ओरडून सांगतो, 'या ब्रिजबद्दल काही नाही सांगितलं. गुराख्यांनी डांगावर जावं, डांगावर जावं, कुणीही नदीकाठी थांबू नये, कुणीही थांबू नये-'

गजेन विचारतो. 'पुराचं पाणी पहाडावरून उतरेल असं म्हणाले, की उतरू लागलंय असं म्हणाले?'

नकुल जणू आत्ताच पहाडावरून उतरून आलाय, अशा आविर्भावात सगळेजण त्याला प्रश्न विचारताहेत. याचं उत्तर नकुल चटकन देऊ शकत नाही. तो रेडिओवरचे

शब्द अचूक आठवण्याचा प्रयत्न करतो.

'आठवतंय- पाणी खाली येऊ लागलंय असं म्हणाले. खाली येऊ लागलंय, शिबक पहाडाचा रेल्वे ब्रिज बंद करण्यात आला आहे. हो, पाणी खाली येऊ लागलंय, येऊ लागलंय, येऊ लागलंय!', पुनरावृत्तीतून नकुल स्वतःच्या बोलण्याचा खरेपणा स्वतःच तपासत जातो.

रावण वरून विचारतो, 'रात्री परत बातम्या सांगणारेत का?'

'नाही. सांगितलं, की याच शेवटच्या बातम्या. सांगितलं, सायरन वाजवण्यात आलाय-'

'सायरन? वाजवण्यात आला? ऐकू आला नाही तो! कुणी ऐकला?' गजेन विचारतो.

जगदीश ओरडतो, 'गप व्हा बैलांनो! वारा केवढ्या जोराने वहातोय, दिसत नाही? तुझ्या लग्नात सनई वाजवणार, साल्या! अरे इथं स्वतःचा आवाज स्वतःला ऐकू येत नाही, तिथं सायरन कुठला ऐकू येणार?' गप्प होऊन जगदीश पुन्हा अचानक म्हणतो, 'नकुल, एऽनकुल, कुठंयस तू?'

'बोला ना, इथंच आहे!'

'तुझ्या काकाने रेडिओ चालूच ठेवलाय ना? बंद नाही ना केला?'

'असं काय म्हणता? अशा वेळी काय काका गाणं ऐकत बसतील काय?'

'चूप सूअर! परत न्यूज दिली तर?'

'जयहिंद म्हणाले ते, आता परत कशी न्यूज देणार?'

'जयहिंद म्हणाले? मग आता काय होणार? निताई?' कुणीच याचं उत्तर देत नाही.

जगदीश पुन्हा ओरडतो-, 'निताई? निताई नाही इथं!'

निताई धमकीच्या स्वरात ओरडतो-, 'अरे जरा गप बसा ना! काय आरडाओरडा चाललाय? ए नरेश, किती वाजले बघ बरं!'

नरेशच्या टॉर्चचा प्रकाश सगळ्यांच्या अंगांवरून फिरतो- 'अकरा बावीस.'

निताई म्हणतो, 'हे बघा, आता झालेत रात्रीचे साडेअकरा. तिस्ताबाजाराहून पुराचं पाणी इथपर्यंत यायला किती वेळ लागतो रे नरेश? सहा घंटे-'

'हो, सहा घंटे-'

'हिशेब करा बरं, साडे अकरा-'

'साडे अकरा तर आत्ता वाजलेत, बातम्या झाल्या पावणे अकराला.'

'ते राहू दे रे, पावणे अकरापासून पुढे सहा तास म्हणजे किती होतात?'

'अकरा धरा ना, म्हणजे हिशेब सोपा होईल!' गजेन म्हणतो.

'साला, तुझ्या सोयीसाठी पूर उशीरा येणार आहे का रे?' जगदीश ओरडतो.

'अहो, तालई, तुम्ही बोला, मी गप्प बसतो,' निताई म्हणतो.

'विसरलो होतो निताई, तू बोल; तो गजेन सगळं उलटंपालटं बोलतो.'

निताई पुन्हा ओरडतो, 'ऐका, कुठल्याही हिशेबाने पूर सकाळी चारच्या आधी इथं येणार नाही-'

निताईच्या हिशेबाचं एक मोठं तात्पर्य म्हणजे आज रात्रीसाठी तरी ते सारे धोक्यापासून दूर आहेत. एवढंच काय, सकाळी चारला जर चर सोडून डांगावर जावं लागलं, तरी तोवर पहाटेचा प्रकाश आलेला असेल. काही वेळानंतर रावण म्हणतो. 'आसामच्या रेल्वेगाड्या बंद केल्या म्हणाले. साला म्हणजे फ्लड शिबकपर्यंत आला म्हणायचा-'

रावणच्या बोलण्याला प्रतिसाद म्हणून कुणीच काही बोलत नाही. ते सारेच आणखी एक हिशेब करी रहातात. पुराचा इशारा दिला जाणार पहाडामधल्या, कालिम्पाँगच्या वाटेवरच्या 'तिस्ताबाजार' नावाच्या ठिकाणाहून. तिथून पाण्याचा हिशेब मिळाल्यावर, त्यानुसार अंदाज करता येतो- तिस्ताबाजार पासून हलद्दिबाडीच्या काशियाबाडीपर्यंत तिस्तेवरून सुमारे साठ मैल मार्ग कापीत यायला पाण्याला किती वेळ लागणार, याचा. शिबक ब्रिजपर्यंत नदी पहाडाच्या मध्यभागातून उतरते. तिस्ताबाजारपासून शिबक पुलापर्यंत ती खूप वेगाने उतरणार, शिबक पासून जलपाइगुडीपर्यंत त्यापेक्षा अधिक वेळ लागणार. या ठिकाणी तिस्ता केवळ सपाटीवर वहाते एवढंच नाही, इथेच तिस्तेचा तो भूखंड सुरू होतो- तिची नाना पात्रं, नाना मार्ग.

नरेश म्हणतो, 'आता तरी सगळेजण जागे आहोत. रात्री अडीच-तीनच्या सुमाराला चर सोडावा लागला, तर-'

**ब्याण्णव**

# अड्डुसष्टच्या पुराची आठवण

नरेश ते वाक्य खास कुणी ऐकावं, म्हणून म्हणाला नाही, पण या वाऱ्यामुळे त्याच्या बोलण्यातला खाजगीपणा नष्ट झाला. त्याचं वाक्य पूर्ण झाल्यावर सगळ्यांना वाटत रहातं, नरेशने जणू आपल्याला सावध रहाण्याचा इशारा दिलाय. अंधाऱ्या रात्री चरावर पाणी चढायला सुरुवात होईल. पाण्याचा रागरंग पाहूनच प्रत्येकजण सगळं काही फेकून पैलतिरावर जाण्याचा निर्णय घेईल. कुणी कुणाशी अगदी अक्षरही बोलू शकणार नाही- सगळे मिळून जलपाइगुडी शहराच्या पलीकडच्या बाजूला जाण्यासाठी झेपावतील. कोण मागे राहिलं, कुणी पाणी पार केलं, कोण पार करू शकलं नाही, कोण वाहून गेलं, कोण

वाचलं, तो सारा हिशेब पलिकडे गेल्यावर, जिवंत राहिल्यावर होईल. एकेकटा माणूस वाचल्याबरोबर, सगळे मिळून, सगळे वाचलेत की नाही याचा हिशेब होईल.

इथ जे आहेत, त्यांच्यापैकी बहुधा सर्वांनीच तिस्तेला अड्सष्ट साली आलेला पूर पाहिलाय. सगळे इथंच होते, असं नाही. पण पुरात वाहून गेलेल्या लोकांची संख्या कशी जाहीर होते, एका धक्क्यात पाण्यामुळे गोठा कसा मोकळा होतो, पाच-सात दिवसात उभ्या पिकाच्या ठिकाणी गुडघाभर वाळू कशी दिसू लागते हे सगळ्यांनाच ठाऊक आहे. पुढच्या चार- ते सहा तासांच्या हिशेबात त्यांचा सुमारे पंधरा-सोळा वर्षांआधीचा अनुभव मिसळलेला आहे.

प्रत्येक जण तेव्हा थंडगार पाण्याच्या प्रचंड प्रवाहाच्या पुरामधून आसरा शोधीत वहात जात होता. तो प्रवाह हातात काहीच राहू देत नाही. तो प्रवाह फक्त खोल खोल खाली, तळाशी ओढत रहातो, ओढत रहातो. आता तो प्रवाह सहा की चार तासांवर आलाय, नक्की किती, कोण जाणे.

गेल्या आठवड्यातही नदीला पाणी होतं, पण संकटाची भीती या लोकांना नव्हती.

संकटाचा वास काल रात्री आला. तोही रेडिओवरच्या बातम्यांमुळे आणि पलीकडे जाऊन लोकांनी आणलेल्या नाना बातम्यांमुळे. पहाडावरून पाणी वहात यायला सुरुवात झालीय. पूर-डिपार्टमेंटकडून सिग्नल देणं सुरू झालंय.

इतकं असूनही आजच्या या शुक्रवाच्या रात्री, आता, रात्री सुमारे बारा वाजता, ही जी संकटं आली आहेत, ती आलीही नसती. वारा कमी झाला असता, पाणी कमी झालं असतं; असा हिशेब असल्यानेच ही सारी माणसं रात्री एकत्र बाहेर पडली होती- नदीच्या पाण्याचा रागरंग पहायला. तिस्ता ब्रिजवर रात्री दहा वाजता त्यांनी प्रकाश पाहिला नसता, तर बहुधा पाणीबिणी पाहून, सकाळपर्यंत आकाश स्वच्छ होईल असा अंदाज करून प्रत्येकजण आपापल्या घरी जाऊन झोपी गेला असता. त्यानंतर, रात्री अडीच-तीन वाजता ते झोपेत असताना पुराचं पाणी घरात शिरलं असतं- अड्सष्ट सालप्रमाणे.

तिस्ता ब्रिजवर प्रकाश आहे. म्हणजेच ब्रिजचं रक्षण करण्याचं काम सुरू झालंय. अड्सष्टच्या पुराच्या वेळी पुराची बातमीच मिळाली नव्हती. आणि आता- पुराची बातमी आल्यानंतर सिग्नल तर देण्यातच आलाय, सायरनही बहुधा वाजून गेलाय, एवढंच काय, पुलाची काही पडझड होऊ नये म्हणून गाड्या भरून बोल्डर्सही आणले आहेत आणि रांगेत ते ट्रक्स उभे आहेत.

पण आता, या दलातले लोक पुराच्या निश्चितपणाची कल्पना आल्याने भयभीत होऊन, असहायपणे त्याची वाट पहाताहेत. अड्सष्ट साली पुराची पूर्वकल्पना नव्हती, अपेक्षाही नव्हती. तेव्हां वाटलं होतं- आधी समजलं असतं, तर वाचता आलं असतं. आता, इतक्या आधी समजूनही, जीव वाचवण्यासाठी कुठलाही आसरा या दलातली

माणसं शोधू शकत नाहीत- भीती आणि असहायतेमुळे.

## त्र्याण्णव

# हिंदी सिनेमातला जोकर

पुन्हा-पुन्हा, पूर आल्यावर काय करायचं या एकाच समस्येवर ते सारे बोलत रहातात. पूर इथं नक्की कधी, म्हणजे किती वाजता येणार याचा निर्णय कुणालाध करता येत नाही.

गजेन अचानक म्हणतो, 'अरे निताई, चार वाजता पूर आल्यावर काय तुला पंख फुटणार आहेत- उडत-उडत नदी पार करायला?'

'काय सांगायचं ते नीट सांग ना, हे असं काय वगातल्यासारखं बोलतो आहेस?' निताई म्हणतो.

'नाही, मला असं म्हणायचंय, पलीकडे सकाळीसुद्धा जाता येईल, पण जाणार कसं?'

'पोहोत जाता येईल. सकाळच्या प्रकाशात सगळंच दिसेल की.'

'आता असं बघ, सुखरंजनची आई, कानकाटूची आई आणि तालईची सासू- या सगळ्यांना पोहोत जाता येईल?'

'नाही, त्यांचं तर विसर्जन करावं लागणार-' गजेन म्हणतो.

'कर, कर, विसर्जन करून टाक; या बुढीला नेण्यासाठीच पूर येऊ दे. तिच्या जखमेतून असा दुर्गंध येतोय, की घरात थांबता म्हणून येत नाही-' जगदीश बारुई हात वर करून म्हणतो. त्याची सासू आजारपणाने आता मृत्युशय्येवर आहे.

'तुला काय म्हणायचंय ते म्हणून टाक ना!' निताई गजेनला म्हणतो. समस्या आत्ताच सोडवून टाकली पाहिजे.

'एक काम करा. सिग्नल देण्यात आलाय, पुराचं पाणी करून येऊ लागलंय, काय, येऊ लागलंय की नाही?' गजेन म्हणतो.

'हो, यायला लागलंय, यायला लागलंय,' कुणीतरी म्हणतं. जगदीश मान खाली झुकवून संमती दाखवतो. एवढंच काय, गजेनच्या नंतरच्या बोलण्यालाही तो आधीच संमती दाखवतो.

'मग पाणी रात्री तीनला येवो किंवा उद्या सकाळी येवो- कसं? गजेन पुन्हा विचारतो.

'हो, येवो,' कुणीतरी म्हणतो. जगदीश मान हलवतो.

'पुराचं पाणी इथंच येणार, आणि तुमच्या चराला धक्का मारणारच!'

'मारणारच!'

'साला आम्हाला एस्कू (रेस्क्यू) व्हावं लागणार?'

'लागणार!'

'एस्कू होण्यासाठी काय लागणार? नाव लागणार.'

'लागणार.'

'पण नाव तर नाही भाऊ!'

'नाही भाऊ!'

'एक आहे - रंधामालीच्या बाजारातली फुटकी नाव - ती वापरता येणार नाही.'

'येणार नाही.'

'आपण एस्कू होऊन गेल्यावर मिलिटरीची नाव येईल.'

'येईल.'

'इथं एस्कू आहे. नाव नाही.'

'नाही.'

'नाव आहे, एस्कू नाही.'

'नाही.'

निताई दोन्ही हातांनी आपल्या जवळच्या लोकांना जरा मागे सारून स्वतः दोन पावलं मागे जातो. त्यानंतर गजेनच्या पार्श्वभागावर इतक्या जोरात लाथ मारतो, की गजेन रावणच्या अंगावर आदळतो. रावण बाजूला सरकल्याबरोबर तो भिजलेल्या वाळूत पडतो. निताई पुन्हा त्याच्याकडे धावून जातो, म्हणतो 'साला, हिंदी सिनेमा बघून बघून जोकरगिरी करायला शिकलाय. हे होणार, हे होणार नाही असं काहीही म्हणायचं तुझं काम नाही.' पण निताई फक्त धावून जातो, गजेनला मारीत नाही. तोवर गजेन सरळ झालाय, उठून उभा राहू शकत नाही. एका हाताचं कोपर जमिनीत रोवून, दुसरा हात वर उचलून गजेन म्हणतो, 'जाऊ दे, जाऊ दे, चला, आता दोन-चार तराफे तयार करू द्या!'

निताई हे ऐकून सरळ होतो. विचारतो, 'आणखी?'

गजेनला आता उठून बसण्याची संधी मिळते, 'आणि दोन-चार मशाली तयार करून ठेवा, गरज पडली तर. . .'

अडचणीवर एवढा सोपा मार्ग सापडल्यावर निताई ओरडतो. 'मग ऊठ बरं!'

## चौऱ्याण्णव

# वाळूच्या टेकडीच्या माथ्यावर कोण?

एवढी सगळी चर्चा जणू झालीच नाही, अशा आविर्भावात निताई निघून जातो-जणू आज रात्री तराफे तयार करायचे आहेत हे खूप आधीच ठरलंय. निताई दोनेक पावलं

गेल्यानंतर बाकीचेही त्याच्या मागे-मागे चालू लागतात.

सारेजण गोल बसलेले असताना जाणवत नसलेला वारा, ते सारे चालू लागल्यावर क्षणात त्यांना घेरतो, त्यांच्यावर जणू झेप घेतो. आकाश जणू अगदी डोक्यावर स्पर्श होईल इतकं खाली येतं, दोन्ही हातांनी ते आकाश सारीत-सारीत त्यांना रस्ता काढावा लागतो. पण वाऱ्याच्या धक्क्याने पुन्हा मागे यावं लागतं, किंवा थांबावं लागतं. प्रत्येकाच्या शरीराभोवती जणू वेगवेगळं चक्रीवादळ घोंघावतंय. त्यांच्या चालण्याबरोबर ती चक्रीवादळंही जणू पुढे सरकताहेत. जणू इथं या शरीरांशिवाय वाऱ्याला काहीही अवलंबन नाहीय.

खरोखरच नाहीय. चार मैल लांब आणि तीन मैल रुंद अशा या चराची दक्षिण सीमा खाली उतरत नदीला मिळालेली आहे. जणू इथूनच चर नदीमधून हळूहळू वर आलाय. बरोबर त्याने नदीमधले दगड आणि वाळू आणलीय. त्यानंतर इथे वस्ती झाली, शेती झाली, पण इथली वाळू काही कमी झाली नाही.

हे सारे इथं आले होते पश्चिमेकडच्या रस्त्याने, चालत चालत. आता यांना पूर्वेकडे चालत चालत परत जायला हवं. वाऱ्याच्या अडचणीला तोंड देत. पायाखालच्या ओल्या वाळूत पाय रुततात, वर काढताना त्रास होतो. तिसरी गोष्ट, इथे चढ आहे. तो त्यांना चढायला हवा.

निताई अचानक वळून उभा रहातो आणि ओरडतो, 'नरेश आणि नकुल, तम्ही टॉर्च घेऊन इथे थांबा. काही दिसलं तर पळत येऊन खबर द्या.'

नरेश आणि नकुल थांबतात, नंतर मागे जायला सुरुवात करतात.

जरा दुरून वा वरून हे दृश्य पाहिलं असतं, तर एखाद्याला वाटलं असतं, जणू वाळूचेच काही स्तंभ वाऱ्यामुळे पुढे चालले आहेत.

कोण ते लक्षात येत नाही, पण त्यांच्यापेक्षा एकजण अधिक उंचीवर गेलेला दिसतो. तो हळूहळू अधिकाधिक उंचीवर जात असलेला मागच्या सगळ्यांना दिसतो.

खाली असलेल्यांपैकी एकजण ओरडतो, 'सगळे मागं जायचा विचार करीत असताना हा कोण एकटाच वर चढायला लागलाय रे?'

आवाजावरून समजतं, हा प्रश्न रावणचा.

'इथंही पूर येतोय का रे?' रावण थट्टेच्या सुरात म्हणतो.

टेकडीच्या शिखरावरून निताईचं हसणं ऐकू येतं- 'अजून ब्रिजवर प्रकाश आहे.'

'तो पाहून फायदा काय?' गजेन म्हणतो, निताई आणखी वर चढलेला दिसतो. रावण म्हणतो, 'पूर येणार आहे हे तो प्रकाश पाहूनच समजलं, नाहीतर झोपेतच पुरामध्ये वाहून गेलो असतो!'

'बरोबर बोललास!' जगदीशच्या स्वरात त्याची पराधीनता जाणवते. अधू दृष्टीमुळे.

'आपण इथं आहोत हे तर सगळ्यांना ठाऊक आहे! नाव येऊ शकते,' गजेन म्हणतो.

कुणीच उत्तर देत नाही म्हणून तो पुढे म्हणतो, 'आपल्याला रेस्क्यू करण्यासाठी मिलिटरी येऊ शकते, नाव येऊ शकते!'

'रिस्कू आल्यावर तसाच परत जाणार की हाका मारून-मारून आपल्याला वाचवणार? या टेकडीमागे चर आहे हे त्या लोकांना कसं समजणार?' रावण म्हणतो.

'मिलिटरीची नाव तर फटफटी नाव असते!' निताई म्हणतो.

'फटफटी नाव इथं चालू शकणार नाही. चिखलात अडकून जाईल,' जगदीश हे-हे करीत हसत म्हणतो, जणू या पाण्यात मोटरबोट चालू न शकणं ही त्याला एक आनंदाची गोष्ट वाटते.

निताई वाळूच्या टेकडीच्या शिखरावरून अचानक खाली जातो. तो आता दिसू शकत नाही. त्यानंतर शिखरावरून खाली तळापाशी येतो. त्याच्या डोक्यापासून पायापर्यंत ओली वाळू चिकटलेली असते.

'साला!' निताई उठून उभा रहातो आणि हातांवरची वाळू झटकतो. त्यानंतर डोळ्यांच्या पापण्यांवरची वाळू काढून टाकतो.

टेकडीला फेरी घालून एव्हाना दोघेजण त्याच्यासमोर आले आहेत. निताई म्हणतो. 'साला, सरळ चालता चालता टेकडीच्या माथ्यावरच चढलो की रे!'

निताई पुन्हा चालायला सुरूवात करतो.

## पंच्याण्णव

# पूर, जागरण आणि झोप

'एऽ, बघा बरं का, नाहीतर जगदीश तिस्तेमध्ये बुडून जायचा!' रावण पुढे जाता-जाता मान वळवून म्हणतो.

'तू चल ना साल्या पुढं, हे पहाडासारखं धुकं बाजूला करीत-करीत चालावं लागतंय,' रावणच्या अगदी मागेच जगदीश होता, हे रावणला समजलं नव्हतं.

टेकडी पार केल्याबरोबर यांची एक रांगच तयार होते. आता पुढे शेतजमीन आहे. तिथं अश्विनी राय पाच बिघ्यांमध्ये भाताचं पीक घेतो. यावेळचं पीक खूप चांगलं आलं होतं. आज रात्री, शेवटच्या प्रहरात ते सारं पीक वाहून जाणार.

इथून पुढे येतो, नंबर दोन मिस्त्रीपाडा. तिथूनच चराची वस्ती सुरू होते. मधून रस्ता गेलेला, आणि त्याच्या दोन्ही बाजूंना शेती. अगदी खालच्या पायरीवर वाळू, तिच्या

वरच्या पायरीवर शेत, आणि माथ्यावर वस्ती. पण तिस्तेच्या पुराला वर-खाली हे काही ठाऊक नाही. तो अगदी वस्तीपर्यंत येणार.

मिस्त्रीपाडात येऊन थोडं पुढे गेल्यावर धुकं विरळ झालंय. दोन्ही बाजूंना घरं असल्याने वारा आणि धुकं आत येऊ शकत नाही. पण घरांच्या वरती धुकं ओठंगलेलं आहेच. आकाशाचा प्रकाश ते धुकं भेदून खाली उतरू शकत नाही. पण, मिस्त्रीपाड्यात थोडं पुढं गेल्यावर हे सारे एकमेकांना जणू पाहू शकतात. जवळजवळ पहाटेच्या प्रकाशात. निताई आपले कुरळे केस एकदा पुढे आणतो, नंतर एका झटक्यात मागे करतो. केसांमधलं पाणी आणि वाळू निघून जाते. रावण उभा रहातो. तो सर्वांत वयस्कर आणि उंच आहे. त्याच्या डोक्यावर केस नाहीत. तो या अंधुक उजेडात एखाद्या झाडासारखा वाटतो. त्याच्या अंगावरचे पाण्याचे थेंब चमकतात- त्याने फक्त एक लंगोटी घातली आहे. जगदीश सगळ्यांत बुटका आहे. तो कमरेच्या पंचाने आपलं तोंड, मान, हात, पुसतो; आणि नुकतीच आंघोळ झाल्याप्रमाणे तोंडातून तृप्तिसूचक आवाज काढतो.

गजेन एका पायावर भार टाकून उभा रहातो. तो अशा आविर्भावात उभा राहिलाय, की इथवरच्या वाटचालीत त्याला काहीच त्रास झालेला नाहीच, आणि पुढे इतकंच अतंर तो अगदी सहजपणे चालू शकेल. गजेननेही फक्त एक लंगोटी घातलेली आहे. तो आपल्या अंगावरचं पाणी पुशीत नाही.

'आता इथल्या लोकांना कसं सांगायचं- हळू आवाजात की मोठ्या आवाजात?' निताई विचारतो.

गजेन हसतो, 'निताईचंद्र सरकार आता इथं भाषण देणार आहेत. आपण सर्वांनी उपस्थित रहावे.'

गजेन हे जरा जोरातच बोलतो. शेजारच्या घरामधून झोप आणि श्लेष्माभरल्या आवाजात कुणीतरी म्हणतं, 'कोण रे? कोण?'

जगदीश चित्कारतो, 'साल्या, इथं बघ तुझा बाप आलाय; माणसाचा आवाज येऊनही उठायचं नाव नाही!' ते घर रमणी सरकारचं होतं.

आवाजावरून लक्षात येतं, आत रमणी सरकार उठतोय.

रावण म्हणतो, 'इथं काय आमच्या आईचं लगीन आहे का- सगळ्या कुटुंबाला निमंत्रण द्यायला? रमणीला तर उठायला अर्धा तास लागणार, त्यानंतर बिडी पेटवणार, मग कंदील पेटवणार, मग दार उघडणार- सरळ सांगून टाका ना-'

निताई ओरडतो, 'अहोऽ काका, लाल सिग्नल दिलाय, पहाटेआधीच पूर येणार; तराफा बनवून ठेवा, चला!'

ते पुन्हा जाण्यासाठी वळतात, तेवढ्यात आतून रमणी ओरडतो. 'अरे थांबा, थांबा!'

गजेन म्हणतो, 'आता आम्ही थांबणार नाही, तुम्हीच या!'

रावण म्हणतो, 'बघा, तिकडं लाल सिग्नल दिलाय अन् इकडं सगळे झोपले आहेत!'

जगदीश म्हणतो, 'ते झोपेत असतानाच पूर आला म्हणजे समजेल साल्यांना!' जणू त्याला ही मजा पाहायची आहे.

जगदीश आता खूप गडबडीत दिसतो. नदीकाठी तो अस्थिर वाटत होता; पण जेव्हा लाल सिग्नल दिलाय, लवकरच पूर येणार, त्यासाठी आताच तराफा तयार करावा लागणार हे समजलं, तेव्हा तो स्थिर झाला. त्या सर्वांत तो वयाने मोठा असूनही, एखाद्या किशोराच्या उत्साहाने वावरू लागतो. पहाटेआधी पूर आल्यावर झोपेत असलेल्या रमणीचं काय होईल, या कल्पनेने ते स्वतःशीच 'ख्यांक ख्याक' करून हसतो, पळत-पळत चालतो. त्याला पळतच चालावं लागतं, कारण निताई आणि रावण मोठमोठ्या ढांगा टाकीत पुढं चालले आहेत.

चरावर मिस्त्रिपाडा ते नाउवापाडा यांच्या मध्ये दोन्ही बाजूंना भातशेतं आहेत, त्यानंतर एका मोठ्या बांबूंच्या वनातून रस्ता गेलेला आहे. तो पश्चिमेला वळलाय. नंतर आहे नाउवापाडा. पुढे माहिन्दरपाडा. त्याच्या डावीकडे पुन्हा बांबूची झाडं. नंतर सरकारपाडा नंबर दोन, जणू हा चर, चर न रहाता एक चांगलं गावच बनलंय. काळ्या घट्ट मातीचं गाव, त्यात मोठमोठ्या झाडांखाली वस्ती. त्या गावात शिरल्यावर, आता फक्त दोन-तीन तासांतच इथं पूर येणार आहे असं कुणाला वाटणारही नाही. वारा कमी होता, पण त्यानेही बांबूंची झाडं वाकून अगदी धनुष्यासारखी दिसत होती. त्यांच्यामधून येणारा आवाज एखाद्या जलप्रवाहाच्या आवाजासारखा वाटत होता.

नाउवापाडाच्या वळणाजवळच त्यांना दिसलं, की एक गॅसबत्ती पेटवून दीनानाथच्या किराण्याच्या दुकानासमोर सहा-सातजण केळ्याच्या झाडांच्या खोडांचे तराफे करीत बसले आहेत. दुरून निताई म्हणतो, 'अरे, यांनाही रेडिओवरून बातमी समजलीय, बरं झालं. एऽ अमूल्य!'

सगळेजण हाकेच्या दिशेने पहातात, पण कुणालाच काही दिसत नाही, कारण गॅसबत्तीच्या उजेडाने सगळ्यांचे डोळे दिपले आहेत. कुणा-कुणाच्या हातात कोयते आहेत, दुसऱ्या हातात केळीचं झाड आहे, कुणाच्या हातात लाठी आहे; सारे बाबूंच्या वनाच्या दिशेने पहाताहेत.

त्यानंतर गर्दीतून कुणीतरी ओरडतो, 'कोण आहे रेऽ?'

तोवर ते प्रकाशाच्या सीमेत घुसले आहेत. निताई हसत-हसत सर्वांच्या पुढे आहे.

शहाण्णव

# दक्षिणेला, पश्चिमेला-जागे व्हा

तरीही निताईला कुणी ओळखत नाही से पाहून तो ओरडतो, 'अरे, तुम्हाला काय आम्ही भुतं वाटलो की काय?'

'अरे निताई? जगदीशकाका? अरे, गेला कुठं होता तुम्ही? केळ्यांची झाडं फेकून देऊन सगळे पुढे येतात. या प्रकाशात त्यांचे चेहेरे पाहून वाटतं, हे खूप दूरवरून आले आहेत- प्रत्येकाच्या गुडघ्यापर्यंत वाळू आहे. निताईच्या तर डोक्यावरच्या केसांपासून पायाच्या नखांपर्यंत वाळू आहे.

जगदीश उडी मारून पुढे येतो, 'आता पूर येणारच बघा. तिस्ता पुलावर रात्रभर लाईट जळतोय.'

'अरे, आधी बसा. सांगा-काय, कशासाठी?'

'तुम्ही तराफे का तयार करताहात?' निताई हासतो.

'रेडिओवरची बातमी ऐकली. विचार केला, जे होणार ते होणार, आपण तराफे बनवून ठेवू.'

'स्वतःचा विचार केलात. चराचा विचार कोण करणार?' जगदीश म्हणतो.

'जे विचार करून फिरून आलेत, त्यांनीच करावा!'

'चूप! इकडच्या लोकांना खबर दिलीस की नाही?' निताई समोरच्या माणसाला धमकीच्या सुरात विचारतो. सगळे हसतात.

निताईने हे ज्याला विचारलेलं असतं तो म्हणतो, तुम्ही बसा. ए भोला, सायकली बाहेर काढ दोनतीन!'

निताई दुकानाच्या व्हरांड्यात जाऊन बसतो. अमूल्यला म्हणतो, 'इथं तुम्ही तराफे बनवीत बसला हात आणि तिकडं रमणी असा झोपलाय, की बस! पुरात वाहून गेला तरी समजायचं नाही.'

'ए नीलमोहन, जा बरं, रमणीकाकांना बोलावून येऊन ये!' अमूल्य म्हणतो.

'त्याला बोलवायची गरज नाही, येईल तो इथं पळत!' जगदीश म्हणतो.

भोला आणि आणखी दोघेजण सायकली घेऊन येतात. अमूल्य म्हणतो, 'दादा, भोला आलाय. कुठं काय खबर द्यायची ते सांगा!'

निताई जरा थांबून म्हणतो, 'सरळ फिरून ये. सगळे जागे दिसले तर त्यांना सांग आम्ही इथं आहोत, आणि एखाद्या वस्तीवरचे लोक झोपलेले दिसले तर त्यांना जागं कर.'

जगदीश हाक मारतो, 'ए भोला, ऐक!'

'बोला!'

'तुझ्या काकाला सांग, मी इथं आहे.'

'मग तुम्ही इथं कशाला थांबता? भोलाच्या सायकलवर डबलसीट जा ना!' निताई म्हणतो.

'जाऊ?' जगदीश काहीतरी विचार करतो.

'जा ना! जरा वस्त्यांवरचा बंदोबस्त पहाता येईल!' निताई म्हणतो.

जगदीश भोलाच्या सायकलच्या कॅरियरवर दोन पाय दोन्हीकडे टाकून बसतो. भोला सायकल गच्च धरून विचारतो, 'तिघेही एकाच दिशेला जाऊ की काय?'

'एकाच दिशेला जा, म्हणजे गरज पडली तर एकजण मागे येऊन खबर देऊ शकेल! निताई म्हणतो.

'अमूल्य, किती तराफे बनवतोयस?' निताई विचारतो.

'तीन बनवतोय. पण गुरांसाठी एक मोठा बनवतोय.'

'हत् मूर्खा, तराफ्यावर गुरं उभी राहू शकणार नाहीत, आडवीही पडू शकणार नाहीत. एकेका गुराला एकेका तराफ्यावर पार करावं लागणार-'

'अमूल्य आपल्या गाईबैलांना पाण्यात सोडणार आहे वहायला, आणि ती कुठं किनाऱ्याला लागतात हे पहाण्यासाठी त्यांच्या मागंमागं जाणार आहे-' गजेन म्हणतो.

'तुम्ही पाहिलंत? पूर येणारच? किती मोठा पूर?' अमूल्य विचारतो. तो आता कातर झालाय.

'रेडिओ तर तूच ऐकलास! आम्ही तेव्हा पुलाकडे पहात होतो. तूच सांग ना! किती मोठा पूर?'

'तो साला तर अशा सुरात सांगतोय, की जणू सगळं ठाऊक आहे. सांग, किती पाणी, किती क्युसेक?'

'सगळ्यांना दूर जायला सांगितलंय?' रावण विचारतो.

'अरे काकांना खबर मिळाली की नाही?' निताई विचारतो.

'आता सगळा चर जागा असताना काकांना जर ढाराढूर झोप लागली असेल तर लागू दे ना!'

'एऽ अमूल्य!' म्हणून निताई उभा रहातो, 'चल पश्चिमेकडच्या घाटाकडं जाऊन येऊ, आता पाणी किती वाढलंय- कमी असलं तर गाईगुरांना पार करून-'

निताई ताबडतोब निघतो. गजेन आणि रावणही त्याच्याबरोबर जातात.

ते पुढे गेल्यावर, अंधारातून निताईची हाक तरंगत येते- 'अमूल्य, एऽ अमूल्य!'

गॅसबत्तीजवळून अमूल्य ओरडतो, 'जा, पुढे जा, मी येतोच!'

निताई अंधारातून म्हणतो, 'गाई- बैल- वासरं- सगळ्यांना रांगेने घाटावर घेऊन यायला सांग प्रत्येकाला-'

'आत्ताच?' अमूल्य विचारतो.

'हो, आत्ताच, आत्ताच!'

रस्त्यावर चिखल नसल्याने सगळे वेगाने पळत जात होते. वारा मागून होता. त्यामुळे पश्चिमेच्या घाटाकडे जाणं सोपं वाटत होतं.

### सत्त्याण्णव

## नदी अजून जुनीच

निताई, रावण, गजेन आणि अमूल्य आता जवळजवळ उभे राहून नदीकडे पहातात. पलीकडे, एकदम समोर रंधामाली रायपूरचा बंधारा आहे. आता पाहून वाटतं, पूर आला, तरी इथली उथळ तिस्ता पार करून पलीकडे जायला कितीसा वेळ लागणार? पण पुराचं पाणी आल्यावर ही नदी इथून पार करणं अवघड आहे हे त्यांना ठाऊक आहे. पार तर करायलाच हवी. या ठिकाणाहूनच पार करण्याशिवाय गती नाही. पण आता तर इथं नदी पार करण्यासाठी काही पावलं जावं लागेल, पलीकडच्या तिरावरही काही पावलं चढावं लागेल, त्यानंतर बंधाऱ्याचे बोल्डर्स आहेत. पण जर या ठिकाणी पुराचं पाणी घुसलं, तर या बंधाऱ्यातून येणारे लांब-लांब 'स्पर्स' धक्का देऊन-देऊन प्रवाह चराच्याच दिशेने ढकलतील. त्यावेळी इथून पलिकडं जाणं म्हणजे वेगाने येणाऱ्या पुराच्या प्रवाहाच्या विरुद्ध दिशेने जाणं होईल. पूर आला, की हे सगळे उभे आहेत, तिथेही पाणी येईल, ते सारे पुराच्या प्रवाहात सापडतील. तेव्हा हा सगळा भागच 'तिस्ता' होऊन जाईल. तेव्हा पाण्याचा एकच प्रवाह, एकच ओढ असेल. त्या प्रवाहात सापडलेल्या कुणालाही स्वतःचा जीव वाचवता येणार नाही.

निताई, रावण, गजेन आणि अमूल्य शेजारी-शेजारी उभे राहून नजरेने नदीला मापतात. आता गुरांना इथून सोडलं, तर ती पलीकडे जाऊ शकतील. पण या अंधुक उजेडात त्यांची अंतराच्या हिशेबात काही चूक तर होत नाही ना?

'किती वाजले रे अमूल्य?' निताई जणू स्वतःलाच विचारतो.

'काय ठाऊक? घड्याळ आणलं नाही,' अमूल्य म्हणतो.

'निताई आकाशाकडे पहातो. आता आकाश जणू थोडं उंच आहे, धुक्याचा भार जणू थोडा कमी आहे, वारा आता त्यांच्या डोक्यावरून वहातो आहे. त्याचा जोर थोडा कमी झाला आहे.

समोरच्या बंधाऱ्यावरून तिकडे रायपूर-रंधामलीच्या आकाशाकडे पाहिल्यावर जरा उजळ वाटतं- तिकडे विजेचे दिवे आहेत.

निताई काही पावलं पुढे जाऊन म्हणतो, 'गजेन, उतरणार नाहीस? निताई पाण्यात पाय टाकतो, त्याच्या पायांना प्रवाहाची ओढ जावणते, जरा नरम पाणी, 'पुराचं पाणी शिरलं नाही अजून. नदीचं पाणी गरम आहे.'

निताईच्या मागे-मागे ते थोडं पुढं येतात, 'ओढ कशी आहे?' अमूल्य पाण्याला पायांचा स्पर्श करीत-करीत म्हणतो.

निताई गुडघाभर पाण्यात उतरून म्हणतो, 'सकाळीही असंच होतं,' पाण्यावर वाकून निताई पायांना लागलेली वाळू साफ करू लागतो. त्याला पाण्याचा वास येतो. त्याला जाणवतं- हा पुराच्या पाण्याचा वास नाहीय, रोजच्या पाण्याचा वास आहे. या ठिकाणी नदी पार करायला नाव लागते हे खरं, पण एका बाजूला बंधारा, आणि एका बाजूला माणसांच्या कामाचा गंध. रात्र आता पुराच्या दिशेने बरीच पुढे सरकलीय. आता, तास-दोन तासांत पहाडावरून आलेलं पुराचं पाणी थेट रमाकान्तच्या जोतापर्यंत चढेल. एवढंच कशाला, हा सगळा चरच पाण्याच्या तळाशी जाऊ शकतो. संपूर्ण? हा संपूर्ण चर?

नदीमधून निताई चराकडे तोंड वळवून पहातो. उजवीकडे तोंड वळवतो- दक्षिणेच्या वळणापर्यंत दिसतंय. डावीकडे तोंड वळवतो- फार दूरपर्यंत दिसत नाही. या बाजूला पाण्यात बरीच माती पुढं आलीय. पाण्यामधून निताई हाक मारतो, 'काय गजेन, पाण्यात उतरणार?'

'तू उतरला आहेस की!'

'मी तर इथंच उभा आहे, अमूल्य, गुरांना आणायला सांगतोस?'

'आतापर्यंत निघालीच असतील गुरं.'

'हे बघ, कुठून पार करशील त्यांना? बघ. अजूनही नदी जुनीच आहे-' निताई म्हणतो.

'असं?' गजेन विचारतो.

'हो. अजून नदी जुनीच आहे,' थोडं पाणी घेऊन, वाळू धुवून टाकण्यासाठी निताई ते छातीला-पोटाला लावतो, 'पुराचं पाणी अजून आलेलं नाही नदीत.'

निताई पाण्यात आणखी पुढे जातो. आता त्याला पुढे जाण्यासाठी निमित्त आहेच. गुरं निघाली आहेत. ओळखीच्या मार्गाने त्यांना पैलतिरावर नेता-येईल. पण मार्ग आधी ठरवलेला बरा. म्हणूनच निताईने गजेनलाही पाण्यात उतरायला सांगितलं होतं.

निताई चालत पात्राच्या अगदी मध्ये जातो. म्हणजे आता गुरांना सहज पार करता येईल. काही वेळानंतर त्याला तिथून काही वेळातच पुराचं पाणी आलेलं दिसेल, हा चर

बुडालेला दिसेल. 'अरे, इतक्या मशाली पेटवल्यात मिस्त्रीपाड्यामध्ये-' तो रावणला उद्देशून म्हणतो.

त्या मशालींवरून नजर वळवून निताई उत्तरेला पोहत जातो- पहाडावरून येणारा पूर याच दिशेने येणार. याआधीच्या जुन्या पाण्यातून पोहताना निताई हाक मारतो. 'गजेन, अमूल्य, या, पूर बघू कुठपर्यंत आलाय, या!'

गजेन आणि अमूल्य आपली धोतरं आणि लंगोट्या किनाऱ्यावर काढून ठेवून नदीत उड्या घेतात, पोहत-पोहत निताईकडे जाऊ लागतात.

रावणला मागच्या बाजूने गुरांच्या हंबरण्याचा आवाज येतो. ती याच दिशेने पळत येताहेत.

## अठ्ठ्याण्णव

# गुरांचं बांधाकडे निघणं

गुरं पलीकडे नेणं म्हणजेच पूर येणार हे मान्य करणं. गोठ्यातून गुरं बाहेर काढून ती वरच्या ठिकाणी नेणं म्हणजेच घर वाहून गेलं. गुरांना आधी वर नेलं म्हणजेच घर वाहून गेलं. गुरांना आधी वर नेलं म्हणजे नुकसान नाही; पूर आलाच, किंवा अगदी सामान्य पूर आला, तर त्यांना पुन्हा खाली आणता येईल असं तोंडाने कितीही म्हटलं, तरी एकदा गुरांना घराबाहेर काढलं, की समजावं, त्या घरात आता पुन्हा येता येणार नाही. एरवी गुरं आसपास चरतात, किंवा मैदानात चरायला जातात, ती वेगळी गोष्ट. गुरं परत कधी येणार हे तेव्हा ठाऊकच असतं. घरातलं सर्वात छोटं मूल जसं दिवसभर शेजारच्या इतर घरांमध्ये फिरत असलं, तरी जसं घर भरलेलंच रहातं, तसं. पण गोठा मोकळा, भकास करून गुरांच्या कळपाला वाडीवस्तीवरून, चरावरून, नदी पार करून एकदम पलीकडे उंच ठिकाणी नेणं, आणि त्यानंतर त्याच घरात माणसांनी राहाणं- हे अगदीच अशक्य. गोठे असे मोकळे, भकास झाल्यावर सगळ्या वाडीवस्तीवर जणू शोककळा पसरते.

आता अंदाजाप्रमाणे दोन-एक तासांमध्येच इथं पूर येणार आहे, त्यामुळे गुरांच्या कळपांबरोबर आरडत-ओरडत सारी पोरंसोरंही बाहेर पडतात. सगळ्या चरावरून रात्रीच्या या शेवटच्या प्रहरी गुरांच्या हंबरण्याचा समवेत स्वर ऐकू येऊ लागतो. कळपा-कळपांनी गुरं नदीच्या वाटेने धावत जाताहेत. गुरांबरोबर त्यांची वासरंही गुरांच्या अंगांना अंग घाशीत चालली आहेत, त्यांच्याबरोबर गांवातली मुलंही, हातात लाठ्या घेऊन धावताहेत, पण त्या लाठ्या जनांवरांच्या पाठीवर पडत नाहीत, कारण गुरं रांग न मोडता, सरळ नदीच्या दिशेने चालली आहेत.

गावातील हा रस्ता गुरांच्या आणि पोरासोरांच्याही ओळखीचा, पायाखालचा आहे. या रस्त्याने रोजच गुरं-माणंस ये-जा करतात. पळता-पळता एक वासरू आपल्या आईच्या, रात्रभर दुधाने भरून आलेल्या आचळांना तोंड लावतं, पण मागच्या गुरांच्या धक्क्याने आईला पुढे जावं लागतं. तिच्या आचळातून आधी बारीक धारेने; आणि नंतर थेंबाथेंबाने दूध मातीत पडत रहातं. वासरू खाली पडतं; पण गुरं त्याच्यावर पाय न देता, त्याच्या बाजूने पळत पुढे जातात. प्रफुल्ल पालची गाय म्हातारी झालीय, स्थूल झालीय. तिला आपल्या अंगाच्या भारामुळे पळता येत नाहीय, तोंडाला फेस आलाय. देडा गजेनची गाय दोनच दिवसांपूर्वी व्यालीय. तिच्या वासराला पळता येत नाही, त्यामुळे त्याला जगदीशच्या म्हशीच्या पाठीवर ठेवलंय. वासराला घेऊन म्हैस डुलत-डुलत वेगानं चाललीय. तिच्या धक्क्याने इतर गुरं बाजूला सरकतात. वासरू पाठीवर उभं राहू पहातं, पण म्हशीच्या वेगामुळे पुन्हा त्याची मान खाली आपटते. त्याची आई-गाय म्हशीच्या मागे-मागे धावतेय. वासराला तोंड मागच्या बाजूला करून बसवलंय. त्याची आई जीभ बाहेर काढून, मान पुढे ताणून त्याला चाटू पहाते, पण म्हशीची पाठ उंच असल्यामुळे तिची जीभ तितक्या वरपर्यंत पोचू शकत नाही. तिचं वासरू-चाटणं अद्याप पूर्ण व्हायचं आहे.

गुरं आता वस्तीबाहेर, शेतांच्या सीमेवर येतात. हा सुद्धा रस्ता नीट नाही. दोन्ही बाजूंना उंच गवत वाढलेलं, रस्त्याच्या दोन्ही बाजूंना जमीन बरीच उताराची, कुठं थोडी चढाची. घसरलं, तर पडायचंय! घसरू नये म्हणून गुरं छोटी-छोटी पावलं टाकतात. बरोबरची पोरंही दोन्ही बाजूंच्या शेतामंध्ये उतरली आहेत. रस्त्यावर तिथून काठ्या आपटीत 'हेऽ ई, हऽई, हेई!' आवाज करताहेत- गुरं घसरून पडू नयेत म्हणून. आता रस्त्याच्या बाजूंना घरं नाहीत. पण ही शेतजमीनही सर्वांच्या ओळखीची आहे. मातीचा आणि गवताचा हा वासही ओळखीचा आहे. पण आता ऊन्ह नाही, चरणं नाही, रवंथ करणं नाही, बसणं नाही, आता फक्त पळणं, पळणं!

### नव्याण्णव

# गुरांचं नदीच्या वाळवंटात व पाण्यात उतरणं

पाण्याचा असा एक वास असतो. गुरांना तो वास ओळखता येतो. पण आता त्यांना पाण्याचा कुठलाही वास आला नाही. वारा वेगाने वहात होता आणि पाऊसही पडत होता. डावीकडून येणाऱ्या वाऱ्या पावसाचे फटके गुरांच्या अंगांवर बसत होते. त्यांची तोंडं उजवीकडे वळलेली होती. गती कमी झालेली होती. गुरं नदीच्या जितक्या जवळ पोचत

होती, तितकं त्यांचं डावीकडचं अंग आणि तोंड पाण्याने भिजत होतं, नाकाला पाण्याचा वास येत नव्हता- जणू ती पाण्याच्या विरुद्ध दिशेने पळत होती.

शेतं संपतात. गुरांचे खूर आता नदीच्या वाळवंटात पडतात. आता इथं घसरण्याची पडण्याची भीती नाही. वाळवंटात आल्याबरोबर आधी रांगेत असलेली गुरं इस्ततः बिखरु पहातात, पण मुलं त्यांना काठ्यांनी मारून पुन्हा रांगेत आणतात. निताई, गजेन आणि अमूल्य वाळवंटाजवळच्या नदीच्या पाण्यात होते. रावण वाळवंटात बसलेला होता. गुरांचा कळप येताना दिसताच पाण्यातून निताई, गजेन, अमूल्य बाहेर येऊन पळायला सुरुवात करतात. पाण्यातून बाहेर आल्याबरोबर ते काठावर ठेवलेली आपली धोतरं-लंगोट्या झटकन घालतात. वाळू, भिजलेलं अंग, वारा यामुळे ते पुढे येऊ शकत नाहीत. निताई काहीतरी ओरडतो, पण त्याचे शब्द वाऱ्यात उडून जातात. अमूल्य अचानक मागे वळून पाण्याकडे जातो आणि पाण्यात उतरून पोहू लागतो. 'एऽगजेन!' म्हणून हाक मारण्यासाठी मागे पाहिल्यावर निताईला अमूल्य पुन्हा पाण्यात उतरलेला दिसतो. 'आता कशाला पाण्यात उतरलास?' या निताईच्या प्रश्नावर, आपण पैलतिरी जात आहोत असं अमूल्य खुणेने सांगतो. पाण्यात अद्याप पुराचं पाणी शिरलेलं नाही.

निताईला ते समजतं. अमूल्य बरोबरच करतोय. पैलतिरी कुणीतरी असणं आवश्यकच आहे. पण एकटा अमूल्य काय करू शकणार? तो गजेनला म्हणतो, 'जा, तू पण जा पैलतिरी- कुठून पार करता येतील गुरं ते बघून ये!'

गजेन यावर पाण्यात शिरतो, पण अमूल्यच्या दिशेने जात नाही. उथळ पाण्यात तो छपछप करीत चालत रहातो. तो पुढे गेल्यावर गुडघ्याइतकं पाणी लागतं. खाली घट्ट माती लागते. तिचा उतार कोणत्या दिशेला आहे, याचा गजेन अंदाज घेऊ पहातो, म्हणजे नीट चालता येईल. पण तो अंदाज घेताना गजेन पडतो, पडल्यावर पुन्हा उठत नाही. त्याचं डोकं पाण्याच्या तळाशी जातं- किमान पाण्याच्या तळाशी तरी वारा-पाऊस यांची झोडपणी नाही! डोकं लगेच पाण्यावर काढून, पाणी झटकून गजेन आसापास पहातो. अमूल्य समोरच्या किनाऱ्यावर पोचलाय, चालत-चालत या दिशेने येतोय. गुरं सध्या ज्या ठिकाणी आहेत, त्याच्या सरळ पश्चिमेच्या वाळवंटाच्या बाजूची एक जागा ठरवून गजेन पुन्हा पाण्यात डुबकी मारतो.

कळप नुकताच थांबलाय. त्यातला एक गोऱ्हा समोरच्या गुराच्या पाठीवर दोन पाय ठेवतो, आणि समोरचं जनावर पुढच्या वासरावर आदळतं. निताई लाठी घेऊन त्या गोऱ्ह्याकडे धावत जातो. ओरडतो- 'काही कळत नाही साल्यांनो! बैलोबा सगळे!'

निताई पुढे जाता, आणि नदीकडे पाठ करून, कळपाकडे तोंड करून उभा रहातो. तो उजवीकडे पहातो- नदीचा वरचा भाग अत्यंत दूरपर्यंत स्पष्ट दिसतोय, पण पलीकडच्या तीरावर अद्याप अंधारच आहे. अंधुकसा. सगळं आभाळ खाली झुकल्यासारखं वाटतंय.

आणखी पाऊस येणार, आणखी पूर येणार. निताई त्या येऊ घातलेल्या पावसाचा आणि पुराचा अंदाज घेण्यासाठी समोरच्या गुरांना विसरून फक्त आपली मान उजवीकडे वळवतो, आकाशाकडे वळवतो, आणि खाली घेतो.

निताई गुरांच्या कळपावरून पलीकडे पहातो- कळपामागे, शेतीच्या रस्त्यावर, गावच्या रस्त्यावर. निताईला वाटतं- आपण गाव पहाण्याची ही शेवटचीच वेघ का? पुन्हा हे गाव असंच दिसेल का? की ही सारी शेती, वाटा, घरं- पाण्याखाली जाणार? निताई तर या नदीला आपल्या जन्मापासून ओळखतोय.

निताई गुरांकडे पहातो. गुरं पलीकडे नेल्यावर मग माणसांना पैलतिरी न्यावं लागणार. पण तो तरी किती जणांना हाक मारणार? एवढ्यातच काही-काही लोक येऊन जमा होऊ लागलेले त्याला दिसतात. आपल्या गुरांपासून ते किती काळ दूर रहाणार?

निताई पहातो; गुरं पाय बदलताहेत. आता उशीर करता येणार नाही. तो समोरच्या गुराच्या गळ्यातली दोरी धरून, नदीच्या दिशेने जाताना थांबतो. गुराला सोडून देतो. मग ओरडून म्हणतो 'एऽ सालिश, म्हशींना घेऊन ये इथं.'

सालिश व बालिश वाट काढीत कळपात जातात. जिच्या पाठीवर वासरू आहे. त्या म्हशीला काठीने डिवचित डिवचित पुढे आणतात. त्याच वेळी समोरून निताई जिथेने टर्र्रर आवाज करतो आणि ओरडतो, 'हे ऽऽऽ, ये ना, ये, एऽऽ' वाऱ्याच्या झपाट्यामुळे तो आवाज बराचसा विस्कळित होतो, पण 'आपल्याला बोलावलं जातंय' इतकं म्हशीला कळण्याइतपत म्हशीपर्यंत पोचतो.

म्हैस खूप हळू पावलांनी चालते. तिच्या पाठीवर वासरू आहेच. मागून मागून वासराला चाटीत गायसुद्धा म्हशीमागे पुढे येते. त्या दोघीही निताईजवळ येऊन उभ्या रहातात. निताई म्हशीच्या गळ्यातली दोरी धरून त्यांना म्हणतो, 'जा, आस्ते आस्ते नदी पार करा. गडबड गोंधळ करू नका.' अद्याप नदीत पुराचं पाणी शिरलेलं नाहीय, पण गेल्या काही दिवसांत पडलेल्या पावसाने नदीच्या पाण्यालाही एक अपरिचित असा गंध लागला आहे. पाणी थंडसुद्धा आहे. थंड पाण्याला गुरं बुजू नयेत, यासाठी काळजी घ्यायला हवी.

निताई म्हशीला नदीच्या पाण्यात उतरवतो. तो तिच्या पुढे आहे, त्याच्या डाव्या हातात आहे म्हशीची दोरी, आणि उजव्या हातात आहे एक काठी. पाण्याच्या खोलीचा अंदाज घेण्यासाठी.

आपण खूप आस्ते-आस्ते, पाण्याचा अंदाज घेऊन पावलं टाकली पाहिजेत हे म्हशीलाही जणू समजतं. खोल पाणी आलं की म्हैस पोहत जाऊ शकेल. इथलं पाणी जरा अधिक थंड वाटतंय का? पुराचं पाणी नदीमध्ये घुसलंय की काय? म्हैस अचानक थांबते. 'आँऽऽऽ' आवाज करते. म्हशीला पाण्यात भीती वाटत नाही, उलट आरामच

वाटतो. म्हणून म्हशीसह हा कळप पार करणं अधिक सोयीचं आहे. 'हेऽ टर्र्र्र'- निताई आवाज करतो, पण म्हैस हलत नाही. निताई मागे जाऊन त्या वासराला पहातो. त्याने आपला एक पाय म्हशीच्या पाठीवरून बाहेर सोडलाय. म्हशीच्या मागेच ती गाय आहे. ती मागे असल्यानेच गडबड होतेय. निताई गायीच्या तोंडावर लाठी मारतो, 'साला, वासरू चाटतेस?'

गाय मान खाली करून तोंड वळवते. निताई वासराचा पाय नीट करतो आणि म्हैस पुढे जाऊ लागते, पण लगेच पुन्हा थांबते. निताई पुन्हा तोंडाने आवाज काढतो, आणि ती पुन्हा चालू लागते.

पण त्याच वेळी निताई लाठीसह पाण्यात पडतो. इथं पाणी खोल आहे, हे त्याच्या लक्षात येतं. लाठी फेकून देऊन हात मारताना तो प्रवाहाच्या वेगाने ढकलला जातो. 'पुराचं पाणी आलं रे, घुसलं रे नदीत!' पण एका गटांगळीनंतर तो स्वतःला सावरतो. ओरडत नाही. नाहीतर सगळे घाबरतील. आतापर्यंत निम्मा कळप पाण्यात उतरलाय. आता म्हैस खोल पाण्यात उतरेल. पुराचं पाणी प्रवाहात शिरलंय, पण फारसं वाढलेलं नाही. म्हैस खोल पाण्याच्या अगदी सीमेवर, गुडघाभर पाण्यात उभी आहे. पुढे प्रवाहाचं पाणी आहे, हे निताई कसं समजावून सांगणार तिला? हळूहळू पोहावं लागणार असा म्हैस विचार करतेय. गजेनला बोलवावं का? पण निर्णय न घेता आल्याने निताई म्हशीचा डावा पाय धरतो, जणू ती खुंटी आहे. म्हशीला त्यातून काहीतरी समजतं. ती 'आँऽऽऽ' करून निताईच्या हातासह आपला डावा पाय उचलते व खोल पाण्याच्या दिशेने पुढे जाते. त्या आविर्भावावरून निताईला कळतं, की पुढे प्रवाहाचं खोल पाणी आहे हे म्हशीला समजलंय. तो म्हशीच्या गळ्याखालून 'टर्र्र्र' असा आवाज काढतो. म्हैस आपली मान पुढे करते, उजवा पाय उचलते; समोरचे दोन पाय पाण्यातच थोडे वर करून पाण्यात पोहू लागते, त्यामुळे तिचे मागचे दोन पाय लांब होतात, पाठीची उंची कमी होते आणि पाण्यात तिच्या पाठीवरचं बदामी वासरू तरंगत-तरंगत जाऊ लागतं. निताई म्हशीच्या गळ्याभोवती हात टाकून तरंगू लागतो; नंतर हात काढून घेऊन तिच्या शेजारून पोहू लागतो, जिभेने आवाज काढतो 'टर्र्र्र'. . .

## शंभर

# गुरांच्या कळपाचं नदी पार करणं

पात्राच्या मधली खोली जी आहे ती फार रुंद नाही. म्हशीबरोबर पोहताना निताईच्या पक्कं लक्षात येतं, की पुराचं पाणी नदीच्या प्रवाहात घुसलं आहे. पुढची म्हैस

तराफ्यासारखी तरंगत पैलतिरी चाललेली पाहून बाकीची मागची गुरंही तशीच तरंगत चाललेली आहेत. पण, निताईला जसं आपल्या शरीराला झालेल्या पाण्याच्या स्पर्शामुळे पुराचं पाणी पात्रात घुसल्याचं समजलंय तसंच, किंबहुना त्यापेक्षाही अधिक तीव्रतेने, ते या गुरांना समजलंय. प्रवाहात शरीरं सोडल्याबरोबर, या पाण्याच रागरंग वेगळाच आहे हे त्यांना समजलंय, पण ते समजेपर्यंत मधला प्रवाह संपलाय. म्हशीला पायाखाली माती लागतेय, त्यामुळे ती उभी रहाते, पण पैलीतरी जाण्यासाठी पाऊल उचलीत नाही. निताई थोडा पुढे जाऊन पाण्यात उभा रहातो, पायाने त्याला समजतं, इथंही पुराचं पाणी येऊन पोचलंय. तो पहातो, गुरांच्या अंगाला स्पर्श करणारं प्रवाहाचं पाणी गिरक्या घेतंय, फेसाळतंय. गुरांच्या मधल्या अंतरांतून पाणी डावीकडून उजवीकडे फेसाळत वहातंय.

निताई पायाने वाळवंटाचा अंदाज घेत कळपापासून थोडा उत्तरेला सरकतो. तिथे जागा मिळते. तिथे थांबून तो 'या, या!' अशा हाका मारतो आणि जिभेने 'टर्रर' असा आवाज काढतो.

आधी म्हैस त्याच्याकडे मान वळवून पहाते, मग आस्ते-आस्ते उजवीकडे वळते. तिच्यामागून इतर गुरंही पावलं उचलतात. गुरं प्रवाहापलीकडे आल्यावर, पाणी आणखी वेगाने, आवाज करीत प्रवाहित होऊन वाहू लागतं इतका वेगवान प्रवाह इथे एरवी कधीच नसतो. प्रवाहाकडे पाहून निताई किती वेगाने इथं पाणी शिरलंय याचा अंदाज करतो. पूर आला आहे. निताई थोडा बेचैन होतो. म्हैसजवळ आल्यावर त्या बेचैनीतच तो तिच्या गळ्यातील दोरी हातात धरून प्रवाहाकडे पहातो. गुरांच्या अंगावर प्रवाह किती जोराने झेपावतोय याचाच जणू तो अंदाज घेतोय. म्हैस आपली मान हलवून जणू निताईला आठवण करून देते - आपण आता पैलतिरीच्या वाळवंटात गेलं पाहिजे. निताई दोन्ही हातांनी म्हशीच्या पाठीवरच्या वासराला धरून लगेच ओरडतो, 'एऽ गजेन, अमूल्य, चला, इकडे या!'

नरेश म्हणतो; 'गुरं वर घे ना तू, येतो आम्ही!' नरेश कधी एवढी वाट पार करून दक्षिणेकडून या किनाऱ्यावर आलाय? म्हणजे काय तो तिस्ता ब्रिजलाही पुराचा धक्का लागताना पाहून आलाय? निताई विचार करतो, पण विचारीत नाही.

म्हैस आस्ते समोरचा डावा पाय उचलते. नंतर थोड्यावेळाने उजवाही पाय वाळवंटावर ठेवते. नंतर, वासरू सावरण्यासाठी निताईला थोडा वेळ देऊन, आपलं प्रचंड शरीर एका झटक्यात वाळवंटावर आणून, मागचे दोन्ही पाय वेगाने पुढे घेत बोल्डर आणि पाणी यांच्यामधल्या अरुंद जागेत घेते.

प्रवाह पार करण्यापेक्षा किनाऱ्यावरून बांधावर येणं गुरांना अवघड वाटतं. बांधाची माती पावसाने वाहून जाऊ नये आणि बांध आणि नदी यांच्यामधलं वाळवंट नदीमुळे वाहून जाऊ नये म्हणून तिथे बोल्डर्स - मोठमोठे दगड - ठेवलेले आहेत. ते तारांच्या

जाळ्याने झाकलेले आहेत. बोल्डर आणि पाण्याची सीमा यांच्यामध्ये अत्यंत अरुंद अशी जमीन आहे. तीही बरीच वाहून गेलेली आहे. अनेक ठिकाणी बोल्डर्स अगदी पाण्यातच बुडालेले आहेत. इतक्या अरुंद जागेतून गुरांच्या कळपाला चालता येणार नाही. एरवीही या बोल्डर्सवर पाय देऊन गुरांना वर येता येणार नाही. त्यांची खुरं बोल्डरवरून घसरतील; तारांच्या जाळ्यात पाय अडकतील.

गजेन आणि नरेशने आधीच काठाशी दोन सपाट दगड पायऱ्यांसारखे ठेवले आहेत. त्यांच्यावरून येऊन बोल्डर्सच्या दोन रांगा पार केल्यावर एक बोल्डरहीन नाली आहे. नालीच्या वरच्या बाजूला पुन्हा बोल्डर्स आमि ताराचं जाळं. गजेन आणि नरेश म्हशीला त्या बाजूला घेऊन जातात. गजेन खाली उभा राहून म्हशीची दोरी धरतो, आणि कुणी म्हैस पाय घसरून पडत तर नाही ना, हे वरच्या बाजूने गजेन पहातो.

ती जागा इतकी अरुंद आहे, की एरवी पाहिल्यास तिच्यामधून गुरं जाऊ शकतील असं वाटतच नाही. पण गुरं एकमेकांच्या अंगाच्या अंग घाशीत तिथून जातात खरी, पण आपण पडणार नाही, याची काळजी घेण्यासाठी खूप हळू गतीने. त्यांच्या पोटांना बोल्डर्स घासतात. पाण्यामधून ओरडतो, 'एऽ नरेश, एक बोल्डर टाक इकडं, माती वाहून गेलीय.' नरेश पहातो, प्रफुल्ल पालची बुढी आणि भुरी म्हैस वर चढवायचा निताईचा प्रयत्न चाललाय. तो म्हशीच्या पुढे आहे, बालिश आणि सालिश तिच्या दोन बाजूंना आहेत आणि बलरामचा मुलगा मागे आहे. बाकीची गुरं पाण्यात उभी आहेत.

या बुढीला वर घेतलं तर एक पाऊलही या अरुंद जागेतून तिला पुढे येता येणार नाही. नरेश बोल्डरवरून खाली उतरून ओरडतो 'एऽ निताई, बुढीला राहू दे मागं, आधी बाकीची गुरं वरती सोड!'

निताई नरेशला काहीच उत्तर देत नाही. बालिश सालिश म्हणतो, 'न्या, न्या तिला वर!' पाण्यात उभे राहून दोघेही दोन बाजूंनी तिला ओढतात. बुढीला बहुधा कळतं, ती सालिशच्या दिशेने दोन पावलं पुढं जाते. निताई बलरामच्या मुलाला म्हणतो, 'आण, बाकीच्या गुरांना आण! बलरामचा मुलगा मागच्या गुरांना पुढं सरकवतो. निताई पहातो, गुरांच्या पायामुळे वाळू इतकी वाहून गेलीय की कुठलंही जनावर आता पाण्यात पडू शकेल. तो बालिशला म्हणतो, 'पुढं, आणखी पुढं!' सालिश दोरी धरून ओढता-ओढता खोल पाण्यात पडतो. बालिश मोठ्या आवाजात ओरडतो, 'ओऽ काका, सालिश पडला, आता कुठलं पुढं?'

निताई 'थांब!' म्हणतो, पण तिकडं वळूनही पहात नाही. बुढीसुद्धा थांबते. सालिश उठून येतो. निताईला दिसतं, वाळवंटातली गुरं पुढं येत नाहीत, थांबलेलीच आहेत. आता एका गुराला उभं रहाण्याइतकीही जागा वर राहिलेली नाही.

निताई ओरडतो, 'तू काय इथं गांजा पीत बसला आहेस का रे; नरेशा?

नरेश मान मागे वळवून, निताईला हाताने थांबायला सांगतो. नरेश मान उंचावून पहातो पाठीवर वासरू घेऊन म्हशीला ती अरुंद नाली पार करता येत नाहीय. 'अरे गजेन, मूर्ख आहेस का रे तू?' म्हणत नरेश एका उडीत बोल्डरवर चढतो व त्या दिशेला पळत सुटतो, 'साला, वासराला उतरवायचं बोल्डरवर!'

नरेशंच ओरडणं ऐकून गजेन मागे वळून पहात उभा होता. नरेश गेल्याबरोबर मातीवर उतरून आपल्या लांब हाताने वासराला म्हशीच्या पाठीच्या कडेशी ओढून आणतो आणि गजेनला म्हणतो, 'त्याचं डोकं धर!'

'अरे, माझा हात पोचत नाही रे!'

'मूर्ख साला!' नरेश हसतो, 'ओढ, बोल्डरजवळ ओढ, आण ओढून!'

गजेन म्हशीच्या गळ्यातली दोरी धरून ओढत तिला बोल्डरजवळ घेऊन येतो. मागून वासराची आई-गाय 'हंबाऽ' करून हंबरते. नरेश म्हशीच्या पाठीवरून 'वन टू-थ्री' म्हणून एका झटक्यात वासराला उतरवतो व हळूच बोल्डरवर आणून खाली ठेवतो. मागून वासराची आई हंबरते इतक्या वेळाने वासरू तिच्या जिभेच्या टप्प्यात आलंय. गजेन म्हशीची दोरी धरून, नाली पार करून बांधावर चढतो. नरेश निताईकडे धावतो.

आता जगदीशची म्हैस, पाठीवरचं ओझं उतरल्याने नालीच्या कडेकडेने आरामात चालू लागली. पुढे तिच्या गळ्यातली दोरी धरून गजेन.

गजेन तिच्या गळ्यातली दोरी सोडूही शकतो. पण सोडीत नाही आता वाट जरा रुंद झाली आहे. चढ तर आहेच. कुणी गाय, म्हैस किंवा वासरू इथून खाली खड्ड्यात पडलं, तर त्याला वर काढणं फार मुश्किल!

गजेन म्हशीबरोबर अर्धी वाट चढून आल्यावर मागे पहातो. गुरांचा कळप संथ गतीने मागे-मागे येतोय. पण त्यांच्या अंगावरून इतकं पाणी ठिबकतंय की त्याने सारा चढ भिजलाय. निसरडा झालाय. अरे बापरे, आता घसरून एखादं जनावर पडणार खड्ड्यात!' गजेन म्हशीला थांबवतो, नदीकडे तोंड करून उभा रहातो. कळपातली काही गुरं - वासरं अद्याप नदीत आहेत. ही संपूर्ण रांग हळू-हळू नदीच्या वाळूत पुढे येतेय.

'एऽ निताई!' गजेन ओरडतो, पण वाऱ्यामुळे ही हाक मागेच उडून जाते. म्हशीला थांबवून त्याला सांगून यावं की काय? 'साला अमूल्य कुठं गेला?' गजेन इकडं-तिकडं पहातो. बालिश-सालिश, बलरामचा मुलगा आणि आणखी तीन चार मुलं गुरांना पात्रातून वर चढवताहेत. दोघेजण डोक्यावर घासाची पोती घेऊन बांधावर चढताहेत. ही आश्विनी राय आणि अमूल्यची माणसं. गजेन ओरडतो. 'एऽ भाऊ, इकडं ये की!' त्या लोकांना गजेनचे शब्द ऐकू येत नाहीत, पण चेहरा दिसतो. ते गजेनच्या दिशेने येऊ लागतात. बांधाच्या चढावरून आडवं चालणं त्यांना अवघडच वाटतंय.

पण म्हैस थांबल्याने गुरांची रांगही थांबलीय. त्यामुळे आणखी गुरं नदीच्या वाळूत येण्यासाठी जागा न राहिल्याने नरेश वळून पहातो, निताईचेही केस नदीच्या पात्रातून

वर येतात. लोक पुढे पाहून समजून घेण्याचा प्रयत्न करतात. गजेन खुणेने त्यांना थोडी वाट पहायला सांगतो दोघेजण पुढे येतात. नरेशचं बोलणं वाऱ्याबरोबर ऐकू येतं, 'एऽ गजेन, तिथं काय मुतायसाठी उभा राहिलायस का रे?'

गजेन या प्रश्नाचं उत्तर न देता म्हणतो, 'इथं जरा निसरडं झालंय. गुरं जरा थांबवा, जा ना!' तिथून निताई-नरेश यांनी उताराकडे पाहिल्याबरोबर अडचण त्यांच्या लक्षात येत. ते दोघेही पुन्हा वेगाने खाली उतरतात. आषाढू हा आश्विनी रायचा माणूस खाली उतरतो, पण अमूल्यचा माणूस पुन्हा वर येतो. तो बांधावर चढून, डोक्यावरचं ओझं खाली टाकून पुन्हा नदीच्या दिशेने पळतो.

आषाढूने नरेशला सांगितल्याबरोबर नरेश हाताने 'ठीक आहे, आता गजेनने म्हशीला घेऊन पुढे जावं' अशी खूण करतो. आषाढू आणि अमूल्यचा माणूस पुन्हा गुरांच्या रांगेकडे येतो. आषाढू अमूल्यच्या माणसाला काहीतरी म्हणतो. त्यावर तो लगेच गुराच्या पायांवरचं पाणी निपटून काढायला सुरुवात करतो आणि आषाढू एकेका गुराला वर सोडू लागतो. वरून गजेनचं 'हा-हा' हसू ऐकू आल्यावर तो वर पहातो. गुरांनी वरती पडलेला घास खायला सुरुवात केलीय. गजेन त्याला खुणेने बांधावर जायला सांगतो. स्वत: म्हशीची दोरी हातात घेऊन पुढे जाऊ लागतो.

बांधावरून खुंटी ठोकण्याचा क्षीण आवाज येतोय. आता तर गुरं-वासरं बांधावर आली आहेत. आता प्रत्येकजण आपापली गुरं वेगळी करून घेईल, वेगवेगळ्या खुंट्यांना बांधील. ज्यांची अनेक गुरं आहेत, वेगवेगळ्या कामांसाठीची वेगवेगळी गुरं आहेत, ते त्या गुरांचे तसे गट करून त्यांना बांधतील. अमूल्य आणि आश्विनी राय यांनी यासाठी माणसं पाठ गली आहेत. जगदीश बारुईने पाठवलेली नाहीत. आपल्या गुरांकडं लक्ष देण्यासाठी माणस.ची करतरता भासणार नाही हे त्याला ठाऊक आहे. इथेही चरावरच्या लोकांचे वस्तीप्रमाणे भाग पडलेले दिसतील. आधी आली गुरं. नंतर येतंय गुरांचं खाणं आणि त्यांच्याकडे देणारी माणसं ज्यांची माणसं आहेत त्यांची माणसं, ज्यांची पोरं आहेत त्यांची पोरं.

आता गुरांचे गट करून त्यांना बांधण्यासाठी बांधावर खुंट्या ठोकण्याचं काम सुरू झालंय. तो आवाज पुराच्या वाऱ्यावर उडून जातोय. गजेनने धरलेल्या जगदीशच्या म्हशीची वाकडी शिंगं जणू आकाशातल्या धूसर मेघांमध्ये शिरतात.

## एकशे एक

# चर नंबर दोन

निताईच्या चरापासून आठ मैलांवर आणि जलपाइगुडी शहरापासून बारा मैलांवर हा दोन नंबरचा चर आहे. खरं तर हे पात्र वर्षातले आठ महिने कोरडंच असतं. तिस्ता

जर दुसरीकडे वहात गेली, तर उरलेले चार महिनेसुद्धा ते कोरडंच राहू शकतं. असं लागोपाठ तीन वर्ष झाल्यानेच इथे नांगर आले, माणसं आली; त्यानंतर घरं उभी राहिली, केळीची झाडं फोफावली, आणि सुपारीच्या झाडांचीही एका रांग सरसर करीत वाढली. पण, त्यानंतर पुन्हा एकदा तिस्ता आपली बाकीची पात्रं सोडून या बाजूच्या पात्रात शिरली. असं होता होता गेल्या दहा एक वर्षांत आता या चराच्या खालच्या बाजू वर आल्या आहेत, तर काही जागा बुडून गेल्या आहेत. थंडीत संपूर्ण जमिनीवर रब्बीची शेती होते. गहू सुद्धा अलीकडं चांगला होतो. असंच चांगलं चाललं, तर सगळे गव्हाचीच शेती करतील.

जमिनीच्या पातळीच्या हिशेबाने हा चर मुळात तिस्तेच्याही खाली आहे. पण तिस्तेचं मुख्य पात्र आणि हा दोन नंबरचा चर यांच्यामध्ये एक मोठं मैदान आहे. त्यावर अगदी पक्की घरंसुद्धा आहेत. त्यामुळेच इथे शेती करता येते. पहाडावरच्या पावसाने जर खाली पूर आला, तर या पात्रातूनही तिस्तेचं पाणी वहातं. पूर येतो.

नदीची जमीन शेतीखाली येते, तेव्हा सोळा आण्यांवर अठरा आणे फायदा होतो. कारण, या जमिनीचा कुणी मालक नसतो. जेव्हा जमीन भिजलेलीच असते, पाय ठेवल्याबरोबरच दबते, तिच्यावर मचाणासाठी बाबूंही रोवता येत नाहीत, जेव्हा जे त्या जमिनीवर प्रथम जातात त्यांच्या डोळ्यांचा आणि मनाचा हिशेब अचूक असावा लागतो.

चराच्या जमिनीचा कुणी मालक नसल्याने जो प्रथम येतो, त्याच्याच मालकीची ही जमीन होते. जितकी जमीन तो ताब्यात घेईल, तेवढी त्याची. मंगलघाट आणि कचुवा यांच्या मध्ये आहे चर नंबर दोन. आता मंगलघाटपर्यंत तिस्तेकाठी बांध घातला आहे. पुराखेरीज या बांधावर कुणी येत नाही. पूर आला, तर इथेच कँप उभारला जातो.

## एकशे दोन

# पुराआधी अंथरुण पसरणे

बुधवारपासून पाणी येतंय. पण इथं किमान त्या दिवशी पाऊस नव्हता. त्यामुळे वाटलं, जसं आलं, तसंच ते पाणी निघून जाईल. पण आज शनिवार, कालचा शुक्रवार, परवाचा गुरुवार- तेव्हापासून इथे सोसाट्याचा वारा आणि पाऊस सुरू झालाय. गुरुवारी सकाळी दहा-अकराच्या सुमाराला पाऊस थोडा थांबलाही होता. रस्ते वाळले होते. ऊन पडलं नाही, पण ढगांत फारसं पाणी नव्हतं. त्यामुळे उन्हाचा प्रकाश सगळीकडे पसरला दोन नंबर चराच्या नदीचं पाणी थोडंसं वाढलंही होत. एरवी वाढतं तसं, अशा मोठ्या वाऱ्यामुळे.

पण गुरुवार संध्याकाळपासून वारा व पाऊस दुप्पट वाढला. गुरुवारी रात्री प्रथम

दहाला, त्यानंतर शुक्रवारी सकाळपासून रेडिओवर 'पिवळ्या' सिग्नलची बातमी वारंवार येऊ लागली. नदीतल्या चरावर किंवा काठाशी रहाणाऱ्यांना 'सुरक्षित स्थळी स्थलांतर' करण्याचा इशारा वारंवार देण्यात आला. सिक्किमहून मोठ्या प्रस्तरभंगाची बातमी आली, पण सविस्तर विवरण मिळालं नाही. हेलिकॉप्टर आणि सेनादलाचा उल्लेख रेडिओवर शुक्रवार रात्री दहापूर्वी झाला नाही, म्हणजेच कुठेही तोपर्यंत पूर आलेला नव्हता.

पण शुक्रवारी रात्री दहालाच सांगण्यात आलं, की सिक्किममधून काही बातम्या आल्या आहेत, काही ठिकाणी प्रस्तरभंग झाल्याने नदीचं पात्र रुद्ध होऊन कृत्रिम हौद (ऱ्हद) तयार झाले आहेत. है हौद भरून वाहू लागल्यास नदीच्या 'निम्म भागात' 'आकस्मिक' व 'प्रबल' पुराची शक्यता आहे. जलपाइगुडी आणि कुचबिहारच्या 'जिल्हा प्रशासनाने' 'सावधगिरीचा उपाय म्हणून' व्यवस्था करून सर्वत्र पिवळे संकेत दिले आहेत. नदीच्या चरावर व बांधाजवळ रहाणाऱ्यांना सुरक्षित स्थानी स्थलांतर करण्याचे निर्देश देण्यात आले आहेत. पाऊस तर होताच, पण वारा इतक्या जोरात वहात होता, की तो जमिनीवर पडू शकत नव्हता- पावसाच्या धारा जमिनीला समांतर जात होत्या.

त्यामुळे शुक्रवारची रात्र जवळजवळ आंधळ्यासारखीच काढावी लागली. शनिवारचीही केवळ कालचक्रानुसार पहाट होते, म्हणून झाली म्हणायची. राखी रगाचं आभाळ नदीवर झुकलंय आणि नदीचं पाणी खूपच वर चढलंय. काल रात्रीपेक्षा सुमारे दीडपट पाणी वाढलंय. वाऱ्याचा जोर असा, की वाटतं. जिथं प्रस्तरभंग होतात, तिथे आणखी प्रस्तरभंग होणार. पण त्यामुळे ठिकठिकाणी पहाडांमध्ये जे नवीन ऱ्हद - जलाशय - तयार होतात, ते एकाच वेळी फुटले, तर बांधावरच्या माणसांना थेट मंडलघाट शाळेत आश्रयाला जावं लागेल. त्या जलाशयांतलं पाणी एकाच वेळी आलं नाही, तर इथं पूर येणार नाही.

पहाता-पहाता बांधावर काही-काही लोक यायला सुरुवात झाली.

सर्वांत आधी येतो अब्दुल. या दोन नंबरच्या बांधावर.

अब्दुलकडं पाहून वाटतं, तो जणू भंडाऱ्याचं जेवण जेवायला आलाय. आकाशातले ढग, पाऊस, वारा याचं त्याला जणू काहीच सोयरसुतक नाही. त्याच्या हातांत एक बिछान्याची घडी, एक ॲल्युमिनियमचा मग आणि एक ॲल्युमिनियमची हंडी आहे. तो बसण्यासाठी आधी जागा निवडतो, आणि बिछान्याची घडी उघडून तिथं पसरतो. त्याचा बिछाना म्हणजे पूर्वी अशाच एखाद्या पुराच्या वेळी 'रिलीफ' म्हणून मिळालेलं कांबळं आहे. बांधावरचे लोक अब्दुलला पाहतात. त्यातला एकजण अब्दुलला म्हणतो, 'अब्दुल, आता झोपून घे, रात्री पूर आल्यावर तर उठावं लागणार!'

अब्दुल यावर काही बोलत नाही, एवढंच काय, बोलणाराकडं पहातही नाही. अंथरूण पसरून झाल्यावर तो उभा रहातो. त्याने घातलीय एक खाकी पँट, तिच्यात

खोचलेला शर्ट, शर्टवर स्वेटर. सगळ्यांच्या आपणाकडे पहाण्याची त्याला चांगलीच सवय झालेली आहे.

अब्दुल पुन्हा त्या बिछान्याची वळकटी करतो, ती दोरीने बांधतो, आणि झाडाच्या एका फांदीला टांगतो. बंडल थोडं झुलतं. ते झुलणं थांबण्याआधीच अब्दुल 'मग' आपल्या डेगचीत टाकून ती झाडाच्या ढोलीत ठेवतो. आपली लाठीही हंडीसमोर ठेवून अब्दुल अशा आविर्भावात हातावर हात घासतो, की जणू त्याचं काम संपलंय.

## एकशे तीन

# जीपगाडी येते

अब्दुल या भागातला, सगळ्यांच्या ओळखीचा वेडा. किंवा कदाचित वेडा नाहीसुद्धा. तसा काही वेडसरपणा त्याच्यात नाही. त्याचा वेश होमगार्डासारखा असतो, कारण तो नियमितपणे, महिन्यातून एकदातरी, बेरुबाडीच्या बॉर्डर कँपमध्ये जातो. तिथे सलग सात ते पंधरा दिवस रहातो. तिथे गेल्यावर तिथल्या मळ्यात काम करतो, व्हरांड्यातच एका खांबाला त्याचा बिछाना आणि हंडी अडकवलेली असते. त्याला कुणीही हरकत घेत नाही. मग कधीतरी तो कँप सोडून निघतो. कधी, तेही आधी सांगता येत नाही. तो विहिरीवर जाऊन हातपाय धुतो, आणि काठीला बिछाना आणि हंडी बांधून, काठी खांद्यावर घेऊन चालू लागतो. जणू मळ्यातलं काम करून देण्यासाठीच तो आला होता, किंवा इथं तो रोजच काम करतो, आता संध्याकाळी घरी चाललाय, अशा आविर्भावात.

असंच फिरत फिरत तो मंगलघाटच्या चौकात, घुघुडांगाच्या बाजारात किंवा कादोबाडीच्या बाजारात जातो. पण कधीही कुणाच्या घरात किंवा वस्तीत जात नाही. अब्दुलचा गंध इथल्या कुत्र्यांचाही इतक्या ओळखीचा आहे, की तो कुठही गेला - शिरला, तरी ती भुंकत नाहीत, फक्त त्याला हुंगून जातात. तो जिथे जातो, तिथं त्याची खाण्याची व्यवस्था होते खरी, पण तिथं तो दिवसाभर इतकं काम करतो, की त्याने त्याची मजुरी घेतली असती, तर त्याचं चांगलंच उत्पन्न त्याला मिळालं असतं. पण पेरणी किंवा कापणीच्या दिवसात अब्दुल कुणाच्याही शेतात कधीच काम करीत नाही. असं वाटतं, त्याला खूप माणसांमध्ये असणंच आवडतं, एकट्या-दुकट्या किंवा कमी माणसांमध्ये नव्हे : म्हणूनच तो बाजारात, चौकात, कँपमध्ये जातो; कुणाच्याही घरात किंवा वस्तीवर जात नाही.

अब्दुल बांधावर उभा राहून, कमरेवर हात ठेवून, नदीकडे पहातो. तिस्तेला पूर

येणार, चरावरची सगळी माणसं बांधावर चढून येणार, इथं कँम्प उभा रहाणार, साधू-संन्यासी आणि ऑफिसरलोक येणार - जाणार - आगामी काही दिवसांत अब्दुलसाठी इथं खूपच काम आहे. झाडाच्या फांदीवर आपला बिछाना - टांगून, ढोलीत आपली हंडी ठेवून तो या कामासाठी तयार झालाय.

चौपत्तीच्या बाजूने एक आवाज येतो आणि बांधावरची गर्दी चौपत्तीच्या दिशेने धावते. मुलांच्या तोंडून आरोळ्या उठतात, 'आली, आली, जीपगाडी आली!' अब्दुल जवळजवळ एकटाच उरतो. त्याच्याशिवाय उरलेला दुसरा माणूस म्हणजे या इलाख्यातला सगळ्यात मोठा जोरदार महेश्वर राय. त्याच्या पंचवीस-तीस गाईम्हशी दोन नंबरच्या चरावर असतात. तो त्यांची अवस्था पहायला आलाय.

चौपत्तीच्या दिशेने पळत गेलेली गर्दी आता चुपचाप चालत-चालत परत येते- मोईनुद्दीन डीलर, गमबूट घातलेला, दारोगासारखा दिसणारा एकजण, आणि मागे-मागे एक ऑफिसर. हे तिघेजण पुढे होते, मागच्या गर्दीतही शहरातून आलेले आणखी दोनेकजण होते. मोईनुद्दिन डीलरने धोतर-झब्बा घातलेला. तो या सगळ्यांमध्ये उंच, आणि ऑफिसर सर्वांमध्ये बुटका. ते सारेजण अब्दुल उभा होता त्या ठिकाणी येऊन उभे रहातात- कारण अब्दुल तिथं एकटाच उभा असलेला पाहून हीच उभं रहाण्याची जागा असं ऑफिसरला वाटतं. अब्दुलची खाकी पँट पाहून तो सरकारी काम करीत असावा असं त्याला वाटणं शक्य आहे. पण इतके सगळे लोक जवळ येऊनही अब्दुल फक्त एकदाच त्यांच्याकडे पाहून पुन्हा नदीकडे नजर वळवतो - हाच बहुधा त्याचा वेडसरपणा.

मोईनुद्दीन डीलर महेश्वर जोतदाराला हाक मारतो, 'अहो महेश्वर बाबू, इकडे या!' महेश्वर पुढे येतो, गर्दी त्याला वाट करून देते. तो ऑफिसरजवळ येऊन उभा रहातो.

'हे डी. सी. साहेब आलेयत, इथली परिस्थिती कशी आहे असं विचारताहेत,' डीलर म्हणतो.

महेश्वर नमस्कार करून, दोन हात दोन्ही बाजूंना पसरून म्हणतो, 'परिस्थिती तर आपण पहातच आहात!'

'या चरावर रहाणारे सगळे इथं आलेयत ना?' डेप्युटी कमिशनर विचारतो.

'आता कोण येणार आणखी? गुरं सगळी आली आहेत इथं!' महेश्वर त्याच सुरात म्हणतो.

'म्हणजे? रेडिओवर इतक्या वेळा अनाउन्समेंट देऊनही आपण लोकांना हलवलं नाही? आता नंतर कॅज्युअल्टी झाल्या तर त्याची जबाबदारी कोण घेणार? इथल्या पंचायतीचे लोक नाहीत का?' डी.सी. मान वळवून गर्दीला विचारतात.

'पंचायत आणखी काय करणार? हे मास्टर आहेत पहा, मेंबर!' महेश्वर म्हणतो.

'कोण आहेत मेंबर?' डेप्युटी कमिशनर विचारतो.

'मास्टर, मास्टर' कुजबूज होते. डी.सी. वळून पहातात. लुंगी - बनियन या वेशातला एक तरुण नमस्कार करून पुढे येतो.

'काय? रेडिओवर इतक्या वेळा घोषणा ऐकून सुद्धा आपण चरावरच्या लोकांना हलवण्याची व्यवस्था केली नाहीत?' डी.सी. जरा जोरातच बोलतात, पण ते संतापाने, की वाऱ्यामुळे त्यांना आवाज चढवावा लागतो हे समजत नाही.

मास्टर मऊ आवाजात म्हणतो, 'सर, आम्हाला वाटलं पाणी उतरून जाईल, म्हणून आम्ही काही केलं नाही.'

डी.सी. ना अनुभवावरून समजतं, की हा मास्टर पंचायतीचा सदस्य असेल, पण इथला नेता नाही. नेता असता तर जीपगाडीपासून त्यांच्याबरोबर आला असता. पण पंचायतीच्या सहाय्याशिवाय काही करणंही योग्य होणार नाही. आता डी.सी. नदीकडे पाहून हळू आवाजात हाक मारतात, 'सान्याल!' सान्याल हे डिस्ट्रिक्ट पंचायत ऑफिसर.

सान्याल पुढे येऊन म्हणतात, 'येस, सर!'

'इथल्या अव्हाइलेबल पंचायत मेंबर्सना पंचायत-ऑफिसमध्ये भेटा, मी येतो. आणि त्याच्याआधी नाव पाठवा, आत्ताच!' शेवटचं वाक्य डी.सी. मोबाईल सिव्हिल इमर्जन्सीच्या ऑफिसरला उद्देशून म्हणतात.

सान्याल आणि मोबाईल सिव्हिल इमर्जन्सी ऑफिसर बांधावरून चौपत्तीच्या दिशेने जातात. त्यांच्याबरोबर गर्दीतले अनेकजण तिकडे जातात. डी.सी. उरलेल्या गर्दीबरोबर थांबतो. त्या गर्दीमध्ये असूनही अब्दुल जणू गर्दीबाहेर असतो. तो आधीच्या जागेपासून पाऊलभरही सरकलेला नाही. त्याच्या आसपासच्या गर्दीतल्या सर्वांचे चेहरे डी.सी. च्या दिशेने वळलेले. डी. सी. च्या मागे असलेलेही डी.सी कडेच पहाताहेत. अब्दुलनेही त्यांच्याकडं पहाणंच योग्य.

## एकशे चार

# पुराची 'घोषणा'- झाली की झाली नाही?

आता अब्दुलच्या अशा उभं रहाण्याचा नक्कीच काहीतरी अर्थ आहे, कारण डी.सी. सुद्धा नदीकडेच पहात होते. पाण्याचा रंग अधिकाधिक गढूळ होत होता, वेग अधिकाधिक वाढत होता. वाटत होतं, कुठंतरी नक्कीच काहीतरी झालंय किंवा होणार आहे.

'तर मग आपण चला सर, इथं बसून चर्चा होऊ द्या'- मोइनुद्दीन डीलर, डी.सी. च्या कानात म्हणतो.

'तिथं जायचं असेल तेव्हा जाईन. आपण एक काम करा- इथं पोहे आणि गूळ

मिळेल का?'

'इथं मिळणार नाही सर, घुघुडांगाला रिक्षा पाठवू?'

'हो, लगेच पाठवा.'

'बरंय सर, 'म्हणून डीलर गर्दीबाहेर गेल्याबरोबर डी.सी. म्हणाले, 'आणि हे पहा, रिक्षावाल्याशी भाड्यावरून हुज्जत घालू नका. उशीर होईल. त्याला जी रक्कम पाहिजे असेल ती द्या आणि पाठवा.'

मोइनुद्दिन मागे वळून, थांबवू विचारतो, 'सर, म्हणजे कॅम्प आजपासूनच सुरू होणार का?'

'नाही नाही, कॅम्प नाही. पण लोक चरावरून इथं येतील, सगळ्यांनाच काही इथं स्वैपाक करता येणार नाही. त्यांच्यासाठी स्टॉक करा. वेदर फोरकास्ट खराब आहे. पहाडावर भयानक पाऊस चाललाय. पाणी आणखी वाढणार.'

'आणखी वाढणार सर?' महेश्वरच्या प्रश्नात जणू काहीच बेचैनी नाही.

'वाढणार नाही कसं? पहाडावर झड लागलीय, खडक कोसळू लागलेत. आपणाकडं तर आजकाल इतके रेडिओ आहेत. गेले तीन दिवस ऐकले नाहीत का?'

'ऐकलेत सर!', महेश्वर कबूल करतो.

'ऐकलेत तर मग लोकांना का हलवलं नाहीत?'

'रेडिओवरच्या बातम्यांवर नेहमीच विश्वास ठेवता येत नाही, म्हणून सर.'

'सर,' सिव्हिल मोबाइल इमर्जन्सीचा ऑफिसर येऊन मागून म्हणतो, 'इथं एक नाव मिळाली सर.'

'एका नावेने काय होणार?' डी.सी. विचारतात. नंतर म्हणतात, 'इथं नावा आहेत का? त्या लगेच ताब्यात घेणं चांगलं, नाहीतर गरजेच्या वेळी कुठं जाणार?'

ऑफिसर महेश्वरकडे बोट दाखवून म्हणतो, 'त्यांची एक नाव आहे सर, पण ते देणार नाहीत.'

महेश्वर गुपचुप उभा रहातो. डी.सी. एकदा त्याच्याकडे आणि एकदा ऑफिसरकडे पाहून म्हणतात, 'ते तर तेव्हापासून इथंच उभे आहेत. नाव देणार नाही असं म्हणाले कधी तुम्हाला?'

'सर, नाव तर राइस-मिलसमोर आहे. तिकडूनच इकडे येणार. त्यांची माणसं आहेत. ती म्हणाली, मालकांनी नाव कुणालाही द्यायला मनाई केलीय.' डी.सी. थोडं समजावून घेतात, नंतर म्हणतात, 'काय, आपली नौका देणार नाही का?'

'नाही सर.'

डी.सी. ना थोडं आश्चर्य वाटतं, पण रागावल्यास नुकसान आहे हे त्यांना अनुभवावरून समजतं. यांची नाव आहे, तर पंचायतीचे लोकच ती नाव घेतील.

'हे काय, लोकांना रेस्क्यू करायला नको?'

'माझ्या गुरा-माणसांनाही रेस्क्यू केलं पाहिजे सर. आपण मिलिटरी आणा सर.'

डी.सी. हसण्याची संधी घेऊन म्हणतात, 'अच्छा, एक काम करा. जी नाव मिळालीय ती लगेच चराच्या दिशेने सोडून द्या. इथल्या कुणाला तरी बरोबर घ्या.' ऑफिसर निघून जातो.

अब्दुल बांधावरून उतरून पाण्याच्या काठाशी जातो. त्याच्याकडे बोट दाखवून डी.सी. विचारतात, 'तो जाणार की काय?' गर्दीतून हशा उठतो. महेश्वर हसून म्हणतो, 'वेडा-'

'मग त्याला कशाला जाऊ देता?'

'नाही, नाही, तो खूप चांगलं काम करील सर!'

पुन्हा त्यांना वाट पहावी लागते. बऱ्याच वेळानंतर दिसतं, एक नाव त्यांच्या डावीकडून येऊन, एखाद्या ढलप्यासारखी दक्षिणेकडे वहात चाललीय- पण पाचजण लोक लग्गी लावून नावेला उलट्या बाजूला ढकलातहेत. अब्दुल आपल्या कपड्यांसहित पाण्यात उडी घेतो आणि प्रवाहाच्या ओढीमुळे लगेच नावेजवळ पोहोचतो.

डी.सी. पंचायतीच्या मीटिंगसाठी मागे वळतात. 'पहिली रेस्क्यूबोट स्टार्ट केली' एवढं तरी ते आता म्हणू शकतील.

डी.सी. च्या मागे-मागे मोबाइल सिव्हिल इमर्जन्सी ऑफिसरही गर्दीबाहेर येतो. आतापर्यंत त्यांच्याभोवतीची गर्दी निघून गेलीय. काही-काहींना डी.सी. नीच कामासाठी पाठवलंय. बाकीचे नदीकाठी उभे राहून नावेची वाट पहाताहेत.

दोन दुकांनाच्या मधून ते चौपत्तीवर येतात. त्यांच्या जीपगाड्या उलट्या दिशेला उभ्या केलेल्या आहेत. त्यांना पाहून ड्रायव्हर थोडे पुढे येतात, पण ड्रायव्हर त्यांच्यापर्यंत पोचण्याआधीच दोन्हीकडच्या दुकानांमधून अनेकजण बाहेर येतात. लुंगी घातलेला आणि अंगावर आसामी सिल्कची चादर पांघरलेला एकजण पुढे येऊन, नमस्कार करून म्हणतो. 'या सर, थोडं बसून जा.'

'नाही, इथं काशासाठी बसायचं? जरा पंचायतीत जाऊन पहातो,' असं म्हटलं, तर डी.सी. मानेमागे हात घेऊन जरा थांबतात- जणू त्यांना काहीतरी सांगायचंच आहे.

'आपण स्वतः आलात सर'- तो माणूस म्हणतो.

'न येऊन चालणार कसं?' डी.सी. हसून म्हणतात, 'तुम्हाला कितीही नोटिसा द्या, रेडिओवरून कितीही वेळा घोषणा करा, तुम्ही काही चर सोडून सुरक्षित ठिकाणी जाणार नाही हे तर मला ठाऊकच आहे. इतके पूर पाहिलेत तुमच्याबरोबर- आणि हे समजणार नाही होय मला?'

डी.सी बरोबर बाकीचेही सगळे हसतात. एक मुलगा चहाची कपबशी घेऊन येतो.

ती कुणाला द्यायची हे त्याला समजत नाही. एकजण त्याच्या हातून कपबशी घेऊन डी.सी. पुढे करतो. डी.सी. कप घेऊन एक घोट घेतात. तेवढ्यात एकजण म्हणतो, 'सर, स्वतःचं घरदार सोडून यायला मन धजत नाही. वाटतं, आणखी एक रात्र रहावं, पहावं-'

'पण सगळं वाहून गेलं, की सगळा दोष सरकारचाच, नाही का? आपल्या पंचायतीनेही काहीच केलेलं नाही. ऑफिस कुठंय पंचायतीचं?'

'हे काय इकडे, या-' एकजण बाजूला होऊन डी.सी. ना वाट करून देतो.

चहाचा शेवटचा घोट घेतल्यानंतर, एकजण डी.सी. च्या हातातला कप घेतो, आणि डी.सी. पंचायत ऑफिसकडे जातात.

## एकशे पाच

# पुराच्या तोंडाशी पंचायत

डी.सी. काही पावलं पुढे गेल्याबरोबर ड्रायव्हर मागून येऊन विचारतो, 'जीप घेऊन येऊ, सर?'

डी.सी. ड्रायव्हरकडे वळून म्हणतात, 'नाही, तुम्ही इथंच थांबा, चहा-बिहा झाला?'

ड्रायव्हर मान हलवतो. डी.सी. दुकानं, घरं, पार करून पुढं जातात. डावीकडच्या वाळूच्या विस्तीर्ण चढाकडं बोट दाखवीत म्हणतात, 'इथं खूप सुपीक जमीन होती. अडुसष्टच्या पुरात सगळी नष्ट झाली. खूप चांगलं पीक यायचं इथं.'

'आपण होता सर तेव्हा इथे?' गर्दीतला एकजण विचारतो.

चालता-चालता मात थोडी वळवून डी.सी. म्हणतात, 'मी तेव्हा प्रोबेशनवर होतो. त्याच वर्षी पूर आला. म्हणून जलपाइगुडीला आलो, की वाटतं, आता पूर येणार. आपण होता तेव्हा इथं?'

या प्रश्नाचं एकच उत्तर असणार नाही. तेव्हा काहीजण होते, काहीजण नव्हते. पण प्रत्येकाला काही ना काही माहिती होती. सगळे मिळून उत्तर देऊ जातात. डी.सी. एकदा डावीकडे, एकदा उजवीकडे मान वळवून जणू सगळ्यांचीच उत्तरं ऐकू पहातात. शेवटी त्यांच्याजवळ असलेला एक माणूस म्हणतो. 'अडुसष्टच्या पुरानंतर तर सर या मंडलघाटचा चेहराच बदलला. सगळी रौनक गेली. बाजार, वस्ती- कुठं गेल्या या सगळ्या गोष्टी?'

पंचायतीचं ऑफिस येतं. 'इथेच, सर' म्हणून जवळचा एक माणूस ऑफिसमध्ये जातो, पण त्याआधीच ऑफिसकडून अनेकजण व्हरांड्यात येतात. आता आधीच्या लोकांकडे वळून डी.सी. म्हणतात, 'ठीक आहे, आता जरा यांच्याबरोबर बसतो. आणि

आपण सारे सावध रहा. जगपाइगुडीचा पूर म्हटल्याबरोबर भीती वाटते!' डी.सी. ऑफिसच्या व्हरांड्यात येतात.

'काय, आपण कितीजण मेंबर आहात?' असे विचारून डी.सी. पंचायत ऑफिसमध्ये प्रवेश करतात.

डी.सी. ऑफिसचं रंगरूप पहातात. दरवाजाजवळच बांबूच्या कुंपणावर लेनिनचा एक रंगीत फोटो टांगलेला आहे. आत उजव्या बाजूला सेक्रेटरीचं टेबल, जवळ स्टीलचं कपाट. टेबलमागच्या भिंतीवर 'वामफ्रन्ट सरकार झिन्दाबाद' लिहिलेलं एक पोस्टर. डी.सी. च्या डावीकडच्या भिंतीवर, कॅलेंडरमधून कापून फ्रेम केलेलं. एक रवीन्द्रनाथांचं रंगीत चित्र. त्यावर एक जुना हार झुलत असलेला.

'बसा सर,' टेबलमागची खुर्ची पुढं करीत एकजण म्हणतो.

खुर्चीत बसत-बसत पुन्हा डी.सी. विचारतात,

'इथं कोण कोण मेंबर आहेत आपणापैकी?'

दरवाजाजवळच्या गर्दीतून एकजण पुढे येतो, 'सर, आम्ही थोडेजण आहोत. आणखी दोघांना बोलवायला सायकलवरून लोक गेले आहेत. पण ते दोघे इथं आहेत की शहरात गेलेत-' मेंबर वाक्य पूर्ण करू शकत नाही.

तेवढ्यात आणखी दोघेजण पुढे येतात. डी.सी. त्यांना म्हणतात, 'आपण बसा.'

टेबलसमोरच्या खुर्चीच्या डाव्या बाजूला एक बेंच आहे. मेंबर त्या बेंचवर बसतात. जवळच्या एका खोलीतून एकजण एक खुर्ची आणून ठेवतो. डी.सी. विचारतात, 'तिकडंही एक खोली आहे काय?'

'हो, या खोलीत गर्दी होते, त्या खोलीत निवांत काम करता येतं.'

डी.सी. आता म्हणतात, 'हं, आता बोला. आमच्या एकाही वॉर्निंगची आपण दखल घेतलेली नाही. आता पुरामुळे एखादा मोठा ॲक्सिडेंट झाला तर कैफियत कोण देणार?'

'याबद्दल बोलण्यासाठीच आम्ही आपणाकडे येणार होतो आज!' एकजण म्हणतो.

'आता जर माझ्याकडे आला असता, तर पंचायतीचा फायदा काय? आपल्या भागात पूर आला तर आपणच व्यवस्था करायला हवी.'

'नाही सर म्हणजे, किती पैसा खर्च केलेला चालेल, किती नाही ते आम्हाला ठाऊक नाही-'

'सुरुवातीलाच पैशांचा मामला आला कुठून? आधी बांधापलीकडे, नदीजवळ जे आहेत, त्यांना घेऊन यायला हवं. त्यांना तर वाटतंय पूर येणार नाही. शेवटी जर मध्यरात्री त्यांना हलवावं लागलं, तर काय करणार? इथं बांधाच्या वरती एका गृहस्थाला आमच्या ऑफिसरने नाव मागितली, तर तो गृहस्थ म्हणाला नाव मला लागतेय, तुम्हाला देणार नाही-'

'कोण म्हणाला सर?'

'ते मी कसं सांगणार? बघा बरं आमचे ऑफिसर बाहेर आहेत का?'

एक मेंबर दरवाजाशी जाऊन ऑफिसरना म्हणतो, 'साहेब आपल्याला बोलावताहेत.'

ऑफिसर आत आल्यावर डी.सी. म्हणतात, 'आपण अजून इथंच उभे आहात? जरा तिकडं जाऊन नाव नीट काम करतेय का ते पहा.'

'हो, सर,' म्हणून ऑफिसर बाहेर जातात.

'महेश्वर जोतदाराच्या नावेबद्दल बोलताय सर?

'तो नाव देत नाही?'

'न देणाराचं नाव मला ठाऊक नाही. मी एका रेस्क्यू नाव सुरू करून दिलीय, आता तुम्ही पहा कुठल्या-कुठल्या पॉईंटवर लोक असतील ते. गरज वाटली तर ती आणखी एक नाव घ्या. किमान आज संध्याकाळपर्यंत नदीजवळ कुणीही रहायला नको. हे सांगण्यासाठीच तुम्हाला भेटायचं होतं.' डी.सी. खुर्चीवरून उठतात. दरवाजाकडे जाताना पुन्हा थांबून म्हणतात, 'तुमचे नेते नाहीत म्हणून उशीर करू नका. ते आले तर सांगा, मी सांगितलंय तुम्हाला म्हणून. घुंघुडांगाहून पोहे-गूळ आणायला लोक गेलेत, ते पोहेगूळ आल्यावर त्यांचं काय करायचं ते करा.' डी.सी. बाहेर येतात. तिथे अद्याप अनेकजण बसलेले किंवा उभे आहेत. डी.सी. म्हणतात, 'गाडीला जरा इकडं यायला सांगा ना!'

## एकशे सहा

# पुराच्या कार्यकारणाची वेळ

ऑफिसरलोक बांधावरून निघून गेल्यावर ठाऊक असलेली गोष्टच पुन्हा एकदा समजते. नावेने आणण्यासारखं विशेष काहीही दोन नंबरच्या चरावर राहिलेलं नाही. बायकापोरं तर आलेलीच आहेत, चौकावर फिरताहेत, पुरुषही ये जा करताहेत. आतापर्यंत धीरेन साहाची नाव एकदा गेलीय, व तिच्यातून कुठल्याशा एका घरातलं सामानसुमान आणलंही आहे. पण त्यानंतर नाव कुठेतरी बांधून ठेवण्यासाठीच गेलीय- गरज पडली, तर तयार असण्यासाठी. जितके दिवस पाणी राहील, माणसांना आणावं न्यावं लागणार, तोपर्यंत नावेचं भाडं मालकाला सरकारकडून मिळणार. ऑफिसरनी भाड्याने घेतलेली नाव पंचायत रद्द करू शकत नाही.

पण या ऑफिसरांचं येणं, सिव्हिल इमर्जन्सीची लाल गाडी, नाव भाड्याने घेणं, घुघुडांगाहून पोहे-गूळ आणण्यासाठी रिक्षा पाठवणं- यांच्यामुळे जणू पुराची घोषणा होऊन गेली. या काही दिवसांच्या मुसळधार पावसात आणि गुडघ्यापर्यंतच्या कमरेपर्यंतच्या

पाण्यात बुडूनही पूर जणू तेवढासा पूर नव्हता, आता हा सरकारी पूर म्हटल्याने खात्रीच झाली. पूर आणखी वाढला, तर हेलिकॉप्टर आणि सैन्यही इथं येईल, आजवर कुठल्याही पुरात इथं कुणी हेलिकॉप्टरही पाहिलेलं नाही, की एखादा सैनिकही पाहिलेला नाही; पण या दोघांमुळे पुराची आणखी एक अवस्था सांगता येते.

ऑफिसरांच्या येण्या-जाण्यामुळे नदी - आकाशाचा चेहेरा जणू आणखी सत्य होऊन उठतो. वारा तर इतका प्रचंड वहातोय, की त्यामुळे आकाशातले सगळे ढग इतस्ततः पांगायला हवेत, पण ढग जणू पांगायला तयार नाहीत. त्यांच्यावर आपटून वारा पुन्हा बांधावर उभ्या राहिलेल्या माणसांवर येऊन आपटतोय.

वाऱ्याच्या उलट्या दिशेला, बांधावर उभा राहून महेश्वर जोतदार ओरडतो, 'आता तर गुरांना आणावं लागणार रे, भादई!' भादई कुठंय हे त्याला ठाऊक नाही.

महेश्वर असं ओरडला हे सत्य वाऱ्यामुळे त्याचं हे आरडणं पश्चिमेकडून पश्चिमेकडेच रहात गेलं हे सत्य त्याच वेळी भादई, कान्दुरा आणि कानकाटू बांधाचा उतार उतरून पाण्यात उतरले- ही घटनाही सत्य. या तीन गोष्टींमध्ये काही कार्यकारणभाव नसेल ही किंवा असेलही.

आता तर इथं रिलीफ कँप जवळजवळ झालाच. पोहे-गूळ येताहेत, गुरांचं खाद्यही नक्कीच येणार, तेव्हां गुरांना घेऊन येणं योग्य.

किंवा, शनिवार संध्याकाळच्या यावेळी, महेश्वर-भादई-कान्दुरा-कानकाटू या सर्वांना एकाच वेळी समजलंय, की आत्मरक्षण करण्याची ही शेवटची वेळ आहे. जणू अचानक पाण्याच्या रंगात त्यांना मृत्यूचा रंग दिसतो. ऑफिसरच्या येण्यापासून तर भादईच्या पाण्यात उतरण्यापर्यंतच्या घटनांत कुठलाही कार्यकारणभाव बहुधा नव्हता. कितीतरी काकतालीय घटनांना आपण कार्यकारणभावाने घडलेल्या घटना समजतो, किंवा कितीतरी कार्यकारणभावाने घडलेल्या घटनांना आपण काकतालीय समजतो.

भादई, कान्दुरा आणि कानकाटू पाण्यात उतरतात. त्यांना सराव असल्याने ते नदीच्या पाण्यातून चालत जातात. कधी उंच, कधी खाली, कधी अचानक कमरेपर्यंत पाण्यात बुडतात, तर लगेच पुढे गुडघ्याइतकं पाणी लागतं. ते तिघे एकाच ठिकाणी पाण्यात उतरले होते, पण आता तीन ठिकाणी पांगले आहेत. नदीच्या मधल्या उंच भागावरती गुरं बांधलेली होती, त्या सगळ्या ठिकाणांहून 'हम्बाऽ' असा एक दीर्घ कोरस ऐकू येतो- जणू हे तिघेजण येताहेत हे गुरांना समजलंय. तो कोरस थांबल्यावर मेघांचं गंभीर गर्जन ऐकू येतं. गुरांना समजलंय, की आता आपल्याला येथून दुसरीकडे नेण्यात येणार आहे. ती सारी दोऱ्यांवर शिंगं घासू लागतात, मातीवर खुरं आपटू लागतात.

भादई, पुन्हा बांधाकडे परत येण्यासाठी निघतो. पाण्यात तो कुठं चालतोय आणि कुठे पोहोतोय, ते लक्षात येत नाही; पण पाणी बाजूला सारण्यासाठी त्याला हात चालवावे

लागतात, व त्याच्या हातांचे- बाहूंचे स्नायू त्यामुळे फुगून उठतात.

बांधातळी येऊन भादई महेश्वर जोतदारालाच हुकूम करतो- 'बांबू टाका ना, बाबूं टाका!'

महेश्वर बाबूंच्या जुडीतून एक बांबू बांधाच्या किनाऱ्याशी येऊन पाण्याच्या काठापासून भादईकडे सोडतो. तो पाण्यात पडल्याबरोबर भादई पुन्हा ओरडतो. 'आणखी सोडा ना, आणखी सोडा-'

महेश्वरला पुन्हा बांधावर जावं लागतं. पुन्हा एक बांबू घेऊन तो उतारावरून खाली येतो, पण पाण्याच्या काठाशी न येता तेथूनच बांबू फेकून देतो- पाण्यात पडल्यावर भादई घेईलच, अशा अंदाजाने. पण बांबू मध्येच एका काटेरी झुडुपाला अडकतो. महेश्वरला खाली उतरून तो बांबू पाण्यात सोडावा लागतो.

तो बांबू धरण्यासाठी भादईला बरंच पुढं याव लागतं. बांधाच्या अगदी जवळ येऊन भादई महेश्वरकडे पाहून ओरडतो. 'काय एकेक एकेक करीत बांबू आणताय, फेका ना सगळे, फेका!' पाण्यामधून भादई आपला एक हात पुढे करतो. भादई वाऱ्याकडे पाठ करून उभा होता, त्यामुळे त्याचा आवाज वाऱ्याच्या वेगाने येऊन बांधावर आपटतो. महेश्वर धोतर गुडघ्यापर्यंत उचलून असा काही बांधावर चढतो, की वाटतं, या क्षणी भादईचा हूकूम मोडणं त्याला शक्य नाही.

दुसऱ्या कुणाच्या हातून बाबू पोचवता येतील का, याचा अंदाज घेण्यासाठी महेश्वर इकडेतिकडे नजर फिरवतो, तेवढ्यात, भादईमागून, पाण्यातच उभा असलेला कांदुरा ओरडतो, 'अरे भादईऽऽ!' भादई गुढघ्याइतक्या पाण्यातून मागे वळून पाहून प्रतिसाद देतो. 'हो ऽऽऽ'

'गुरांना सोडू की नको?'

'नको, नको!'

पुराचं पाणी येतं, तेव्हा त्याचं येणं दिसत नाही. कुठलाही आवाज न करता पाण्याची पातळी वाढत रहाते- जणू पाताळातून पाणी वर येतंय. पण वारा काही असा नीरवपणे, अव्याहत वहात नाही. एक म्हणजे आता तिस्तेचे तट दिसत नाहीत- अगदी प्रखर ऊन असतानाही दिसत नाहीत. पाण्याच्या किंवा वाळूच्या चमकदारपणावर नजर अडकून रहाते. आता तर तट मुळीच दिसत नाहीत. राखी रंगाचं आकाश नदीवर झुकलं आहे.

खाली भादई बांबूसाठी हात पसरून उभा आहे. महेश्वरला बांबू त्याच्याकडे पोचवण्यासाठी कुणीच दिसत नाहीय. एरवी त्याला हुकुमासरशी माणसं मिळत. तेव्हा आता महेश्वरलाच दोन हातांत दोन बांबू घेऊन पुढे जावं लागतं. बांधाच्या काठाशी येऊन तो बांबू उताराच्या दिशेने सोडून देतो. ते कुठे पडले हे न पहाताच मागे वळतो. पुन्हा दोन बांबू आणून फेकतो आणि तेही कुठे पडले हे न पहाताच मागे वळतो.

आता आपल्याला बांबू भादईला द्यावे लागणार आहेत हे लक्षात आल्यावर सगळेच बांबू एकदम भादईच्या दिशेने सोडायचे ठरवून सगळे बांबू बांधाजवळ आणू लागतो. पण बांधाच्या उत्तरेकडून खाकी युनिफार्म आणि गमबूट घातलेला सिव्हिल इमर्जन्सीचा कर्मचारी ओरडून हात वर करतो. त्याचं बोलणं वाऱ्यामुळे महेश्वराला ऐकू येत नाही.

महेश्वर एकदा डावीकडून, एकदा उजवीकडून अशा बांबूंना लाथा मारू लागतो. बहुधा जरा संतापूनही. लाथा तो जोरात मारत असल्याने एक - दोन बांबू भादईच्या हाताच्या पल्ल्यात येतात. भादई दोन लांब बांबू पुढे पाण्यात सोडून आपण त्यांच्यामागे पोहत जातो.

अगदी त्याच वेळी मोबाइल इमर्जन्सीचा माणूस बांधावरून ओरडतो, 'हे काय करताय आपण, बांबू आम्हाला लागणार आहेत- काऊशेड करण्यासाठी.'

महेश्वर बांधाच्या उतारावरून, मान वर करून ओरडतो. 'हे बांबू काय तुमचा बाप ठेवून गेला होता काय इथं?'

ऐकू न आल्याने, की न समजल्याने, तो माणूस कानांवर हात ठेवून विचारतो, 'काय म्हणालात?'

एक बांबू हातात घेऊन जणू त्या कर्मचाऱ्याला मारण्यासाठीच महेश्वर मागे फेकतो. इमर्जन्सीच्या माणसाकडे बोट दाखवून महेश्वर विचारतो, 'तुमच्या बापाने आणलेत काय हे बांबू? तुमच्या बापाने?' जणू त्या माणसाचा बाप त्याच्या शेजारीच उभा आहे.

इमर्जन्सीचा माणूस तरीही कानावर हात ठेवून विचारतो, 'काय म्हणालात?'

एकच राग दोनपेक्षा अधिक वेळा बाहेर काढता येत नाही. महेश्वर आधी बांबूंकडे, नंतर पाण्यात उभ्या असलेल्या भादईकडे बोट दाखवतो. त्यानंतर पुन्हा बाबूंना लाथ मारमारून खाली ढकलू पहातो.

बांधावरून उभा राहून इमर्जन्सीचा माणूस पहातो.

महेश्वर दोन बांबू घेऊन, बांधावरून थोडा खाली उतरून ते बांबू पाण्यात फेकतो. भादई त्यांच्याकडे पोहत निघतो.

## एकशे सात

# जलगोधूलि

या निर्जन किनाऱ्यावर, निर्जन पुरात आणि निर्जन झडीत पाण्यात उभा राहून, चालत-पोहत भादई एका बांबूला दुसरा बांबू जोडून-जोडून लांब करतोय, आणि बांधावरून महेश्वर जोतदार आणि इमर्जन्सी ऑफिसर त्याच्याकडे बांबू ढकलताहेत. भादई

एकामागोमाग एक बांबू जोडत चाललाय आणि त्यांना दोरखंडाने गाठी मारतोय. बांबू हातात आल्यावर तो आधीच्या बांबूला जोडून गाठ मारायला त्याला फार वेळ लागत नाही. गाठ बांधल्यावर तो आपल्या कमरेला खोचलेला कोयता बाहेर काढून त्याने दोरी कापतो.

अशाप्रकारे बांबू बांधून भादई किमान एखाद्या उंच जागेपर्यंत जाईल. दोन लाईन बांबू पुराच्या पाण्याबरोबर वहातील. आता गुरांना या दोन रांगांच्या मधून सोडलं म्हणजे ती सारी एका रांगेत जाऊन थेट बांधावर पोचतील. नाहीतर ही पाण्याने व्यापलेली जागा त्यांना इतकी अपरिचित आहे, की सारी गुरं इकडंतिकडं विखरून जातील मोठ्या प्रवाहाच्या बाजूला तेव्हा मग त्या गुरांना वाचवणं या भादई-कान्दुरा-कानकाटू यांना शक्यच होणार नाही. दोन्ही बाजूंना बांबूंची खूण असल्याने गुरं चुकणार-भरकटणार नाहीत. त्याशिवाय पाणी आणखी वाढलं, तरी बांबूची ही खूण कायम राहील- सगळं बुडून जाण्याआधी या खुणेच्या आधारानेच येणंजाणं होत राहील.

भादई ही बांबूंची लाईन ओढून समोर वरच्या किनाऱ्यावर घेऊन गेला. तिथेही आता पाणी आलंय. तिथे, एक बांबू तो चिखलात असा रोवतो, की थोड्याशा प्रवाहानेही तो वाकतो, पण उखडून पडत नाही. आणि पडला, तरी बांबूंच्या लाइनचं त्या बाजूचं टोक बांधाच्या उतारावर बांधलेलं रहातं. पाणी चढलं तर ती लाईन वरतीही घेता येईल.

आता मात्र साऱ्या मालमत्तेवरून नदी वहातेय. किनाऱ्याच्या वरच्या भागांवर घरांची छपरं, घरांची कुंपणं दिसताहेत. पण पाण्याचं लक्षण काही चांगलं नाही. आज रात्रभर वारा भणाभणा वहाणार, पाऊस कोसळत रहाणार, त्याने हे पाणी वाढणार. सकाळी दिसेल - इथं घरंबिरं काहीही नाहीत, फक्त नदी आहे. शिवाय पहाडांवर प्रस्तरभंग होतच आहेत. त्या गुहांमध्ये पाणी साठून जे कृत्रिम हौद (ऱ्हद) तयार झाले आहेत. ते फुटले म्हणजे पहाडावरून येणाऱ्या पाण्याने एक नवीनच नदी तयार होईल. भादुई, कान्दुरा, कानकाटू त्या नव्या नदीला तोंड देण्यासाठीच तयार होताहेत.

जवळच्या एका किनाऱ्यावरून भादई एक लांबलचक हाक देतो. 'एऽऽ काऽ न् दुऽ राऽऽऽ- काऽ न काऽ टूऽऽऽ!' कशीबशी त्यांची ही हाक, वाऱ्यामधून कान्दुरा-कानकाटूपर्यंत पोचते.

हाक मारून भादई तिकडच्या पाण्यात उतरतो. तिकडं पाणी खोल आहे आणि प्रवाहाचीही ओढ आहे. त्या प्रवाहात भादई आपलं सडपातळ शरीर एखाद्या लाकडासारखं सोडून देतो, आणि आणखी दूरच्या तटावरच्या एका जागी, कांदुरा आणि कानकाटूंप्रमाणे निघून जातो.

दोन दिवसांपासून चाललेल्या या झडीने सारंच जणू पाण्याखाली घातलं आहे. जी जमीन माणसाच्या ताब्यात होती ती पुन्हा नदीने ताब्यात घेतली आहे. फक्त ही तीन

माणसे तेवढी त्या पात्रात कुठं उभी, तर कुठं चालत, तर कुठं पोहत होती.

त्यानंतर, त्या सगळ्या उंच किनाऱ्यांवर बांधलेल्या गुरांना घेऊन हे तिघेही एकाच वेळी पाण्यात उतरतात, आणि जिथं भादईने बांबू बांधून ठेवले होते, त्या दिशेने येऊ लागतात. तिघेही डोक्यांवर छडीसारखं काहीतरी फिरवीत, गरज नसतानाही जिभेने टर्रर, टर्रर, आवाज काढीत गुरांना घेऊन निघतात. त्या आवाजांमुळे म्हणा, की पाण्यापलीकडे दिसणाऱ्या जमिनीच्या ओढीमुळे म्हणा, शक्य तितक्या वेगाने गुरं बांधाच्या दिशेने धावू लागतात.

त्या पळण्यात एकच गैरसोय होती. पाण्याची खोली ठिकठिकाणी वेगवेगळी होती. कुठं गुरांच्या छातीपर्यंत पाणी होतं, कुठं कुणी-कुणी वासरं बुडून जात होती, कुठं वासरांना पाणी आणि जमीन यांच्यामधला फरक कळत नव्हता, आणि क्षणात पाण्यावर दिसणारी वासरं लगेच पाठीइतक्या पाण्यात बुडून जात होती. आता एकही जनावर हंबरत नाहीय, जणू, आपल्या हंबरण्यामुळे आकाशातल्या, दूर पहाडांवरच्या पोकळ्यांत साठलेल्या पाण्याला आपला पत्ता लागेल असं जनावरांना वाटत होतं. शक्य तितक्या घाई नेती नदी पार करीत होती.

पण इतकी गुरं नेहमीपेक्षा अधिक पाण्यातून नदीपार करण्यासाठी भादई, कांदुरा आणि कानकाटू यांना जरा अधिक साहसाची गरज वाटते. आकाश नदीवर इतकं ओथंबलंय, की काही वेळाने दोघांमध्ये काहीच अंतर रहाणार नाही असं त्यांना वाटतं. अद्याप आकाश नदी यांच्यात थोडं अंतर आहे हे स्वतःलाच समजावण्यासाठी भादई हुंकार देतो- 'एऽ, हेऽट, हेट; खबरदाऽऽऽर! खबरदाऽर!' कान्दुरा ओरडतो, 'कानकाटू, डावीकडं मार, डावीकडं!'

भादईने पाण्याखाली गेलेल्या काठावर जिथं बांबू बांधले होते, तिथे गेल्यावर गुरं क्षणार्धात त्या दोन बांबूंच्या लाइनमध्ये घुसतात, पुढे जाऊ लागतात. भादई, कांदुरा आणि कानकाटू त्या दोन बांबूच्या लाईनमध्येच वेगवेगळ्या ठिकाणी उभे रहातात. ढगाळ आकाशातही एक अदृश्य सूर्यास्त होतो. त्या प्रचंड पाण्यातून, कांदुरा, भादई आणि कानकाटू आपलं घेनुदल घेऊन, या संध्याकाळी पैलतिरी पोचतात-

## एकशे आठ

# 'सीमा सुरक्षा दला' चे दोन अर्थ

तिस्तेमध्ये नोवापाडा, मेचियापाडा, सयेदपाडा, दहग्राम हे चार चर किंवा विदेशी अंतःक्षेत्रं आहेत. त्यांच्यासंदर्भात भारताच्या सुप्रीम कोर्टापर्यंत खटले चालले आहेत,

कारण ही चार ठिकाणं पूर्वीच्या पूर्व पाकिस्तानला आणि आताच्या बांग्लादेशला एका करारानुसार देण्यात आली आहेत. ब्रिटिश अंमलात जलपाइगुडी जिल्ह्यात पाटग्राम ठाणं होतं. तिस्ता इथं सीमान्तवाहिनी. मंडलघाटनंतर तिस्ता पूर्वेकडच्या मेखलीगंज आणि पश्चिमेकडच्या हलदीबाडी या दोन गावांमधून तेव्हाच्या कूचबिहार संस्थानातून (आताच्या कूचबिहार जिल्ह्यातून) जाऊन पाटग्रामच्या पश्चिम सीमेने रंगपूरकडे जात असे. तेव्हा पाटग्रामच्या पश्चिमेकडची ही नदीच रंगपूर आणि जलपाइगुडीमधील सीमा होती. या नदीच्या अगदी मध्यभागी नोवापाडा, मेचियापाडा, सयेदपाडा, दहग्राम आणि इतर अनेक नाव नसलेले चर मुळात कूचबिहार संस्थानची इस्टेट होती. आणि त्याच कारणामुळे कूचबिहार भारतात विलीन झाल्यावर ते चर भागतीय प्रजासत्ताकाचे (आणि त्यातील प. बंगाल राज्याचे) भाग बनले. पण केवळ नकाशात. एक दुसऱ्या राष्ट्रात असलेल्या त्या चरांसारख्या एन्क्लेव्हवर भारत आपला ताबा कसा राखणार? का राखणार? कधी एक नंबर आणि पाच नंबर बहुधा भारताचे, दोन, तीन, चार बहुधा बांग्लादेशचे. आणखी कुठे आठ, नऊ नंबर बांग्लादेशचे, सहा, सात, दहा, भारताचे. अशा प्रकारे एकेक चर एकेक राष्ट्र होऊन रहाणं दोन्ही राष्ट्रांना गैरसोयीचं होतं. त्यामुळे त्यांच्या संदर्भात काही देवाण-घेवाण करून त्या चरांची वाटणी करण्यात आली. पण तरी नदी ही नदीच रहाते, चर हे चरच रहातात, राष्ट्र रहातं, राष्ट्राची सीमा रहाते, सीमेवर बॉर्डर-सुरक्षा दल रहातं, बॉर्डर-सिक्युरिटी फोर्सचा कॅम्प रहातो, त्या कॅम्पच स्वतःचं अस्त्रभांडार रहातं. त्याचप्रमाणे, आधी जशा पूर्व पाकिस्तानात या सगळ्या गोष्टी सीमेवर असत, तशा आता बांग्लादेशच्या सीमेवर असतात.

पण, एवढी सगळी व्यवस्था ज्या सीमान्ताची, सीमेची रक्षा करण्यासाठी आहे, तो सीमान्त प्रदेश, ती सीमाच इथं राहत नाही. दोन्ही देशातील कायदेशीर किंवा बेकायदेशीर प्रवासी-कुणीही, इतकी सीमा असल्याने या चरांची किंवा नदीच्या पाण्याची सीमा ओलांडू इच्छीत नाहीत. पण या सीमेवर किंवा नदीच्या चरावर जी माणसं रहातात, ती बाजारहाट करण्यासाठी जवळपासच्या बंदराच्या भागात व बाजारात जातातच. त्याला त्यांचा निरुपाय असतो. एवढंच काय, भारतीय आउटपोस्टसाठी रसद विकत घेण्यासाठी नावेतून रविवारी व गुरुवारी सयेदच्या हाटात जावंच लागतं. सयदेचा हाट अगदी सीमेला लागूनच आहे. बाजार करता-करता इंडियन बॉर्डर आउटपोस्ट आणि बॉर्डर सिक्युरिटी फोर्सचे लोक बांग्लादेशमध्ये प्रवेश करतात आणि बांग्लादेशचे लोक भारतात प्रवेश करतात. हा हाट चालतो, तोच मुळी दोन्ही देशांच्या सीमेवरच्या लोकांच्या सोयीसाठी-नाहीतर इतके बकरे, इतक्या शेळ्या किंवा इतक्या कोंबड्या इथं आल्या कशा असत्या?

हाटाच्या मैदानाची पश्चिम बाजू बांग्लादेशची आहे आणि पूर्व बाजू भारताची आहे. तीही अर्धी-अर्धी अशी नाही. 'मुर्गीहाट' भारताच्या सीमेत मोडतो. तिथे बकऱ्या, कोंबड्या, एवढंच काय, गुरांची सुद्धा विक्री होते. दोनेकदा गुरांच्यावरून गोंधळही झाला

होता. सीमेवरून चोरलेली गुरं पकडण्यात आली होती. बांग्लादेशी चोरांनी भारतातली गुरं चोरून ती बाजारात विकण्याचा त्यांचा प्रयत्न चालला होता. यावर भारतीय जवानांनी त्यांना भारतीय सीमेत आणून चांगला चोप दिला होता. दुसऱ्या एका वेळी एका चोराला भारतीय जवानाने अशी काही लाथ घातली, की तो हाटातल्या भोपळेविक्याच्या अंगावर पडला. त्यामुळे त्या भोपळेविक्याचे भोपळे घरंगळत काही बांग्लादेशात गेले, काही भारतीय भागात गेले! तो बिचारा भोपळे गोळा करण्यासाठी बांग्लादेश-भारत यांच्यात पळापळ करू लागला. तेवढ्यात भारतीय जवानाने पुन्हा त्या चोराची कॉलर धरली, आणि 'मामला काय आहे' हे पहाण्यासाठी आलेल्या बांग्लादेशी जवानाला तो म्हणाला, 'दादा, काही दिवस याला आमच्याकडं राहू द्या, आमच्या स्वैपाक्याचा मदतनीस पळून गेलाय!'

बांग्लादेशी सैनिक म्हणाला, 'घ्या की दादा! काही हरकत नाही! घ्या याला तुमच्या ताब्यात!'

इथला बाजार चरांवरच्या लोकांसाठी, तसंच आसपासच्या गावातल्या लोकांसाठीही भरतो. तो संध्याकाळआधी दोनेकतास उठतो, कारण प्रत्येकाला आपापल्या देशाच्या सीमेत जायचं असतं. लाल रंगाचं कुंपण पाहून भारतीय बॉर्डर कॅम्प आणि हिरव्या रंगाचं पाहून बांग्लादेश बॉर्डर कॅम्प ओळखता येतो.

पण आता, पुरातील तीस्तेने ही सगळी सीमान्तचिन्हं पाण्याखाली बुडवली आहेत. सूर्याचा प्रकाश किंवा रात्रीचा अंधार सीमा मानीत नाही, तसंच तीस्तेच्या पाण्याचंही आहे. आज शनिवारची संध्याकाळ सारीकडून तिस्तेचं पाणी वाढतंय. नाउवापाडापासून या खालच्या सहा नंबर दहग्राम पर्यंत सगळ्या चरांवरून वहात जाऊन तिस्ता आंतरराष्ट्रीय समस्या सोडवून टाकील. बुधवारपासून पाणी वाढतंय. पण इथला पाऊस तर थांबून गेलाय. गुरुवारी पहाटे आकाश हळूहळू विवर्ण व्हायला सुरुवात झाली आणि वारा खूप वाढला. आता या शनिवारच्या संध्याकाळी आकाशाचा आणि तिस्तेचा गढूळ रंग एकमेकांमध्ये मिसळून गेलाय.

## एकशे नऊ

# बांग्लादेशचा दूत इण्डियात

भारताच्या सीमान्त चौकीतल्या रेडिओ-टेलिफोनची रिंग वाजते. एक्सचेंजवर कुणीच नव्हतं. आता ड्यूटी किशोरचंदची होती, तो कमांडंटच्या खोलीसमोर इतरांबरोबर उभा होता. 'एल' पॅटर्न बरॅकच्या एका टोकाला कमांडंटची खोली होती आणि त्याच्याशी समकोण साधून, शेवटी 'एक्स्चेंज-' म्हणजे फोन वाजल्यावर ऐकू यायलाच हवा. पण

वारा उलट्या दिशेने वहात होता आणि हे लोकही मोठमोठ्यांदा गप्पा मारीत होते - म्हणूनच फोनची घंटा त्यांना ऐकू आली नाही. हा कॅम्प आता पुराच्या पाण्यात बुडणार होता, पण इथे अजून कुणाला खबर नव्हती.

एवढंच काय, आता तिस्तेचा पूर इंडियाकडून एवढं पाणी घेऊन बांग्लादेशकडे धावत येतोय, त्यामुळे आज शनिवारची रात्र कशी जाणार, याचा काही भरोसा नाही. संध्याकाळपूर्वीच, पूर आल्यास काय उपाय करायचे याचा विचार करून ठेवायला हवा- त्यातही भारताची सीमान्तचौकी आणि बांग्लादेशची सीमांतचौकी यांच्या समस्या समान नाहीत. बांग्लादेश चौकीतले बहुतेकजण डावीकडे-उजवीकडे नौकेतून पार झाले आहेत. इथं तर पार जाण्यासाठी जागा नाही, कुठंतरी आश्रय घ्यायचा असेल तर बांग्लादेशातच कुठेतरी जायला हवं. आठवड्यातून एकदा एकदोघांनी बांग्लादेशच्या बाजारातून खरेदी करून आणणं एक गोष्ट झाली. आता हा सगळ्या कँपच बांग्लादेशात जाऊन आश्रय कसा घेणार? ते जमलं नाही, तर उपाय काय?

कमांडंट म्हणतो, 'एक काम करा. तुम्ही नावा घेऊन आता पैलतिरी जा. शिफ्टस् करून जितक्या जणांना जाता येईल, तितके जण जा. मी इतरांबरोबर इथेच थांबतो. रात्री जर पाणी खोल्यांमध्ये घुसलं, तर आम्हीही नावेत चढून बसू.'

विभूती घोष वयस्कर आहे. तो म्हणतो, 'कल्पना वाईट नाही. त्यापेक्षा मग रात्री जाण्याऐवजी आत्ताच निघा ना!'

'कुठं जाणार?' कमांडंट विचारतो.

'रात्रीच्या अंधारात, पुराच्या पाण्यात भरकटत जिथं पोचायचं तिथं पोचाल!'

कमांडंट हसत-हसत, खुर्चीत डुलत-डुलत म्हणतो, 'घोषचं बोलणं तर एका!'

'तर मग आता एवढ्या मीटिंगबिटिंगची गरज नाही. जे व्हायचं ते होईल.' बटुक बर्मन म्हणतो.

'काय होणार ते तर समजतंच आहे. काय नित्यानंद, गावचे लोक काय करताहेत?'

'पुराचं पाणी तर दक्षिणेकडच्या गांवांत घुसलं आहे- मी सकाळीच बघून आलो. त्यानंतर तर पाणी आणखीच वाढलं. दक्षिणेकडचे लोक म्हणाले- त्यांची गुरं ते कॅम्पच्या मैदानात आणून ठेवणार होते.'

'पण पाणी उतरूही शकतं, काय, विभूती घोष?

'तुम्ही तर पहाताच आहात- चांगली मजा चाललीय. आता इलिशमासे आणि खिचडीचं जेवण व्हायला पाहिजे!'

'अरे पुरातच मरायचं तर मग इलिशमासे खाऊन मलेलं चांगलं!' कमांडंट खुर्चीत बसल्याबसल्या हसतो.

एवढ्यात, आपादमस्तक वॉटरप्रूफ कापडामध्ये असलेला एक माणूस सायकलवरून

तिथे येतो, सायकल लावून व्हरांड्यात येतो, वॉटरप्रूफ कापड अंगावरून काढल्याबरोबर बटुक बर्मन त्याला म्हणतो, 'अरे अज़ीज़, तुम्ही?'

'काय अज़ीज़ करता राव? टेलीफोन करून-करून बेजार झालो. साला शेवटी सायकल घेऊन निघालो. काय वारा रे बाबा! कमांडरने पाठवलं.'

## एकशे दहा

# इण्डिया-बांग्लादेश चर्चा

'असं? तुम्ही फोन केला होता की काय?' कमांडंट खुर्चीतून न उठता विचारतो. अजीज दरम्यान वॉटरप्रूफ कापडाची घडी करून ती सायकलच्या कॅरियरला लावतो.

अजीजचा वेश आहे लुंगी, सँडो बनियन आणि गमबूट. लुंगी गुडघ्यापर्यंत वर घेऊन कमरेला खोचलेली. आता अजीज कमांडंटला विचारतो, 'तुम्ही काय टेलिफोन ऑफ करून ठेवला होता का?'

'का? ऑफ कशासाठी? ड्यूटी कुणाची होती?' कमांडंट वरच्या आवाजात विचारतात. किशोरीचंद गर्दीतून एक्चेजच्या दिशेने सरकतो, पण भरभर किंवा पळत जात नाही, नाहीतर संशय येऊन पकडला जायचा. शिवाय बांग्लादेशच्या कँपमधून या अशा वेळी मेसेंजर कशासाठी आलाय हेसुद्धा त्याला जाणून घ्यायचंय. एरव्हीही या कँपमध्ये कुणाची ड्यूटी कधी कुठे असते याबद्दल कुणाला सोयरसुतक नसतं- रुटीन कामं झाली म्हणजे झालं! पण बांग्लादेश कँपहून आलेला फोन इथे घेण्यात आला नाही हा गंभीर मामला होता. वर, तो फोन न घेतल्यामुळे सायकलवरून बांग्लादेशचा मेसेंजर आलाय.

अज़ीज़ म्हणतो, 'सर, तुमच्याकडे काही फ्लडवॉर्निंग आली की नाही हे कमांडटसाहेबांनी विचारलंय.'

'का? तुमच्याकडं आली का?' कमांडंट थोडे वाकतात.

'ते तर बाबू सांगू शकत नाही. मला फक्त तुमच्याकडे वॉर्निंग आलीय की नाही एवढंच विचारायला सांगितलंय.' अजीज म्हणतो. कमांडंट थोडा विचार करून अचानक विचारतात, 'अरे, एक्सचेंजमध्ये कोण आहे? काही वेदर मेसेज आलाय का? येतोय का?'

तोवर किशोरीचंद एक्सचेंजपर्यंत पोचलाय, तो तिथूनच उत्तरतो, 'नाही, आला नाही.'

'तुम्ही तर फोनजवळ नव्हताच, मग हे कसं समजलं?' कमांडरच्या आवाजात थोडा तिरस्कार आहे.

'मी तर इथंच होतो,' किशोरचंद एक्सचेंजच्या दरवाजातून, मोठ्या आवाजात म्हणतो.

'असं! आता कुठून पुराची खबर मिळतेय का ते पहा- कूचबिहार पहा, जलपाइगुडी हेडक्वार्टर्स पहा. अज़ीज़, तुम्हाला काही खबर नाही?' कमांडंट विचारतो.

'आम्हाला कुठून खबर मिळणार? दोन नंबरचा चर तर वाहून गेला!'

'दोन नंबर? वाहून गेला?' कमांडंट उभा रहातो, 'तिथं तर तुमचे बरेच लोक-'

'सगळे आता कॅम्पमध्ये येऊन गर्दी करायला लागलेत.'

'तुमच्या कॅम्पमध्ये दोन नंबर चरावरचे लोक आले? मग तर या कॅम्पमध्येही येणारच! एऽ बघा बरं, दक्षिणपाडाची काय खबर आहे!' कमांडंट ओरडून विचारतो. इथं जी गर्दी जमली होती ती हळू-हळू पांगते. फक्त एकटा विभूती घोष तेवढा उरतो. कमांडंट व्हरांड्यात जाऊन उभा राहिल्याबरोबर पावसाचा सपकारा अचानक आलेल्या वाऱ्याने इकडे येतो, कमांडंट ताबडतोब मागे होतो, अजीज भिंतीकडे तोंड करतो आणि घोष खोलीमध्ये घुसतो.

'सर, कमांडट म्हणाले, त्यांना आपणाशी फोनवर बोलायचंय. ते फोनजवळच बसले आहेत. आपण फोन केलात की लगेच त्यांच्याशी बोलू शकाल.'

'असं? मग लगेच बोलूनच घेतो,' कमांडंटनी फोनच्या दिशेने हात पुढे केल्यावर अज़ीज़ म्हणतो, 'सर, आणखी एक मेसेज आहे सर. तेवढा ऐकून मग फोन करा!'

'सांगा, काय मेसेज आहे?'

'सर, कमांडट म्हणाले, आता रात्रभर पाणी वाढत रहाणार, वारा भणाणत रहाणार, म्हणून तुमच्या कॅंपमधल्या सगळ्यांनी आमच्या कॅंपवर रात्री भोजनासाठी यावं!'

'आँ? पार्टी देताहेत तुमचे कमांडट?' हेः हेः करीत कमांडंट हसतात.

'हो सर; तुम्ही सगळे आज रात्री आमच्या कॅंपवर या, रात्री तिथेच मुक्काम करा, उद्या सकाळी वारा- पाणी कमी झाल्यावर पुन्हा इथं या.'

'एकलंत का विभूती घोष, सगळ्या कॅंपला तिकडं जायला हवं!' कमांडंर हे-हे करून प्रचंड मोठ्याने हसतो. वाटतं, संकटाचं त्याला काहीच सोयरसुतक नाही. ही त्याच्या दृष्टीने जणू मौजमजेचीच गोष्ट आहे.

'अरे, आपण तर इथंच गप्पा करताहात- आपल्या फोनची तिकडं वाट पहाताहेत ना!' विभूती घोष कमांडंटना आठवण करून देतात.

'हो, हो, सांगा बरं कनेक्ट करायला,' कमांडंट फोनकडे बोट दाखवीत म्हणतात. विभूती घोष रिसीव्हर उचलून म्हणतो, 'बांग्लादेशला कनेक्ट करा,' मग कमांडंटला म्हणतो- 'धरा!' कमांडंर तेव्हा अजीजला म्हणत असतात, 'तुम्ही काय बकराबिकरा कापून मेजवानीचा बेत केलाय की काय?' नंतर ते रिसिव्हर घेतात.

रिसिव्हर कानाला लावून, थोड्या वेळाने ते मोठ्यात म्हणतात, 'हो, हो!' नंतर त्यांचा आवाज उतरतो, 'येस, इंडिया स्पीकिंग, इंडिया स्पीकिंग, इंडिया स्पीकिंग, कमांडंट, इंडियन बॉर्डर आउटपोस्ट, दहग्राम, स्पीकिंग' त्यानंतर अचानक आवाज

चढवतात, जणू गर्दीत ज्याला शोधीत होते, तो गृहस्थ अचानक सापडलाय- 'अरे हो, हो, मोताहार भाई? अरे, अज़ीज़ आलाय, सगळ्यांना जेवणाचं निमंत्रण दिलंय, हाः हाः हाः!' कमांडट हसत रहातो. विभूती घोष हळू आवाजात म्हणतात, 'त्यांना काय म्हणायचंय ते आधी ऐकून घ्या, मग हसा!' यावर हसू थांबवून कमांडंट म्हणतो, हं, बोला, काय झालं?' त्यानंतर रिसीव्हरमध्ये फक्त हूं, हूं' करीत रहातात. टेलिफोनमधून एक गोंगों असा आवाज संपूर्ण खोलीमध्ये घुमत रहातो. बाहेर वारा भणाणा वाहतोच आहे. फोनवर बांग्लादेशच्या कमांडटचा आवाज लांबूनही ओळखू येत होता. घोष तो ऐकत रहातो.

गों गों आवाज थांबतो. आता भारताच्या कमांडंटला उत्तर द्यायला हवं, पण त्याला जणू चटकन उत्तर सुचत नाहीय. जरा गप्प राहून तो म्हणतो, 'हॅलो, मोताहार भाई?' तिकडून पुन्हा काही वेळ गोंगों आवाज येतो. कमांडंट पुन्हा थोडा वेळ घेतो, मग म्हणतो, 'मोताहार भाई, आमच्या हेडक्वार्टर्समध्ये तर फोनची कुठलीच लाईन मिळत नाहीय. आपण म्हणताय कॅम्प, म्हणजे आमचा कॅम्प वाहून जाणारच?' पुन्हा तोच 'गों गों' आवाज. कमांडंरला जणू अचानक उत्तर सुचतं.

'हॅलो मोताहार भाई! मी जरा सगळ्यांशी चर्चा करतो, बघतो जलपाईगुडी किंवा कूचबिहारशी कॉंटॅक्ट करता येतं का. त्यानंतर तुम्हाला फोन करतो ना!'

बांग्लादेशकडून पुन्हा गों-गों आवाज येतो.

'नाही, नाही, हाफ ॲन अवर नाही, फिफ्टीन मिनिटस्नंतर आपणाला फोन करतो. नाही. समजतंय मला, उशीर झाला की सगळ्याच बाबतीत नुकसान होणार. पण, माझी एक रिक्वेस्ट आहे. आम्हाला आपणाकडं शिफ्ट व्हावं लागलंच, तर आमचं रेशन आम्ही बरोबर घेऊ येऊ.'

बांग्लादेशकडून पुन्हा संक्षिप्त गों-गों नंतर कमांडंट पुन्हा 'हे-हे' हसायला सुरुवात करतो, पण ते पूर्ण करू शकत नाही. 'अच्छा, ठेवतो!' रिसिव्हर ठेवून, रिसिव्हरवर हात ठेवूनच कमांडंट घोषला म्हणतो, 'सगळ्यांना बोलवा. त्यांनी शिफ्ट करायला सांगितलंय. फ्लड वाढतो आहे. रात्री या कॅम्पमध्ये पाणी घुसणारच.'

## एकशे अकरा

# इंडियाची गुप्त चर्चा

**कमांडंट टेबलमागच्या खुर्चीवर बसून दरवाजातून बाहेर पहात रहातो. घोष सगळ्यांना बोलावायला गेलाय. कमांडंटला डोळ्यांसमोर कँपचं मैदान, त्याच्याशेवटी**

घास, त्यानंतर झाडं दिसताहेत. वारा आणि पाऊस चालूच असल्याने झाडं अंधुक दिसताहेत. इथं कँपच्या मैदानात झाडं नसल्याने पावसाच्या धारांचा रोख स्पष्ट दिसतोय. वारा इतका जोरात वहातोय, की पावसाचं पाणी धुक्यासारखं दिसतंय.

दरवाज्यातून अजीज म्हणतो. 'सर, मी जाऊ?' त्याने पुन्हा वॉटरप्रूफ आणि टोपी परिधान केलीय.

'अं? हो, हो. तुमच्या साहेबांना सलाम सांगा, अज़ीज़!'

'हो सर, सांगतो.'

अज़ीज़ सायकल ढकलत नेत असताना कमांडरला दिसतो. वारा जणू सायकलचं हँडल ढकलू पहातोय. येताना वारा अजीजच्या पाठीकडून होता. आता समोरून येतोय. कसं जावं?

अज़ीज़ दृष्टीआड जातो. अज़ीज़ सारी वाट चालतच जाईल बहुधा, किंबहुना त्याला चालतच जावं लागणार. सायकल इथं ठेऊन गेला असता तर लवकर पोचला असता.

विभूती घोष कमांडंटच्या खोलीत येऊन, एका स्टुलावर बसून विचारतो, 'ते काय म्हणाले, फ्लड येणारच?'

'हूं.'

'आपल्या रेडिओवरही तसंच सांगताहेत.'

'हूं.'

'मग तर शिफ्ट करण्याशिवाय दुसरा उपायच नाही.'

'हूं.'

'मग सगळ्यांना बोलावलंत कशाला?'

कमांडंट काहीच उत्तर देत नाही. खरं तर तो द्विधा मनोवस्थेत सापडलाय. इथून जर तिकडं शेल्टर घ्यायला गेलं, तर हा त्याचाच निर्णय ठरणार होता. सगळे म्हणणार, 'कमांडंटच्या हुकुमाने गेलो.' पण इथून गेलं, तर इंडियाच्या सीमेवर काही तासांसाठी किंवा रात्रभर मुळीच पहारा रहाणार नाही.

कँपमध्ये इतरजण एकेक करीत येतात. इतर म्हणजे दहाबारा लोक. त्यात कस्टम्सचा एकजण आहे. काहीजण आत, काहीजण बाहेर उभे रहातात. बाहेरचे म्हणतात, 'सर, काय सांगायचं ते सांगा! पावसात उभं रहावत नाही!'

'मग आत या की!' म्हणून कमांडंट स्वतःच्या खुर्चीवर बसतो. सगळे खोलीत आल्यावर कमांडंर म्हणतो, 'दरवाजा बंद करून घ्या!' दरवाजाजवळचा माणूस दरवाजा लोटून घेतो.

'तुम्ही सगळं ऐकलंत, आता काय करावं, बोला!'

'आता यात करण्यासारखं काय? फ्लड आल्यावर समोरच्या उंच जागी जावंच लागणार!'

'बांग्लादेशच्या कमांडंरने आपल्याला त्यांच्याकडे, त्यांच्या कँपमध्ये आजची रात्र काढायची विनंती केलीय- तुम्ही ऐकलीच आहे ती.'

'मग तिकडेच चला. जायचं असेल तर आता लगेच चला. अंधार झाल्यावर आणखी त्रास होणार.'

'कँपला कुलूप लावून जायचं सगळ्यांनी?' कमांडंट म्हणतो, 'खरं तर जलपाइगुडीशी एकदा काँटॅक्ट झालं असतं, तरी काहीच प्रश्न उभा राहिला नसता. पण हेडक्वार्टरच्या परमिशनशिवाय असं एकदम कँपला टाळं कसं लावायचं?' कमांडंट गप्प होतो. इतरही सगळेजण समस्येवर विचार करू लागतात.

'कोण होतं एक्सचेंजवर?' कमांडंट सगळ्यांकडे नजर टाकतो.

'मी होतो.' किशोरचंद म्हणतो. वाऱ्याने दार धाडकन उघडतं आणि पुन्हा वाऱ्यानेच बंद होतं. दाराजवळचा माणूस बोल्ट लावून टाकतो.

'काही मेसेज आला? आपल्याकडून काही दिला?'

'नाही, नाही मेसेजची देवाणघेवाण होणार कशी? ऑल डेड!'

'कुचबिहारही डेड?''

'कुचबिहार डेड, जलपाइगुडीही डेड. सर, असल्या पुरात आपल्याला कधी मेसेज मिळणार? सगळीकडे पाणीच-पाणी!'

'हो! आणि इथं आपलं ठाणं आहे याची आठवण कुणाला होणार?' कमांडंटच्या सुरात विषाद आहे.

'मग करायचं काय हे आपणालाच ठरवावं लागणार. वेळही आता फार कमी आहे-' विभूती घोष म्हणतो.

'यात एवढं विचार करण्यासारखं काय आहे? इथं पुराचं पाणी येतंय- आपण त्यात वाहून जाणार की काय? वाहून जायचं असेल तर वाहून जा, आणि वाहून जायचं नसेल तर बांग्लादेशच्या कॅम्पमध्ये चला!' कस्टम्सचा माणूस म्हणतो.

कमांडंट त्याच्याकडे थोडावेळ पहात रहातो. तो दुसरा काहीतरी विचार करतोय हे त्याच्या नजरेवरून समजतं.

'आता इंडिया सोडून बांग्लादेशात आश्रयाला जायचं का असा आपण विचार करताहात, पण या क्षणी तरी आश्रयासाठी बांग्लादेशशिवाय दुसरी जागाच नाही. जाणार कुठं?' कस्टम्सचा माणूस पुन्हा म्हणतो.

कमांडंट त्याच्याकडे पहातच होता. आता त्याच्या ओठांवर थोडं स्मित दिसतं.

'आणि कँप कुठं सोडतोय आपण? बांग्लादेशच्या कँपमधून टॉर्च मारला की हा कँप दिसेल. फार तर रात्री कुणीतरी एकदा येऊन पाहून जाईल,' कस्टम्सचा माणूस पुन्हा म्हणतो, 'फक्त रात्रीच्या काही तासांचा प्रश्न आहे. त्यात एवढं विचार करण्यासारखं काय

आहे?'

'हेडक्वार्टर्सहून काही मेसेज आला तर?' कमांडंर विचारतो.

'नो रिप्लाय होईल. पुरात सगळं वाहून गेलं असं समजतील,' बटुक बर्मन उत्तरतो.

कमांडंट सरळ होऊन बसतो. 'ऐका तर मग. आत्ताच मूव्ह करा. सगळ्यांनी फुल युनिफॉर्ममध्ये-'

'युनिफॉर्म तर भिजून जड होतील,' बटुकच म्हणतो.

'कसे काय? तुमच्याकडं वॉटरप्रूफ नाही का? युनिफॉर्मशिवाय बांग्लादेशमध्ये जाता येणार नाही. फुल युनिफॉर्म विथ आर्मस्!'

'आर्म्स घेऊन करणार काय?'

'इतकी हत्यारं काय इथंच सोडून जायची? तसं असेल तर मग बांग्लादेशमध्ये जायचं काहीच काम नाही!' कमांडंट आपला निर्णय सांगतो.

'आम्ही हत्यारं बरोबर घेतल्यावरही काही शिल्लक रहातील- त्यांचं काय?'

'त्यांच्याबद्दल मी ऑर्डर देतोय. तीनजण एक्स्ट्रा सेन्ट्री आर्मरीच्या छतावर ड्यूटीसाठी थांबतील. इथंच ताडपत्री फिट् करा. क्विक! आणि सगळे इन् फुल युनिफॉर्म विथ् आर्म्स टु बांग्लादेश कॅम्प,' कमांडंट उठून उभा रहातो.

## एकशे बारा

# 'टु बांग्लादेश विथ् आर्मस्'

पाऊस आणि वारा यांच्यामुळे गेल्या काही दिवसांपासून संपूर्ण कॅंप जणू दबून गेला आहे. बुधवारची गोष्ट सोडून दिली, तरी गुरुवार संध्याकाळपासून पावसाने या कॅंपला जणू गिळून टाकलंय. साधारणपणे रात्रभर पाऊस झाला की सकाळी ऊन पडतं. त्यामुळे कुणाचं नुकसान होत नाही, उलट रात्री झोप चांगली होते. संपूर्ण पावसाळ्यात दोन-चारदा रात्रीचा पाऊस सकाळीही चालू रहातो, संपूर्ण दिवस चालू राहून संध्याकाळच्या सुमाराला थांबतो, किंवा त्या रात्रीही चालूच रहातो, आणि दुसऱ्या दिवशी आकाश स्वच्छ होतं. त्यामुळेही काही अडत नाही- पावसाळ्यात किमान दोन-चारदा असा पाऊस झाल्याशिवाय भागणार कसं? पण सलग तीन दिवस दिवसरात्र चाललेल्या या पावसाने कॅंपला जणू गिळून टाकलाय. एरवीही इथं काम काही नाही. तरीही सकाळची पी.टी., आठवड्यांतून एक दिवसं रूट मार्च, भाजीपाल्याची लागवड करणं, ड्यूटी शिफ्ट, दिवसरात्र एकेका ग्रूपने सीमेवरच्या इलाख्यात पहारा देणं- या सगळ्या कामांमध्ये दिवस कामाच्या गडबडीतच जातो. पण अशा पावसात ही सगळी कामं एक-एक करीत बंद होतात. पी.टी. सर्वात आधी बंद होते,

रूटमार्चचा तर प्रश्नच येत नाही, ड्युटीशिफ्ट नियमाप्रमाणे होते खरी, पण आर्मरीचा व्हरांडा सोडता इतर कुठल्याही ठिकाणी ती लक्षात येत नाही. रात्रंदिवस बसून-झोपून किंवा पत्ते खेळूनही वेळ जाता जात नाही. एकेकावेळी वाटतं, या कॅम्पवर माणसंच रहात नसावीत. आळस झटकण्यासाठी कुणी मोठ्या आवाजात बोलतं-ओरडतं, ते सोडलं, तर इथं माणसाचा स्वाभाविक आवाजच ऐकू येत नाही.

कमांडंटने हुकूम दिल्याबरोबर सगळा कँप जणू खडबडून जागा झाला. वाऱ्याच्या आवाजातूनही ऐकू येईल, अशा मोठ्या आवाजात बोलणं, हाका मारणं सुरु झालं. जे मैदान गेल्या काही दिवसांपासून रिकामं पडलं होतं, त्यावर, डोक्यावर वॉटरप्रूफ कापड घेऊन काहीजण पळत गेले. काही व्हरांड्यातलं काम आटपू लागले. बांग्लादेशच्या कँपने दिलेल्या निमंत्रणाने सगळ्या कँपला जागं केलं.

उमेन, रामाशिश आणि असिन्दिर यांनी आर्मरीच्या छतावर ताडपत्रीचं झाकण टाकलं.

## एकशे तेरा

# बांग्लादेशच्या दिशेने कूच

दरम्यान कँपच्या ध्वजवंदनाच्या मैदानात एकेक करीत सगळे जमा झाले आहेत. आता पावसामुळे कुणीही व्हरांड्यात उभं राहिलेलं नाही, उलट सगळ्यांनाच जणू व्हरांड्यात मैदानात येण्याची घाई आहे. प्रत्येकाने युनिफॉर्म घातलाय, पायात गमबूट घातले आहेत आणि अंगावर वॉटरप्रूफ विभूती घोष उभा राहून शिट्टी वाजवतोय.

बटुक बर्मन, परशमणी सुन्दास, आषाढू, सुभद्र आणि पंचानन मागून ओढीत-ओढीत, ढकलीत-ढकलीत एक ढकलगाडी घेऊन आले आहेत. गाडी बरीचशी जीपला जोडल्या जाणाऱ्या ट्रेलरसारखी आहे. मोठमोठी, टायर लावलेली चाकं, समोर दोन लाकडी, जुवांसारखे दंड, ते धरून गाडी ओढता येते. ते गाडी आणून ठेवतात, आणि पुन्हा परत जातात.

आता ते खांद्यावरून एकेक करीत दोन बकरे, दोन बंडल्स केळीची पानं, पॉलिथिनच्या कापडात गुंडाळलेली काही पाकिटं घेऊन येतात, गाडीत ठेवतात. बकरे गाडीत इकडे - तिकडे पहातात, पाय आपटतात, काहीवेळ बँऽ बँऽ करीत ओरडून नंतर गप्प होतात. त्यांच्या अवस्थेत एवढ्यात काही परिवर्तन न झाल्याने त्यांच्या मनातली संकटाची शंका दूर झाल्यासारखी वाटते, पण तरीही ते पुन्हा दबल्या आवाजात बँऽ बँऽ करतात.

अनेकजण तोवर पावसात येऊन उभे रहातात. पाऊस-वारा त्यांच्या अंगावर येऊन धडकताहेत, पण तरीही इतके लोक मैदानात येऊन उभे राहिल्याने जणू त्यांनी पाऊस-वारा यांना नाकरलंय असं वाटतं.

कमांडंट आपल्या खोलीतून हळूहळू खाली उतरतो. एक जवान पळत जाऊन त्याच्यासाठी रेनकोट घेऊन येतो. कमांडंट तो घालतो.

'काय घोष? चला, स्टार्ट करा. तुम्ही काय व्यवस्था केलीय?'

'आर्मरीवर तीनऐवजी सहाजण ड्यूटीवर रहातील. आर्मरीत पाणी घुसलं. तर ते आर्म्स ॲम्युनिशन बाहेर काढून वर छतावर ठेवतील. हीच व्यवस्था. ते सहाजण वगळता आपण सगळे चाललो आहोत.'

'चला तर मग, उशीर करण्यात फायदा काय?'

गाडीतून एक बकरा खालच्या आवाजात ओरडतो, 'बँ ऽऽ' दुसरा आणखी खालच्या आवाजात ओरडतो, 'बँऽ.'

'काय, फॉल इन् करू का?' घोष कमांडंरला विचारतो.

'करा, चांगलं मार्च करीत-करीत जाता येईल.'

'पण मग ही गाडी कशी नेता येणार?' बटुक विचारतो.

कमांडंट घोषकडे पाहून म्हणतो. 'मग असेच चला.'

घोष म्हणतो. 'नाही. फॉल इन् करायलाच हवं. फॉल इन् करून आर्मरीत जाऊन आर्म्स घेऊ, त्यानंतर पुन्हा फॉल इन् मग डिस्पर्स.'

कमांडंरने मान हलवल्यावर घोष ओरडून हुकूम देतो, 'फॉऽल इऽन!'

सगळेजण येऊन रांगेत उभे रहातात. पावसाच्या आवाजापेक्षा चिखलात आपटल्या जाणाऱ्या गमबूटस्‌चा आवाज अधिक येतो. घोष पुन्हा हुकूम देतो, 'ॲटेऽन्शन!' घोषच्या हुकुमाने रांग चालू लागते. घोष 'लेफ्ट-लेफ्ट' करीत आर्मरीच्या दिशेने पुढे जातो. लाईन आर्मरीजवळ पोचल्यावर एक जवान हातात गमबूटस् घेऊन पळत-पळत येऊन लाईनच्या शेवटी येऊन उभा राहातो.

सगळेजण रांगेने आर्मरीत जाऊन आपापली रायफल खांद्यावर झुलवीत येतात आणि पुन्हा रांगेत उभे रहातात.

प्रत्येकाने खांद्यावर रायफल घेतल्याबरोबर लाईनचा चेहरामोहराच बदलून जातो. वारा-पाऊस अवांतर होतात, आणि सेनेचं काम जणू अधोरेखित होतं-भारताच्या सीमेचं रक्षण.

कमांडंट घोषला म्हणतो. 'काही अंतर मार्च करीतच घेऊन जा, मग सोडा.'

एक जवान येऊन कमांडटसमोर त्याचा बेल्ट आणि रिव्हॉल्व्हर धरतो. कमांडंटने रेनकोट थोडा बाजूला केल्यावर जवान त्याला बेल्ट बांधतो. घोष आदेश देतो, 'तुम्ही

चारजण गाडी घेऊन या. अॅटेन्शन!'

नंतर, घोषच्या आदेशानुसार लाईन एका छंदात चालालया सुरुवात करते. त्यांच्या उजव्या खांद्यावर रायफल्स झुलताहेत.

सगळी लाईन घासबनाच्या दिशेने चालू लागते. घासाखाली लपलेली वाट सैनिकांच्या पावलांमुळे पुन्हा तयार होऊ लागते.

## एकशे चौदा

# पुराच्या वाऱ्यात दोन बकरे

संपूर्ण रांग घासवनात गेल्यावर घोष ऑर्डर देणं बंद करतो, पण लाईन मात्र ऑर्डर असल्याप्रमाणे तालातच चालत रहाते. आसपास विस्कळित होण्यासाठी इथे जागाच नाही. हळूहळू वाऱ्यामुळे वॉटरप्रूफ रेनकोटस्च्या कॉलरी आणि बाजू फडफडू लागतात.

घासाने झाकलेला हा रस्ता म्हणजे पायवाट नाही. बॉर्डर कँपपासून दगडविटांचे तुकडे अंथरून, ते रोलरने दाबून तयार केलेला हा रस्ता आहे. वर्षातून एकदा त्याची दुरुस्ती होत असल्याने रस्ता चांगल्या अवस्थेत आहे. रांगेच्या शेवटी दोनजण गाडी ढकलताहेत, दोनजण ओढताहेत. दोन बकरे ताडपत्रीखालून बाहेर येऊ पहाताहेत, त्यामुळे ताडपत्री वरखाली होतेय. वाऱ्याच्या मोठ्या झोताचा ताडपत्रीत प्रवेश झाल्याने, नंतर काही काळ बकरे गुपचूप बसतात.

रस्ता संपण्यापूर्वीच तिस्तानदीचा आवाज कानावर पडतो. कमांडंट लाईनच्या मागे-मागे चालला होता. लाइनमधून घोष बाजूला येऊन उभा रहातो; मग कमांडंटकडे वळून म्हणतो, 'नदीचा आवाज ऐकलात?'

कमांडंट अद्याप नदीचा आवाज वेगळा असा ओळखू शकत नाही. तोवर लाईन आणखी पुढे गेलीय. घोष तरीही होकारार्थी मान हलवतो.

घासवन संपतं, तिथे लाकडाच्या फळ्यांनी तयार केलेला एक उंच सेंट्री बॉक्स आहे-खरं तर एक खोलीच. तिला दरवाजाही आहे. तो वाऱ्याने बंद होतोय, उघडतोय्. कमांडंट एकदा पाहून ओरडतो, 'एऽ, तो दरवाजा बंद करून या.' मग म्हणतो, 'लास्ट कोण ड्यूटीवर होतं? दरवाजा उघडा ठेवूनच आलं?' लाइनमध्ये सर्वात मागे, कमांडंटच्या समोर जे दोघेजण होते, त्यांच्यातला डावीकडचा जवान लाईनमधून बाहेर येऊन सेंट्रीबॉक्समध्ये जातो.

सेंट्रीबॉक्सच्या खाली, काटेरी तारांचं कुंपण, त्यामध्ये गेट. समोरचे दोघेजण गेट ढकलतात. गेटमधून बाहेर गेल्यावर कुणीकुणी वळून उभे रहातात, कुणी हात वर करून

आळस देतात, कुणी उजवीकडे पहातच रहातात.

इथे अगदीच कोवळा घास, आणि घासामध्ये चिखल आहे. उजवीकडे न वळता सरळ गेलं, की नदी. घासबनातून येताना वाऱ्याचा जो आवाज आला होता, तो गेटमधून बाहेर आल्याबरोबर जणू बदलून जातो. हे असं कसं? वारा एकाच प्रकारे वहातोय, पावसाचे थेंबही एकाच प्रकारे पडताहेत, पण सैनिकांचं चालणं बदलून गेलं. आतापर्यंत रांगेत चालण्याचा एक वेगळा आवाजा होता, तो आता नाही. आता नदीचा आणि वाऱ्याचा आवाज मिळून तयार होणारा झंझावात कानी येतो. इतर कुठलाही आवाज आता ऐकू येत नाही.

गाडी गेटपाशी येऊन अडकते. गाडी आणणाऱ्या चार जणांपैकी एकजण गेट नीट उघडतो, मागचे जवान धक्का देऊन गाडी आत घुसवतात. थोडं अंतर जाऊन गाडी पुन्हा अडकते. उपेनजवळ तेव्हा बटुक बर्मन उभा होता. तो ओरडतो, 'गेट जरा वर धरा बरं, वर धरा!' तो स्वत:च गेट उचलून धरतो, आणखी दोघेजण त्याला मदत करतात. कशीबशी गाडी आत जाते.

कमांडंट ओरडतो, 'गेट बंद करून टाका.'

घोष म्हणतो, 'हो, नाहीतर पुराचं पाणी आत यायचं.'

कमांडंट म्हणतो, 'सगळ्याच गोष्टींना उत्तरं असतात घोष! हा दरवाजा रोज उघडला जायला-बंद व्हायला हवा. तसं का होत नाही?

तोपर्यंत गाडी वळवण्यात आली होती. पुन्हा चालणं सुरू झालं. जे पुढं गेले होते, ते यांना थांबलेले पाहून, वळून पुन्हा मागे आले होते. पण गाडी पाहून, थांबून, पुन्हा वळून सरळ चालू लागले.

'घोष, सगळ्यांना सांगा, बांगलादेशाच्या कँपमध्ये जाण्याआधी पुन्हा एकदा लाईन करा. मार्च करीत प्रवेश करायला हवा. कमांडंट म्हणतो. घोष एका जवानाबरोबर हा निरोप पुढच्या दलाकडे पाठवतो. तो पळायला सुरू करतो, पण रेनकोट आणि वाऱ्याच्या धक्क्यामुळे पुढे जाऊ शकत नाही.

'घोष, चला, नदी पहात-पहात जाऊ' म्हणून कमांडंट नदीच्या दिशेने चालायला सुरुवात करतो.

सैनिकांचे आता चार गट होतात. एक गट पुढे निघून गेलाय्. गाडी गेटबाहेर आणण्यासाठी गेट उघडण्यात जे गुंतले होते, त्यांचा एक गट होतो. कमांडंट, घोष आणि दोन जवान नदीच्या दिशेने जातात. गाडी घेऊन आता सहाजण चाललें आहेत. पुढच्या जवानांना सूचना देणायासाठी घोषाने ज्या जवानाला सांगितलं होतं, तो एकटाच पुढे वेगाने निघाला होता.

भारताच्या या 'सीमान्तरक्षी बाहिनी' मध्ये (सीमा-सुरक्षा दलामध्ये) स्थानिक

लोकांबरोबर पश्चिम बंगालमधील नाना जिल्ह्यांचे लोक आहेत. नदिया जिल्ह्यातलेच अधिक. शिवाय कमांडंट जणू पश्चिम बंगालचा नाही, बांग्लादेशामधला आहे. काहीजण नेपाळी आहेत. बरेच जण बिहारी आहेत. तीन पंजाबी होते, त्यांची बदली होऊन गेली. दहग्रामच्या अशा या 'इंडिया' (ज्याला पुराच्या वेळी इंडिया विसरून गेला) वरून लक्षात येतं की, 'इंडिया' हा खूप मोठा देश आहे.

## एकशे पंधरा

# देशासाठी दुःख

कमांडंटला नदीजवळ जावं लागत नाही, त्याआधीच काही काही ठिकाणी नदीच त्यांच्याजवळ येते. हे मैदान तर काही समतल नाही, कुठं उंच आहे, कुठं खोल आहे, त्या खोलगट जागांमध्ये पाणी घुसलं आहे त्यावरून वाटतं की, आणखी थोड्या वेळातच हा भाग पूर्णपणे वाहून जाणार. कमांडंट अशा जागी उभा राहून पहातो-नदीचं पाणी येऊन या खोलगट जमिनीवर आदळून पुन्हा परत जातयं, पुन्हा नवीन प्रवाह येऊन आदळतोय्.

'घोष, बघितलात हा प्रकार?'

'हो, इथं असं पाणी आहे, म्हणजे आपल्या कॅम्पच्या उत्तरेकडचा दक्षिणपाडा तर वाहून गेला असणार आतापर्यंत, नाही का?'

'कसा? तिथले लोक वर कँपमध्ये येणार होते, अजून आले नाहीत ते?'

'त्यांना समजलं असावं की कँपही वाहून जाणार, म्हणून दुसरीकडं कुठंतरी गेले असावेत बहुधा!'

'दुसरीकडं कुठं जाणार? बाकीची तर सगळी फॉरेन लँड आहे!'

फॉरेन लँडमध्येच गेले असतील आतापर्यंत. नाही गेले तर वाहून नाही जाणार ते.?

नदीच्या आणखी जवळ जाण्यासाठी ते दोन पावलं पुढे जातात, पण लगेच थांबतात-नदीचे किनारे दिसणं तर दूरची गोष्ट, समोर थोड्या अंतरावर नदी आता दिसत नव्हती. नदी आणि आकाश आता वेगळं करता येत नव्हतं. वारा हू हू करीत वहातोय. नदीच्याच वेगाने, पण विपरीत दिशेला. त्या वाऱ्यामुळे पावसाच्या धारा जमिनीवर पडत नाहीयेत. वाऱ्यामुळे आडव्या होताहेत, उडून जाताहेत, आकाशात आवर्त निर्माण करताहेत. त्यामुळे नदीच्या पात्रावर असं धुकं तयार झालयं की काहीच दिसत नाहीय्. नदीचा प्रवाह जमिनीच्या उतारानुसार धावतो. इतकं पाणी जेव्हा अशा उतारावरून धावतं. तेव्हा त्याचा एक वेगळा असा. आवाज येतो, गगनभेदी असा, पण आता तर उलट्या दिशेने वहाणाऱ्या वाऱ्यामुळे तो आवाजही काही पटींनी वाढलाय. वाऱ्याचा आणि

पाण्याचा स्रोत या दोघांच्या संघर्षातून जो आवाज येतोय, त्यामुळे वाटतं, नदी आपल्या पात्रातून सरकून नवीन पात्र तयार करणार.

दूरवर ओरडल्यासारखे आवाज येतात. कमांडंट विचारतो, 'कुणाचं ओरडणं हे?' कान टवकारून, थोडं ऐकून घोष म्हणतो, 'कुणी ओरडत नाहीय्. आपली पोरंच गाणं म्हणाताहेत!'

'मग लवकर चला, नाहीतर पुन्हा अंधार व्हायचा. तुमच्याकडं टॉर्च आहे ना?' कमांडंट विचारतो.

'होय सर, आहे!' एकजण जवान म्हणतो, आणि रेनकोटमधून टॉर्च काढून दाखवतो.

नदीच्या किनाऱ्यानेच तो जरा वेगाने चालू लागतात. वेगाने चालायला रहातात. वाऱ्याचा धक्का जोरात लागतो, पाय खाली करून चालतात-पावसाचे थेंब तोंडावर कमी पडावेत, म्हणून कमांडंट एकदा हाताने चेहरा पुसून घेतो.

थोडं पुढे गेल्यावर ते गाडीजवळ येतात, दोन्ही बकरे तारस्वरात ओरडतात. घोष म्हणतो, 'या बकऱ्यांना जणू ताडपत्रीने यांनी दाबून मारलंय्. ए, जरा त्यांना सांगा बरं ती ताडपत्री काढायला!'

एक जवान पुढे पळाल्यावर कमांडर हाक मारतो, 'घोष!'

घोष काहीच उत्तर देत नाही. पण कमांडंट पुढे काहीच न बोलल्याने घोष विचारतो, 'काही म्हणालात मला?'

कमांडंट चालता-चालता गोषकडे पहातो, पण काही बोलत नाही, तो वेगानेच चालत होते. श्वासांचा आवाज जोरजोराने येतोय्. कमांडंट काहीतरी विचार करतोय्.

कमांडंट पुन्हा पुकारतो, 'घोष!'

यावेळी घोष म्हणतो, 'बोला!'

'आज तर बकरे-बिकरे कापून पिकनिक होणार ना?'

'हो तर! त्यांनीच तर निमंत्रण दिलंय्. पण आपलेच बकरे कापून आपल्याला खिलवणार?'

तो जवान गाडीजवळून परत येतोय्.

'उद्या दुपारपर्यंत पाऊस पडत रहाणार म्हणे?'

'पडत राहिला तर बरं! बांग्लादेशाच्या कॅंपमध्येच रहाता येईल. तो सोडला तर जाणार कुठं? पाणी पाहिलं नाहीत? रात्रीतून सगळं वाहून जाईल.'

'होय्. वाटतंय खरं तसं. इकडच्या नद्या फार गोंधळात टाकणाऱ्या असतात. आमच्याकडच्या नद्या पाहून तुमच्या लक्षात येतं, तुम्हाला टाईम मिळतो. पण इकडच्या नद्या म्हणजे एकदम ट्रेचरस. काही अंदाजच करता येत नाही यांचा.'

ते सारे दुसऱ्या दलाला मागे टाकतात. कमांडंटच्या चालण्याची गती पाहून तेही वेगाने चालू लागतात.

'इथं पहाड आहे. पहाड भेदून पाणी इथं उतरतं. हे बघा, मी काय म्हणतोय, ही गाडी पुन्हा मागे पाठवा. तांदूळ, डाळ आणि बटाटे आणा गाडीतून. यांच्या कँपमध्ये किती दिवस रहावं लागणार, कोण जाणे! आणि आपल्या कँपमध्ये पाणी शिरल्यावर धान्य सगळं नष्ट होऊन जाईल ना!'

'सगळे तांदूळ आणायचे?'

'जमले तर आणा; नाहीतरी मग जमतील तितके आणा.'

घोष एकदा मागे वळून पहातो, मग समोर पहातो, 'या चिखलातून एवढं लोड घेऊन येऊ शकेल का ही गाडी? अडकून बसेल.'

काहीच उत्तर न देता कमांडंट चालत रहातो. मग म्हणतो, 'जितकी पोती गाडीत आणता येतील, तितकी आणा, नाहीतर मग जवानांनी खांद्यावर आणावीत.'

'इतका रस्ता खांद्यावर आणायची पोती?'

'जमतील तेवढी आणा तरी!'

ते समोरच्या दलाजवळ पोचतात, ते उभेच होते. थोड्या अंतरावर बांग्लादेशाचा कँप-हिरवा पत्रा दिसतोय-सेन्ट्री बॉक्स. इथूनच रांगेत जायला हवं. सगळेजण मागून येणाऱ्यांची वाट पहातात, एकीकडे बांग्लादेशाच्या कँपकडे पहातात. भारताच्या सीमान्त रक्षा दलाला (सीमा सुरक्षा दलाला) फक्त इतकंसं अंतर दूर आल्यावर जणू असहाय वाटतं, आता खरोखरच त्यांना देश सोडून जावं लागतंय्. ते जसे बांग्लादेशाच्या कँपकडे पहाताहेत, तसेच आपण आलेल्या रस्त्याकडेही पहाताहेत. तो रस्ता म्हणजेच तर इंडिया आहे, त्यांचा देश.

## एकशे सोळा

# बांग्लादेशात इंडियाचं सीमा सुरक्षा दल

जवळजवळ सगळ्यांचेच रेनकोट आणि टोप्यांचे समोरचे भाग भिजलेले आणि मागचे कोरडे होते. बंदुका आता त्यांच्या खांद्यावर झुलत नव्हत्या, हातात धरलेल्या होत्या. माना ताठ होत्या. सर्वात पुढे कमांडंट, सर्वात मागे घोष, त्यांच्याही मागे गाडी. घोषच्या 'लेफ्ट-राईट-लेफ्ट'च्या तालावर भारतीय सीमा सुरक्षा दलाचे सैनिक बांग्लादेशाच्या कँपमध्ये प्रवेशतात.

त्यांना बघितल्याबरोबर बांग्लादेशाचा कमांडर लुंगी घालून, उघड्या अंगानेच

पावसात बाहेर येतो. पण भारतीय सैनिकांचं असं परेड करीत येणं पाहिल्यावर ताबडतोब आत जाऊन गणवेषातील खाकी शर्ट घालून येतो. पँटही घालावी असं त्याला वाटतं, पण मग बूट घालावे लागणार असा विचार करून तो लुंगी-शर्टवरच आता सामोरा येतो. एकजण त्याच्या डोक्यावर छत्री धरून येतो, पण वाऱ्याने ती छत्री उलटी होते, म्हणून तो दुसरी छत्री आणायला आत जातो.

दरम्यान घोषच्या आदेशाप्रमाणे भारतीय दल 'सावधान' मधून 'विश्राम' मध्ये आल्याबरोबर बांग्लादेशचा कमांडर भारतीय कमांडंट उराउरी भेटतो आणि म्हणतो, 'अरे दादा, आपण तर आम्हाला असं परेड करीत येऊन घाबरवूनच सोडलंत!' व्हरांड्याच्या दिशेने येताना कमांडर सगळ्यांना हाताच्या निर्देशाने 'या!' असं सांगतो. व्हरांड्यात येण्यापूर्वी कमांडर अचानक थांबून म्हणतो, 'अरे भाई थांबा. 'घोऽष!'

घोष आल्याबरोबर कमांडंट बकऱ्यांकडे निर्देश करीत त्याला म्हणतो, 'किचनमध्ये पाठवा!'

'हे काय? किचनमध्ये काय?' कमांडर विचारतो.'अरे भाताबरोबर खाण्याजोगे दोन बकरे होते आमच्याकडं. तिकडं थंडीने मेले असते. म्हटलं, ते जरा भारत-बांग्लादेश मैत्रीच्या कारणी लागोत. चला, चला'

कमांडर आणि कमांडंट व्हरांड्यात जातात-न-जातात तोच बांग्लादेशाच्या कँपमधून सगळे हे-हे करत मैदानात उतरतात, भारतीय जवानांना अगदी हातांना धर-धरून व्हरांड्यात घेऊन येतात. व्हरांड्यात पोचल्याबरोबर भारतीय जवान आधी टोप्या काढतात, त्यानंतर रेनकोटस् काढू लागतात. बांग्लादेशाच्या जवळजवळ प्रत्येकाचा वेश लुंगी-बनियान असाच आहे, काहीजण फक्त लुंगीवरच आहेत. त्यामुळे यावेळी खरोखरच वाटत रहातं की, भारतीय सैनिक या कँपवर आमंत्रणावरून जेवण्यासाठीच आले आहेत.

भिजलेले रेनकोटस् व्हरांड्यातल्या खुंट्यांना टांगणे, भिजलेले गमबूट काढून व्हरांड्यात एका बाजूला ठेवणे यात सुरवातीची काही मिनिटं जातात. दरम्यान गाडीत पिशव्यांमध्ये ठेवलेले आपले पायमोजे किंवा लुंग्या, गमछाय इत्यादी कपडे जवान घेऊन येतात. एक जवान कमांडंटच्या कपड्याची पिशवी आणून त्याला देतो. काही वेळानंतर जेव्हा भारतीय जवान पायमोजे किंवा लुंगी आणि त्यावर बनियान घालून गप्पा करायला किंवा पत्ते खेळायला बसतात, तेव्हा दोन देशांच्या सीमा-सुरक्षा दलांच्यामध्ये चेहेऱ्यांच्या बाबतीत फारसा फरक रहात नाही. बंगाली भाषेच्या उच्चारणीतील वैचित्र्य जितकं बांग्लादेशाच्या सैनिकांमध्ये, तितकंच भारतीय सैनिकांमध्येही दिसतं. फक्त रामाशिश आणि परशमणि हे वेगळे आहेत. बांग्लादेशच्या कॅम्पमध्ये हिन्दीभाषी कुणीच नव्हतं, नेपाळी तर नाहीच. रामाशिश आणि परशमणि तेवढ्यात किचनमध्ये जाऊन, बिर्याणीशिवाय आणखी काही पदार्थ होणार आहेत का हे विचारून येतात.

किचनमध्ये बांग्लादेशच्या सीमा सुरक्षा दलातले सैनिकच स्वैपाक करताहेत. ते म्हणतात, 'का बरं दादा? आमटी करणार ना, हरभऱ्याची आमटी!'

रामाशिश म्हणतो, 'बस् बस्! हमलोग व्हेज खायेगा. दो आलू और बैंगन डाल दी उसमें, बस्!'

किचनमधल्या लोकांना आधी 'व्हेज' या शब्दाचा अर्थ समजत नाही. त्यासाठी त्यांना जरा विचार करावा लागतो 'निरामिष खाणार? मांस खाणार नाही? का?'

परशमणि म्हणतो, 'नाही, आम्ही तरी खात नाही. आम्ही व्हेजच खाणार.'

बांग्लादेशच्या एकजणाला अचानक समजतं. तो रामाशिशला मिठी मारून, 'अरे दादा!' म्हणून 'हे हे' करून हसतो. त्यानंतर आपल्या सहकाऱ्यांकडे पाहून म्हणतो, 'दादांना वाटतंय आपण त्यांना गोश्त खायला देऊ- हेः हेः हेः हेः!'

इतकी मोठी बातमी तर काही दाबून ठेवता येणार नाही. रामाशिश आणि परशमणिला घेऊन किचनमधले सगळेजण व्हरांड्यात येतात. ज्या हॉलमध्ये सगळेजण मनोविनोदन करीत होते, त्याच्या दरवाजात उभा राहून एकजण ओरडतो, 'अरे, सगळ्यांनी ऐका रे!'

इतकेजण दरवाजात येऊन ओरडू लागल्याने सगळ्यांची नजर तिकडे जाते. तेव्हा किचनमधील तो कर्मचारी रामाशिश आणि परशमणि यांच्याकडे निर्देश करून म्हणतो. 'इंडियातले हे दादा किचनमध्ये येऊन म्हणतात काय, आम्ही निरामिष खाणार. त्यांना वाटतं आपण त्यांना गोश्त खिलवणार.'

सगळे यावर हसल्यावर रामाशिश दोन्ही हात वर करून म्हणतो, 'अरे नाही, आम्ही विचार केला, क्या पकाते हैं जरा देखके आयेंगे!' परशमणि आणि रामाशिश बसतात. किचनमधील लोक पुन्हा किचनमध्ये जाण्यासाठी वळतात. एकजण म्हणतो, 'दादांसाठी मुर्ग्याची चार पिसं ठेवतो.' आतून एकजण म्हणतो, 'शेपूट आणि कोंबड्याचा तुराही दे त्या दादाला!'

परशमणी आणि रामशिश ताबडतोब एका पत्त्याच्या खेळात सामील होतात. पत्ते खेळता-खेळता, किंवा नुसतं पडल्यापडल्या कुणी जवान हिंदी सिनेगीत गुणगुणतो. बांग्लादेशचा कुणीतरी म्हणतो. 'अरे दादा, जरा मोठ्या आवाजात गा ना, आम्हीपण ऐकू!' दोन्ही देशांची सिगारेटची पाकिटं वेगवेगळी आहेत. दोरीवर वाळत टाकलेले युनिफॉर्मसुद्धा वेगवेगळे आहेत. भिंतींवर चिकटलेले सिने नट-नट्यांचे फोटो वेगळे आहेत - त्यांचे चेहेरे भारतीयांच्या ओळखीचे नाहीत.

दोन्ही कँपमधील लोक एकमेकांच्या ओळखीचे आहेत. अनेकजण अनेकांना नावाने हाक मारतात. बाजारात भेटी होतात, ड्युटी करीत असताना भेटी होतात. अशी घनिष्ठता नसती, तर बांग्लादेशच्या सीमेवरील कँपच्या कमांडरने, पूर आल्यामुळे भारतीय

जवानांना आमंत्रण देणं शक्य झालं असतं का?

पण या घनिष्ठतेत कधी असं एका ठिकाणी रहाणं-जेवणं होत नाही. म्हणूनच हा जो आनन्द होतोय, तो पिकनिकच्या आनंदासारखाच आहे. त्या आनंदाला सगळेजण जरा वाढवू पहातात.

बांग्लादेशचा कमांडर भारतीय कमांडंटला विचारतो, 'दादा, तुमच्यासाठी एक स्कॉचची बाटली ठेवलीय. काढू बाहेर?'

कमांडंट कॉटवर पहुडून म्हणतो, 'काढा!'

## एकशे सतरा

# दोन सेनापतींचा संवाद

कमांडरच्या खोलीत दोन कँपकॉटस टाकलेल्या आहेत- त्यांच्या मध्यभागी भिंतीला टेकून एक टेबल, टेबलावर एक कंदील, आणि कॉटस्च्या पायांच्या दिशेला दोन दरवाजे- दोन्हीकडच्या पॅसेजेसमध्ये उघडणारे.

कमांडंट लुंगी आणि सँडो बनियन अशा वेशात उत्तरेकडच्या खाटेवर बसतो. रिव्हॉल्व्हरसह आपला बेल्ट काढून त्याने उशीजवळ ठेवलाय. कमांडर टेबलावर दोन ग्लास ठेवतो. नंतर खुर्चीखालून एक पत्र्याची सूटकेस बाहेर काढतो, टेबलच्या ड्रॉवरमधून चावी काढून ती ट्रंक उघडतो आणि तिच्यातून बाटली बाहेर काढून टेबलवर ठेवतो, कुलूप बंद करून सरळ होऊन उभा रहातो. किल्ली ड्रॉवरमध्ये टाकून पायाने सूटकेस खुर्चीखाली ढकलतो.

'आपली तर भाई चांगली सोय आहे ही- सिगरेट फर्स्टक्लास मिळतात तुम्हाला, दारूही फर्स्टक्लास मिळते,' बेन्सन अँड हेजेसचं पाकीट हाताने उचलून कमांडंट म्हणतो.

'सोय आपलीही काय कमी असते का? स्कॉच घेणारे स्कॉचच घेतात!' कमांडर बाटलीचं झाकण उघडतो.

'आपली मजा आहे बाबा, आपल्याकडं अस्सल फॉरेन माल मिळतो. आणि या सिगरेट - या तर आपल्या सगळ्या दुकानांत मिळतात ना?'

'अरे इंडियात जशा कॅप्स्टन, तशा बांग्लादेशात या सगळ्या सिग्रेटी!'

'पण या अस्सल फॉरेन आहेत. आमच्याकडं आमच्या स्वतःच्या फॅक्टऱ्या आहेत, फॉरेन मिळणार कुठून?'

'आमच्याकडं एक स्टेट एक्सप्रेसची फॅक्टरी आहे, पण तीही पूर्ण फॉरेन.'

कमांडंटसमोर ग्लास पुढे करून कमांडर ग्लास घेऊन स्वतःच्या खुर्चीत बसतो.

कमांडरचं वय फार नाही. रंगपूर गावचा हा राजवंशी तरुण, त्याच्या बोलण्यात राजवंशी भाषेतून बाहेर येण्याचा प्रयत्न दिसतो. पण रंगपूरच्याच या बॉर्डरवर काम करीत असल्याने ती संधी त्याला फारशी मिळत नाही. कमांडंटचं वय अधिक आहे - त्यामुळेच त्या दोघांमध्ये दादा - भाई असा संपर्क तयार झालाय खरा, पण एरवीही या दोघांमध्ये भारताच्या कमांडंटच मोठेपणा मिळाला असता. कमांडंट इथं लुंगी-बनियन वेशात बसलेला असला, तरी प्रचंड मोठ्या भारताचा नागरिक म्हणूनच - बांग्लादेशच्या तुलनेत भारत म्हणजे खरोखर एक महादेशच म्हणायला हवा. ग्लास उचलून म्हणतो, 'काय, टोस्ट करणार ना? काय करणार? भारत - बांग्लादेश मैत्री?'

कमांडर थोडं हसतो, 'ती ज्यांना करायचीय त्यांना करू द्या. आपण तर काही हा पूर नसता तर इथं आला नसता. पुराच्या नावाने टोस्ट करू.'

कमांडंट हेः हेः करीत हसतो, 'अरे, चांगलेच तल्लख दिसताय तुम्ही! तर मग कोणत्या पुराच्या नावाने टोस्ट करणार - ज्या पुराच्या भीतीने आम्ही इथं आलोय त्याच्या, की ज्या पुरामुळे आम्ही आणखी दोन दिवस रहाणार आहोत, त्याच्या?'

कमांडर होः होः करीत हसतो - 'कुठल्या पुराच्या नावाने कोण जाणे!' ग्लास उचलून तो कमांडंरच्या ग्लासला लावीत कमांडर म्हणतो. 'थ्री चीयर्स फॉर फ्लड!'

कमांडंट एक घोट घेऊन ग्लास ठेवून म्हणतो, 'आपणाकडं पूरग्रस्त येऊन उतरलेत, ते कुठं?'

कमांडर आपल्या डोक्याच्या दिशेचं कुंपण दाखवून म्हणतो, 'तिकडं - किचनममागे दोन ताडपत्र्यांच्या छावण्या करून दिल्या आहेत. संध्याकाळी तर शंभराच्या आसपास लोक होते, आता नक्कीच आणखी वाढले असणार. इंडियाचेही लोक आहेत असं ऐकतोय. संध्याकाळी तर इंडियाचेच लोक जास्त आले, आता.'

'ते तर इंडियाच्या कँपमधून आले. जाणार कुठं हो? आपण काय कँप उघडलात की काय?'

'अरे नाही नाही, फक्त ताडपत्र्यांच्या छावण्या केल्या आहेत. जरा पावसातून निवारा मिळेल, आणि पाणी उतरलं की निघून जातील. हा भाग तर खूप उंचावर आहे.'

'इथं टी.व्ही. नाही?'

'आहे की पहाणार? आता भाषण चाललंय. थांबा. सिनेमा सुरू व्हायच्या वेळी जाऊ वाजले किती आता?'

कमांडर उशीखालून घड्याळ काढून पाहून म्हणतो, 'सात.' कमांडंट स्वतःचं घड्याळ पाहून म्हणतो, 'माझ्या घड्याळात तर साडेसात वाजलेत, तुमचं घड्याळ स्लो आहे की काय?'

'अरे नाही, घड्याळ तर मी रोज लावतो.'

'माझं घड्याळ तर भाई फास्ट चालत नाही कधी.'

ज़रावेळानंतर होः होः हसत कमांडंर म्हणतो, 'अरे आपला तर इंडियाचा टाइम आहे, आमचा बांग्लादेशचा टाइम आहे. इथं नऊला सिनेमा दाखवतात. बघू.'

'आमच्या नॉर्थ बेंगालमध्ये तर सगळे बांग्लादेशचेच टी.व्ही. कार्यक्रम बघतात, तुमचे, आणि दिल्लीचे. कलकत्ता तर लागतच नाही.'

'आमच्या साऊथ बेंगालमध्ये कलकत्ता दिसतं, थंडीत.'

'टी.व्ही. एक, नदी एक, फ्लड एक, फक्त टाईम वेगळा?'

'कसा काय? सिगरेट वेगळी, दारू वेगळी-'

'नदीही वेगळी होणार.'

'कुठली नदी? तिस्तामाय?'

'माय का बाय कोण जाणे. आमच्या इंडियात तर पहाडाच्या तळाशी प्रचंड तिस्ता बॅरेज बांधायचं काम चाललंय.'

'तिस्तेवर बॅरेज?'

'हो. स्लुईस गेट. पूर येणार नाही. पाणी अडकून राहील. हिवाळ्यात ते सोडतील. प्रचंड बॅरेज. तिस्तेच्या प्रवाहामध्ये.'

'साला मग आम्हाला पाणी कुठून मिळणार?'

'तुम्हाला काय कमतरता आहे पाण्याची? दरवर्षी तर पूर येतो!'

'पूर आल्यामुळेच तर रंगपूरजवळ, पाटग्रामात, पीक चांगलं येतं. पुरात माणसं मरतात ती तुमची, पण पीक चांगलं येतं, ते आमचं!'

'त्यासाठीच बॅरेज होणार. तिस्ता बॅरेज! पूरही येणार नाही, माणसंही मरणार नाहीत.'

'पण नदीचे तर भाग होतील. चावी आपल्या हाती रहाणार- तुम्ही पाणी दिले, तर आम्हाला मिळणार नाहीतर दुष्काळ!'

'दुष्काळ तर दुष्काळ! तेव्हा फक्त टीव्हीच एक राहील. तुम्ही कलकत्ता केंद्र पहा, आम्ही रंगपूर केंद्र पाहू! बाकी सगळं वेगवेगळं - नदी वेगळी, पूर वेगळा, टाइम वेगळा.'

'वेगळेपण इतकं वाढवणं बरं नव्हे!' कमांडर कमांडंटचा ग्लास परत भरून देऊन, स्वतःचाही ग्लास भरून घेतो.

## एकशे अठरा

# घोषचं इंडियात एकदा पुनरागमन

घोष अगदीच एकटा होऊन जातो.

बांग्लादेशच्या कँपमध्ये जवान जवानांमध्ये मिसळले आहेत, कस्टम्सचे लोक

कस्टम्सच्या खोलीत गेले आहेत, फोनचे लोक फोनच्या लोकांच्या खोलीत गेले आहेत. पण घोषचीच जणू कुठे खोली नव्हती.

खरं तर आहे हे नक्कीच. बांग्लादेशच्या कँपमध्ये कमांडर आणि जवान यांच्यामध्ये कुणी नाही की काय? पण घोषशी त्याचा परिचय अद्याप व्हायचाय. बांग्लादेशच्या कँपमध्ये पोचल्यावर, कसाबसा एक कप चहा घेऊन घोष त्या सहा जवानांबरोबर गाडी घेऊन बाहेर पडतो. जमतील तितकी डाळ-तांदळाची पोती आणायला हवीत.

वाऱ्याच्या दिशेने ते निघाले. पाऊस आता रेनकोटस्च्या पाठींवर पडत होता. लवकर पोचलं म्हणजे बरं होईल.

डाळ-तांदूळ नष्ट झाले असते, तर त्यात काही नुकसान नव्हतं, उलट फायदाच होता. हेडक्वार्टरहून नवीन रेशन आलं असतं, आधीचं कमी किमतीत विकून टाकून कमांडंटलाही त्यातला काही भाग घेता आला असता. पुरानंतर अशा वस्तूंची आवश्यकता असतेच. पण नवीन रेशन यायला उशीरही झाला असता - किमान काही दिवसांसाठीचं रेशन ठेवायला हवं. घोष मनातल्या मनात हिशेब करीत चालतो. नदीत जे पाणी दिसतंय्, त्यावरून आज कॅम्पमध्ये पाणी नक्कीच शिरणार. पाणी किती दिवस रहाणार - याचा मात्र अंदाज करता येत नाही. घोष अधूनमधून नदीच्या दिशेने टॉर्च मारतो, पण टॉर्चचा प्रकाश पावसाच्या धारांमधून फारसा दूरवर पोचत नाही.

जवान पळतच गाडी ओढीत पुढे चालले आहेत. ते आधी पोचले, तरी त्यांना थांबावं लागणार - गुदामाची चावी घोषकडे आहे.

मध्येच, आपण रस्ता चुकलो की काय असं त्याला वाटतं, पण नाही, तो सरळच चाललाय. काही पावलं गेल्यावर ओळखीच्या खुणा दिसतात. तो टॉर्च लावून काही पावलं डावीकडे जातो- त्यांच्या कॅम्पचं तारांचं कुंपण सुरू झालं. पण मघाशी दिसलेले पाण्याचे प्रवाह गेले कुठे?

सेन्ट्रीबॉक्सचा दरवाजा उघडाच होता- गाडी पुढे गेलीय. दरवाजातून पुढे गेल्याबरोबर छप् करून पाण्यात पाऊल पडलं. घोष पायाजवळ टॉर्च मारतो- गमबूटखाली गढूळ पाणी- म्हणजे पुराचं पाणी कँपमध्ये घुसलंय. टॉर्च बंद करून काही पावलं छप्-छप् करीत घोष जातो. आकाशात अंधुकसं चांदणं आहे - त्यात ढग दिसताहेत. पायापाशी पाण्याच्या रेखा डावीकडून उजवीकडे पळताहेत.

टॉर्च वाऱ्यात हलवून घोष विचारतो, 'काय रे, तुम्ही आलात का?'

कँपच्या व्हरांड्यात दोन-तीन टॉर्च लागतात. ते ओरडून काहीतरी म्हणतात- ऐकू येतं, समजत नाही. मैदान पार करून घोष अगदी गुदामासमोर जाऊन उभा रहातो- व्हरांड्याखालीच गाडी ठेवलीय.

व्हरांड्याच्या पायऱ्या चढता-चढता घोष म्हणतो, 'पाणी तर घुसलंय!'

जवानांपैकी एकजण म्हणतो, 'हो सर! आर्मरीच्या व्हरांड्यातून तर काही त्यांच्यापैकी कुणी उतरलं नाही.'

'जरा टॉर्च धरा बंर,' गुदामाचं कुलूप उघडता-उघडता घोष विचारतो, 'काय, पाणी व्हरांड्यात शिरणार की काय?'

'ते तर शिरणारच सर! जाताना काही नव्हतं, आणि आता सगळीकडं पाणी दिसतंय!'

गुदामाचा दरवाजा उघडल्याबरोबर वाऱ्यामुळे त्याचं दार मागे जाऊन पुन्हा समोर आपटतं, बंद होतं. एकाचवेळी अनेक टॉर्च लागतात. ते सारे दरवाजा ढकलून गुदामात शिरतात.

'हे पाहा, तुम्हाला जेवढं ओझं ओढून नेता येईल, तेवढंच घ्या, उगाच मध्ये रस्त्यात फेकून देण्याची वेळ येऊ देऊ नका.'

'सर, एक पोतं तांदूळ आणि एक पोतं आटा नेता येईल.'

'मग तेवढंच न्या. जमलं तर एक छोटं पोतं भरून डाळ घ्या.'

एक जवान दरवाजा धरून उभा रहातो, दुसरा जवान एक-एक अशी दोन पोती आणून व्हरांड्याच्या टोकाशी ठेवतो. ते गुदामातून बाहेर गेल्यावर घोषला टॉर्चच्या उजेडात दिसतं, खाली एक सीलबंद केरोसीनचा डबा आहे. एकदा त्याला वाटतं, जवानांना पाठवून देऊन तो डबा स्वतःच्या खोलीत नेऊन ठेवावा. लगेच वाटतं, जाऊ द्या, नंतर बघू.

'ऐका रे!' घोष दरवाजाकडे टॉर्चचा उजेड टाकतो. एक जवान पुढे येतो.

'हा केरोसीनचा डबा या पोत्यांच्या वरती ठेवून द्या,' घोष टॉर्चचा उजेडात जवानाला डबा दाखवतो. जवान तो डबा तांदळाच्या पोत्यावर नीट ठेवून देतो.

सगळे जवान खाली उतरून गेले होत. घोष पुन्हा त्यातल्या एकाला बोलावतो, त्याच्या मदतीने वाऱ्याने हलणारा दरवाजा बंद करतो. जवान पुन्हा उडी मारून खाली उतरतो. तोवर गाडीचं जू पुढून दोघांनी धरलंय्, मागून दोन जण ढकलू लागले आहेत.

'एऽ, तुम्ही पोती काढल्यानंतर गुदामात किती पोती राहिली?' घोषने विचारल्याबरोबर ते थांबतात, पण कुणीच काही बोलत नाही. थोड्या वेळानंतर एकजण हसून म्हणतो, 'काहीच दिसलं नाही हो, असे गुदामात गेलो, अन्, असे बाहेर आलो.' तो हेः हेः करीत हसतो, बाकीचेही आपल्या हसण्याचा आवाज त्याच्या आवाजात मिसळतात.

'अच्छा अच्छा, जा, मी जरा आर्मरी बघून येतो.'

ते 'हूं' करून गाडी ओढतात, आणि पुढे जाऊ लागतात. त्यांच्याकडे पाठ करून घोष व्हरांडा आणि खोल्यांच्या दरवाजांवरून टॉर्च फिरवतो. वाऱ्याच्या आघाताने

दरवाजांमधून आवाज येतोहेत, पण माणसं इथं कुणीही नाहीत. थोड्या वेळापूर्वीच कँप माणसांनी कसा गजबजलेला होता, नाही?

समोरच्या व्हरांड्यातूनच घोष आर्मरीच्या दिशेने टॉर्च फिरवतो, 'तुम्ही सगळे ठीक आहात ना रे?'

'हो सर, ठीक आहोत!'

घोष टॉर्च चालू ठेवूनच थोडा पुढे जातो. त्यानंतर मोठ्या आवाजात म्हणतो. 'उद्या सकाळी तुमच्याबदली दुसरे जवान आल्यावर तुम्ही बांग्लादेश कँपवर या.'

'पाणी तर वाढतंय. पाणी वाढलं, तर बदली जवान येणार कसे, सर?'

घोष थोडा विचार करतो, मग पुन्हा काही पावलं आर्मरीच्या दिशेने जाऊन, टॉर्च तिकडे वळवून म्हणतो, 'हे पहा, पाणी वाढलं तरी कोणी-ना-कुणी येईल. व्हरांड्यात पाणी आलं तर तुम्ही धाब्यावर जा.' मागून एक आवाज येतो. गाडी सेंट्रीबॉक्सच्या पुढे गेल्याचा.

'आम्ही ठीक आहोत सर, काळजी करू नका!' व्हरांड्यातून उत्तर येतं. घोष आता लगबगीने दरवाजाच्या दिशेने चालायला सुरुवात करतो.

## एकशे एकोणीस

# पुरातील एका बलात्काराने चरपर्वाचा शेवटचा अध्याय

घासवनात पाऊल टाकून पाण्यावर टॉर्च मारल्यावर घोषला दिसतं, सगळा रस्ता पाण्याखाली गेलाय. घास सरळ झालाय. एवढ्यात पाणी आणखी वाढलं की काय? घोष छप् छप् करीत गेटजवळ पोचतो. ते गेट उघडंच ठेवून गेले आहेत. बाहेरून गेट बंद करण्यासाठी वळल्याबरोबर घोषला सेन्ट्रीबॉक्सच्या पायथ्याजवळून कुणीतरी हाक मारतं, 'बाबू!' -स्त्रीचा आवाज.

घोष दचकतो. टॉर्च लावल्याबरोबर ती स्त्री गेटमधून बाहेर येते. गेट आणखी न ढकलता, टॉर्च चालूच ठेवून घोष विचारतो, 'काय प्रकार आहे?'

'नाही बाबू, मला कँपमध्ये यायचंय, तुमच्याबरोबर.'

'कँप? कुणाचा कँप?'

'पूरग्रस्तांचा कँप, बाबू. माझं गाव वाहून गेलं.'

'आं!' घोष गेट बंद करून चालायला सुरुवात करतो, ती स्त्रीसुद्धा त्याच्या मागे-मागे जाते. गाडी बरीच पुढे गेलीय. वाऱ्यातून आवाज येतोय. वाऱ्याचा धक्का जोरदार

आहे. घोष थोडा मागेच सरकतो. मग थोडं वाकून चालायला सुरुवात करतो. मधूनमधून टॉर्च लावतो.

काही पावलं गेल्यावर, ती स्त्री मागून येत असावी असा त्याला संशय येतो. मान वळवून, टॉर्च लावून तो पहातो- स्त्री तर येतेच आहे. बरोबर एक कुत्रंही.

चालता-चालता घोष विचारतो, 'कोणत्या गावच्या तुम्ही?'

'दक्षिणपाडाची, बाबू.'

'तुम्ही एकट्या इतक्या रात्री का निघालात? तुमच्या घरची माणसं कुठंतय?'

'मला घर नाही बाबू. माणंसही नाहीत. मी झोपले होते. बाकीची सारी माणसं पाणी येताना पाहून कुठंतरी निघून गेली.'

स्त्रीचा आवाज घोषला ऐकू येत नाही. तो जरा हळू चालतो, स्त्री त्याच्या बरोबर येते, आणि ते कुत्रंही.

'तुम्ही गावच्या लोकांबरोबर का गेला नाहीत?'

'मला बोलावलं होतं त्यांनी, पण मी गेले, तेव्हा नाव नव्हती.'

'असं! म्हणजे तिथली माणसं नावेने कँपवर गेली?' एकटं जाण्याऐवजी गप्पा मारीत जाण्यात घोषला जणू चागलं वाटतंय.

'सगळे नावेने गेले. मग मी चालत निघाले.'

'आता गाडी घेऊन गेले त्यांच्याबरोबर का गेला नाहीत तुम्ही?'

'भीती वाटली. इतकी माणसं ओरडत होती. विचार केला, त्यांना पुढं जाऊ द्या, मी मागं-मागं जाईन. तेवढ्यात तुम्ही एकटे येताना दिसला. मग वाटलं, आपण बाबूंसंगे जाऊ.'

'तुम्ही इंडियाच्या?'

'नाही बाबू. माझं कुणीच नाहा?

'तसं नाही. तुमचं गांव इंडियात आहे की बांग्लादेशात?'

'नाही बाबू'. माझं कुणीच नाही.

'तुमचं घर नाही?'

'नाही बाबू. मला घर नाही हो.'

'तुम्हाला कुणी नातेवाईक नाहीत?'

'नाही बाबू. कुणीही नातेवाईक नाहीत.'

'तुमचा इंडिया-बांग्लादेशही नाही?'

'नाही बाबू. माझं कुणीच नाही.'

या भागातला कुठला भाग कुठपर्यंत भारत आणि कुठला भाग कुठपर्यंत बांग्लादेश हे समजणं मुश्किल. स्त्रीचा देश समजावा म्हणून घोष विचारतो, 'तुम्ही कुणाचं नांव

ऐकता-राजीव गांधीचं की इरशादचं?'

'नाही. ही नावं मी ऐकलेली नाहीत.'

'तुमच्याकडे मतदान होतं? पंचायत असते?'

'होत असेल बाबू. मतदान होत असेल.'

घोष डावीकडे पहातो. अंधुकसं चादणं तिस्तेवर असं पडलं आहे, की वाटतं, तिस्ता एखाद्या भिंतीसारखी आकाशापर्यंत उंच गेली आहे. घोष उजवीकडे पहातो. दोन देशांच्या सीमान्तांमधला हा मालकीविहीन प्रदेश आता पुराच्या पाण्याखाली चाललाय. बांग्लादेशकडून भारताच्या दिशेने वारा पुरासारखाच वाहत येतोय. थांबून घोष त्या स्त्रीवर टॉर्चचा प्रकाश टाकतो. ती प्रथम टॉर्चकडे पहाते, मग डोळे बारीक करते. कुत्रं त्या स्त्रीजवळ, टॉर्चच्या प्रकाशाच्या वर्तुळात येऊन उभं रहातं.

'काय बघताय बाबू? मला बघता आहात?'

टॉर्च बंद करून घोष पुन्हा चालायला सुरुवात करतो. ती स्त्री इतकी भिजलेली होती, की पाहूनही काही समजत नव्हतं. वाऱ्यामुळे म्हणा की दुसऱ्या काही कारणामुळे म्हणा, घोषची गती जर कमी होते. कँपमध्ये त्याच्या खोलीत त्या स्त्रीला नेता आलं असतं, तर तिला जरा कोरडं करून पहाता आलं असतं. कँप तर आता सुनसानच आहे. जाता येईल. पण आर्मरीच्या व्हरांड्यातून जवानांनी टॉर्च लावले तर? घोषला आधी जाऊन, त्या स्त्रीला नंतर यायला सांगता येईल. पण ती मागून आली नाही तर? हो, सेन्ट्री-बॉक्समध्ये नक्कीच जाता येईल.

घोष आवंढा गिळून विचारतो, 'कँपमध्ये तुमचं कोण आहे?'

'कुणी ना कुणी तरी असणारच बाबू!'

'पण तुमचे कुणी नातेवाईक नाहीत म्हणालात ना?'

'नाही बाबू. मला घर नाही हो.'

'इंडिया-बांग्लादेशही नाही?'

'नाही बाबू. यातलं माझं काहीही नाही हो.'

'तुम्हाला देश नाही? एकही?'

'नाही. मला देश नाही हो.'

'मग कँपमध्ये तुमचं कोण असणार?'

'माणसं तर असतील ना बाबू, पुरात सापडलेली माणसं!'

गाडी ओढून नेणाऱ्यांचे आवाज घोषला आता ऐकू येत नाहीत. ते खूप दूर, पुढे गेले-आहेत. किंवा तिस्तेचा आवाज वाढला आहे. म्हणजे ते चालत-चालत तिस्तेजवळ आले आहेत का-किनाऱ्यापाशी? घोष डावीकडे टॉर्च वळवतो- जमिनीवर गढूळ पाणी, नंतर तिस्तेवरचं धुकं. तो टॉर्च वळवून प्रकाश त्या स्त्रीवर टाकतो. ती आपादमस्तक

चिंब भिजलेली आहे. ती स्त्री पुन्हा चेहरा वर उचलून विचारते, 'काय बघताय बाबू? नदीला पूर आलाय?'

टॉर्च चालूच ठेवून घोष त्या स्त्रीच्या समोर उभा राहून आपले दोन्ही हात तिच्या खांद्यांवर ठेवतो. स्त्रीच्या मागेमागे टॉर्चचा प्रकाश सीमेअलीकडच्या प्रदेशात अकारण पडतो. त्यात, कुत्रं दुसरीकडं तोंड करून उभं राहिलेलं दिसतं. इतके दिवस सीमेवर नोकरी करतोय घोष- त्याला समजतं. ज्यांना घरदार - देश नाही, नातेवाईक नाहीत, अशाच अनेक लोकांपैकी ही एक स्त्री आहे.

घोष त्या आपादमस्तक भिजलेल्या स्त्रीला भणाणा वहाणाऱ्या वाऱ्यात, भिजलेल्या मातीवर झोपवतो. . .

चरपर्व इथंच संपवायला हवं. यानंतर ती स्त्री कँपमध्ये जाईल. तिथे ती इतर पूरग्रस्त लोकांबरोबर राहील. त्या पूरग्रस्तांपैकी अनेकांना कुटुंब आहेत, घरं आहेत, बांग्लादेश-इंडिया तर आहेतच. या स्त्रीसारखेही दोन-तीनजण असतीलच. तिथं ती स्त्री पुन्हा झोपी जाऊ शकेल. घोषने तिला, ती भिजलेली असताना भिजलेल्या मातीवर झोपवलं होतं, ही तिच्या जीवनातली एक न सांगण्यासारखी गोष्ट असेल.

पर्वाचं शेवटचं प्रकरण म्हणून बलात्कार योग्य वाटत नाही. तो प्रकार जणू परस्परसंमतीनेच घडला. पण तरीही तो बलात्कारच होता, कारण विरोधाची, असहमती दाखवण्याची काही संधीच त्यात नव्हती.

चरपर्व इथेच पूर्ण होवो.

पहाडाच्या पायथ्यापासून बांग्लादेशच्या आंतरराष्ट्रीय सीमेपर्यंत तिस्तानदीत कितीतरी चर आहेत. काही चर तर काठांपेक्षाही कायम आहेत. पण काठ जसे वाहून जातात, तसे हे सगळे चरही राहून जाऊ शकतात. दरवर्षी या चरांवर रहाणाऱ्या माणसांना आपण बेघर होऊ असं भय वाटतं.

चरांवर रहाणाऱ्यांना पाणी आणि माती याचा संपर्कच महत्त्वाचा वाटतो. ते हृदयाने नव्हे, तर शरीराच्या सवयीने या गोष्टींकडे पहातात. चरांवरची माती चांगली असते, श्रम केले, तर चांगलं पीक देते. प्रत्येक जमिनीची स्वतःची काही पिकं असतात. तिस्तेच्या वाळवंटात एवढी चांगली टरबुजं होतील असं पूर्वी कुणाला वाटलं तरी होतं का?

पाण्याशीही मैत्रीचा हाच धागा कायम रहातो. तुम्ही अगदी पाण्याच्या मध्ये येऊन चरांवर पीक काढता किंवा डांगा किनाऱ्यावर पीक काढता, ते पाण्याने आपली जागा सोडून दिल्यानेच ना?

पण पावसाळ्याच्या महिन्यांत पाण्याशी असलेला मैत्रीचा संपर्क तुटून जातो. पाण्याचं सामर्थ्य तेव्हा माणसाच्या सामर्थ्यापेक्षा अनेक पटींनी अधिक असतं. त्या काळात पाण्याशी मैत्री ठेवण्याचा प्रयत्न करणं म्हणजे मृत्यू, आणि वैर करणं म्हणजेही मृत्यूच.

तेव्हा माणसाने पाण्याच्या मार्गातून दूर व्हायचं असतं. बऱ्याचदा असं दिसतं, की पाणी उतरल्यावर माणसं पुन्हा आपल्या जुन्या घरांमध्ये परत येतात. पण दोनेक चर पुरात वाहूनही जाऊ शकतात. ती अनिश्चितता राहतेच. त्याला काही उपायही नसतो. त्यामधून परित्राणही नाही आणि उद्धारही नाही. म्हणून माणसं चर सोडू - सोडू म्हणूनही सोडीत नाहीत; जणू चर न सोडल्यास तो त्यांच्याच मालकीचा राहील.

पाणी, आकाश - यांच्यापैकी कुठलीही गोष्ट देशाच्या सीमेपेक्षा मोठी नाही. वारा आणि प्रकाशाला मात्र कुठलीच सीमा नाही. त्यांच्याव्यतिरिक्त सर्वच गोष्टींना, तत्त्वांना सीमा असते. त्या सीमा जेव्हा नष्ट होतात, तेव्हा त्या सीमा निर्धारित करणाऱ्या शासनाचा सांगाडाही कोसळतो. सीमा-सीमांदरम्यानच्या इतक्या पळापळीनंतरही, ज्यांना कुठलाही देश नाही, कुठलीच सीमा नाही अशी कितीतरी माणसं असतात. सीमान्त केवळ त्यांच्या बलात्कारित जीवनाची आणखी विडम्बना करतो! त्या विडम्बनेमधून तिस्तेकाठच्या देशहीन माणसांनाही मुक्ती नाही.

आता मुक्तीच नाही म्हटल्यावर चरपर्वाची कहाणी पूर्व होवो- नदीसारख्या तरल जमिनीवर नदीसारख्याच भिजलेल्या स्त्रीला जिथे सीमांमधल्या प्रदेशात झोपावं लागतं, तिथे ही कहाणी पूर्व होवो.



## एकशे वीस

# आपलचांद फॉरेस्टमध्ये रात्री तीन वाजता

शनिवारी रात्री तीनच्या सुमारास आपलचांदमध्ये तिस्तेच्या किनाऱ्यावर उभे राहून गयानाथ आणि असिन्दिर तिस्तेचा पूर पहात होते. असिन्दिरच्या एका हातात पाच सेल्सचा टॉर्च होता, आणि एका हाताच्या मनगटावर सीको घड्याळ चमकत होतं-. त्या वाऱ्यात, पावसात आणि पुरातही असिन्दिरच्या मनगटावर ते घड्याळ चमकत होतं. आकाशात तारे असते, तर तेही असेच चमकले असते. बाघारू पूर पहात होता. तिस्तेवर राखी, गढूळ रंगांचं आकाश, राखी रंगाचा प्रकाश. पण, किनाऱ्यावर खूप झाडंझुडपं असल्याने अंधार होता. त्या अंधारात बाघारू आणखी एखाद्या झाडाप्रमाणेच उभा होता.

आपलचांद फॉरेस्टमध्ये जिथं गाजोलडोबा होतं, तिथं, शनिवारी संध्याकाळीच तिस्तेने काठ ध्वस्त केला. का ध्वस्त होता-होता रात्री बाराच्या सुमाराला तिथं एक छोटा झराच जणू तयार झाला. पण, ज्याच्यामधून तिस्तेचं पणी धोधो करीत आपलचांद मध्ये शिरेल, असा तो झरा नव्हता - फक्त किनाऱ्याला धडका मारून आणखी माती वाहून नेईल, असा होता. तिस्तेचा पूर उतरल्यावर तो झराही सुकून जाईल. पहाता-पहाता झाडाझुडुपांमधले, जंगलातले खड्डे बुजून जातील. इथं तिस्तेचा एक झरा घुसला होता, हे एक वर्षानंतर लक्षातसुद्धा यायचं नाही.

असिन्दिरच्या हाती टॉर्च असूनही, तो टॉर्च लावीत नाही. गयानाथ आणि असिन्दिर किनाऱ्यावर उभे राहून तिस्तेकडे पहात रहातात - जणू तिस्तेतून कुणीतरी अवतीर्ण होणार आहे.

गयानाथ म्हणतो, 'किती झाडं पडली बघ ना!'

असिन्दिर म्हणतो, 'कितीवेळा बघायचं सालं! चार पडली, त्यानंतर काही नाही.'

गयानाथ विचारतो, 'तुला काय वाटतं? अर्जुनाचं झाड पडेल की नाही?'

असिन्दिर उलटा प्रश्न विचारतो, 'तुम्हाला काय वाटतं बापू? पाणी आणखी धक्के मारणार, की थांबणार?'

याला प्रतिसाद म्हणून गयानाथ तिस्तेच्या प्रवाहाकडे आणखी नीट पहातो. तिस्तेचं पाणी आणि आकाशातले ढग यांचा रंग तेव्हा अगदी सारखाच गढूळ आहे. त्यामुळे तिस्तेच्या पाठ्याची गती वेगळी ओळखू येत नाही. पण हे दोघे रात्री बारापासून पहाताहेत. इतक्या वेळपासून पहाता-पहाता डोळ्यांनी तिस्तेचं पाणी मोजण्याच्या बऱ्याच पद्धती त्यांनी शोधून काढल्या आहेत. बऱ्याच वेळपासून पहात असल्याने, कोणत्या ठिकाणी प्रवाह मोठा होऊन, डावीकडे वळण घेऊन या किन्याऱ्याकडे येतो आहे हे आता त्यांच्या लक्षात येतं. त्या वळणावर हा अंधुक प्रकाशही थोडा चमकतो आहे. प्रवाहाच्या आवर्तात

जेव्हा अधिक पाणी घुसतं व आणखी वळण घेतं, तेव्हा तिथं प्रकाश जरा अधिक चमकतो.

तसं थोडंसं पहाताच गयानाथ म्हणतो. 'एऽ बाघारू, बघ बरं पाणी वाढलंय की नाही ते!' बाघारू किनाऱ्यावरून झप् करून नव्या झऱ्यात उडी घेतो. पाणी मोजण्यासाठी बाघारूने तिथे एक फांदी रोवून ठेवलीय. त्याने पाण्यात उडी मारल्यावरचा आवाज आल्यावर असिन्दर जरा वळून टॉर्च लावतो. टॉर्चच्या झोतामध्ये पावसाचे थेंब दिसतात. दिव्याभोवतीच्या किड्यासारखे. बाघारू त्या प्रकाशात आपली मान खाली करून, पाण्यात पाहून सांगतो, 'नाही हो!' त्यानंतर उभा रहातो. टॉर्च विझतो. बाघारू अर्जुनवृक्षाची एक फांदी घेऊन वरती येतो.

हे अर्जुनाचं झाड कधी पडणार याची गयानाथ आणि असिन्दिर वाट पहाताहेत. पण अर्जुनवृक्षाच्या बुंध्याजवळची निम्मी माती वाहून गेली, तरी झाड सरळच उभं आहे. मध्ये एकदा गयानाथच्या सांगण्यावरून बाघारूने झाड ढकलून पाहिलं होतं. या प्रवाहाचा जोर पहाता, त्यामुळे हे झाड बहुधा कधीच पडणार नाही हे बाघारूला ठाऊक आहे. झाडाच्या फांद्या तुटून आसपास पसरल्या आहेत. त्या फांद्या वाहून जाण्याइकता काही इथे प्रवाहाचा जोर नाही. उलट या झाडामुळे प्रवाह इथे अडेल, किंवा नरम माती धुपवून उजवीकडे वळेल.

असिन्दिर म्हणतो, 'आता आणखी उशीर करण्यात अर्थ नाही, सोडून द्या पाण्यात, बापू, सोडून द्या झाड पाण्यात.' गयानाथ प्रवाहाच्या वळणाकडे पहात म्हणतो, 'मग दे की, सोडून दे, बाघारूला सांग कुऱ्हाड घेऊन यायला.'

असिन्दिर बाघारूला हाक मारीत नाही. तो वळतो आणि टॉर्च लावून बाघारूकडे जातो. त्याने लुंगी आणि गमबूट घातले आहेत. प्रचंड वारा सुटलेल्या अंधारात तो ओरडतो. 'एऽ बाघारू!' बाघारू जवळून म्हणतो, 'बोला!' टॉर्च लावून असिन्दिर बाघारूला आपादमस्तक पहातो. त्या उजेडात वाऱ्याने वाकणारी झाडं आणि भिजलेलं जंगलही दिसतं. असिन्दिर तिस्तेच्या दिशेने टॉर्च मारून आपल्या सासऱ्यालाही बघून घेतो. बाघारूला नीट पाहून घेऊन तो म्हणतो, 'कुऱ्हाड घेऊन ये, म्हातारा हाक मारतोय.'

अंधारात दोन पावलं पुढे जाऊन बाघारू एका झाडाच्या ढोलीत लपवून ठेवलेली कुऱ्हाड एका झटक्यात बाहेर काढतो. झप् करून झुडपांत काहीतरी पडतं. बाघारू विसरला होता-कुऱ्हाडीबरोबर नायलॉनच्या दोरीची दोन बंडलंही तिथं ठेवलेली होती. ती झुडुपांतून उचलून घेऊन तो गयानाथकडे जातो. गयानाथ नदीकाठच्या भागात उभा. असिन्दिर जरा आत. हातात कुऱ्हाड घेऊन गयानाथकडं चाललेल्या बाघारूला बघून असिन्दिरला जरा भीती वाटते-पुन्हा तो आपल्या शर्टच्या खिश्यातून सिगारेट आणि लायटर बाहेर काढतो.

बाघारू आपल्या मागे येऊन उभा राहिल्याची गयानाथला चाहूल लागत नाही. तो अद्याप प्रवाहाच्या त्या वळणाकडेच पहातोय. बाघारू हाक मारतो, 'देउनिया-'

'आलास? जा, झाड तोडून टाक नदीत, टाक!'

बाघारू नदीकाठी उभा रहातो. त्यानंतर, मासे धरण्यासाठी जाळं फेकण्यापूर्वी कोळी जसे गुढग्यात थोडं वाकतात, तसं करून बाघारू नदीच्या दिशेने पहातो. तो नदीच्या विस्ताराकडे पहात नाही, आपल्या पायतळीच्या पाण्याकडे पहातो-जणू हे पाणी म्हणजे मासे पाळायच्या हौदातलं पाणी आहे, त्याचा प्रवाहाच्या प्रबलतेशी काही संपर्कच नाही, किंवा असला तरी बाघारूचं त्यात काहीच नुकसान नाही.

## एकशे एकवीस

# बाघारूचं वृक्षकर्तन

बाघारू उजवीकडे वळून, जंगलाच्या आणखी आत जातो. तिथं एक मध्यम आकाराचं सालाचं झाड पाण्यात पडलंय, पण त्याची मुळं अद्याप मातीमध्ये आहेत. बाघारू डाव्या हाताने कुऱ्हाड आपल्या लंगोटीच्या मागच्या बाजूला खेचतो. कुऱ्हाडीचा दांडा त्याच्या पाठीच्या कण्याला समांतर आहे. नायलॉनचं बंडल तो आपल्या डाव्या खांद्याला अडकवतो. बाघारू झाडाची बाहेर आलेली मुळं धरून, ओढून एकदा अंदाज घेऊन त्या झाडाच्या खोडावर पाय देतो-त्या खोडाखालीच तिस्तेचं पाणी आहे. बाघारू डावा पाय खोडावर देतो, पण उजवा पाय जमिनीवरून उचलताना त्याच्या लक्षात येतं, शरीराचा पूर्ण भार तो एकाच वेळी डाव्या पायावर टाकूही शकणार नाही. तो डावा पाय खाली घेतो. पुन्हा सरळ उभा रहातो. मग झाडाच्या विरूद्ध दिशेला जातो. डाव्या हाताने त्याला हे एकच मूळ धरायचं आहे. नंतर तो डाव्या हाताच्या मुठीत मूळ धरून उजवा पाय खोडावर ठेवून फक्त एकदाच पायाने झटका देतो. त्यानंतर झाडाची खालची एक फांदी मुठीत धरून ठेवतो. या काही सेकंदांत तो पाण्यावरून जणू घारीसारखा, दोन्ही हात पंखासारखे पसरून चालत गेला. खालच्या दोन फांद्यांजवळ पोचल्याबरोबर दोन्ही बाजूंना दोन पाय ठेवून बाघारू झाडाच्या मध्यावर बसतो. नायलॉनच्या दोरीची दोन बंडलं एकत्र बांधून त्याने त्यांचं आता एकच बंडल केलय्. तो बंडल बाहेर काढीत नाही, पण त्याचं डोकं जिथे घुसवलेलं होतं, तिथून झटका देऊन बाहेर काढून झाडाच्या खालच्या बाजूच्या दोन फांद्यामधून 8 (इंग्लिश आठ) संख्येच्या आकाराची एक गाठ मारतो. त्यानंतर शरीर सरळ करून तो झाडाच्या पानांमधून आणखी आत डोकं घालतो. पानांमध्ये दोन्ही पंजांनी चाचपून आणखी एक फांदी शोधून बाहेर काढतो, पण त्याला दिसतं, की याच फांदीला आपण आधी गाठ मारलेली आहे. बाघारू तेव्हा डाव्या दंडावरून दोरीचं बंडल हाताच्या बोटांपर्यंत आणण्यासाठी उताणा पडल्या-पडल्या डावा हात आस्ते-आस्ते

झुलवतो, पण दोरीचं बंडल हातातून सुटून जाऊ नये म्हणून मनगट वळवतो. बंडल मनगटाजवळ आल्याबरोबर बाघारू हात नाचवून बंडल बोटांवर आणतो, आणि ते डाव्या हातावर घेतो. पेच घातलेत, आता गाठ मारायला हवी. पण संपूर्ण बंडलाने तर काही गाठ देता येणार नाही. बाघारू उजव्या हाताने मागे खोचलेली कुऱ्हाड बाहेर काढतो. दोरी झाडाच्या खोडावर, त्याच्या डोळ्यांच्या बरोब्बर खाली आहे. तो कुऱ्हाडीचा 'खच्' करून एकच घाव घालतो-दोर तुटले. आता त्याच्या उजव्या हातात कुऱ्हाड, डाव्या हातात बंडल. तो आधी कुऱ्हाड मागे खोचतो, उजव्या हातात बंडलातल्या दोरीचं सुटं टोक आणि गाठीच्या दोरीचं सुटं टोक धरून ठेवून, बंडल डाव्या हाताच्या बोटांपासून कोपरापर्यंत नेतो. त्यानंतर दोन्ही हातांनी गाठ मारतो. झाडावर मुंग्या होत्या. गाठ देताना त्याला इतक्या मुंग्या चावल्या की आधी दोन्ही हात झाडून मग त्याला सरळ व्हावं लागतं. पुन्हा नदीकाठच्या भागात येण्यासाठी बाघारू दोन्ही बाजूंच्या फांद्या धरून उभा रहातो आणि त्यानंतर एक पाऊल पुढे करून मातीत असलेल्या मुळांवर उडी मारतो. त्याच्याबरोबर नायलॉनची दोरी झाडाच्या शेंड्यापासून नदीकाठापर्यंत झुलते. ती आणखी सोडून बाघारू फॉरेस्टच्या आणखी आतमध्ये घुसतो. तिथे एका झाडाच्या खोडाला दोराचे काही वेढे देऊन बंडल झाडासमोर टाकून, उजव्या हाताने पाठीवरुन कुऱ्हाड काढून, पाण्यात पडलेल्या सालाच्या झाडाजवळ येऊन, बाघारू झाडाच्या मुळांचे जे भाग अजूनही जमिनीत रुतलेले होते, त्यांच्यावर वाकतो. बाघारूला काही दिसत नाही. तो उजव्या हाताने चाचपत अंदाज घेतो, पण काहीच अंदाज येत नाही. तेव्हा सरळ होऊन, कुऱ्हाड माथ्यावर उंचावून त्या मुळांवर घाव घालतो. घाव पडल्याबरोबर तो योग्य ठिकाणी पडतोय् हे बाघारूच्या लक्षात येतं. त्यानंतरचे घावसुद्धा त्याच नेमकेपणाने पडत रहातात. शेवटी सारं झाड जमिनीपासून अलग होतं. झाडाच्या शेंड्याखालून पाण्याचा आवाज जरा बदलतो. झाड आणखी झुलायला लागलं आहे, हे बाघारूच्या लक्षात येतं. आणखी दोन घाव दिल्यावर एक थोडासा तीव्र आवाज येतो आणि झाड पाण्यात पडतं. पाण्याचा आवाज अचानक वाढून पुन्हा कमी होतो. 'झुप् झुप्' असा माती पडल्याचा आवाज येतो, त्याहीनंतर झाडाच्या फांद्या नायलॉनच्या दोरीला ओढीत तिस्तेच्या पाण्यात वाहात जाऊ लागतात. बाघारू ताबडतोब कुऱ्हाड पाठीशी खोचतो, झाडाच्या शेंड्याशी जाऊन दोरी धरून पाठीशी ओढल्याबरोबर लक्षात येतं, की झाडाला प्रवाह ओढतोय. तो लगेच बंडल काढून एक-एक वेढा खोलतो. दोरीचा वेढा काढण्यापूर्वीच वेढा पाण्यात वाहून जातो-इतका पाण्याचा वेग आहे, ओढ आहे. बाघारू शेवटचा वेढा सोडीत नाही-नाहीतर त्यालाच पाणी ओढत नेईल. एक वेढा झाडाला ठेवून तो थोडी-थोडी दोरी सोडत राहातो. दोरी सोडल्यानंतर बाघारूला वाटतं, आता आपण प्रवाहाची ओढ सहन करू शकू. तेव्हा झाडावरून शेवटचा वेढा सोडून तो प्रवाहात सोडलेल्या झाडाबरोबर समान वेगाने पळत

गयानाथ-असिंन्दर यांच्या दिशेने जातो. पण दोन पावलांनंतरच पुन्हा एका झाडाला दोरीचा वेढा घालतो. थोडा थांबून पुन्हा दोन पावलं पळतो. पहिलं झाड प्रवाहात सोडण्यापूर्वी त्याला तीन गोष्टींचा अंदाज घ्यावा लागणार - वाऱ्याचा वेग, प्रवाहाची धार आणि स्वत:चा जोर. हा आणखी तीन झाडं प्रवाहात सोडण्यासाठी याप्रमाणे बांधून आणून, नंतर चारही झाडांना बरोबरच प्रवाहात सोडायचं आहे.

इथे, जंगलाच्या आतल्या भागात पाऊस आणि वाऱ्याचा प्रकारच वेगळा आहे. नदीवरून पाऊस आणि वारा या अंधुक प्रकाशात नदीच्या प्रवाहाप्रमाणे, पण विरुद्ध दिशेने पहाडाच्या दिशेने वाहातोय. पावसाचे थेंब जमिनीवर पडू शकत नाहीत. वाराही हूऽहूऽ करीत फॉरेस्टमध्ये घुसतो. या ताराहीन, किंवा आकाशहीन म्हणा, रात्री, किनारा ध्वस्त करून वहाणाऱ्या पुराच्या पाण्याप्रमाणे वारा नदीवरून जंगलात घुसतो, पण त्याला बाहेर पडण्याची वाट सापडत नाही. झाडांच्या पानांनी आकाश इतकं झाकलेलं आहे की वाऱ्याला वरती आकाशात जाता येत नाही. झाडांखाली झुडपांचं गचपण एवढं वाढलेलं आहे, की त्याच्यातूनही वाऱ्याला बाहेर जाता येत नाही. जंगलात जनावरांचा एखादा कळप घुसावा आणि त्याला बाहेर पडायची वाट सापडू नये, तसं वाऱ्याचं झालंय्. सात वाटांनी तो हरवलाय, विखुरलाय्. त्या वाऱ्यामुळे फॉरेस्टमधली झाडं वाकताहेत.

## एकशे बावीस

# गयानाथ जमीन-वृक्ष-पाणी यांच्या स्वरात बोलतो

गयानाथ म्हणतो 'एऽ असिन्दिर, ते अर्जुनाचं झाड पडलं की नाही जरा बघ बरं!' ऽऽ असिन्दिर टॉर्च लावून म्हणतो, 'त्या अर्जुनाच्या झाडासाठी तुम्हाला ती सालाची झाडं गमवावी लागतील', आणि टॉर्च विझवतो. पुन्हा दोघेजण गप्प होतात. आता दोघेही एकाच झाडाच्या खोडावर बसलेले आहेत. गयानाथ तिस्तेकडे, तर असिन्दिर जंगलाकडे तोंड करून. फॉरेस्टमधून आवाज येतोय् - बाघारू शेवटच्या झाडाला दोरीने बांधून पाण्यात सोडून, गयानाथसमोरच्या नदीकाठाखाली तिस्तेत ठेवलेल्या तीन झाडांबरोबर मोळीत बांधण्यासाठी घेऊन येईल. इकडच्या मोठमोठ्या झाडांचा पर्णसंभार नदीतून नदीच्या काठावर आलाय्-अगदी गयानाथच्या पायांपर्यंत. त्या पानांमुळे तिस्ता झाकून गेलीय. गुमगुम् आवाज करीत तिस्तेचं पाणी वहातंय्. आवाजावरून लक्षात येतंय् की मागून पाण्याचे लोंढे प्रचंड वेगाने येताहेत. तिस्तेच्या पुराशी ज्यांची ओळख आहे, त्यांना ठाऊक आहे-तिस्तेचं पाणी जेव्हा खळखळ-छलछल असा आवाज न करता खडकांवर खडक घासल्याप्रमाणे गुमगुम् आवाज करतं, तेव्हा ते सगळ्या गोष्टी वाहून नेतं-घरंदारं, गावं-

वाड्या-बाजार-सगळंच! या तिस्तेच्या पुरामुळे पडलेली झाडं बांधून, प्रवाहात सोडून देऊन नंतर पूर उतरल्यावर ती जिथं काठाशी लागली असतील, तिथं जाऊन ती ताब्यात घेऊन, ती सॉ-मिल्सना विकून हजारो रुपयांचा नफा कमावण्याच्या व्यवसायात हे जावई-सासरे उतरले आहेत. पण, ही झाडं नदीच्या पाण्यात सोडण्याआधी, तिस्तेचा पूरच त्या दोघांच्या दृष्टीने अधिक सत्य आहे-जो पूर जंगलातून पन्नास-शंभर वर्षांची जुनी झाडं मुळासकट उपटून टाकतो, तो पूर या दोघांनाही सहज वाहून नेऊ शकतो- क्षणार्धात! दोघेही त्या पुराचा आवाज ऐकतात.

पण या झाडांवर गयानाथचा एकप्रकारचा हक्कसुद्धा आहे!

गाजोलडाबाजवळ शनिवार सकाळपासूनच तिस्तेने किनारा झुगारायला सुरुवात केली. एकेवेळी तिथेच, फॉरेस्टला लागून गयानाथाची थोडी पैतृक जमीन होती. शेवटी ती सरकारने संपादित केली. गयानाथाने त्याविरुद्ध अपील केलं. त्यात सरकारचाच विजय झाला तेव्हा गयानाथाने जलपाइगुडी कोर्टात सिव्हिल खटला दाखल केला आणि फौजदारी कोर्टात अर्ज केला, की या मामल्याचा निकाल लागेपर्यंत पूर्वीची परिस्थिती कायम ठेवावी. कोर्टानेही विशिष्ट कालखंडापर्यंत पूर्वीसारखी परिस्थिती ठेवण्याचा आदेश दिला. त्या मुदतीनंतर गयानाथने अर्ज केल्यावर कोर्ट म्हणालं, की तिथे पूर्वावस्था कायम ठेवली, तरी गयानाथ व सरकार यांचं नुकसान काही वाढत नाही, मग पूर्वावस्था हवी कशाला? यावर गायनाथचा वकील म्हणाला, की पूर्वावस्था कायम ठेवली नाही, तर फॉरेस्ट डिपार्टमेंट अशीलाच्या जागेवरची सगळी झाडं पाडून टाकण्याची भीती आहे. यात कायद्याचा पेच होता. असं झालं असतं, तर वादींचं मोठं आर्थिक नुकसान झालं असतं, कारण ज्या जमिनीच्या मालकीबद्दल मामला होता त्या जमीनीवरची मुख्य आर्थिक संपत्ती म्हणजे तिच्यावरची झाडं. कोर्ट गमतीने गयानाथच्या वकिलाला म्हणालंही, 'तुमच्यासारखा निकाल लागला नाही, तर गयानाथने ती झाडं सरकारला दान म्हणून देऊन टाकावीत.' ही गोष्ट वकिलाने गयानाथला सांगितली. गयानाथच्या सांगण्यावरून वकीलबाबू कोर्टाला म्हणाले, की या गयानाथचाही भाग आहे असं कोर्टाने जाहीर करावं, त्यानंतर गयानाथबाबू ती झाडं सरकारला दान म्हणून देतील. कायद्याचे पेच न्यायाधीश-वकील यांच्यापेक्षाही गयानाथला चांगलेच ठाऊक आहेत-आपल्या वडिलांकडून आणि आजोबांकडून जमिनीसंदर्भातले कायदे गयानाथ शिकला आहे. सरकारचा वकील म्हणतो, 'सर, अशी ऑर्डर दिली तर तिस्ताबॅरेज बांधण्यात अडचणी येतील.' कोर्ट यावर जरा आनंद वाटूनच म्हणतं, 'मग तिस्ता बॅरेजचा प्लॅन दाखवा आणि त्यांनी या जमिनीची अलाइन्मेंट काय केलीय ते सांगा.' पण सरकारी वकिलांकडे यापैकी काहीच नव्हतं. त्यांनी आपसात बोलून कोर्टाला सांगितलं-'सर, ठीक आहे, यावेळची ऑर्डर द्यायची असेल तर द्या, आम्ही नंतरच्या तारखेला तिस्ता बॅरेजचा मास्टरप्लॅन आणि या जमिनीसंदर्भातला अलाइनमेंटचा

रिपोर्ट सादर करू.' सरकारी वकिलांच्या या बोलण्यामुळे तर गयानाथच्या अगदीच मनासारखं झालं त्याच्या हाती जणू चंद्रच मिळाला. ज्या तारखेला ही विनंती कोर्टापुढे येईल, त्या दिवशी गयानाथ वकील कोर्टाला सांगेल, की सर, सरकारपक्षाने त्यांनी सांगितल्याप्रमाणे कागद पत्रं सादर केली-नसल्याने पूर्वावस्था तशीच ठेवण्याचा आदेश कायम रहावा. सरकारी वकिलांच्या हाती आणखी इतर महत्त्वाचे मामले, त्यामुळे या छोट्याशा जमिनीसाठी कोण मास्टरप्लॅन आणि इंजिनियरांचे रिपोर्टस् गोळा करणार? त्यामुळे सिव्हिल कोर्टात मामला चालू रहातो. आणि या जमिनीच्या संदर्भात पूर्वावस्था तशीच रहाते.

सोमवार-मंगळवारपासून क्रान्तिहाट-गाजोलडोबा- आपलचांदचं आकाशही जड होऊन खाली वाकतं, वारा व पाऊस पडत रहातो. पण उतारावरच्या भागातील पाऊस व वारा यांच्यापेक्षा चढावरील-उंचावरील पाऊस व वारा यांचा प्रकार वेगळा असतो. उतारावरच्या जमिनीवर, भागावर वारा आकाशातून आवलम्बनहीन असा वहात येतो. आणि वरच्या बाजूला, फॉरेस्टजवळ वारा खालच्या बाजूने वर वहात यतो. संतप्त हत्तींचा काही कळप होत नाही, नाहीतर म्हणता आलं असतं-हा वारा जणू संतप्त हत्तींच्या कळपासारखा असतो.

असा पाऊस-वारा असल्यावर तिस्तेचं पाणी वाढणारच. पण ते किती वाढणार आणि किती दिवस रहणार याचा काही अंदाज करता येत नाही. गयानाथ जोतदाराची जमीन चारी दिशांना विखुरलेली आहे. तो या जमिनींबद्दल सिव्हिल कोर्टात मामला करू शकतो, तो या जमिनीवर पूर्वावस्था चालू ठेवण्यासाठी फौजदारीही करू शकतो, पण त्यामुळे आपली सगळी कामं सोडून तो या जमिनीवर पहारा देत काही बसू शकत नाही.

पहारा देवो-न-देवो, शुक्रवारी संध्याकाळी गयानाथला खबर लागते, की आणखी वरच्या दिशेला तिस्तेने उच्छाद मांडलाय- काठ तोडून ती आसपासच्या भागात शिरलीय्. त्यामुळेही गयानाथचं काही बिघडत नाही. कारण तिकडे गयानाथची जमीन नाही, आणि गयानाथचं घरदार तिस्तेपासून दूर आहे. पण शनिवारी दुपारी जेव्हा समजतं, की गाजोलडोबालाही तिस्ता खवळलीय, काठावरच्या भागात घुसलीय्, तेव्हा तो जावयाला बोलावून म्हणतो, 'फटफटी काढ, जमीन बघून येऊ आपली.'

आसिन्दिरच्या मागे बसून गयानाथ, ज्या जमिनीबाबत कोर्टकचेऱ्या चालू आहेत, ती जमीन पहायला जातो. त्याला दिसतं-फॉरेस्टच्या इतक्या आत, घरादारांपासून इतक्या दूर, तिस्ता फॉरेस्टच्या आत घुसली आहे. एका ठिकाणी तर जमीन इतकी धुपून गेली आहे, की तिथे एक वेगळी खाडीच तयार झाली आहे.

तेवढ्यात गयानाथला एक युक्ती सुचली. त्याच्या डोळ्यांसमोर, सुमारे सात वर्षे वयाचं एक सालाचं झाड उपटून पडलंय्.'

'बाघारूला घेऊन ये, टॉर्चही आण,' जो स्वर इथली माती-झाडं-पाणी-यांच्यामध्ये मिसळून गेला आहे, त्या स्वरात गयानाथ म्हणतो. गयानाथला जसा या वाऱ्याचा आणि

पाण्याचा आवाज समजतो. तसाच माती-पाणी यांनाही गयानाथचा आवाज समजतो. त्या तरूण सालवृक्षाच्या मुळांवर पाय देऊन गयानाथ आपल्या जावयाला आदेश देतो 'फटफटी घेऊन ये, तुझा मोठा टॉर्च घेऊन ये, बाघारूला घेऊन ये, एक चांगली कुऱ्हाड घेऊन ये, दोन बंडल चांगली मजबूत, जाड नायलॉनची दोरी घेऊन ये.' असिन्दिर मागे वळल्यावर कदाचित संपूर्ण रात्रसुद्धा लागेल.'

असिन्दर निघून जातो आणि गयानाथ एकटाच वाऱ्या-पावसात तिस्तेचा पूर आणि फॉरेस्टमधल्या झाडांवर पहारा देतो. काही तास तिस्तेच्या पाण्याकडे पहात-पहात गायानाथ त्या लक्ष-लक्ष क्यूसेक्स पाण्याच्या तळच्या मातीलाही जणू पाहून घेतो- मातीचा उतार कुणीकडे आहे, कुठे किती आहे, त्या उतारावर वाळू-दगड साचले आहेत का हे पाहून घेतो. वाऱ्याकडे काही तास पाहून तो जणू वाऱ्याचा वेग मापतो, आकाशाची जी पोकळी पूर्ण करण्यासाठी वारा पूर्वेकडून वहात येतोय, ती पोकळी किती मोठी आहे, ढग किती आहेत, त्यांच्यामध्ये पाणी किती आहे हेसुद्धा मापून घेतो.

या पुराने गयानाथचे बरेच आदेश मानले-जिथं पाणी घुसायला हवं होतं असं गयानाथला वाटत होतं, तिथं खरोखर पाणी घुसलं, आणि प्रवाहाच्या मार्गात आणखी दोन झाडं पाण्यातही पडली.

असिन्दिर बाघारूला मोटरसायकलवर जणू बांधूनच घेऊन येतो-कारण मोरटसायकल चालू असताना बाघारू अनेकदा पडतो. बाघारूजवळ कुऱ्हाड आणि नायलॉनची दोरीही आहे-एक बंडल. आणखी एक झाड पाण्यात पडतं, पण अर्जुनाचं झाड मात्र पडत नाही.

बाघारू चौथ्या झाडाला पाण्यात तरंगत सोडून आधीच्या तीन झाडांजवळ घेऊन येतो.

## एकशे तेवीस

# 'बाघारू रे, तू वहात जा!'

बाघारू नदीकाठी उभा-त्याच्या डाव्या खांद्यावर नायलॉनच्या दोरीचं एक बंडल, उजव्या हाताच्या मुठीत दोरी धरलेली - झाडांना त्याने ओढून आणलंय्, उजव्या हातात कुऱ्हाड झुलतेय्. दोरी बाघारूच्या हातात असली, तरी ती गयानाथ आणि असिन्दिर ज्या एका खोडावर बसले होते, त्या खोडाला बांधलेली होती. गयानाथने आदेश दिल्याबरोबर बाघारू आपल्या मुठीतली दोरी सोडून देईल, तेव्हा प्रवाहाच्या ओढीने झाडं थोडी दूर जातील, त्यानंतर खोडाला बांधलेली दोरी सोडून दिल्याबरोबर वहात जातील. गयानाथ 'सोडून दे!' कधी म्हणतोय्, याची वाट पहात बाघारू उभा रहातो.

गयानाथ असिन्दिरला विचारतो, 'वाजले किती रे?'

असिन्दिर घड्याळ पाहून सांगतो, 'चार.'

'चार?' गयानाथ स्वत:च्या मनाशीच म्हणतो.

नदीवर जो अंधुक प्रकाश होता, तो पुसला जातो. किंवा बराच वेळपासून कमी होत आता नष्ट झाला असेल, आता त्यांच्या लक्षात आलं असेल. दशमी-एकादशीच्या चंद्रावर ढग आल्यानंतर जसा अचानक अंधार होतो, तसंच आता झालंय्. बाघारू आकाशाकडे पहात नाही, गयानाथ व असिन्दिर पहातात. त्यांच्या लक्षात येतं, चंद्रास्त झालाय, आता अंधार अधिकच वाढत रहाणार. सूर्य उगवत नाही, तोपर्यंत. पण सूर्योदय होतो कधी, हे काही दिवसांपासून समजत नाही. तरीही आकाश अंधुक प्रकाशाने भरून जातं, तेव्हा अंदाज येतो.

आतापर्यंत हाच अंधुक प्रकाश नदीवर अंतराळात होता. तिथपासून तो फॉरेस्टच्या सीमेपर्यंत पसरला होता. पण आत मात्र तो प्रकाश शिरू शकत नाही. आता नदीवरही अंधार पसरला होता. फॉरेस्टच्या सीमेवरही अंधार झाला. नदीवर अंधार पसरल्याबरोबर नदीचं पणी जणू बदलून गेलं. आतापर्यंत नदीपासून आकाशापर्यंत एकच गढूळ प्रवाह होता. अधूनमधून तो चमकायचा, आता तेही बंद झालं. पण या अंधारामुळे पाण्याचा गढूळपणा दिसत नसल्याने एक भ्रम होतो - जणू नदीचं पाणी अचानक स्वच्छ झालं, जणू त्यावर रुपेरी चमक आली. जणू नदीचा पैलतीरही दिसतोय्. सगळाच विभ्रम.

असिन्दिर अधीर होतो, 'आताही नाही सोडलीत, तर मग कितीवेळ जागणार? गरज काय जागायची?'

'हो, सोडतो, सोडतो,' म्हणून गयानाथ विचारतो, 'पुराची ओढ किती आहे, झाडं कुठं जाऊन टेकतील याचा अंदाज करावा लागणार, नाही का?

'त्याचा काय अंदाज करणार? उद्या मोटरसायकलवर जाऊन पहाता येईल. नायलॉनच्या दोरीने झाडं बांधलेली असल्याने सगळ्यांना समजेल, की ही झाडं कुणाच्यातरी मालकीची आहेत. आणि टेकून टेकून ती टेकणार एखाद्या चराला. माणसं तर सगळी चर सोडून गेली आहेत. उगीच घाबरू नका. ही तुमची मालमत्ता कुणीही घेणार नाही. फारतर झाडांवर लिहा-गयानाथ अँड कंपनी.'

गयानथ याचं उत्तर देत नाही. तो नदीवरच्या अंधाराच्या दिशेने पहात रहातो. आता तिस्तेचा पुराचा अंदाज घेण्यासाठी अंधाराशिवाय काहीच साधन नाही. इथं थांबून गेल्या आठ-नऊ तासांपासून वाऱ्या-पावसाचे जे फटकारे ते खाताहेत, ते आतापर्यंत त्यांच्या शरीराचे भाग होऊन गेले आहेत. 'इतक्या कष्टाने ही झाडं बांधली गेली आहेत, आणि आता देवाचं नांव घेऊन ती पाण्यात सोडून देऊ? नंतर कुठं शोधीत फिरणार त्यांना?' गयानाथ मोठ्याने बोलतो, पण त्यातही स्वगतोक्ति होती. असिन्दिर मागे उभा असल्याने त्याला हे ऐकूही आलं नसणार. बाघारूला ऐकू येतं, कारण गयानाथ हे बाघारू व तिस्ता यांच्या दिशेने पहातच म्हणतो.

ही झाडं म्हणजे जणू नावा आहेत, आणि आपल्या कुणा प्रियतम व्यक्तीला गायानाथ त्या नावेत बसवून सोडणार आहे. या नावा पुरात कुठं जाऊन किनाऱ्याला टेकतील? पुराने सगळेच किनारे ध्वस्त केले, तर गयानाथ ही झाडं शोधणार कशी? सापडली नाहीत, तर किती हजारांचं नुकसान होईल? जणू हे पैसे गयानाथ कनवटीचे काढून पाण्यात सोडणार होता! ही चार-चार झाडं पुराच्या या रात्री त्याला तितकीच जवळची वाटू लागली आहेत.

'मउवामारीच्या चरावर गुराखी, प्रेमगंज चरावर भाटिया, तर बाकालीच्या चरावर मुसलमान आहेत. काशियाबाडीचा चर पार करून ही झाडं पाकिस्तानात तर जाणार नाहीत?'

वाऱ्याच्या आवाजात गयानाथचा हाहा:कार मिसळून जातो. गयानाथ पुन्हा चीत्कारतो, 'ए बाघारू!'

बाघारू समोर असूनही उत्तर देत नाही. तो तर समोरच उभा आहे. तोंड थोडं नदीकडे, थोडं गयानाथकडे करून. तो जरा आणखी गयानाथकडे वळतो. त्याच्या हातांना झाडांना बांधलेल्या दोरीची ओढ बसते. पुरात वाहून नेण्यासाठी प्रवाह झाडांना ओढतोय्.

'बाघारू, तू जा बरं या झाडांबरोबर! एवढी मौल्यवान झाडं, प्रवाहात कुठंतरी भरकटत जातील अन् कुणाच्यातरी हाती पडतील! तू पण वहात जा झाडांबरोबर, त्यांच्यावर पहारा देत!'

गयानाथाच्या चीत्कारानंतरच्या शांततेत वारा उन्मळून पडलेल्या झाडांच्या फांद्यांना झोडपतो आणि प्रवाहाची ओढ बाघारूच्या पंजाला, मनगटाला, गुडघ्यांना जाणवते - प्रचंड ओढ. कुऱ्हाड जमिनीवर टाकून बाघारू नरम मातीत झाडं ओढून ठेवतो.

'बाघारू, झाडांबरोबर वहात जा. ती जिथं टेकतील, तिथं थांब. आम्ही झाडांना आणि तुला शोधून काढू.'

बाघारू आपल्या हातातली दोरी हळू-हळू सोडतो. हे जाणवल्याबरोबर प्रवाह जणू चारी झाडांना वाहून नेऊ पहातो. आणखी थोडी दोरी सोडून बाघारू त्या झाडाच्या खोडाजवळ जातो. त्या खोडावर गुडघा टेकून, दोरी आणखी ओढून, सर्व शक्तीनिशी खोडाभोवती दोरीचे दोन-तीन पेच देतो. झाडं आता अगदी किनाऱ्याशी आली आहेत. मोकळ्या हातांनी बाघारू उभा रहातो, कुऱ्हाड मागे लंगोटीत खोचतो. किनाऱ्याशी उभा राहून त्या झाडांपैकी एका झाडाची मजबूत फांदी शोधतो. तशी फांदी त्याला सापडते. पक्षी फांदीवर पाय ठेवतात, त्याप्रमाणे त्या फांदीवर हात ठेवून बाघारू पुरात झेप घेतो. वाहात जाणाऱ्या झाडाचा शेंडा वाऱ्याने थरथरतो.

'सोड, सोड, दोरी सोड' - गयानाथ ओरडत-ओरडत झाडाच्या खोडाकडे जाता-जाता मागे येतो. नदीच्या किनाऱ्याशी नायलॉनची दोरी झुलतेय - झाडाच्या शेंड्यापासून तर खोडापर्यंत बांधलेली. त्या दोरीजवळ बाघारू कुठल्यातरी फांदीमध्ये घुसलाय. त्याला

उद्देशून गयानाथ जोतदार ओरडतो, 'एऽ बाघारू, अर्जुनाचं झाड मागून वहात आलं, तर बांधून ठेव, बांधून ठेव रे!'

## एकशे चोवीस

# अंधार आणि जलप्रवाह यांच्यामध्ये

काठावरून, झाडाची फांदी धरून, नदीच्या प्रवाहात चार झाडांबरोबर वाहात जाताना बाघारूला जाणवतं, की तो फांदीसहित पाण्यात बुडू लागलाय्. अशा वेळी वरची फांदी धरता येते किंवा ताबडतोब काठाशी येता येतं. पण आपण ज्या फांदीवर उभे आहोत त्या फांदीबरोबर बुडतो आहोत हे लक्षात आल्यावर बाघारू त्या फांदीवर उभा रहातो - जणू, आपल्या वजनाने ही फांदी किती बुडते हे पहाण्यासाठी. बाघारू स्वत:ला वाचवण्यासाठी कुठलाही प्रयत्न करीत नाही. अजूनही आपल्याला नदीकाठावर जाता येईल, हे जणू त्याच्या लक्षातच येत नाही. बाघारू तर आता या चार झाडांच्या फांद्या-पानांच्या संभारामध्ये दिसेनासा झालाय्. त्याच्यासारखा तरबेज पोहोणाराही तिस्तेच्या पुरामध्ये बुडून जाऊ शकतो. त्याचे केस किंवा लंगोटी एखाद्या फांदीत अडकून त्याला पाण्यातळाशी नेऊन, श्वासरुद्ध करून मारू शकतात.

पण, दोरीचं बंडल लगेच गळ्यात अडकवताना बाघारूच्या लक्षात येतं, की थोडी बुडाल्यानंतर ती फांदी आता आणखी बुडत नाहीय्. त्याच्या गुडघ्यापर्यंत पाणी आहे. म्हणजेच, फांदीखाली काठावरची माती आहे. म्हणूनच तो फांदीवर झोपून फांदीशी एकरूप होऊ पहातो - दोन्ही हातांनी आणि पायांनी फांदीला धरू पहातो, जणू तोही या झाडाचीच एक फांदी आहे. बाघारूला वाटून जातं, आपण स्वत:ला नायलॉनच्या दोरीने या झाडांशी बांधून घेतलं असतं तर!

दरम्यान असिन्दिरने दोरीचे पेच सोडल्याने ही चार झाडं प्रवाहात प्रवेश करतात, ती फांदी आणखी पाण्याखाली जाते, बाघारूच्या पाठीवरून तिस्तेचा प्रवाह वाहू लागतो. झाडांच्यामधून प्रवाह इतक्या जोराने वहातोय् की वाटतं, ही झाडं प्रवाहाच्या जोरामुळे सरळही होतील! बाघारूला वाटतं, ही अवस्थाच कायम राहिली तर तो नीट वहात जाऊ शकेल, कारण त्याच्या कमरेपासून पायांपर्यंत जितकं पाणी आहे, तितकं डोक्यापासून करमेपर्यंत नाही. म्हणजेच, त्याचं डोकं फांदीच्या ज्या भागावर आहे, तो भाग जाड व उंच आहे. म्हणजे, हे झाड उभं असताना, खोडाच्या ज्या भागामधून त्याला फांद्या फुटल्या होत्या, त्याच ठिकाणी आता बाघारूने डोकं टेकवलेलं होतं.

तोवर असिन्दिर आणि गयानाथ यांनी आणखी एक पेच सोडल्यावर आणखी एका धक्क्याने झाडं नदीच्या आणखी आत जातात. झाड या धक्क्यामुळे वळतं. पाण्याच्या

नियमाप्रमाणे झाड पाण्यात स्वत:भोवती फिरत रहाणार. बाघारू फांद्यांच्या तळाशी जाणार. त्याच्या वजनामुळे फांद्या पाण्यात आणखी खाली जाणार. बाघारू उजवा हात वर करून एखादी जाड फांदी सापडते का याचा अंदाज घेतो. हा प्रकार म्हणजे 'उर्ध्वमूलं अध:शाखं' असा प्रकार - मुळं वरती, फांद्या खाली. बाघारू त्या मुळांच्या दिशेने वर जाऊ पहातो - पुढचा विचार न करताच, कारण फांद्यांपेक्षा खोड मोठं आहे, म्हणून त्याला आश्रय घ्यायला अधिक जागा मिळणार. पण जर ते उलटं होऊ लागलं, तर बाघारू त्याला सावरू शकणार नव्हता. पण तरीही तो पाण्यात वहात जाऊ शकेल, त्या पर्णसंभारामध्ये दबून रहाणार नाही. पाना-फांद्याच्या दाबाखालून त्याला बाहेर यावंस वाटतं. जिथून नदी दिसेल, अशी एक जागा तो शोधत होता. तशी जागा त्याला मिळाली.

वरतून आणखी एक पेच सोडल्याचं जाणवतं - पाण्याच्या धक्क्यामुळे. शेवटी तो आपले दोन्ही पाय फांदीच्या दोन्ही बाजूंना टाकून बसतो. पाना-फांद्याच्या दाबाखालून बाहेर आल्याने तो आश्वस्त होतो.

पण तेवढ्यात गयानाथ-असिन्दिर शेवटचा पेच सोडतात आणि बाघारूला दोन्ही हातांनी दोन्ही बाजूंच्या फांद्या दाबून धरून, स्वत:ला सावरावं लागतं. जो आता वारा-पाऊस यांची भिंत भेदून समोरच्या अंधाराकडे वेगाने चालला आहे.

## एकशे पंचवीस

# जलप्रवाहात वृक्ष वाहून नेणे

सुरुवातीचा काही वेळ बाघारूला स्वत:ला सावरण्यासाठीच लागतो. कुठल्याही क्षणी आपण पडू, या शंकेने जणू तो दोन्ही हातांनी झाडांच्या फांद्या गच्च धरतो. अंधार तर होताच, पण वारा आणि पाऊस यांच्यामुळे त्याला वाटतं, आपण कुठल्याही क्षणी एखाद्या प्रचंड खडकावर आपटू. तो डाव्या हाताने आपले डोळे झाकून घेतो. मान खाली वाकवतो. खालून वाहाणाऱ्या प्रवाहावर त्याचं काहीच नियंत्रण नाही. त्याला वाटतं, कुठल्यातरी कारणामुळे ही झाडं कुठेतरी अडकून थांबावीत किंवा हा प्रवाह तरी थांबावा - निदान काही वेळासाठी तरी. त्याला कुठेच परिचित चिन्ह दिसत नाही - आकाशातले तारे, भाताची शेतं किंवा जंगलात वाऱ्याचं वळणं - यापैकी काहीच दिसत नाही. रात्रीची नदी तर बाघारूच्या ओळखीची आहे, हा प्रवाहसुद्धा. अंधार, वारा, पाऊस या गोष्टीसुद्धा त्याच्या ओळखीच्या आहेत. पण या सगळ्या गोष्टी त्याने पूर्वी कधीही नदीमधून पाहिलेल्या नाहीत. यापूर्वी कधीही गयानाथची झाडं घेऊन त्याला असं वाहात जावं लागलेलं नाही.

बाघारू एकदा उजवीकडे पहातो - त्याने कापलेली इतर झाडं वाहाताना पाहून तो

आश्वस्त होतो. ही सारी झाडं थोडी पुढंमागं, पण बरोबरच वहाताहेत; तरीही बाघारूला वाटतं, आपण ज्या झाडावर बसलेलो आहोत, तेच सर्वात पुढे आहे.

दोन्हीकडे सोडलेले पाय बाघारू जरा झुलवतो. त्याच्या पावलांना पाणी लागत नाही. उजवा पाय जरा आणखी खाली सोडल्यावर प्रचंड प्रवाह जणू तो पाय वाहून नेऊ पहातो. बाघारू पाय वर घेतो.

पण, पाण्याच्या स्पर्शाने बाघारू जरा धीट होतो. आतापर्यंत, पाणी आणि आकाश यांच्यामधून आपण उडत चाललो आहोत, अशी जी त्याची भावना होती, ती नष्ट होते. हे पाणी, प्रवाह, त्याचा स्पर्श - साऱ्या गोष्टी बाघारूच्या ओळखीच्या आहेत. पण पाणी इतकं खाली का बरं गेलं?

नंतर त्याला कळतं, तो झाडाच्या वरच्या, जिथून फांद्या फुटतात, त्या पाण्यावरच्या भागावर बसलेला असल्याने त्याच्या पायांना पाण्याचा स्पर्श होत नाहीय्.

दरम्यान, आश्वस्त होऊन तो बसण्याची पद्धत बदलतो. आता झाडाचं खोड आणि मुळं त्याच्या समोर आहेत. मधूनमधून पाय खाली झुलवून तो प्रवाहाचा अंदाज घेऊ शकतो. आता बाघारूच्या मनातली मघाची भीती गेली आहे.

या झाडाची पानं-फांद्या इतकी घनदाट आहेत, की योग्य ठिकाणी त्यांच्यामध्ये आश्रय घेतल्यास बाघारूला वारा-पाऊस यांचा त्रास होणार नाही. पण कुठं आश्रय घ्यायचा, हे सूर्य उगवल्यावरच ठरवता येईल. आता तर अंधार आहे. घनदाट अंधार. हा अंधार सूर्य-उगवल्यावरच संपेल. सूर्याचं दर्शन होणार नाही, पण निदान नदी, झाड, त्याच्या फांद्या या गोष्टी दिसू लागतील.

तोवर बाघारू अंधाराकडेच पहात रहातो.

## एकशे सव्वीस

# दोन आघातांच्या मध्ये

वेळ असाच जात रहातो; पण किती वेळ गेला, आपण गाजोलडोबाहून इथपर्यंत येईपर्यंत किती काळ उलटला हे त्याला कसं कळणार? एरवी जमिनीवर असताना सावल्यांच्या दाटपणावरून, गवताच्या स्पर्शावरूनही त्याला दिवसाची वेळ कळत असे. रात्र किती झाली, हे त्याच्या शरीराला आपोआप कळत असे - ते या पुराच्या पाण्यात वाहात जात असताना कसं कळणार? वारा-पाऊसही अखंड चालू आहे. गयानाथने त्याला जरा आधी वाहात जायला का सांगितलं नाही? तो अर्जुनाचं झाड पडेल म्हणून त्या आशेने वाट पहात राहिला होता. 'तुम्हाला ते झाड पाहिजेच होतं, तर मी पाडून दिलं असतं की!' बाघारू जणू थोडा हसू शकतो.

'देउनियाला अर्जुनाचं झाड पाहिजे होतं, पण त्याने ते पाडायला सांगितलं नाही.

आवाज आला असता. कुठूनतरी फॉरेस्ट-गार्ड उपटला असता. झाडावरचे कुऱ्हाडीचे वण पुसता आले नसते. त्या झाडामुळेच इतका उशीर झाला. आता किती अंतरापर्यंत, किती वेळ वाहात जाणार आपण? आता तर वाटतंय्, असंच वाहात रहावं!' बाघारू खुक् करून हसतो.

'मी जणू फटफटीवरच चाललोय!' बाघारू पुन्हा खुक् करून हसतो. असिन्दिरची फटफटी जमिनीवरून, तर माझी फटफटी पाण्यावरून चालतेय्!' बाघारू दोन्ही बाजूच्या दोन फांद्या धरतो - जणू फटफटींची हँडल्स तोंडाने फटफटीचा आवाज काढावासा वाटतो, पण काढीत नाही.

बाघारू आता खोडावरच्या एका मोठ्या खोबणीत बसलाय. त्याला वाटतं, आता आपण झाडावर उताणे झालो, तर झोपता येईल, डोळे बंद करता येतील. मग अंधार जेव्हा संपायचा, तेव्हा संपो.

तो पाय सरळ करतो, मागच्या फांदीला पाठ टेकवतो, हात मानेमागे घेतो. त्याला वाटतं, काय गरज उताणं पडण्याची? असंच बरं. आरामही वाटतोय. गरज पडली, तर लगेच उठून बसता येईल. पण नकोच. बाघारू दोन्ही पाय फांद्यांवर सरळ करतो, झाडावर उताणा होऊन पहुडतो. मागे कुऱ्हाड टोचते. ती काढून तो पडल्यापडल्याच दोन पायांमधल्या फांदीच्या खोबणीत ठेवतो. नंतर डोळे मिटतो.

आता त्याला शरीराखालून प्रवाहाचा कल्लोळ आणि वरून वारा-पाऊस यांचा आवाज ऐकू येतो. या दोन आघातांच्यामध्ये, डोळे मिटून बाघारू वाहात रहातो. हे दोन्ही आवाजही त्याच्या शरीराबरोबर मिसळून जातात.

त्यानंतर, कधी कोण जाणे, त्याला पक्ष्यांच्या किलबिलाटाचा आवाज ऐकू येतो. त्याला कळतं, अंधार संपला.

## एकशे सत्तावीस

# जलप्रवाहात जागे होणे

पक्ष्यांचा किलबिलाट, म्हणजे पहाट झाली. त्याला किलबिलाटाबरोबरच वाऱ्याचा झोत आणि नदीचा प्रवाह यांचाही आवाज येतो. म्हणजे झोप लागली होती की काय? बाघारू डोळे उघडतो. उशाशी असलेल्या झाडाच्या फांदीवर दोनेक पक्षी बसलेले त्याला दिसतात. बाघारू पूर्ण जागा होते. उशाकडच्या फांदीकडे, पानांतून दिसणाऱ्या आकाशाकडे पहात रहातो. म्हणजे हे झाड कुठंतरी काठाशी येऊन टेकलंय की काय? हे पक्षी कुठले? झाडाबरोबरच वाहात आलेले, की झाड दिसतंय म्हणून त्यावर येऊन बसलेले? किनाऱ्यावरचे?

बाघारू मनाशी चाळा करीत रहातो. आपण वाहात आहोत, की कुठेतरी काठाशी टेकलेले आहोत हे त्याला समजतच नाही. आता प्रकाश आल्याने त्याला सगळं पहाता येईल, वाहात असलेल्या झाडांना दोरीने ओढून आणखी जवळ आणता येईल.

बाघारू उताण्या अवस्थेतच आपले पाय दोन्ही बाजूंना सोडतो - पाण्याचा त्यांना स्पर्श होतो, प्रवाहाची प्रचंड ओढ जाणवते. पक्षी पुन्हा किलबिलतात. ही झाडं पक्ष्यांच्या घरट्यांसहितच पाण्यात पडली होती आणि पक्ष्यांनी घरटी सोडली नव्हती, म्हणून पक्षीही बाघारूप्रमाणेच रात्रभर वाहात आले होते या झाडांबरोबर. बाघारू दोन्हीकडच्या फांद्यांवर हातांचा जोर देऊन उठून बसतो. दोरीचं बंडल त्याच्या छातीवर झुलतंय्.

बाघारू कुऱ्हाड पाठीमागे खोचतो, दोरीचं बंडलही पाठीवर टाकतो. प्रवाहाच्या विरुद्ध दिशेला त्याचं तोंड आहे. दरम्यान वाहात्या झाडांच्या फांद्यांवरून उडून, पुन्हा फांद्यांवर बसणाऱ्या पक्ष्यांची संख्या वाढली आहे.

एकदा झाडावर उभं राहून आणखी दूरवरचा भाग दिसतो का, हे पहावं असं बाघारूला वाटतं. वाहात आणलेली सगळी झाडं वेगवेगळी ओळखता येतील, इतक्या उंचीवरून पहाता आलं पाहिजे, पण तसं उभं रहाणं जमत नाही. त्यासाठी अंधार जरा आणखी कमी व्हायला हवा. किलबिलाट वाढत चाललाय्, म्हणजे अंधार कमी होत चाललाय्.

## एकशे अठ्ठावीस

# बाघारू आणि पक्षी जागे होतात

प्रवाहाच्या विरुद्ध दिशेने वारा वहातोच आहे, पाऊस पडतोच आहे. बाघारू प्रवाहाच्या वेगाने वहात चाललाय आणि त्याच्या अंगावर वाऱ्या-पावसाचे फटकारे बसतच आहेत. सूर्योदयाची वाट पहात बाघारू बसून रहातो. आकाश त्याला शेणाने सारवलेल्या अंगणासारखं वाटतं.

बाघारू बेचैन होऊन या प्रवाहात, वाऱ्यात, पावसात ही झाडं घेऊन आपल्या वाहात जाण्यामागची नक्की भूमिका काय आहे, याचा विचार करू लागतो. गयानाथची ही चार-चार झाडं कापून, बांधून, ती तो वाहून नेतोय्. अर्जुनाचं झाड पडलं असतं, तर पाच झाडं झाली असती. एक सालाचं झाड आहे, एक खैराचं आहे. बाकीची दोन झाडं बाघारूने अद्याप नीट पाहिलेली नाहीत. ह्या झाडांसोबत गयानाथने त्याला प्रवाहात सोडलंय्. ही झाडं आणि बाघारू कुठे जाऊन काठाला टेकणार, हे त्याला ठाऊक नाही; गयानाथलाही ठाऊक नाही. ठाऊक असलं तर या पुरालाच ठाऊक असेल. ती कुठेतरी टेकल्यावर

गयानाथ - असिन्दिर फटफटीवरून येऊन 'झाडांचं आणि बाघारूचं काय करायचं ते करतील. पण तोवर बाघारूला सावध, जागं रहायला हवं. म्हणूनच त्याला या फांदीवर आंधळ्यासारखं बसून रहावं लागतंय्.

पक्षी अचानक भयार्त अशी किलबिल करतात. संपूर्ण झाडावरच्याच पक्षांना भीती वाटलीय् की, एखाद्या विशिष्ट जागेवरच्या पक्ष्यांना, हे समजून घेण्याचा बाघारू प्रयत्न करतो. उंच फांदीवरून तो बघतो; या चार झाडांवरचे कितीतरी पक्षी उडू पहातात, पण वाऱ्याचा झोत सहन न झाल्याने पुन्हा या झाडांवर येऊन बसतात.

पण या पक्ष्यांची भीती दूर करण्याची जबाबदारी बाघारूकडे कुणी सोपवलीय?

'झाड गयानाथचं, पक्षी झाडाचे. पक्षी काही गयानाथचे नाहीत. वाऱ्या-वादळात झाड पडलं, तरी पक्षी झाड सोडून जात नाहीत. नंतर वारा-पाऊस थांबला की, त्या झाडावरचे पक्षी, मुंग्या, साप दुसरीकडं आश्रय शोधतात, घरटी बांधतात, बिळं करतात. मी गयानाथचा बाघारू, त्याची झाडं घेऊन नदीतून वाहातोय्. गयानाथ आणि त्याचा जावई यांना किती त्रास - ही झाडं कुठं टेकली आहेत, हा बाघारू कुठे आहे हे पहात बिचाऱ्यांना फटफटीवर फिरावं लागणार. मला ओरडता येईल, "ओऽ देउनिया, मी इथं आहे!" आता उपाय काय देऊनियाला? मला व झाडांना तर शोधून काढणं त्याला भागच आहे. नाहीतर त्याचा सगळाच 'लॉस'! ही चारी झाडं 'लॉस', हा बाघारूही 'लॉस!' कोळी नदीत जाळं फेकतो, ते त्याला पुन्हा ओढावं लागतंच. या वाऱ्या-पावसात त्यांना फटफटीवर बाहेर पडावं लागणारच. पण हे पक्षी गयानाथचे नाहीत. त्यांना आता कोण? त्यांना मी आहे, बाघारू आहे. त्यांना कसली भीती वाटतेय् ते मी बघायला नको?' हा विचार करीत असतानाच, अंधार अधिक कमी होऊन झाडाच्या पानांचा हिरवा रंग कधी दिसू लागतो हे त्याच्या लक्षातच येत नाही. पानांचे वेगवेगळे आकारही स्पष्ट होतात.

शिडाच्या काठीसारख्या उंच असलेल्या फांदीवर बसून बाघारू पक्षांना भीती का वाटते याचा शोध घेतो. या नवीन परिस्थितीशी जुळवून घेता न आल्याने पक्ष्यांना भाती वाटतेय्. नेहमी स्थिर उभ्या असलेल्या झाडांवर रहाण्याची त्यांना सवय, आता ती झाडं वेगाने वाहात चालली आहेत. हे कसं झालं, हे त्यांना समजत नाहीय्.

बाघारूला समजत नाही. काही पक्षी प्रवाहात वाहून गेले की काय? गेलेही असतील. प्रवाहाला स्पर्श झाला, की तो पक्ष्यांना ओढून नेणारच. पक्षी पर्णसंभाराच्या आत, पाण्याच्या जवळ जाऊ पहातात - त्यामुळे त्यांचं वाऱ्या-पावसापासून रक्षण होतं. पण वारा-पाऊस पक्ष्यांना ठाऊक असला, तरी पाण्याचा प्रवाह त्यांना ठाऊक नसतो. प्रवाहापासून किती उंचीवर असलो म्हणजे आपण सुरक्षित राहू शकतो हे त्यांना समजत नाही.

या चार झाडांच्या मधोमध जे सालाचं झाड आहे; त्याच्याही मध्ये जाण्याचं बाघारू

ठरवतो. आता बरंच फटफटलंय्. पावसाचे थेंब दिसताहेत, दृष्टी जिथपर्यंत पोचते, तिथपर्यंत तिस्तेचा गढूळ, वेगाने वाहाणारा प्रवाह दिसतोय्. फार वेळ त्या प्रवाहाकडं पाहिल्यावर डोळे गरगरतात.

बाघारू कसाबसा त्या सालाच्या झाडावर जाऊन बसतो. दोन्हीकडे सोडलेले त्याचे पाय गुडघ्यापर्यंत पाण्यात बुडतात.

## एकशे एकोणतीस

# मचाणबांधणी

आणखी जरा वरच्या पातळीवर बसता आलं, तर बरं, असं बाघारूला वाटतं. तो झाडांच्या छोट्या-छोट्या फांद्यांवर कुऱ्हाडीने घाव घालू लागतो. डाव्या हाताने फांदी धरून उजव्या हाताने तो कुऱ्हाडीचा घाव घालतो. फांदी झुलू लागते, पण तुटत नाही.

अशा अनेक फांद्यांवर तो आघात करतो. नंतर त्या तोडून सालाच्या झाडावर आडव्या टाकतो.

त्यांना बांधायला हवं. पण या नायलॉनच्या दोरीने बांधता येणार नाही; कारण वाहाणाऱ्या चारही झाडांना बांधून मग उरलेल्या दोरीचं बंडल त्याने गळ्यात घातलेलं आहे. एखादं जरी झाड अडकलं किंवा दूर गेलं, तरी गळ्यात अडकवलेल्या या बंडलाला ओढ बसेल, आणि बाघारूला इशारा मिळेल.

## एकशे तीस

# पक्षी पाण्यात झरून पडतात

बाघारू एक युक्ती काढतो. युक्ती काढतो असं नव्हे. त्याच्या हाती नायलॉनच्या दोरीचं बंडल आहे. जे करायचं ते या बंडलच्या आधारेच करावं लागणार. तो आडव्या ठेवलेल्या फांद्या मोठ्या फांद्यांना दोरीने बांधतो - त्याही घट्ट बांधता येत नाहीत, पण किमान त्या मचाणावरून बाघारू खाली पडण्याची भीती रहात नाही - दोरीच्या जाळ्यात तो अडकेल.

दोरीचं बंडल पुन्हा गळ्यात अडकवून बाघारू फांदीवर पाय देऊन आपल्या मचाणावर जाऊन उभा राहातो. उभं राहून मागे-पुढे, वरखाली, डावी-उडवीकडं पहातो. उभं राहिल्याने त्याला इतकं चांगलं वाटतं, की तो एकदा मचाणावर असतो, मग पहुडतो,

मग पुन्हा उठून उभा रहातो.

हे करताना, फांद्या सरकणार नाही याबद्दल त्याला सावध रहावं लागतं, पण त्यामुळे त्याचा आनंद कमी होत नाही. या छोट्या फांद्या कापल्यामुळे त्याच्या नजरेचा पल्ला आता वाढला आहे. या पुरावर, वाऱ्या-पावसावर त्याचं जणू नियंत्रण प्रस्थापित झालंय.

याच्या समर्थनासाठी बाघारूला एका काठीची आवश्यकता आहे. ज्या काठीने पाण्याला स्पर्श करता येईल, जी आकाशातही फिरवता येईल, अशी काठी.

तो पाठीची कुदळ काढून, प्रवाहाकडे तोंड करून, ज्या फांदीची काठी करता येईल अशी फांदी शोधतो. अशी एक फांदी त्याला दिसते. तो ती तोडतो, तिच्यावरची पानं काढून टाकतो, ती साफ करतो. त्याच्या हाताला फांदीचा रस लागतो, नाकात फॉरेस्टचा गंध येतो - त्याला वाटतं तो जणू पुरात वहात नाहीय्, जंगलात किंवा चहाच्या मळ्यात फिरतोय्.

तो काठी आसपास फिरवतो. त्यामुळे काही पक्षी उडतात. 'पण ते उडत इतके वर जातात, की त्यांना खाली उतरता येत नाही. वाऱ्याच्या प्रचंड झोतामुळे त्यांना नदी प्रवाहाच्या विरुद्ध दिशेला जावं लागतं आणि झाडं तर प्रवाहाबरोबर पुढेच जातात. पक्ष्यांना वाऱ्याविरुद्ध उडत झाडांपर्यंत येता येत नाही. वाऱ्यात ते पाचोळ्यासारखे भिरभिरू लागतात आणि शेवटी नदीच्या प्रवाहात पडतात, वाहू लागतात.

बाघारू विव्हळ होऊन त्या पक्षांकडे पहातो, पण तोवर तो आणखी पुढे वाहात आलेला असतो.

## एकशे एकतीस

# बाघारूचा विषाद

दिवस जरा आणखी वर आल्यावर बाघारूला त्याच्या उजव्या बाजूचा, म्हणजे तिस्तेच्या पश्चिमेचा किनारा दिसतो. आपली काठी जवळ ठेऊन, दोन्ही गुडघ्यांभोवती हातांचा वेढा घालून, उदास होऊन बाघारू आपल्या मचाणावर बसला होता. त्याच्या बसण्याच्या पद्धतीवरून वाटत होतं, की तो आता काठी, कुऱ्हाड, नायलॉनची दोरी यांचा इथून पुढे वापरच करणार नाही. सगळ्याच पक्षांना उडवून आपण मारून टाकलंय्, असं त्याला वाटत होतं. पक्षी वाऱ्याच्या जोरामुळे उडूही शकले नाहीत, झाडांवरही परत येऊ शकले नाहीत. प्रवाहात सापडून मेले बिचारे! पण काही पक्षी झाडांवर होते. ते बाघारूला दिसतात, पण आता तो पक्ष्यांकडे पाहाणार नाही. पक्षी आपल्या इच्छेप्रमाणे उडतील, बसतील, वाहात जातील किंवा मरतील. म्हणूनच बाघारू प्रवाहाकडे तोंड करून बसलाय

आणि उजव्या हाताला असलेला तिस्तेचा काठ, त्यावरचं जंगल, अधूनमधून दिसणारी घरं पहातोय्.

बाघारूला हा भाग काही ओळखू येत नाही. कुठेतरी काठाला लागलं, म्हणजे झालं. मग गयानाथ त्याला आणि झाडांना शोधून काढील.

बाघारू डावीकडे पाहातो. दूरवर रेल्वेचा एक डिस्टंट सिग्नल आणि अंधुकशी झाडं दिसताहेत. थोड्याच वेळानंतर त्याला पश्चिम काठावर चहाच्या मळ्याचा भोंगा दिसतो, काही झाडांचे शेंडे आणि घरांची छतं दिसतात. त्यामुळे त्याला उभं रहावं लागतं. ती झाडं आणि घरं खूपच पाण्यासाठी गेलेली दिसताहेत - 'चर आहेत, माणसं निघून गेलीत!' बाघारूची झाडं त्याच चराच्या दिशेने वाहात चालली आहेत. झाडं आता या चराच्या काठाला लावण्याचा प्रयत्न करायचा का? असा बाघारू विचार करू लागतो.

बाघारूने कुठलाही निर्णय घेतला, तरी तो या प्रवाहाशी लढूनच कार्यवाहीत आणावा लागेल. बाघारूला वाटतं, आपण दोराचा एक फास तयार करून, तो काठावरच्या एखाद्या झाडावर टाकू शकतो. अडकला, तर ठीक, नाहीतर वहात जाणं आहेच. पण हे वाटतं तितकं सोपं नाही हेसुद्धा त्याला कळतं. उडी टाकून पोहोत जावं का? तेही अवघडच. बाघारू हा विचार करीत असताना ती झाडं आणि घरं वेगाने त्याच्या जवळ येताहेत - वेगाने, अधिक वेगाने.

## एकशे बत्तीस

# तात्पुरता नांगर

वीस-बावीस तासांपूर्वी निताई-गजेन-नरेश यांनी पुराच्या भयाने आपली गुरं ज्या चरावरून हलवली होती, त्याच चराच्या दिशेने बाघारू आपली झाडं घेऊन वाहात चालला होता. आता, पाण्याच्या प्रवाहात तिथं दिसणारी वस्तीची चिन्हं म्हणजे तीनचार झाडं आणि टिनांच छपरं.

त्या दिशेने वाहात जाताना बाघारूला रायपूर - रंधामालीच्या बांधावर माणसांच्या आणि गुरांच्या रांगा दिसतात. त्या पाहिल्याबरोबर तो निर्णय घेतो, ही झाडं याच चराच्या काठाशी लावायची. पाण्याचा प्रवाह आता त्याला तुच्छ वाटू लागतो. आपण आता झाडांसहित याच काठाला टेकायचं! पुढं कदाचित आणखी माणसं असलेलं एखादं ठिकाण असेल, पण जवळ आलेलं हे आश्रयस्थान कशासाठी टाळायचं? इथं झाडं बांधल्यावरच तर त्याला तो बांध नीट दिसू शकेल.

बाघारू उठून चालत झाडांच्या फांघांकडे जातो. शिसवीच्या झाडाची एक फांदी

धरून तो पाण्यात उतरतो, आतापर्यंत ओळखू न आलेलं, सर्वात खालच्या बाजूचं झाड आता त्याला ओळखता येतं. ते आहे चाफ्याचं झाड. त्याच्या एका फांदीला तो धरतो. ती फांदी खूप कमजोर असल्याने बाघारू पाण्याखाली जातो. पाण्याखालून सरकत तो मुळांच्या दिशेने जातो, पुन्हा झाडांच्यावर, आपल्या मचाणावर येऊन बसतो.

एका छताचा बांबू जवळून तरंगत जाताना त्याला दिसतो, त्यामुळे त्याला समजतं - आता आपण चरावरती आलो आहोत. काही तासांपूर्वीच इथं मनुष्यवस्ती होती. पाण्याच्या तळाशी, नक्की किती उंचीवर ती आहे हे काही सांगता येत नाही. पण तिथं त्याला पोचता येणार नाही. अचानक झाडं अडकतात. त्यांच्या तळाशी पाणी फुलून उठतं. बाघारू उभं राहू पहातो - दोन-तीन सुपारीच्या झाडांमध्ये त्याची झाडं अडकली आहेत. सुपारीच्या झाडांच्या पश्चिमेला एक पत्र्याचं छप्पर दिसतं. बाघारू बसतो, पाय पाण्यात सोडतो. बाघारू पाण्यात उडी घेतो आणि एका सुपारीच्या झाडाच्या शेंड्यावर बसतो.

निताईच्या चरावर बाघारूला आपल्या झाडांसहित थांबण्यासाठी जागा मिळते. त्यानंतर एका झाडाच्या शेंड्यावरून दुसऱ्या झाडाच्या शेंड्यावर जात तो शेवटी पत्र्याच्या छपरावर जातो. वहात आलेल्या झाडांच्यावरील मचाणावर बसणं, सुपारीच्या झाडाच्या शेंड्यावर बसणं आणि पत्र्याच्या छपरावर बसणं - या तीन गोष्टींपैकी कोणती गोष्ट अधिक चांगली, याची निवड करणं बाघारूला अवघड वाटतं. छपरावर बसायचा कंटाळा आल्यास आपल्या मचाणावर जाईल. नायलॉनच्या दोरीने असे पेच देत तो आलाय्, की त्याची झाडं आता इथून वाहून जाऊ शकणार नाहीत.

बाघारू पत्र्याच्या छपरावर बसला होता, ते रायपूर-रंधामाळीच्या बांधाकडे तोंड करून. तोच पाऊस, तोच वारा, तोच पूर, पण या छपरावरून तो बांध किती रंगीत दिसतोय! एवढंच काय, माणसांचं चालणंफिरणंही स्पष्ट दिसतंय. गुरांचे रंगही अंधुकसे दिसताहेत, ओळखता येताहेत. एकदोन म्हशी आहेत. स्त्रियाही ओळखू येताहेत, फक्त कुणाचेच चेहरे स्पष्ट दिसत नाहीत. या पत्र्याच्या छपरावर बसून, समोरचं पाणी वगळता समोरचा बांध पहाणं खूपच आरामाचं वाटतं, दिलासा देणारं वाटतं.

असं कुठंतरी अडकण्यासाठी, अडकून रहाण्यासाठीच गयानाथने बाघारूला झाडांसहित पाण्यात सोडलं होतं. आता तो जावयाच्या फटफटीवर बसून जेव्हा शोधील तेव्हा शोधो. बाघारूला आता करण्यासारखं काहीच नाही.

अजूनही पाणी वाढतंच आहे, वाराही वाढतोच आहे. पूर कमी होतो आहे असं काहीच चिन्ह आसमंतात दिसत नाही. कमी होईल असंही काही चिन्ह नाही. पण कधी ना कधी हा पूर उतरणारच. तेव्हा, पाण्याबरोबर बाघारूही खाली-खाली उतरत जाईल. या पाण्याच्या तळाशी कुणाच्या घरांची अंगणं आहेत देव जाणे! पाणी उतरलं तरी बाघारूला गयानाथची वाट पहात इथंच थांबावं लागेल.

तेव्हा आसपासचं दृश्यही बदलेल. आता तर चारीकडे पाणी दिसतंय. पाणी उतरलं, की काठ दिसेल. काठ म्हणजे जमीन. जमीन म्हणजे तिचे भाग. त्या-त्या भागांचे मालक. मालक म्हणजे घरं. घरं म्हणजे वस्ती - गावं, गंज, शहरं. पण आता मात्र तसं काहीच नाहीय्. सारं पाण्याखाली आहे. इथं बसून पाणीच पाणी पहायला खूप बरं वाटतंय् बाघारूला. पलीकडचा बांध, त्यावरची माणसं पहाण्यातही खूप मजा वाटतेय्.

पण हेसुद्धा एक छप्परच आहे की, पत्र्याचं का होईना! इथंही एक सुपारीची बाग आहे. आणखीही काही पत्र्याची छपरं, झाडं दिसताहेत. या सगळ्यांना पाण्याने झाकून टाकलंय्. बाघारूला तर काही घरदार नाही. सारं काही आहे ते गयानाथचं - घर, बाग, फॉरेस्ट, शेत, गोठा, गायी-म्हशी. जणू इथे बसून आसपास पहाताना बाघारू विचार करू पाहातो, आपण आणखी असंच वाहात जायला हवं - इतकं दूर, की गयानाथ आणि असिन्दिरला त्याला शोधण्याची संधीच मिळू नये.

पण असा विचार त्याला करता येत नाही. असा विचार करायचा सरावच त्याला नाही. तो फक्त आपल्या शरीरानेच विचार करू शकतो. त्याला इथं थकवा वाटत नाही, एकाकीपण जाणवत नाही.

वाहात जाणं थांबून इथं जरा विसावल्यावर बाघारूचं शरीर जाणीव देतं - त्याला भूक लागलीय्. एरवी बाघारूला भुकेची जाणीव होत नाही. गयानाथच्या घरी त्याला जेव्हा खायला देतात, तेव्हा त्याची भूक थोडी भागते. पण इथं तर काही कुणी त्याला खायला देणार नाही. बाघारू पाण्यावर दिसणाऱ्या झाडांच्या शेंड्यांकडे पहातो - तिथून काही खायला काढता येईल का, या विचाराने. सुपारीच्या झाडांवर पिकलेल्या सुपाऱ्या आहेत, पण त्यांनी बाघारूची भूक कशी भागणार?

## एकशे तेहेतीस

# पाण्याचा विस्तार

रविवारची सकाळ होते ना होते, तेवढ्यात रंधामाली-रायपूरच्या चहाच्या मळ्यांच्या बांधावरून दिसतं, पूर्वेकडे तिस्ता एकामागोमाग एक गावं आणि बंदरं पार करीत अगदी मयनागुडी गावाजवळ पोचलीय्. म्हणजे, दोमोहनी तिस्तेच्या जवळजवळ मध्यभागी आलं. जलपाइगुडी शहराच्या कचेरीच्या बांधावरून दिसतं, तिस्ता बार्नेश बंदर पार करून लॅटरल रोडजवळ पोचलीय्. तिस्तेच्या पूर्व काठावरच्या बाकाली पदमतीवरून दिसतंय्, तिस्तेच्या जुन्या पात्रात नवीन पुराचं पाणी घुसलंय्.

तिस्तेचा पूर मापण्याचा निकष म्हणजे तिस्तेच्या पाण्याखाली कोणकोणते चर गेले आहेत, हे पहाणं. नदीच्या एका काठावरून दिसणारं दुसऱ्या काठावरचं दृश्य रोज पाहून-

पाहून लोकांच्या ओळखीचं झालेलं असतं. दोमोहनीचा जुना डिस्टंट सिग्नल, निताईच्या चरावरचं एक मोठं झाड, पलपाइगुडीच्या कमिशनरच्या घरामागचं मोठं अर्जुनाचं झाड, बार्नेशच्या समोरचा चर - अशा सगळ्या गोष्टी नदीची सीमा पक्की करतात. रविवारी सकाळी दिसतं - या सगळ्या सीमाचिन्हांना तिस्तेने पोटात घेतलं आहे. पहावं तिकडं तिस्तेचं गढूळ पाणी दिसतं आहे.

प्रकाश जरा वाढल्यावर दिसतं, की आकाश गुरुवारपासून होतं तसंच रविवार सकाळीही आहे, पाऊसही तसाच आहे. म्हणजे पाणीसुद्धा गुरुवारपासून वाढतंय, तसंच वाढत जाणार; आणि असंच वाढत राहिलं, तर काय होणार?

पाणी सतत वाढत असलं, तरीही त्याचं गुरुवारपासूनचं वाढत जाणं आणि रविवारचं वाढणं याचा अर्थ काही एकच नाही. गुरुवारपासून तिस्तेचं पाणी वाढत होत ते आधी स्वत:चं पात्र भरण्यासाठी, त्यानंतर पात्रामध्ये असलेले छोटेमोठे चर वाहून नेऊन, नंतर आणखी चर पोटात घेऊन, कधी पूर्वेकडचा तर कधी पश्चिमेकडचा काठ भग्न करीत हे पाणी वाढलंय्. मग शुक्रवारी रात्री जुने, कायम असलेले चरही वाहून जायला सुरुवात झाली. पण त्यांचाही एक हिशेब होता - तिस्तेच्या तळच्या मातीच्या उताराच्या हिशेबाने. काल शनिवार संध्याकाळपर्यंत अंदाजांना काहीतरी अर्थ होता. तेव्हा तर काही तिस्तेने सगळे अंदाज कसे वाहून नेलेत हे कुणाला दिसलं नव्हतं. पण आज रविवारी सकाळी दिसतंय, की तिस्तेचा पूर आता अंदाज करण्यापलीकडे गेलाय्. नदी दोन्ही काठांवरच्या बांधांपासून बोल्डर्सच्या रांगांपासून बरीच खाली आहे. तिथेही पाणी गेलं, की फक्त बोल्डर्सच्या रांगाच उरतील. त्यांना मग पाणी धक्का देऊ लागेल. त्यापुढं कुणाचंही काहीही चालणार नाही. रविवारी सकाळी, तिस्तेला अड्डुसष्ट साली आलेल्या पुराची आठवण जणू वास्तव बनली.

घरांची छपरं, झाडं-सारं वाहात चाललंय्. वर कुठेतरी तिस्ता फॉरेस्टमध्ये घुसलीय्. म्हणजे तिस्तेला नवीन मार्ग सापडला की काय? तिथून पाणी बरंच वाहून जाईल? त्यामुळे इथले काठ शाबूत राहातील? की वरतून तिस्ता सगळं उपटीत-उपटीत येतेय्? काल संध्याकाळपर्यंत पाण्यात झाडं वाहाताना दिसत नव्हती. रात्री कधी सुरू झालं तिस्तेचं हे अरण्य उपटणं?

## एकशे चौतीस

# छपरावर बाघारूचं दर्शन

अशा परिस्थितीत, रायपूर-रंधामालीच्या बांधावरून लोकांना दिसलं की निताईच्या चरावरच्या एका पत्र्याच्या छपरावर एक माणूस इकडच्या बाजूला तोंड करून बसला आहे.

ते छप्पर आहे, अश्विनी रायच्या घराचं. बाघारू तिथं बसल्यावर पलीकडच्या तिरावरचा बांध आणि हे छप्पर यांच्यामध्ये काहीच अडथळा नसल्याने बाघारूवर त्यांची नजर जाते. त्याला पाहिल्याबरोबर कुणीतरी ओरडतं, 'माणसं वाहून चाललीयत्, माणसं वाहून चाललीयत्!'

म्हणजे वरती, पुराची जाणीव नसलेल्या एखाद्या वाडीत तिस्तेचं पाणी घुसलं की काय? तिथून ते माणसं वाहून आणू लागलं की काय? तिथं 'अडुसष्ट' झालं की काय? नाहीतर असं कसं होईल? डोळ्यांसमोर दिसतंय्, एक अख्खा माणूस वाहून आलाय् आणि तो अश्विनी रायच्या घराच्या छपरावर बसून इकडं पाहातोय!

आणखी माणसं वाहात येताहेत की काय, हे पाहाण्यासाठी बांधावरचे लोक तिस्तेच्या पात्रात उत्तरेकडे पाहातात. एकटा माणूस वाहात येणं अशक्य आहे. पण हा माणूस जसा वाहात येताना दिसला नाही, एकदम तो छपरावर बसल्यावरच दिसला, तशी इतर माणसंही कदाचित वाहात येताना दिसणार नाहीत, ती एखाद्या झाडावर किंवा छपरावर बसल्यावरच दिसतील!

तेवढ्यात पोरासोरांमधून एकजण ओरडतो, 'आणखी एकजण वहात येतोय् रे, आणखी एकजण!'

'कुठंय? कुठंय?'

निताई ओरडतो, 'कुणी पाहिलं रे?'

जगदीश विचारतो, 'कोण येतंय् रे वहात? माणूस? की बाई? की पोरगं?' काहीजण यावर हसतात.

'ते बघा, डोकं दिसंतय्! कुणीतरी म्हणतं.

'अरे डोकं नाही, लाकूड आहे ते!' दुसरं कुणीतरी म्हणतं.

नरेश मागे होता. तो निताईला हाक मारून म्हणतो, 'एऽ निताई! अरे तो अश्विनीदाच्या छपरावर बसलाय तो माणूसच आहे ना? की तेही लाकूडच आहे?'

तेव्हा परत सगळे बाघारूकडं पहातात. बांधावरून मुलं बाघारूला पाहून हात हलवतात; पण बाघारू त्यांना काहीच प्रतिसाद देत नाही. मुलं ओरडतात, पण बाघारू प्रतिसाद देत नाही किंवा हातही हलवीत नाही.

जगदीश अमूल्यला म्हणतो, 'रमणी सरकारना बोलव.'

'अरे थांबाना जरा! अजून कशात काही नाही, तर ही बोलवाबोलवी कशासाठी?' अमूल्य म्हणतो.

जगदीश म्हणतो, 'नाही. निताईदांना सांग डेप्युटी कमिशनरना एक फोन करा रायपूर मळ्यातून.'

'काय फोन करायला सांगू?'

'तिस्तेच्या पुरात वहात येऊन एक माणूस चरावरच्या एका घराच्या छपरावर बसलेला इथून दिसतोय म्हणावं.

निताई जरा विचार करतो. नरेश म्हणतो, 'जा निताई, फोन कर. माणूस तर खरोखरच दिसतोय्.'

जगदीश खिशातून दोन बिड्या काढून, एक निताईला देऊन म्हणतो, 'जा, करूनच ये फोन.'

निताई म्हणतो, 'नाही, मी विचार करीत होतो. भोलाबरोबर त्याच्या सायकलवर डबलसीट शहरात जावं, रिलीफ मिळवण्यासाठी. आता तर डेप्युटी कमिशनरना सांगितलं की वरतून माणसं वहात येताहेत, तर मग आपल्याला मदत देण्याची विनंती कोण ऐकणार? सगळे मग रेस्क्यूच्या कामाला लागतील. आता आपण वाहाणाऱ्या माणसांना शोधीत बसायचं, की स्वत:साठी तांदूळ-डाळ-गहू मिळवायच्या कामाला लागायचं?'

'पण एक माणूस तिथं वहात आलाय . . .' जगदीश जणू स्वत:शीच म्हणतो.

'फक्त एकच तर माणूस आहे. कुठून वाहात आलाय कोण जाणे!' निताई प्रतिवाद करतो.

## एकशे पस्तीस

# बाघारू गायब होतो

शेवटी लक्षात येतं की, समस्या तेवढी अवघड नाहीय्. असं ठरतं की निताईने भोलाबरोबर जलपाइगुडीला मदत मिळवण्यासाठी जायचं. इथून त्याला पार्टी ऑफिसात जावं लागणार. तिथून पार्टीच्या एखाद्या नेत्याला घेऊन ज्या ऑफिसरकडून मदतीचं काम होईल, अशा ऑफिसरकडं जावं लागणार. आज रविवार म्हणजे जरा अवघडच काम आहे. डाळ-तांदूळ-पोहे-गूळ मिळवावा लागणार. पावसाचा प्रकोप आणि पूर पाहून व्यापाऱ्यांनी या गोष्टी गुदामात लपवूनही ठेवल्या असतील. त्यात सरकार मदतीची घोषणा करणार की नाही तेही पहावं लागणार. शहरात पुराच्या आणखी बातम्याही समजतील. म्हणून निताईने शहरात जाणंच इष्ट - आज नाही, तर निदान उद्या तरी मदत मिळेल.

निताईच्या चरावरचे जे लोक या बांधावर आले आहेत ते अर्थात सावध राहूनच आले आहेत. पूर येण्यापूर्वी आपले सगळे संसार ते घेऊन येऊ शकले आहेत - त्यामुळे सरकारी मदत आली नाही, तर त्यांची उपासमार होईल, अशी परिस्थिती नाही.

सकाळपासून, बांधाच्या पश्चिमेच्या उतारावर स्वैपाकही सुरू झालाय्. पण पूर आला की, बांधावर यावं लागतं. सरकारकडून मदत मागावी लागते. जितकी मदत मिळेल, तितकाच लाभ.

पण अद्याप न आलेल्या त्या मदतीपेक्षा समोर अश्विनी रायच्या छपरावर बसून असलेला माणूस अधिक जवळचा आहे. आता मात्र नदीच्या पात्रात कुणी आणखी माणसं वाहात येताहेत का, हे शोधीत नाहीय्. किमान एक माणूस का होईना, रात्रभर वाहात येऊन या छपरावर येऊन बसला आहे. म्हणजे नदीच्या वरच्या बाजूला नदीने किनारा कुठेतरी मोठ्या प्रमाणावर उध्वस्त केला असावा. ते या माणसाच्या तोंडूनच ऐकायला हवं. म्हणूनच दोघांना सायकलवरून रायपूर मळ्याच्या मॅनेजरबाबूंकडे पाठवलंय् - म्हणजे मॅनेजरबाबू आवश्यक तिथे फोन करून सांगतील की, रायपूरसमोरच्या बांधाविरुद्धच्या चरावरील एका घराच्या छतावर एक जिवंत माणूस वहात येऊन बसला आहे. रविवारच्या दिवशी कुणाला फोन केला म्हणजे काम होईल हे मॅनेजरबाबूंनाच चांगलं ठाऊक आहे.

बाघारूबद्दल बांधावरच्या लोकांमध्ये जितकी अधिक चर्चा होऊ लागते, तितका तो या लोकांसाठी अधिक ठळक होऊ लागतो, अधिक दृश्य होऊ लागतो.

बाघारूला आपल्या ठिकाणाहून बांध तितकासा स्पष्ट दिसत नाही. बांधावरच्या लोकांना मात्र बाघारू संपूर्ण दिसतो. त्यामुळे बाघारू छपरावरून सुपारीच्या झाडावर गेल्यावर अश्विनी राय म्हणतो, 'गेल्या रे, गेल्या! माझ्या सगळ्या सुपाऱ्या गेल्या!' यावर गर्दीतला एकजण धमकावतो, 'तुमच्या सुपाऱ्या काय पुरात वाहून गेल्या, की त्या माणसाने खाल्ल्या?' यावर अश्विनी राय गप्प होतो.

बाघारू छपरावरून जवळच्या सुपारीच्या झाडावर आणि तिथून आपल्या मचाणावर गेला, तेव्हा बांधावरून दिसतही नाही आणि समजतही नाही. एक माणूस छपरावर होता, मग तो सुपारीच्या झाडावर चढला, तिथून उतरला नाही हे तर बांधावरच्या लोकांनी स्पष्ट पाहिलंय्. मग तो आता दिसत नाही ते? गायब झाला की काय?

बाघारूचं गायब होणं हा आता बांधावरच्या लोकांच्या चर्चेचा विषय बनतो. ज्यांनी बाघारूला छपरावरही पाहिलं नाही, असे लोक विचारू लागले, 'तुम्ही नीट पाहिलंत ना? माणूस होता, की नव्हता?'

## एकशे छत्तीस

# फोनवर बाधारुउद्धाराचं आवाहन

दुपारी अडीचच्या सुमाराला बांधावरची गर्दी एखाद्या छोट्या बाजारातल्या गर्दीच्या स्वरूपाची झाली.

रायपूर चहामळ्यातले बाबूलोक, रंधामाली बाजारातले दुकानदार, चहामळ्यातले मजूर, रंधामाळी बंदरावरचे लोक - गट करून पूर पहायला इथंच आले आहेत.

आज सकाळी बांधावरून दोन जणांनी सायकलवर जाऊन मळ्यात खबर दिली - तिस्तेच्या पुरात आता जिवंत माणसं वाहात यायला सुरुवात झालीय्. एकजण माणूस त्यांच्या बुडालेल्या घरांपैकी एकाच्या छपरावर अडकलाय, त्याच्या 'रेसकू' (रेस्क्यू) साठी मिलिटरीची नाव पाठवण्याबद्दल शहरात डी.सी.ला फोन करायला हवा. मळ्यातल्या बाबूंनीही या लोकांची खोदून खोदून चौकशी करायला सुरुवात केली. 'तुमचा चर कधी पाण्याखाली गेला? तुम्ही कधी बांधावर आलात? तो माणूस वाहात आलेला कधी दिसला?'

अमूल्यच्या वाडीवरचे सुबल आणि छिदाम मळ्यावर गेले होते. त्यांनी या प्रश्नांना संक्षिप्त उत्तरं दिली आणि निघण्यापूर्वी पुन्हा फोन करण्याबद्दल आठवण करून दिली.

सुबल-छिदाम निघून गेल्यावर मळ्यातल्या लोकांमध्येही ही खबर पसरली. आता मिलिटरी आली म्हणजे ते टी.व्ही.वर दाखवणारच ना! त्यामुळे दुपारचं जेवण उरकून मळ्यातले बाबू, त्यांची बायका-पोरं सारी बांधावर येतात.

मॅनेजरबाबूंनी जलपाइगुडीला याबद्दल फोन केलाय - रायपूर चहा कंपनीच्या ऑफिसात. त्यांना फोन करण्यापेक्षा मोबाइल सिव्हिल इमर्जन्सीला का फोन केला नाहीत असं रघू घोषने मॅनेजरबाबूंना विचारलं.

'अरे तो सगळा मिलिटरीचा मामला भाई, करायचा असेल तर तुम्हीच फोन करा, नाहीतर सोडून द्या, वाहात जात असतील माणसं तर जाऊ द्या वाहात!'

'एक फोन करायला इतकं काय घाबरता?' रघू विचारतो आणि स्वत:च फोन उचलतो. त्याला लाइन मिळते. तो एम.सी.इ.च्या माणसाशी बोलू लागतो, 'हं - म्हणजे अर्ध्या तासात तुम्ही पोचणार इथे!' आणखी थोडं ऐकून, फोन ठेवून तो मॅनेजरला म्हणतो, 'चला, अर्ध्या तासात मिलिटरीची नाव येणार इथे. चला. तिकडूनही मळ्याच्या ऑफिसने फोन केला होता.' मॅनेजर म्हणतात, 'मला सोडून द्या भाई - तुम्ही तर जाताच आहात, मग मी आणखी कशाला?'

रघूने खूपच आग्रह केल्यावर ते तयार होतात; पण म्हणतात, मिलिटरीच्या लोकांच्या प्रश्नांना तुम्हीच उत्तरं द्या, मी काही बोलणार नाही.

रघू हसत-हसत म्हणतो, 'अच्छा, चला!'

दोघेही बांधावर पोचतात, तेव्हा गर्दी चांगलीच वाढलेली. अर्ध्या तासातच मिलिटरीची नाव येणार आहे असं रघू लोकांना सांगतो. तेवढ्यात गुदामबाबू म्हणतात, 'अरे, रेस्क्यू करणार कुणाला? तो माणूस तर गायब झालाय!' 'कसा काय?' या रघू घोषच्या प्रश्नावर गुदामबाबू आपण पाहिलेला प्रकार सांगतात. 'म्हणजे झाडावरून पाण्यात पडला की काय तो?' मॅनेजर विचारतात.

'पडला असता तर दिसला नसता?' बाबू म्हणतात.

'मग काय तो अदृश्य झाला?' रघू विचारतो.

## एकशे सदतीस

# पुराची दंतकथा

'ते आता मी कसं सांगणार? पण हे सगळे लोक तर असंच सांगताहेत!' गुदामबाबू उजवीकडे हात दाखवतात.

'चला, बघू तर खरं,' रघू त्या दिशेला निघत मॅनेजरबाबूंकडे पाहातो. ते रघू घोषला जवळ बोलावतात. घोष आणि गुदामबाबू त्यांच्याकडे निघतात.

ते दोघे जिथं जाऊन थांबतात, तिथंच पूरग्रस्तांची तात्पुरती निवास-व्यवस्था सुरू होते. या सगळ्या गर्दीत पूरग्रस्त वेगळे ओळखू येतात. चोवीस घंटे ते वाऱ्या-पावसाला तोंड देताहेत. कुणीकुणी आपल्या सामानाचा ढीग केलाय्, आणि त्यामागं आडोसा घेण्याचा प्रयत्न केलाय्. जवळच गुरंही उभी आहेत. चिंब भिजलेली. शेणाच्या वासाने हवा जड झालेली. एक म्हातारी एका लाकडी फळीवर उताणी झोपलेली - तिच्या तोंडावर, पावसापासून संरक्षणासाठी एक टोपली पालथी घातलेली.

आता इथं पूरग्रस्तांची इतकी गर्दी आहे, की पूर पहायला येणारांना पुढे जाणं अवघड आहे. पूर पहाण्यामध्ये त्याचं कुतूहल आहे, तसंच स्मृतिचारणही आहे. अडुसष्टच्या पुरातून कसेबसे वाचलेले अनेकजण या गर्दीत आहेत. दोनेक वर्षांपूर्वीच्या पुरात सापडलेले अनेकजण आहेत. गुदामबाबू रघू घोषला म्हणतो, 'जरा इथल्या लोकांना विचारा. तो माणूस वाहात येऊन तिथे छपरावर बसलेला या सगळ्यांनी पाहिलाय्!'

'तुम्ही पाहिलंत ना? एक माणूस खरोखर वाहात आला होता?' रघू घोष थोडं हसून,

मोठ्या आवाजात विचारतो. पण ज्या पूरग्रस्तांच्या दलाला त्याने प्रश्न केलाय्, ते उत्तर देत नाही, एवढंच काय, त्याच्याकडे पहातही नाही. बहुधा हा प्रश्न त्यांना असंख्य वेळा विचारला गेला असावा.

'आता थोड्या वेळातच दिसेल - कोण त्या पत्र्याच्या छपरावर बसला होता आणि तिथून सुपारीच्या झाडावर गेला!' रघू घोष घोषणा करतो.

'का बरं? मिलिटरी येणार आहे की काय?' गुदामबाबू विचारतात.

'इथं येण्यापूर्वीच फोन केला मिलिटरीला. ज्योतिदांनी फोन केलाच होता आधी. मिलट्रीचे लोक निघाले आहेत, कुठल्याही वेळी इथं पोचतील,' रघू घोष अगदी घोषणेच्या स्वरात म्हणतो.

रघू घोषने सांगितलेली ही बातमी सारा बांधभर पसरते - मिलिटरी कधीही येऊन हजर होणार. पूरग्रस्तांमध्येही हालचाल दिसते. त्यांच्यापैकी बऱ्याचजणांनी बराच वेळ नदीकडे पाहिलेलं नव्हतं. आता काही-काही जण पुन्हा नदीकडे पाहातात.

रघू घोषची बायको लिली मागच्या बाजूने विचारते,

'मिलिटरी येऊन काय करणार इथं?'

'ते आता मी काय सांगणार? प्रत्यक्षच पाहा ना!'

'एक माणूस सुपारीच्या झाडावरून व्हॅनिश झाला म्हणे!' म्हणून लिली मोकळेपणाने हसते. रघू घोषही हसून ताबडतोब म्हणतो, 'अरे मॅनेजरबाबू आहेत जवळच!' लिली आणि तिची भाची गोपा हसणं बंद करतात.

आता ही घटना केवळ काही तासांपूर्वीचा प्रसंग उरलेली नाही. तिस्तेच्या पुरात एक माणूस वाहात आला होता - येऊ शकतो, दरवर्षीच असं होतं. तो अश्विनी रायच्या घराच्या छपरावर चढून बसला - होऊ शकतं, पुरात असाच जीव वाचवायचा असतो. तो माणूस छपरावरून सुपारीच्या झाडावर गेला - जाऊ शकतो - त्याला भूक लागू शकते; पण तो सुपारीच्या झाडावरून उतरला नाही.

ही शेवटची घटना आता आज सकाळचीच एक घटना राहात नाही. त्या माणसाचं सुपारीच्या झाडावर चढणं आणि तिथून न उतरणं, अदृश्य होऊन जाणं ही गोष्ट जणू तिस्ता नदीबद्दलच्या असंख्य दंतकथांपैकी एक दंतकथा होऊन जाते. तिस्ता आता केवळ एक नदी रहात नाही, ती या एका गोष्टीमुळे पुन्हा तिस्तामाय होऊन जाते. या तिस्तामाईचीच लोक मूर्ती घडवून पूजा करतात. या तिस्तामाईने आपल्या पात्रात वाहात असलेल्या एका मनुष्याला आकाशात अदृश्य करून टाकलं.

पुराबद्दलची आणखी एक दंतकथा जन्मली.

## एकशे अडतीस

# बाघारू-उद्धाराशी संबंधित शोधाशोध

पावसाळ्यात तिस्तेला एकापेक्षा अधिकवेळा पूर येतोच, काही-काही वेळा त्यातला एखादा पूर मोठा होतो. आता गेल्या आठवड्यापासून ज्या प्रकारे संततधार पाऊस पडतोय्, त्यावरून असा पूर येणार हे अपेक्षितच होतं. पण पूर जेव्हा अंदाजपल्याड जातो, तेव्हा सगळेच सावरून बसतात.

यावेळच्या या पुराने आता दुसऱ्या आठवड्यात पदार्पण केलंय्. आज संध्याकाळपर्यंत वारा आणि पाऊस यांचा वेग कणभरही कमी झालेला नाही. आता पूर हाताबाहेर गेल्यावर काय करायला हवं? एखाद्या शाळेबिळेत कँप तयार होणार का? बांधावरूनही हलावं लागणार का? हा बांधही पुरात वाहून जाणार का?

बाघारू वाहात आल्यानंतर मात्र आणखी इतर कुणी माणसं वाहात न आल्याने हा पूर काही लोकांच्या दृष्टीने हाताबाहेर जात नाही. असं एखादं माणूस वाहात येणं कुठल्याही पुरात होऊ शकतं. लोक थोडे आश्वस्त होतात.

त्यामुळे संध्याकाळपर्यंत बांधावरच्या गर्दीचे नकळतच दोन भाग पडतात. काही लोक आपल्या कुटुंबियांसाठी आडोसा तयार करतात; काहीजण तसेच गर्दीतच राहातात.

मोबाइल सिव्हिल इमर्जन्सी (एम्.सी.ई.)ची गाडी थोड्याच वेळापूर्वी येऊन उभी राहिली होती. दोन शिपायांना घेऊन ऑफिसर बांधावर येऊन पाहातो - त्यांच्यासमोर गुरंवासरं, माणसं, संसारोपयोगी वस्तू. ते वाट काढीत या गर्दीच्या दिशेने यायला सुरुवात करतात. ऑफिसर चौकशी करीत राहातो - 'काय, तो माणूस कुठं वाहात आलाय? कोण आहे तो? कुठंय्? कुणी पाहिलंय् त्याला?' बसलेल्या - पहुडलेल्या लोकांना बाघारूची काहीच कल्पना नाही. मध्ये ताडपत्र्यांचे आणि मेणकापडाचे आडोसे उभे केल्याने ऑफिसरही लोकांना लांबून दिसत नाही; नाहीतर लोकच त्याच्याकडे आले असते.

ऑफिसर जेव्हा पूर पहाणाऱ्या गर्दीपर्यंत येतो, तोपर्यंत खुद्द त्याच्यमागेही एक गर्दी तयार झालेली असते. ऑफिसरला पाहिल्याबरोबर चहाच्या मळ्याचे मॅनेजरबाबू जरा मागे जातात, लोकांमागे लपतात.

ऑफिसर विचारतो, 'काय', आपणाकडून फोन आला होता - एक माणूस वाहात येऊन चरावरच्या छपरावर बसलाय्. कुठं वाहात आला? कधी? सांगा, सांगा, जरा नदी बघू द्या मला, समोरून सरका - '

शिपायांना काम मिळतं. ते गर्दीला सरकवतात, काठ्यांनी ती जागा सुरक्षितही करतात. आता ऑफिसर नदीकडे थेट पाहू शकतो. तिकडे पाहात ऑफिसर चौकशी करीतच राहातो - न थांबता. त्यामुळे कुणाही माणसाला उत्तर द्यायची संधीच मिळत नाही.

'इथं फोन कुठंय्?' असं ऑफिसरने विचारल्यावर कुणीतरी गर्दीतून उत्तरतं, 'रायपूर चहाच्या मळ्यात.'

'असं, रायपूर?' म्हणून ऑफिसर रायपूरच्या दिशेने पाहातो. तेवढ्यातग कुणीतरी म्हणतं, 'मॅनेजरबाबूही आहेत.'

'कुठंयत् मॅनेजरबाबू?' ऑफिसर विचारतो.

'हे काय! मॅनेजरबाबू, अहो मॅनेजरबाबू!'

मॅनेजरबाबू आणखी मागे गेले होते. एका मजुराने त्यांच्या डोक्यावर छत्री धरलेलीच होती. हाक ऐकूनही मॅनेजरबाबू पुढे येत नाहीत. ऑफिसर मान वळवून मॅनेजरबाबू कुठंयत हे पाहाण्याचा प्रयत्न करतो. मॅनेजरबाबू आपल्याकडे येत नाहीत हे पाहिल्यावर ऑफिसरच मॅनेजरबाबूंकडे जातो.

'नमस्कार! आपणाकडून फोन आला होता. एका वाहात आलेल्या माणसाला रेस्क्यू करण्याबद्दल', जरा रिपोर्ट द्या.

मॅनेजरबाबू ऑफिसरकडे न पाहात जवळच्या एका मजुराला म्हणतात, 'रघूबाबूंना बोलाव.' ऑफिसरकडे न पहाताच ते म्हणतात, 'मी तर आत्ताच आलो. मला काहीच ठाऊक नाही. ज्याला ठाऊक आहे, त्याला बोलावलंय्. तो सगळं सांगू शकेल.'

रघू घोष येतो. मॅनेजरबाबू पून्हा मागे जातात. रघू मागूनच म्हणतो, 'हे काय त्या छपरावर एक माणूस वाहात येऊन बसला होता.' मग गर्दीतल्या लोकांना म्हणतो, 'अरे, तुम्ही बोला ना! तुम्ही तर त्या चरावरचे!'

जगदीश बारूईचा आवाज येतो, 'निताई नाही आला वाटतं अजून. अरे गजेन, नरेश, अमूल्य, बघा बरं हे काय विचारताहेत!'

नरेश गर्दीतून उत्तरतो, 'त्यात काय सांगायचं? त्या समोरच्या छपरावर एक माणूस वाहात येऊन बसला. सगळ्यांनी पाहिलं!'

ऑफिसर बोटाने नदीकडे निर्देश करून विचारतो, 'कुठं, त्या सुपारीच्या झाडाजवळच्या छपरावर?'

'हो!' नरेश उत्तर देतो.

'मग आता तर तिथं कुणीच दिसत नाही ते?' ऑफिसर विचारतो.

'अहो, तीच तर गोष्ट!' गर्दीतून जगदीश बारूईचा आवाज येतो, 'सगळ्यांनी पाहिलं - तिथं माणूस वाहात आला, नंतर सगळ्यांनी पाहिलं - तो गायब!'

'गायब म्हणजे? परत वाहात गेला की काय?' ऑफिसर वैतागानेच विचारतो. त्यांना यायला थोडी उशीर झालाय. दरम्यान एखादा माणूस वाहात येऊन पुन्हा वाहात गेला, आणि त्यातून काही गोंधळ झाला तर ऑफिसर त्या मामल्यात अडकू शकतो.

'कुणाला ठाऊक? वाहून गेला, की उडून गेला की आणखी कुठं गेला? हा प्रकार

झाला सकाळी. आपण आलात आत्ता. आता तो माणूस इतका वेळ कसा राहाणार?' जगदीश बारूई मागून बोलतो.

ऑफिसर म्हणतो, 'आम्हाला दहा ठिकाणी धावायचं असतं. आता काय करता येईल ते सांगा.'

आता नरेशलाही धीटपणा येतो. तो विचारतो, 'आम्ही तुम्हाला नाव घेऊन यायला सांगितलं होतं. आणलीत का तुम्ही नाव?'

'नाव लगेच्च कशी मिळणार? काय झालं ते तुम्ही सांगा, नंतर नावेची गरज आहे की नाही ठरवता येईल.'

'आम्ही तर सकाळपासून एकच गोष्ट सांगतोय् ना - एक माणूस वाहून आलाय आणि एका छपरावर अडकला होता. आता तुम्ही जीप घाला नदीत आणि शोधा त्याला!'

नरेशच्या बोलण्यावर सारे हसतात. नरेशच्या बोलण्यात संताप आणि आरोप दोन्ही आहेत. गर्दी आता ऑफिसरचा उपहास करू लागली आहे. त्याला आता काहीतरी काम दाखवावंच लागणार, नाहीतर गर्दी त्याला परत जाऊ देणार नाही.

'आता सुपारीच्या झाडाचा मामला सांगा!' तो म्हणतो.

यावर गर्दीतून कुणीच काही म्हणत नाही. रघूला समजतं, की तो माणूस सुपारीच्या झाडावरून अदृश्य झाला, हे कुणालाही ऑफिसरला सांगावंसं वाटत नाही, नाहीतर त्यांच्या सांगण्यातला दमच निघून जायचा! पण तो आता अदृश्य झालाय म्हणूनच नावेतून जाऊन तिथे त्याला शोधायला हवं.

## एकशे एकोणचाळीस

# बाघारु-उद्धारासाठीच्या बजेटवरून घासाघीस

ऑफिसर मुद्दामच उशीर करून आला होता. इथले लोकच त्या माणसाला वाचवण्याची काहीतरी व्यवस्था करतील असा त्याचा अंदाज होता. इथं खरोखर नाव मागवावी लागेल असं त्याला वाटलं नव्हतं. इथून निसटणं आता मुश्किल आहे. निसटायचं म्हटलं, तर दोन शिपायांना इथं ठेवून, 'फोन करायला जातो' म्हणून गाडी घेऊन रामपूर चहाच्या मळ्याकडे जाऊन तिथून पळून जाता येईल. आता खरोखरच कंट्रोलरूमला फोन केला, तरी नाव येणं संध्याकाळपर्यंत मुश्किलच आहे. त्यात मिलिटरीकडं रबराच्या नावा आहेत. त्या या प्रवाहाला तोंड देऊ शकणार नाहीत. आता साडेतीन वाजले आहेत. ऑफिसरच्या हाती आणखी दीडेक तास वेळ आहे. मग अंधारायलाच लागणार.

'हे पहा,' ऑफिसर निर्णायक सुरात म्हणतो, 'आपणापैकी कुणाकडं नाव आहे का? कारण कंट्रोलला फोन करून नावेची व्यवस्था करेपर्यंत अंधार होणार; आणि कंट्रोलला फोन करणं एवढंच फक्त माझ्या हातात आहे. त्यापेक्षा अधिक काहीही नाही. निर्णय तिथला डी.सी. घेणार इथून कुणी नाव आणि नावाडी दिलात तर मी नावेचं भाडं आणि नावाड्याची मजुरी देईन.

रघू घोष विचारतो, 'काय रे, इथं नाव आहे का कुणाची?'

'अरे इथल्या नावा या पुराशी टक्कर घेऊ शकतील का? आणि पैसे किती देणार पुरात नाव उतरवण्यासाठी?' जगदीश विचारतो.

'अशा परिस्थितीत पैशांवरून मी वाद घालणार नाही. तुम्हाला किती पाहिजेत, सांगा ना! नाव आहे इथं?'

पुन्हा सगळे चुपचाप होतात. गर्दी गटागटांत विभागली जाते. नरेश आणि अमूल्य एकमेकांशी कानात बोलत जरा दूर जातात. ऑफिसर जणू एकटा पडतो. थोडी वाट पाहून, ऑफिसर आवाज चढवून विचारतो, 'आता आणखी उशीर करता येणार नाही. एकतर तुम्ही नाव द्या, नाहीतर मी रायपूर चहामळ्यात जाऊन फोन करीन. मॅनेजरबाबू!' ऑफिसर मागे पहातो.

रघू घोष हे-हे करीत हसत म्हणतो. 'मॅनेजरबाबू निघून गेले. आम्ही आहोत.'

'आपण मळ्याचे कर्मचारी?'

'हो'.

नरेश आणि अमूल्य पुन्हा ऑफिसरजवळ येऊन थांबतात. ऑफिसर त्यांना विचारतो. 'काय झालं? मिळतेय का नाव?'

'हो. आम्ही चारजण जाऊ शकतो, पण दरडोई अडीचशे रुपये द्यावे लागतील. नावेचं भाडं वेगळं.' नरेश म्हणतो.

यानंतर सगळे अचानक गप्प होतात. फक्त वाऱ्या-पावसाचा आवाज तेवढा येत रहातो. ऑफिसर म्हणतो. 'हे काय? तुमच्यातलाच एक माणूस तिथं अडकून पडलाय. खरं तर तुम्हीच त्याला आतापर्यंत सोडवून आणायला पाहिजे होते. आम्ही खर्च करायला तयार आहोत म्हटल्याबरोबर हजार रुपये सांगताय काय!' ऑफिसर इकडे-तिकडे पहातो. रघू घोष हे-हे करीत हसतो.

गुरांच्या बाजारात जशी एखाद्या जनावराच्या किंमतीवरून दिवसभर घासाघीस चालू रहाते, तशीच परिस्थिती आता बांधावर तयार झालीय. नरेश - अमूल्य गर्दीपासून थोडे दूर जाऊन बसतात, पण आपसातही काही बोलत नाहीत. गर्दीतले काहीजण ऑफिसरजवळ, तर काहीजण नरेश-अमूल्यजवळ जाऊन थांबतात. गर्दी पांगल्यावर दिसतं, जगदीश बारुई ऑफिसरजवळ, त्याच्या उजव्या बाजूला जमिनीवर बसलाय.

ऑफिसर पुन्हा दोन वेळा नावेची चौकशी करतो. त्यावरही कुणी उत्तर न दिल्यावर म्हणतो. 'वा:! तुम्हाला हजार रुपये द्यायला तयार झाल्यावर नाव मिळेल, नाहीतर मिळणार नाही काय? पण पुराच्या वेळी असं करणं बेकायदेशीर आहे!'

जगदीश आपल्या जागेवरून उठून नरेशजवळ जाऊन बसतो, आणि अगदी हळू आवाजात म्हणतो; 'सातशे रुपये ठरवून टाक-तुम्हाला दरडोई दीडशे, आणि शंभर रुपये मला देऊन टाक.'

'तुम्ही मध्येच मलई खायला बघताय काय? दीडशेला मी राजी होणार नाही!' नरेशही इतरांना ऐकू जाणार नाही, अशा आवाजात म्हणतो.

'तुम्ही राजी आहात की नाही ते सांगा. अमूल्यला विचार.' जगदीश म्हणतो

हळू आवाजात अमूल्यशी मसलत करून नरेश म्हणतो; 'अमूल्य प्रत्येकी दोनशेच्या खाली राजी नाही. अन् तुम्हाला कशाचं कमिशन द्यायचं हो?'

जगदीश हसत म्हणतो, 'तुझंच भलं झालं असतं मला शंभर दिले असते तर! नसशील देत तर मीच ऑफिसरकडून कॉंट्रॅक्ट घेतो. तेव्हा तुला पन्नास रुपये सुद्धा मिळणार नाहीत.' एवढं बोलून जगदीश उभा राहतो, बोटं मोडतो, जांभई देतो.

आता बाघारूला हे कसं कळणार, की तो कुठं गेला हे शोधण्यासंदर्भात सरकारी ऑफिसरशी मोबदल्याबद्दल घासाघीस चाललीय? पुरात अनेकांच्या अनेक वस्तू वाहून जातात, अनेकांकडे अनेक वस्तू वाहात येतात. आपल्याकडं नक्की काहीतरी वाहात येतंय की नाही हे नरेश, अमूल्य आणि जगदीश यांना समजत नाही. त्यांना काहीतरी वाहात आणायचंय

ऑफिसर म्हणतो, 'हे पहा, मी तर काही इथं संपूर्ण दिवसभर थांबू शकत नाही. इथं तर रेस्क्यू करण्यासाठी एकही माणूस अडकलेला दिसत नाहीय. हेच मी रिपोर्ट करतो. नाहीतर आपण नाव कुठंय ते सांगा. आम्ही रेस्क्यूची व्यवस्था करतो.'

## एकशे चाळीस

# बाघारु उद्धाबद्दलच्या चर्चासभेचा त्याग व नंतर मतैक्य

ऑफिसर थोडावेळ वाट पहातो; पण अवस्था काही बदलत नाही हे पाहून जीपच्या दिशेने चालू लागतो.

अश्विनी राय क्षीण आवाजात म्हणतो, 'ए नरेश्या, अरे ऑफिसर निघून चालला रे, बघ ना!' जगदीश कपाळावर हात मारून म्हणतो, 'अरे नरेश्या-अमूल्या, तुमचे हजार

रुपये चालले रेऽ जीपमध्ये बसून! आता स्वत:चे हात चाटत बसा!'

नरेश ओरडतो, 'एऽ, चला सगळेजण, जीप अडवा!' नरेश, अमूल्य आणि इतरजण ऑफिसरच्या दिशेने धावायला सुरुवात करतात. बाघारूला वाचण्यावरून सकाळी सुरू झालेली गडबड दुपारपर्यंत नरेश अमूल्यचा व्यवसाय बनेल, हे कुणाला ठाऊक होतं?

ऑफिसरजवळ सारेजण पोचतात, पण ऑफिसर थांबत नाही, वळूनही पहात नाही. ऑफिसर ड्रायव्हरला म्हणतो, 'गाडी वळवून घ्या, रामपूरला जाऊ!'

तेव्हा नरेश म्हणतो, 'आपण निघालात की काय? मग त्या माणसाच्या रेसक्यूचं काय होणार?'

'तिथं तर मला कुणी दिसलं नाही. तुम्ही म्हणताय तिथं माणूस आहे. मी तुम्हाला म्हटलं, मला नाव द्या, माणसं द्या, पैसे देतो; तर तुम्हाला वाटलं घ्या चांदी करुन!' आता मी हे कंट्रोल-रुमला कळवतो. ते म्हणतील तसं करतो!

गाडी वळून उभी रहाते. ऑफिसर ड्रायव्हरजवळ बसल्यावर नरेश मोठ्याने विचारतो, 'आपण परत इथं येणार, की मळ्यातून परस्पर शहराकडे जाणार?'

ऑफिसर म्हणतो, 'देखो भाई, मला पाचशे रुपये खर्च करण्याचा अधिकार आहे. तुम्ही तेवढ्यात करू शकत असता, तर मी लगेच दिले असते. मी आता कंट्रोलला फोन करतो. त्यांनी सांगितलं, तरी आर्मीची नाव यायला उद्याची दुपार होईल. शिवाय कुणी माणूस अडकलेला दिसतही नाही. रेस्क्यू करणार कुणाला? मी फोन करून परत इथं येतो; कंट्रोल काय म्हणालं ते तुम्हाला सांगून जातो. याउलट मी करण्यासारखं काही नाही. चला!'

ड्रायव्हरने गाडी सुरू केल्याबरोबर नरेश म्हणतो, 'थांबा, थांबा!' ड्रायव्हर गाडी थांबवतो. नरेश म्हणतो, 'ऐका सर. या नदीत उतरण्याचं धाडस मिलिटरीही करू शकणार नाही. पाण्याचा असलातसला धक्का बसला, तर नाव उलटी होईल. आपणही आता फोन करायची तसदी होऊ नका. नावेच्या भाड्यासहित आम्हाला एक हजार रुपये द्या, आम्ही आत्ता नाव घालतो नदीत!'

'तुम्ही आता जाणार? नाव आहे जवळपास?

'हो. रंधामाली हाटाजवळ.'

'तर मग ऐका. मी तुम्हाला साडेसातशे रुपये देऊ शकतो. पण आता पाचशे; उद्या आमच्या ऑफिसात जाऊन बाकीचे अडीचशे आणावे लागतील. आम्हाला एका कामासाठी एकावेळी पाचशे रुपयांपेक्षा अधिक खर्च करण्याचा अधिकार नाही. अडीचशे उद्या तुम्हाला देऊ!

नरेश हसत-हसत म्हणतो. 'उद्या आणखी एक रेस्क्यू दाखवणारच आहात तर

त्याचेही पाचशे रुपये देऊन टाका सर. तुम्हाला तर दिसतंच आहे. घरदार, जमिन-जुमला सगळं वाहून गेलंय!'

आता ऑफिसर सस्नेह धमकीच्या स्वरात म्हणतो, 'बसा बरं गाडीत! उशीर केलात तर नाव घालता यायची नाही नदीत-नाव कुठंय? तिथं जाऊ. कुणा-कुणाला घ्यायचं, घेऊन जा. गाडी वळवा.

नरेश मागे वळून गर्दीकडे पहातो. गर्दीतल्या एका मुलाला म्हणतो 'ए बालिश, पळत जा, अश्विनी काकाला त्याच्या माणसाला हाटाजवळ पाठवायला सांग!' नरेश मागून जीपमध्ये चढतो. अमूल्यही चढल्यावर बालिशसुद्धा हट्ट करून जीपमध्ये बसतो. गाडी पूरग्रस्तांच्या तात्पुरत्या वस्तीकडे निघते. नरेश म्हणतो, 'नाव जिथं आहे, तिथपर्यंत गाडी जाणार नाही. बांधापर्यंत जाईल. पुढे नाही.

बोलता-बोलता गाडी पोचते. बालिश उडी मारून खाली उतरतो. काय झालं, ऑफिसरने नरेश-अमूल्यला धरलं की त्या दोघांनी ऑफिसरला धरलं हे लोकांना समजत नाही. नरेश गाडीबाहेर तोंड काढून, बांधाकडे पहात ओरडतो. 'ओऽ अश्विनीकाका, कादाखोवाला पाठवून द्या हाटाजवळ!' आणि पुन्हा तोंड आत घेऊन म्हणतो, 'चला!' दरम्यान बालिशही बांधावर पोचतो आणि घोषणा करतो, 'नदीत नाव घालणार, कादाखोवाला पाठवायला सांगितलंय.'

कादाखोवा हा अश्विनी जोतदाराकडे काम करणारा माणूस म्हणजे या चरावरचा उस्ताद नावाडी आहे.

## एकशे एकेचाळीस

# कादाखोवाचा निद्राभंग

ऑफिसरची जीपगाडी नरेश-अमूल्य यांना घेऊन गेल्यावर अश्विनी राय जाऊन कादाखोवाला हाक मारतो. 'एऽ भाऊ!' अश्विनी रायची गुरं जिथं खुंटीला बांधलेली आहेत, त्यांच्या खाली, बांधाच्या पश्चिम उतारावर तो झोपलेला होता. अंगावर फक्त लंगोटी आणि गमछा. गमछा तोंडावरून ओढून घेऊन तो पालथा झोपलेला होता. अश्विनी राय खाली उतरून पुन्हा हाक मारतो. 'एऽ भाऊ, भाऊ रेऽ!'

बांधावरून जगदीश ओरडतो, 'दगड हाण एक डोक्यात त्याच्या, नाहीतर धक्का दे एक!' अश्विनी राय कादाखोवाची दगडासारखी पाठ हालवीत आणखी जोराने हाका मारतो, 'एऽ भाऊ, भाऊ रेऽऽ!'

रघू घोष ओरडतो, 'पाणी ओता त्याच्या तोंडावर!' आणखी एकदा अश्विनी राय

हाक मारणार, एवढ्यात कादाखोवा दोन्ही हात आपल्या तोंडाजवळ आणतो. अश्विनी म्हणतो, 'एऽ कादाखोवा, झटकन ऊठ बरं, झटकन ऊठ, नाव घालायचीय पाण्यात!'

कादाखोवा उठून बसतो. गमछाने तोंड पुसतो, आणि अश्विनी रायकडे पहातो. अश्विनी त्याला म्हणतो, 'हाटाजवळ जा, तिथं नरेशुवा आहे, नाव घालायचीय नदीत!'

कादाखोवा लांब-लांब पावलं टाकीत जातो. आणि वळणावर दिसेनासा होतो. तो जणू झोपेतच चालत गेल्यासारखा वाटतो.

नाव रंधामाली हाटाजवळ कुठे ठेवलेली असते हे सगळ्यांना ठाऊक आहे. तिचा एक मालकही आहे. एरवी ही नाव भाड्यांची वाहातूक करण्यासाठी वापरली जाते. नावेची देखभाल-दुरुस्ती चरावरचे लोकच करतात. इथून उत्तरेला बांध जिथं डावीकडे वळतो, तिथं नाव बांधलेली आहे. ऑफिसर अमूल्य-नरेशला त्या वळणावर उतरवून देईल आणि कादाखोवा इथून त्या वळणापाशी पोचेल.

पण नाव नदीत घालण्याआधी तयारीसाठी थोडा वेळ लागेल. दोनेक ठिकाणी हातोडीने नाही, निदान दगडाने तरी नाव ठोकून घेतली पाहिजे. तीनजण नावेत जाणार असतील, तर तेवढ्या लग्ग्या लागतील. त्यांच्याशिवाय पाण्यात नाव सावरता येणार नाही.

पलीकडून ऑफिसरची जीप थांबल्याचा आवाज येतो. काहीजण तिकडे जातात, तेवढ्यात ऑफिसरच उतरून खाली येतो.

## एकशे बेचाळीस

# ऑपरेशन बाघारू

ऑफिसर बांधावर चढून, नदीच्या दिशेने पहात कमरेवर हात ठेवून उभा रहातो. नाव जिकडून येणार, त्या बाजूला-डावीकडे पहात रहातो. नंतर मागे वळून आपल्या दोन शिपायांना शोधतो. तेवढ्यात दबल्या आवाजात लोक म्हणतात, 'आली, आली! नाव आली!' नाव एखाद्या फळकुटासारखी बांधावरच्या लोकांसमोर येते. बांधावरून ऑफिसर, रघू घोष, लिली, गोपा, ऑफिसरची थोरली मेहुणी, गुदामबाबू, हाटातले लोक पहात असतात. नावेत आहेत नरेश, अमूल्य. लग्गी मारताहेत. कादाखोवा नावेच्या मागच्या बाजूला उभा राहून तेच काम करतोय. प्रवाहात नाव सोडण्यापूर्वी पहिलं कार्य म्हणजे नाव सरळ ठेवणं. त्यानंतर मग लग्गी मारण्याचा एक छंद तयार होतो.

कादाखोवा एकदा उजवीकडे, एकदा डावीकडे लग्गी मारीत असूनही नावेला सरळ ठेवू शकत नाही. इकडे अश्विनी रायची सुपारीची झाडं मागे पडतात. अचानक कादाखोवा

उजवीकडे लगी मारणं बंद करून डावीकडेच तीन वेळा लगी मारतो. नाव लगेच वळते. बांधावरून लोक ओरडतात, 'गेली रे, नाव गेली!' पण तेवढ्यात कादाखोवा नावेच्या पुढच्या टोकाशी जातो. नाव चराच्या दिशेने जाऊ लागते. 'मिळाला, प्रवाह मिळाला!' ते नदी पार करून चराजवळ पोचले आहेत. मधूनमधून वर आलेल्या छपरांमुळे बांधावरून नाव दिसत नाही. कुणीतरी म्हणतं, 'उलटली की काय नाव?'

जगदीश ठामपणे ओरडतो, 'उलटणार कशी? अहो आमचा कादाखोवा आहे ना! परत अमूल्य-नरेशचा जोर आहे!' ऑफिसर विचारतो. 'परत कधी येणार नाव?'

जगदीश पुन्हा ठामपणे म्हणतो. 'का? आत्ताच परत येईल! उशीर कशाला करतील ते?'

## एकशे त्रेचाळीस

# नृत्यभाषेत संवाद

नाव तिघेजण एका झाडाजवळ अडकवतात. दोरीने नाव त्या झाडाला बांधतात. त्यानंतर, सर्वांना बाघारू दिसतो.

बाघारू आपल्या झाडांमध्ये मचाणावर उभा होता. आधी तो बसलेलाच होता. अचानक त्या छताच्या एका बाजूला माणसांचा आवाज आल्याने तो उभा राहिला. त्या लोकांनी आपल्याला पाहिलंय हे लक्षात आल्यावर बाघारूखाली बसला. गुडघ्यांभोवती हातांचा वेढा घातला.

आता ती नाव आणि बाघारूची झाडं यांच्यामध्ये फक्त काही हातांचं अंतर आहे. पाणी नसतं, तर तिथं अश्विनी रायची रिकामी जमीन असती. नरेशला दिसतं, तो सुपारीच्या झाडाचा शेंडा म्हणजे छपरावरून उतरण्यासाठी पायरीसारखा आहे. फक्त बांधावरून पाहताना तो माणूस छपरावरून, सुपारीच्या झाडाचा शेंडा पायरीसारखा वापरून खाली उतरलेला दिसला नव्हता.

बाघारूला दिसतं - ही तीन माणसं नावेने आली आहेत, पण त्यांनी एकही झाड आणलेलं नाही. कदाचित आणखीही माणसं येतील, असं त्याला वाटतं.

नरेश ओरडून बाघारूला विचारतो, 'अरे, तुम्हीच तेव्हा त्या छपरावर बसलेला होता का?'

हे काही हातांचं अंतर त्यांना तोडता येत नाही. मधून जोरात पाणी वहातं आहे. निघताना त्यांनी ठरवलं होतं, तिथं कुणी माणूस सापडला. तर त्याला आपल्याबरोबर नावेत घेऊन यायचं. पण इथं ते आपला हा हेतू विसरूनच जातात. बाघारू दिसल्यावर

पुन्हा त्यांना तो आठवतो. पण या अथांग पाण्यात त्यांची नाव कुसळासारखी आहे. नरेशच्या तोंडून अवान्तर सामाजिक जिज्ञासेवाचून काहीच प्रश्न बाहेर पडत नाही.

आपल्याला त्यांनी हे विचारलंय हे बाघारूला समजतच नाही. अमूल्य पुन्हा नावेवरून ओरडतो. 'ऐकू येतंय का? अहो देऊनिया, ऐकू येतंय का? बाघारूला ते काहीतरी बोलताहेत असं दिसतं, पण तो काही उत्तर देत नाही.

'अरे, मुका आहेस की काय? परत यायचं नाही का?' नरेश बाघारूला ओरडून विचारतो. बाघारूला नावेत घेऊन पुन्हा परत जायला हवं. ते लोक आपल्यासाठी आले आहेत हे त्याला समजतच नाही. त्याला वाटलं, हे कुठेतरी चालले असावेत, आणि दम लागल्याने विश्रांती घेण्यासाठी थांबले असावेत. इकडे नरेश आणि अमूल्य यांना मात्र बाघारूचं मुक्यासारखं बसून रहाणं असह्य होतं.

नरेश-अमूल्य दोघेही ओरडतात, 'अरे, तू बहिरा आहेस की मुका?'

कादाखोवा झाडाची फांदी धरून बसलेला होता. नरेश आणि अमूल्य बाघारूकडे पाहून ओरडत असल्याने बाघारूला वाटतं, त्यांना काहीतरी हवं आहे. तो उडी मारून हातात कुऱ्हाड घेऊन उभा रहातो. ती वर उचलून तो विचारतो, 'पाहिजे?'

नाव डळमळू लागते. नरेश - अमूल्य मागे वळून पाहतात. त्याबरोबर बाघारू नायलॉनच्या दोरीचं बंडल वर उचलून विचारतो, 'पाहिजे? हे पाहिजे का?'

अमूल्यला हे समजतं. आम्हाला दोरी हवी आहे. असं तो दोन्ही हातांनी खुणा करून सांगतो. ती खूण समजल्याने बाघारू बंडलमधून दोरी सोडू लागतो.

नरेश म्हणतो, 'हे काय रे? कुऱ्हाड-दोरी घेऊन हा जणू आपल्यालाच रेसकू करायला लागलाय' नरेश पुन्हा बाघारूला म्हणतो, 'एऽ दादा! एऽ दादा!' बाघारू त्याच्याकडे पहातो. नरेश हात उचलून त्याला थांबायला सांगतो. तो थांबतो. नरेश अमूल्यला म्हणतो. 'एऽ अमूल्य, दोरी कापायची गरज नाही असं त्याला समजाव. समजाव, की दोरी नदीत वाहात सोड, एक टोक त्याच्या हाती राहू दे. आपण एक टोक धरून त्याच्याजवळ जाऊ' अमूल्य टाळी वाजवून बाघारूला हाक मारतो. मग एक हात हवेत वर ठेवतो आणि दुसऱ्या हाताने पाण्यातून काहीतरी वर आणल्यासारखा अभिनय करतो. सरळ उभा राहून अमूल्य स्वतःच्या छातीवर दोन्ही हातांनी दोन-तीनदा स्पर्श करून ते बाघारूच्या दिशेने पुढे करतो. दोन-तीन. वेळानंतर पुन्हा दोन-तीनवेळा आपल्यालाच बाघारूकडे जायचं आहे, हे बाघारूला समजलं, तर तो दोरी पाण्यात सोडील हे अमूल्यला समजलंय.

थोड्याच वेळात अंधार होईल. वाऱ्या-पावसातही काहीच खळ नाहीय. आज रात्रीत ही झाडं, ही छप्परं, हे मचाण-सारंच वाहून जाईल, अशा गतीने पाणी वाढतंय. अमूल्य-

नरेशला तर हे अधिकच कठीण वाटतंय. काही शेकडा रुपयांसाठी अशा पुरात उतरणं चुकलं तर नाही ना, असं त्यांना वाटतं. तेवढ्यात अमूल्यच्या हातवाऱ्यांचा अर्थ बाघारूच्या लक्षात येतो. दोरी पाण्यात टाकून, दोन्ही हातावर करून बाघारू त्यांना आश्वस्त करतो. आणतोय, आणतोय त्यांना इकडं आणतोय. मग तो मचाणाकडं आणि छपराकडं पहातो.

## एकशे चव्वेचाळीस

# बाघारू आणि त्याचे उद्धारकर्ते

बाघारू एक अंदाज करतो. या झाडांना काही चार माणसांचं वजन पेलणार नाही. त्यापेक्षा पत्र्याच्या छपरावर गेलेलं बरं. त्या लोकांनाही सुपारीच्या झाडावरून छपरावर येता येईल. बाघारू सुपारीच्या झाडावरून छपरावर चढतो.

अश्विनी रायच्या छपरावर एक माणूस चढलाय असं बांधावरच्या लोकांना दिसतं. ऑफिसर चौकशी करू लागतो. लोक अंदाज वर्तवू लागतात. कुणी म्हणतं तो वाहात आलेला माणूस असेल, कुणी म्हणतं नरेश असेल, कुणी म्हणतं अमूल्य असेल, कुणी म्हणतं कादाखोवा असेल.

बाघारू छपरावर येऊन दोरी पाण्यात सोडून देतो. पाण्यात पडल्याबरोबर ती सरळ होते. अमूल्य एका लगीने दोरी ओढून घेतो. दोरीला ओढ बसल्यावर त्यांच्या नावेलाही ओढ बसते. नाव त्या छपराच्या दिशेने वळते. कादाखोवा विचारतो, 'नाव सोडू?' पण, दोरी पलीकडे पक्की बांधलेली आहे की नाही हे ठाऊक नसल्याने नरेश-अमूल्य द्विधावस्थेत असतात. बाघारू सांगतो. 'सोडा, सोडा नाव. दोरी पक्की बांधलीय इकडं. झाडांना.'

कादाखोवाने दोरी सोडल्याबरोबर नाव झाडाजवळून सरकते. प्रवाहाविरुद्ध जाण्यासाठी त्यांना सर्व शक्ती पणाला लावावी लागते. आस्ते आस्ते ते बाघारूच्या झाडाजवळ पोचतात. कादाखोवा बाघारूच्या झाडांपैकी एका झाडाच्या मजबूत फांदीला नाव बांधतो.

अमूल्य हळूच बाघारूच्या एका झाडाच्या फांदीवर पाय देऊन सुपारीच्या झाडाला धरतो. नरेशही नावेतून उतरतो. दोघेजण उतरल्याने नाव हलकी होते. नरेश-अमूल्य अश्विनी रायच्या छपरावर चढतात. कादाखोवा म्हणतो, 'मी नावेतच थांबतो.' तो नाव झाडांच्या फांद्यामध्ये आणून ठेवतो.

## एकशे पंचेचाळीस

# बांधावर तर्कवितर्क

आता छपरावर दिसणारी ती तीन माणसं कोण आहेत, यावर बांधावरच्या लोकांमध्ये तर्कवितर्क सुरू होतो. अमूल्यला सगळे लगेच ओळखतात. तो सर्वांत बुटका, म्हणून. पण, छपरावर आधी जो उभा होता, तो नरेश की कादाखोवा याबद्दल लोकांना संशय वाटतो. अमूल्यबरोबर जो छपरावर आला, तो जर नरेश आहे असं मानलं, तर मग आधीचा माणूस कादाखोवाच असणार. असं असेल, तर मग ज्या माणसाला वाचण्यासाठी हे लोक इथून नाव घेऊन गेले, तो माणूस कुठंय? सुपारीच्या झाडावर चढून तो माणूस खरोखरच अदृश्य झाला की काय?

ही चर्चा ऐकून ऑफिसर म्हणतो, 'हे काय? तो माणूस नाही? तुम्हाला तो माणूस दिसत नाही? आणि तुम्ही किती गडबड सुरू केली होती बरेच लोक वाहून चाललेत म्हणून! परत पैशांसाठी हुज्जत सुरू केलीत. आता तर मला एक्स्प्लनेशन द्यावं लागणार. कुणीही माणूस अडकलेला नसताना नाव पाठवलीत कशासाठी म्हणून!'

ऑफिसर गर्दीला मागे सारून पुढे जातो. तेव्हा दिसतं, की त्या पत्राच्या छपरावर ते तिघेजण आपसात बोलताहेत. अमूल्य छपरावर एका बाजूला चक्क बसलाच आहे, आणि नरेश व 'कादाखोवा'(?) चर्चा करताहेत. ते बोलताहेत, हे त्यांच्या उभं रहाण्याचा पद्धतीवरून आणि हातवाऱ्यांवरून समजतं. कादाखोवाशी नरेश एवढं काय बोलतोय असं लोकांना वाटतं.

## एकशे सेहेचाळीस

# शीर्ष बैठक

नरेश चरावरच्या छपरावरून बांधाकडे पहातो. बांधावरून चर जवळ वाटतो, पण चरावरून मात्र बांध दूर वाटतो. नरेश अश्विनी रायच्या छपरावर उभा आहे. तिथून त्याला फक्त धो-धो वाहाणारं पाणी दिसतंय. त्याचं घर इथून थोड्याच अंतरावर आहे, पण त्यावरूनही धो-धो पाणी वाहातंय. पाण्यात उतरून पोहोत गेला, तरी नरेशला आपलं घर सापडणार नाही. बांधावरून पाहाताना वाटलं होतं, पाणी उतरलं की चरावर पुन्हा जाता येईल. पण आता मात्र तसं काही वाटत नाही. पुन्हा लवकर बांधावर गेलं पाहिजे, असं त्याला वाटू लागतं. तो बाघारूला विचारतो, 'सकाळी या छपरावर तुम्हीच बसला होता ना?'

'हो.'

'त्यानंतर सुपारीच्या झाडावर चढून व्हॅनिश? परत उतरलाच नाहीत!'

'माझ्या झाडांवर बसलो होतो.'

'आम्हाला वाटलं, तुम्ही माणूस की पुरातलं भूत! आता चला, चला!'

'कुठं जायचं?' बाघारू दोरी गुंडाळीत-गुंडाळीत म्हणतो.

'तिकडं, बांधावर. आम्ही तुम्हालाच रेसकू करायला आलो.'

'मी नाही येणार!' बाघारू त्यांच्याकडे वळून म्हणतो. नरेश संतापतो, 'नाही येणार म्हणजे? यावंच लागणार तुम्हाला. तुम्हाला रेसकू करण्यासाठी नाव घेऊन बुडत-बुडत इथं आलो, आणि तुम्ही येणार नाही म्हणता? चला-' नरेशच्या आवाजात आज्ञेचा सूर येतो; पण जणू त्याला जाणवलेलंही दिसतं, की बाघारू येणार नाही.

अमूल्य बांधाकडे तोंड करून अश्विनी गयच्या छपरावर बसला. त्याचंही घर याच चगवर पाण्याखाली गेलेलं. सगळीकडे नुसतं धो-धो वहाणारं पाणी, पाऊस आणि वारा. त्याला वाटतं, जणू आपलं एकट्याचंच घर बुडालंय. बेचैन होऊन तो ओरडतो 'न का येईना तो! मी आता इथं थांबणार नाही-'

नरेश अमूल्यकडे पाहून काहीतरी समजूत घेतो, मग हळू आवाजात म्हणतो, 'हे काय म्हणतोयस? याला नाही घेऊन गेलो तर तुझे पैसे कोण देणार?'

'न का देईनात! कुणाला ठाऊक होतं हा इथं आहे म्हणून!'

'नव्हतं ठाऊक तर मग आलास कशाला इथं?'

'पैशाची बात काढतोस तू, साल्या? बघतोयस ना आसपास? तिस्तेच्या तळाशी तुझ्या जमिनीचं वाळवंट व्हायला लागलंय अन् तुला पैसा सुचतोय?

नरेश बाघारूला म्हणतो, 'ए देऊनिया, ऐका-' बाघारूने दोरी तोपर्यंत गुंडाळून घेतलीय. तो नरेशला म्हणतो, 'मी देऊनिया नाही. गयानाथ जोतदार माझा देऊनिया.'

'तुमचं घर कुठंय?'

'हेच!' बाघारू तिस्तेकडे हात दाखवतो. नरेशच्या लक्षात येत नाही. तो विचारतो, 'तुमचं गाव कुठंय?'

बाघारू पुन्हा संपूर्ण तिस्तेकडे निर्देश करतो 'इथेच!'

'पाण्यात वाहून गेलं तुमचं गाव?' नरेश विचारतो.

बाघारू मान हलवतो. नाही, वाहून नाही गेलं.

'मग तुम्ही वाहात आलात, ते कुठून?'

'गयानाथच्या फॉरेस्टमध्ये पुराचं पाणी घुसलं!

'मग?'

'झाडं पडली.'

'मग?'

'गयानाथने मला न् झाडांना नदीत सोडलं.'

'मग?'

'मी वाहात आलो.'

'आलात तर आलात. बाबा, आता बांधावर जावं लागणार. ऑफिसर आलाय. त्याने आम्हाला पाठवलंय. चला-' नरेश पुढं होऊन बाघारूचा हात धरतो. बाघारू प्रतिकार करीत नाही. नरेश त्याचा हात ओढतो, बाघारू हलत नाही. नरेश हात सोडून देतो, बाघारूचा हात खाली पडतो.

'गयानाथ म्हणालाय, बाघारू, झाडं घेऊन वाहात जा, पूर उतरल्यावर तुला शोधून काढीन.'

'मग तुमची झाडं घेऊन चला बाबा - इथूनच तुमचा देऊनिया तुम्हाला शोधून काढील.'

बाघारू चुपचाप बांधाकडे पहातो. बांधाजवळ त्याला शोधणं गयानाथला सोयीचं आहे हा मुद्दा त्याला पटू शकतो. बांध, तिथली माणसं, तिथलं चलनवलन या साऱ्या गोष्टींची त्याला ओढही वाटू शकते.

नरेश म्हणतो, 'चला, चला, झाडं घेऊनच चला, चल अमूल्य!'

अमूल्य उठून उभा रहातो. नंतर नरेश सुपारीच्या झाडाकडं एक पाऊल टाकतो. मान वळवून पहातो, बाघारू हलत नाहीय.

## एकशे सत्तेचाळीस

# कादाखोवाचं नाव चालवणं

नरेश वळून, अस्वस्थ होऊन विचारतो, 'काय झालं?'

बाघारू बांधाकडं पहात म्हणतो, 'मी इथंच थांबतो.'

नरेश जोरात विचारतो, 'तुमचा देउनिया येऊन बांधावर उभा राहिला अन् तुम्ही इथं झाडांच्या मचाणावर बसून राहिलात, तर तुमच्या देउनियाला तुम्ही दिसणार कसे?'

हे जणू बांधारूला पटतंच असं वाटतं. नरेश पुन्हा विचारतो, 'तुमचा देऊनिया तुम्हाला बांधावर शोधणार की पाण्यात?'

'बांधावर.'

'पटतंय ना? मग बांधावर चला. इथं खाणार काय? देउनियाने काही खायला दिलंय का तुमच्याबरोबर?'

'नाही हो!'

'दिवसभर काहीच खाल्लं नाहीत?'

'नाही हो'.

'भूक नाही लागली?'

'लागली.'

नरेश अमृल्यकडे पहातो. मग दोघेही बाघारूकडे पाहतात. त्यांच्या लक्षात येतं, झाडांना वाचवण्यासाठी याच्या मालकाने याला पुरात सोडलं. हा इथं अडकला नसता, तर आणखी पुढे वाहात गेला असता. या पुरातलं ओंजळभर पाणीसुद्धा हा प्याला नसणार. त्याला वाचवण्याची, बांधावर नेण्याची ऊर्मी त्यांना वाटू लागते. ऑफिसर आला म्हणून त्यांनी पैशांचा विषय काढला. नाहीतर ते त्याला वाचवण्यासाठी इथं आलेच असते. अमृल्य बाघारूजवळ जातो. म्हणतो, 'चला बरं! इथं बसून तहान-भुकेने मरणार की काय? चला रात्री मुक्काम करा. जेवण करा. झोपा मग वाटलं तर पुन्हा पुरात वाहात जा?

'भूक लागलीय, पण तिथं तर ऑफिसर आहे.'

'अरे ऐका, आम्ही याच चरावरचे. इथेच आमची घरं-शेतीवाडी. आपण उभं आहोत आता, त्या घराचे मालकसुद्धा बांधावर आहेत. माझं घर इकडं आहे. याचं घर या बाजूला आहे. पुरामुळं आम्ही त्या बांधावर गेलो. आम्ही ऑफिसरला सांगू, तुम्ही आमच्यापैकीच आहात, इथं अडकला होता. मग ऑफिसर काय करील?'

'झाडं? गयानाथशी ऑफिसर भांडण करील.

नरेश हसतो 'तो काय या झाडांचा ऑफिसर आहे का? चला!' नरेश बाघारूच्या अमूल्यने धरलेल्या हातालाच धरतो. बाघारू पाऊल पुढे टाकतो.

तिघेजण एकामागून एक सुपारीच्या झाडावरून नावेत उतरतात. आता एक समस्या उभी रहाते. झाडं इथं ठेवून चौघे जाऊ शकले असते. पण नरेश-अमूल्यला ते बोलायचं धाडसच होत नाही. बाघारूच्या गळ्यात नायलॉनच्या दोरीचं बंडल आहे. त्याच दोरीने तो त्या झाडांशी बांधालेला आहे. पण आता वेळ नाही. त्यांना इथून निघायलाच हवं.

'ए कादाखोवा, ही झाडं नावेला बांधता येतील का?'

'नाही. नावेला त्यांचा धक्का लागला तर नाव बुडेल.'

'तुम्ही नावेत जा, मी झाडांबरोबर येतो' म्हणून बाघारू झाडांवरच्या त्याच्या मचाणावर नसतो. 'मग झाडं सोडा आधी. कुठं बांधली आहेत?'

बाघारूने झाडं त्या छपराला बांधली होती. तो झाडं सोडू लागतो. शेवटचं बंधन ढिलं केल्यावर झाडं हलू लागतात. झाडं सोडण्यात कादाखोवाही मदत करीत होता. त्याला बाघारू म्हणतो, 'नावेत जा तुम्ही, आता ही दोरी सोडली की प्रवाहात झाडं वाहात जाणार.'

नाव झाडांमध्ये अडकलेली असते. बाघारूने सगळी बंधनं सोडल्यावर झाडं

तिस्तेच्या पात्रात वेगानें वाहू लागतात. कादाखोवा एक 'लगी' बाघारूकडे देतो. म्हणतो, 'लगी मारा!' बाघारू लगी मारीत रहातो. कादाखोवा समोर पहात रहातो.

त्या झाडांच्या ढालीमुळे नरेश-अमूल्य यांना लगी मारण्याची अशी संधी मिळते, की वेगवान प्रवाहातही त्या झाडांमुळे नाव भरकटत नाही. प्रवाहात सरळ वाहात न जाता झाडं-नाव तिरप्या रेषेत बांधाकडे जात रहाते. 'आणखी एक लगी असती तर बरं झालं असतं-लगेच पोचलो असते पलीकडं!' कादाखोवा म्हणतो.

## एकशे अठ्ठेचाळीस

# संदेह आणि संशय

बांधावरून दिसतं, अश्विनी रायच्या छपरावरून अमूल्य, नरेश आणि 'कादाखोवा' सुपारीच्या झाडावर उतरल्यानंतर काही वेळानं नावे ऐवजी एक प्रचंड झाडांची मोळी नदीतून या दिशेने वाहात येतेय. नाव त्या झाडांमध्ये अशी गुंतलेली होती आणि तिच्यापुढं झाडांच्या फांद्यांचा संभार इतका होता की ती दिसतच नव्हती.

ती झाडं पाहून अश्विनी राय म्हणतो, 'कापली रे कापली! माझी झाडं कापली कुणीतरी!'

'पण मग नरेश-अमूल्यने प्रतिबंध केला नसता का झाडं कापायला? अन तुमची कोहळ्याची झाडं सालाच्या झाडांएवढी कधी झाली?' एकजण विचारतो. अश्विनी निरुत्तर.

ऑफिसर, रघू घोष, लिली आणि गुदामबाबूही तर्कवितर्क करू लागतात. ऑफिसर म्हणतो, 'रेस्क्यूच्या नावाखाली एकावर एक गोंधळ व्हायला लागलेत! नाव गेली कुठं मग?'

याचवेळी ती झाडं वळतात; आणि फांद्यांमधून दिसतं, की झाडावर कादाखोवा उभा आहे. पहाणाऱ्यांना तो लगेच ओळखू येतो. 'कादाखोवा, कादाखोवा! झाडांवर कादाखोवा आहे!' झाडं किनाऱ्याजवळ येताहेत. तिकडं पळत गेलेल्यांना तो आणखीच स्पष्टपणे ओळखू येतो.

दरम्यान झाडं आणखी वळतात. दिसतं, की कादाखोवा खरंच उभा आहे; आणि त्याच्याशेजारी, त्याच्यासारखाच दुसरा एक माणूस उभा आहे. पण नरेश-अमूल्य नाहीत. म्हणजे ते तिकडं अडकलेत की काय? की नंतर नाव घेऊन येणार आहेत? या वाऱ्या पावसात, पुरात ते नाव आणणार तरी कशी?

झाडं किनाऱ्याच्या आणखी जवळ येतात. कादाखोवा आणि तो माणूस स्पष्ट

दिसतोय. आता झाडं बांधाच्या आड वाहात जाणार, तिथे एक वळण आहे, उजवीकडे, त्याच्यामागे झाडं तिथंच थांबणार, की पुढे वाहात जाणार, हे कसं कळणार?

बांधावरचे लोक आणखी पांगतात. पोरीबाळी, बायका, उतारावर नाना जागांवर उभ्या राहून नदीकडे पहातात. कपाळावर हात ठेवून. आता ऊन नाही, वारा पाऊस अव्याहत चालू आहे. गुरंही नदीकडे माना वळवतात, 'हा ऽऽऽ म्बा' असं विलंबित लयीत हंबरतात. तेवढ्यात वळणाआडून लोकांचे चीत्कार ऐकू येतात. काही विपरीत तर झालं नाही ना, याचा सगळेजण कान टवकारून अंदाज घेतात.

## एकशे एकोणपन्नास

# बाघारू आणि कादाखोवाचं अभिनंदन

गलबला जरा कमी होतो, पण थांबत नाही. वाईट काही झालेलं नाही, एवढं लक्षात येतं. मध्ये मध्ये गलबला आणखी वाढतो. काही मुलं पळत पळत इकडे येतात, आणि त्यांच्यामागोमाग तो गलबलाही इकडं येऊ लागतो.

तेवढ्यात दिसतं, की ती झाडं वळण पार करून इकडं येताहेत, म्हणजेच काठावरून झाडांना लोक इकडं ओढून आणताहेत. झाडांसमोर नाव, आणि तिच्यात नरेश अमूल्य उभे आहेत. ते दोघेजण मोकळेपणाने, बत्तिशी दाखवीत हसताहेत, हे सुद्धा दिसतं.

नरेश आणि अमूल्यच्या पुढे, झाडांच्या फांद्यावर कादाखोवा आणि तो माणूस उभा आहे. दोघांनी कमरेवर हात ठेवलेले आहेत. एक सोनेरी दोरी त्या दोघांमधून किनाऱ्यापर्यंत पसरलीय. लोकांनी ती दोरी धरूनच नाव आणि झाडं किनाऱ्यापर्यंत ओढीत आणली आहेत. दोरी धरून ओढीत ओढीत लोक बांधावरच्या त्या तात्पुरत्या कॅंपपर्यंत पोचतात. सगळ्यांनाच दिसतं-त्या नव्या माणसाच्या गळ्यात नायलॉनच्या दोरीचं मोठं बंडल आहे. आणि तीच दोरी किनाऱ्यावरच्या लोकांच्या हातात आहे.

झाडं काठावर जिथं टेकलेली, तिथं गर्दी होते. नदीमध्ये नावेत नरेश-अमूल्य, आणि त्यांच्यापुढे कादाखोवा आणि तो माणूस.

'सापडला, सापडला, तो माणूस सापडला!'

'फॉरेस्टमधून रात्रभर वाहात आलाय!

'हो. झाडांवर बसून वाहात आलाय!

'एवढी मोठी दोरी मिळाली कुठं त्याला?'

या गलबल्यात नरेश-अमूल्य नावेतून किनाऱ्यावर येतात. कादाखोवा आणि बाघारू उतरत नाहीत. त्यांना जणू कळत नाहीय-उतरावं की नाही. नरेश उतरल्याबरोबर विचारतो,

'का रे, ऑफिसरसाहेब कुठंयत?'

त्याच्या प्रश्नाचा प्रतिध्वनी म्हणून आणखी तीन चारजण विचारतात, 'ऑफिसर कुठंयत?' ते बांधावरच आहेत असं कुणीतरी नरेशला सांगतं. नरेश बांधावर चढायला सुरुवात करतो. ऑफिसरसमोर पोचल्यावर, आपल्या केसांतून हात फिरवीत, दात दाखवीत हसत, नरेश ऑफिसरला म्हणतो, 'आणलंय सर, हे पहा' डावा हात बाघारूकडे दाखवीत म्हणतो, 'चला सर,' दोघे काठाकडे जाऊ लागतात.

लोक त्यांना वाट करून देतात. ते काठाशी येऊन उभे रहातात. त्यांच्यामागे गर्दी समोर कादाखोदा आणि बाघारू नरेश ओरडतो, 'अरे, उतरा, काठावर या ना!'

बाघारू मचाणावरून आपली कुऱ्हाड उचलून लंगोटीत मागे खोचतो. कादाखोवा लगी घेऊन खालच्या फांदीवर पाय देतो. बाघारू त्याला काठावर उतरायला मदत करतो आणि मग स्वतःही त्याच्या मदतीने काठावर उतरतो. दोघेजण ऑफिसरसमोर उभे रहातात. बाघारूच्या गळ्यात दोरी झुलणारी. आता आपल्याला काय करायला हवं हे ऑफिसरला नीट समजत नाही. नरेश बाघारूकडे बोट दाखवून म्हणतो, 'हाच माणूस सर-झाडं घेऊन वाहात आलाय रात्रभर.'

यानंतर जणू ऑफिसरने एकच गोष्ट करायची. राहिलीय. तो बाघारूचा हात धरतो. ऑफिसरने खरं तर शेकहॅण्डसाठी हात पुढे केला होता. पण बाघारू हात पुढे करीत नाही म्हणून ऑफिसर त्याचं मनगट एकदा धरतो आणि हलवून सोडून देतो. मग कादाखोवाचं मनगट धरून हलवतो व सोडून देतो. बाघारू व कादाखोवा यांच्या दिसण्यामध्ये इतकं साम्य आहे, की ते दोघेही वाहात आले असावेत असं ऑफिसरला वाटतं. ऑफिसरने त्यांच्याशी असा 'शेकहॅण्ड' केल्याने सर्वांना मजा वाटते व सर्वजण टाळ्या वाजवतात. ऑफिसर त्यांच्याकडे पाहून हसून मान हलवतो.

## एकशे पन्नास

# अभिनंदनानंतर बाघारू व कादाखोवा

आता आपण काय करायला हवं हे पुन्हा कुणालाच समजत नाही. अमूल्य येऊन नरेशजवळ उभा रहातो. ऑफिसर नरेशला म्हणतो, 'तर मग तुमचं रेस्क्यूचं काम झालं. म्हणजे मी निघायला हरकत नाही - हो की नाही?'

नरेश म्हणतो, 'सर, आपल्याला खूप त्रास झाला!'

बांधावर जाण्यासाठी वळत ऑफिसर म्हणतो, 'त्रास कसला, हे तर आमचं कामच आहे.' ऑफिसर नरेशच्या पाठीवर हात ठेवून मग तो खाली घेतो. ही संधी घेऊन मान

खाली वाकवून नरेश विचारतो, 'सर, आमचं पेमेन्ट?'

'हो, चला, आत्ता लगेच पाचशे देतो. उद्या माझ्या ऑफिसात या -'

'आपलं ऑफिस कुठं आलं, सर?' नरेश विचारतो.

'दीप्ती टॉकीज ठाऊक आहे ना?'

'हो, सर.

'थोडं पुढं गेलं की फायर-ब्रिगेड - '

'ठाऊक आहे सर!' मागून अमूल्य म्हणतो.

'त्याच्या जवळच.' ऑफिसर चालायला सुरुवात करतो. 'सर, तुमच्या जीपपर्यंत येतो, तिथेच पेमेंट द्या,' नरेश म्हणतो.

'ठीक आहे, चला.' ऑफिसर म्हणतो. त्याच्या मागून नरेश-अमूल्य चालू लागतात. त्यांच्या मागं गर्दीतले लोक. कादाखोवा-बाघारूही बांधावर चढू लागतात; पण आता त्यांच्याकडे कुणीही लक्ष देत नाही. लोक आणि मुलं त्यांना धक्के देऊन पुढे जातात. ते गर्दीमागून बांधावर चढू लागतात. बाघारूबरोबर त्याच्या गळ्यातली दोरीही फरफरटत जाते. शेवटी बांधाच्या माथ्यापासून तर नदीपर्यंत पसरते.

बांधावर येऊन बाघारू-कादाखोवा दोघे पुन्हा थांबतात. ऑफिसबरोबर गर्दी बांधाच्याविरुद्ध बाजूला उतरतेय्. बरेचसे लोक अद्यापि बांधावरच थांबून इतरांकडे पाहाताहेत. तेवढ्यात अश्विनी राय कादाखोवाला हाक मारतो; आणि कादाखोवा त्याच्या दिशेने पुढे जातो.

अश्विनी राय म्हणतो, 'काय बघून आलास रे? घरबीर ठीक आहे ना माझं?

कादाखोवा प्रश्नाचा अर्थ न समजून म्हणतो, 'तिथं पाणी - '

'पण हा माणूस तिथं काय करीत होता? काय पाहिलसं तिथं?' तेवढ्यात त्यांच्याभोवती गर्दी जमा होते.

'काहीही पाहिलं नाही हो - '

'हा माणूस तिथं होता, तो नाही पाहिलास?'

'हो. माणूस होता.'

'याला सोडून द्या हो, नरेशला येऊ द्या. तो सांगेल सगळं.' गर्दीतून कुणीतरी म्हणतं.

अश्विनीराय संतापतो-'सुपारीच्या झाडावर या माणसाचं काय काम होतं?'

'तिथं छप्पर होतं जवळ. बाकी पाणी,' कादाखोवाला नीट सांगता येत नाही. तो पुन्हा खाली जमिनीकडे पहातो.

'झाडावर सुपाऱ्या आहेत की नाहीत?' अश्विनी राय कादाखोवाला सुपारीच्या

फळांचा हिशेब विचारतो. कादाखोवा दूर, त्या झाडाकडे पहातो. त्याचा नाद सोडून अश्विनी राय म्हणतो, 'जा, गुरांना चारा घाल,'' त्याने दाखवलेल्या दिशेने कादाखोवा जातो.

बाघारू आपल्या जागीच उभा राहातो. गर्दीचे दोन भाग झाले आहेत. एक भाग गेलाय ऑफिसर-नरेश-अमूल्य यांच्याबरोबर, दुसरा इथे थांबलाय अश्विनी-राय-कादाखोवा यांच्याबरोबर. त्यामुळे बाघारू एकटाच पडतो. दोनेकजण त्याच्या गळ्यातली दोरी पहातात, पण कुणीच त्याला काही विचारीत नाही. त्याच्या गळ्यापासून नदीपर्यंत पसरलेली दोरी वाऱ्यापावसात झुलत रहाते.

## एकशे एक्कावन्न

# बाघारूचा दुसरा संवाद

बांधाखाली ऑफिसर नरेशला म्हणतो, 'अरे, त्या माणसाचा नाव पत्ता घ्यायचा राहिलाय - मला तर रिपोर्ट करायला पाहिजे ना!'

नरेश मागे वळून बाघारूला हाक मारण्यासाठी बांध चढू लागतो. बाघारू एकटा-एकटा उभा असलेला त्याला दिसतो. नरेश त्याला हाक मारतो - 'अहोऽ ऐका! अरे एऽऽ!'

बाघारू ऑफिसरच्या गाडीकडे पहात होता. नरेश पुन्हा हाक मारतो 'एऽ गाछुयामानषी, एऽगाछुयामानषी' (एऽ झाडमाणसा, एऽ झाडमाणसा!)

बाघारूने नजर वळल्यावर त्याला नरेश दिसतो. नरेश त्याला म्हणतो, 'अरे ऐकू येत नाही का? सर बोलावताहेत!' बाघारू उतारावर उतरायला सुरुवात करतो. नरेश पुन्हा खाली उतरू लागतो.

बाघारू खाली जाऊन ऑफिसरसमोर उभा रहात नाही. गर्दीमागे उभा रहातो. नरेश जीपजवळ पोचून मागे पहातो. त्याला गर्दीमागे उंच बाघारूचा चेहरा दिसतो.

'अरे इथं या ना! सर, आलाय तो,' नरेश आपल्या मागच्या लोकांना दूर सारून बाघारूला पुढं येण्यासाठी वाट करून देतो, पण तरीही बाघारू पुढे होत नाही.

ऑफिसर जीपमधून त्याला म्हणतो, 'इकडं या, आपलं नांव काय?' आता जीपमध्ये ऑफिसर आणि जमिनीवर बाघारू असे समोरासमोर आहेत, दोघांमध्ये पाच-सहा हातांचं अंतर.

बाघारू गप्पच. ऑफिसर खिशातून एक कागद आणि पेन बाहेर काढतो, आणि उजव्या गुडघ्यावर कागद ठेवून पेन सरसावतो. उत्तर न आल्याने विचारतो. 'अहो नांव सांगा आपलं!' नरेशला विचारतो, 'दोरी कुणाची?'

नरेश म्हणतो, 'अहो सर, ती झाडांना बांधलेली दोरी!'

'ती गळ्यात बांधलीय?'

नरेश हसतो, 'झाडं बांधून मग गळ्यात अडकवलीय्.'

ऑफिसर नरेशला म्हणतो, 'त्याला नाव-पत्ता विचारा!'

नरेश बाघारूजवळ जाऊन म्हणतो, 'अहो, आपल्याला ना, सर बोलावताहेत, इथं काय उभे राहिलात? आपला नाव-पत्ता सांगा, सर विचारताहेत. त्यांना लिहायचं आहे. सांगा!'

'मला नाव-पत्ता नाही हो. माझा देउनिया गयानाथ जोतदार!' बाघारू एकदाचा बोलतो.

नरेश तोंडावर हात ठेवून हसू दाबतो. ऑफीसर विचरतो, 'काय, झालं काय?' नरेश उत्तरतो, 'सर, हा म्हणतोय की त्याला नांवच नाही. गयानाथ जोतदाराचं नांव लिहायला सांगतोय्.'

इतरांचं दबलं हसू शांत झाल्यावर ऑफिसर म्हणतो, 'अच्छा, गयानाथ जोतदाराचा पत्ता विचारा ना-त्यावरून याचा पत्ता लिहिता येईल, केअर ऑफ गयानाथ जोतदार.' ऑफिसर कागदावर नजर वळवतो.

नरेश बाघारूला म्हणतो, 'गयानाथ जोतदाराचा पत्ता सांगा, काका.'

'मला ठाऊक नाही. लिहून टाका गयानाथ जोतदार.'

'अरे ते तर लिहिलंच आहे. पण तो जोतदार राहातो कुठं? पत्ता काय त्याचा? घर कुठंय् त्यांचं?'

'सगळीकडं राहातो. इथंही राहातो.'

नरेश पुन्हा हसतो, तोंडावर हात दाबून. हसणं पूर्ण झाल्यावर नरेश म्हणतो, 'सर, हा म्हणतोय्, याचा जोतदार सगळीकडं राहातो, इथंही राहातो.'

ऑफिसर विचार करतो, 'गयानाथचं नांव तर सगळ्यांना ठाऊक आहे. हा कुठं नदीत पडला ते विचारा. तेही चालेल.'

नरेश बाघारूला तसं विचारतो.

बाघारू उत्तरतो, 'मी नदीत पडलो नाही.'

आतापर्यंत लक्षात येतं, की हा इसम अर्धवटासारखी उत्तरं देत रहाणार, आणि सगळे हसत रहाणार. बाघारू आपलं उत्तर पूर्ण करतो-'मी पुरात वाहात आलो.'

ऑफिसर लगेच विचारतो, 'हं कुठून वाहात आला ते सांगा, अन् नांवही सांगा.'

बाघारू उत्तरतो, 'गाजोलडोबाहून.'

नरेश म्हणतो, 'सांगितलं ठिकाणाचं नांव. गाजोलडोबा.'

ऑफिसर तोंडाने उच्चारीत ते नाव कागदाच्या तुकड्यावर लिहितो. नरेशला म्हणतो, 'आता नांव विचारा.' नरेश पुन्हा बाघारूला म्हणतो, 'आता नांव सांगा, म्हणजे

सर जायला मोकळे होतील. ''गयानाथ जोतदार, गाजोलडोबा'' एवढं लिहिलंय्. आता तुमचं नांव तेवढं सांगा.'

बाघारू नीट उत्तर देत नाही असं पाहून ऑफिसर म्हणतो, 'नसेल सांगत तर सोडून द्या.' जणू, गाजोलडोबाहून एक माणूस झांडासहित वाहात आला, त्याला वाचवण्यात आलं - एवढं ऑफिसरच्या रिपोर्टसाठी पुरेसं आहे. पुरात एवढं अंतर वाहात येता-येता माणसाला इतका मानसिक धक्का बसू शकतो, की त्याला आपलं नांवही आठवणं अशक्य होतं!

थोड्या वेळाने नरेश म्हणतो, 'आपलं नांव सांगा!'

'मला नांव नाही हो!' नरेश आता रागावतो, 'नाव नाही सांगता येत तुम्हाला स्वत:चं? हे घोंगडं, कपडे ताडपत्री, खाणं - हे कुणाच्या नावावर द्यायचं मग तुम्हाला?' की त्याचीही गरज नाही तुम्हाला?'

बाघारू या जिनसांच्या लोभाने तरी नांव सांगेल असं नरेशला वाटतं, पण बाघारू म्हणतो, 'गयानाथचं नाव लिहा!'

'अरे? परत गयानाथ? मदत तुम्हाला द्यायची अन नांव गयानाथचं?'

'मला गरज नाही.'

ऑफिसर तेवढ्या वेळात 'गयानाथ जोतदाराच्या शेतजमिनींवर काम करणारा एक शेतमजूर' असं लिहून टाकतो; ड्रायव्हरला म्हणतो, 'चला!' नरेशला म्हणतो, 'सोडून द्या त्याला! उद्या ऑफिसला याल तुम्ही, तोवर समजलं तर पहा!'

## एकशे बावन्न

# दीड हात लंगोटीचं बंधन, दोरीचं बंधन आणि टी. व्ही. कॅमेरा इत्यादींसहित वृक्षपर्वाचा शेवटचा अध्याय

वृक्षपर्व इथेच समाप्त होऊ शकतं. वृक्षपर्वात, बाघारू कशा प्रकारे गयानाथच्या झाडांसहित वाहात येऊन निताईच्या चरावर थांबला आणि तिथून रंधामालीच्या बांधावर आला याची कहाणी आहे. रंधामालीच्या बांधावर, त्या दिवशी संध्याकाळी नरेशला ऑफिसरने ठरल्याप्रमाणे पैसे दिले. दुसऱ्या दिवशी ऑफिसवर यायला सांगितलंय्. आणखी एक पावती करून आणखी काही पैसे तो देईल. बाघारू स्वत:चं नांव सांगू शकला नाही ते एका परीने बरंच झालं-ऑफिसरने स्वत:च्या मनाने त्यासंबंधी लिहिलंय्. माणूस एकच-'बाघारू', पण तो दोनदा 'रेसकू' झाला - मग त्यासाठी एक नवीन काहीतरी नांव

हवंच्. अधिक लोक 'रेस्क्यू' करू शकल्याबद्दलची नोंद ऑफिसरच्या 'सर्व्हिस बुका'तही नोंदली जाईल.

बाघारूने आपली झाडं जरा सरकवून घेतली आहेत, बांधली आहेत. तो या बांधावरच्या गुराख्यांपैकी नाही, पण आता त्यांच्यातलाच एकजण. तो आपल्या मचाणावर रहातो. अधूनमधून बांधावर जातो. कादाखोवाशी नंतर त्याचं काही बोलणं झालं नाही. बांधावरचे लोक कधी बाघारूला 'कादाखोवा' म्हणतात, तर कादाखोवाला 'गाछारू' म्हणतात.

बांधावरच्या लोकांनी बाघारूला नांव दिलंय - 'गाछारू' (गाछ म्हणजे झाड). इतक्या झाडांशी बाघारूचं शरीर बांधलेलं, त्याचं राहाणंही त्या मचाणावरच - यामुळे त्याचं 'गाछारू' हे नांव बांधावर प्रचलित झालं.

बाघारू बांधावर गयानाथ आणि असिन्दिरची वाट पहातो. याशिवाय त्याला दुसरं काहीही काम नाही. हा वारा-पाऊस थांबल्यावर, पूर उतरल्यावर असिन्दिरच्या फटफटीवर गयानाथ इथे येईल. त्याला फारसं शोधावं लागणार नाही.

पण त्या सगळ्यात बाघारूची काहीच भूमिका नाही. तो विश्वस्तभावाने ही झाडं घेऊन वाहात आलाय्. या चरावर अडकलाय्. आता त्याचं शरीर पुराशी जोडलेलं नाहीय्. 'गयानाथची प्रतीक्षा' या टप्प्यावर वृक्षपर्व समाप्त होऊ शकतं.

निताईने पूरग्रस्तांसाठी मदत आणलीय् - तिचा भाग बाघारूलाही मिळतो. पण हा पाऊस असाच चालू राहिला, आणि तांदूळ-गहू-कपडे-कांबळं-पैसे अशी मदत आली आणि बाघारूला या गुराख्यांपैकी एक होऊन राहण्याची वेळ आली, तर त्याचं संपूर्ण नांव सांगावं लागेल, 'गाछारू' हे नांव चालणार नाही.

पण ही शक्यता खूपच कमी आहे. चरावरचे लोक आपल्याला मिळणाऱ्या सुखसुविधांमध्ये बाघारूला सहभागी करून घेणार नाहीत. त्या दिल्या जातात कुटुंबांना. बाघारू चरावरच्या कुणा कुटुंबातला माणूस नाहीय्. तरीही काही किमान मदत तर त्याला मिळेलच. नरेश-अमूल्य त्याला आपल्यापैकी दाखवू शकले असते, पण वारंवार गयानाथ जोतदाराचं नांव घेऊन, तो गयानाथच्या झाडांसोबत वाहात आलाय हे बाघारूने सर्वांना सांगितलंय्. शिवाय, एवढी झाडं संपत्तीसारखीच! बाघारूला बघितल्याबरोबर समजतं, की ही संपत्ती त्याची असूच शकत नाही. बाघारू चरांवरच्या गुराख्यांपैकी एकजण होऊ शकत नाही, म्हणून पूरग्रस्त गुराखी म्हणूनही त्याच्या नांवाची नोंद होत नाही.

दुसरं कारण म्हणजे - बाघारूला आणि झाडांना इतके दिवस गयानाथ या ठिकाणी कधीही ठेवणार नाही. तो या वाऱ्या-पावसात, पुरात येऊनच बाघारूला व झाडांना शोधून काढील. बाघारू गयानाथचाच राहील. झाडं गयानाथ इथंही विकून टाकू शकेल, पण बाघारूला मात्र आपल्या घरी पुन्हा पाठवून देईल.

आता पाहून ओळखू येत नाही, पण फक्त तीन-चार दिवसांपूर्वी तिस्ता अशी नव्हती. समोर, निताईच्या चरावर चांगलं गाव होतं. आता वाटतं, तिस्ता जणू वर्षभर अशीच असते आणि हे लोक या बांधावरचेच रहिवासी आहेत. हे सगळे एकाच गावचे लोक, त्यामुळे सगळे व्यवहार गावातल्यासारखेच - नाही, ते फक्त पहाटेपासून संध्याकाळपर्यंत चालणारं काम. त्याऐवजी मग कुणी मदत आणण्यासाठी हेलपाटे घालतं, कुणी चैनीसाठी शहरात जातं; तर कठिण परिस्थितीमुळं कुणावर घरातल्या वस्तू शहरातल्या बाजारात नेऊन विकण्याचीही वेळ येते.

या गर्दीत, कोपऱ्यात बसलेल्या बाघारूकडं एरवी कुणाचं लक्षही गेलं नसतं; पण तो एवढी झाडं घेऊन बसलेला असल्याने काहींचं लक्ष त्याच्याकडे जातं, ते त्याच्याशी गप्पाही मारतात.

रंधामाली हाटातला एक लाकडाचा आडतदार बऱ्याच वेळपासून बाघारूच्या झाडांजवळ बसला होता. त्याचा व्यवसाय छोटा आहे, विजेची करवतही त्याच्याकडे नाही. एक साधी करवत आहे आणि पदरी तीन बिहारी मजूर आहेत. एका छोट्या शेडखाली त्याचं झाडं कापून लाकडी फळ्या बनवण्याचं काम चाललेलं असतं. आडतदाराचं नांव चरण राय, पण तो परप्रांतीय वाटतो - उच्चारांवरून, चेहेऱ्यावरून. तो एकदा बाघारूला म्हणतो, 'माझ्या सॉ मिलमध्ये का येत नाही भाऊ? रात्रंदिवस इथं नदीकिनारी काय करणार? रात्री माझ्या शेडखाली झोपताही येईल -'

बाघारूला जणू याचा काही अर्थच समजत नाही. तो दुसरीकडेच पाहत राहतो. नंतर येऊन चरण राय बाघारूला म्हणतो; 'काय माणूस आहात आपण! मी बोलवलं, निमंत्रण दिलं तरी आला नाहीत?' बाघारू याचंही उत्तर देत नाही. राय तेव्हा बिडी ओढत-ओढत बाघारूला विचारतो, 'तुमच्या मालकाची सॉ-मिल आहे की नाही?'

बाघारू दुसरीकडेच पहात उत्तरतो, 'ठाऊक नाही.'

तो माणूस बाघारूला एक बिडी ऑफर करतो. ती घेण्यासाठी बाघारूला झाडांवरून खाली उतरावं लागतं, त्याने पेटवलेल्या काडीवर बिडी पेटवण्यासाठी त्याच्याजवळ जावं लागतं आणि बिडी पिण्यासाठी त्याच्या जवळच बसावं लागतं.

राय म्हणतो, 'ही तर जंगलातली झाडं! तुम्ही वाहात घेऊन आलात?'

बाघारू गप्प राहतो. राय म्हणतो, 'पोलिसांनी पाहिलं तर पकडतील.'

'कुणाला पकडतील?'

'तुम्हाला. तुमच्याकडं झाडं आहेत, तुम्हालाच धरतील.'

'मला?'

'हो, तुम्हाला धरतील.'

बाघारू यावर गंभीरपणे विचार करीत गंभीरपणे बिडी ओढतो. मग त्या माणसाला

म्हणतो, 'मला आणखी एक बिडी द्या ना!' त्याने बिडी दिल्यावर ती कानामागे खोचतो.

तो माणूस म्हणतो, 'झाडं मला विकून टाका, मी माझ्या पद्धतीने लपवून ठेवतो. कुणालाच पत्ता लागणार नाही. अन् साला तुमचा जोतदार आल्यावर त्याला माझ्याकडं घेऊन या, पैसे देऊन टाकीन.'

तो माणूस दुसरी बिडी पेटवतो. त्याआधी एक बिडी बाघारूला देतो. बाघारू ती दुसऱ्या कानामागे खोचतो. पण शेवटपर्यंत या संदर्भात काहीच ठरत नाही. अर्थात् तो माणूस जाताना म्हणतो, 'उद्या येतो माझी माणसं घेऊन -' पण प्रत्यक्षात मात्र येत नाही.

त्याच्याऐवजी येतो जगदीश बारूई. आल्या आल्या बाघारूला एक बिडी देऊन तो म्हणतो, 'अरे, तुझ्या जोतदाराने काय मोजून ठेवलीयेत का झाडं - की अमुक इतकी झाडं तू घेऊन निघालायस म्हणून? एक विकून टाक - हे चाफ्याचं झाड दे आणि पैसे घेऊन लपवून ठेव!' मग स्वत:शीच हसत म्हणतो, 'पैसे तू ठेवणार तरी कुठं लपवून? तुझ्या अंगावर तर फक्त एक लंगोटी! पण खोच, तिच्यातच खोचून ठेव पैसे, आं? काय, राजी ना?' थोडावेळ वाट पाहून, बाघारूकडून प्रतिसाद नाही असं बघून, 'साला, मूर्ख!' म्हणून जगदीश निघून जातो.

इथल्या सॉ-मिलचा मालक आपल्याला ही झाडं - किमान एक झाड - विकून टाकायला सांगतोय्, हे बाघारूच्या लक्षात येतं. गयानाथचे अनेक धंदे आहेत - त्याची जमीन आहे, मिलिटरीला दूध-पुरवठा करतो तो, त्याचं फॉरेस्ट आहे, त्याचा हाट आहे, त्याची नदी आहे. या सगळ्या ठिकाणी काही-ना-काही कामांसाठी बाघारूला जावं लागतं, फिरावं लागतं. त्याला ऑफिसरमागे खुर्ची घेऊन धावावं लागतं, त्याला आमदाराला पाठुंगळी घेऊन नदीपार करावं लागतं, त्याला वनामध्ये म्हशी चाराव्या लागतात. या चार झाडांमधलं एक झाड - हे चाफ्याचं झाड - विकून टाकून, गयानाथला अंधारात ते झाड कधी वाहून गेलं काही समजलंच नाही, असं सांगता येईल, हे गयानाथची इतकी कामं करणाऱ्या बाघारूला समजूच शकत नाही का? गयानाथ हे एकून रागावेल, शिव्या देईल, मारहाणही करील - पण त्यापेक्षा जास्त काय करील? पैसे लंगोटीत लपवता आले नाहीत. तर इथं एखाद्या मोठ्या दगडाखालीही लपवून ठेवता येतील. हे असं चालतं, असं करता येतं हे बाघारूला पक्कं ठाऊक आहे. बाघारूची आईसुद्धा गयानाथची होती, बाघारूही गयानाथचा आहे. गयानाथचं एक झाड विकून टाकणं अगदी सोपं आहे - इतके दिवस गयानाथबरोबर राहून बाघारू एवढंसुद्धा शिकला नाही? हे तर झाडं तोडून पुरात सोडण्यापेक्षाही सोपं आहे, हे त्याला कळत थोडंच नाही? बाघारू फक्त 'घेऊन जा' म्हणण्याचाच अवकाश, की या अडत्याचे लोक येऊन ते झाड घेऊन जातील. पण बाघारू अडत्याने आणि जगदीशने दिलेल्या बिड्या कानामागे खोचून, गळ्यात दोरीचं बंडल अडकवून भटकत फिरतो. बाघारू 'हे झाड घेऊन जा' असं का म्हणत नाही, हे त्याला

स्वत:लाही ठाऊक नाही. पण बाघारू असं म्हणत नाही, म्हणण्याचा विचारही करीत नाही. असं सांगावं की नाही या मानसिक द्वंद्वातही तो अडकू शकत नाही. यावरून वाटू शकतं, की त्याला मन नाही, म्हणूनच मानसिक द्वंद्वही नाही. हे मान्य केल्यावर असं म्हणता येईल, की त्याला मन नाही, पण शरीर आहे - तो केवळ शरीराच्या पातळीवरच जगतोय्. जर बाघारूने त्याच्या दोरीसंगे बांधलेल्या चार झाडांपैकी एक झाड विकून टाकलं, तर त्याच्या अस्तित्वाच्या गोळाबेरजेतून एक झाड कमी होईल. द्वंद्वात अडकण्यासाठी मनसुद्धा ज्या बाघारूला नाही, एवढंच काय, त्याच्या संपूर्ण शरीरावर फक्त एक लंगोटी तेवढी परिधानविशेष म्हणून आहे आणि त्या लंगोटीमुळेच ज्याचं मानवी संस्कृतीशी नातं आहे, बंधन आहे - तो बाघारू, एवढा पूर पार करून येऊन एक झाड कसं काय विकू शकेल? बाघारूला जसं मन नाही, तसंच बहुधा डोकंही नाही. म्हणूनच एखादी गोष्ट करण्याच्या बाजूने तो विचार करू शकत नाही, त्याप्रमाणे तिच्या विरुद्ध बाजूनेही विचार करू शकत नाही. तो एकतर काम करू शकतो; किंवा करू शकत नाही. ज्याला विचार करण्यासाठी डोकंही नाही, तो बाघारू त्या अडत्याला किंवा जगदीशला 'नाही' कसं म्हणणार? तो फक्त त्या चार झाडांशी स्वत:लाही बांधून घेऊन, त्या दोरीचं बंडल गळ्यात अडकवून कधी कधी या बांधावर उभं राहू शकतो, कधी खालच्या दगडांवरून फिरू शकतो, स्वत:च्या झाडांच्या मचाणावर झोपू शकतो. कुऱ्हाड आता बाघारू कायम लंगोटीत मागे खोचलेली ठेवीत नाही - एका झाडाच्या फांदीच्या खोबणीत त्याने ती ठेवून दिलीय्.

याच प्रकारे बाघारू या रंधामालीच्या बांधावर गयानाथची आणि पूर कमी होण्याची वाट पहात दिवस काढतोय्.

पूर तर काही अनंतकाळपर्यंत राहणार नाही - कधीतरी तो उतरणारच. पण तो कधी उतरणार, यावर वर्तमानपत्रं, टी.व्ही. पुराबद्दल किती लिहिणार, किती दाखवणार हे अवलंबून असेल. एखादा पूर विजेसारखा येऊन वज्रपाताप्रमाणे जीवितहत्या करू शकत असेल, तर तो दीर्घ मुदतीचा नसला, तरी बातम्यांमध्ये गाजू शकतो. तिस्तेचा तेव्हाचा पूरही बातमी झाला - अनेक दिवस राहून. त्यामुळे कलकत्त्याहून वर्तमानपत्रांचे फोटोग्राफर्स व टी.व्ही.चे कॅमेरामेन येऊ शकतात. पण त्यांना नेहमीच परतण्याची घाई असते. म्हणून जिल्ह्याचं माहिती कार्यालय त्यांना शहराजवळच्याच दोन जागा दाखवतं. जलपाइगुडी शहरापासून आठ मैलांवरचा, मंडलघाटाजवळचा हा दोन नंबरचा चर आणि हा रंधामालीचा बांध. दोन्ही ठिकाणी काही पूरग्रस्त कुटुंब आली आहेत, गुरंवासरं आहेत, सरकारची ताडपत्रीही आहे. रंधामाली हाटाची विशेष सोय म्हणजे पूर पाहून लगेच तिस्ता ब्रिजवरून डूयार्सला जाता येतं.

तर, टी.व्ही. कॅमेरामेन आले, तेव्हा त्यांना आणि वर्तमानपत्रांच्या फोटोग्राफर्सना

बाघारू दिसला. जिल्हा माहिती कार्यालयाने त्यांना कुठे आणि किती पूरग्रस्तांची पुरातून सुटका करण्यात आली आहे, याची संख्या दिली होती. पण त्यात बाघारूचा वेगळा असा परिचय दिलेला नव्हता. फोटोग्राफर्सनी स्वत:च त्याला शोधून काढलं.

तसं तिस्तेच्या पुराच्या पार्श्वभूमीवर म्हातारे-म्हाताऱ्या, म्हशी, गायीवासरं, लेकुरवाळ्या बायका - या सगळ्यांचं चित्रण झालं होतंच. बाघारूने जिथं आपली झाडं बांधली होती, तिथं फोटोग्राफर्स पोचण्याचा प्रश्नच नव्हता. पण टी.व्ही.चा एक कॅमेरामन लाँगशॉट घेत असताना, डावीकडून उजवीकडे कॅमेरा पॅन करताना त्याला व्ह्यूफाईंडरमधून बाघारू दिसतो - बाघारू उभा आहे, गळ्यात दोरीचं बंडल, झाडांच्या मचाणावर, झाडांच्या फांद्यांमध्येच, जणू पाण्यातूनच अवतीर्ण झालाय् - लक्ष्मीसारखा! पॅनिंग संपल्यावर कॅमेरामन बाघारूसमोर जातो, बांधावरून उतरून, दगडांच्या रांगेच्या अगदी पुढच्या कडेला गुडघे टेकून बसून, तो पाण्यामधून साल-चाफा-खैर-शिसवी वृक्षांसह जणू एका फॉरेस्टमधूनच उगवलेल्या बाघारूला ढगाळलेल्या आभाळाच्या पार्श्वपटावर चित्रित करू पाहतो. त्या तो बराचसा यशस्वी होतो. त्याला जसा शॉट पाहिजे होता, तसा घ्यायचा झाला असता तर त्याला पाण्यावर पालथं पडून, कॅमेरा आकाशाच्या दिशेने टिल्ट-अप् करून शॉट घ्यावा लागला असता. अर्थात् तो एकदा बाघारूला 'मूव्ह!' असा निर्देश देतो, पण बाघारू हलत नाही. त्यामुळे हा शॉट स्थिरचित्र वाटेल अशी कॅमेरामनला भीती वाटते.

टी.व्ही. कॅमेरामनपाठोपाठ वर्तमानपत्रांचे फोटोग्राफर्सही येऊन पळत पळत फोटो काढू लागतात. टेलेफोटो आणि वाईड-अँगल लेन्समधून बाघारूचं लंगोटीधारी शरीर, चेहऱ्याची बाह्यरेषा आणि बांधावर पुराचा परीघ कॅमेऱ्यात टिपला जातो. तेही बाघारूला वळून उभं राहायला सांगतात, पण बाघारू स्थिरच उभा राहतो. चांगलं व्हिज्युअल मिळवण्यासाठी परस्परांशी स्पर्धा करताना छायाचित्रकारांची आपसात टवाळीही चालते. 'लोअर' पार्टवर टेलेफोटो नको लावूस रे!' 'बघ रे, नाहीतर झाटांचेही फोटो निघतील,' इत्यादी. इतकं नग्न पण इतसं संपूर्ण शरीर कॅमेऱ्यात पकडणं अवघड आहे. अर्थात टी.व्ही. कॅमेरामनने अगदी तळापासून आकाशापर्यंत एक उत्तम पॅनिंग केलंय् - पुराचं पाणी, क्लोज्-अपमध्ये पाण्यातले भोवरे, झाडांच्या फांद्या-पानांवर जलप्रवाहाचा आघात, आणखी फांद्या-पानं, बाघारूचे दोन्ही पाय - क्लोज अपमध्ये, हळूहळू टिल्ट-अप होत गुडघे, मांड्या, लंगोटी, कंबर. मिडियम् शॉटमध्ये - पोट, छाती, त्यानंतर डोकं. तिथून बाघारू हळ हळू क्षितिजाच्या एका कडेपासून दुसऱ्या कडेपर्यंत, आकाशात-नदीत, स्थापित होतो.

गयानाथ येईपर्यंत या सगळ्यांमध्येच बाघारूचं वृक्षपर्व व्यतीत होतं.

❑ ❑ ❑

## एकशे त्रेपन्न

# गयानाथचं स्वगत चिन्तन

गयानाथ जोतदार सकाळी सकाळीच असिन्दिरच्या मोटरसायकलमागे बसून जलपाइगुडी शहरात त्याच्या वकीलबाबूंकडे निघाला होता. आता ठीक आहे, परतीच्या वेळी बसने परत येईल, असिन्दिर आपल्या कामासाठी निघून जाईल. तेच - जे तिस्ता बंधाऱ्याच्या सेटलमेंटच्या वेळी सुरू झालं. आता तो बंधारा गेल्या काही वर्षांत नदीच्या मध्यापर्यंत गेला आहे - असिन्दिर तर आपला सासरा गयानाथ याचा जणू ड्रायव्हरच होऊन गेलाय्. गयानाथ जोतदारासारख्या विख्यात माणसाचं नांव आता लोटागुडी-रामसाई-ओदलाबाडी-क्रान्तिहाट-मौलानी, एवढंच काय मयनागुडीतही 'फटफटी जोतदार' म्हणूनच प्रचलित झालंय्. आधी आधी लोक हे नांव त्याच्यासाठी त्याच्या पाठीमागे वापरीत, आता अनेकजण त्याला 'ए फटफटी जोतदार' म्हणून हाकही मारतात. यावर रागवायचं आता गयानाथने सोडून दिलंय्.

मोटरसायकल तर असिन्दिरकडं खूप वर्षांपासूनच आहे; पण पूर्वी गयानाथ कधी त्याच्या पाठीमागे बसत नसे, तशी काही गरजही पडत नसे. जलपाइगुडी शहरात त्याच्या वडिलांच्या वेळेपासूनचे ठरलेले वकीलबाबू आहेत. त्याच्या वडिलांपासून त्याच्या काळाच्या दरम्यान 'थोरले वकीलबाबू' मरणही पावले, आता त्यांचा मुलगा वकील झालाय्. त्याला आता 'छोया उकीलबाबू' म्हणतात. अगदी गरजच पडली, तर वकीलबाबूच आपला माणूस पाठवून जलापइगुडीला खबर देत; दुसऱ्या दिवशी सकाळी बसने जलपाइगुडीला जाऊन, वकीलबाबूंशी चर्चा करून, संध्याकाळच्या आत गयानाथ परत येऊ शकत होता.

पण तिस्ता-बंधाऱ्याची ती स्पेशल सेटलमेंट सुरू झाल्यापासून गयानाथला जणू विश्रांती म्हणून नाही. फॉरेस्ट डिपार्टमेंटविरुद्ध त्याचा शेताबद्दलचा मामला आहे, बंधाऱ्यासाठी जमीन घेण्यात आलीय् त्याविरुद्ध मामला, नुकसानभरपाईच्या केसमधील पराभवाविरुद्धचा मामला - मामल्यांचं जणू कुरुक्षेत्रच. फॉरेस्ट डिपार्टमेंटविरुद्ध तर काही स्टे-ऑर्डर्स गयानाथने मिळवल्या आहेत. पण नुकसानभरपाईचा मामला आणि भूसंपादनाविरुद्धचा मामला या केसेस कलकत्ता हायकोर्टापर्यंत गेल्या आहेत. जलपाइगुडीच्या वकीलबाबूंच्या माणसानेच कलकत्त्याचा वकील मिळवून दिलाय्. गयानाथला जावं लागत नाही, पण पहिल्यांदा वकीलबाबूंच्या माणसाबरोबर असिन्दिरला जावं लागलं. त्यानंतर तो मामला जो सुरू झाला, तो अद्याप चालूच आहे. एकदा एक नुकसानभरपाईचा मामला तर गयानाथने जिंकलासुद्धा - सरकारनेही त्या निकालाविरुद्ध काही अपील केलं नाही,

उलट कोर्टाच्या आदेशानुसार नवीन हिशेब करून ताबडतोब गयानाथघला त्याचे येणे असलेले पैसे देऊन टाकले. सरकारने अपील केलं नाही हे जेव्हा गयानाथने पाहिलं, तेव्हा त्याने आणखी अधिक रकमेची नुकसानभरपाई मागण्यासाठी अपील करण्याचा बेत केला होता, पण असं अपील करता येत नाही, असं त्याच्या वकीलबाबूंनी त्याला समजावून सांगितलं. सरकारला शक्य तितक्या लवकर तिस्ता बंधारा पूर्ण करायचा असल्यानेच ते कोर्टाचे आदेश मानतंय् असं गयानाथला उमगलं. तर बंधारा होणारच, हे उमगल्याने गयानाथ अधिकच अस्वस्थ होतो.

आधी असिन्दिर आपली मोटरसायकल घेऊन फिरत असे आणि गयानाथ आपल्या जोतजमिनीत पायी फिरत असे. पण या स्पेशल सेटलमेंटनंतरच्या काळापासून काही वर्ष असिन्दिर, त्याची मोटरसायकल आणि गयानाथ जणू एक होऊन गेले आहेत. मयनागुडीच्या चौपत्तीवरून जायचं असं गयानाथ असिन्दिरचं ठरलं नव्हतं. 'भारती' सिनेमाजवळून डाव्या बाजूच्या रस्त्याने ते पुढे जाऊ शकले असते. पण मयनागुडीच्या मरणचंदच्या दुकानात मिठाई आणि चहा घेऊ म्हणून ते चौपत्तीवर येतात. मोटरसायकलच्या मागच्या सीटवरून उतरून गयानाथ चादर झटकतो. त्यानंतर, ओळखीचं कुणी दिसतंय का हे जरा पहातो. समोर, रस्त्याच्या त्या कडेला एका मिनिबसमध्ये गार्डीत आणखी दोनतास पॅसेंजर घेण्यासाठी काही लोक थांबलेयत. जोपर्यंत असिन्दिर मोटरसायकल उभी करून मरणचंदच्या दुकानात प्रवेश करून 'दोन बोल्डार आणि दोन कप चहा' ऑर्डर देतो, तोपर्यंत गयानाथ रस्ता पार करून त्या मिनिबसमध्ये जाऊन डोकावून येतो - त्याला कुणीही ओळखीचं भेटत नाही. पण परतताना मात्र चौपत्तीवर कापडाचे फलक त्याच्या नजरेला पडतात. मयनागुडीत उत्तरखंड संमेलन होतंय्. गयानाथकडं एकदा ते सगळे आले होते. पण गयानाथ असल्या प्रकारांमध्ये नसतो. रस्ता पार करण्यासाठी इकडं-तिकडं पाहिल्यावर गयानाथला उत्तरखंडाची अनेक पोस्टर्स दिसतात.

मरणचंदच्या दुकानात शिरून असिन्दिरशेजारी बसता-बसता गयानाथ म्हणतो, 'इकडं उत्तरखंडवाल्या लोकांनी फार मिटिंगाबिटिंगा चालवल्यात जणू! त्यानंतर मोठ्या आकाराचा एक लालसर रसगुल्ला चमच्यात घेऊन त्याचा एक तुकडा तोडतो - रसगुल्ल्यावरून माशा उडून जातात.

असिन्दिरचं रसगुल्ला खाऊन झालंय्. तो चहाचा एक घोट घेऊन म्हणतो, 'तुम्हाला म्हटलंय की जॉईन व्हा. बॉम्बेहून शिनिमातली पोरगी आणायचं ठरवतायत्.'

पहिल्या घासात चमच्यातून जेवढा रसगुल्ला तोंडात गेला होता तेवढा गयानाथ गिळतो. त्याच्या दातांना रस लागला, तर दात दुखतात; म्हणून जरा कौशल्याने रसगुल्ला

जिभेच्या मागे नेऊन जिभेनेच खावा लागतो. त्यामुळे थोडा वेळ लागतो.

दुसरा घास घेण्यासाठी चमचा उचलता उचलता गयानाथ असिन्दिरला विचारतो, 'मला काय त्या पोरीसारखं नाचावं लागणार की काय?'

चहा संपवून, आवाज करीत असिन्दिर जिभेने दात स्वच्छ करतोय्. ते थांबवून तो उत्तरतो, 'तुम्हाला नाचायला कोण सांगतंय्? यांनी तर राजबन्शी लोकांसाठी पार्टी काढलीय्. कॉंग्रेस यांची नाहीय्. सगळ्यांनाच उत्तरखंड पार्टीत यायचंय् - तुम्हीही का जॉईन होत नाही? एवढं मामले ठोकलेयत तुम्ही सरकारवर, काय झालं त्यांचं?'

हे बोलता-बोलता खिशातून सिगारेट-काडीची पेटी बाहेर काढीत असिन्दिर दुकानाबाहेर जातो. बाहेर जाऊन तो सिगारेट पेटवतो आणि दुकानात गयानाथ खूप वेळ घेऊन दुसरा रसगुल्ला संपवतो. पुरा एक ग्लास पाणी पितो. तोपर्यंत त्याचा चहा घट्ट होतो. तरीही गयानाथ तो चहा चवीने हळू हळू पितो. या सगळ्या गोष्टी तर त्याला एकट्यालाच कराव्या लागतात - तेवढा वेळ असिन्दिरचा उत्तरखंडाबद्दलचा प्रस्ताव शांतच राहतो.

पैसे देऊन गयानाथ बाहेर आल्याबरोबर असिन्दिर मोटरसायकलवर बसून स्टार्ट देतो. चादर आपल्या छातीवर आडवी घेताना गयानाथ पुन्हा ती निळी पोस्टर्स आणि फलक पाहतो. म्हणतो, 'बराच जोर धरलेला दिसतोय् तुमच्या या उत्तरखंडाने!' पण मोटरसायकलच्या आवाजात त्याचं हे बोलणं ऐकू जात नाही. असिन्दिर मागच्या बाजूला हात करून पान आणि चुना देतो. गयानाथ ते घेत नाही. आधी पॅडलवर नीट पाय ठेवून शिस्तीत बसतो, मग पान घेतो. गयानाथने पान घेतल्यावर असिन्दिर तोंड पुढे करून पिंक मारतो आणि मोटरसायकल चालवायला सुरुवात करतो. गयानाथला असिन्दिरमागे मोटरसायकलवर बसायची इतकी सवय झालीय की तो पान नीट करून तोंडात घालतो. पानाने त्यांचं तोंड पूर्ण भरून जातं.

मोटरसायकलवर जाताना तर काही दोघांमध्ये बोलणं होऊ शकत नाही, पण उत्तरखंडाच्या संदर्भात गयानाथच्या मनात अनेक प्रश्न उभे राहतात. ते सगळे प्रश्न असिन्दिरला विचारता येतील, काही गोष्टी ठाऊक होतील. पण नंतर निवांतपणे चर्चा करायची गयानाथला सवय नाही. त्यामुळे त्या गोष्टी त्यावेळी बोलता न आल्याने त्याच्या स्वत:शीच गप्पा होतात, संवाद होतात. गयानाथ पक्का कॉंग्रेसचा माणूस, आजवर कॉंग्रेसलाच मत देत आलाय. पण गयानाथ जोतदारासारखा एक विख्यात माणूस तर काही केवळ एक मामुली मतदाता असू शकत नाही. त्याची जमीन कसणारे काही शेकडा लोक तर केवळ त्याच्या आदेशानुसारच तर मतदान करतात. नाहीतर त्याने एकट्याने जाऊन मतदान करण्यात त्याची शान कुठे राहिली? मतदानाआधी त्याला प्रत्यक्ष असा

आदेशनिर्देश कधीही द्यावा लागत नाही - काय करायचं ते सर्वांना ठाऊक असतं. पण हे फॉरेस्ट गयानाथचं आहे हे तर सगळ्यांना ठाऊक आहे - ते ठाऊक असल्याचा तर लोकांना काही फायदा नाही. असं असेल, तर मग गयानाथ आणि त्याच्या माणसांनी कॉंग्रेसच्याच बाजूने राहण्यात काही अर्थ नाही.

या सगळ्या माणसांना बरोबर घेऊन गयानाथ स्वत:चा जोर नक्कीच दाखवू शकतो.

वकीलबाबूंच्या घरासमोरच्या अंगणात मोटरसायकलवरून उतरण्याआधी गयानाथ स्वत:ला या मुद्द्यापर्यंतच समजावू शकतो.

## एकशे चोपन्न

# वकीलबाबू विरुद्ध उत्तरखण्ड

वकीलबाबूंच्या घरासमोरच्या अंगणात असिन्दिरच्या मोटरसायकलवरून उतरून गयानाथ आपले दोन्ही हात डोक्यावर उचलून आळस देतो. असिन्दिर मोटरसायकल वळवून परत जाताना म्हणतो, 'येतो'. पण जाता जाता अचानक थांबून, मान वळवून विचारतो, 'इथंच येऊ, की सरळ घरी जाऊ?' आळस देण्याच्या प्रक्रियेतच गयानाथ आपले दोन्ही हात मागे घेऊन मान खाली वळवतो. गयानाथच्या शरीराचे आखडलेले स्नायू सैल होईपर्यंत असिन्दिर रस्त्यापाशी फट्फट् करीत थांबतो. गयानाथ तोंडाने उत्तर देत नाही, उजवा हात वर करून निर्देश देतो. असिन्दिरला त्याचा अर्थ समजतो. कोर्टात जायचंय्. आता गयानाथ सरळ वकीलाबाबूंच्या रस्त्याच्या दरवाजात जाऊन थांबतो. वकीलबाबू किंवा त्यांचा कारकून त्यांच्यापैकी कुणीही एकदा गयानाथला पाहिलं, की गयानाथचं काम संपलं. गरज असेल तर वकीलबाबूच त्याला बोलावून घेतील किंवा काही सांगायचं असेल तर कारकुनाला सांगून पाठवतील. करकून बहुधा गयानाथला सांगेल- कोर्टात भेटा. तोपर्यंत गयानाथ या अंगणात चक्कर मारून थोडं ऊन खाईल, बाहेरच्या व्हरांड्यातल्या बेंचवर बसून राहील, एवढंच काय, वकीलबाबूंचं शिरस्त्याचं काम संपल्यावर, सगळे लोक निघून गेल्यानंतर, कारकूनही आपल्या घरी निघून गेला, तरी गयानाथ व्हरांड्याला बाकावर बसूनच राहील. वकीलबाबू आंघोळ-जेवणखाण आटोपून रिक्षातून कोर्टात जायच्या वेळी म्हणतील, 'काय गयानाथबाबू! चला, कचेरीत चला!' रिक्शात वकीलबाबूंबरोबर दुसरं कुणी जाणारं असेल तर वकीलबाबू बहुधा म्हणतील, 'काय गयानाथबाबू! या, कोर्टात या!' गयानाथ तेव्हा चालत चालत कोर्टात जाण्यासाठी निघेल.

गयानाथ आपल्या वडिलांबरोबर याच वकीलबाबूंच्या घरी आलाय्. तेव्हा या वकिलबाबूंचे वडील बुढे वकीलबाबू यांचा शिरस्ता होता. तिस्ता ब्रिज झाला नव्हता. डुयार्सहून सकाळी येऊन संध्याकाळआधी परत जाणं खूप अवघड होतं- वाडीच्या अंतर्भागाशी वाडीच्या बाहेरच्या काहीच संपर्क नव्हता, तेव्हा वकीलबाबूंचा हा नवीन दिवाणखाना बांधला गेलेला नव्हता. इथं एक पत्र्याचा दरवाजा होता. या अंगणाच्या पश्चिम कोपऱ्यात एक विहीर आणि पायखाना होता. गयानाथ आपल्या वडिलांबरोबर येत असे - थंडीच्या दिवसात बैलगाडीतून नदीपर्यंत आणि नंतर 'मार' नौकेतून तिस्ता पार करूनही येत असे. या अंगणात तेव्हा विटेच्या चुलीवर स्वैपाक होत असे, आणि संध्याकाळनंतर व्हरांड्यातल्या बाजेवर ते झोपत असत. कोर्टकचेरीचं काम पूर्ण करून दोन-तीन दिवसांनंतर ते घरी परतत असत. तेव्हा जलपाइगुडी शहरात आल्यावर तर अगदी देशान्तर केल्यासारखं वाटे. आणि आता तर सकाळी घरून निघालं, की दुपारच्या जेवणापर्यंत पुन्हा घरी जाता येतंय्. जलपाइगुडीला जाणं आता देशान्तर करण्यासारखं वाटत नाही. पूर्वी वर्षातून एक-दोन दिवस कोर्टकचेरीचं काम असे; आता तर रोज असतं अशी अवस्था आहे.

गयानाथ वकीलबाबूंच्या शिरस्त्यात जाऊन दरवाजाजवळून कारकूनाला म्हणणार, गयानाथ आलाय असं वकीलबाबूंना सांगा, पण कारकुनाने पहाण्याआधीच वकीलबाबू गयानाथला पहातात- 'अरे गयानाथबाबू, याऽ याऽ!'

वकीलबाबू आपल्या हातातली लेखणी कागदावर टाकून असा आळस देतात, की जणू ते गयानाथबाबूंचीच वाट पहाताहेत. गयानाथ दोनतीन माणसांना ओलांडून तिथल्या एका रिकाम्या खुर्चीत बसतो. वकीलबाबू म्हणतात, 'कलकत्त्याच्या वकिलाने चिठ्ठी दिलीय्, इथून काही कागदपत्रांच्या नकला करून पाठवायला हव्यात.' वकीलबाबू आता कारकुनाकडे पहातात, 'सन्तोष, तुझ्याकडं लिस्ट आहे ना?'

कारकून म्हणतो, 'हो, आहे.'

वकीलबाबू आता पुन्हा गयानाथकडे पाहून म्हणतात, 'तर मग आपण कोर्टात जाऊन सन्तोषला भेटून काय पाहिजे ते करून द्या.'

गयानाथ वकीलबाबूंकडे पाहून म्हणतो, 'आपली प्रकृती तर ठीक आहे ना?'

वकीलबाबू, 'हो, ठीकच आहे म्हणायची,' म्हणून दोन्ही हात कागदावर ठेवतात खरे, पण लेखणी उचलीत नाहीत. त्यांनी लेखणी उचलल्यावर गयानाथ आणखी बोलू शकणार नाही. आणि मग कितीही आवश्यक मामला असला, तरी गयानाथ सरळ वकीलबाबूंना काहीही विचारू शकला नसता. गयानाथ आता जवळच्या दोन गृहस्थांकडे पहातो. आपल्या अगदी डावीकडच्या गृहस्थाला तो पाहू शकत नाही, पण पहिल्या

खुर्चीवरच्या माणसाने आपले दोन्हीही कोपर वकीलबाबूंच्या टेबलावर टेकवले आहेत आणि तळहात स्वत:च्या हनुवटीखाली ठेवले आहेत. गयानाथ काही त्या माणसाला ओळखू शकत नाही. इथं येऊन वकीलबाबूंचे अनेक अशील गयानाथच्या ओळखीचे झाले आहेत. गयानाथला थोडा संकोच वाटतो-या लोकांसमोर वकीलबाबूंना प्रश्न विचारावेत की नाही? वकीलबाबूही खुर्चीत सरळ होतात. आता ते पुन्हा लेखणी उचलतात. गयानाथबाबूंशी त्यांचं यापेक्षा जास्त बोलणं कधी होणार? गयानाथ खुर्चीतून उठत नाही. वकीलबाबूंनी लेखणी उचलण्याआधीच गयानाथ विचारतो, 'वकीलबाबू, कलकत्याहून काही खबर मिळाली का?' हा प्रश्न शेजारच्या लोकांना ऐकू येऊ नये, म्हणून गयानाथ जरा टेबलाकडे सरकून, जरा हसून, खूप खालच्या आवाजात विचारतो. पण वकीलबाबूंना हा प्रश्न संपूर्ण ऐकू येत नाही. ते खुर्चीला टेकून बसत विचारतात, 'हं? काय म्हणालात? कसली खबर?' गयानाथ आता खुर्चीवरून आणखी पुढे सरकून आपल्या हातांची बोटं टेबलावर ठेवतो. जरासं हसून म्हणतो, 'मी म्हटलं, की कलकत्याच्या हायकोर्टातला मामला संपण्याचं काही लक्षण दिसतंय् का? इथं तर बंधाऱ्याचे खांब अर्ध्या नदीपर्यंत उभे राहिलेतय्!'

'ते तर होणारच. तुमच्या जमिनीच्या मामल्यासाठी काही बंधाऱ्याचं काम अडून रहाणार नाही. तरी तुमच्याकडून ही चांगली बातमी मिळाली की तिस्ता बंधाऱ्याचं काम वेगाने चाललंय्. नाहीतर इथं साध्या एका रस्ता दुरुस्तीच्या कामाला अठरा-अठरा महिने लागतात' वकीलबाबू बाकीच्या दोन गृहस्थांकडे पहात आपलं बोलणं पुरं करतात. जो पहिल्या खुर्चीवर बसलेला आहे, बोलणं पुरं करतात. जो पहिल्या खुर्चीवर बसलेला आहे, त्याच गृहस्थाचं काम वकीलबाबू बहुधा करताहेत, म्हणून तो एक उदासीनसं स्मित करीत गयानाथकडे पहातो. गयानाथही हसतो - सभ्य गृहस्थांमध्ये बसल्यावर, ते जसं वागतात तसंच वागण्याची गयानाथला सवय आहे. हसतच तो म्हणतो, 'पण बंधारा पूर्ण झाल्यावर माझ्या जमिनीचं काय होणार वकीलबाबू?'

वकीलबाबू म्हणतात, 'तुमचा तर नुकसानभरपाईचा मामला आहे. तुम्ही तर एक जिंकलासुद्धा आहे. त्याच्याप्रमाणेच होईल. पण बंधाऱ्याखाली जी जमीन गेलीय् ती परत मिळणार का?'

'मी तर म्हटलंय्-मला नुकसानभरपाई नकोय्. पाण्याखाली गेलेल्या माझ्या जमिनीच्या क्षेत्रफळाइतकीच जमीन मला सरकारने दुसरीकडे द्यावी' मामल्याची चर्चा सुरू झाल्याबरोबर गयानाथ आत्मविश्वासाने बोलू लागतो.

'हो. तो रिट् तर केलाय्. तुमच्या मागणीतही मुद्दा आहेच. सरकारला तो मुद्दा कदाचित मान्यही होईल. पण कोर्टाचा मामला आहे. त्यासाठी तर काही बंधाऱ्याचं काम

अडकून रहाणार नाही.' गयानाथ जणू कानाने जरा कमीच असल्याप्रमाणे वकीलबाबू जरा मोठ्या आवाजात बोलतात.

गयानाथ थोडं शान्त राहून म्हणतो, 'कोर्ट सुद्धा सरकारचंच ऑफिस आहे, जजलासुद्धा सरकारकडूनच पगार मिळतो-मग बंधारा बांधून झाल्यावर आमच्या मामल्यावर विचार जज करील का?'

वकीलबाबू थोडा वेळ शांत रहातात, त्यानंतर आपल्या समोरच्या कागदपत्रांवर नजर वळवतात, आणि म्हणतात-त्यांचा आवाज आता वरच्या पट्टीत उठत नाही - 'गयानाथबाबू, तुमची तर कितीतरी पिढ्यांची जोतदारी आहे, जोतदारी किती बदललीय हे काय तुम्ही पाहिलेलं नाही? तुम्हालाही आता जुनी जोतदारी विसरायला हवी. कोर्ट-हायकोर्टही बदललंय्. एक बंधारा तयार होणार-ते सरकारचं काम आहे. सरकार ते काम बंद करून तुमची जमीन परत करील हा विचार आता सोडून द्या. पण नुकसानभरपाई जर न्याय्य असेल तर मिळेल, किंवा तुम्ही म्हणता, तसं पाण्याखाली गेलेल्या जमिनीएवढीच दुसरीकडची जमीन तुम्हाला द्यायची की नाही ते कोर्ट नक्कीच पाहील,' वकील- बाबू सरळ होऊन बसत लेखणी उचलतात, 'इथपर्यंतच कायद्याचा प्रांत आहे. ते झालं नाही, तर मग तुम्हाला राजकीय पार्टी बनवावी लागेल - उत्तरखंड पार्टी. त्यांना तर कामतापुरचं राज्य हवंय्. पश्चिम बंगालपासून वेगळं असं राज्य. त्या राज्याचं हायकोर्ट झालं, तर ते कदाचित् तुमच्या बाजूने निकाल देईल - ''बंधारा पाडून गयानाथबाबूंची जमीन गयानाथबाबूंना परत द्या!'' मयनागुडीत तर त्यांचा प्रचंड मेळावा होतोय्- खरं ना?'

गयानाथ मान हलवून म्हणतो, 'हो.'

'तुम्ही आहात की काय उत्तरखंड पार्टीत?' वकीलबाबू लिहायला सुरूवात करता-करता गयानाथबाबूंना विचारतात. काय उत्तर द्यावं हे गयानाथला समजत नाही. वकीलबाबूंच्या बोलण्यावरून ते उत्तरखंडला अनुकूल नाहीत हे गयानाथच्या लक्षात आलंय्; पण गयानाथच्या जमिनीची बाजू वकीलबाबूंपेक्षा उत्तरखंड जर अधिक ठोसपणे मांडत असेल, तर गयानाथने उत्तरखंडचं का होऊ नये? गयानाथ असलं उत्तर तयार करता-करता पहातो, की वकीलबाबूंनी लिहीणं सुरू केलंय्. तो हळूच खुर्चीवरून उठतो, खूप खालच्या आवाजात 'नमस्कार' म्हणून खुर्चीजवळून मागे निघून जातो. मागे तक्तपोशीजवळ कारकून बाबू बसलेले आहेत. गयानाथ त्यांच्याकडे जाऊन खालच्या आवाजात विचारतो, 'कुठल्याकुठल्या कागदपत्रांच्या नकला हव्या आहेत, सांगा.'

'बसा,' म्हणून कारकून बाबू आपल्या डायरीची पानं उलटून अनेक घडी घातलेले कागद उघडून-उघडून पहातात. शेवटी हवा तो कागद न सापडल्याने म्हणतात, 'तुम्ही

कोर्टात तर या, मी बाहेर काढून ठेवतो.' गयानाथ आता विचारतो, 'ज्या कागदपत्रांच्या नकला करायच्यायत् ती तुमच्याकडे आहेत, की माझ्याकडे?'

कारकून म्हणतो, 'पहावं लागेल. तुम्ही कोर्टात तर या, मी काढून ठेवतो.' गयानाथ आस्ते-आस्ते वकीलबाबूंच्या घरातून बाहेर पडतो.

## एकशे पंचावन्न

# गयानाथचा पब्लिकशी संपर्क

गयानाथ व्हरांड्यात बसतो. असं बसण्याचीच त्याला सवय आहे-त्यानंतर मग वकीलबाबूंच्या बरोबर, किंवा त्यांच्या मागे-मागे कोर्टात जाणं. गयानाथ तर कधीच घड्याळ पाहून काम करीत नाही-एकूण दिवसाच्या हिशेबाने काम करतो. सकाळी उठून जिथं जायचं ठरलं असेल त्या जोताच्या दिशेने बाहेर पडतो. वाटेत आणखी दोन-चार ठिकाणी जो जाऊ शकतो. दुपारच्या जेवणासाठी घरी आलंच पाहिजे असा काही त्याचा नियम नाही. आणि येणार नाही, असंही नाही. आला तर आला. नाही तर नाही. आता संध्याकाळनंतर तो फारसं कुठेजात नाही-त्या 'नक्षलिया गोंधळा' पासून रात्री बाहेर जाणं बंद. एखादी सवय तुटली की परत सुरू होत नाही.

जलपाइगुडीला आल्यावर त्याची हीच एक गैरसोय होते. 'तासाभरानंतर या', किंवा, 'साडे बाराच्या सुमारास भेटा'- या सांगण्यानुसार आपलं जाणं येणं ठरवणं हे गयानाथच्या सरावाबाहेरचं आहे. त्याशिवाय, एक काम होतंय् तोवर दुसरं काम आटोपून येता येईल इतकी काही त्याची शहरात कामं नसतात. तरीही जोतजमिनीत फिरताना घड्याळाशिवायच गयानाथ वेळेचं भान ठेवतो. शहरात ते भानही नष्ट होतं. हळूहळू चालत जाऊन कोर्टात पोहोचायचं असेल, तर किती आधी निघायला हवं हे काही त्याला समजत नाही.

वकीलबाबूंच्या व्हरांड्यात बसून गयानाथ थोडा विचारही करतो. वकीलबाबू जे म्हणाले होते, त्यावर तो मनातल्या मनात विचार करीत नाही असं नाही. जो प्रचंड बंधारा तयार होतोय्, त्याच्या तुलनेत गयानाथची जमीन तर टिचभर आहे. पण कितीही प्रचंड बंधारा होवो, गयानाथची जमीन ही तर गयानाथची जमीन आहे ना! सरकारने एका विशिष्ट दराने नुकसानभरपाईची रक्कम ठरवून ते पैसे दिल्याने तर काही गयानाथ नवीन जमीन विकत घेऊ शकत नाही; आणि विकत घेऊ शकला, तरी जुनी जमीन हातातून जाण्याचं नुकसान काही भरून येत नाही. जमीन म्हणजे काही सरकारी नोकरीचा पगार नाही - प्रत्येक महिन्याच्या पहिल्या तारखेला त्याच रकमेचा पगार मिळायला! एरवीही जोतजमीन

ठेवण्याचा वेगळा असा काही कायदा नाही. सगळेच कायदे जोतजमीन सोडण्याचे आहेत. अधियारालाही जमीन रेकॉर्ड करून दिल्यावर मग जोतदाराच्या हाती नोंदवहीच्या कागदाशिवाय रहातं काय? गेल्या काही वर्षांपासून तर तेच होतंय्. जोतदाराकडं रहाणार नोंदवही, आणि जमीन खाणार 'बारा भुतं'!

एवढ्या संतापात, हिशेबठिशेबात गयानाथ हे विसरत नाही, की त्याच्या हातून जमीन कितीही गेलेली असली, तरी जोतदारी मात्र त्याच्या बापाच्या अंमलापासून खूप वाढली आहे. खत कितीतरी वाढलंय्. पडीक जमीन कितीतरी कमी झाली आहे.

पण ते या सरकारच्या समर्थनासाठी, स्वत:च्याच स्वत:शी चाललेल्या संवादात मान्य करायला गयानाथ तयार नाही, 'अरे, आमची सगळी जमीन आमच्या हातात असती तर किती पीक आलं असतं!' पण इतक्या जमिनीत इथं शेती करणं शक्य होतं का, आणि ही तर खूपच चांगली व्यवस्था झाली - जमीन थोडी कमी झाली खरी, पण शेती मात्र खूप वाढली. या गोष्टी दुर्लक्ष करता येत नाही म्हणूनच गयानाथला ही गोष्ट महीत आहे, पण स्वत:चंच मत मान्य केलं नाही तरी त्याचं चालतं, म्हणून तो हे मत मान्य करीत नाही.

हे तो मान्य करीत तर नाहीच, उलट वकील बाबूंच्या गोष्टींना आपल्याला अनुकूल असं वळण देतो. 'जोतदारी आता पूर्वीसारखी चालणार नाही. आता न्यायाधीश बदलले आहेत. कायदा बदलला आहे. बंधाऱ्याखाली गेलेली जमीन आता परत मिळणार नाही. या सरकारच्या कायद्यानुसार परत मिळणार नाही. कामतापूरच्या लोकांनी स्वतंत्र राज्य मिळवलं, तर त्या नवीनत राज्याच्या नव्या कायद्यानुसार आपली जमीन परत मिळेल.' जमीन परत मिळण्याची खात्री असती, तर गयानाथ उत्तरखण्ड राज्याचा नेता होऊन बसला असता. पण आता काही लोक एकत्र येऊन संपूर्ण असं एक नवीन राज्य तयार करू शकतील या कल्पनेवर गयानाथचा विश्वासच बसत नाही. तरीही आपल्या इतरांशी झालेल्या गप्पांमधून गयानाथला समजतं, की उत्तरखंड एवढ्यात होऊ नये म्हणून सरकार अनेक गोष्टी द्यायला राजी आहे. पुढे मागे उत्तरखंड राज्य अस्तित्वात येईल, म्हणून सरकार कायम भीतीच्या छायेत असतं. आता सरकार भीतीच्या छायेतच आहे, तर आणखी भीती दाखवायला हरकत कसली? आणि, भीती दाखवल्यानेच जर सरकारला भीती वाटत असेल तर गयानाथनेच थोडी भीती का दाखवू नये?

तरीही उत्तरखंड पक्षात सहभागी होण्यात गयानाथला जो संकोच वाटतोय, तो राजकारणात न शिरण्याच्या इच्छेमुळे निर्माण झालेला आहे. पार्टीबिर्टीचं राजकारण म्हणजे आपल्या जोतदारीचं नुकसान-हे तो आपल्या वडिलांच्या वेळेपासून पहात आलाय्. 'मग ती काँग्रेसपार्टी असो वा कम्युनिस्टपार्टी असो. ज्याला जोतदारी करायचीय् तो इमानदारीने जोतदारी करतो, त्याला पार्टी-बिर्टीचं राजकारण करायला वेळ नसतो. साले जोतदारी सोडून देउनियागिरी करतात. देउनियागिरीत नगद पैसा खूप, पण जोतदारी

नाही.'

अनुभव आणि जीवनाचं तत्त्वज्ञान यांच्या मिश्रणातून गयानाथने ही धारणा तयार केली आहे. पण ही धारणा त्याने तयार केली आहे, हे त्याला ठाऊक नाही. पक्षाचं राजकारण केल्याने जोतदारीचं नुकसान होतें, किंवा पार्टीचं राजकारण करणं म्हणजे देउनियगिरी करणं या गोष्टी तो पुराव्याने सिद्ध करू शकणार नाही. खरं तर याउलटच खरं आहे. गयानाथच्या धारणेप्रमाणे शोधलं तरी काही पुरावे सापडतील. पण गयानाथची ही धारणा तयार होण्यामागे कुठलेही पुरावे कार्य करीत नाहीत. गयानाथ असा काही आपादमस्तक मूर्तिमंत जोतदार आहे, की जमीन आणि शेती यांच्या नियमांव्यतिरिक्तच्या सर्वच नियमांना तो व्यर्थ मानतो. यालाच त्याच्या जीवनाचं तत्त्वज्ञान म्हणता येईल. त्याची जोतदारी त्याला कधीही काँग्रेस पक्षाचं राजकारण करू देत नाही- मतदानाच्या वेळी लोकांना बरोबर घेऊन जाऊन एक मत देऊन येणं हा गयानाथला एखाद्या लग्नसमारंभाचं भोजन करून येण्यासारखा प्रकार वाटतो. हे जीवनदर्शन त्याला उत्तरखंड पक्षात सामील होण्यापासून परावृत्त करतंय्. पण गयानाथला जणू चाहूल लागलीय - त्याला या पक्षात सामील व्हावंच लागेल, तो सामील होईलही.

'साला आता पब्लिकचे दिवस आलेयत्. जे काम तुम्ही पब्लिक गोळा करून करणार नाही, ते काम होणार नाही. अधियारी पब्लिक झाले आहेत, त्यांचं काम होतंय्! जोतदारांनाही आता पब्लिक व्हायला हवं - सालं काम तरी होईल!'

पण स्वत:शी चाललेल्या संवादात गयानाथ एका प्रश्नाशी येऊन थांबतो - 'पण माझं काम काय? मी काय करायला हवं?'

या प्रश्नाचं समाधानकारक असं काही उत्तर तो स्वत:मधून बाहेर काढू शकत नाही; त्याचं कारण म्हणजे गयानाथला स्वत:लाच त्याचं उत्तर संपूर्णपणे जाणून घ्यायची इच्छा नाही. 'उत्तरखंड झालं, तर माझी जी जमीन बंधाऱ्याखाली गेलीय, ती परत येईल का?' गयानाथला या प्रश्नाचं उत्तर नक्कीच ठाऊक आहे - 'नाही.' म्हणूनच तो हा प्रश्न या प्रकारे उठवू इच्छीत नाही. पण, जर कुणी तुमच्या बापजाद्यांची जमीन घ्यायला आलं,तर त्यांना रोखायला हवं, अटकाव करायला हवा. ते जर लाठ्याकाठ्या घेऊन आले, तर आपणही त्यांचा लाठ्याकाठ्यांनीच प्रतिकार करायला हवा. जर त्या जमिनीवर ते शेती करू लागले, तर ती उपटून टाकून प्रतिकार करायला हवा. गयानाथने तसा प्रतिकार केलायसुद्धा. 'पार्टीबिर्टी जर पब्लिकला बरोबर घेऊन जमिनीचा ताबा घ्यायला आली, तर साल्यांना पब्लिक जमवूनच रोखायला हवं,' उत्तरखंड म्हणजे गयानाथचं पब्लिक.

गयानाथ अगदी याच प्रकारे उदाहरणांनी आपल्या युक्तिवादाला पुष्टी देतो असं नाही. पण, आपण आता उत्तरखण्ड पार्टीत जायलाच हवं असं जेव्हा त्याला उमगतं, तेव्हा त्याला आपल्या जीवनदर्शनातूनच युक्तिवाद मांडावे लागणार ना! उत्तरखण्ड

निर्मिती आवश्यक आहे असं जर त्याला प्रथमपासूनच वाटत असतं, तर मग तो आधीपासूनच तिथं असता की! तरीही शेतीभातीच्या कामासंदर्भात सरकारशी जुळतं घेतलेलं चांगलं याची गयानाथला जाणीव आहे. आता जी शेतीभाती उभी आहे, तिच्या संदर्भात सरकारशी अनुकूल संपर्क ठेवला नाही, तर शेती करणंच अशक्य आहे. उलट उत्तरखण्ड-बिण्ड वगैरे पार्टीबिर्टीत सामील झालं तर सरकारशी असलेले संबंध बिघडतील आणि गयानाथसारख्या एखाद्या जोतदाराचं समर्थन मिळालं, तर 'माझ्या वसुलीसाठी हवी उत्तरखण्ड पार्टी आणि माझ्या माणसांच्या वसुलीसाठी हवी लाल पार्टी.' अशाने तर गोंधळ आणखी वाढणार. पण गयानाथला जे 'पब्लिक' पाहिजे आहे, ते त्याला उत्तरखण्ड सोडून दुसरीकडं कुठं मिळणार?

गयानाथ वकीलबाबूंच्या व्हरांड्यातून उतरून कोर्टाच्या दिशेने चालायला सुरुवात करतो. रस्त्यावरून रिक्षा-सायकली-फटफट्यांची ये-जा सुरू झालीय् - लोक आपापल्या ऑफिसात निघाले आहेत. हळू हळू चालत गेलं, तर तो वेळेपर्यंत कोर्टात पोचेल. कारकूनबाबूंकडून लिस्ट घेतली की काम संपलं. दरम्यान असिन्दिर आला म्हणजे झालं.

## एकशे छप्पन्न

# गयानाथची उत्तरखण्ड-पक्ष-प्रवेश निर्णयाची घोषणा

गयानाथ वकीलबाबूंच्या घरून निघाला तेव्हा त्याच्या मनात दुसराही एक हिशेब होता. कारकूनबाबू कोर्टात जाऊन दुसऱ्या कामात अडकले, तर ते गयानाथला अगदी दुपार उलटून जाईपर्यंत बसवून ठेवतील.

सन्तोष कारकुनाने तसं केलंही असतं. गयानाथ दिसल्याबरोबर तो समोरच्या लोकांकडे पाहून म्हणतो, 'गयानाथबाबू, या सगळ्यांच्या केसेस आता कोर्टासमोर येणार आहेत, आपण जरा बसा. यांना वाटेला लावून आपलं काम हाती घेतो.'

गयानाथ हात जोडून म्हणतो, 'आज मला लवकर जायचंय् हो. जायच्या वाटेवर मयनागुडीला थांबायचंय्. आपण माझे कागद द्या आणि आता देणं जमणार नसेल, तर पाठवून द्या.'

गयानाथ जोतदाराला साधारणतः बसवून ठेवता येतं खरं, पण शिरस्त्यातल्या इतक्या पैसेवाल्या अशीलाने काम करून द्यायची विनंती केल्यावर सन्तोष कारकुनाचीच काय, त्याच्या वकिलाचीही ती विनंती फेटाळण्याची क्षमता नाही. गयानाथला आपल्या या सामर्थ्याचा पूर्ण अंदाज नाही. पण त्याला एवढं मात्र समजतंय्, की मयनागुडीला

जायचं असेल, तर इथे संध्याकाळपर्यंत बसून राहून चालणार नाही.

कारकूनबाबू म्हणतात, 'आपण बसा, या खुर्चीत बसा.' एकजण एका हाततुटक्या खुर्चीत बसलेला होता, सन्तोष त्याला उठवता-उठवता स्वत:च्या बुकपॉकेटमधून एका कागदाचा गठ्ठा बाहेर काढतो - नानाप्रकारे घड्या घातलेले कागद आणि एक छोटीशी वही. सन्तोष अत्यंत वेगाने जवळ जवळ प्रत्येक कागद पाहतो. कागद पाहण्याशी ताल राखून तो जिभेने दही चाटल्यासारखा आवाज करतो. 'नाही,' म्हणून ते सारे कागद परत बुकपॉकेटमध्ये ठेवून, 'अरे गयानाथबाबूंना चहा आणा, एक कप चहा आणा बरं,' असं तो समोर उभ्या असलेल्या एकजणाला सांगतो. त्यानंतर स्वत:च्या मोठ्या डायरीची पानं उलटू लागतो. जवळजवळ प्रत्येक पान उलटतो आणि दही चाटल्यासारखा आवाज करतो. उलटता-उलटता संतोष अचानक थांबतो, तोंडाचा आवाजही बंद होतो. जिथपर्यंत पानं उलटली तिथं एक खूण ठेवतो आणि हसतमुखाने गयानाथला म्हणतो, 'सापडलं, सापडलं!'

गयानाथ म्हणतो, 'काय काय लागेल पहा.'

डायरीमधून एक इनलँड बाहेर काढून, ते उघडून वाचून सन्तोष म्हणतो, 'आपल्या त्या २३१ नंबर डागाचा दस्तऐवज.'

'तो तर पहिल्यापासूनच आपणाकडे - '

'आँ? तसं असेल तर बहुधा आणखी एक कॉपी लागेल . . . अं ऽऽ २३१ की २३३ नंबर डाग?'

'२३३ चा तर काहीच मामला नाही.'

'नसला तरी लागेल.'

सन्तोषने पाठवलेला माणूस एक कप चहा आणून गयानाथला देतो. गयानाथने चहाचा एक घुटका घेतल्यावर सन्तोष म्हणतो, 'गयानाथबाबू, त्यापेक्षा आपण हे पत्र घेऊन जा, कुणालातरी दाखवून काय-काय लागेल ते पहा, ते घेऊन या, तेव्हा मी पाहून घेईन. आता या सगळ्यांच्या केसेस पुकारल्या जातील, तेव्हा -

'अच्छा, अच्छा, द्या माझ्याकडं,' सन्तोषच्या हातातून पत्र घेऊन, त्याची घडी घालून ते खिशात ठेवण्यासाठी गयानाथला चहाचा कप टेबलावर ठेवावा लागतो; 'पण जर काही कागदपत्रं आपणाकडं असतील तर?'

'मी जेव्हा पाठवीन, तेव्हा ती पाहूनच देईन की,' सन्तोष न पाहता म्हणतो.

चहा आणखी एका घोटात संपून जातो. गयानाथ उठून म्हणतो, 'अच्छा बाबू, नमस्कार.'

मान उचलून संतोष 'हं; नमस्कार' म्हणून पुन्हा टेबलावर मान झुकवतो.

गयानाथ रस्त्यावर उतरून विचार करतो, असिन्दिरची वाट पहात कुठं थांबावं? याचा विचार करता-करताच तो असिन्दिरच्या येण्याच्या रस्त्याच्या वळणावरून मोठ्या रस्त्याच्या दिशेने चालत राहतो. चालता-चालता तो ठरवतो, की सरळ पी.डब्ल्यू.डी.च्या वळणावर जाऊन वाट पहावी.

पी.डब्यृ.डी.च्या वळणावर स्कूलबोर्डाच्या ऑफिससमोर चहाची अनेक दुकानं आहेत. त्यांच्या बाहेरच्या बाजूच्या एका बेंचच्या एका कोपऱ्यावर तो बसतो. अंगाला उन्हाचा चटका लागतोय्, पण त्याला आता चहा घ्यायचा नाहीय् म्हणून तो आत बसत नाही. शहरातून बाहेर जाणाऱ्या साऱ्याच बसेस-मिनिबसेस इथून तिस्ता पुलाकडे वळण घेतात, थोडावेळ इथं थांबतातसुद्धा. कुठल्याही गाडीत बसलं, तरी अर्ध्या तासात मयनागुडी. कारकूनबाबूंना सांगून बसने मयनागुडीला निघून जावं, असं गयानाथला अधूनमधून वाटतं. कारकूनबाबू असिन्दिरला मयनागुडी चौपत्तीवर मरण घोषच्या दुकानी पाठवून देईल. दरम्यान गयानाथ उत्तरखण्ड पक्षाचे अध्यक्ष पंचानन मल्लिक यांना भेटून घेईल.

तसं करायचं असेल, तर गयानाथला परत कोर्टात जाऊन कारकूनबाबूंना सांगून यायला हवं. पण असिन्दिर आता कुठल्याही क्षणी येईल असा गयानाथचा अंदाज आहे. मयनागुडीला पंचानन घोष यांना भेटण्याचा विचार गयानाथच्या मनात आल्यानेच त्याला आता वाटतंय् की, असिन्दिर उशीर करतोय्. पण त्याबरोबरच्, असिन्दिर आता कुठल्याही क्षणी येईल हेसुद्धा त्याला समजतंय्. गयानाथ चहाच्या दुकानाच्या बेंचवर बसूनच राहतो. इकडे तिकडे बघतो, बसेस-मिनिबसेस पाहतो, मोठ्या पुलावरून कोर्टाकडे वळण घेणाऱ्या रिक्षाही पाहतो.

असिन्दिरचा जो प्रश्न ऐकून गयानाथ चमकून आपल्यासमोर उभे राहून फटफटीचा आवाज करणाऱ्या असिन्दिरकडे पाहतो, तो म्हणजे - 'झोप लागली होती काय बापू?' गयानाथ दचकून उठतो आणि पाहतो - असिन्दिर आपल्या फटफटीवर बसूनच हो-हो करीत हसतोय्. ते दोन-चारजण पाहातात आणि गयानाथ बेंचवरून उठून चादर सावरीत-सावरीत स्वत:चा अवघडलेपणा दूर करतो.

हसणं थांबवून असिन्दिर म्हणतो, 'इथून मी तुमच्या डोळ्यांसमोरून गेलो आणि तुम्हाला दिसलो नाही? तिकडं कोर्टात तुम्ही नव्हता. संतोषबाबू म्हणाले, 'ते तर निघून गेले.'' मग वाटलं की आपले बापू पी.डब्ल्यू.डी.च्या वळणावर बसले असतील. इथं येऊन तुम्हाला बघून पँक-पँक हॉर्न दिला, तुम्हाला ऐकू आला नाही. हाक मारली, ऐकू आली नाही - '

असिन्दिरचं हे बोलणं चालू असतानाच गयानाथ त्याच्यामागे फटफटीवर बसतो,

चादर ठीक करतो. असिन्दिरने गाडी सुरू केल्यावर त्याचं बोलणं थांबवून म्हणतो, 'मय्रनागुडीला पंचानन मल्लिकच्या घरी जायचंय्.'

गाडी थांबवून, मान वळवून असिन्दिर विचारतो, 'पंचानन मल्लिक? बापू, उत्तरखंड पार्टीत जाणार आहात की काय?' त्यानंतर रस्त्याच्या तोंडाशी मोटारसायकल थांबवतो.

अचानक थांबवलेली मोटरसायकल कापतेय्, तिच्यावर गयानाथही कापतोय्, असिन्दिर पाय दोन्ही बाजूंना जमिनीवर टेकवतो, त्याची मान वळवलेली आहे. अशा अवस्थेत गयानाथ आपल्या ऐतिहासिक निर्णयाची घोषणा करतो, 'जाणार तर! उत्तरखंड पार्टीत जाणार! मी नाही गेलो तर तुला जायला लावीन. नाहीतर या कोर्ट-कचेरीच्या गुंत्यात जमीन काही सांभाळता यायची नाही.'

असिन्दिर आपला उजवा हात वर उचलून, परत हँडलवर ठेवीत ओरडतो, 'मग असं म्हणाना! आमचे बापू आता लीडर होणार, बापू आमचे आता लीडर होणार, उत्तरखंडचे लीडर!' तो गाडी चालू करतो.

थोड्या वेळानंतर गयानाथ मागून ओरडतो, 'ऐक, मी नाही जाणार, तू जा ना!'

असिन्दिरला हे स्पष्ट ऐकू येत नाही. गती कमी न करता तो मान वळवून विचारतो, 'कुठं जाऊ? मयनागुडीलाच तर चाललोय् ना!'

असिन्दिरच्या पाठीला स्पर्श करून गयानाथ समजावतो - तो बरोबरच चाललाय्. समोर आकाशात तिस्ता पुलाचा माथा दिसतो.

असिन्दिर मान वळवून ओरडतो, 'काय? काय म्हणताय?'

पुन्हा असिन्दिरच्या पाठीला स्पर्श करून गयानाथ ओरडतो, 'सांगतो, सांगतो; आधी मयनागुडीला तर चल!'

## एकशे सत्तावन

# शब्दाच्या अर्थाबद्दल पंचानन-गयानाथ चर्चा व निर्णय

मयनागुडीत् पंचानन मल्लिकच्या घरी जाण्याआधी चौपत्तीवर मरणचंद घोषच्या दुकानात दोन कप चहा घेता घेता गयानाथ आणि असिन्दिर यांच्यामध्ये थोडी चर्चा होते. गयानाथ म्हणतो, 'सुरुवातीलाच त्याने उत्तरखंड पक्षात सामील होणं योग्य होणार नाही. तो तसा सामील झाला, तर सरकार त्याचे मामले-खटले 'डिसमिस्' करू शकतं.

त्याशिवाय, सुरुवातीलाच एकदम संपूर्णपणे कशाला सामील व्हायचं त्या पक्षात?' निवडणुका तोंडावर आल्यात. गयानाथच्या हातात मतं काही अगदीच कमी नाहीत. असिन्दिर जर उत्तरखंड पक्षात गेला, तर जावई आता सासऱ्यालाही या पक्षात आणणार, अशी सगळ्यांना भीती वाटेल. पण गयानाथला कुणी विचारलं, तर तो म्हणेल, 'माझा जावई काही जोतदारी करीत नाहीत, कॉन्ट्रॅक्टरी करतो. माझं सांगणं तो ऐकत नाही.'

गयानाथच्या या बोलण्यावर असिन्दिर म्हणतो, 'माझ्याकडून काम करवून घ्यायचंय काय तुम्हाला?' असिन्दिरला वाटतं, हे सगळं आता कुणी विसरत नाही. गयानाथ स्वत: न जाता असिन्दिरमार्फत आपला मतलब साधून घेतोय्, हे सगळ्यांच्या लक्षात येईल. त्यात जातही जाईल आणि पोटही भरणार नाही. पक्षात प्रवेश करायचा असेल, तर गयानाथ-असिन्दिर अशा दोघांनीही प्रवेश करणं योग्य. त्यामुळे सगळ्यांनाच जरा हादरा बसेल. 'लीडरी करायची असेल तर लीडरी स्वत: करावी लागेल. लीडरी काय दुसऱ्यामार्फत करता येते? नाही येत.'

गयानाथ जरा गुळमुळीतपणेच म्हणतो की, यांचे लीडरबीडर सगळे ठरलेलेच आहेत; तो गेल्यावर त्याला ताबडतोब लीडर थोडंच बनवणार?

असिन्दिर त्याला म्हणतो, 'म्हणता काय? अहो, गयानाथ जोतदार आपल्या पक्षात सामील झाले ही उत्तरखंडाच्या दृष्टीने तर फारच जोरदार बातमी असणार. कार्यकर्ता म्हणून काम करायला तुम्ही काय साधीसुधी आसामी आहात काय? तुम्ही तर पक्षात प्रवेश केल्याबरोबर नेते-लीडर!' त्यामुळे, चहा संपवून पंचानन मल्लिकच्या घरी मोटरसायकलवरून जाताना दोघेही जरा द्विधावस्थेतच आहेत. उत्तरखण्ड पक्षात प्रवेश करणार - इथपर्यंतच ठीक. असिन्दिर म्हणतोय् की गयानाथने उत्तरखंड पक्षात प्रवेश केल्यावर गाजावाजा होणारच, गयानाथला मात्र वाटतं, एवढ्या गाजावाजाची गरज काय?

पंचानन मल्लिक दुपारी वामकुक्षी करीत होता. गयानाथ आणि असिन्दिरला त्याच्या दिवाणखान्यात बसवण्यात आलं. एक छोटा मुलगा एका काशाच्या गडव्यात पाणी आणि एक स्टेनलेस स्टीलचा ग्लास देऊन गेला. पंचानन मल्लिकच्या दिवाणखान्यात एक मोठी तक्तपोशी आहे, एक टेबल आणि काही खुर्च्याही आहेत. दिवाणखान्यात गेल्यावर आपण कुठं बसावं हे गयानाथ जणू ठरवू शकत नाही. मागून असिन्दिर म्हणतो, 'चेअरवर बसा, मी तुमच्याजवळ बसतो.' असिन्दिर जाऊन तक्तपोशीवर बसतो. गयानाथ खुर्चीत बसल्यावर असिन्दिर जरा मागे पडतो, म्हणून गयानाथ खुर्ची थोडी-थोडी फिरवून बसतो, पण खुर्चीला टेकत नाही. गयानाथ जणू आत्ता उठून जाऊ शकतो-त्याच्या चेहेऱ्यावर अशीच काहीशी अनिश्चितता आहे. असिन्दिर विचारतो, 'तुम्ही पंचानन मल्लिकना ओळखता ना?''

या प्रश्नाचं उत्तर द्यायला गयानाथला वेळ मिळत नाही. त्याच्याआधीच पंचानन मल्लिक दिवाणखान्यात प्रवेश करतो.

प्रवेश करताना पंचाननबाबूंना दरवाजाचा आधार द्यावा लागतो. बनियान आणि धोतर असा त्यांचा वेश आहे. दिवाणखान्यात आल्यावर ते गयानाथला नमस्कार करतात. गयानाथला पार करून त्यांना टेबलच्या पलीकडच्या बाजूला बसावं लागतं. तिथं बसूनही ते असिन्दिरला पाहू शकत नाहीत-गयानाथवरून नजर हटवली, तरच पाहू शकतील.

गयानाथ बोलणं सुरू करतो, 'जलपाइगुडीला कोर्टात गेलो होतो. जाताना फलक पाहिले - त्यावरून कळलं, की उत्तरखंड सेळावा होणार आहे. तर विचार केला, आपणाला जरा भेटून जावं. हा तर आपलाच मेळावा - राजवंशी माणसांचा!'

पंचाननबाबू गळा साफ करून संथपणे म्हणतात, 'हा मेळावा, संमेलन मुख्यत: राजवंशी माणसांचं आहे असं म्हणा: का, तर उत्तरबंगालमध्ये मुख्यत्त्वेकरून राजबन्शी लोकच प्राधान्याने आहेत. पण उत्तरखंड पक्ष हा सगळ्याच लोकांचा आहे. जे लोक कामतापुर नावाच्या स्वतंत्र्य राज्याच्या मागणीचं समर्थन करतात, अशा सर्वांचा हा उत्तरखंड पक्ष आहे.'

'नक्कीच, नक्कीच! आपण तिस्ता बंधाऱ्याच्या संदर्भात काही विचार मांडणार आहात का?' गयानाथ विचरतो.

'हो, हो. उत्तरबंगालच्या सगळ्याच प्रश्नांवर आम्हाला बोलायला हवं. आपली तर खूप जमीन गेली, नाही का?'

'तेच तर सांगायचंय्. त्याच्याच तर बाबतीत सरकारचा माझ्याशी कलकत्त्याच्या हायकोर्टात आणि जलपाइगुडीच्या कोर्टात मामला चालू आहे. कोर्टाने फॉरेस्ट-डिपार्टमेंटला स्टे-ऑर्डर दिली नाही. पण नुकसानभरपाईचा एक मामला मी जिंकलाय्. या संदर्भात मला हेच सांगायचंय्, की ज्या जोतदारांची जमीन आधी व्हेस्ट झालीय्, त्यांना आता बंधाऱ्यासाठी जी नवीन जमीन संपादन करण्यात आलीय, तिच्या समपरिमाणात जमीन सरकारने परत द्यायला हवी.'

पंचानन थोडा विचार करून म्हणतो, 'हा तर खूप चांगला प्रस्ताव आहे. पण या प्रस्तावात 'जोतदार' असं म्हणण्यात येऊ नये.'

'का बरं? जमीन तर जोतदारांचीच व्हेस्ट झालीय्', गयानाथ म्हणतो.

'ते बरोबर आहे. पण आमच्या पार्टीला सरकारचे लोक-कम्युनिस्ट लोक-जोतदारांची पार्टी असं म्हणतात. त्यामुळे आपण या प्रस्तावात किंवा बोलण्यात, भाषणात, 'जोतदार' न म्हणता 'कृषक' म्हटलं पाहिजे. आम्ही कृषकांच्या हिताची गोष्ट सांगतोय्.'

गयानाथ गप्प बसतो. शांत बसून त्याला हा शब्दार्थाचा गोंधळ समजावून घेतला

पाहिजे. आजपर्यंत तो असं ऐकत आलाय की कृषक म्हणजे पार्टीचे लोक, लाल पर्टीचे लोक. कृषक वेगळे, आणि जोतदार वेगळे. पण पंचानन मल्लिक म्हणताहेत की जोतदारांना कृषक व्हावं लागणार.

'पण ''कृषक'' हा शब्द तर कम्युनिस्ट पक्षाचे लोक वापरतात - ''कृषक समिती झिंदाबाद!'' ''कृषकांचे हक्क मिळाले पाहिजेत, मिळाले पाहिजेत!'' ''कृषकांवर अन्याय चालणार नाही, चालणार नाही!'

पंचानन घोष यांना या प्रश्नाचं उत्तर द्यायची सवय झालीय्, बहुधा हे त्यांना आवडलंसुद्धा- कृषक हा तर संस्कृत शब्द आहे. जे कृषिकार्य करीत असतात. ते कृषक जोतदार तर चोवीस तास कृषिकार्य करीत असतात. तुम्हाला जमीन कशासाठी हवी आहे? कृषि करण्यासाठी. त्याच कारणासाठी आम्ही स्वत:ला कृषक म्हणतो. कम्युनिस्ट लोक 'कृषक' शब्दाला मान देतात, आणि 'जोतदार' शब्दाला शिवी समजतात. उत्तरखंड पक्ष 'कृषक' या शब्दाचा अर्थ सर्वांना समजावून सांगणार. आम्ही तर कृषक आहेत- मग ते अधियार असोत, देउनिया असोत वा शेतमजूर असोत.'

हे समजून घेण्यासाठी गयानाथ थोडावेळ शांत बसतो. त्याला 'कृषक' हा शब्द खूप सन्मानाचा आणि 'जोतदार' शब्द शिवीसारखा वाटत नाही. त्याला जणू जोतदार रहायचंय्. उत्तरखंड पक्ष त्याला 'कृषक' व्हायला सांगणार यासाठी जणू तो तयार नव्हता.

असिन्दिर तक्तपोशीहून उठून येऊन म्हणतो, 'बापू, जे जोतदार आहेत, ते कृषक आहेत. उत्तरखंडाचे कृषक आणि लाल पार्टीचे कृषक एकच नव्हेत, वेगवेगळे आहेत.' असिन्दिरच्या नकारार्थी वाक्याला पंचानन डोकं हलवतात आणि होकारार्थी वाक्याला मान हलवतात. जणू, वाक्य असिन्दिरचं, हावभाव पंचाननबाबूंचे.

'पण लोकांना हे समजणार कसं? लाल पार्टी म्हणणार, ''कृषकांचा उच्छेद चालणार नाही!'' आपणही म्हणणार, ''कृषकांना न्याय- मिळालाच पाहिजे!'' त्यामुळं लोकांच्या डोक्यात तर सगळा गोंधळ होऊन जाईल. मी कृषक, माझा हा जावईही कृषक, आणि माझा नोकर बाघारूसुद्धा कृषक-हे कसं काय?'

'हे पहा गयानाथबाबू, आम्हाला तर एक पक्ष बांधायचाय्-उत्तरखंड पक्ष. त्याचा हेतू काय? पश्चिम बंगालमधून एका वेगळ्या राज्याची निर्मिती. कोणतं राज्य? कामतापूर राज्य. त्या राज्याच्या मागणीसाठी तर सगळ्या लोकांना यायला सांगायला हवं. राज्यात तर अनेक लोक रहातात. कृषक म्हटल्याने सगळ्यांच्या लक्षात येतं. जोतदार म्हटल्याने सगळ्यांच्या लक्षात येत नाही. पण लोक जेव्हा ऐकतील की उत्तरखंड पक्ष म्हणतोय् - व्हेस्ट जमिनीमधून बंध्याऱ्याची जमीन-बंधाऱ्याखाली गेलेली जमीन-परत द्या-तेव्हा सगळ्यांच्या लक्षात येईल की ज्यांची व्हेस्ट जमीन होती, अशाच लोकांबद्दल आम्ही

बोलतोय्.' गयानाथ आता डोकं हलवून म्हणतो, 'हं, हे मात्र अगदी बरोबर बोललात. माणसं आणावी लागणार. जोतदार म्हटल्यावर माणसं येणार नाहीत. आणि 'व्हेस्ट जमीन' म्हटल्यावर हे जोतदारांबद्दल बोलताहेत हे लोकांच्या लक्षात येईल.

'आता कसं बोललात! पण ही फक्त जोतदारांचीच गोष्ट नाहीय्, न्याय्य गोष्ट आहे, धर्माची गोष्ट आहे. पाच गावं दिली असती, तर कुरुक्षेत्रावर लढाई झाली नसती; आणि इथं सरकारने आधीच आपली इतकी सारी जमीन व्हेस्ट करून घेतली, नंतर पुन्हा इतकी जमीन बंधाऱ्यासाठी संपादित केली!' पंचाननबाबूंना महाभारतातलं उदाहरण देऊन काय समजावून सांगायचं होतं ते त्यांनाही समजत नाही आणि गयानाथला तर नाहीच नाही.

'आपल्या कामतापुरी राज्यात हा तिस्ता बंधारा रहाणार का?' गयानाथच्या या साध्या प्रश्नावर पंचाननबाबू गंभीर होतात. या प्रश्नाचं काय उत्तर द्यावं याचा विचार त्यांनी केलेला नव्हता. खरे तर गयानाथसारखा मोठा जोतदार उत्तरखंड पक्षात आल्यास त्याच्या हितासाठी तिस्ताबंधाऱ्याच्या संदर्भातला प्रस्ताव घ्यायलाच हवा. पण तो प्रस्ताव घेतल्यावरही, कामतापूर राज्यात तिस्ता बंधारा रहाणार नाही हे पंचानन आता कसं काय सांगणार?

पंचाननबाबू म्हणतात, 'बंधाऱ्याबद्दल तर आपला काही, आरोप नाही, तक्रार नाही. तुमची तक्रार आहे सरकारने जमीन अधिग्रहण केल्याबद्दल. कामतापुरात गरज पडल्यास तिस्तेवर बंधारा बांधावा लागेल, पण कृषकांच्या जमिनीचं अधिग्रहण मुळीच केलं जाणार नाही. नदीच्या जमिनीवरच नदीवर बंधारा बांधला जाईल.' इतक्या सुंदर प्रकारे उत्तर देऊ शकल्याने पंचाननबाबूंना आनंद होतो.

गयानाथ लगेच प्रश्न विचारतो, 'आणि, फॉरेस्ट डिपार्टमेंट? कामतापुरातही फॉरेस्ट डिपार्टमेंट असणार?'

पंचाननबाबूंनी उत्तर द्यायची जी पद्धत अंगिकारली आहे, ती पद्धत ते सोडत नाहीत- 'गयानाथबाबू, आमचं कामतापूर राज्य हे तर भारत देशामधलं एक राज्य म्हणून रहाणार. भारतातल्या सगळ्या राज्यांचे जे नियम आणि कायदे आहेत, ते कामतापूरमध्येही रहातील; पण ते कधीही कृषकांच्या विरुद्ध जाणार नाहीत, कृषकांच्या हितासाठीच रहातील.'

'कृषक म्हणजे लालपार्टीचे कृषक नव्हेत, उत्तरखंड पक्षाचे कृषकच आहे. हे पहा गयानाथबाबू, तुम्ही उत्तरखंड पक्षात आलात तर तो आमचा गौरव आहे. डूअर्समधले लोक, कुचबिहारचे लोक, तराईमधले लोक विचारताहेत, गयानाथबाबू का आले नाहीत आपल्या पक्षात? आपण तर कितीतरी पिढ्यांपासून जमिनीचा मालकीहक्क भोगणाऱ्यांमध्ये

केंद्रस्थानी आहात. आपण पक्षात येऊन आपलं म्हणणं सांगा - आम्ही त्यावर चर्चा करू, आपणही दहाजणांबरोबर बसा.'

थोडं शांत बसल्यानंतर गयानाथ म्हणतो, 'त्याच संदर्भात तर आपली भेट घ्यायला आलो. पण माझे तर एवढे कज्जेखटले चाललेयत् की ते साले मला पुढं जाऊ देत नाहीत. माझ्याऐवजी माझा जावई हा असिन्दिर उत्तरखंड पार्टीत येईल. मीसुद्धा आपलं सगळं करीन, पण पक्षात प्रवेश करण्याआधी दोन - चार महिने मला जरा पहायचंय्.'

'काय पहायचंय? आमचं कामकाज?'

'नाही, नाही. माझ्या कज्जे-खटल्यांचं काय होणार?'

'कज्जे-खटले चालतील त्यांच्या गतीनं. तुमच्या उत्तरखंड-पक्षात यायला त्यांचा अडथळा कुठला? तिस्ता धरणाबद्दल आम्ही आमच्या मेळाव्यात बोलावं अशी आपलीच इच्छा आहे ना? आपणच आला नाहीत, तर हा विषय कोण काढणार? त्याच्यावर काय बोलणार? बंधाऱ्याच्या संदर्भात तर आपणाला नेतृत्व द्यायची आमची इच्छा आहे. आपण आमचे नेते व्हा.'

असिन्दिर गयानाथशेजारी उठून म्हणतो, 'मी हेच तर सांगितलं बापूंना! म्हटलो, 'हे काय तुमचं लपून रहायचं वय आहे का व्हॉलंटियर व्हायचं वय आहे? तुम्हाला आता लीडर व्हायला पाहिजे''. लीडर व्हा ना बापू, लीडर व्हा!' गयानाथ जरा गप्प राहून म्हणतो, 'अच्छा, धरणाच्या संदर्भात मी येतो; पण बाकीचं सगळं काम असिन्दिर करील.'

त्यानंतर आणखी काही विचार करून म्हणतो, 'नाही, मी आलो तर मग असिन्दिरला वगळा. आम्ही दोघांनी मिळून तुम्हाला सहाय्य केलं तर सगळ्यांना वाटेल की आम्ही सरकारविरुद्ध युद्धाची घोषणा दिलीय्.'

'तसं असेल तर जावईबापूंना आमच्या सांस्कृतिक विभागाचा पार्टनर करून टाका.'

'तो काय प्रकार आहे?'

पंचानन दोन हात वर करून म्हणतो, 'एक काम करा. आपण घरी परत जा. दोनेक दिवसात मी आणि आमचे संपादक वीरेंद्रनाथ बसुनिया आपल्याला भेटू.'

## एकशे अठ्ठावन

# उत्तरखण्ड मेळावा आणि श्रीदेवीचा नाच

मयनागुडीत 'निखिल बंग उत्तरखण्ड समिती' च्या पहिल्या सम्मेलनाचं आयोजन झालंय्. पण ते उत्तरखंड समितीच्या मेळ्याव्यासाठी, की मेळाव्याच्या शेवटी प्रत्येक संध्याकाळी आयोजित केलेल्या सांस्कृतिक कार्यक्रमासाठी ते समजत नाहीय्, कारण

अद्याप समजण्याची वेळ आलेली नाही. पण सम्मेलन आणि सांस्कृतिक कार्यक्रम जेव्हा सुरू होतील तेव्हा सम्मेलनाची गोष्ट कुणाच्याहीलक्षात रहाणार नाही याचा आतापासून अंदाज येतोय. अर्थात् सांस्कृतिक कार्यक्रम चांगले यशस्वी झाले, तर तेसुद्धा उत्तरखंण्ड मेळाव्याचं यश मानलं जाईल. एवढ्यातच या सांस्कृतिक कार्यक्रमाचं नांव लोकांच्या तोंडी 'उत्तरखंड फंक्शन' असं झालंय्.

मेळाव्यात सामील होण्यासाठी पैसा द्यावा लागणार नाही - 'सगळ्यांनी गटा-गटांनी येऊन सहभागी व्हावे.' पण सांस्कृतिक कार्यक्रमाला मात्र तिकीट आहे-फर्स्ट क्लास पंधरा रुपये. सेकंडक्लास दहा रुपये, थर्डक्लास सहा रुपये. खुर्च्या देणगीदारांसाठी आणि पासधारकांसाठी. मेळावा होणार सकाळी आणि सांस्कृतिक कार्यक्रम संध्याकाळी. दोन दिवस 'नवरंग ऑपेरा' संस्थेची दोन नाटकं 'कुलटार कुल' (कुलटेचं कूळ) आणि 'प्रमोदतरणी.' या नाटकांमध्ये तीनजण सिनेमातले नट-नटी आहेत - सानू बॅनर्जी, अल्बर्ट सेन आणि मोना गुप्ता. मोना गुप्ता सिनेमातही नाचते, या जात्रानाटकातही नाचेल. त्यानंतर हिंदी-बंगाली गाण्यांचा कार्यक्रम आहे. त्यात मन्ना डे यांच्यापासून तर अनूप जलोटापर्यंतचे गायक आहेत. चित्रा सिंगही यायचीय् असं म्हणतात, पण अजून तिचं नक्की नाही. त्यानंतर कलकत्त्याच्या एका ग्रूप थिएटरचं एक सामाजिक नाटक आहे. नंतर एकदा संपूर्ण रात्रभर व्हिडिओवर चार सिनेमे दाखवणार आहेत. आणि शेवटच्या आणि सर्वात महत्त्वाच्या दिवशी - बॉम्बेची फिल्म आर्टिस्ट श्रीदेवी हिचा प्रोग्रॅम आहे. त्यानंतरच्या दिवशी सकाळी सम्मेलन व कार्यक्रम मंडपापासून एक विराट शोभायात्रा जल्पेश मंदिराकडं जाणार आहे. तिथे जल्पेश शिवासमोर शपथग्रहणाचा कार्यक्रम आहे.

उत्तरखंड मेळाव्यासाठी असा सांस्कृतिक कार्यक्रम होतोय् असं नाही. उलट मेळावा हीच गोष्ट इथे नवीन आहे, सांस्कृतिक कार्यक्रम तर दरवर्षी पूजा-नवरात्र उत्सवानंतर वर्षातल्या या काळात कुठे-ना कुठे होतच असतात. हे कार्यक्रम अनेक वर्षापासून होत असल्याने त्यांची एक संपर्क-व्यवस्थासुद्धा तयार झालीय्. आसामपासून परतीच्या मार्गावर डुयार्सच्या नाना ठिकाणच्या कलाकारांच्या वतीने किंवा कंपन्यांच्यावतीने लोक कार्यक्रम-संयोजकांकडे फेऱ्या मारायला सुरूवात करतात. डुयार्समध्ये कुठेतरी किंवा शिलिगुडी शहरात या प्रकारचे कार्यक्रम होतात. आयोजक व्यावसायिक दृष्टीनेच या कार्यक्रमांचं आयोजन करतात. त्यामुळे जवळजवळच्या ठिकाळी दोन कार्यक्रम होत नाहीत किंवा एकाच ठिकाणी सलग दोन वर्ष होत नाहीत. कार्यक्रम कुठेही होवोत, त्यात बडा कलाकार असेल, तर अगदी आसाम-बिहारपासून प्रेक्षक येतात. उत्तरखंड फंक्शनमध्ये श्रीदेवीच्या प्रोग्रॅमच्या दिवशी या सगळ्या ठिकाणांहून खूप लोक येतील - अशी आशा वाटतेय्.

उत्तरखंड मेळावा याच वर्षी प्रथम होतेय्, पण या सांस्कृतिक कार्यक्रमाचं नावच 'उत्तरखंड फंक्शन' असं होऊन गेलंय्. तेराजण एकत्र येऊन, शेअर्स विकत घेऊन फंक्शन करताहेत - त्यांच्याशी मेळाव्याचा थेट असा संबंध नाही. सांस्कृतिक कार्यक्रमाची पोस्टर्स उत्तरबंगालमध्ये सगळीकडे लावली आहेत - दार्जिलिंगपासून फराक्कापर्यंत, एवढंच काय, काही-काही पोस्टर्स बरहमपूरपर्यंत लावली आहेत. शिलिगुडी-डुयार्स-कुचबिहार अगदी पोस्टर-फलकमय झाली आहेत. तिस्ता पूल पार करून ज्या बसेस आसाममध्ये जातात, त्यांच्या मागे तर पोस्टर्स आहेतच, त्याशिवाय बंगाईगांव, चुटियापाडा, पाण्डू आणि गौहाटीत कापडी फलकही झुलताहेत. पुन्हा आसाममधून किशनगंज मार्गे पूर्णियाकडे जाणाऱ्या सगळ्या ट्रक्सवरतीही पोस्टर्स चिकटवली आहेत. पण ट्रक्स रती पोस्टर्स रहात नाहीत, फाटून जातात. म्हणून कलकत्त्याहून काही प्लॅस्टिकशीटस् छापून आणून ट्रक्ससमोर काचांवर लावली आहेत. किशनगंज - डालखोलाच्या रिक्षांच्यामागेही पोस्टर्स. असं म्हणतात, की फंक्शनच्या दोन दिवस आधी मयनागुडी आणि जलपाइगुडीतल्या रिक्षावाल्यांना श्रीदेवीचे फोटो छापलेले बनियान वाटणार आहेत.

आसाम, बिहार, पहाड, डुयार्सपर्यंत इतका प्रचार - आसामी, हिंदी, नेपाळी भाषांमध्ये. पाण्डूमध्ये ट्रायल म्हणून एक बंगाली फलकही टांगला होता. तो कुणी फाडला नाही हे पाहिल्यावर रेल्वे कॉलनीत आणखी काही फलक टांगण्यात आले. किशनगंजमध्ये हिन्दी पोस्टर्स आणि फेस्टून्स, डालखोलाच्या वळणावर हिंदी-बंगाली दोन्ही भाषांमधील पोस्टर्स आहेत - डूयार्समध्येही तशीच.

डालखोला फाट्यावर तीन दुकानांमध्ये, किशनगंजच्या सहा दुकानांमध्ये, पाण्डूमध्ये एका दुकानामध्ये, बंगाईगावच्या व्हीलर स्टॉलवर, चुटियापाडाच्या सिनेमा थिएटरवर, गौहाटीच्या तीन दुकानांमध्ये, अलिपूरदुवारच्या एका मिठाईच्या दुकानात आणि अलिपूरदुवार जंक्शनच्या एका ऑफिसात, दर्जिलिंगच्या एका ऑफिसात आणि दोन दुकानांत, कार्शियांगच्या टॅक्सी-स्टॅंडवर, शिलिगुडीत एअरव्ह्यू हॉटेलच्या वळणावर छत्रीखाली, जलपाइगुडीत निराला हॉटेलमध्ये, पूर्णियाच्या एका दवाखान्यात, कुचबिहार मध्ये अशा कार्यक्रमांच्या एका काँट्रॅक्टरकडे आणि डुयार्समध्ये नाना ठिकाणी तिकिट-विक्रीची व्यवस्था आहे. पण कार्यक्रमाच्या पाच दिवस आधी वरील सगळ्या ठिकाणांहून तिकिटं परत घेऊन फक्त एकाच ठिकाणाहून तिकिटविक्री होईल. या कार्यक्रमासाठी लक्ष-लक्ष रुपये खर्च करावे लागलेले आहेत. ते सगळे पैसे वसूल करून वर नफा मिळवायला हवा आहे. कार्यक्रमाचे आयोजक प्रचारावर जितका जोर देताहेत, तितकाच जोर तिकिटं सगळीकडं उपलब्ध होण्यावरही देताहेत. तिकिटामुळे कुणाला कार्यक्रमाला येता आलं नाही, असं होता कामा नये. कार्यक्रम सहा दिवसांचा असला, तरी सहाही दिवसांची तिकिटं

घेणाऱ्याला पैसे मात्र फक्त पाचच दिवसांचे द्यावे लागतील; पण ही सगळी व्यवस्था शेवटच्या दिवशी होणाऱ्या श्रीदेवीच्या कार्यक्रमासाठी आहे. श्रीदेवीचा नाच पहायला किती लोक येतील त्याचा हिशेब करणंही मुश्किल आहे. या शेवटच्या दिवशीच्या कार्यक्रमाच्या अमिषामुळेच बाकीच्या दिवसांची तिकिटं सहजपणे विकली जाताहेत. श्रीदेवीच्या कार्यक्रमाला आसाम-बिहार-डुयार्सहून जर लोक आले, तर जबरदस्त नफा होणार.

दूरच्या ठिकाणाहून येणारे लोक आपल्याच खर्चाने ट्रक्स किंवा बसेसमधून येतील. एवढंच काय, चहाच्या मळ्यांमधून येणारे लोक चहा-मळ्यांच्याच ट्रक्समधून येतील. पण जवळच्या सुमारे पंधरा ते तीस किलोमीटर्स त्रिज्येतील प्रदेशातून नियमित प्रेक्षक येतील-अशी आशा आहे. त्यातलेही बरेचजण बैलगाड्यांमधून येत असले, तरी कार्यक्रमाच्या शेवटी काही रस्त्यांवर काही दूरपर्यंत दोनेक बसेस जातील असं आश्वासन मिळालं, तर अनेकांना भरोसा वाटतो. त्यासाठी प्रायव्हेट बसेस आणि बाजारच्या बसेस चालवणाऱ्यांशी चर्चा चालली आहे.

या कार्यक्रमाला येण्यासाठी आसामात, बिहारमध्ये, दार्जिलिंगमध्ये, तराईमध्ये नानाप्रकारची व्यवस्था सुरू झालीय्. अनेकजण फक्त श्रीदेवीचा कार्यक्रम पहाण्यासाठी डी-लक्स बसने जितक्या लोकांना आणणं शक्य आहे, तेवढ्याच जणांची तिकिटं घेऊन जाऊन, तिकिटाच्या किंमतीत बस-भाडं वगैरे मिळवून होणाऱ्या रेटने तिकिटं विकताहेत. बसवाल्यांमध्ये ज्याप्रमाणे डी-लक्स बस आणि ऑर्डिनरी बस असतात, त्याप्रमाणे डी-लक्समध्येही व्हीडिओबस हा वेगळा प्रकार असतोच. ते जाण्या-येण्याच्या वेळी व्हिडिओवर श्रीदेवीचे सिनेमे दाखवणार आहेत. अंतराच्या प्रमाणात काही-काही बसेसमध्ये एकदा-जेवणाची व दोनदा अल्पोपाहाराची व्यवस्था आहे. काही-काही बसेमध्ये खाण्या-पिण्याची काही व्यवस्था नाही. त्याशिवाय अनेकजण स्वत:चा बस-ट्रक भाड्याने घेऊन येताहेत.

त्यामुळे, शेवटच्या दिवशीच्या कार्यक्रमाच्या वेळी संपूर्ण मायनागुडी शहर 'जॅम' होऊन जाण्याची शक्यता आहे. एवढसं शहर, रस्तेही अरुंद, एखादी गाडी जर अडकली, तर ती बाहेर काढणं अशक्य. त्यामुळे सगळं पोलिसांवर अवलंबून आहे. परवानगी तर घेतलीच आहे - पोलिसच वेगवेगळ्या मैदानांवर बस व ट्रक पार्किंगची व्यवस्था करून देतील, कंपनीला फक्त त्या मैदानात प्रवेश करायचा रस्ता तयार करून द्यावा लागेल. आसामहून येणाऱ्या गाड्यांना चौपत्तीच्या अलिकडेच गाड्या थांबवाव्या लागतील आणि बिहार किंवा तिस्ताब्रिजपलीकडून येणाऱ्या गाड्या पश्चिमेकडे पार्क कराव्या लागतील. मैदानं खूप मोठमोठी आहेत, ही जमेची बाजू. श्रीदेवीच्या नाचासाठी मयनागुडीसारख्या ठाणं लायकीच्या शहरात भारतीय पातळीवर व्यवस्था केली जातेय्-तिच्यामुळे आसामची

गाडी आणि बिहारची गाडी एकमेकींसमोर येणार नाही, डुयार्सच्या गाड्यांमध्ये तराईच्या गाड्या मिसळणार नाहीत सगळ्या गाड्यांची तोंडं जणू रहाणार श्रीदेवीच्या मंचाकडे, पण वेगवेगळ्या दिशांकडून.

## एकशे एकोणसाठ
# एक उपयुक्त चरित्र-संक्षेपाने

वीरेन्द्रनाथ बसुनिया यांना त्या दिवशी दुपारीच ठाण्याच्या बड्याबाबूंकडून आलेलं पत्र मिळालं. सांस्कृतिक कार्यक्रमाचे व्यवस्थापक म्हणून त्यांना कळवण्यात आलं होतं, की ज्या तेरा जणांनी आर्थिक जबाबदारी घेऊन या सांस्कृतिक कार्यक्रमासाठी अनुमतीची विनंती केली होती त्यांना जलपाइगुडी सर्किट हाऊसमधील सभेस उपस्थित रहाण्याबद्दल कळवण्यात आले आहे. या सांस्कृतिक कार्यक्रमाच्या मंडपात त्याचबरोबर 'निखिलबंग उत्तरखंड सम्मेलन' नावाने जो मेळावा होत आहे आणि ज्या मेळाव्याबद्दल सरकारला अद्यापपर्यंत काहीच कळवण्यात आलेलं नाही, त्यच्या संघटकांनाही सांस्कृतिक कार्यक्रमाच्या आयोजकांनी घेऊन यावे-या निर्देशनाबरोबरच असंही कळवण्यात आलंय् की माननीय पर्यटनमंत्री आणि वनविभागाचे राष्ट्रमंत्री दया करून या मीटिंगला उपस्थित रहातील.

पत्र दोनवेळा वाचून, ते खिशात ठेवून वीरेनबाबू पुन्हा आपल्या कोबीच्या शेतात वाकतात. हिवाळ्याच्या सुरुवातीला घराजवळच्या व मागे असलेल्या विस्तीर्ण जमिनीच्या फक्त काही भागातच वीरेनबाबू फूलकोबी, पानकोबी, पालक, मटार पिकवतात. त्यांच्याकडं काही गुरंही आहेत. त्यांचा गुराखीच या मळ्याकडं लक्ष देतो. वीरेनबाबू अगदी पहाटेच उठून पिकावर केळीच्या झाडाच्या सालांपासून तयार केलेली आवरणं टाकतात, आणि दुपारी चार-पाचच्या सुमारास ती आवरणं काढून घेतात. अलीकडं इतकं दंव पडतं, की अगदी कच्चं पीक संपूर्ण रात्रभर उघडं राहिलं, तर दवाने भिजून चिंब होतं. सकाळी आणि संध्याकाळी त्यांचा माणूस गुरांकडे असतो. त्याशिवाय फक्त तीनेक वर्षांपूर्वी सुद्धा वीरेनबाबू स्वत:च्या हातांनीच हे शेत करीत; पण तीन वर्षांपूर्वी छातीत श्लेष्मा झाल्याने आणि ब्लडप्रेशर वाढल्याने त्यांना जलपाइगुडी हॉस्पिटलमध्ये दहा दिवसांसाठी ॲडमिट् व्हावं लागलं होतं. हॉस्पिटलमधून बाहेर आल्यावर वीरेनबाबू पूर्वीसारखे कामावर परत गेले नाहीत-जावं असं त्यांना बहुधा वाटतही नव्हतं. त्यांची काही शेतजमीन आहे, तिच्यामधून वर्षभराचं अन्नधान्य मिळतं, सरकारची लेव्ही देऊनसुद्धा विकण्यायोग्य असं थोडं पीक उरतं. त्यांच्या चारही मुलींची लग्न झाली आहेत. थोरला मुलगा जलपाइगुडी

कॉलेजमधून बी. ए. करून घरीच असतो-जमीन जुमल्याकडे लक्ष देतो, एक तळं तयार करून सध्या मत्स्यशेतीचा व्यवसाय करतोय्. त्याला एकच कन्या आहे. धाकटा मुलगा कलकत्त्यात वकिली शिकतोय. आता नॉर्थ बेंगॉल युनिव्हर्सिटीतही लॉ फॅकल्टी झालेली आहे. आणि जलपाइगुडीतही लॉ कॉलेज आहे-संध्याकाळी कॉलेज करून अनेकजण रात्री मयनागुडीला परत येतात. पण, आपल्या मुलाला वकिली शिकायचीच असेल तर त्याने ती कलकत्त्यात शिकावी अशी वीरेन बाबूंची इच्छा होती. आपल्या त्या धाकट्या मुलासाठीच वीरेनबाबूंनी अद्याप आपलं ऑफिस ठेवलंय्, नाहीतर बहुधा वकिली सोडून देऊन ते घरी बसले असते. वकिली पेशाबद्दल वीरेनबाबूंना जितकी ओढ आहे, त्यापेक्षा अधिक ओढ त्यांना आपण जमवलेल्या अशीलांबद्दल आणि आपल्या कार्यालयाबद्दल वाटते. ते मयनागुडीत राहूनच सतत जलपाइगुडी कोर्टात प्रॅक्टिस करतात. आधी जलपाइगुडीत एक छोटं घर भाड्याने घेऊन त्यात रहात असत. तिस्ता पूल झाल्यानंतर त्यांनी घर सोडून दिलं. वीरेनबाबूंचं वकिली पेशावर प्रेम आहे. कायद्यातल्या सूक्ष्मातिसूक्ष्म खाचाखोचा त्यांना अगदी पक्क्या ठाऊक आहेत. बऱ्याचशा वकिलांना त्या ठाऊक नसतात, ठाऊक असण्याची आवश्यकताही भासत नाही. एवढंच काय, जज-कोर्टातही फक्त दोन-तीनच वकील कायद्याचा असा कीस काढतात. वकिलीची भाषा ठाऊक झाली, की साधारण वकिलाचं काम भागतं. पण वीरेबाबूंना फक्त जमिनाचा वकील व्हायचं नव्हतं, फौजदारी खटले ते उपजीविकेसाठी करीत-अधिकच करीत, पण त्यांना आपले अशील जमवायचे होते विशेषत: सिव्हिल केसेसच्या संदर्भात. आणि त्यातच त्यांना संपूर्ण जीवनात सर्वात अधिक अडथळे आले, जणू राजवंशी वकील म्हटला की त्याला डोकं जरा कमीच असतं-हाणामारीच्या केसेस जरी तो करू शकत असला, तर संपत्तीच्या मामल्यात त्याच्यावर विश्वास टाकून केसेस देणारे अशील मिळत नसत. राजबन्शी समाजातले लोकही त्यांच्याकडे आपल्या केसेस देत नसत. वीरेनबाबूंना आपल्या अगदी तरुण वयात पहिल्यांदाच एक मोठी केस मिळाली, ती बाकालीच्या गुलाम मुस्तफा यांच्याकडून. गुलाम मुस्तफा मुसलमान राजवंशी होते-जबरदस्त जोतदार, जलपाइगुडी शहराच्या नवीन भागातील 'बाकाली हाऊस' हा त्यांचा बंगला सर्वांना ठाऊक होता. जलपाइगुडी शहरातले मोठेमोठे वकील त्यांच्या केसेस चालवीत. त्यांनीच एके दिवशी वीरेनबाबूंना आपल्या बाकालीमधल्या घरी बोलावणं पाठवून, एका मामल्याची जबाबदारी देऊन म्हटलं, कुणाचाही ज्यूनियर म्हणून नव्हे, या केसची संपूर्ण जबाबदारी तुमची; पण तुम्हाला जर एखाद्या सीनियरशी चर्चा करायची असेल किंवा त्याच्याकडून ड्राफ्ट करवून घ्यायचा असेल, तर तो तुमचा प्रश्न. 'पण ही केस हरलेलं चालणार नाही, साल्यांना हायकोर्ट करावं लागलं तरी बेहत्तर, पण आपण ही केस जिंकली पाहिजे!' गुलाम मुस्तफा

साहेब हसून म्हणाले होते, चौकड्यांची लुंगी आणि स्वच्छ पांढऱ्या बनियानमध्ये ते लाकडी हातांच्या लांबलचक बेंचला टेकून, त्याच्या किनाऱ्यावर पिंक थुंकून म्हणाले होते, हो-हो करीत हसून पिंक थुंकून म्हणाले होते, 'हरायचं असेल तर आपले भाटिया वकील आहेत ना-नलिनी घोष, मक्बूल हुसेन, खगेन महालनवीस पण हा मामला मला आमच्या राजवंशी वकीलाकडे देऊन जिंकायचाय्- 'जिंकून या भाई, जिंकून या!'

मामला फारसा अवघड नव्हता-जिंकता येईल असाच होता. तेव्हांचे कायदेकानून खूपच सरळ होते. पण गुलाम मुस्तफासारख्या बड्या माणसाने त्यांना, वीरेन बसुनियांना, आपला मामला चालवायला दिला-तेव्हापासूनच त्यांच्या वकिलीचा पसारा वाढायला सुरूवात झाली. मुस्तफा साहेबच एकदा वीरेनबाबूंना म्हणाले होते, 'आपले लोक तुमच्याकडे केसेस का देत नाहीत, सांगा बरं!' त्यानंतर स्वत:च उत्तरले होते, 'हे कायदेकानून, कोर्टकचेरी - या सगळ्या गोष्टी भाटिया लोकांनी तयार केलेल्या आहेत. त्या सगळ्यांना वाटतं हे सगळे कज्जेखटले भाटिया लोकांनाच चांगले समजतात, तुम्हा राजबन्शी लोकांना जजसाहेबांसमोर धड इंग्लिशमध्ये बोलता कसं येणार?' मुस्तफासाहेब बरेच दिवस पाकिस्तानात गेले नाहीत, बहुधा जायचं नाही असंच त्यांनी ठरवलेलं असावं, पण सत्तावन्न सालच्या एका छोट्या दंग्यानंतर अचानक सगळी मालमत्ता विकून निघून गेले. मुस्तफा साहेबांच्या वरदहस्तामुळेच वीरेनबाबूंची वकिली वाढलीय्. मुस्तफासाहेब काही दंग्यामुळे पाकिस्तानला गेले नाहीत असं त्यांना वाटतं. इंडियात जोतदारी-जमीनदारीचे दिवस संपत आले आहेत असं अचानक मुस्तफासाहेबांच्या लक्षात आलं असावं. पण ही गोष्ट वीरेनबाबूंनी कधीच कुणाला सांगितली नाही. पण अद्यापही त्यांची मनोमन हीच खात्री आहे की मुस्तफासाहेब प्रथमत: होते एक जोतदार, द्वितीयत: होते एक राजवंशी आणि तृतीयत: होते एक मुसलमान. नाहीतर त्या लीगच्या अंमलात मुस्तफांसारखा एखादा मुसलमान किमान डिस्ट्रिक्ट बोर्डाचा चेअरमन होऊ शकला असता, पण लीगमध्ये प्रवेश न करताच मुस्तफासाहेब निघून गेले. एकदा ते वीरेनबाबूंना म्हणाले होते, 'तुम्ही 'क्षत्रिय समिती' तयार केलीय, चांगलं आहे, पण जरा पहा बरं तुमच्या महाभारतात मुसलमान क्षत्रिय आहे की नाही - नसला तर आम्ही जाणार कुठं - आम्ही मुसलमान, आम्ही जाणार कुठं, सांगा!'

वीरेनबाबूसुद्धा मुळात प्रथमत: एक राजवंशीच आहेत का? नाहीतर मग उत्तरखण्ड पक्षाने जेव्हा त्यांना व्यवस्थापक करून या मेळाव्याची व्यवस्था केली, तेव्हा ते कबूल का झाले? पुन्हा, नागरिक कमिटिचेही तेच व्यवस्थापक आहेत- ही नागरिक कमिटीच सांस्कृतिक कार्यक्रमाची व्यवस्था करतेय्. नाहीतर ते अजूनही आपल्या धाकट्या मुलासाठी आपलं कार्यालय चालू ठेवून नियमित कोर्टात जातात कशासाठी - त्यांचा

मुलगा बहुधा मयनागुडी किंवा जलपाइगुडीत राहून प्रॅक्टिस करणार नाही, बहुधा कलकत्त्यातच स्थायिक होईल हे ठाऊक असूनही? तो कलकत्त्यात स्थायिक व्हावा असं जणू वीरेनबाबूंना वाटतंयसुद्धा-नकळत वाटतंय्. आजकाल जवळजवळ कुठल्याही केसचा जजकोर्टात सोक्षमोक्ष लागत नाही-सगळ्या केसेस हायकोर्टापर्यंत चालतात. असं जर असेल, तर एखादा राजवंशी वकील त्यांच्या ह्या सध्याच्या अशीलांच्या केसेस घेऊनच आपली प्रॅक्टिस सुरू करू शकतो- आपल्या त्याच भावी ॲडव्होकेट मुलासाठी वीरेनबाबूंनी हे अशील अद्याप बांधून ठेवले आहेत.

वीरेनबाबू कोबीच्या सगळ्या रोपांवर झाकण घालणं पूर्ण करतात. काम करायला त्यांना थोडा वेळ लागतो. उभं राहून, कमरेत वाकून काम केल्यास लवकर झालं असतं, पण त्यामुळे त्यांची कंबर दुखते. म्हणून ते गुडघे वाकवून उकिवडे बसतात. आणि सरकत जातात. त्यामुळेही गुडघ्यांत दुखतं. पण एकेक रांग पूर्ण करून उभं राहून पाय ताठ केल्यावर दुखणं थांबतं.

वीरेनबाबूंनी आपल्या जमिनीच्या दोन छोट्या तुकड्यांवर आता पालेभाजी लावलीय् - बाकीची जवळजवळ दीडेक बिघा जमीन तर गोठा वगैरेंसह पडूनच असते. अर्थात् अलीकडे या बाजूला एक नवीन व्यवसाय सुरू झालाय्. ज्यांची अशा मोठ्या जमिनीवर घरं आहेत, त्यांच्याकडं भाजीपाला पिकवणारे शेतकरी येतात आणि वर्षभरासाठी जमीन मागतात. सगळा खर्च शेतकऱ्याचा. जो भाजीपाला पिकेल, त्याचा काही भाग जमीनमालकाचा. किती भाग जमीनमालकाचा आणि किती शेतकऱ्याचा ते अद्याप ठरलेलं नाही, कारण जमीन द्यायची असेल, तर प्रत्येकजण वेगवेगळ्या हिशेबाने देतो. कुणी अधिभागाने देतो- त्यामुळे अर्थात शेतीचा खर्चही बारा आणे-चार आणे असा वाटला जातो. वीरेन बाबूंकडेही असा प्रस्ताव घेऊन दोन-तीन वर्षांपासून माणसं येताहेत; पण वकिली बुद्धिमुळे त्यांनी ते प्रस्ताव स्वीकारले नाहीत. एकाच जमिनीत सलग दोन-तीन वर्षे एकाच शेतकऱ्याने भाजी पिकवली, तर त्याचा एक घनिष्ठ संबंध तयार होतो, आणि मग त्याला एकदम झटकून टाकता येत नाही. शिवाय त्यांना तेवढी गरजही नाही. पण ज्यांना गरज असते - आधी श्रीमंत कुटुंब होतं, आता नाना कारणांमुळे जरा पडता काळ आला आहे, पण घर दोन-तीन बिघे जमिनीवर आहे - अशा लोकांसाठी हा एक उपजीविकेचा मार्ग आहे. वीरेनबाबूंनी प्रत्यक्षच काही गोष्टी पहिल्या आहेत. एक: दोन-चार वर्षांमध्येच शहरातल्या घरांजवळच्या या सगळ्या जमिनीवर भाज्या पिकवणाऱ्या शेतकऱ्यांचा वावर अश्विन महिन्यापासून माघ महिन्याच्या अखेरीपर्यंत कायम होऊन जातो. आणि, दोन: या शेतकऱ्यांना अर्थसहाय्य देतात, ते डुयार्स आणि जलपाइगुडी-सिलिगुडी इथले कच्च्या पालेभाज्यांचे मोठमोठे आडतदार. वीरेनबाबूंचा असा अंदाज

आहे, आणखी दोनेक वर्षांतच इथे बटाट्यांची लागवड होईल. बटाटे बरेच दिवस ठेवता येतात. कोल्ड स्टोअरेजही होईल. जुन्या घरांच्या आसपास काहीजणांची दोन-तीन बिघे जमीन असते. अशी घरं बहुधा चौदा-पंधरा आणे राजवंशी लोकांचीच आहेत. मयनागुडीसारख्या शहरात जर या घरांभोवतालच्या जमिनीवर-वास्तुजमिनीवर-भाजीपाल्याची शेती होत राहिली, तर दहा वर्षांच्या आत वास्तुजमिनीचा हा भाग विकून टाकावा लागेल. पूर्वी जलपाइगुडी शहरात जितकी राजवंशी कुटंबं रहात, तितकी आता रहात नाहीत. मयनागुडीतही वास्तुजमिनीची मालकी वेगाने कमी होत जाईल. जलपाइगुडी शहरातील राजवंशी घरांचं प्रमाण घटण्याचं एक प्रमुख कारण म्हणजे तिस्ता ब्रिज आणि बसेस, मिनी-टॅक्सीजच्या संख्येत झालेली मोठी वाढ. पूर्वी जलपाइगुडी शहरात जाण्यासाठी नावेने तिस्तानदी पार करून, चालत, पुन्हा पोहत; टॅक्सीत दाटीवाटीने बसून जावं लागे. तरीही शाळा, कॉलेज, हॉस्पिटल, कोर्ट ही सारी जलपाइगुडीत. तेव्हा शाळा म्हणजे यज्ञेश्वर राय यांची रांगालीबाजनाची शाळा, दोहामनीचं रेल स्कूल आणि मयनागुडीची शाळा. आणि आता कॉलेजही एक फालाकाटाला आणि एक धूपगुडीला. शाळेची तर बातच नाही. जलपाइगुडीमध्ये मुलामुलींना शिकण्यासाठी ठेवायला एखादी भाड्याची खोली घेणं हा खार्चिक प्रकार होता. तो खर्च उगाच कोण करणार? वीरेनबाबूंचंसुद्धा शहरात आधी एक घर होतं, आता नाही. यावरून जलपाइगुडीतील राजवंशी घरांच्या घटत्या प्रमाणाचं कारण लक्षात येतं.

पण, यापैकी कुठलंही कारण मयानागुडीत नाही. ही अशी जंक्शन ठिकाणासारखी जागा आहे मयनागुडी - इथून शिलिगुडीमार्गे पहाड-बिहार, धूपगुडीमागे आसामपर्यंत काही तासांमध्ये माल पाठवता येतो. अशा जागी जुनी राजवंशी कुटुंब आपल्या दोन बिघे-चार बिघे जमिनीपैकी मोठा भाग देऊन टाकून फक्त एक-दोन पत्र्याच्या खोल्यांमध्ये रहात असतील, तर कच्च्या भाज्यांचे आडतदार ते कशाला चालू देतील? फक्त रोख पैशाचं आमिष दाखवूनच ते या जमिनी हडप करतील! अजून त्यांनी हडप केलेल्या नाहीत खऱ्या, पण गेल्या-पंचवीस वर्षांच्या प्रॅक्टिसच्या अनुभवातून वीरेनबाबूंना ठाऊक होतं, की मयनागुडी, धूपगुडी, फालाकाटा यांच्यासारख्या गावातल्या भूसंपत्तीच्या मालकीमध्ये लवकरच बदल होणार आहे, ती अवस्था अगदी जवळ आली आहे. अगदी सात-आठ महिन्यांच्या गर्भार बाईसारखी. डूयार्समध्ये राजवंशी अल्पसंख्यांक बनतील - संपत्तीच्या मालकी संदर्भातसुद्धा. हे थांबवणं कायद्याच्याही हातात नाही - यावर एकमेव उपाय म्हणजे सगळ्या राजवंशी लोकांना एकत्र संघटित करून आसामसारखं एखादं आन्दोलन उभारणे. तसं झालं, तर गोंधळाच्या भीतीमुळे आत्ताच कुणी भूसंपत्ती खरेदी करू इच्छिणार नाही. पण यातूनही समस्येचं कायमचं असं उत्तर मिळणार नाही; समस्या कायमची सुटणार

नाही. ही समस्या कायमची सोडवण्यासाठी आसामप्रमाणे 'परप्रांतीयांना हाकलून लावा' - 'विदेशी खेदाओ' - असं एखादं आन्दोलन बहुधा केलं जाणार नाही, पण, राजवंशी माणसाकडून त्याची संपत्ती मालमत्ता कुणी अराजवंशी माणूस विकत घेऊ शकणार नाही, असं काहीतरी करता येऊ शकतं. म्हणजेच आदिवासी जमातींच्या प्रदेशातला हा नियम जलपाइगुडी आणि डुयार्समध्येही लागू करायला हवा. त्याचा आशयच राजवन्शी प्रदेशासाठी काही प्रमाणात स्वातंत्र्याची मागणी असा होतो. त्याला नांव सध्या 'उत्तरखंड' असं दिलेलं आहे. ते नांव नंतर बदलूही शकेल. पण मग राजवन्शी किंवा उत्तरबंगालमधल्या आदिवासींच्या हितरक्षणासाठी दुसरा कुठला विकल्प आहे? नसेल, तर हे मान्य करायला हवं, की साऱ्या देशात जे होतंय् तेच इथेही होवो; तिथे राजवन्शी लोकांचा मुद्दा वेगळेपणाने कशाला मांडायचा? वीरेनबाबूंचं भाजीच्या शेतीतलं काम संपलं. ते तिथूनच विहिरीजवळ गेले. पाणी काढलेलंच होतं, एका गडव्यात पाणी घेऊन त्यांनी थोडं तोंडावर मारलं, थोडं पायांवर. बारा पायऱ्या चढून त्यांना व्हरांड्यात चढावं लागतं. पूर्वीची घरं अशी दीड मजल्यांसारखी उंच असत. वाघांच्या भीतीमुळेच ती अशी उंच बांधली जात, असं वीरेनबाबूंनी ऐकलंय्. लाकडी घरं रात्री शिडी काढून टाकीत. पण त्यांच्या काळातच तर लाकडी घरं बदलून विटांची घरं झाली, काही लोकांनी घरं अशी उंचावर बांधली नाहीत. एकेका प्रकारच्या घरात रहायची सवय होऊन जाते. वीरेनबाबूंना अशा उंचावरच्या घरात रहायची सवय आहे.

व्हरांड्यातल्या तारेवर त्यांचा गमछा होता, त्याने तोंड आणि पाय पुसून वीरेनबाबू घरात शिरतात. बागेचं काम करताना धोतर जरा वर बांधलेलं होतं, आता ते त्यांनी खाली सोडलं. त्यानंतर अंगात गरम कापडाचा झब्बा घालून, पम्पशू घालून, बाहेर येऊन जरा मोठ्या आवाजात पत्नीला म्हणाले, 'मी उत्तरखंडला चाललोय.' मेळावा आणि सांस्कृतिक कार्यक्रमाची जागा या दोन्ही सध्या याच नावाने ओळखल्या जातात.

अचानक सरकारचं पत्र मिळाल्यामुळे आपल्या वकिलीच्या काळातील आठवणी, आपल्या धाकट्या मुलाच्या कलकत्ता हायकोर्टातील प्रॅक्टिसचं स्वप्न आणि जलपाइगुडीतल्या डुयार्समध्ये राजवन्शी लोकांच्या मालमत्तेत होत चाललेली घर या गोष्टी एकामागोमाग एक अशा त्यांच्या मनात आल्या, असं नाही. उत्तरखंड आणि श्रीदेवीच्या कार्यक्रमाचे व्यवस्थापक ते कशासाठी झाले - या आठवणीसह त्यांच्या अपेक्षांच्या कारणांचीच जणू ही सूची होती. या सगळ्या गोष्टी वीरेनबाबूंच्या मनात एकाच वेळी या वृत्तांताची गरज म्हणून, योग्य त्या वेळी आलेल्या नाहीत. वीरेनबाबूंची स्वत:ची कहाणी, राजवन्शी असूनही वकील म्हणून मिळवलेल्या प्रतिष्ठेची कहाणी हासुद्धा खरं तर एका वेगळ्या वृत्तांताचा विलोभनीय विषय होऊ शकतो. त्यांच्यासरखा माणूस उत्तरखंडासारख्या

आंदोलनात कशासाठी उडी घेतो याची कल्पना देण्यासाठीही वीरेनबाबूंबद्दलच्या या सगळ्या गोष्टी इथे आलेल्या नाहीत. परंतु, ज्यांनी आपलं सारं कर्मजीवन जिल्ह्याच्या गावी, जिल्ह्याच्या राजकारणात आणि प्रशासनामध्ये घालवलंय, अशा वीरेनबाबूंसारख्या वकील असलेल्या वयस्कर गृहस्थांपुढे, दारोगाने हे पत्र त्यांना कसं व का लिहिलं असावं याचा अर्थ पत्र मिळाल्याबरोबर अगदी पाण्यासारखा स्पष्ट होतो.

मेळावा आणि सांस्कृतिक कार्यक्रम यांच्यामध्ये गोंधळ-गडबड करून मेळावा उधळून लावायचा, पण सांस्कृतिक कार्यक्रम होऊ द्यायचा, अशी सरकारची इच्छा आहे. डाव्या आघाडीचं सरकार आणि त्याला समर्थन देणारे पक्ष यांना बॉम्बेच्या कुणा श्रीदेवी नावाच्या सिनेमातल्या छबेलीच्या नाचापासून काहीच धोका नाही. पण राजवंशी लोकांचं वेगळं असं एकत्र बसून चर्चा करणं फार म्हणजे फारच धोकादायक आहे - 'अतिरेकी', 'फुटीरतावादी' आहे. वीरेनबाबू फारच कमी बोलतात, म्हणूनच असं पत्र मिळाल्यावरही ते बंडीच्या खिशात ठेवून फुलकोबीच्या रोपांवरून केळ्यांच्या झाडांच्या आवरणांपासून केलेली झाकणं काढण्याचं काम अव्याहत ठेवून, पत्राची उपेक्षा आणि अपमान करून ते स्वत:च्या खूप-खूप प्राचीन अशा उपेक्षा व अपमानांचा धांडोळा घेतात. त्यांच्या जीवनातील या बातम्या सगळ्या उपेक्षा-अपमानांशी संबंधित आहेत.

## एकशे साठ

# उत्तरखंड फंक्शनबद्दल चर्चा - एक

वीरेनबाबूंना घरापासून मेळावा आणि कार्यक्रमाच्या जागी पोचण्यासाठी बरंच चालावं लागतं. ते चालतच जातात, रिक्षा करीत नाहीत. पण चालण्यासाठी हा रस्ता आता चांगला राहिलेला नाही. सतत ट्रक्स, बसेस आणि मिनि-बसेस जात असतात. रस्ताही अरुंद, कडेला दुकानं झाल्यामुळे तो आणखीच अरुंद झालाय्. दोन्ही बाजूंना पादचाऱ्यांसाठी फारशी जागा रहात नाही. कार्यक्रमाचा मंडप ब्लॉक ऑफिसजवळ तयार होतोय्. आता अगदी पूर्ण बळ वापरून काम चाललंय्. - सगळेजण तिथेच भेटतील. तरी जाताना वीरेनबाबूंनी मरणचंदच्या दुकानात एकदा डोकावून पाहिलं - बरेचदा संध्याकाळी सगळे इथं बसतात, पण आता कुणीही नव्हतं.

मंडपात नकुल भेटला. तो तिथे भेटेल असं वाटत होतंच. नकुलला सांगितलं, तर तो धावपळ करून सगळ्यांना जमा करील.

झब्ब्याखाली बंडी, बंडीच्या खिशात पाकीट. त्या पाकीटातून चिठ्ठी बाहेर

काढण्यासाठी वीरेनबाबूंना थोडा वेळ लागणार. पण वीरेनबाबूंना प्रत्येक कामासाठी थोडासा वेळ द्यायची सगळ्यांनाच सवय झाली आहे.

वीरेनबाबूंना पाहून 'या, काका' म्हणून नकुल सिगारेट फेकून ती पायाखाली चिरडतो आणि घडी घातलेली एक खुर्ची उघडून वीरेनबाबूंना देतो. चिठ्ठी बाहेर काढून ती नकुलला देता-देता वीरेनबाबू बसतात. चिठ्ठी न घेता नकुल विचारतो, 'काय काका, आता या वयात मला वर्गातून पळायला शिकवणार की काय? आठवीत मी वर्गाच्या खिडकीतून जे पळालो, ते परत आजतागायत कधी देवी सरस्वतीसमोर उभा राहिलो नाही. अहो, मला टेंडर नोटीस वाचता येत नाही आणि आपण मला पत्र दाखवताहात? मा सरस्वतीला माझी शरम वाटेल, म्हणून सरस्वतीपूजेच्या दिवशी उपाशी राहतो, पण तिला नैवेद्य दाखवीत नाही मी.'

वीरेनबाबू पत्रासहित हात कमरेवर ठेवून नकुलच्या पोटाकडे पहात म्हणतात, 'जलपाइगुडीला सर्किट हाऊसमध्ये मिटींग आहे, नॉर्थ बेंगॉलचे मंत्री असतील. तुम्हा तेरा जणांना उपस्थित रहायला हवं आणि उत्तरखंडाच्या लोकांना बरोबर न्यायला हवं.'

'म्हणजे? कधी?' नकुल जणू आकाशातून पडतो, 'त्या दिवशी ठाण्याच्या मिटिंगमध्ये गोंधळ मिटला नाही? त्यानंतर तर आणखी काही कळवलं नाही, काका? आता फंक्शन तर चार दिवसांवर आलंय् - आणि आता मिटिंग? मंत्री येणार?' नकुल थांबतो, दोन पावलं चालतो, परत येतो, त्यानंतर विचारतो, 'कधी?'

'परवाच्या दिवशी.' उत्तर दिल्यानंतरही वीरेनबाबू पाकिटातून पत्र काढून ते उघडून खात्री करून घेतात आणि परत पत्राची घडी घालून ते पाकिटात ठेवतात.

'परवा? म्हणजे बुधवारी? आणि शनिवारी उद्घाटन? अर्थ काय या सगळ्याचा? हवंय काय त्यांना?'

वीरेनबाबू नकुलला थांबवण्यासाठी हात वर करतात. नकुल थांबल्यावर परत त्याच्या पोटाकडे पहात वीरेनबाबू म्हणतात, 'उत्तेजित होऊ नकोस. सरकारचा हेतू स्पष्ट आहे. उत्तरखंड मेळावा होऊ द्यायचा नाही. तरीही सुरुवातीचे कार्यक्रम होऊ द्यायला सरकारची हरकत नाहीय्. सरकारला शेवटच्या दिवशीची जल्पेश्वर मोहीम आणि तिस्तामाईची पूजा अडवायची आहे. तेव्हा उद्घाटनाची वगैरे काळजी करू नका.' सुताराच्या हातोडी ठोकण्याच्या आवाजाने वीरेनबाबू थांबतात. नकुल त्या बाजूला पाहून ओरडतो, 'अरे तुमची हातोडी थांबवा बरं जरा!' हातोडीचा आवाज थांबल्यावर वीरेनबाबू म्हणतात, 'आधी फंक्शनचे आणि कॉन्फरन्सचे जे रियल लीडर्स आहेत, त्यांनी बसावं, शक्य झालं तर आज रात्रीच आणि तिथेही बसू शकता. अर्थात्, जे काहीजण अव्हाइलेबल असतील, त्यांनी बसावं. त्यानंतर तुम्हा तेरा जणांची आणि उत्तरखंड पार्टीच्या

एक्झिक्युटिव्ह कमिटीची एक जॉइंट मिटिंग व्हायला हवी - उद्या दुपारीच. तिथे फॉर्मल निर्णय घ्यायला हवा - नाहीतर जे या परवाच्या मिटिंगला जातील, ते बोलणार तरी काय?'

नकुल अचानक हात जोडून गुडघ्यांवर बसतो, 'काका, मला यातून सोडून द्या. हे मिटिंग-बिटिंग, निर्णय-बिर्णय म्हटलं की माझं डोकं गरगरतं. निघालो मी. आतापर्यंत या कामासाठी जे पैसे मी दिलेत ते मला परत नको आहेत - मला एखादं टेंडर मिळालं, तर सरकारकडून त्याच्या दसपट रक्कम मी वसूल करून घेईन. पण ही मिटिंग-प्रस्ताव वगैरे मी काही करू शकणार नाही काका. जरा मजा करायला म्हणून आलो, पण हे तर सालं मिटिंगमध्ये गुंतायलाच लागलोय,

वीरेनबाबू गप्प राहिले, मंडपात वेगवेगळ्या ठिकाणी आणखी जे दोनचारजण होते, ते हातोडीचा आवाज थांबल्यावर नकुलचा आरडाओरडा ऐकून पुढे येतात. नवीन दुरूनच विचारतो, 'काय झालं? नकुलदांनी स्वत:च जात्रानाटक सुरू केलं की काय?'

आता नकुल उभा राहून, त्याच्याकडे वळून म्हणतो, 'आता तुम्ही आहातच, भाई-उत्तरखंड-श्रीदेवी यांचं काय वाटेल ते करा - मला मोकळं करा भाऊ त्याच्यातून - माझी हौस फिटली!'

तोपर्यंत ते सारे नकुलपर्यंत पोचले. काय झालं ते परत विचारण्याची आता गरज नाही. परंतु वीरेनबाबू गप्प असल्याने नकुललाच बोलावं लागलं - परवाच्या दिवशी जलपाइगुडीच्या सर्किट हाऊसमध्ये मंत्र्यांनी मिटिंग बोलावलीय्, उत्तरखंड आणि हे फंक्शन याबद्दल चर्चा होणार आहे. सर्वांना मीटिंगला जायला हवं.'

नवीन बरोबर तिलक होता. तो विचारतो, 'काय चर्चा होणार?'

'दुसरी काय चर्चा होणार! गव्हर्नमेंटला वाटतंय की उत्तरखंड मेळावा होऊ नये, पण श्रीदेवीचा कार्यक्रम व्हावा!'

काहीतरी बोलण्यासाठी वीरेनबाबू चेहरा उचलतात, पण त्या आधीच तिलक म्हणतो, 'उद्याच पेपरमध्ये एक जाहिरात द्या, की सरकारच्या आदेशावरून श्रीदेवीचा कार्यक्रम रद्द करण्यात आला आहे. आम्हाला त्याचे काहीही कारण देण्यात आलेले नाही. ज्यांना कारण ठाऊक करून घ्यायचे असेल त्यांनी मंत्र्यांकडे जावे-जाहिरात आली की लग्गेच लोक मंत्र्याना श्रीदेवीचा नाच नाचायला लावतील - एकदम मिस्टर इंडिया!' यावर जो एक सामान्य असा हशा उमटतो, त्यानेही तिलकच्या बोलण्यातला दबलेला संताप दबून रहात नाही. पण तिलकचं बोलणं ऐकल्याबरोबर वीरेनबाबू तिलकच्या चेहेऱ्याकडे पहातात. जणू, असा पर्याय देणं कितपत व्यवहार्य आहे असं त्यांना विचारायचंय्.

वीरेनबाबू हात वर करतात, सगळे त्यांच्या जरा जवळ जातात. वीरेनबाबू सरळ

पहात आपल्या खालच्या आवाजात म्हणतात, 'हे पहा, परवा सकाळी मीटिंग, मंत्री असतील, मीटिंगमध्ये ते नक्कीच निर्दिष्ट प्रस्ताव मांडतील, तुम्हाला त्या प्रस्तावाच्या उत्तरात निर्दिष्ट गोष्टी बोलाव्या लागतील, हो किंवा नाही, किंवा निर्दिष्ट प्रस्थाव मांडावा लागेल. तुम्हाला तुमची सर्वांची मीटिंग घेऊन एक लेखी निर्णय घ्यावा लागेल, की या मंडपात उत्तरखंड मेळावा घेऊ देण्यास जर सरकारने हरकत घेतली, तर श्रीदेवीचा कार्यक्रम, म्हणजेच कल्चरल फंक्शन, होणार की नाही. एकेकाजणाने एकेक मत मांडून चालणार नाही. या मीटिंगमध्येही एकेकजणाने एकेका प्रकारे बोललेलं चालणार नाही. आता एक लिस्ट करून ज्यांना ज्यांना कळवता येईल, त्यांना खबर द्या.'

नकुल नवीनला म्हणतो, 'ए, लिस्ट तयार कर, नवीन!'

नवीन वीरेनबाबूंना म्हणतो, 'काका, आम्ही जर त्या मीटिंगला गेलो नाही तर काय होईल?'

वीरेनबाबू चेहेरे वर करून नवीनला पहातात जणू त्यांना विचारायचंय, की हा पर्याय कितपत व्यवहार्य आहे?'

नवीन पुढे म्हणतो, 'काय करावं? पोलीस येऊन उत्तरखंड मेळाव्याला आडकाठी आणणार आणि श्रीदेवीला सोडून देणार - असं झालं तर कसं काय करणार? त्यांनी प्रस्ताव केला, तर करोत, आम्ही गिरफ्तार होऊ.'

वीरेनबाबू अचानक उठून उभे राहिले, 'तर तुम्ही लिस्ट तयार करून खबर द्या. आणि त्यांनाही मीटिंगला यायला सांगा,' हे ते नकुललाच म्हणाले, 'तुम्ही रात्री माझ्या घरी या. काय झालं ते ऐकेन.' नकुल जवळच येरझारा घालतो, बाकीचे त्याच्या मागे-मागे. वीरेनबाबू अचानक थांबून नकुलला म्हणतात, 'हे बघ नकुल, ''उत्तरखंड मेळाव्यातील शेवटच्या दिवशीची जल्पेश्वर मोहीम वेगवेगळ्या ठिकाणी घेतली जावी'' असं तुम्हा तेरा पार्टनर्सपैकी कुणीही म्हटलेलं योग्य होणार नाही.'

नकुल थोडावेळगप्प रहातो, जणू तो वीरेनबाबूंना कल्पना देऊ पहातोय की असा विचार काहीजण करूही शकतात. पण नीरवतेचा भंग करून तो म्हणतो, 'ते आधी झालं असतं तर विचार करता आला असता, ठाण्याच्या मीटिंगमध्ये झालं असतं तर काहीतरी झालं असतं. पण आता झालं तर वाटेल की सरकार बळ वापरून उत्तरखंडाला शिक्षा देतंय् आणि आम्ही त्यांना संधी उपलब्ध करून दिली. सगळेजण सगळ्या ठिकाणी एकाच वेळी काम करताहेत, कोणतं उत्तरखंड आणि कोण श्रीदेवी हे कोण ठरवणार? आणि तसं झालं तर काय करणार काका, आता ते होणार नाही.'

## एकशे एकसष्ट

# उत्तरखंड फंक्शनबद्दल चर्चा-दोन

वीरेनबाबू घरी रात्री साडेनऊच्या सुमारास नकुल, जगदीश, सुरेन, नवीन, तिलक आणि तरणीबाबू येऊ शकले.

वीरेनबाबूंची मधली खोली हीच त्यांची कार्यालयाची खोली होती. तिथे वकिलीची कागदपत्रे ठेवलेल्या टेबलासमोर चारेक लाकडी खुर्च्या, आणि एका बाजूला एक लांबलचक बेंच-पाठ आणि हात असलेला. वीरेनबाबू दिवे लावून पहुडले होते, हे लोक खोलीत आल्यानंतरही ते नजर उचलत नाहीत. पण हे लाक खुर्च्या आणि बेंचवर बसल्यानंतर पुस्तकात खुणेसाठी कागद ठेवून, पुस्तक बाजूला ठेवून ते बेंच आणि खुर्च्यांवर बसलेल्या साऱ्यांना पाहून घेतात.

नकुल म्हणाला, 'वेणीबाबूंची प्रकृती ठीक नाही म्हणून ते येऊ शकले नाहीत. उद्या मण्डपाची मीटिंग आहे, तिला नक्की येतील.'

वीरेनबाबू काही बोलत नाहीत, समोर पहात रहातात.

सुरेन म्हणाला, 'आता इतक्या रात्री आपणालाही फार वेळ बसवून ठेवता येत नाही. आम्ही एकूण काय करायचं याबद्दल चर्चा करीत आलो. एक गोष्ट आम्ही पक्की केलीय्-उत्तरखंड आणि आमचा कार्यक्रम जर ते अलगअलग करू पहात असतील, तर त्याला आम्ही कबूल होणार नाही.'

हे ऐकल्यानंतर इथे आलेल्यांपैकी सांस्कृतिक कार्यक्रम आयोजकांपैकी किती लोक आहेत हे तपासून पहाण्यासाठीच वीरेनबाबू पुन्हा सगळ्यांचे चेहेरे पहातात. सम्मेलन आणि सांस्कृतिक कार्यक्रमाच्या आयोजनातच पैसे गुंतवले आहेत त्यांचं समर्थन असू शकतं, पण उत्तरखंडी लोकांपैकी तर काही कुणाचं समर्थन नसणार. जे आले आहेत, त्यांचा सांस्कृतिक कार्यक्रमाशी संबंध अधिक आहे हे पाहून वीरेनबाबू आश्वस्त होतात.

'सुस्थिर तर काही दिसत नाही,' वीरेनबाबू विचारतात.

'तो तर मेळाव्याच्या कामासाठीच सगळीकडे फिरतोय्, रात्रीच परत येईल. उद्याच्या मीटिंगला असेल.' नकुल सांगतो.

रामकिशोरचा मयनागुडी बाजारात व्यवसाय आहे. तो म्हणाला, 'सर, आम्ही एक विचार केला. या सरकारी मीटिंगमध्ये आम्ही सगळे लोक जाऊन हजिर झालो, तर कोणी गुस्सा होईल, कुणी खुश होईल-आम्हाला हे सगळं करणं चालणार नाही. आम्हाला सोडून द्या सर.'

वीरेनबाबू हे बोलणं टेबलाकडे पहात ऐकत होते. शेवटचं वाक्य संपल्यावर डोळे

वळवून ते रामकिशोरकडे पहातात, 'तुम्ही तर काही या तेराजण पार्टनर्समध्ये नाहीत.'

'नाही सर, त्यांच्यामध्ये नाही; पण कमिटीमध्ये आहे.'

'म्हणजे, तुम्हाला कमिटी सोडून द्यायचीय्?'

'नाही, नाही, सर, कमिटीत मी राहीन, आहे-' रामकिशोर ताबडतोब उत्तरतो. त्याला थांबवून तरणीबाबू म्हणतात, 'आम्ही असं म्हणतोय् वीरेनदा, की आम्ही आता जिथे आहोत तिथे राहू, ज्या ज्या समित्यांवर होतो, तिथे-तिथे राहू. आपण जे ठरवाल ते आम्ही मान्य करू, आपण ज्या मीटिंग्ज-बीटिंग्ज बोलवाल त्यांनाही येऊ. पण या सरकारी मीटिंगला जायची आमची इच्छा नाही. आम्ही तर काही बोलून शकणार नाही, मध्येच गर्दी होईल आणि हे सगळे पार्टीचे लोक आमच्यावर संतापतील. आम्हाला तर आमचा धंदा करायचंय्.'

मयनागुडी बाजारात तरणीबाबूंचं सायकलचं मोठं दुकान आहे. आणखी वेगवेगळ्या वस्तूंची एजन्सी आहे. तरणीबाबूंचं बोलणं ऐकून वीरेनबाबू रघुनाथकडे पहातात-त्याचंही दुकान आहे, त्यांचंही नक्की हेच मत असणार.

'काका, सरकारचा प्रस्ताव आम्ही कुणी मान्य करणार नाही आणि सरकारची आम्हा कुणाला भीतीही वाटणार नाही. पण आम्हा तेरा पार्टनर्सपैकी पाचजण आपल्याला कधीही उपलब्ध होणार नाहीत. ते काय-पैसे देऊन खलास, आणि पैसे मिळाले की खुश! आणि, गोंधळाच्या भीतीने या पाचजणांपैकी कुणी-कुणी यातून अंगही काढून घेण्याची शक्यता आहे. पण त्या दोन-तीनजणांसाठी काही आता आम्ही माघार घेणार नाही. तेव्हा आता कुणा-कुणाला घेऊन आम्ही मीटिंगला जावं ते आपण ठरवा,' नकुल म्हणतो.

'पण तुम्हा तेराही जणांना मीटिंगला बोलावलंय्. मला सेक्रेटरी म्हणून तसं पत्र लिहिलंय्. या तेराजणांना हे पत्र दाखवून त्यावर त्यांच्या सह्या घेऊन ठेवू. पण या तेराही जणांनी किमान एकदातरी मीटिंगमध्ये तोंड दाखवायला हवं. ते तुम्ही पहा. आणि उत्तरखंडाच्या बाजूने जे चांगलं बोलू शकतील त्यांना पाठवा,' वीरेनबाबू म्हणतात.

'मीही तोच विचार केला काका,' जगदीश म्हणतो, 'तर, आपण तर आहातच, पण आपण एकटेच असे किती बोलणार? साले दोनचार ज्यूनियर वकील बरोबर नेले तर बरं होईल. ज्यूनियर जरा चिल्लाचिल्ली करू शकतात - आपण आपलं म्हणणं शेवटी सांगा.'

नकुल हसून म्हणतो, 'अरे, काकांना तर चेहेरा वर उचलावा लागेल, आवाज साफ करावा लागेल - त्यानंतर ते आपलं म्हणणं सांगतील. त्यादरम्यान तर सरकारी पक्षाचे लोक जिन्दाबाद-जिन्दाबाद करतील.' सगळे जण हसतात. सौम्य हसून वीरेनबाबू म्हणतात, 'जो आपली मतं मान्य करील असं कुणी तुमच्या नजरेत आहे का?'

नकुल वीरेनबाबूंकडे पाहून म्हणतो, 'देवनाथ मास्टर आणि उमापद वकील यांची नावं आठवली.' वीरेन बाबू जरा विचार करतात. त्यानंतर डोळे खाली वळवून नकुल म्हणतो, 'ते राजी होतील?'

प्रश्न ऐकून सारे शांत बसून रहातात.

वीरेनबाबू पुस्ती देत म्हणतात, 'देवनाथ उपस्थित राहिला तर खूप चांगलं होईलं. राजवंशी समाजातला तो एकमेव पी. एच्. डी. पण तो तर युनिव्हर्सिटीत नोकरी मिळावी म्हणून प्रयत्न करतोय, त्याला या प्रकरणात पडावंसं वाटेल? आणखी उमापद खूप चांगला आहे, पण तो तर काँग्रेसचा होता.'

'काँग्रेस तर काका, उत्तरखंडाच्या बऱ्याच भागात आहे,' जगदीश म्हणतो.

'नाही, पण त्यांना तर काही सगळे ओळखत नाहीत. उमापती सिलिगुडी कोर्टात बऱ्याच दिवसांपासून प्रॅक्टिस करतोय्. आता सरकारने जर असं सिद्ध केलं की उत्तरखंडामागे काँग्रेस आहे, तर तो असा प्रचार करील, की तुम्ही आणखी काही बोलू शकणार नाही.' वीरेनबाबू बोलण्यानंतर सगळे गप्प बसतात.

वीरेनबाबू पुढे म्हणतात. 'पण हा विचार तुम्ही चांगला केलाय्. एक काम करा, देवनाथला राजी करवून घ्या, त्याला काहीच बोलावं लागणार नाही. पण आम्ही गरज पडल्यास त्याचं म्हणणं मांडू' थोडं थांबून वीरेनबाबू म्हणतात, 'देवनाथला सांगा, 'त्याच्या नोकरीच्या दृष्टीने हे सोयीचंच होईल. आणि कूचबिहारच्या सन्तोषला आणा.'

'सन्तोष म्हणजे सन्तोष मुख्तार?' सुरेन विरारतो.

'आता तो अॅडव्होकेट आहे. पण सन्तोषशी तुमचं आधी काही बोलणं झालं नाही? माझ्या अंदाजाप्रमाणे तर तो याबाबतीत सपोर्टच करील. सन्तोषला सगळं ठाऊक नसेल, तर तो कदाचित राजी होणारही नाही. तो आला असता तर तुम्हाला जे हवंय् ते खूप चांगल्या पद्धतीने झालं असतं. खूप स्ट्रॉंगली आरग्यू करता आलं असतं. तुम्ही उद्याच त्याच्याकडे जा. माझं नांव सांगा. त्याला आणा.' वीरेनबाबू थांबतात. सगळे जरा चुपचाप बसतात. त्यानंतर तरणीबाबू म्हणतात, जणू बसलेले आहेत म्हणूनच बोलताहेत, नाहीतर बोलले नसते- 'यावर काही उपाय शोधला असता, तर चांललं नसतं?'

'उपाय म्हणजे?' सुरेन विचारतो.

'समजा, सरकार म्हणालं- उत्तरखंड मेळावा होऊ देणार नाही आणि आपण म्हणालात मेळावा आणि फंक्शन होणारच-तर यातून काहीच साधणार नाही, प्रश्न सुटणार नाही. मी म्हणालो होतो - शेवटच्या दिवशीची मिरवणूक सुरू होण्याची जागा बदलायला जर तुम्ही राजी असाल, तर सरकार बहुधा आणखी काहीच बोलू शकणार नाही, अगदी इच्छा असूनही बोलू शकणार नाही.'

'मिरवणूक म्हणजे जल्पेश्वर मोहीम?' तिलक विचारतो.

'हो', तरणीबाबू म्हणतात.

'म्हणजे, मिरवणूक होणार नाही?' तिलक विचारतो. 'नाही, नाही, मिरवणूक होईल. समजा, श्रीदेवीच्या नाचाच्या ठिकाणाहून मिरवणूक न निघता ती चौपत्ती पासून निघेल हे आपण मान्य केलंत, तर त्यात काही तोटा नाही.' तरणीबाबू म्हणतात.

'तसा आपसात विचार करता येईल की. तर तुम्ही या, उद्या सगळीकडे फिरून काय होतंय् ते सांगा. . .' वीरेनबाबू उठून उभे रहातात.

## एकशे बासष्ट

# जलपाइगुडी सर्किट हाऊसचं स्थापत्य

जलपाइगुडी सर्किट हाऊसमधली मीटिंगची खोली खूप छोटी आहे. खरं तर ती मीटिंगची खोली नाहीच, ती डायनिंग रूम आहे. एक छोटंसं पार्टिशन घालून बसण्याची जागा वेगळी केलीय्. इंग्रजांच्या अमलात टूरवर येणाऱ्या सरकारी ऑफिसर्ससाठी अशा प्रकारचं, बंगल्यासारखं सर्किट हाऊस बांधण्यात आलं. जलपाइगुडी जिल्ह्याचे सदर, आणि कमिशनर जलपाइगुडीतच रहातात. त्यामुळे जिल्ह्याच्या ऑफिसरांना टूरवर येण्याची काही संधीच नव्हती. कलकत्त्याहून सर्वात मोठे सरकारी अधिकारी येत. इतर इल्ह्यांमधून ऑफिसर्स कमिशनरना भेटायला किंवा जिल्हा कोर्टात साक्षी द्यायला. येत: भारतीय ऑफिसर्स स्वातंत्र्यपूर्वकाळात या सर्किट हाऊसमध्ये फारसे उतरत नसत - त्यापेक्षा त्यांना स्टेशनजवळचा डाकबंगला आवडे. सर्किट हाऊस मुख्यत: इंग्रजांसाठीच होतं. इंग्रजांचा विचार करूनच ठिकाण निवडण्यात आलं होतं. आता याच रस्त्याच्या पूर्वेला, तिस्तेच्या काठावर कमिशनर, डिस्टिक्ट जज, डेप्युटी कमिशनर आणि डिव्हिजनल फॉरेस्ट ऑफिसर यांचे मोठमोठे बंगले आहेत-लाल विटांचे, उतरत्या छपरांचे आणि बिघा-बिघा बागा असलेले. रस्त्याच्या पश्चिमेला एक मोठ्ठी पेरूंची बाग, तिच्याजवळ करला नदी. या करला नदीच्या काठी पेरूंच्या बागेच्या दक्षिण सीमेवर, हे एकमजली सुबक छोटं असं एकाकी सर्किट हाऊस.

त्याचं स्थापत्यसुद्धा बंगल्यांपेक्षा वेगळं आहे. तीन बाजूंना-समोर, डावीकडे आणि उजवीकडे रुंद व्हरांडा-कमानी असलेला. खाली फरशी - फरशी इतकी खाली या बाजूला दिसतच नाही. समोरच्या व्हरांड्यातून आत गेल्यावर बसण्याची जागा आणि पार्टिशन टाकून वेगळी केलेली भोजनाची जागा. त्या खोलीकडे तोंड करून मागे फक्त तीन मोठ्या झोपण्याच्या खोल्या. कमानींशी मेळ राखून छप्पर बांधलं आहे- एकच उतार असलेलं नाही, तर व्हरांड्यांवरती एक छत आणि त्याच्या काही अंतर वरती खोल्यांच्यावरचं

आणखी एक छप्पर. वरच्या छताच्या मध्यभागातून एक चिमणी बांधलेली-तिचा आता काही उपयोग राहिलेला नाही-थंडी कमी झालीय म्हणून नाही, तर थंडीत लाकडांची शेकोटी पेटवणारे लोक आता राहिले नाहीत, म्हणून. पण रस्त्यापलिकडच्या बंगल्यांच्या आणि या सर्किट हाऊसच्या रांगेपासून थोड्या अंतरावर, कोर्ट बिल्डिंगच्या इडियन रेड रंगाच्या विरूद्ध या सुबक छोट्या इमारतीचा फिकट पिवळा रंग जेव्हा बदलला जातो, तेव्हा या चिमणीचा रंगही बदलला जातो.

सर्किट हाऊस अद्याप सर्किट हाउसच आहे. मंत्रीलोक, मोठमोठे ऑफिसर्स इथे उतरतात. पण मंत्रीलोकांच्या येण्यामुळे सर्किट हाऊसचा व्यवहार थोडासा बदललाही आहे. मंत्र्यांबरोबरच्या माटिंग्ज सर्किट हाऊसमध्येच होतात-त्या मीटींग्ज ऑफिसर्सबरोबरही असू शकतात, किंवा सर्वपक्षीय मीटिंग्जही असू शकतात. मीटिंग्जसाठी वेगळा असा हॉल नसल्याने, डायनिंग रूममध्ये, लांब डायनिंग टेबलभोवतीच मीटिंग बसते. बरेचदा जागा पुरत नाही-मग दुसरी खुर्च्यांची रांग तयार करावी लागते. पण या डायनिंग टेबलमुळे आणि खुर्च्यांच्या दोन रांगांमुळे मग हालचालीसाठी जागा उरत नाही. आतून कुणाला बाहेर जायचं असेल, तर स्टीलच्या चेअरवरून उठून, चेअरची घडी घालून जागा द्यावी लागते. म्हणूनच बरेचदा अशा मोठ्या मीटिंगसाठी जमलेली गर्दी डायनिंग रूमध्ये व्हरांड्यापर्यंत येते. व्हरांड्याच्या दरवाज्याशी लोक गर्दी करून उभे रहातात. त्याशिवाय बसण्याची जागा आणि भोजनाची जागा अलग करणाऱ्या पार्टिशनजवळही बरेच लोक दाटीवाटीने उभे रहातात.

त्यादिवशीच्या मीटिंगला इतकी गर्दी होत नाही-कारण विषय जलपाइगुडीच्या संदर्भातला नाही, मयनागुडीच्या संदर्भातला आहे. पण, श्रीदेवीचं फंक्शन रद्द होऊ शकतं अशी एक वार्ता एका दिवसातच जलपाइगुडी शहरात पसरली होती. त्यामुळे, प्रकार काय आहे हे माहीत करून घेण्यासाठी कुणी-कुणी आले होते. पण, मीटिंगमध्ये सहभागी न होणारे, तरीही मीटिंगमध्ये काय होतंय् याबद्दल उद्विग्न असणारे मयनगुडीचे अनेकजण आले आहेत. त्यांच्यामध्ये उत्तखंड मेळावा आणि सांस्कृतिक कार्यक्रमाचे नाना प्रकारचे कार्यकर्ते तर आहेतच, त्याशिवाय ज्यांनी तिकिटं विकत घेतली आहेत आणि ज्यांना फंक्शन पहायचंय, असे लोकही मोठ्या प्रमाणावर आहेत.

ज्या कार्यकर्त्यांना आत मीटिंगच्या खोलीमध्ये जाता आलं नाही तेच फक्त बाहेर आहेत, असं नाही. जे या मेळाव्यातील सांस्कृतिक कार्यक्रमाचे आयोजक आहेत आणि त्यांच्याशी चर्चा करण्यासाठीच ही मीटिंग बोलावलीय् असेही अनेकजण बाहेर येरझारा घालताहेत किंवा व्हरांड्याच्या किनाऱ्याशी खाली पाय सोडून बसले आहेत. पण हे आयोजक मीटिंगची जबाबदारी जणू दुसऱ्यांच्यावर सोडून देऊन स्वत: बाहेर उभे आहेत-कज्जेखटल्यांच्या वेळी जसे अशोल बाहेरच थांबतात, आणि वकील-मुखत्यार आत

खटला लढतात, तसे.

बाहेर बसलेल्या आणि येरझारा घालणाऱ्या लोकांच्या डोळ्यांसमोरूनच मेळावा आणि कार्यक्रमाची पोस्टर्स लावलेल्या बसेस कोर्टाच्या दिशेने जात होत्या आणि कोर्टाकडून परत येत होत्या. एवढंच काय, एका मिनिबसमागे 'मिस्टर इंडिया' सिनेमातील श्रीदेवीच्या नाचाचा एक रंगीत फोटोही टांगलेला होता.

जलपाइगुडीचे एम्. एल्. ए. आणि कूचबिहारच्या नाटाबाडीचे एम्. एल. ए. हे मंत्री आहेत. डूयार्सचे आणखी एक एम्. एल्. ए. वनविभागाचे राष्ट्रमंत्री आहेत. त्यांच्यापैकी मीटिंग हॉलच्या बाहेर कुणीही दिसत नाहीय्, पण मयगुडीच्या एम्. एल्. ए. नी बाहेर येऊन अनेकांशी गप्पा मारल्या. एम्. एल्. ए. प्रथम बाहेर आले, तेव्हा एकाने त्यांना आपली एक वैयक्तिक समस्या सांगून त्यांच्या हाती तीन कागद दिले. ते कागद गुंडाळी करून त्यांनी उजव्या हातात धरून ठेवले होते. पण तोच उजवा हात ते इतका हलवीत होते-कधी डोक्यामागे नेत होते, कधी कुणाच्या पाठीवर ठेवीत होते, कधी कुणाला कोपरखळी मारीत होते, की वाटत होतं, हे कागद त्यांनी असे गुंडाळी करून हातात धरले नसते, तर या हाताचा असा वापरच त्यांना करता आला नसता. एम्. एल्. ए. च्या कपड्यांचा रंग थोडा मळकट होता, गळ्या भोवती एक शाल घेतलेली. त्यांना पाहून वाटत होतं, की या मीटिंगशी त्यांचा संपर्क सर्वात दूरचा आहे. पण खरं पाहता, दोन बाजूंनी या मीटिंगशी त्यांचा संपर्क अत्यंत जवळचा होता. घटना घडतेय्. मयनागुडीत. म्हणून सरकारी -सत्ताधारी-पक्षाची अपेक्षा अशी आहे, की त्यांनी आधी चर्चा करून समस्या सोडवण्याच्या दृष्टीने काहीतरी मार्ग नक्की करावा. तसंच, सांस्कृतिक कार्यक्रमाच्या आयोजकांचीही अशी अपेक्षा आहे की त्यांनी काहीतरी उपाय सांगावा. पण एम्. एल्. ए. च्या बोलण्यात आणि हालचालीत या दृष्टीने ते प्रयत्नशील असावेत काहीच जाणवत नाही.

एम्. एल. ए. व्हरांड्याच्या वर पण पायऱ्यांच्या जवळ उभे होते, त्यामुळे सगळेजण त्यांना घेरून, त्यांच्याभोवती कोंडाळं करून त्यांच्याशी बोलत होते. एम्. एल. ए. एका पंचवीस-सव्वीस वर्षाच्या तरुणाच्या खांद्यावर हात ठेवून त्याला म्हणतात, 'हे काय म्हणतोयस् तू! उत्तरखंड पार्टीतही रहायचं आणि माझ्या पार्टीतही रहायचं?' तरूण हसून म्हणतो, 'का राहू नये-सांगा बरं!'

एम्. एल. ए. हसून म्हणतात, 'मला उलट प्रश्न विचारतोस? हे काय टी. व्ही. वरचं क्विझ् आहे? अच्छा, मी तुला विचारतो, सांग बरं-सगळं जग बदलावं असं आमच्या कम्युनिस्ट पार्टीला वाटतं, आणि तुमच्या उत्तरखंड पार्टीला वाटतं की फक्त तिस्ताकाठाच बदलावा. तर, जग बदललं की तिस्ताकाठ बदलेलच, पण तिस्ताकाठ बदलल्यावर जग थोडंच बदलेल? सांग बरं!'

दोन्ही हात चेहऱ्याजवळ आणून तो तरूण थोडं हसला. त्याच्या हास्यातल्या संकोचाने, तरीही त्याच्यातील बुद्धिमत्तेच्या तेजाने तो खूप सुंदर दिसत होता. जणू या एम्. एल्. ए. च्या कपड्यांचा मळकटपणा आणि परिश्रमी शरीराच्या स्वच्छंदतेबरोबर या युवकाच्या सौंदर्याचं थोडं साम्य होतं. पण कुठेतरी जणू थोडं वेगळेपणही होतं-एम्. एल्. ए. च्या चेहऱ्यावरील निश्चितपणाची भावना आणि या तरुणाच्या चेहेऱ्यावरील अनिश्चितपणाची भावना यांच्यामध्ये. एम्. एल्. एं. च्या बोलण्याच्या शेवटी हास्याची एक लहर उठते. ती थांबल्यावर तो तरुण म्हणतो, 'म्हणून तर जग बदलायचं काम करण्यासाठी लाल झेंड्याला मतं देऊन आम्ही तुम्हाला आमदार केलं, आणि उत्तरखंडाच्या हितासाठी उत्तरखंड पक्ष धरला!' यावर लोकांचा हशा अधिकच वाढतो. एम्. एल्. ए. तरुणाच्या खांद्यावरून हात खाली घेऊन त्याला एक धपाटा मारतात. तरुण नाचरे हावभाव करीत बाजूला सरकतो. गर्दी बदलते.

मागून एकजण पुढे येऊन म्हणतो, 'अहो हेमेनदादा, फालतू गोष्टी बंद करा. हे फंक्शन रद्द केलं तर कुरुक्षेत्र होईल. जरा समजून-उमजून काम करा.'

एम्. एल्. ए. हेमेनदा हसून म्हणतात, 'अरे, कुरुक्षेत्र होऊ नये म्हणून तर मीटिंग बोलावलीय्. तुम्ही तर उत्तरखंड पक्षात सामील होताय् आणि आणताय् मात्र मुंबईहून श्रीदेवीला. ती सालं तिसरीकडचीच पोरगी-मद्रासची. हे कसलं उत्तरखंड रे बाबांनो तुमचं-मयनागुडी-मद्रास-मुंबई-आं?'

मागून हळू आवाजात ऐकू येतं, 'तुम्हीच तर हे शिकवता - दुनिया के मज़दूर एक हों!'

'कोण रे ते?' म्हणून हशाच्या आवाजामध्ये एम्. एल्. ए. च्या आवाजात मालकाला शोधतात.

'एऽकोण रे?' प्रथम बोललेला माणूसच धमकावतो आणि एम्. एल्. ए. ना म्हणतो, 'आता आपण मीटींगआधी जरा सल्ला द्या, त्यानंतर मीटिंगला जा.'

'अरे काय सल्ला देणार? कॉंग्रेसचे तर सगळेच लोक उत्तरखंडाला समर्थन देणार. त्यांना असं वाटतंय् की आता पश्चिमबंगालमध्ये कॉंग्रेसचं सरकार होण्याची काही आशा नाही, म्हणून हे इकडं उत्तरखंड करून, तिकडं गोर्खालँड करून, तिकडं झाडखंड करून डाव्या आघाडीच्या सरकारला वैताग देताहेत. तुम्ही त्या कॉंग्रेसवाल्या. देउनियांकडून सल्ला घ्या ना. आम्हाला कुठली आलीय् अक्कल? एम्. एल्. ए. नी बोलण्याची सुरुवात हसत-हसतच केली असली, तरी ते शेवट मात्र जरा संतापातच करतात. ज्याने मुद्दा सुरू केला होता, तो म्हणतो, 'अच्छा, असं समजा, कॉंग्रेसच मेळावा करतंय आणि श्रीदेवीलाही नाचवतंय्-सालं त्यांना तर तुम्ही काही करणार नाही - एऽहेमेनदा, बोला जरा!'

आतून हाक येते, 'हेमेन, या.'

इतकावेळ पर्यटनमंत्री तयार होत होते. सकाळी तयार व्हायला त्यांना जरा वेळ लागतो. त्यांची हाक आल्याबरोबर एम्. एल्. ए. खोलीच्या दिशेने वळतात, गर्दी पांगते, अनेकजण एम्. एल्. एं. च्या बरोबर खोलीमध्ये जातात. काही काहीजण परत व्हरांड्यातून खाली जमिनीवर उतरतात. दोनेकजण मीटिंगरूमच्या खिडकीजवळ उभे रहातात.

## एकशे त्रेशष्ट

# मेळावा आणि कार्यक्रमाबद्दल सरकारी चर्चा

टेबलाभोवती सगळ्यांनी बसण्यात थोडासा वेळ जातो. डेप्युटी कमिशनर, ॲडिशनल डी. सी. सदर एस्. डी. ओ., डी. एस. पी. हे सोफ्यावर बसले होते, तर मयनागुडीचे ओ. सी. आत जायच्या दरावाजाजवळ एका लाकडी खुर्चीवर बसले होते. पर्यटनमंत्री दरवाजाजवळ एका लाकडी खुर्चीवर बसले होते. पर्यटनमंत्री बाहेर आलेले नसल्याने मीटींग सुरू झाली नव्हती खरी, पण त्याआधीच उद्योगमंत्री बाहेर येऊन उभे रहातात. सगळे ऑफिसर्स उठून उभे राहिले होते. उद्योगमंत्री त्यांना 'बसा' म्हणाले, तरी ते बसत नाहीत. पण उद्योगमंत्र्यांच्या माणसाने त्यांना खाण्याच्या ठिकाणाहून मीटिंगच्या ठिकाणी बोलावून नेल्याबरोबर ऑफिसर्स पुन्हा बसतात. यानंतर काही वेळाने वनविभागाचे राष्ट्रमंत्री बाहेर येऊन, दरवाजात थांबून जरा इकडे-तिकडे पहातात. मयनागुडी ठाण्याचे ओ. सी. उभे रहातात. जरा नंतर एस्. डी. ओ. पण डी. सी. आणि ए. डी. सी. उठण्याचा फक्त हावभाव करतात.

काहीतरी आठवल्यावर एस्. डी. ओ. त्यांच्याजवळ जाऊन म्हणतात, 'सर, ही अगदीच वेगळी मीटींग असल्याने डी. एफ्. ओ. आले नाहीत. पण ते त्यांच्या ऑफिसात आहेत. आपल्याला वेळ असल्यास सांगा. मी त्यांना फोन करतो.'

'वेळ तर आता तुमच्या हाती आहे. मीटिंग जेव्हा संपवाल, तेव्हा अच्छा!' असं म्हणून ते पुन्हा आता निघून जातात.

आणखी काही वेळानंतर पर्यटनमंत्री बाहेर येतात. त्यांना जरा दम्याचा त्रास आहे. खूप पातळ अशा धोतरावर जाड अशा गरम कापडाचा झब्बा, त्यावर पांढरी वूलन शाल पण त्यांचा चेहरा आणि डोळे जरासे सुजल्यासारखे वाटत होते. ते येऊन उभे राहिल्यावर सगळेच उठून उभे रहातात, ऑफिसर्स बाहेर येतात, आता मीटिंग सुरू होणार. पर्यटनमंत्री मीटिंगच्या ठिकाणी जाताना इकडेतिकडे पाहून विचारतात, 'हेमेन कुठंय्? हा त्याचाच तर मामला आहे!'

एस्. डी. ओ. म्हणतात, 'ते बाहेरच आहेत, सर!'

पर्यटनमंत्री बाहेरच्या दरवाजाच्या दिशेने दोन पावलं जाऊन मोठ्याने हाक मारतात, 'हेमेन, या!' त्यानंतर ते मीटिंगच्या ठिकाणी जाऊन टेबलाच्या टोकाशी असलेल्या खुर्चीत बसतात. त्यांच्यामागे-मागे ऑफिसर्स येतात आणि पर्यटनमंत्र्यांच्या डाव्या बाजूच्या खुर्च्यांवर बसतात-एक खुर्ची उद्योगमंत्र्यांसाठी रिकामी ठेवून. प्रथम डी. सी., त्यानंतर ए. डी. सी., ए. डी. ओ., डी. एस्. पी. मयनागुडी ठाण्याचे ओ. सी., डी. एस. पीं.ना विचारतात, 'सर, तर मग मी तिकडे वाट पहातो, गरज पडली तर बोलवा.'

'नाही, नाही, आपल्यालाच तर ब्रीफ करायला हवं, इथं बसा' - असं म्हणून स्वत:च्या खुर्चीशेजारची खुर्ची दाखवतात. ओ. सी. खुर्ची जरा सरकवून आत घुसतात, आणखी थोडं सरकून बसतात. पण खुर्ची टेबलच्या अगदी कडेच्या टोकाला असल्याने ते खुर्ची जरा सरकवून बसले आहेत हे लक्षात येत नाही. असं वाटतं, की जणू पर्यटनमंत्र्यांच्या समोरासमोर होण्यासाठी जरा तिरके झाले आहेत, एवढंच.

हे सगळे बसत असतानाच बाहेर असलेले आत येतात. उद्योगमंत्री येतात. ते जलपाइगुडीचे एम्. एल्. ए. त्यांना ऑफिसर्सच्या मागच्या बाजूने येऊन टेबलाच्या टोकाशी उभं रहावं लागतं. आपल्यासाठी एक खुर्ची रिकामी ठेवलीय् हे ते पहातात. ती खुर्ची ओढून, ती जरा सरकवून घेऊन ते टेबलापासून थोडी दूर पण पर्यटनमंत्र्यांच्या अगदी जवळ घेऊन जातात. त्यामुळे तिकडून ये-जा करण्यात जरा अडचण येईल, पण ते तिथेच बसतात. जिल्ह्याच्या ठिकाणी अशा प्रकाची सभा झाली, तर तिच्या अध्यक्षपदी त्या जिल्ह्याचा कॅबिनेटमंत्री असावा, अशी साधारण प्रथा आहे. या प्रथेनुसार उद्योगमंत्र्यांनीच या मीटिंगच्या अध्यक्षपदी असायला हवं. पण सुबिमल बाबू कुठल्याही मीटींगला गेले, की अध्यक्षपदाच्या खुर्चीतच बसतात. ते त्यांच्या वयामुळेही, आणि बरेचदा पक्षाच्या संदर्भातही. अर्थात अशा ठिकाणी कुणी अध्यक्षपदासाठी कुणाच्या नांवाचा प्रस्ताव ठेवीत नाही. मीटिंगचं वृत्त लिहिलं, तर त्यात एकामागोमाग एक मंत्र्यांची नांवं असतील. पण तरीही सभा चालवण्याचा काहीएक नियम असतोच. त्याशिवाय, या घटनेशी सुबिमलबाबूंचा काही संबंधही नाही. ती खुर्ची म्हणजेच अध्यक्षांची खुर्ची असंही काही ठरवलेलं नाही. तरीही उद्योगमंत्र्यांनीच अध्यक्षपदाच्या खुर्चीवर बसणं योग्य होतं. ते जर आधी आले असते, तर नक्कीच त्या खुर्चीत बसले असते. पण आता सुबिमलबाबू त्या खुर्चीत बसल्यावर उद्योगमंत्र्यांनी आपली खुर्ची जरा सरकवून घेऊन स्वत:च्या बसण्याच्या जागेला महत्त्व प्राप्त करून देऊ पाहिलं.

सुबिमलबाबूंच्या उजविकडच्या खुर्चीत वनविभागाचे राष्ट्रमंत्री भुवनमोहन राय आहेत-हेच एकमेव राजबन्शी मंत्री आहेत. त्यांच्याशेजारी मयनागुडीचे एम्. एल्. ए.

हेमेनाबाबू. त्यांच्यानंतर उत्तरखंड आणि सांस्कृतिक कार्यक्रमाशी संबंधित लोक. पण त्या सगळ्यांना जागा न मिळाल्याने खुर्च्यांच्या पहिल्या रांगेमागे स्टीलच्या खुर्च्या ठेवाव्या लागल्या. त्या दुसऱ्या रांगेत सगळ्यांनी बसून घेण्याच्या आधीच सुबिमलबाबू एकदा डावी-उजवीकडे पाहून म्हणतात, 'चला सुरू करा, मीटिंग फार वेळ चालणार नाही, आपल्या ज्या समस्या आहेत त्या प्रथम मांडा.'

बोलायला सुरुवात कोण करणार म्हणून जरा इकडंतिकडं पाहिलं जातं. डी. सी. पहातात डी. एस्. पीं. कडे, डी. एस्. पी. पहातात ओ. सीं. च्याकडे. ते ओ. सीं. ना दिसत नाही, कारण त्यांना वाटतंय् की बोलणं उत्तरखंडी लोकच सुरू करणार, म्हणून ते वीरेनबाबूंकडे पहाताहेत. वीरेनबाबू टेबलाकडे पहात असल्याने ओ. सी. आपल्याकडे पहाताहेत हे त्यांना दिसत नाही. पण नकुल सगळ्यांच्याकडे पहात असल्याने त्याच्या लक्षात येतं, की वीरेनबाबूंनी सुरूवात करावी असं ओ. सीं. ना वाटतंय्. नकुल वीरेनबाबूंच्या जवळच, संतोषबाबूंनंतर बसलाय्. त्याने संतोषबाबूंच्या मागून वीरेनबाबूंच्या पाठीला हलकासा स्पर्श केल्यानंतर वीरेनबाबू संथपणे डोकं वळवतात. नकुल त्यांना डोक्याच्या इशाऱ्याने, सुरुवात करायला सांगतो. वीरेनबाबू खूप हलक्या आवाजात संतोषबाबूंना म्हणतात, 'संतोष, बोला.'

संतोषबाबूंना कूचबिहारहून पाचारण करण्यात आलंय्. ते घसा खाकरून म्हणतात, 'ऑनरेबल् मिनिस्टर्स, आम्ही तर प्रॉपर परमिशन घेऊन फंक्शन करतो आहोत. आज बुधवार. शनिवारी आमचं फंक्शन सुरू होणार. यात फक्त लाखो-लाखो रुपये गुंतले आहेत एवढंच नाही, तर या फंक्शनसाठी हजारो-हजारो लोक येणार आहेत. आता ही मीटिंग का बोलावण्यात आली हे आमच्या लक्षात येत नाहीय्.' संतोषबाबूंच्या आवाजात जोरकसपणा आहे. तो जोरकसपणा इतका आहे, की या एवढ्याश्या खोलीत या काहीजणांच्या मीटिंगमध्ये हा आवाज जरा चढाच वाटतो. या मीटिंगमध्ये नंतर अशा चढ्या आवाजात चर्चा होऊ शकते खरी, पण सुरुवात जरा वेगळ्या प्रकारे व्हावी, असं ठरलं होतं.

सुबिमलबाबूंनी पांढऱ्या शालीने आपला चेहेरा झाकलेला होता. त्यांनी चादर चेहेऱ्यावरून खाली घेतली नाही, पण आपलं बोलणं इतरांना स्पष्टपणे समजावं, म्हणून ते चादरीआडूनच आपला हात चेहेऱ्यावरून सरकवतात. ते आपल्या स्वाभाविक आवाजात बोलतात, पण त्यांचा हा स्वाभाविक आवाजच खूप भारी आहे. त्यामुळे संतोषबाबूंच्या चढ्या आवाजातल्या बोलण्याला प्रत्युत्तर म्हणून ते जे बोलले, त्याचा आवाज चढा वाटला नाही खरा, पण वजनदार वाटला. 'तुम्हाला तर आम्ही काही म्हटलेलं नाही. तुम्ही ज्या फंक्शनसाठी परमिशन घेतलीय् तेच फंक्शन तेवढं करावं. पण ज्यांनी

परमिशन घेतलेली नाही, ते तुमच्या फंक्शनमध्ये सामील होऊन दुसरं कुठलं फंक्शन किंवा मेळावा करू शकणार नाहीत.'

संतोषबाबूंचं प्रतिपादन आणि सुबिमलबाबूंच्या उत्तरानंतर सगळेच अचानक गप्प होतात. कुठला मुद्दा घेऊन आता सभा पुन्हा सुरू करावी हे कुणालाच समजत नाही. सुबिमलबाबू चादरीच्या आत आपला हात पुन्हा तोंडाजवळ घेतात.

थोड्या वेळानंतर सुस्थिर म्हणतो, 'मला एक सांगायचं होतं.' जणू कुणीतरी आपल्याला बोलण्याची अनुमती देणार आहे, अशा पद्धतीने तो जरा वाट पहातो. त्यानंतर म्हणतो, 'तसं असेल, तर मग आपल्याला ही मीटिंग बोलवायची काही आवश्यकता नव्हती. उत्तरखंड मेळाव्याला परमिशन नाही असं सरकार आम्हाला कळवू शकत होतं. त्यावर मग, सरकारने बंदी घातलेली असतानाही हा मेळावा भरवायचा की नाही याबद्दल आम्ही निर्णय घेतला असता.' सुस्थिरच्या म्हणण्याला समर्थनात्मक अशी कुजबूज मागच्या रांगेत सुरू होते. ती अशा आवाजात सुरू होते, की वाटतं, ती थांबवायला हवी. पण ऑफिसर्स आणि सुबिमलबाबू त्या दिशेकडे फक्त पहात राहतात. त्यामुळे कुजबूज आणखीच वाढते. नंतर काही वेळाने थांबते.

त्याहीनंतर थोड्या वेळाने सुबिमलबाबू म्हणतात, यावेळी चादर तोंडावरून काढून म्हणतात, 'उत्तरखंड की कुठलं फलाणं खंड पक्षाचा कुठे आणि कोण मेळावा घेत आहे याचं सरकारला काही घेणं-देणं नाही. तरीही कायद्यानुसार त्यासाठी पोलिसांची परमिशन घ्यावी लागेल. पण फंक्शनसाठी ज्या जागेची अनुमती दिली आहे, तिथे याप्रकारचा एखादा राजकीय मेळावा झाला, तर कायदा आणि सुव्यवस्थेची परिस्थिती बिघडू शकते. त्यासाठीच सरकार म्हणतंय की फंक्शनच्या जागी फंक्शनच व्हावं, कुठल्याही प्रकारचा मेळावा-बिळावा त्या ठिकाणी घेणं चालणार नाही. एवढा हा सरळ मामला आहे.'

## एकशे चौसष्ट

# श्रीदेवीचा नाच व जल्पेश मोहिमेसंदर्भात आरग्युमेंट

मीटिंग पुन्हा स्तब्ध होते. काही वेळानंतर डी. सी. हाक मारतात, 'सर!' सुबिमलबाबू डी. सी. कडे पहातात. हा सगळा कल्चरल फंक्शनचा मामला असल्याने आम्ही दोघाजणांना या मीटिंगला येण्याबद्दल विशेष अशी विनंती केली होती-उपेनबाबू आणि समीर बाबू. उपेनबाबूंची प्रकृती बरी नाहीय्'

मागील बाजूकडून उद्योगमंत्री म्हणतात, 'उपेनबाबू म्हणजे उपेनदा? म्हणजे, उपेन

बर्मन मशाई?'

डी.सी. त्या दिशेने मान वळवून म्हणतात, 'हो, सर.'

'ते या सगळ्या मामल्यात आहेत की काय?'

'नाही, सर; पण जिल्ह्यातले एक ओल्ड सिटिझन म्हणून त्यांच्या मताचंही एक विशेष मूल्य असू शकतं ना! दुपारच्या सुमारास एकदा येण्याचा प्रयत्न करतो असं ते म्हणालेयत. पण मला ते म्हणाले, की या कल्चरल फंक्शनशी एखादा पोलिटिकल मामला जोडणं उचित नाही.' डी. सी. मान वळवून हे सारं उद्योगमंत्र्यांशी बोलत असल्याने मिटिंगमधल्या सगळ्यांना ते ऐकू येत नाही. पण हे ऐकून उद्योगमंत्री सरळ होऊन बसतात आणि म्हणतात, 'हे मीटिंगमध्ये सांगा ना, की उपेन्द्रनाथ बर्मन यांच्यासारखे सीनियर लोकही म्हणताहेत की फंक्शन व्हावं, पण मेळावा-बिळावा काही होऊ नये.' उद्योगमंत्री हे इतक्या जोरात म्हणतात की मीटिंगमधले सगळे लोक सावरून बसतात. जणू उपेनबाबूंच्या या मतानंतर यासंदर्भात आता काहीच चर्चा होणार नाही, मीटिंग जणू इथेच संपली. उपेन्द्रनाथ बर्मन यांच्या नावावर विशेषत: उत्तरखंडी लोकांमध्ये एक प्रतिक्रिया होते. राजवंशी समाजातली इतर कोणतीही व्यक्ती उपेन्द्रनाथ बर्मन यांच्याइतकी संपूर्ण भारतभर आदरणीय मानली जात नाही. परंतु आयुष्यात इतकं यशस्वी होऊनही आपण राजबन्शी आहोत हे ते कधीही कमीपणाचं मानत नाहीत. राजवंशी समाजातील इतर ज्या ज्या लोकांना देशातील नाना ठिकाणी नाना प्रकारे सन्मान मिळाले आहेत, ते अता स्वत:ला राजवंशी म्हणवत नाहीत, किंवा मग राजा प्रसन्नदेव रायकत यांच्यासारखे जमीनदार आहेत. उपेन्द्रनाथांचं मत फेटाळणं कोणाही उत्तरखण्डी माणसाला शक्य नाही, सरकारलाही नाही.

संतोषबाबू वीरेनबाबूंशी कानात बोलण्यासाठी जितक्या हळू आवाजात बोलता येणं शक्य आहे तितक्या हळू आवाजात म्हणतात, 'यावरून किमान हे सिद्ध होतंय की काँग्रेसचे लोक उत्तरखंड पक्षाच्या पाठीशी नाहीत, कारण उपेनबाबू पक्के काँग्रेसी आहेत.'

सन्तोषबाबूंचं हे वाक्य सगळ्यांना ऐकू जातं, किंबहुना, सगळ्यांना ऐकवण्यासाठीच ते हे म्हणाहेत. खरं तर, उपेनबाबूंच्या नावामुळे मीटिंगमध्ये सरकारच्या मताला जे समर्थन तयार होत चाललं होतं, ते नष्ट व्हावं, त्याला छेद बसावा हाच सन्तोषबाबूंचा खरा हेतू होता.

उद्योगमंत्री मान वळवून म्हणाले, 'सन्तोषबाबू, उपेनदांना या सगळ्यामध्ये ओढू नका. आफ्टर ऑल ही इज अबव्ह पेटी पॉलिटिक्स. त्यांच्याबद्दल आपणा सर्वांनाच आदर वाटतो. ते जर इथे आले तर खूप चांगलं होईल.'

संतोषबाबू म्हणतात, 'अरे, आम्ही कधी उपेनबाबूंचं नाव घेतलं? आपणच तर

घेतलंत! त्यांना तर या सगळ्यातलं काहीच ठाऊक नाही. आपण काय ब्रीफ करताहात ते आपल्यालाच ठाऊक आहे. आता आपण त्यांचं नांव घेऊन एक डिसिजन आमच्यावर लादता आहात.'

सुबिमलबाबू जरा हसून म्हणतात, 'तुमच्यासारख्या अॅडव्होकेटला कूचबिहारहून धरून आणलंय-आता डिसिजन काय सहजपणे होणार आहे?'

संतोषबाबूही थोडं हसून म्हणतात, 'त्यांनी तर तुम्हालासुद्धा कूचबिहारहून धरून आणलंय. तर मग मीटिंगमध्ये तुम्हीही बोलू नका, मीही बोलणार नाही जलपाइगुडीचा मामला यांनी इथे बसूनच मिटवावा.'

मयनागुडीचे एम.एल.ए. हो: हो: करीत हसतात. ऑफिसर्सनाही हसू फुटतं. मेळावा आणि सांस्कृतिक कार्यक्रमाशी संबधित लोकांमध्ये एक समर्थनाची कुजबूज उठते. दोन्ही बाजूंच्या लोकांमधील या हशामुळे मीटिंगमध्ये निर्माण झालेला ताण नष्ट होतो.

हा हशा थांबल्यानंतर वीरेनबाबू घसा खाकरतात, पण ते कुणाच्या लक्षात येत नाही. ते एक हात वर करतात. ते सुद्धा कुणाच्या लक्षात येत नाही. अचानक संतोषबाबू इंग्लिशमध्ये म्हणतात, 'मिस्टर मिनिस्टर्स, कृपा करून जरा लक्ष द्या, वीरेन्द्रनाथ बसुनिया, या जिल्ह्यातले एक पहिल्या दर्जाचे वकील; कलकत्ता हायकोर्ट सुद्धा ज्यांच्यामुळे उपकृत झालं असतं आणि उपेनबाबूंइतकेच जे आदरणीय आहेत; जरी ते आपल्याला ठाऊक नसतील - त्यांना काही सांगायचंय आणि आपल्या माहितीसाठी सांगून ठेवतो. आज आपल्यामध्ये देवनाथ रायसुद्धा आहेत. ते राजबन्शी समाजातले पाहिजे पी.एच.डी.'

मयनागुडीचे एम.एल.ए. हेमेनबाबू आणि वनविभागाचे राष्ट्रमंत्री खूप उत्सुकतेने वीरेनबाबूकडे पहातात. वीरेनबाबू टेबलाकडे पहात होते. ते बहुधा या मंत्र्यांना पाहू शकत नाहीत. हेमेनबाबू म्हणतात, 'काका, आपण बोला भुवन मोहनबाबू सुद्धा म्हणतात, 'दादा, बोला, बोला.' सगळे स्तब्ध बसतात. वीरेनबाबू पुन्हा आवाज साफ करू म्हणतात, 'मला एक गोष्ट सांगा, आपण या मामल्याकडे कायद्याच्या दृष्टीने पहातो आहोत, की राजकारणाच्या दृष्टीने पहातो आहोत, की प्रशासकीय दृष्टीने पहातो आहोत?'

वीरेनबाबू थांबतात. त्यांचं हळू आवाजातलं बोलणं ऐकण्यासाठी ऑफिसर्स टेबलावर पुढे सरकतात. उद्योगमंत्री आपल्या खुर्चीतच पुढे सरकतात. फक्त संतोषबाबू एकटेच खुर्चीत टेकून बसून सगळ्यांच्याकडे हसतमुखाने पहातात. जणू वीरेनबाबू काय बोलणार आहेत आणि त्यामुळे मीटिंगची अवस्था कशी होणार आहे हे त्यांना ठाऊक आहे. किंवा, वीरेनबाबूंच्या अगदी जवळ बसलेले असल्याने त्याचं बोलणं संतोषबाबू सर्वात अधिक स्पष्टपणे ऐकू शकत होते आणि त्यासाठी त्यांना काही विशेष प्रयत्न करावे

लागत नव्हते. वीरेनबाबू जणू आपल्या प्रश्नाच्या उत्तरासाठी वेळ देतात; त्यानंतर पुन्हा बोलणं सुरू करतात.

'माननीय पर्यटनमंत्री या मीटिंगच्या सुरुवातीला म्हणाले, की ज्यांनी अनुमती घेतलीय ते लोक फंक्शन करू शकतात, मात्र त्याबरोबर मेळावा करता येणार नाही. तेव्हा हा कायद्याचा प्रश्न आहे. आणि त्यानंतर इतरांच्या बोलण्यावरून मला वाटलं, की मेळावा आणि सांस्कृतिक कार्यक्रम एकाच ठिकाणी झाल्यास सरकारला कायदा आणि सुव्यवस्थेविषयी शंका वाटतेय्. आम्हाला मेळावा आणि सांस्कृतिक कार्यक्रम दोन्हीही करायचे आहेत आणि ते शान्तिपूर्ण मार्गाने शांततेने करायचे आहेत. त्या व्यतिरिक्त, इथे काँग्रेस आणि उत्तरखंड यांचा विषय निघालाय. तो राजकारणाचा प्रश्न आहे. इथे आपल्याला कोणत्या प्रश्नावर चर्चा करायची आहे हे आपण आधी ठरवल्याशिवाय आपल्याला कुठल्याही निर्णयाप्रत येणं अशक्य आहे. नाहीतर मग आम्हाला असं वाटू शकतं, की कुठल्याही मार्गाने सरकार आपली इच्छा आमच्यावर लादतं आहे.'

उद्योगमंत्री खुर्ची जरा पुढे सरकवतात. सुबिमलबाबू खुर्चीच्या हातांवर कोपर ठेवून हात उभे ठेवतात आणि दोन्ही पाय हलवीत रहातात. मयनागुडीचे एम.एल.ए. आपला चेहेरा पुढे करून म्हणतात, 'काका, आपणच सांगा ना-कायद्याची गोष्ट बाजूला ठेवा, पण एकाच दिवशी श्रीदेवीचा नाच आणि आपला मेळावा झाला, तर काय प्रचंड गोंधळाची अवस्था निर्माण होईल-पोलिसांच्या सहाय्यानेही नीट नियंत्रण ठेवता येणार नाही. श्रीदेवीच्या नाचाला तर म्हणे अगदी आसाम बिहारमधूनसुद्धा ट्रक भर-भरून लोक येणार आहेत.'

सुबिमलबाबू पाय हलवता हलवता थोडंसं हसून म्हणतात, 'संतोषच कूचबिहारहून दोन ट्रक भरून माणसं घेऊन येईल ना!'

त्याबरोबर संतोषबाबू म्हणतात, 'दोन ट्रक कसे काय? तुम्हीच तर त्या दिवशी फोन करून म्हणालात, की तुम्हाला एक वेगळा ट्रक हवाय, पण मंत्र्यांच्या नावाने ट्रक भाड्याने घेतला, तर बरं दिसत नाही म्हणून मी भाड्याने घेऊन ठेवावा. तो ट्रक धरून एकूण तीन ट्रक!'

सगळेच, एवढंच काय अगदी ऑफिसर्ससुद्धा यावर हो: हो: करीत हसू लागल्याबरोबर हेमेनबाबू उभे राहून एकदा सुबिमलबाबूकडे आणि एकदा संतोषबाबूंकडे मान वळवून मोठ्याने म्हणतात, 'सुबिमलदा, संतोषदा, आपणा दोन मित्रांमधली ही फ्रेंडली मॅच थांबवा बरं! मीटिंग तर संपवायला हवी ना! काका, बोला.'

वीरेनबाबू आवाज साफ करून हात वर उचलतात. संतोषबाबू त्या हाताकडे पाहून थोडे हसतात. वीरेनबाबू कोर्टात बोलताना आपला सर्वात वजनदार मुद्दा मांडताना या

प्रकारे आपला डावा हात थोडासा वर उचलतात. टेबलाकडे पहात वीरेनबाबू म्हणतात, 'मयनागुडीचे एम.एल.ए. जे काही बोलले, तोच जर या मीटिंगचा विषय असेल, तर त्याचं उत्तर खूप सरळ आहे. श्रीदेवी काही रोज नाचणार नाही, आणि आमच्या मेळावा दुपारी एक वाजायच्या आतच संपतोय त्यानंतर पाच तासांनी सांस्कृतिक कार्यक्रम सरु होतोय. तेव्हा मेळाव्याचे लोक आणि कार्यक्रमाचे लोक कधीही एकमेकांमध्ये मिसळणार नाहीत.

वीरेनबाबू थांबल्याबरोबर हेमेनबाबू म्हणतात, 'वा:! त्यामुळेच तर क्रायासिस आहे. श्रीदेवीचा नाच होणार रात्री आणि आपली जल्पेश्वर मोहीम होणार सकाळी. मग?'

सगळेजण वीरेनबाबूंकडे पहातात. ते आपली पोझ रेसभरही बदलत नाहीत, आवाज थोडासुद्धा वाढवीत नाहीत. अपरिवर्तित स्वर आणि ढब यांच्यामुळे ते सहजच सर्वांचं लक्ष सर्वात अधिक वेधून घेतात. कधी-कधी हे त्यांचं कौशल्यच वाटतं.

प्रतिपक्षावर ते सरळसरळ कधीही हल्ला करीत नाहीत. हा त्यांचा स्वभावच आहे असं अनेकदा वाटतं. वीरेनबाबू म्हणाले, 'आमच्या कार्यक्रमपत्रिकेनुसार श्रीदेवीचा कार्यक्रम रात्री नऊ ते साडेअकरा या वेळात होणार आहे. कार्यक्रमाच्या वेळेत वाढ मुळीच होणार नाही, कारण, कार्यक्रम संपवून श्रीदेवी शिलिगुडीला आपल्या हॉटेलवर परत जाईल. एवढंच काय, कार्यक्रम सुरु व्हायला उशीर झाला, तरी श्रीदेवी आपला कार्यक्रम साडेअकरालाच संपवील. त्यापुढच्या प्रत्येक मिनिटासाठी आम्हाला इतके अधिक पैसे द्यावे. लागतील, की तितके पैसे देणे हे आम्हाला अशक्य आहे. रात्री साडेअकराला आमचा कार्यक्रम संपणार आणि सकाळी सहा वाजता जल्पेश्वर शिवाच्या मंदिराकडे मिरवणूक. दरम्यान साडेसहा तासांचा वेळ आहे. त्यामुळे श्रीदेवीच्या नाचासाठी जमलेली गर्दी आणि जल्पेश्वर शिवमंदिराकडे जाणाऱ्यांची गर्दी कुठल्याही परिस्थितीत एकमेकांत मिसळण्याची शक्यता नाही. त्याशिवाय याच भागात रहाणारे लोक म्हणून तुम्हाला ठाऊकच आहे, की वर्षातल्या याच काळात जल्पेश्वर शिवमंदिराकडे नाना ठिकाणांहून नाना तीर्थयात्र्यांचे गट येतात. मेळाव्याचा किंवा कार्यक्रमाचा त्या यात्रेकरूशी कुठलाही संबंध नाही. आम्ही आमच्या मेळाव्याचा आणि कार्यक्रमाचा शेवटचा दिवस चिरकाल चालत आलेल्या या तीर्थयात्रेला जोडून घेतलाय. तीर्थयात्रेसाठी सरकारच्या अनुमतीची कधीही आवश्यकता नसते. उलट यात्रेकरूची गैरसोय होऊ नये म्हणून सरकारच यथायोग्य व्यवस्था करीत आलं आहे, यावर्षीही करतंय आणि यापुढेही नक्कीच करील.'

सगळेजण अगदी स्तब्ध राहून वीरेनबाबूंचं हलक्या आवाजातलं हे बोलणं ऐकूतात. कुणीतरी एकजण जोरजोराने निश्वास टाकीत होता, त्याच्याजवळ बसलेल्या माणूस त्याला थांबवतो. वीरेनबाबूंचं बोलणं थांबल्यावर, त्यांचं बोलणं संपलं की नाही हे समजण्यासाठी

जो अधिकचा वेळ थांबावं लागतं, तो वेळ पूर्ण झाल्यावर शास्त्रीय गायनाला वाहवा देण्याच्या हावभावात संतोषबाबू मान हलवतात आणि दबल्या आवाजात म्हणतात, 'ऑरग्युमेंट, ऑरग्युमेंट-सुबिमल, किती दिवसांपासून म्हणतोय. की हायकोर्टाचा एक बेंच इथे बसवा, वीरेनबाबूंसारख्या सगळ्या लीगल टॅलेंटला तुम्हाला कामाला लावता आलं असतं! तुमचं उत्तरखंड झालं नसतं, कामतापूरही झालं नसतं. वा:! काय लीगल टॅलेंट! काय ऑरग्युमेंट!'

## एकशे पासष्ट

# श्रीदेवीचा नाच व जल्पेश मोहिमेसंदर्भात राजकारण

उद्योगमंत्र्यांना खुर्ची ओढून टेबलापर्यंत आणावी लागते. त्यानंतर टेबलावर दोन हात ठेवून ते म्हणतात, 'वीरेनदा, 'अंकांच्या हिशेबाने आपलं म्हणणं ठीक आहे, पण बेअंकांचा हिशेब काय?'

उद्योगमंत्री वीरेनबाबूंना ओळखीत नाहीत. राजकारणाच्या संदर्भातही त्यांचा परिचय उद्योगमंत्र्यांना कधी झाला नाही. पण त्यांच्या हे लक्षात आलंय वीरेनबाबूच आता हा घोळ सावरू शकतात. त्याशिवाय डेप्युटी कमिशनरनी त्यांना एक कागद आधीच दाखवलाय त्यात हा कार्यक्रम आयोजित करणाऱ्या पार्टनर्सची नावं आणि परिचय होता. कार्यक्रमाचे आणि मेळाव्याचे व्यवस्थापक म्हणून त्यात या वीरेन्द्रनाथ बसुनियांचं नावही आहे.

उद्योगमंत्र्यांचा आणखीही एक हेतू होता तो म्हणजे, वीरेनबाबूंच्या मुद्द्यांमुळे सभेवर जो प्रभाव पडला होता, तो थोडासा कमी करणं.

किंवा बहुधा अनुभवानेच त्यांना समजलं असेल, की समस्या सोडवण्याचा, तिच्यावर उपाय सापडण्याचा क्षण आला आहे, त्याचा उपयोग करून घेतला पाहिजे. सुबिमलबाबू उजव्या गुडघ्यावर डावा पाय टाकून डावा गुडघा नाचवताहेत. पांढरी चादर ओठांपर्यंत ओढलेली आहे, पण आता ते जरा डावीकडे सरकून बसले आहेत. त्यांच्या डोळ्यांत आणि चेहेऱ्यावर प्रशंसेचं स्मित आहे. आणि या सर्वाचा परिपाक म्हणून, जे सुबिमलबाबू स्वत: होऊनच अध्यक्षपद बळकावून बसले होते, तेच आता मीटिंगच्या या क्लायमॅक्सच्या क्षणी मीटींगच्या विषयापासून सर्वांत दूर असलेले वाटताहेत. एवढंच काय, ते जणू त्यांच्या प्रतिपक्षाबद्दल सहानुभूतिशीलही वाटताहेत.

उद्योगमंत्र्यांच्या प्रश्नाचं उत्तर म्हणून वीरेनबाबू डोळे वर उचलून पहातात. संतोषबाबू विचारतात, 'बेअंकांचा हिशेब काय ते सांगा.

उद्योगमंत्र्यांच्या बोलण्याच्या सुरावरून उत्तरखंडी लोकांच्या आणि कार्यक्रमाच्या आयोजकांच्या जणू अचानक लक्षात येतं, की मेळावा किंवा कार्यक्रम रद्द होत नाहीय, वीरेनबाबूंनी जबरदस्त युक्तिवाद मांडलाय; किंवा वीरेनबाबूंचा युक्तिवाद जबरदस्त आहे हे मंत्र्यांनी मान्य केलंय.

इच्छा असूनही उद्योगमंत्र्यांनी हे सांगितलं नाही की काय हे समजणार नाही, कळणारही नाही. इतका सूक्ष्म हिशेब करून बोलणं बहुधा शक्यही नाही. पण उद्योगमंत्र्यांचा एक स्थूल हिशेब असा होता, की आज काय किंवा उद्या काय,. मेळावा आणि कार्यक्रम कुठल्याही परिस्थितीत रद्द करता येणार नाही. जर कुठल्यातरी प्रकारे जल्पेश्वर मोहिम थांबवता आली किंवा आधी घेता आली, किंवा मेळावा जरा आधी घेण्यासाठी यांना राजी करता आलं, तरी ते पुरेसं आहे.

उद्योगमंत्री म्हणतात, 'आम्हाला फक्त कायद्याच्या दृष्टीतूनच श्रीदेवाचा नाच आणि आपली जल्पेश्वर मोहिम एकाच रात्रीत होतेय याबद्दल शंका वाटतेय. नाना ठिकाणचे लोक येणार, आपल्या मिरवणुकीतही लोक येणार, रात्रीतच तर काही सगळ्या लोकांना परत जाता यणार नाही, बऱ्याचसे लोक कार्यक्रमाच्या ठिकाणीच थांबतील, कुणीही एखादा मिसक्रियन्ट गोंधळ सुरू करून देऊ शकतो.

'ते तर असला इसम कुठल्याही दिवशी करू शकतो', संतोषबाबू म्हणतात.

'ते खरंय, पण कलकत्त्यात श्रीदेवीचा नुस्ता एखादा सिनेमा लागला, तरी गर्दी हाताबाहेर जाऊ नये म्हणून पोलिस-पोस्टिंग करावं लागतं, आणि इथे तर अगदी हाडामांसाची श्रीदेवी येणार आहे. मी काही अद्याप तिला पाहिलेलं नाही. पण मला रिपोर्ट मिळालाय की ती सेक्स सिम्बॉल आहे. आपण आपल्या राजकीय कार्यक्रमाच्या वेळी अशा आर्टिस्टला आणलं कशासाठी ते काही मला समजलं नाही. ते काहीही असो, आपली मिरवणूक एकदिवस आधी घ्या.' 'मिरवणूक म्हणजे जल्पेश्वर मोहिम?' संतोषबाबू विचारतात.

मेळावा आणि कार्यक्रमाच्या आयोजकांमधून आक्षेपाची कुजबूज ऐकू येते. संतोषबाबू एकदा मागे वळून पहातात. त्यानंतर जवळच बसलेल्या नकुलबाबूंशी बोलून हे कितपत शक्य किंवा अशक्य आहे हे अजमावून पहातात. आपल्या वकिली बुद्धिमुळे, श्रीदेवीचा नाच आणि जल्पेश्वर मोहिम यांचा दिवस आणि वेळ बदलणं मुळीच शक्य नाही हा निष्कर्ष संतोषबाबू काढतात. या विषयावर आपसात काही समझौता होणार नाही. इतर कुठला विषय असता, तर समझौता होऊ शकला असता.

सुस्थिर उभा राहून म्हणतो, 'माननीय मंत्रीमहोदयांना आम्ही उत्तरखण्डी विनंती करतो आहोत, की श्री. वीरेन बसुनिया यांनी जे युक्तिवाद केले आहेत, त्यातील प्रत्येकावर मंत्रीमहोदयांनी आलोचना करावी; अन्यथा आम्हाला ज्याप्रकारे मेळावा आणि

कार्यक्रम करायचा आहे, त्याप्रकारे तो करू द्यावा. आम्ही आमच्या कार्यक्रमपत्रिकेत कुठलाही बदल करणार नाही.'

मयनागुडीचे एम.एल.ए. हेमेनबाबू चटकन उठून उभे रहातात. त्यांच्या गळ्याभोवतीची चादर आता अर्धी त्यांच्या गळ्याभोवती आणि अर्धी खुर्चीवर आहे. उजव्या हाताने चादर खुर्चीवर टाकून ते म्हणतात, 'हे पहा, मला एक सांगायचंय. वीरेनकाकांनीच मुद्दा उपस्थित केला मी उभा राहूनच बोलतो, कारण मला सगळ्यांचे चेहेरे पहायचे आहेत. वीरेनकाका म्हणाले, की या विषयाला तीन बाजू आहेत-कायद्याची बाजू, कायदा सुव्यवस्था यांची बाजू आणि राजकारणाची बाजू. राजकारणाच्या बाजूची आम्ही कुणी इथे आतापर्यंत समीक्षा केली नाही, पण ती करणं उचित ठरेल. उत्तरखंड आंदोलन ही फुटीरतावादी चळवळ आहे किंवा कसे तसंच उत्तरबंगाल हा पश्चिमबंगालमध्ये राहूनच वाचेल की बाहेर पडून वाचेल हे राजकारणाचे मुद्दे आहेत आणि त्यांची समीक्षा व्हायला हवी, त्यांच्यावर चर्चा व्हायला हवी. पण ती या मीटिंगमध्ये होऊ नये, बाहेरच्या एखाद्या सभेत व्हावी. जाहीर सभेत व्हावी. पब्लिक मीटिंगमध्ये व्हावी; बैठक-मीटिंगमध्ये व्हावी. सर्व ठिकाणी या विषयांवर चर्चासमीक्षा व्हायला हवी. आमच्या पार्टीच्या वतीने आम्ही त्या राजनैतिक चर्चेत उतरू, आपणही उतरा. पण उद्योगमंत्र्यांचा चांगला प्रस्ताव आपण फेटाळून लावलात. आपली मिरवणूक आपण एक दिवस आधी घेतल्याने आपलं काय नुकसान झालं असतं? पण आपण त्याला राजी झाला नाहीत. मग आपणच सांगा सरकार मयनागुडी आणि आसपासच्या नागरिकांच्या सुरक्षिततेच्या संदर्भात कसं काय गप्प रहाणार? आपण कुणाकुणाला हाताशी धरून या कार्यक्रमाला लागणारा पैसा जमवलाय? त्या कार्यक्रमाचे पार्टनर्स कोण आहेत? रामगोपाल आगरवाल-उत्तरबंगाल आणि नेपाळ यांच्यामध्ये जो चोरटा व्यापार चालतो, त्यात सर्वांत अधिक पैसे गुंतवणारा हा स्मगलर तुमच्या या समितीत आहे.' यावर उत्तरखंडी लोकांमध्ये थोडी कुजबूज सुरू होताच हेमेनबाबू आपला आवाज आणखी थोडा वाढवतात. त्यामुळे त्यांचं भाषण हे एखाद्या जाहीर सभेतल्या भाषणासारखं वाटू लागतं. ऑफिसर्स माना खाली घालून ऐकतात. 'आपला आणखी एक पार्टनर आहे. सुखराम बर्मन तंबाखूच्या स्मगलिंगमध्ये लक्षाधीश होऊन त्याने अगदी स्वत:चं नावसुद्धा बदललंय बहुधा. आता तो ओळखला जातो अमिताभ बच्चन म्हणून! आपला आणखी एक पार्टनर असिन्दिर राय. गयानाथ जोतदाराचा जावई. गयानाथ जोतदार सेटलमेंटविरुद्ध खटला भरून तिस्ता बंधाऱ्याचं काम बंद करायचं कारस्थान करतोय आणि एकीकडं फॉरेस्ट डिपार्टमेंटशी संगनमत करून, फॉरेस्टमधली झाडं कापून, ती विकून एक नवा बडा आसामी झालाय. आपले जे पार्टनर्स आहेत, त्यांचे असलेच तर धंदे आहेत. आपणाला जर उत्तरखंड मेळावाच करायचाय तर आपण असल्या लोकांवर कशासाठी अवलंबून आहात? कारण, आपणाला पैशांची गरज आहे. हे लोक आपणाला पैसा देताहेत. हे लोक आपणाला पैसा देऊन

मुंबईहून श्रीदेवी आणून देणार आहेत आणि आपण तो पैसा आणि तेच लोक घेऊन जल्पेश्वर शिवाच्या नावाखाली सरकारविरोधी मोर्चा काढणार आहात. सरकारविरोधी मोर्चालाही आमची हरकत नाही; पण आपण जल्पेश्वर शिवाच्या पवित्र नावाला आपल्या क्षुद्र स्वार्थासाठी वापरणार आहात. तिथे तिस्तामाईच्या पूजेचा समारंभ होईल. त्या पूजेच्या शेवटी तिस्ता-बंधाऱ्याविरुद्ध चळवळ उभारण्याची आपण शपथ घेणार आहात- कशासाठी? तर गयानाथ जोतदाराने गोचिमारी, बासुसूबा, गाजोलडोबा या भागांत वंशपरंपरेने जी जमीन बेकायदेशीरपणे बळकावलेली आहे, ती जमीन सरकारने तिस्ता बंधाऱ्यासाठी घेऊ नये म्हणून! तिस्ता-बंधारा झाल्यास लाखो-लाखो कृषकांवर उपकार होणार आहेत, त्यांचं हित होणार आहे. आपणाला ते नकोय. आपणाला हवं आहे ते गयानाथ जोतदार, रामगोपाल आगरवाल अभिताभ बच्चन यांच्यासारख्या काळाबाजारवाल्यांचं आणि स्मगलर्सचं हित! वीरेनकाकांनी या सगळ्या गोष्टींचा विचार करावा. जे स्पष्ट आहे, ते आडपडदा न ठेवता सरळ-सरळ सांगितलेलंच चांगलं. श्रीदेवी की हेमा मालिनी - तुम्हाला जिचा नाच पहायचाय तिचा नाच पहा; पण या नाचाच्या नावाखाली आपण हजारो-हजारो लोकांना जल्पेश्वरासारख्या तीर्थक्षेत्री घेऊन जाणार असाल आणि तिस्ता - बंधाऱ्याविरुद्ध आंदोलन उभं करणार असाल, तर ते आम्ही होऊ देणार नाही. तसं झालं तर मग आम्हीही प्रत्युत्तर म्हणून एक मोर्चा काढू. या महिन्याभरातच आपले मुख्यमंत्री तिस्ता बंधाऱ्याचं उद्‌घाटन करणार आहेत हे आपल्याला ठाऊक आहे. त्या उद्‌घाटनप्रसंगी विक्षोभ दाखवण्यासाठी उत्तरखंड, कामतापुरी, गोर्खालँड असे सगळेजण एकजूट करताहात. आपल्या या मेळाव्याचा हेतूसुद्धा या कामासाठी माणसं गोळा करणं हाच आहे. पण आम्हीही काही कच्च्या गुरूचे चेले नाहीत. बॉम्बेची श्रीदेवी कलकत्त्याला आणण्यासाठी किती खर्च लागतो ते आम्हाला ठाऊक आहे. हा पैसा कुठून येतोय हे सुद्धा आम्हाला ठाऊक आहे. पण मला स्पष्टपणे सांगायचंय, की हा मामला कायदा आणि सुव्यवस्था यांचाही नाही, कायद्याचाही नाही हा मामला आहे राजकारणाचा आपण राजकारण करताहात, तर मग आम्हीही राजकारणच करू.'

## एकशे सहासष्ट

# उपेन्द्रनाथ बर्मन व उभय पक्षांचं एकमत

शेवटचं वाक्य हेमेनबाबू धपदिशी खुर्चीत बसून बोलतात. बसल्याबरोबर ते चादर ओढतात. पण ते स्वतःच चादरीवर बसलेले असल्याने चादर बाहेर येत नाही. त्यामुळे हेमेनबाबू जरा उठून, चादर बाहेर काढून घेऊन ती खांद्यावर टाकतात.

हेमेनबाबूंच्या भाषणानंतर सगळ्या मीटिंगचं वातावरण बदलतं. त्यांचं भाषण चालू असतानाच वातावरण बदलत चाललं होतं; पण ते किती बदलेल हे लक्षात येत नव्हतं. वीरेनबाबूंच्या बोलण्यानंतरही मीटिंगची परिस्थिती बदलली होती, पण आताचा हा बदल त्या बदलासारखा नव्हता. वीरेनबाबूंनी मीटिंगच्या नियमानुसार, त्यांचं उल्लंघन न करता, मंत्री आणि ऑफिसर्सनी मांडलेल्या मुद्द्यांचा जबरदस्त प्रतिवाद केला होता. त्या प्रतिवादाचं वजन मान्य करूनच उद्योगमंत्र्यांनी थोडं नरम होऊन चर्चेचा एक प्रस्ताव मांडला होता. तो प्रस्ताव मान्य केला असता तर हेमेनबाबू बहुधा काहीच म्हणाले नसते. पण तो प्रस्ताव उत्तरखंडी लोकांनी मान्य न केल्याने हेमेनबाबूंनी मीटिंगमध्ये तोपर्यंत झालेल्या सगळ्या चर्चेवर पाणी ओतून, आजवर आणि या क्षणापर्यंत ज्या सगळ्या गोष्टी गुप्त होत्या, त्यांचा उद्धार केला. मेळावा आणि कार्यक्रमाशी संबंधित अनेकजण मनात उद्वेग घेऊनच मीटिंगला आले होते. पण मीटिंगचा एकूण रंग पाहून शेवटी मेळावाही होणार आणि कार्यक्रमही होणार असं त्यांना खात्रीने वाटू लागलं होतं. पण उद्योगमंत्र्यांचा प्रस्ताव फेटाळल्यानंतर हेमेनबाबू मीटिंगची परिस्थिती अशा प्रकारे बदलून टाकतील असं कुणालाच वाटलं नव्हतं.

हेमेनबाबू बसल्याबरोबर सुस्थिर उठून उभा रहातो, 'आमच्याविरुद्धचे सगळे मुद्दे मांडल्याबद्दल आमदार हेमेनबाबूंना धन्यवाद.' पण उद्योगमंत्री आपल्या खुर्चीवरून उठून सुस्थिरला म्हणतात, 'आपण बसा, बसा, आता यानंतर काहीही चर्चा होणार नाही, बसा.'

'आपण आम्हाला मीटिंगला बोलावून इथं आमचं म्हणणं मांडू देणार नाही?' म्हणत संतोषबाबू उभे रहातात, 'हेमेनबाबू वाटेल ते आरोप करीत जाणार? आम्हा राजवंशी लोकांची अस्मिता, धर्म आणि कल्चर यांच्यावर संशय करीत प्रश्न उभे करणार?' आता उद्योगमंत्री, सुस्थिर आणि संतोषबाबू असे तीनजण उभे आहेत, परंतु संतोषबाबू उंच असल्याने आणि त्यांचा आवाज जरा मोठा असल्याने संधी घेतात, 'हेमेनबाबूंना राजवंशी लोकांची संस्कृती आवडत नसेल, ते कम्युनिस्ट असल्यामुळे आता जल्पेश्वर मंदिराचं महात्म्य विसरले असतील, तिस्तामाईची पूजा हा त्यांना अंधश्रद्धेचा प्रकार वाटत असेल, पण जल्पेश्वर हे आमचं सर्वश्रेष्ठ दैवत आहे. तिस्तामाई ही आम्हाला गंगामाईसारखी आहे. तिस्ता नदी नाही, देवता आहे. हेमेनबाबूंना वाटलं तर त्यांनी तिस्ता-बंधाऱ्याची पूजा करावी, पण आम्ही तिस्तामाईचीच पूजा करणार. तो जर गुन्हा असेल, तर आमच्या हातून तो होणार. पण याप्रकारे आम्हाला-'

अचानक खाण्याच्या जागेच्या पार्टिशनजवळ काही लोकांची ये-जा सुरू होते आणि डेप्युटी कमिशनर चटकन् खुर्चीवरून उठून उद्योगमंत्र्यांशी काहीतरी कानगोष्ट करण्यासाठी बाहेर जातात. 'उपेनबाबू, उपेनबाबू,' असे शब्द ऐकू येतात.

उद्योगमंत्री बसण्याच्या जागेकडे एकदा चेहरा वळवून संतोषबाबूंना म्हणतात, 'उपेनदा आले आहेत, त्यामुळे तात्पुरती ही चर्चा जरा बंद ठेवावी. उपेनदांशी आम्ही सगळे जरा बोलून घेतो. त्यानंतर पुन्हा चर्चा सुरू होईल.' त्यामुळे संतोषबाबूंना बसावं लागतं.

सुबिमलबाबू पाय खाली करून बसतात; वनविभागाचे राष्ट्रमंत्री उठून उभे रहातात, उद्योगमंत्री बसण्याच्या जागेकडे निघून जातात, डी.सी. आणि एस्.डी.ओ. सुद्धा त्यांच्याबरोबर जातात, त्यामुळे मीटिंग विस्कळितच होते. उत्तरखंड पक्षाच्या लोकांपैकी काहीजण उपेनबाबूंना भेटायला म्हणून बसण्याच्या ठिकाणाकडे जातात, काहीजण दरवाजातून बाहेर जातात. वीरेनबाबू आपल्या जागीच बसून रहातात.

काही क्षणांतच मीटिंगमधले लोक विस्कळित होऊन इकडे-तिकडे पांगतात. बसण्याच्या खोलीत उपेनबाबूंना घेरून मंत्री, मीटिंगच्या टेबलवर इतर ऑफिसर्स आणि अन्य काहीजण, बाहेर व्हरांड्यात आणि मैदानात उत्तरखंड आणि कार्यक्रमांशी संबंधित लोक एकेक गट करून तावातावाने चर्चा करताहेत.

अशाच एका गटात सुस्थिर किंचाळून नकुलता म्हणतो, 'तुम्हाला वाटेल तिला नाचवा, आम्ही मेळावा घेणार, आता आम्ही या मीटिंगमध्ये थांबणार नाही.'

संतोषबाबू अचानक सुस्थिरचा खांदा डाव्या हाताने दाबून धरून उजव्या हाताची तर्जनी नाचवीत म्हणतात, 'तुमच्यासारख्या फायरब्रँड लोकांमुळेच आमचं उत्तरखंड मार खाणार. पहिली गोष्ट म्हणजे तुम्ही एक बेकायदेशीर काम करताहात- कॉन्फरन्ससाठी परमिशन घेत नाही. -त्यावर कडी म्हणजे परमिशन घेतलीय कल्चरल फंक्शनसाठी आणि करताहात मात्र पोलिटिकल कॉन्फरन्स. गव्हर्नमेण्टला वाटलं तर तुमची ही कॉन्फरन्स ते एका मिनीटात बंद करू शकतं. पण त्याची प्रतिक्रिया काय होईल याचा त्यांना अंदाज करता येत नाहीय म्हणून ते तसं धाडस करू शकत नाहीय. सरकारला पाठिंबा देणारे सगळे पक्ष जर तुमच्या अगेन्स्ट उतरले, तर काय कराल तुम्ही? त्यापेक्षा आताच एक कॉम्प्रोमाइझ मान्य करा. जल्पेश्वर मोहीम आपण करायचीच- ती जर तुम्ही करू शकत नसाल तर त्या कॉन्फरन्सला काही अर्थच नाही. त्यासाठी ती मोहीम एक दिवस आधी घ्यावी लागली किंवा ती सुरू करण्याची जागा बदलावी लागली, तर त्यासाठी राजी व्हा. तुम्ही जर सगळ्याच मुद्यांवर अडून बसलात, तर तेसुद्धा कसे काय राजी होतील? बोला! सगळ्यांना बोलवा, वीरेनदा कुठंयत?'

संतोषबाबू सुस्थिरच्या खांद्यावरून हात काढून घेतात. सुस्थिर तिथेच उभा रहातो- त्याच्या खांद्यावर शबनमबॅग आहे, डावा हात कोपरापाशी समकोणात वळवून त्याने पोट आणि छाती यांच्यामध्ये धरला आहे, उजवा हात हनुवटीपाशी, चेहेऱ्यावर थोडीशी दाढी.

या क्षणी त्याला खूप एकाकी वाटतं. जणू वीरेनबाबू, नकुलबाबू, संतोषबाबू हे सगळे एकमत झाल्यास त्याचं इथं काहीच काम नाही. तेव्हा सुस्थिर शारीरिक दृष्ट्याही एकटाच आहे फक्त संतोषबाबू तेवढे त्याच्यासमोर उभे आहेत, बाकीचे सगळे इतरांशी मीटिंग सुरू होण्याआधी चर्चा करून घेता यावी, म्हणून त्यांना बोलवायला पळाले आहेत.

नकुल-जगदीश मीटिंगच्या खोलीतून घाईघाईने बाहेर येतात म्हणतात, 'वीरेनकाकांना बोलावून घेऊन उपेनबाबू चर्चा करताहेत. आपल्यालाही ठरवायला हवं. इथेच बसा.' तोपर्यंत सुरेन, शान्ति, भूपेनबाबू त्यांच्याकडे येऊन त्यांच्याबरोबर जमिनीवरच बसतात. इथं आता इतक्या जणांना मैदानामध्ये गोल करून बसलेलं पाहून इकडं तिकडं विखरून उभे राहिलेले लोकही त्यांच्याभोवती येऊन बसतात. इथं आता दबलेल्या आवाजातली एक वेगळी मीटिंगच जणू सुरू होते.

काही वेळानंतर व्हरांड्यातून हाका मारायला सुरूवात होते, 'सगळेजण या, मीटिंग, मीटिंग!'

हे ऐकून ते सगळेजण उठून मीटिंगच्या खोलीच्या दिशेने निघतात. नवीन कुणी आलेलं नाही. उलट दोनतीन जण निघून गेलेले असावेत. कोण कुठं बसलं होतं त्या जागा ठरलेल्या आहेत. त्यामुळे मीटिंग पुन्हा पहिल्याप्रमाणे बसायला उशीर लागत नाही. फरक फक्त एकच आहे - वीरेनबाबूंचं म्हणणं ऐकल्यानंतर उद्योगमंत्र्यांनी आपली खुर्ची जिथं ओढून ठेवली होती, त्या खुर्चीवर उपेनबाबू बसले आहेत, आणि उपेनबाबूंच्या शेजारच्या खुर्चीवरच उद्योगमंत्री. सगळे ऑफिसर्स त्यामुळे एकेक खुर्ची पुढे सरकले आहेत.

उद्योगमंत्री उठून म्हणाले, 'आजच्या मीटिंगला येण्यासाठी उपेनबाबूंना विनंती केली होती. पण ते खूप आजारी आहेत. म्हणूनच आम्हा सर्वांना ते थोडावेळ भेटले. आता लगेच ते परत जाणार आहेत. म्हणूनच, आपणा सर्वांना भेटण्याची इच्छा त्यांनी प्रकट केली.'

उपेन्द्रनाथ उभे राहून नमस्कार करतात. सुस्थिर आणि इतर अनेकजण डोळे मोठमोठे करून दंतकथेच्या त्या नायकाकडे पहातात. उपेनबाबू केवळ त्या काळचे एक एम.ए.एल.एल.बी. च फक्त नाहीत; देशाने जे जे काम त्यांच्याकडे सोपवलं, त्या त्या जबाबदारीच्या क्षेत्रात त्यांनी आपला ठसा उमटवला दिल्लीत, कलकत्त्यात, लंडनमध्ये, लॉस एंजेलेसमध्ये. या राज्याची विधान-परिषद एके दिवशी या राजबन्शी माणसाच्या निर्देशाखाली संचालित होते, आणि उपेनबाबू आपण एक राजबन्शी आहोत हे जीवनात कधीही विसरत नाहीत. उपेन्द्रनाथांनी लिहिलेल्या जल्पेश्वर मंदिराच्या इतिहासाचा आता सुस्थिर आणि त्याचे भिन्न जल्पेश्वर मोहीमेसाठी प्रचार करीत आहेत. उपेंद्रनाथांची शाल

त्यांच्या डाव्या खांद्यावर व उजव्या बगलेखाली आहे. डोक्यावर विरळ केस, बारीक आणि लांब मिशा, पांढऱ्या झालेल्या चेहऱ्यावर स्मितहास्य-विनयाचं आणि आत्मविश्वासाचं. ते डोळे वर उचलू शकत नाहीत - जणू जरा संकोची आहेत. झब्ब्याच्या ढिल्या बाह्या झुलवीत नमस्कार करून हळू आवाजात म्हणतात, 'मी निघतोय. आपणा सर्वांना नमस्कार. सगळेजण मिळून-मिसळून, चर्चा करून एकमत होऊन सगळं ठीक करा. अच्छा,' असं म्हणून जरा वळून उभे रहातात. उद्योगमंत्री खुर्ची सरकवून उभे राहातात, त्यांच्याबरोबर सगळेजण नमस्कार करीत उभे रहातात. उद्योगमंत्री दोन पावलं पुढे जातात, डी.सी. मागच्या बाजूने म्हणतात, 'सर, मी त्यांना कारमध्ये बसवून येतो, आपण मीटिंगमध्ये बसा.' उपेन्द्रनाथ थोडे वळून, नमस्कार करून संथ पावलांनी बाहेर जातात. उद्योगमंत्री येऊन आपल्या आधीच्या खुर्चीत बसतात.

उद्योगमंत्री येऊन बसल्याबरोबर सन्तोषबाबू विचारतात, 'श्रीदेवी नाचणार आहे हे तर तुम्ही उपेनदांना सांगितलं नाही ना?'

सगळेजण हो: हो: करून हसू लागल्यावर सुबिमलबाबू म्हणतात, 'काय हेमेन, उपेनदांच्या हस्ते श्रीदेवीचा नाच ओपन करायची कल्पना कशी काय वाटते?'

यावर पुन्हा एकदा हशाची एक छोटी लहर उठते-जणू, आता सारेजण आपल्या कुटुंबातल्या बुजुर्गांशी मिळून एक निषिद्ध आनंद उपभोगताहेत - तिथे त्यांच्यामध्ये कुठलेही मतभेद नाहीत. डी.सी. येऊन आपल्या खुर्चीत बसतात. त्यामुळे उद्योगमंत्री आणि डी.सी. यांच्यामध्ये एक खुर्ची रिकामीच रहाते.

सन्तोषबाबू आपला लांब हात वर करून म्हणतात, 'सुबिमल, हे पहा, इनफ हीट हॅज् बीन जनरेटेड बाय् द् फायरी ओरॅटरी ऑफ् अवर एस्टीम्ड् एम्. एल्. ए. फ्रॉम मयनागुडी. त्याला तितकंच जळजळीत उत्तर देण्यासाठी आमचे ज्वलंत वक्ते सुस्थिरबाबू उभे राहिले खरे, पण उपेनदांच्या उपस्थितीमुळे पुढचा तमाशा वाचला.' सन्तोषबाबू हे सर्वांकडे आपली मान वळवून पहात म्हणाले, विशेषत: उत्तरखंडी लोकांकडे पहात. स्वत:ही थोडेसे हसले. त्यांच्याशेजारी नकुल हसऱ्या चेहेऱ्याने बसला होता, जणू आपल्या हास्यानेच त्याला नकुलबाबूंच्या प्रस्तावाला शक्य तितकं अनुमोदन द्यायचं आहे.

सन्तोषबाबू पुढे म्हणाले, 'कायदा आणि सुव्यवस्थेच्या संदर्भात सरकारला वाटत असलेली चिंता लक्षात घेऊन मी असा प्रस्ताव मांडतो, की उत्तरखंड मेळावा ज्या ठिकाणी आणि ज्या प्रकारे होणार आहे त्याच प्रकारे व्हावा; पण शेवटच्या दिवशीची जल्पेश्वर मोहीम मात्र मेळाव्याच्या ठिकाणाहून सूरू होता चौपत्तीपासून सुरु व्हावी.'

हेमेनबाबू त्याबरोबर म्हणतात, 'मोहीम रद्द करून टाका ना, बाकी सगळं करा. दुर्दैवी परिस्थितीमुळे मोहीम रद्द करा. चौपत्तीवर लोक उभे कुठं रहाणार?'

हेमेनबाबू आणि संतोषबाबू हसतात खरे, तसंच सन्तोषबाबूंचा प्रस्ताव सगळेच मान्य करतील असं वाटतं, पण हेमेनबाबू मोहीम रद्द करण्याचा आपला मुद्दा आणखी किती वेळ लावून धरणार आहेत याची बऱ्याच जणांना चिंता वाटते.

हेमेनबाबू म्हणतात, 'त्यापेक्षा जल्पेश्वराच्या दिशेने आणखी थोडं पुढे या, आपण टाऊनबाहेर लोकांना जमा करा.'

'ठीक आहे, तसंच करू!' म्हणून नकुल हात उंचावतो. यावर इतर कुणीही आक्षेप न घेतल्याने नकुल उभा राहून म्हणतो, 'माननीय पर्यटनमंत्री, उद्योगमंत्री, वनमंत्री आणि एम्. एल्. ए. साहेबांना मी आम्हा कल्चरल फंक्शनच्या पार्टनर्सच्या वतीने विनंती करतो, की त्यांनी या फंक्शनला, विशेषत: शेवटच्या दिवशी, सहकुटुंब उपस्थित रहावं.'

'अरे रहाणार आहोत म्हणून तर तुम्हाला इतकं डोकं फोडून सांगितलं, की बाबांनो, उत्तरखंड बाजूला ठेवा, श्रीदेवी असू द्या; पण तुम्ही तर काही ऐकलंच नाहीत!' असं म्हणून सुबिमलबाबू बऱ्याच वेळपासून बळकावलेल्या खुर्चीवरून उठतात.

## एकशे सदुसष्ट

# मेळावा आणि कार्यक्रमाचं मैदान

मयनागुडी ब्लॉक ऑफिसच्या जवळच्या मैदानावर प्रचंड मंडप - कापडाचा. आत वाळूवर ताडपत्री अंथरून त्यावर बसण्याची व्यवस्था. समोरच्या बाजूला, जरा कोपऱ्यात, घडी घालून ठेवलेल्या स्टीलच्या आणि लाकडाच्या खुर्च्या-त्या अगदी कुंपणापर्यंत आहेत. या खुर्च्यांमुळे प्रेक्षकांची काहीही गैरसोय होणार नाही. वाळूवर घातलेल्या ताडपत्रीच्या विभागाचे पुन्हा बांबू उभारून तीन भाग केलेले आहेत. फर्स्ट, सेकंड आणि थर्ड क्लास. पूर्वेच्या बाजूला एकही दरवाजा नाही. पश्चिमेच्या बाजूला तीन मोठे गेट आहेत, पण त्यांच्यावरही पडदे झुलताहेत. या पूर्व मंडपाला घेरून चारही बाजूंनी पत्र्याचं कुंपण आहे, ते बरंचसं बांबूंच्या आधार देऊन उभारलंय्. स्टेजच्या मागच्या बाजूला आणि जवळ लाकडी सांगाडा - त्यावर स्क्रूंच्या सहाय्याने पत्रे लावलेले. पत्र्यांच्या कुंपणातून आत येण्याचा मार्ग बराच रुंद आहे. त्या प्रवेशमार्गाचेही पुन्हा बांबूच्या साहाय्याने दोन भाग केलेले आहेत - पुरुषांसाठी आणि महिलांसाठी. स्टेजच्या पाठीमागे, स्टेजच्या जरा कमी उंचीवर, लाकडांच्या फळ्यांनी तयार केलेली ग्रीनरूम. ग्रीनरून आणि स्टेज लाकडाच्या सांगाड्यावर पत्रा लावून वेगळं केलेलं. बंद करण्यासाठी दोन बाजूंना दोन कोलॅप्सिबल् गेट - त्यांच्यामधून स्टेजवर प्रवेश करता येतो. ग्रीनरूमसाठीच आणखी एक लाकडी दरवाजा-गरज पडल्यास तो आतून बंद करता येतो.

या मंडपाच्या बाहेर, मैदानावर नाना प्रकारची दुकानं उभी राहिली आहेत-बरीचशी खाण्याच्या पदार्थांची. एका बऱ्याच लांब दुकानाची शेगडी बाहेरच्या बाजूला आहे. तिथे जिलेबी आणि शेव तळण्याची व्यवस्था. दुकानाच्या आत बसण्याची व्यवस्था आहे खरी, पण बरेचसे लोक बाहेर शेगडीसमोर उभे राहून वर्तमानपत्रांच्या कागदांच्या तुकड्यावर गरमगरम जिलेबी आणि शेव घेऊन खातात. म्हणूनच दुकानात दोन कॅशबॉक्स आहेत- एक दुकानाच्या आत आणि एक या शेगडीजवळ. या मोठ्या दुकानाव्यतिरिक्त छोटी आणि मध्यम अशी दुकानंही आहेत. फक्त एक टेबल आणि एक शेगडी असलेलं एक चहाचं दुकान आहे. मैदानावर प्लॅस्टिकची चादर अंथरून त्यावर साखरेच्या पाकात तयार केलेली सुकी मिठाई. एकजण ॲल्युमिनियमच्या कढईत रसगुल्ले आणि लाडू घेऊन एका स्टुलावर बसलाय्. वरती ताडपत्रीचं छत टाकून खाली जमिनीवर आडव्या ठेवलेल्या काचेच्या शोकेसमध्ये कागदावर लावलेले मुलांचे नाना प्रकारचे खोटे दागिने. मागे नाना प्रकारची प्लॅस्टिकची खेळणी. एका दुकानात तर प्लॅस्टिकच्या बादल्या आणि कुंडया यांचीही विक्री चाललीय्. खुल्या मैदानावर मागे टांगलेल्या एका पडद्यावर फुग्यांच्या ओळींवर ओळी. जरा दूर एका टेबलावर एक खेळण्यातली बंदूक ठेवलेली. त्या फुग्यांना नंबर दिलेले आहेत आणि खाली नंबर दिलेली नाना प्राइझेस्. ढबऱ्या पेटवून बसलेले खारेदाणेवाले आणि चिक्कीवाले, गुडदाणीवाले. रस्त्याने आत आल्यावर उजव्या-डाव्या बाजूंना दोन-दोन पान-सिगारेटचे ठेले-चौकीवर ठेवलेले. आत जाताना उजव्या बाजूच्या पान-सिगारेटच्या दुकानामागे सायकल, मोपेड, स्कूटर आणि मोटरसायकल ठेवण्याची जागा.

हे मैदान ब्लॉक ऑफिसजवळ आहे पण रस्त्यावरून या मैदानात प्रवेश करण्यासाठी कोणतीच व्यवस्था नाही. रस्ता मैदानाच्या पातळीपेक्षा खूपच उंचावर आहे. रस्त्यावरून माती सुटी होऊन खाली एका प्रचंड नाल्यात येऊन पडतेय्. या थंडीच्या दिवसात नाल्यामध्ये आता ती काळी माती आणि त्या मातीवर हिरव्या शेवाळाचं आवरण, पण सगळ्या ठिकाणी समान नाही. कुठे काळ्या मातीचा ढिगारा, तर कुठे त्या मातीचा खड्डा. हा नाला सरकारी मालकीच्या जमिनीवर आहे. त्यामुळे इथून कुणीही वाटेल तितकी माती काढून नेऊन आपल्या जमिनीची पातळी वाढवतोय्. त्यामुळे, रस्त्याजवळ एखाद्या सुकलेल्या कालव्यागत ही नाली दिसतेय.

रस्त्यावरून सरळ हा खोल खड्डा पार करून मैदानावर येणं शक्य नाही. या खड्ड्यावर बांबूचा किंवा लाकडाचा तात्पुरता साकवही उभारलेला नाही. पण श्रीदेवीच्या गाडीला मैदानावर येता यावं, म्हणून इतरांना बंदी असलेला एक कल्व्हर्ट बांधला आहे. ब्लॉक ऑफिसकडे येण्यासाठी असलेला मोठा कल्व्हर्टच मुख्य प्रवेशमार्ग आहे. त्या कल्व्हर्टवरून खड्डा पार करून, ब्लॉक ऑफिसच्या भिंतीला डावी घालून वळल्याबरोबर

मैदानात पोचता येतं. तिथं जे काही खड्डे होते, ते या नाल्यातली माती काढूनच भरून काढण्यात आले होते. दोन-चार ट्रक वाळू टाकून लेव्हल केल्यामुळे ही जागा जवळ-जवळ सदर रस्त्यासारखीच वाटतेय्. एक तर या ब्लॉक ऑफिसच्या भिंतीजवळची वाट इतकी अरुंद, पण त्या वाटेनेही मोटारसायकली येतात.

पण सदर रस्त्यावर या मेळाव्यासाठी एखादा पब्लिक साकव न बांधल्यामुळे गेटही उभारण्यात आलेला नाही. 'निखिल बंग उत्तरखण्ड सम्मिलन' लिहिलेला, निळ्या रंगाचा एक कापडी फलक मंडपाच्या मागचा बाजूला उंचावर टांगण्यात आला आहे, तर दुसरा पान-सिगारेटच्या दुकानाजवळ तिरपा टांगला आहे - दोन्ही फलक रस्त्याकडे तोंड करून लावण्यात आले आहेत. पण गेट नसल्यामुळे ते फलक कसेतरीच, अलग असे झुलताहेत. हे फलक रस्त्यावरून दिसतात हे खरं आहे, बसमधल्या लोकांनाही दिसतात, पण मेळाव्यातल्या लोकांना, मंडपातल्या लोकांना दिसू शकत नाहीत. पत्र्याच्या कुंपणावरही एक फलक टांगलाय्, पण त्याला दोरी न पुरल्याने इतक्या घड्या पडल्या आहेत, की तो नीट वाचता येत नाही. त्याशिवाय, त्या पत्र्यावर कागदावर लिहिलेली नाना पोस्टर्स आहेत-त्यांच्या वर कुठल्या दिवसी कुठला कार्यक्रम आहे हे लिहिलंय् - ती पोस्टर्सच जास्त दिसतात.

मयानागुडीच्या चौपत्तीवर एक गेट उभारलाय्. तसाच एक पेट्रोलपंपाजवळ. एकदम नॅशनल हायवेवर असल्यामुळे गेटची उंची अधिक ठेवावी लागलीय-आसाममधून आणि आसामकडे जाणाऱ्या, प्रचंड माल वाहून नेणाऱ्या ट्रक्सची वरची बाजू धडकू नये म्हणून. इतका उंच करण्यासाठी गेट इलेक्ट्रिक आणि फोन लाईन्सपेक्षा वरती उभारावा लागलाय्, पण त्याहीपेक्षा वरून जाणाऱ्या हाय्-व्होल्टेज लाईनपेक्षा बराच खाली ठेवावा लागलाय. इतक्या मोठ्या रस्त्याच्या रुंदीच्या या टोकापासून त्या टोकापर्यंत उभारल्याने हा गेट इतका रुंद आणि इतका उंच झालाय, की पाहून आश्चर्य वाटतं, डोळे त्यावर खिळून रहातात. त्या गेटच्या वरच्या बाजूला लिहिलंय् 'निखिल बंग उत्तरखंड सम्मिलन, मयनागुडी.' पण ते नजरेला पडणं मुश्किल. गेटचा वरचा भाग-माथा-जितका मोठा आहे, तितका त्याचा एकेक स्तंभ मोठा नाही. दोन स्तंभांना जोडणारा, त्यांच्यावरचा जो भाग, तोही अरुंद आहे. त्यामुळे गेट दोन्ही बाजूंच्या आणि माडीवरच्या दुकानांमध्ये, घरांच्या गर्दीत मिसळून गेलाय्. इतका मिसळून गेलाय्, की ट्रक किंवा बसमधून तो नजरेस पडतच नाही, एवढंच काय, रिक्षात चढतानासुद्धा दिसत नाही. पण एकदा दिसला, की मग वारंवार पहावं लागतं 'हो, इथं एक गेट झालाय् खरा!' सात दिवसांच्या या मेळाव्यासाठी जे लोक येणार-जाणार आहेत त्यांना हा गेट न पहाण्याशिवाय पर्याय काय? पण मेळाव्याच्या मूळ जागी एकही गेट नसल्याने चावडीजवळचा हा गेट म्हणजे मेळाव्याचाच गेट आहे हे लक्षात येत नाही.

मेळाव्याच्या मैदानामध्ये सायकली, मोपेडस्, मोटर-सायकली, स्कूटर लावण्यासाठी व्यवस्था आहे खरी, पण बैलगाड्या वगैरे लावायला कुठेच जागा नाही. रस्त्यावरून एक साकव तयार केला असता, तर या इतक्या मोठ्या मैदानाचा एक भाग बैलगाड्यांनी भरून गेला असता सगळ्याच बाजारांच्या रस्त्याकडेलाच रांगेने उभं करावं लागतं त्यामुळेही गैरसोय. नॅशनल हायवे असला, तरी हा रस्ता काही तेवढा रुंद नाही. अप्-डाऊन गाड्यांसाठी रस्ता मोकळा सोडल्यावर आणखी कितीशी जागा उरणार? तिथूनच तर हा रस्त्याकडेचा मोठा खड्डा सुरू होतो. त्या खड्ड्यात एखादी बैलगाडी पडली, तर ती वर काढणं मुश्किल. असं असल, तरी बैलगाडींची संख्या काही अगदीच कमी नाही. संध्याकाळच्या कार्यक्रम पहाण्यासाठी दुपारनंतरपासूनच आसपासच्या गावातली बायकापोरं चालत, रिक्षाने किंवा बैलगाडीतून यायला सुरुवात होते. फंक्शन सुरू व्हायच्या आधीच मैदान आणि रस्ता यांना एखाद्या जत्रेचं स्वरूप येतं, रस्त्यावर एकेका मोठ्या झाडाखाली बैलगाड्या सोडल्या जातात आणि बैलांना त्या गाड्यांच्या चाकांना, किंवा खुंट्या रोवून त्या खुंट्यांना दोऱ्यांनी बांधून ठेवलं जातं, आत घेऊन जाण्यासाठी त्यांचा देउनिया येत नाही, तोपर्यंत नाना रंगीत साड्या आणि कपडे घातलेली बायका आणि पोरं झाडाखालीच वाट पहातात.

## एकशे अडुसष्ट

# उद्घाटन-समारंभातील विविध भाषणांचा सारसंक्षेप

शनिवारी सकाळी मेळाव्याचं उद्घाटन झालं. वेळ होती सकाळी आठची; पण लोक जमता-जमता नऊ वाजले. सकाळी फक्त ध्वजारोहण आणि विशेष पाहुण्यांची भाषणं होती. ध्वजारोहण केलं राजवंशी समाजाचे मुख्य नेते पंचावन मल्लिक यांनी, आणि भाषणं केली आसाम आणि दार्जिलिंगहून आलेल्या दोन प्रतिनिधींनी आणि काही स्थानिक व्यक्तींना. ज्या स्थानिक व्यक्तींनी भाषणं केली, त्यांचा उत्तरखंड आंदोलनाशी थेट असा संबंध नव्हता, काही काही तर उतरखण्ड पक्षातही नव्हते. पण वेगवेगळ्या व्यवसायांमध्ये आणि राजकारणामध्ये त्यांना प्रतिष्ठा होती.

या कार्यक्रमाला, एवढ्या मोठ्या मंडपात फक्त शंभर-दीडशेंच्या आसपास लोक उपस्थित होते. त्यांच्यापैकी बरेचजण संध्याकाळच्या सांस्कृतिक कार्यक्रमाशी संबंधित कार्यकर्ते व पडद्यामागचे कलाकार होते. सुस्थिरबरोबर काम करणारे काही प्राथमिक शिक्षक एकत्रितपणे आले होते. आणखी, मयनागुडी बाजारातले जे व्यापारी सांस्कृतिक कार्यक्रमाशी संबंधित होते, त्यांच्यापैकीही काहीजण आले होते. त्याशिवाय विविध

प्रदेशांमधून काही प्रतिनिधी आले होते. मेळावा चालणार आहे, तितके दिवस ते इथे रहातील. याशिवाय जे राजवंशी नाहीत आणि उत्तरखण्ड चळवळीशी ज्यांचा कुठल्याही प्रकारे संबंध नाही असेही काहीजण मेळाव्यात उपस्थित होते. त्यांच्यापैकी एकजण १९७०-७१ साली लोटागुडी विभागात 'कृषकांचा मुक्त विभाग' तयार करायला जाऊन कृषकांच्या हाताचा मार खाऊन हॉस्पिटलमध्ये गेले होते, हॉस्पिटलमध्येच बिछान्यावरच त्यांना अटक करण्यात आली होती, त्यांच्या बिछान्यावरच काही पोलिस बसत. काही दिवसांनंतर त्यांना कलकत्त्याच्या एका हॉस्पिटलमध्ये दाखल करण्यात आलं होतं. तिथं त्यांच्या हाडाबिडांवर बरीच ऑपरेशन्स झाली होती आणि त्यानंतर त्यांना जेलमध्येही रहावं लागलं होतं. एकूण सात-आठ वर्षांनंतर तुरुंगातून त्यांची सुटका झाली होती. त्यांना तेव्हाही दाढी होती, आताही दाढी आहे; पण आता बरीचशी पांढरी झाली आहे. आता ते जलपाइगुडीत राहतात, आपल्या वडिलांच्या घरीच रहातात. काही करीत नाहीत; पण अधूनमधून इथल्या स्थानिक चळवळींमध्ये उपस्थित रहातात. त्यांना काही करण्यासारखंही नाही, पण अशा प्रकारच्या स्थानिक समस्यांच्या बाबतीत त्यांना जणू एक प्रकारचं अगत्य वाटतं. ते आपल्या एका मित्राबरोबर बसले होते. कुणी त्यांना निमंत्रण देतंय् की नाही किंवा यायला सांगातंय् की नाही - हे प्रश्नच येत नाहीत, झब्बा-पायजामा-दाढी आणि एक चादर अशा एका परिचित व्यक्तींला पाहून अशा सगळ्या चळवळीत जरा जोर येतो.

याचप्रकारे धूपगुडी आणि बीरपाडा भागात काँग्रेसी नेते म्हणून ओळखले जाणारे दोघेजण आले होते. - अनिल राय आणि देवकान्त क्षत्रिय. काँग्रेसी नेते म्हणून जिल्हा पातळीवर यांना कुणी फारसं ओळखीत नाही. पण स्थानिक पातळीवरचे काँग्रेस नेते म्हणून यांना ओळखलं जात असल्याने, निवडणुकांच्या वेळी त्यांना थोडं महत्त्व येतं. काँग्रेस सरकार असतं, तर स्थानिक व्यवहारांमध्ये यांना काहीतरी भूमिका असती, आता त्यांचं वय झालंय्. यांची स्वत:ची थोडीशी जमीनबिमीन आहे, पण उत्पन्न मिळवण्याचा यांचा प्रमुख मार्ग होता नाना लोकांच्या कज्जेखटल्यांमध्ये किंवा सरकारदरबारीच्या छोट्याछोट्या कामांमध्ये छोट्या प्रमाणावर मध्यस्थी करणे, तब्दीर-तदारकी करणे. हे काही फार मोठं, प्रतिष्ठेचं काम नव्हतं. त्यात यांना फार महत्वही नव्हतं. असल्या कामांना वाईट अर्थाने इकडच्या भाषेत म्हणतात 'देउनियागिरी'-चमचेगिरी. आता बरेच दिवसांपासून ते उत्पन्न नाही, ती भूमिकाही नाही. काँग्रेसचं सरकार असतं तर जो नैतिक आत्मविश्वास यांच्या चेहेऱ्यावर दिसत असे, तोही नाही. स्थानिक पातळीवर नेतृत्व करायची यांना सवय झालीय्. पंचायती-बिंचायतीमधून गावांमध्ये नवीन नेते तयार झाले आहेत. या नवीन नेता-पुढाऱ्यांमध्ये यांना काहीच किंमत नाही. पण जेव्हा पंचायत नव्हती, तेव्हा यांनाच पंचायत म्हणून ओळखलं जायचं. उत्तरखण्ड-आंदोलन हे ग्रामीण भागांवर भर देऊन होणार अशी आशा आहे. म्हणूनच यांच्या चेहेऱ्यावर अशी एक असहाय खात्री दिसते

आहे की हे आंदोलन आपल्याला आपलं जुनं नेतृत्त्व परत देऊ शकेल आपल्याला पुन्हा एकदा पुढारीगिरी करता येईल. पण उत्तरखण्ड ज्याप्रकारे मीटिंग, मेळावे, मिरवणूक, मागण्या करतंय् हे काही यांच्या सरावाचं नाही. उलट या सर्वांपासून त्यांना दूरच रहावंसं वाटतं.

उद्‌घाटनाच्या दिवशी नाना प्रकारची भाषणं झाली. उत्तरखण्ड पक्षाच्या स्वतःच्या ध्वजाचं ध्वजारोहण करण्यात आलं. त्रिकोणी आकाराच्या लाल पताकेच्या मध्यभागी श्वेत पूर्ण-सूर्य असा उत्तरखण्ड पक्षाचा ध्वज. त्यानंतर या नवीन पताकेचं स्पष्टीकरण करताना अध्यक्ष पंचानन घोष म्हणाले, म्हणजे म्हणाले नाहीत, त्यांच्या अध्यक्षीय भाषणात असं छापलेलं होतं-कामतापूर राज्याच्या मुक्ती-आंदोलनाच्या या प्रसंगी आपली पताका रक्तवर्ण त्रिकोणामध्ये मध्याह्नकालीन श्वेत पूर्णसूर्य अशी जाहीर करण्यात आलेली आहे. उत्तरखण्ड पक्षाची पौर्वात्य तत्त्वज्ञानावर श्रद्धा आहे. पौराणिक युगापासून तर प्रागौतिहासिक युगापर्यंत त्रिकोणी पताका प्रचलित होत्या. त्रिकोणाचा अर्थ आहे त्रिगुण - सत्त्व, रज, तमः रक्तवर्ण हा मातृरजाचं म्हणजेच पूर्णतेचं प्रतीक आहे. श्वेतवर्ण हा पितृओजाचं, बीजाचं, म्हणूनच ज्ञानाचं प्रतीक-म्हणजेच सूर्य हा ज्ञानाचं प्रतीक आहे. शक्ती आणि ज्ञानाचा समन्वय हाच प्रगतीचा मार्ग आहे. ही जैविक त्रिगुणात्मक व श्वेतसूर्यसमन्वित पताका संपूर्णतः अहिंसात्मक व लोकशाहीच्या मार्गाने, ज्ञानाच्या प्रकाशात आपल्या पक्षाच्या क्रान्तिकारक विचारप्रणाली आपल्या ध्येयाप्रत पोचविण्याची घोषणा करते.'

अध्यक्ष, वक्ते आणि प्रमुख नेते पंचानन मल्लिक यांच्या भाषणामध्येही हाच विषय प्रमुखपणे मांडला गेला - भारतीय हिंदू-तत्त्वज्ञानावर श्रद्धा, भारताच्या राज्यघटनेबद्दल आदर, केन्द्र सरकारवर विश्वास आणि कलकत्त्याच्या नेतृत्वाबद्दल संपूर्ण अविश्वास. त्यांच्या भाषणांमधूनच स्वतंत्र कामतापूर राज्याची मागणी करण्यात आली. या मागणीच्या समर्थनार्थ इतिहासातूनही काही काही उदाहरणं देण्यात आली खरी, पण स्वतःच्या जमातीच्या स्वतंत्र अस्तित्वाच्या घोषणेमध्येच हिन्दु समाजाच्या आनुगत्याचाही संस्कार मिसळलेला होता.

त्यांचं भाषणं सुरू झालं, तेच मुळी गीतेतल्या एका उद्धरणाने; तेही अनुवादात नव्हे, तर संस्कृतमध्ये -

हतो वा प्राप्स्यसि स्वर्गं
जित्वा वा भोक्ष्यसे महीं।
तस्मादुत्तिष्ठ कौन्तेय युद्धाय कृतनिश्चयः।।
सुखदुःखे समे कृत्वा लाभलाभौ जयाययौ।
ततो युद्धाय युज्यस्व नैवं पापमवाप्स्यसि।।

ते सुरुवातीलाच म्हणतात, 'भारतावर्ष ही आपली मातृभूमी आहे. भारतवर्षाची अखण्डता आणि राष्ट्रीय ऐक्य याचं रक्षण करण्यासाठी प्रत्येक भारतवासीयाप्रमाणे आम्हीही सर्व प्रकारचा त्याग करायला कटिबद्ध आहोत.' त्यानंतर लगेच पुढे म्हणतात, 'पश्चिम बंगाल राज्यातील उत्तर भागातील माणसांच्या सर्वांगीण उन्नतीसाठी पश्चिम-बंगाल सरकारने आजपर्यंत जे करणं आवश्यक होतं, ते केलेलं नाही. . . . सर्वांत अधिक शोषित आहेत ते इथल्या वनांत रहाणारे बहुसंख्यांक राजवंशी, अल्पसंख्यांक मुसलमान, निर्वासित नमशूद्र, अनेक जमाती आणि इतर सम्प्रदायांचे लोक. या सगळ्या अविचाराच्या आणि अन्यायाच्या विरुद्ध कठित झाला आहे उत्तरखण्ड पक्ष! उत्तरखण्ड पक्षाचं उद्दिष्ट आहे उत्तर बंगालला पश्चिमबंगालपासून वेगळं करून भारतीय राज्यघटनेच्या कलम क्रमांक तीन अनुसारे 'कामतापूर' नावांचं एक भारतवर्षातील समृद्धिशाली अंगराज्य गठन करणं आणि कलकत्ताकेन्द्रित राजकारणी, कारस्थानी, भांडवलशाही-समर्थक नेत्यांनी चालवलेल्या उत्तरबंगवासियांचं शोषण थांबवणं, शोषणापासून उत्तरबंगवासीयांना मुक्त करणं आणि त्यांच्या चेहेऱ्यावर हास्य फुलवणं . . . भारतवर्षात प्राचीन काळी 'कामरूप' नावाचं एक राज्य होतं हे आपणास ठाऊकच आहे. याच कामरूप राज्याच्या पश्चिम भागात गठित होतंय 'कामतापूर राज्य'. महाराजा नरनारायण यांच्या अंमलात या कामता राज्याची सीमा आसाम आणि उत्तरबंगालपर्यंत विस्तृत होती पण काही काळानंतर कामताराज्याची सीमा थोडी परिवर्तित झाली आणि संपूर्ण उत्तरबंगाल तिच्यामध्ये सामावला गेला . . . उत्तरबंगालचा कुठलाही भाग सिराजुद्दौलाच्या हुकुमतीखाली नव्हता. १७५७ साली २३ जूनला प्लासीच्या लढाईत सिराजुद्दौला इंग्रजांकडून पराजित झाल्यावर बांग्लादेश इंग्रजांच्या हुकुमतीखाली गेला, पण हे कामता राज्य कुठल्याही काळी बंगालमध्ये अंतर्भूत नव्हतं. हे ऐतिहासिक पुराव्यांच्या आधारे सिद्ध झालं आहे. स्वातंत्र्यप्राप्तीनंतर भारत सरकारला उत्तरबंगाल हे एक वेगळं राज्य करायचं होतं. 'भाषानिहाय राज्य पुनर्गठन कमिशन' उत्तरबंगालमध्ये आल्यावर त्या कमिशनकडे उत्तरबंगालला 'कामतापूर' नावांने एक राज्य म्हणून घोषित करण्याची मागणी १९५५ सालच्या १५ मे रोजी करण्यात आली. या कमिशनचे माननीय सदस्यगण सर्वश्री हृदयनाथ कुंझरू, पणिक्कर आणि इतर यांनी कामतापूर राज्य-गठनचा युक्तिवाद मान्य केला आणि प्रस्ताव स्वीकारला; पण तत्कालीन पश्चिम - बंगालचे मुख्यमंत्री बिधानचंद्र राय यांनी पंतप्रधान नेहरूंना नाना प्रकारे पटवून 'कामता राज्या' ला पश्चिमबंगालमध्येच ठेवलं. त्यानंतर मुंबई राज्याचं विभाजन होऊन महाराष्ट्र आणि गुजरात राज्यांचं गठन (१९६०), आसामाचं विभाजन होऊन नागालँड (१९६२), पंजाबचं विभाजन होऊन हरियाणा (१९६६), आसामचं पुन्हा विभाजन होऊन मेघालय आणि अरुणाचल (१९७१), मद्रासचं विभाजन होऊन आंध्र (१९५३) ही नवी राज्ये निर्माण झाली' - अशी सारी उदाहरणं देतात.

परंतु पंचाननबाबूंच्या भाषणातील मुख्य भाग थोड्याशा वेगळ्या प्रकारे या इतिहासावर आधारित असा होता. सध्याच्या परिस्थितीच्या महत्त्वाबद्दल ते विशेष असं काही जवळजवळ बोललेच नाहीत.

उलट, हा मुद्दा-सध्याच्या परिस्थितीचं महत्त्व-जरा अधिक प्रमाणात स्पष्ट करून सांगितला, तो नक्षलबाडीहून आलेल्या सम्पत् राय यांनी. जेव्हा नक्षलबाडी पहिल्यांदाच सुरू झाली तेव्हा तिथल्या नक्षल-आंदोलनाविरुद्ध संपत राय यांनी जोतदारांची एक 'कृषक समिती' तयार करून ते नक्षलप्रभावित कृषकांसमोर द्वंद्वयुद्धासाठी उभे ठाकले. तेव्हा संपत राय यांचं वय होतं चाळीस, आता आहे साठ. चारू मजुमदार आणि कानू सान्याल यांच्या नेतृत्त्वाखाली नक्षलबाडीचं कृषक आंदोलन सुरुवातीला कृषकांच्या-शेतकऱ्यांच्या-न्याय वाट्यासाठीचं आंदोलन होतं खरं, कुठं-कुठं अधियारींच्या मालकीचं आंदोलन होतं. त्या सगळ्या प्रदेशात कधीही कुठला गोधळबिधळ होत नसे, त्यामुळे पोलिस वगैरे कधीच आले नाहीत असं म्हटलं तरी चालेल. सम्पत राय यांनीच सुरुवातीला स्थानिक जोतदारांना तातडीने संघटित करून, पूर्णियाहून भाडोत्री लोकांना आणवून प्रति-आक्रमणं सुरु केली. तर, इथे मेळाव्यात सम्पत राय अगदी माईक फुटेल इतक्या मोठ्या आवाजात म्हणाले, 'अनेकजण असं म्हणतात की हा उत्तरखण्ड पक्ष म्हणजे राजवंशी लोकांचा पक्ष आहे. मला असं वाटत नाही. उत्तरबंगालमध्ये राजवंशी लोक संख्येने अधिक आहेत. कुठलंही काम संटितपणे करायला घेतलंत, तर त्यात राजवंशी साहजिकच संख्येने अधिक असतील. कम्युनिस्ट लोक इथे जेव्हा मोर्चा-मिरवणूक काढतात, तेव्हा त्यांच्यामध्येही संख्येने राजवंशी लोकच अधिक असतात. - त्यांना तर काही कुणी 'राजवंशी पार्टी' असं म्हणत नाही! पुन्हा चहाच्या मळ्यातल्या मजुरांची आंदोलनं जेव्हा 'सीटू' किंवा 'इंटक' या संघटना घडवून आणतात, तेव्हा त्यांना तर काही कुणी 'मदेशिया आंदोलन' असं म्हणत नाही - मग भले त्यात मदेशिया लोक अधिक असोत! उत्तरबंगालमध्ये राजबन्शी लोकच बहुसंख्यांक आहेत, पण तुम्ही पहाताच आहात की, राजवंशी लोकांना कुठेही नोकऱ्या मिळत नाहीत, राजवंशी शेतकऱ्यांना बँकेकडून कर्ज मिळत नाही, चाळीस वर्षे झाली देश स्वतंत्र होऊन - पण त्यामुळे राजवंशी लोकांचं काय भलं झालं? प्रत्येक सरकार एक राजवंशी मंत्री ठेवतो. पूर्वी पूर्ण मंत्री ठेवत; आता एकाला अर्धा मंत्री ठेवतात - अन् त्यातच राजवंशी लोकांच्या पूर्वजांना जणू स्वर्गलाभ होतो! त्यांच्या जणू उद्धार होतो. पण आपलं हे जे आंदोलन आहे, ते उत्तरबंगालमधल्या सगळ्याच लोकांच्या हितासाठीचं आंदोलन आहे, फक्त राजवंशी लोकांसाठीचंच आंदोलन नाही. उत्तरबंगालमधल्या सर्वांनीच आमच्याबरोबर यावं असं आम्हाला वाटतं.

आसामहून जे आले होते ते आसाममधल्या कोणत्या पक्षाचे प्रतिनिधी होते आणि

इथे का आले आहेत हे काही समजलं नाही. पण त्यांचं भाषण खूपच उल्लेखनीय होतं. ते म्हणाले, 'भारतवर्षाच्या राजकारणात एक महत्त्वाचा, अतिशय महत्त्वाचा बदल होतोय्. आतापर्यंत फक्त दिल्लीहूनच साऱ्या भारतावर शासन केलं जात होतं, पण आता प्रादेशिक पक्षांनीच वेगवेगळ्या प्रदेशांमधून एकत्रितपणे भारतावर शासन करावं, अशी वेळ आली आहे. केन्द्रात एक सरकार असावं, असणं आवश्यक आहे. पण त्या सरकारला या प्रादेशिक सरकारांवर अवलंबून राहून आपलं कार्य करायला हवं, अशाप्रकारे या प्रादेशिक पक्षांशी केंद्र सरकारला देवाण-घेवाणीचा संपर्क तयार होईल. किंबहुना, तसा संपर्क आताच सुरू झाला आहे. तमिळनाडूचंच उदाहरण घ्या. तिथे कितीतरी काळापासून स्थानिक डी. एम्. के. किंवा ए. आय्. ए. डी. एम्. के. या पक्षांशी काँग्रेसचा एक समझौता झालेला आहे. राज्यात डी. एम्. के. किंवा ए. आय्. ए. डी. एम्. के. पक्ष सत्तेवर राहील - त्यात काँग्रेस कुठलाच वाटा मागणार नाही; पण केन्द्रात काँग्रेस सत्तेवर रहाण्याच्या बाबतीत हे लोक मदत करतील - तिथे हे लोक कुठलाच वाटा मागणार नाहीत. एकदा राज्यात सत्तेवर कोण असावं या संदर्भात काँग्रेसने चूक केली. त्यावेळी काँग्रेसला त्या गफलतीची किंमत मोजावी लागली. आणि फक्त कांग्रेसच कशाला, जो कोणता पक्ष केन्द्रात सत्तेवर असेल, त्याला राज्यपातळीवरच्या किंवा प्रादेशिक पक्षाशी अशा प्रकारच्या समझौता करायला हवा. उदाहरणाच पहा - १९७७ सालच्या निवडणूकीत तमिळनाडूमध्ये ए. आय्. ए. डी. एम्. के. पक्षाचा विजय झाला. या ए. आय्. ए. डी. एम्. के. पक्षाशी केन्द्रात सत्तेवर आलेल्या जनता पक्षाच्या समझौता झाला. १९८० मध्ये इन्दिरा गांधींचं पुनरागमन झालं, आणि त्यांनी तामिळनाडूच्या ए. आय्. ए. डी. एम्. के. सरकारला 'काँग्रेसविरोधी सरकार' म्हणून बरखास्त करून डी. एम्. के. पक्षाशी समझौता केला. त्यानंतर सहाच महिन्यांनी झालेल्या निवडणुकीत काँग्रेसचाही पराजय झाला. आणि डी. एम्. के. पक्षाचाही पराजय झाला. ए. आय्. ए. डी. एम्. के. पक्ष विजयी झाला. आपली चूक उमगल्याने इन्दिरा गांधींनी अगदी ताबडतोब ए. आय्. ए. डी. एम्. के. पक्षाशी समझौता केला - राज्य तुमच्या हाती, केंद्र आमच्या हाती. भारतीय राजकारणाला हे नवीन वळण लागत असताना आपल्या या उत्तरखण्ड आन्दोलनाला आपण त्याच प्रकारे निर्देशन करायला हवं, त्याच मार्गाने न्यायला हवं.'

आसामच्या या 'प्रतिनिधीं'नी राजकारणातील तंत्राबद्दल आणखी एक गोष्ट सांगितली, 'आजपर्यंत भारताचं राजकारण दोन भागांमध्ये विभाजित झालंय्. - काँग्रेसविरोधी आणि काँग्रेससमर्थक. किंवा उलट्या प्रकारेही म्हणता येईल. - कम्युनिस्टविरोधी आणि कम्युनिस्टसमर्थक. किंवा हेच आणखी एका प्रकारे मांडता येईल. - काँग्रेस-कम्युनिस्ट-विरोधी आणि काँग्रेस कम्युनिस्टसमर्थक. काँग्रेस फुटून जे सारे पक्ष

तयार झाले आहेत ते पक्ष आणि भा.ज.पा. हे काँग्रेस-कम्युनिस्टविरोधी आहेत. राजकारणाला असं काळ्यापांढऱ्या रंगात कशासाठी म्हणून विभाजित करावं लागावं? एखाद्या पक्षाला काँग्रेस आणि कम्युनिस्टांचं समर्थक किंवा विरोधी असायलाच हवं, ते कशासाठी? का म्हणून? काँग्रेस आणि कम्युनिस्ट हे दोन पक्ष मात्र तसा कुठलाही विधिनिषेध मानीत नाहीत. या पक्षांना जेव्हा ज्या पक्षांशी समझौता कसावासा वाटेल, त्या पक्षाशी हे समझौता करतात, जेव्हा ज्या पक्षाचा विरोध करावासा वाटेल, तेव्हा त्याचा विरोध करतात. आपणही त्याचप्रमाणे वागू. आपण काँग्रेसही नाही, कम्युनिस्टही नाही. प्रत्येकाशी आपला देवाण-घेवाणीचा संपर्क राहील. आता कम्युनिस्ट इथं सत्तेवर आहेत. कम्युनिस्टांनी जर आपली मागणी मान्य केली - राजबन्शी जिथं बहुसंख्यांक आहेत, तिथे राजबन्शी लोकांचं प्राधान्य त्यांनी मान्य केलं, जर राजबन्शी लोकांना नोकऱ्या मिळतील अशी व्यवस्था केली, किंवा राजबन्शी भाषेला महत्त्वाचं स्थान दिलं, तर आपली हरकत काय? त्याचप्रमाणे, या सगळ्या मागण्या मान्य करून घेण्याच्या बाबतीत केन्द्रातले काँग्रेस सरकार किंवा काँग्रेस पक्ष जर आपणाला सहाय्य करीत असेल, तर आपण केंद्र सरकारची किंवा काँग्रेस पक्षाची मदत घ्यावी. गोर्खालँड होणार की होणार नाही ते एवढ्यातच सांगता येत नाही खरं, पण राज्याचे मुख्यमंत्री जेव्हा गोर्खालँडचे नेते घिशिंग यांना 'देशद्रोही' म्हणाले, तेव्हा केन्द्रातील पंतप्रधानांनी त्यांना विरोध केला. त्यानंतर जेव्हा राजीव गांधी दार्जिलिग-दौऱ्यावर गेले, तेव्हा घिशिंग यांनी 'बंद' चं आवाहन केलं. असंच होणं योग्य आहे. तुमच्या बाजूने जे कोणी आहेत, त्यांचा उपयोग करा, तुमच्या विरोधात जे कोणी असतील, त्यांचा विरोध करा. त्यासाठी आपण काँग्रेसचे कायमचे समर्थक किंवा कायमचे विरोधी असण्याची काहीच गरज नाही. देशात काय फक्त कांग्रेस आणि कम्युनिस्टच आहेत - दुसरे कुणीच नाही? देशातले बरेचशे लोक काँग्रेसचेही नाहीत, कम्युनिस्टांचेही नाहीत. आपल्या या आन्दोलनाला त्याच काँग्रेस-कम्युनिस्टविरोधी आंदोलनाशी जोडायला हवं.

दार्जिलिंगहून जे आले होते, त्यांच्या भाषणानंतर समजलं की ते एक अध्यापक आहेत. त्यांनी एक अगदीच नवीन मुद्दा मांडला - 'देश स्वतंत्र होण्याआधी काँग्रेसने भाषावार प्रांतरचना करण्याचं वचन दिलं, इतर सगळ्या पक्षांनी त्याचं समर्थन केलं. का? तर, ब्रिटिश लोक आपल्या स्वतःच्या गरजेनुसार देशाचे वाटेल तेव्हा, वाटेल तसे भाग करून त्यावर राज्य करीत असत. मद्रास हा एक प्रचंड मोठा प्रांत होता. आजचा केरळ आणि कर्नाटक ही राज्यं तेव्हा नव्हतीच. त्रावणकोर-कोचीन, पेप्सू हे सारे प्रदेश किंवा राज्ये झाली. बंगाल-बिहार-ओरिसा एकत्रित होती, आता वेगळी झाली आहेत. उत्तरप्रदेश नव्हताच, तेव्हा होता तो युनायटेड प्रॉव्हिन्स्. स्वातंत्र्यप्राप्तीनंतर राज्य-सीमा

पुनर्निर्णायक समितीने नवीन-नवीन राज्ये तयार करण्याची शिफारस केली. भाषांच्या आधारावर नवीन-नवीन राज्य तयार झाली. भाषांचा आधार म्हणजे समाज. समाज आणि भाषा यांच्यावर आधारलेलं एकेक राज्य-हाच भारतीय लोकशाहीचा आदर्श. तसंच पब्लिक सेक्टर-सार्वजनिक क्षेत्र-हा भारतीय उद्योगनीतीचा आदर्श. त्याचप्रमाणे, पंचवार्षिक योजना हा भारतीय उन्नतीचा आदर्श. एकामागोमाग एक सार्वजनिक क्षेत्रातील कारखाने तयार झाले. एकाच वेळी काही विशिष्ट संस्थेचे कारखाने उभारून तर काही म्हणू शकता येत नाही, की पुरे हा झाला आमचा पब्लिक सेक्टर पूर्ण! त्याचप्रमाणे,एक पंचवार्षिक योजना पूर्ण करूनच काही म्हणता येत नाही, की बस्! हे पूर्ण झालं आमचा प्लॅनिंग! तर मग, राज्य-सीमा पुनर्निर्णायक कमिटीसुद्धा कायमच्यासाठी एकाच वेळी राज्याच्या सीमा निर्धारित करून कसं काय म्हणू शकेल, की, पुरे-यापेक्षा आता राज्यांची संख्या वाढणार नाही. आमचं काम इथेच पूर्ण झालं! खुद्द भारत देशाच्या सीमा गेल्या चाळीस वर्षांमध्ये किती बदलत्या आहेत-सांगा! सिक्किम आधी भारतामध्ये नव्हतं-आता भारताची सीमा सिक्किम बाहेरून गेली आहे. त्याचप्रमाणे आकसाई चीन प्रत्यक्षात आपल्या हातात नाही, त्यामुळे भारतामध्ये नाही. आपल्या 'सर्व्हे ऑफ इण्डिया'च्या मॅपमध्ये फक्त हा सगळा प्रदेश भारताचा प्रदेश म्हणून दाखवला जातो. जगातील इतर सर्व देशांच्या नकाशामध्ये हा सर्व प्रदेश चीनचा म्हणून दाखवण्यात येतो, त्याचप्रमाणे आझाद काश्मीर हा पाकिस्तानचा प्रदेश म्हणून दाखवण्यात येतो. खुद्द भारताचीच सीमा जर याप्रकारे बदलू शकत असेल, तर मग राज्याची सीमा का बरं बदलू नये? १९५३ साली जेव्हा राज्यांच्या सीमा निश्चित करण्यात आल्या, तेव्हा त्याबद्दल बिहार आणि बंगालच्या आदिवासींना काही ठाऊक नव्हतं, गोर्खा लोकांनाही काही ठाऊक नव्हतं, आपणालाही काही ठाऊक नव्हतं. आता हे सारं समजल्यावर जर आपण आपल्या भाषेसाठी आणि जातीसाठी एका वेगळ्या राज्याची मागणी केली, 'आम्हाला एक वेगळं राज्य द्या' असं म्हणालो, तर त्यात दोष कुठला? बंगाली लोक तेव्हा म्हणाले, बिहारमधल्या काही ठिकाणी बंगाली भाषेचं चलन आहे, तिथे रहाणारे लोक बंगाली आहेत, तो विशिष्ट भाग पश्चिमबंगालला देऊन टाका. तेव्हा तो भाग पश्चिमबंगालला देऊन टाकण्यात आला. आता आम्ही जेव्हा म्हणतोय, की नेपाळी भाषा बोलणाऱ्यांना एक स्वतंत्र राज्य द्या - तर आम्हाला 'फुटीरतावादी' म्हटलं जातं. आपण जर म्हटलात, की आम्हा राजवंशी लोकांना एक स्वतंत्र राज्य हवं आहे तर आपणाला म्हटलं जाईल 'फुटीरवादी' फुटीरतावादी खरं तर आम्ही इथेच वेगळे पडलेले आहोत - स्वतःच्या भाषेपासून तुटलेले, स्वतःच्या हक्काच्या भूमीपासून तुटलेले, तरी नेपाळी लोक हे बंगाली आहेत असं कुणीही म्हणत नाही. तसं जर नसेल, तर मग आपलं एक वेगळं राज्य का निर्माण होऊ नये? राज्य पुनर्निर्णायक

कमिटी पुन्हा कामाला हात का घालीत नाही? कारण त्यामुळे पश्चिमबंगाल छोटा हेईल. तसं असतं तर मग ब्रिटिशही म्हणू शकले असते, की बंगालचं विभाजन केल्यास तो छोटा होईल, त्यापेक्षा सगळाच जाऊ द्या ना पाकिस्तानात! १९५६ साली जेव्हा राज्यांची विभाजणी झाली, तेव्हा आपण नव्हतो, त्यामुळे आपले काका-मामा आपल्या मालमत्तेकडं, संपत्तीकडं लक्ष देत. आता सज्ञान झाल्यावर जेव्हा आपण त्या संपत्तीमधल्या आपला भाग मागतो आहोत, तेव्हा तेच काका-मामा म्हणताहेत, 'हे पोरगं फार उद्धट दिसतंय्, आमच्या सुखी संसारामधून वेगळं होऊ पहातंय्.' तर आता मी म्हणतोय, काका-ऐका, मामा-ऐका! हा संसारही तुमचा, सुखही तुमचं, मग आमचं काय हो? आमच्या वाट्याला काय आहे? मुलगा लायक झाल्यावर त्याचं लग्नबिग्न करवून देऊन त्याचा संसार उभारून द्यायला हवा. उलट, इथं तर आमच्या दाढीचे केस पांढरे व्हायला सुरुवात झालीय्, मिशांचेही केस पिकतील म्हणून मिशा सफाटच केल्या आहेत, पण तरीही आमचं लग्न लावून देवून आम्हाला संसार करू द्यावा असं काही यांना वाटत नाही. हा कुठला न्याय हो? तर, आजवर आमची जी देखभाल केलीत, पालनपोषण केलंत त्याबद्दल आपणाला नमस्कार करतो, पण आता इथून पुढे मात्र आमची देखभाल आम्हालाच करू द्या. राज्याच्या सीमा पुन्हा एकदा निश्चित करण्यासाठी आपण एक कमिटी नेमा, त्या कमिटीने दिलेला सल्ला मान्य करा.'

## एकशे एकोणसत्तर

# तिस्ता बंधाऱ्यासंदर्भात भाषणे

कृषकांसाठी एक मुक्त, स्वतंत्र प्रदेश हवा म्हणून अनेक वर्षे तुरुंगवास सोसलेल्या, जालपाईगुडीमधील एका दाढीवाल्या गृहस्थांना भाषण करण्यासाठी बोलावण्यात आलंय्. पण त्यांचा या संमेलनाशी संबंध काय याबद्दल कुणालाच ठाम कल्पना नाही - त्यांना आमंत्रण कुणी दिलं, आता ते काय करणार आहेत - कुणालाच नीट ठाऊक नाही. साधारणपणे अशा गृहस्थांना 'नक्षलिया'-नक्षलवादी-म्हणूनच ओळखलं जातं. आता ते नक्षलवादी असोत किंवा दुसरे कोणी असोत, एखादे सुशिक्षित गृहस्थ अशा ठिकाणी आल्यावर त्यांना भाषण करण्याची संधी न देणं हे कितपत उचित ठरेल बरं? पण आपल्या भाषणात त्या गृहस्थांनी एकदम उत्तरखंड पक्षाच्या सध्याच्या कार्यसूचीमधील मुख्य विषयांच्या संदर्भात सर्वात आवश्यक अशा काही गोष्टी सांगितल्या. आणखी सुमारे महिनाभरातच तिस्ता बंधाऱ्याचं प्राथमिक उद्घाटन होणार असं सरकारने जाहीर केलंय्.

मुख्यमंत्री उद्‌घाटन करणार आहेत. त्यासाठी त्या दिवशी सगळ्या उत्तरबंगालमधून डाव्या आघाडीचे लोक मिरवणुका घेऊन येणार आहेत. तिस्ता बंधाऱ्याचं उद्‌घाटन एवढ्यात होणं चालणार नाही अशी उत्तरखंड पक्षाची मागणी आहे. शेतकऱ्यांची जमीन संपादन करणं चालणार नाही, जी जमीन बंधाऱ्यासाठी अधिगृहित केलेली आहे तिची नुकसान भरपाई म्हणून जवळच्याच भागातल्या सरकारी खासजमिनीतून समपरिमाण जमीन द्यायला हवी, ज्या शेतकऱ्यांची जमीन बंधऱ्यासाठी अधिगृहित केली गेलीय्, त्यांच्यापैकी ज्या शेतकऱ्यांची जमीन यापूर्वीच व्हेस्ट झालेली असेल, तर त्या शेतकऱ्यांना अधिगृहित जमिनीच्या समपरिमाण जमीन त्या व्हेस्ट जमिनीमधून परत द्यायला हवी. या सगळ्या मागण्यांसाठी बंधाऱ्याला उद्‌घाटनाच्या दिवशी उत्तरबंगालमधील नाना ठिकाणांहून, तसेच जलपईगुडी जिल्ह्यातील वेगवेगळ्या गावांमधून निषेध मोर्चे काढण्यात यावेत. उत्तरखंडाच्या या संमेलनातच सांगितलंय पुढील महिन्यापासून असे निषेध-मोर्चे काढण्यासाठी!' हे नक्षलिया गृहस्थ फक्त या आणि याच विषयावर बोलले. 'भारतात भाकरा-नानगल झालंय्. हिराकुड धरण झालंय्, नागार्जुनसागर झालंय्, कितीतरी ठिकाणी किती नवीन-नवीन धरणं झाली आहेत, बंधारे झाले आहेत. या पश्चिमबंगालमध्येच दामोदर झालंय्. मयूराक्षी झालय्, माइथन झालय्, पांचेत झालय-पण ही धरणं कुठेही होवोत, त्यामुळे त्या सर्व ठिकाणाच्या गरीब रहिवाश्यांचा आणि विशेषत: आदिवासी लोकांचा सर्वनाश झाला आहे. का? हे सगळे बंधारे, धरणं बांधण्यासाठी जिथं-जंगली जनावरांशी संघर्ष करीत पशूप्रमाणेच आदिवासी जगतात, गरीब लोक जगतात अशा पहाडातल्या आणि जंगलातल्या दुर्गम जागा निवडण्यात आल्या. अशा दुर्गम जागी आपण शहरी लोकांकडून होणाऱ्या शोषणापासून वाचू म्हणून आदिवासी तिथे रहात असतात. पण जेव्हा बंधाऱ्याच्या किंवा धरणाच्या बांधकामासाठी जमीन निवडण्यात येते, तेव्हा त्या जमिनीवरून प्रथम या गरिब आदिवासी लोकांना हाकलून लावण्यात येतं. त्यांचा या धरणाच्या बांधकामावर श्रमिक म्हणून उपयोग करून घेण्यात येतो. त्यानंतर या बंधाऱ्याच्या किंवा धरणाच्या पाण्याने जेव्हा ती जमीन शेतीसाठी लायक होते, तेव्हा त्या जमिनीची किंमत म्हणजे सोन्याची किंमत! तेव्हा मोठमोठे व्यावसायिक ही जमीन घेतात आणि 'हरित-क्रांती' करतात. ज्या विकास योजनेतल्या एखाद्या बंधाऱ्यामुळे किंवा धरणामुळे आदिवासींचे किंवा गरिब लोकांचं कणभर तरी भलं झालंय्, अशा एखाद्याही विकास योजनेचं नाव आपल्याला सांगता येणार नाही. आपल्या या बाजूला इतके दिवस हा उपद्रव नव्हता. तिस्ता बंधाऱ्याच्या रूपाने आता तो उपद्रव सुरू झाला. तिस्ता बांधाऱ्याच्या पाण्याने उदंड जमीन सुपीक होणार, तिच्यामध्ये शेती होणार, शेतीमध्ये सोनं पिकणार, ते सोनं विकून शेतकरी मोठे लोक होणार, श्रीमंत होणार, पण त्याच्या

आधीच, या बंधाऱ्यातलं एक थेंब पाणी शेतीच्या कामासाठी उपयोगात येण्याआधीच शेतकऱ्यांचा त्यांच्या जमिनीमधून उच्छेद झालाय. त्यांची जमीन अगदी नाममात्र मूल्य देऊन सरकारने अधि-गृहित केली आहे. जमिन मालक असलेल्या ज्या शेतकऱ्यांना सरकारने धरणाच्या कामावरचं मजूर बनवलं आहे, त्यांना धरणाचं पाणी काय सोन्याचं पीक देणार? बंधारा होण्याआधी शेतकरी तिस्तेचं पाणी ओंजळीत घेऊन आपली तहान भागवू शकत, तिस्तेच्या काठी वाघ-अस्वलांशी संघर्ष करीत एक-दोन मुठी धान्य पिकवू शकत, बंधारा झाल्यावर शेतकऱ्यांना हे सुद्धा करता येणार नाही, कारण, आधी तर हे तिस्तचं पाणी हवेसारखंच सर्वांना मुक्त होतं-वाटेल त्याने श्वास घ्यावा. पण आता मात्र तिस्तेचं पाणी हे सरकारी बंधाऱ्याचं पाणी-आता मात्र त्या पाण्यासाठी किंमत मोजावी लागेल, ज्याला वाटेल तो माणूस तो पाणी आपल्या ओंजळीत घेऊ शकणार नाही, अगदी पिण्यासाठीही घेऊ शकणार नाही. 'ज्याचा नांगर त्याचं पीक' असं म्हणायला तिस्तेचं वाळवंट काही आता पडीक जमीन नाही. बंधाऱ्यामुळे तिस्तेची किंमतही हां-हां म्हणता वाढतेय्. जिथे नदीवरचा आपला स्वाभाविक अधिकार शेतकरी गमावणार, तो कसला विकास? तिच्या काठच्या जमिनीवरची स्वाभाविक मालकी तो गमावणार, तो कसला विकास? जंगलातल्या जमिनीवर वाघ-अस्वलांची मालकी असते, पण त्या जमिनीवर एखाद्या शेतकऱ्याने शेती केली, की तो 'स्क्वॅटर'-अतिक्रमण करणारा-ठरतो. इतके दिवसांपर्यंत भारतातल्या लोकांना ठकवून ही सगळी धरणं बांधण्यात आली, पण स्वतःच्या अनुभवनातून लोकांनी आता धडा घेतलाय्. ओरिसातच दोन घटना घडल्या आहेत-एक बालियापोल या ठिकाणी, दुसरी कुठल्या ठिकाणी ते आता आठवत नाहीय्. बालियापोल या ठिकाणी सरकारने तोफेच्या गोळ्यांची चाचणी घेण्यासाठी समुद्रकाठची जमीन संपादन केलीय्. पण तिथल्या लोकांनी आपली मालकी सोडली नाहीय्. तिथं मोठं आंदोलन चाललंय्. सरकार अद्यापही त्या जमिनीचा ताबा घेऊ शकत नाही. आणखी एका ठिकाणी एका पहाडावर एक नवीन उद्योग सुरू करायचा होता, पण तिथल्या आदिवासींनी प्रखर विरोध केला आणि 'आम्हाला हा उद्योग नको' असं सांगितलं. आपल्या उत्तरखंड चळवळीचं राजकीय भविष्य आपल्या हातात आहे. त्याबद्दल काही बोलायची माझी इच्छा नाही. पण महिनाभरानंतर होणाऱ्या तिस्ताबंधाऱ्याच्या उद्घाटनप्रसंगी आपला विरोध आणि संताप प्रदर्शित करण्याचा जो कार्यक्रम आपण हाती घेतला आहे - तो कार्यक्रम संपूर्ण शक्तिनिशी आपण सफल करावा. आपण प्रयत्न केलात, तर तिस्ता बंधाऱ्याचं काम बंद पाडू शकता, जेवढं काम झालंय् तेही निरुपयोगी करून टाकू शकता. तेच तुमचं प्रमुख साफल्य असेल.'

हे गृहस्थ असं काही भाषण देतील याची सभेच्या आयोजकांना नक्कीच कल्पना

नव्हती. गयानाथ जोतदारांच्या तोंडातून तिस्ता बंधाऱ्याबद्दल भाषण करवायचं असा त्यांनी विचार केला होता. आपलं म्हणणं या मंचावरून मांडण्यासाठीच गयानाथ जोतदारांनी उत्तरखंड पक्षात प्रवेश केला होता; पण आता या गृहस्थांनीच तो विषय मांडला त्यामुळे त्याच्यनंतर लगेच सभेचे अध्यक्ष पंचाननबाबू यांनी 'गयानाथबाबू याच डूअर्स प्रदेशात रहात आले आहेत. त्यांचे पूर्वजही इथलेच, आणि गयानाथबाबूंना तिस्ता बंधाऱ्याच्या संदर्भात बरीच माहिती आहे' असं सांगून गयानाथबाबूंना भाषण करण्यासाठी पाचारण केलं.

गयानाथबाबू कधी भाषण करीत नाही. नाव ऐकलं की लगेच त्यांच्या छातीत धडधडायला सुरुवात होते. त्यांच्या नावांबरोबर जे काही सांगण्यात आलं त्यात जो काही थोडा वेळ गेला, तेवढ्यात त्यांचं छातीत धडधडणं थोडं शांत झालं खरं, पण घसा मात्र कोरडा पडला. पण तेवढ्यात जवळ बसलेले दोन-तीन लोक म्हणाले, 'गयानाथबाबू, जा!'

गयानाथ जिथे बसलेला होत्त तिथे बसूनच बोलला असता, तर त्याची फारशी गैरसोय झाली नसती, किंवा ती कमी झाली असती. शेवटी त्याला उठून मंचावर जावं लागतं आणि माईकसमोर उभं रहावं लागतं. आपलं भाषण ताबडतोब संपवण्याच्या व्यवहारबुद्धीने गयानाथ सुरुवातीलाच मोठ्या आवाजात म्हणतो, 'मला काहीच सांगायचं नाहीय्. मला फक्त एकच गोष्ट सांगायची आहे.' गयानाथ इतक्या जोरात किंचाळतो की माईकमधून 'कुंईऽ कुंई' आवाज सुरू होतो, माइकवाला तोबडतोब आवाज कमी करतो. मग गयानाथ पुढे म्हणतो, 'हे सरकार असं समजतं की गहू, तांदूळ, भाज्या-सारं नदीच्या पाण्यातून वहात येतं. त्यासाठी जमिनीची काहीच गरज नाही. इकडं ज्यांच्याकडं जेवढी जमीन होती त्यांची प्रत्येकाची सगळी जमीन सरकारनं ताब्यात घेतलीय्. मग सरकारनेच शेती करावी ना या सगळ्या जमिनीत! आता तिस्तेवर बांधणार हे सरकार. इथं ज्यांची जमीन होती, ती सारी पाण्याखाली जाणार. आधी माणसं नदीच्या काठच्या जमिनींवर, चरांमध्ये शेती करीत. हे तिस्ता बंधाऱ्यासाठी काठावरची जमीन नदीमध्ये ओढून नेऊ लागलेत. शेती करा की! तिस्ता नदीच्या पाण्यात भातशेती करा! ही कुठली माणसं हो? आमच्या या तिस्तेवर पूर्वी कधी बॅरेजज-बिरेज नव्हतं, तेव्हा काय भातशेती झाली की नाही झाली? यांना जमीनही अडवायचीय्, नदीसुद्धा अडवायचीय्. मला हे बॅरेजबिरेज काहीही नकोय्. एवढचं सांगायचं होतं मला.' गयानाथच्या भाषणाच्या शेवटी टाळ्या पडतात. आतापर्यंतची भाषणं जरा अवघड आणि बेगडी वाटत होती, पण गयानाथचं भाषण मात्र श्रोत्यांना सरळ आणि साधं वाटतं.

## एकशे सत्तर

# राजवंशी समाजाच्या रूपांतरासंबंधी चर्चा

अशा प्रकारे उत्तरखंड मेळावा सुरू झाला. हा आता सहा दिवस चालणार. एकीकडे पंचानन मल्लिक यांच्यासारखे प्रवीण लोक आहेत-उत्तरखंडाच्या रूपाने आपल्या अस्पष्ट भूतकाळातले गौरवशाली दिवस परत येणार असं त्यांना वाटतंय्- पण कशा प्रकारे ते परत येणार याची कल्पना त्यांना नाही. दुसरीकडे सुस्थिर राय बर्मन यांच्यासारखे उत्साही तरुण-उत्तरखंड पक्ष म्हणजे त्यांना आदिवासी-सत्तेची एक लढाऊ संघटना वाटते. ही संघटना आपल्या एकीच्या बळावर राजसत्तेकडून आपला स्वत:चा असा भू खंड मिळवणार असं त्यांना वाटतं. पंचानन मल्लिक आणि सुस्थिर यांच्यामध्ये बहुधा एकच साम्य आहे- त्या दोघांनाही, इतिहासाने समर्थित केलेली अशी, राजवंशी लोकांच्या भूतकाळातील एक गौरवमय लोककथा आपल्या आंदोलनासाठी आवश्यक वाटते. ती आहे हाजोची गोष्ट, शिशु-बिशूची गोष्ट, सेनापती चिला रायच्या दिग्विजयाची गोष्ट. त्यांच्या डोळ्यांसमोर ठळक वर्तमान तर नेहमी उपस्थितच असतं-ते म्हणजे, एकूण सुमारे ४४० वर्षे कूचबिहारमध्ये एका राजवंशी राजवंशाने इ. स. १५१० ते १७७३ पर्यंत स्वतंत्रपणे, आणि त्यानंतर १९४९ पर्यंत भारतातील संस्थान म्हणून राज्य केलं आहे. पूर्व आणि पश्चिमबंगाल मिळून कुठेही अशा प्रकारे देशी राजाने राज्य केल्याचं उदाहरण नाही. असा कुणीही राजा तिथे नव्हता, नाही. त्या राजाचा राजवाडा अजूनही उभा आहे. त्या राजवंशाचाच आणखी एक भाग याच संपूर्ण काळात वैकुंठपूरची जमीनदारी एका स्वतंत्र राज्याप्रमाणे चालवीत होता. त्यामुळेच तर मालदह पासून दार्जिलिंगच्या तराईपर्यंत पसरलेला हा विराट समाज आपली ओळख 'राजवंशी' म्हणून करून देतो. परंतु पंचानन मल्लिक आणि सुस्थिर यांच्यामधील या साधर्म्याशिवाय त्यांच्यामधलं एक वैधर्म्यही कधी कधी प्रकट होतं-ते वैधर्म्य म्हणजे, राजवंशी समाजाच्या आत्मप्रतिष्ठेसाठी या समाजाचा गौरवमय इतिहास हे एकमेव किंवा प्रमुख असं साधन आहे असं पंचानन मल्लिक यांना वाटतं; तर हा गौरवमय इतिहास हे राजवंशी समाजाला स्वत:ची अशी जमीन मिळवण्यासाठीचं केवळ एक साधन आहे-तेच काही प्रमुख साधन नाही.

या उत्तरखंडामध्ये यायची संपत् राय यांची इच्छा आहे-त्यांनी नक्षलबाडी आंदोलनाच्या सुरुवातीलाच भूमिहीन आदिवासी शेतकऱ्यांच्या जमीन बळकावण्याच्या मोहिमेविरूद्ध स्वत:ची एक सैनिक-पलटण सुमारे वीस वर्षांपूर्वी तयार केली होती, आणि जलपाइगुडीच्या त्या गृहस्थाचा 'नक्षलिया' मुलगा अद्यापही नक्षलबाडी आंदोलनामध्येच भारतीय शेतकऱ्यांचे हक्क मिळवण्याचा मार्ग शोधतो आहे. संपत राय यांना उत्तरखंड

आंदोलन हे केवळ राजवंशी समाजाचं आंदोलन वाटतही नसेल-उत्तरबंगालमधल्या राजवंशी जोतदारांच्या हाती जो पैसा आहे, तो उत्तरबंगालमध्येच नाना प्रकारे खेळवण्याचा हक्क संपत राय यांना हवा आहे. संपत राय हे पंजाब-राजस्थानमधल्या 'हरित-क्रांती'च्या 'एन्ट्रेप्रेन्यूर'ची उत्तरबंगालमधली आवृत्ती आहेत. त्यांना वेगळं राज्य नको आहे, वेगळे असे काही अधिकार हवे आहेत-वेगळं राज्य वगैरे त्यांच्या दृष्टीने तुच्छ आहे, उदाहरणार्थ, जुन्या कामतापुरी राज्याच्या व तेथील राज्यांच्या गौरवगाथांची त्यांना फारशी आवश्यकता वाटत नाही. त्यांच्या हाती खूप पैसा आहे आणि आणखीही खूप पैसा त्यांच्या हाती येतो आहे-त्यांना या सगळ्या पैशांसाठी एक विनियागक्षेत्र हवं आहे-मग त्या विनियोग क्षेत्राचं नांव जर 'उत्तरखंड' असेल, तर 'उत्तरखंड'च असो. आणि त्यांच्याशी त्या 'नक्षलिया' गृहस्थांचं सहजच मतैक्य झालं, कारण सम्पत् राय यांचा विद्रोह त्या गृहस्थांना प्रस्थापित व्यवस्थेविरुद्धचा विद्रोह वाटत होता. कारण, सम्पतनी इथे केन्द्रीय शासनव्यवस्थेलाच चॅलेंज दिलेलं होतं. या केन्द्रीय शासनात दिल्लीत काँग्रेस आहे आणि कलकत्त्यात डावी आघाडी आहे, हा फरक त्यांना फरकच वाटत नाही. ज्या कुठल्या विद्रोह आणि नैराश्यामुळे ते संपतला त्यांचा मित्र मानतात आणि शत्रू समजतात, त्याचप्रमाणे ते दिल्ली सरकारला आणि राज्य सकारला शत्रू मानतात. तिस्ता बंधाऱ्याच्या पाण्याचा पूर्ण फायदा तो आपल्या घरी खेचून घेणार आहे हे संपतला ठाऊक आहे. पण तिस्ता बंधाऱ्यासाठी ज्या साऱ्या जोतदारांची थोडी-थोडी जमीन सरकारने घेतली आहे, त्या सगळ्या जोतदारांना जर उत्तरखंड पक्षात ठेवायचं असेल, तर प्रमुख विरोध तिस्ता बंधाऱ्यालाच केला पाहिजे. सम्पत् राय यांच्या दृष्टीने तिस्ता बंधारा हे राजवंशी लोकांसाठी, राजवंशी जोतदार व शेतकरी यांच्यासाठी एक सोपं प्रतीक ठरलं आहे. या बंधाऱ्याचं पाणी कधी मिळणार, त्यामुळे एक बिघा जमिनीत दहा बिघे जमिनीइतकं पीक निघणार यापेक्षाही त्या एक बिघा जमिनीचं संपादन, अधिग्रहण हे अधिक प्रत्यक्ष आहे. पुन्हा, तोच तिस्ता बंधारा या बंधारा या नक्षलिया गृहस्थाला भारतातील दलालांच्या धनाचा गरीब लोकांना अधिक गरीब करण्याचा कारखाना वाटतो. तरीही दलाल शोधण्याच्या आंधळेपणाने संपत राय काही दलाल वाटत नाही. उलट संपत रायसारखा जोतदाराही जर राजवंशी आदिवासींच्यामध्ये एक ऐक्यबद्ध आंदोलन उभं करू शकत असेल, तर काही अंतर संपत रायबरोबर चालण्याला कुणाची हरकत असेल? जो कुणी केंद्रीय शासनावर आघात करू शकत असेल आणि आदिवासींना संघटित करीत असेल, तो योग्यच आहे असं त्याला वाटतं.

याचबरोबर या आंदोलनाला पॅन-बोरो संस्कृतीचाही एक स्पर्श आहे. त्यातून उत्तरपूर्व किंवा नॉर्थईस्ट भागातल्या एका खूप विराट अशा प्रदेशाच्या सांस्कृतिक ऐक्याचा शोध घेतला जातोय.

या सगळ्या प्रकारांमध्ये कुठलंही ठळक असं साम्य नाही, बरेचदा त्यांच्यामध्ये फरकच दिसतो, विपरीतपणाच दिसतो. उत्तरखंड आंदोलनाला एक तात्त्विक पाया देऊ शकेल, अशी कुणीही एक व्यक्ती किंवा एकापेक्षा अधिक व्यक्ती उत्तरखंड पक्षात नाहीत. वीरेन बसुनिया किंवा कूचबिहारच्या संतोषबाबूंसारख्या व्यक्ती उत्तरखंड पक्षाला मोठ्या समाजाशेजारी किंवा प्रशासनात उभे करवू शकतात, पण हा या चळवळीचा केवळ एक छोटा भाग आहे. लोकनेता होणं ही गोष्ट वीरेन बसुनिया किंवा संतोषबाबूंना शक्य नाही.

उत्तरखंड चळवळीसारख्या घटना या प्रकारच्या परस्परविरोधी स्वार्थांचं मिश्रण होऊनच तयार होतात असं वाटत. कधी हा स्वार्थ प्रमुख ठरतो, तर कधी तो स्वार्थ प्रमुख ठरतो. पण राजवंशी जोतदारांकडे नवीनच आलेल्या पैशांसाठी योग्य असं विनियोगक्षेत्र आता इतक्या दिवसांनी तयार झालं आहे आणि बराच काळ ते तसं रहाणार आहे. भारताच्या बऱ्याच मोठ्या भागात होत असलेली उद्योगधंद्यांची वाढ तसेच बहिशेबी प्रचंड पैसा असलेल्या एका सामाजिक वर्गाची जी वाढ झाली आहे त्यापेक्षा राजवंशी लोकही काही वेगळे नाहीत. भारतातील अर्थनैतिक नियमांमुळेच त्यांच्या समाजामध्ये आता त्यांच्या बोरो आणि कूच रक्ताची शुद्धता शोधण्यासाठी एक गट संघटित होतोय; ज्याप्रमाणे अहोम लोक आपल्या प्रागैतिहासिक काळापासूनचा वारसा शोधून आपली अस्मिता तयार करून भारताच्या राजकारणात प्रवेश ताहेत, अगदी त्याचप्रमाणे भारताच्या अर्थनैतिक नियमांमुळेच शिख लोख आणखी किती चांगले शिख होऊ शकतील, हा एक राजकीय विषय झालाय अगदी त्याच नियमांमुळे तेलुगू लोग किती अधिक तेलुगू आहेत हाही एक राजकीय विषय झालाय. इतिहासातील भूतकाळही याप्रमाणे भारतीय राजकारण आणि अर्थकारणाच्या भविष्यसाठी वर्तमानकाळात असा उपयोगी पडतोय.

पण किमान राजवंशी लोकांच्या संदर्भात, आपल्या जमातीच्या भूतकाळाच्या वर्तमानकाळात समजावून घेण्यामध्ये, त्याचा आविष्कार करण्यामध्ये असा काही गोंधळ आहे, की त्याची मीमांसा करणं अवघड आहे. राजवंशी हे राजवंशीही रहातील. आणि त्याचबरोबर कूच-बोरो या जमातीतही रहातील अशी व्यवस्था कोणत्याही प्रकारे शक्य नाही.

राजवंशी लोक नक्की कोणत्या जमातीचे आहेत हे ठरवता येणार नाही, आणि त्यामुळे त्यांना त्यांच्या जमातीत परत जाता येणार नाही, ते अशक्य आहे असं जर कुणी म्हणालं, तर हे विधान विश्लेषणाच्या टप्प्यावर टिकणार नाही. कारण विश्लेषण हे राजवंशी लोकच करणार ते स्वतःची म्हणून जी जमात स्वीकारणार, त्याच जमातीचे म्हणून त्यांना ओळखलं जाणार मग त्यांच्या जमातीचं नांव हॉजसन, डाल्टन, बेव्हरली, हण्टर, राऊनी, बोयलो, मॅगोवार, ओडोनेल, रिजली, ग्रियरसन, गेईट, ओमेली, थॉमसन या सगळ्या ब्रिटिशांनी तयार केलेल्या जाती-जमातींच्या यादीमध्ये आहे की नाही

ही बाब अवान्तर आहे. कारण, या ब्रिटिशांनी जाती-जमातींची जी सूची बनवली आहे. त्या सूचीतल्या जमातींशी आपलं गोत्र वगैरे जुळवल्यावरच ती जमात अस्सल जमात म्हणून ठरायला ती सूची म्हणजे काही नवीन स्मृतिशास्त्र नव्हे!

पण या विविध जमातींच्या परिचयाच्या पुनरुद्धारमध्ये खुद्द राजवंशी लोळच अडथळा आहेत. कारण ते इतके दिवस आपली जमात नाकारून शतकांमागून शतकं हिंदु होऊ इच्छिताहेत, हिंदु बनले आहेत.

कूचबिहारचं राजघराणं आणि जलपाइगुडीच्या वैकुंठपूरमधलं रायकत घराणं ही तर राजवंशी लोकांची प्रमुख प्रतिनिधी असलेली घराणी आहेत. कूचबिहारच्या घराण्याच्या आदिपुरुष होता बिशू किंवा बिशाई. त्या बिशाईचंच नावं पडलं विश्वसिंह. या बिशाईने पूर्वेकडच्या ब्रम्हपुत्रा नदीपासून पश्चिमेकडच्या घोराघाटापर्यंत आपली राज्यसीमा कायम केल्यावर ब्राम्हणांनी त्याला हिंदु बनवलं. पोथ्यांचा धांडोळा घेऊन त्यांनी असा शोध लावला, की मुळात हा बिशाई आणि चाच्या जातीचे हे क्षत्रीय आहेत, आणि परशुरामाच्या भीतीने ते आपलं मूळचं रहाण्याचं ठिकाण सोडून या वनात पळून आले आहेत; आणि बिशाई हा काही हरिया नावाच्या चांडाळाचा मुलगा नाही, तो भगवान शंकराचा पुत्र आहे. त्याचप्रमाणे बिशाईचा भाऊ शिशाई हा सुद्धा शंकराचा पुत्र आहे. विश्वसिंहाने सिल्हेटहून ब्राम्हणांचं एक दल आणलं आणि 'कामरूपी ब्राम्हण' नावांची ब्राम्हणांची एक वेगळी श्रेणी तयार केली. विश्वसिंहानंतर कूचबिहारच्या राजघराण्याने 'नारायण' हे आडनाव लावायला सुरुवात केली, आणि जलपाईगुडीच्या रायकत घराण्यातले लोक वैकुंठपूरचे रहिवासी बनले.

पण ही फक्त राजघराण्यापुरतीच गोष्ट नव्हती. राजघराणं हे तिथल्या रहिवाशांपैकी प्रमुख घराणं असल्यानेच त्याने ही व्यवस्था स्वीकारली. आणि त्या रहिवाश्यांनी स्वत:चा परिचय 'राजवंशी' म्हणून करून द्यावा असं ठरवलं, आणि हीच गोष्ट त्यांच्या गौरवाची ओळख बनली. त्यांच्या खालच्या जमातीमध्ये असण्याच्या अस्वीकृतीचा परिचय बनली, हिंदु या अधिक सर्वसमावेशक जातीमध्ये जाण्यासाठी त्यांचं पारपत्र बनली. तीनशे वर्षांपेक्षाही अधिक काळापासून हा हिंदु असण्याचा परिचय राजवंशी समाजामध्ये इतका भिनला की, एकोणविसाव्या शतकाच्या शेवटापासून हा आपण हिंदु क्षत्रिय असल्याचा त्यांचा दावा एका आंदोलनाचा विषय बनला, तो थेट १९२१ सालपर्यंत, त्यांच्या खाने सुमारीची समस्या बनेपर्यंत. १८९१ सालपूर्वीच वैकुंठपूरच्या जमीनदारीसंबंधी एक मामला प्रिव्ही काउन्सिलपर्यंत गेला होता. त्या मामल्यात असं म्हणण्यात आलं होतं की, वैकुंठपूरमधल्या या घराण्याच्या मुख्य पुरुषाचं आडनाव 'रायकत' असं असून हे रायकत आडनावांचे लोक बंगालच्या अग्नेय सीमेकडच्या कूच जमातीचे आहेत; ते हिंदु नाहीत.

१८९१ सालच्या सेन्सस रिपोर्टमध्येही राजवंशी लोकांचं मूळ 'कूच' जमातीतच असल्याचं नमूद करण्यात आलं आहे. पण या १८९१ सालीच रिजलीसाहेबाने असं लिहिलं की, 'उत्तरबंगालमधले कूच जमातीचे लोक स्वत:ला राजवंशी आणि भंगक्षत्रिय म्हणवतात. ते ब्राह्मण आहेत, ब्राह्मणांचे रीतीरिवाज ते पाळतात आणि त्यांनी ब्राह्मणांची गोत्रं ग्रहण करायला सुरुवात केली आहे.'

पण १९११ सालीच ही द्विधावस्था नष्ट झाली. ओमेलीने आपल्या सेन्सस रिपोर्टमध्ये लिहिलं, 'स्वत:चा परिचय 'क्षत्रिय' म्हणून करून देण्याच्या अधिकारापेक्षाही उत्तरबंगालच्या राजवंशी लोकांमध्ये एक स्थायी आणि गंभीर आंदोलन चालू आहे. त्यांना आपली नोंद 'कूच' लोकांपेक्षा वेगळेपणाने व्हावी, आपल्याला 'कूच' लोक समजलं जाऊ नये असं वाटतं; एवढंच नव्हे, तर आपला उल्लेख 'क्षत्रिय' म्हणून व्हावा असं त्यांना वाटतं. त्यांची पहिली विनंती कुठलाही बदल न करता मान्य करण्यात आली आहे. कारण त्यांची उत्पत्ती कशी झाली ही गोष्ट बाजूला ठेवली, तरी राजवंशी आणि कूच या वेगवेगळ्या जाती आहेत हे नि:संदेहपणे सत्य आहे. हे काहीही असो, त्यांची वंशोत्पत्तिगत उपाधी आणि प्राचीन पदवी 'क्षत्रिय' नावाने त्यांचा उल्लेख करण्याचा काही प्रश्नच येत नाही.' १९२३ च्या सेन्सस रिपोर्टमध्ये टॉमसन यांनी लिहिलं, '१९०१ साली अनेक कूच लोकांनी स्वत:चा परिचय 'राजवंशी' असा करून द्यायला सुरुवात केली, आणि आता अनेक राजवंशी लोक आपला परिचय 'क्षत्रिय' म्हणून नोंदवण्यासाठी अगदी शक्तिप्रयोगसुद्धा करताहेत,' या १९२१ सालीच राजवंशी लोकांमध्ये 'पैतेपरा' (जानवे घालणे) व क्षत्रिय समिती आंदोलन अशा प्रकारे सुरू झालं की त्यांना 'क्षत्रिय' म्हणून न नोंदवण्याच्या धोरणामुळे रंगपूरपासून कुचबिहारपर्यंत खानेसुमारीचं काम ठप्प झालं. हे स्वत:चा परिचय 'क्षत्रिय' असा करून देण्याचं राजवंशी लोकांचं आंदोलन स्वातंत्र्यचळवळीशीही मोठ्या प्रमाणावर संबंधित होतं-त्याचप्रमाणे, स्वत:चा परिचय 'हिंदु' असा करून देणं म्हणजे स्वत:चा परिचय भारतीय म्हणून करून देण्याचाच प्रकार होता. स्वातंत्र्य-चळवळीमधून भारतीय नागरिकांचा जो एक परिचय प्रतिष्ठा पावला होता, त्यामध्येच स्वत:चा 'हिंदु' म्हणून परिचय दिल्याने स्वत:चा समावेश करता येत होता. त्याचप्रमाणे, तोपर्यंत हिंदु मध्यमवर्गीयांची प्रतिष्ठा तसेच हिंदु मध्यमवर्गीयांच्या आदर्शाला राजवंशी लोकांनी आपलं मानलं होतं. तो परिचय जणू त्यांच्या दृष्टीने सामाजिक प्रतिष्ठा मिळवण्याचं पारपत्र (पासपोर्ट) होतं. क्षत्रिय समिती आंदोलन हे राजवंशी समाजातलं सर्वात अधिक व्यापक आणि गंभीर असं आंदोलन होतं. त्या आंदोलनामुळे अगदी राजवंशी घराण्यांचं गठन आणि जीवनयापन या गोष्टीही नियंत्रित झाल्या होत्या.

## एकशे एकाहत्तर

# राजवंशी समाजातील जातींचा व जमातींचा परिचय

राजवंशी समाजाने ऐतिहासिक काळापासून स्व:च्या जमातीच्या परिचयाला जाती-परिचयामध्ये अशा प्रकारे मिसळून टाकण्याचा प्रयत्न केला; तरी सुद्धा त्यांचं चपटं नाक, छोटे डोळे, थोडा गोरा वर्ण आणि हनुवटीचं उंच हाड या गोष्टी त्या जमातीची आठवण म्हणून त्यांच्यात राहिल्याच. ज्या हिंदु समाजात मिसळून जाण्यासाठी राजवंशी समाजाने असे शतकामागून शतके प्रयत्न केले, त्या सवर्ण हिंदु समाजाने आपले दरवाजे राजवंशी समाजासाठी कधीच उघडले नाहीत. स्त्री-पुरुष संबंधामुळे वर्णसंकर होऊन जो जमातीचा परिचय निर्माण होऊ शकला असता, त्यासाठी सवर्ण हिंदु समाजातील लोक व राजवंशी समाजातील लोक कधीही एकमेकांत मिसळले नाहीत. जी दोन राजघराणी राजवंशी समाजातली मुख्य घराणी होती, त्यांनी नाना प्रकारे प्रयत्न करून सवर्ण हिंदु बनण्यात यश मिळवलं, सवर्ण हिंदु समाजानेही त्यांना आपल्यात समाविष्ट करून घेतलं. एवढ्या मोठमोठ्या राजघराण्यांशी किंवा जमीनदार घराण्यांशी रक्तसंबंध जोडायला कुणाची हरकत असणार? तेव्हा तर त्यांच्याकडे 'राजे' म्हणूनच पाहिलं जाई, राजवंशी म्हणून नव्हे. कालापहाडने १५६३ साली ज्या कूचबिहारचा राजा नरनारायण याने पुन्हा बांधणी केली आणि त्या मंदिरात दुर्गेच्या प्रतिमेची प्रतिष्ठापना करून स्वत:च्या हिंदुधर्मातील प्रवेशाचा पथ प्रशस्त केला. या निमित्ताने १५० नरबळी देऊन एक ताम्रपट मंदिरातील देवीसमोर राजा नरनारायण याला देण्यात आला. राजवंशी किंवा कूच जमातीतून हिंदू धर्मात प्रवेश करण्याचा असा रक्तलांछित मार्ग सगळ्याच लोकांसाठी किंवा साधारण लोकांसाठी सोपा-सुलभ नव्हता. राजे कधी रक्त शिंपडीत, कधी रक्ताचं प्रतीक म्हणून गुलाल उधळीत. लक्ष्मीनारायण नावांच्या कूचबिहारच्या एका राजाने १५८५ साली आपल्या एका कन्येचा विवाह अकबराचा सेनापती मानसिंह याच्याशी लावून दिला. आणखी एक राजा प्राणनारायण (१६२५-१६६५) याने आपली बहीण रूपमती हिचा विवाह नेपाळचा राजा प्रतापमल्ल याच्याशी लावून दिला. १८७८ साली ब्राह्मो समाजाचे नेते केशवचंद्र यांची कन्या सुनीती देवी हिचा विवाह कूचबिहारचा राजा नृपेन्द्रनारायण याच्याशी झाला. नृपेन्द्रनाथांचा मोठा मुलगा जितेन्द्रनारायण याचा विवाह बडोद्याच्या इन्दिरा देवीशी झाला. त्यांची मुलगी गायत्री देवी हिचा विवाह जयपूरच्या महाराजांशी झाला. आणखी एका बहिणीचा विवाह आगरतळ्याच्या राजाशी झाला. 'भारतीय राजा' म्हणून आपल्याला सगळ्यांनी स्वीकारावं, म्हणून स्वत:चा 'राजवंशी' हा परिचय कूचबिहारच्या राजेसाहेबांनी स्वेच्छेने त्यागला.

वैकुंठपूरच्या राजघराण्याचा इतिहासही जवळजवळ असाच आहे. पण ते काही भारतीय राजे म्हणून स्वीकृत नव्हते. त्यामुळे भारतातील इतर राजांनी त्यांच्या घराण्याशी लग्नाच्या माध्यमातून संबंध जोडले नाहीत. पण, पैसे देऊन वैकुंठपूरच्या राजांनीही सवर्ण हिंदु घराण्यातले जावई आणि सुना मिळवल्या.

राजवंशी असल्यामुळे जी राज्यं आणि संस्थानं प्रतिष्ठित झाली होती, त्यांनी आपल्या 'राजवंशी' हा परिचय टाकून हिंदु समाजात प्रवेश केला. पण अगदी उलट्या, विपरीत पद्धतीने सवर्ण हिंदु समाजाने या राजवंशी लोकांना दूर ठेवलं. त्यामुळे ते गेल्या पाचशे वर्षांपासून एक अद्‌भुत विपरीत जीवन जगताहेत. त्यांची सगळी शारिरीक वैशिष्ट्यं ते कूच असल्याचं दाखवतात, त्यांचे घराण्यातील इतरांशी असलेले संबंध कूच रीतिरिवाजाप्रमाणे असतात, त्यांचा पोशाख कूच लोकांसारखाच असतो, त्यांचे दागदागिने कूच जमातीच्या लोकांच्या दागदागिन्यांसारखेच असतात, त्यांची घरं कूच पद्धतीने बांधली जातात, तरीही आपल्याला कुठल्याही प्रकारे, 'कूच' म्हणून ओळखलं जावं असं त्यांना वाटत नाही, आपल्याला 'कूच' म्हटलं जाणं हे त्यांना घोर अपमानाप्रमाणे वाटतं.

बिशाई किंवा विश्वसिंह (१४९६-१५५३) याला जर ऐतिहासिक काळात कूच लोकांच्या संघटित गौरवाची प्रतिनिधी अशी प्रथम व्यक्ती म्हणून आपण मानलं, तर पाचशे वर्षांपासूनच राजवंशी लोकांनी आपलं हे दुहेरी जीवन मान्य केलं आहे असं म्हणता येईल. ते स्वत:ला मनाने, प्राणांनी हिंदु मानतात. जल्पेश्वर शिव हे त्यांचं परमपूज्य दैवत आहे. पण सवर्ण हिंदु त्यांना हिंदु मानत नाहीत. त्यामुळे हिंदुची संस्कृतीही ते आत्मसात करू शकत नाहीत.

आता भारताच्या अर्थकारणाच्या आणि राजकारणाच्या नियमांनी राजवंशी लोकांना 'कूच' म्हणून आपल्या परिचयाचा पुनरुद्धार करायचा आहे. जे हिंदुत्त्व त्यांचा आदर्श होतं, त्या हिंदुत्त्वातून बाहेर येण्याची त्यांची इच्छा आहे. शारीरिक आणि सांस्कृतिक वैशिष्ट्यांनी ते 'कूच' राहिले आहेत, आणि तेच 'कूच' पण त्यांना पुन्हा हवं आहे. त्यांना पुन्हा 'कूच' जमातीचं व्हायचं आहे. आणि 'कूच' जमातीचे लोक म्हणून भारताच्या राजकारणात-अर्थकारणात भारतीय म्हणून त्यांना विशेष सवलती मिळवायच्या आहेत. पाचशे वर्षे हिंदु म्हणून राहिल्यानंतर आता त्यांना अहिंदु व्हायचं आहे. पण ही अहिंदु होण्याची भावना त्यांच्या आपल्या 'कूच' म्हणून असलेल्या परंपरेच्या अभिमानातून आणि चैतन्यातून जन्मलेली नाही, तर ती रुपये-पैसे यांच्या रोख हिशेबातून जन्मलेली आहे. जे कूच पाचशे वर्षांपासून राजवंशी होते, ते काय आता त्यांना वाटल्याबरोबर कूच होऊ शकतील?

कूच होण्याचा एक उपाय जरूर त्यांच्याकडे होता. हिंदु समाजाने झिडकारल्यामुळेच

त्यांना आपल्या कूच परंपरेनुसार जगणं कायम ठेवता आलं, त्या कूच परंपरेनुसार वागण्याच्या सरावालाच ते आक्रमकपणे हिंदु समाजाविरुद्ध वापरू शकले असते. पण तसं झालं असतं, तर त्यांना 'राजवंशी' हे नांव नाकारावं लागलं असतं. एखाद्या राजघराण्याशी असलेल्या संबंधाच्या जोरावर त्यांना पुन्हा आपल्या कूच जमातीत जाता येत नाही. त्या राजपरिवाराशी असलेला आपला संपर्क नाकारूनच त्यांना पुन्हा आपल्या कूच या पूर्वीच्या जमातीत जाता येईल. पण १८९० सालपासून तर थेट १९३०-३५ सालपर्यंत जे स्वत:ला केवळ राजवंशीच नव्हे, तर क्षत्रिय म्हणवीत होते, जो परिचय त्यांच्या सामाजिक आंदोलनाचा मुख्य विषय झाला होता, ते आता स्वत:ला 'राजवंशी' न म्हणवता 'कूच' कसे काय म्हणवणार? 'कूच' तर नाहीच, 'राजवंशी' सुद्धा नाही - हिंदू क्षत्रिय'हा परिचय आता कसा काय उलटा फिरणार? हिंदु तर नाहीच, 'राजवंशी' सुद्धा नाही - 'कूच'?

हा समाज जर खरोखर आत्मपरिचयाच्या प्रखर वेदनेने आणि अभिमानाने स्वत:ला प्रायश्चित्त करून घेऊ इच्छित असता, स्वत:च्या पाचशे वर्षे हिंदु असण्याच्या इतिहासाचा बदला घेऊ इच्छित असता, स्वत:ला आघातांवर आघातांनी ताडन करून घेऊ इच्छित असता, तर हा परिचय उलटा फिरू शकला असता. तसं झालं तर एका अद्‌भुत प्रतिक्रियेने त्यांनी आपल्या संस्कृत नावाचा त्याग केला असता, एवढंच काय, त्यांनी आपलं 'राय' किंवा 'बर्मन' हे आडनावसुद्धा सोडून दिलं असतं; लग्नात आणि श्राद्धप्रसंगी त्यांनी ब्राह्मण पुरोहितांना बोलावलं नसतं, आपले पाचशे वर्षांपूर्वीचे रीतीरिवाज त्यांनी पुन्हा आचरणात आणले असते, एवढंच काय, त्यांनी जल्पेश्वर शिवाचाही त्याग केला असता, अगदी कूचबिहारच्या मदनमोहनलाही सोडून दिलं असतं, कामाख्या मंदिरातल्या मूर्तीलाही नाकारलं असतं- त्याऐवजी आपली स्वत:ची अशी नवीन तीर्थस्थानं उभारली असती, मग त्या मोहिमेने या विराट राजवंशी समाजाला इतिहासाच्या एका अवास्तव पुनरावृत्तीच्या प्रतिक्रियेमध्ये नेऊन टाकलं असतं हे खरं असलं, तरी त्या पुनरावृत्तीने बहुधा एक नवा आरंभही घडवून आणला असता. या उत्तरखंड आंदोलनात हे काही नाहीच, उलट उत्तरखंड आंदोलन या सर्वाच्या विपरीत आहे, उलटं आहे.

कॉंग्रेस आता पुन्हा इथे-सत्तेवर येण्याची शक्यता नाही. म्हणून कॉंग्रेसला गावोगावी जो जनतेचा पाठिंबा आहे, त्यावरच याप्रकारचं प्रादेशिकतावादी आंदोलन उभं राहिलं आहे. पण ही बहुधा पश्चिमबंगालमधली विशेष परिस्थिती आहे. पश्चिमबंगाल वगळता इतर साऱ्या भारतातही भारतीयतेच्या विपरीत जी राजनैतिक प्रवणता दिसते, तिचाही संपर्क या राजनैतिक प्रवणतेशी आहे. पण पश्चिमबंगाल आणि भारताच्या या निर्दिष्टेला वगळताही, खरं तर भारताच्या अर्थकारणात नफ्याच्या भागीदारीने असं काही स्पष्ट स्वरूप

घेतलं आहे, की उत्तरबंगालमधील राजवंशी लोकांनाही त्या नफ्यामधला आपला वाटा हवा आहे.

असं एखादं संमेलन ज्याप्रमाणे व्हायचं ठरलं होतं, त्याचप्रमाणे ते होऊ लागलं. सहा दिवस रोज हे संमेलन सकाळी दोन-तीन तास होतं. पण त्यामध्ये रोज एकच भाषण होतं. एवढंच काय, रोज भाषण करण्यासाठी वक्ते मिळत नाहीत. जरा नीट संयोजन केलं असतं, तर संपूर्ण मेळावा एकाच दिवसात संपला असता. पण तसं संयोजन करण्यासाठी माणसंही नव्हती, आणि तशा संयोजनाचा काही हेतूही नव्हता. दरम्यान एके दिवशी देवनाथ राय, पी. एच्. डी., यांनी उत्तरबंग विद्यापीठातून बंगाली विभागातील काही प्राध्यापकांना आणून 'उत्तर बंगालची लोकसंस्कृती' या विषयावर एक परिसंवाद घडवून आणला. त्यात मात्र संमेलनातील इतर भाषणांमध्ये ऐकायला मिळाले नाहीत, असे काही आगळे मुद्दे ऐकायला मिळाले.

सकाळी मेळावा सुरु होता-होता बहुधा दहा वाजत, आणि बारा-साडेबारापर्यंत सकाळचं सत्र संपे. दोनेकदिवस तर सकाळी दहालाही सुरुवात करता आली नाही. पण एखादं सत्र रद्द करणं ठीक दिसत नाही, म्हणून मिळाले त्या बकऱ्याला भाषण करायला लावून ते सत्र संपन्न करण्यात आलं.

शेवटी असं समजलं की या मेळाव्यात अनेक प्रस्ताव मांडण्यात येणार आहेत. त्यांच्यामध्ये पुढील प्रस्ताव आहेत: (१) उत्तरबंगालमधील राजवंशी वस्ती अधिक असलेल्या भागास स्वतंत्र अधिकार द्यायला हवेत. गरज पडली तर त्यासाठी 'राज्य सीमा पुनर्निर्णायक कमिटी' गठित करायला हवी. (२) उत्तरबंगालमधील सर्व शासकीय कार्यालयांमध्ये, महाविद्यालयांमध्ये, विद्यापीठांमध्ये, वैद्यकीय महाविद्यालयांमध्ये, अभियांत्रिकी महाविद्यालयांमध्ये राजवंशी विद्यार्थ्यांसाठी किमान ५०% जागा राखीव ठेवण्यात याव्यात आणि त्यांच्या भरतीसाठी एका प्रवेश परीक्षेची व्यवस्था करण्यात यावी. (३) तिस्ता बंधाऱ्यासाठी अधिगृहीत/संपाद केलेल्या जमिनीच्या समपरिमाण जमीन खास जमिनीमधून शेतकऱ्यांना देण्यात यावी तसेच यानंतर कुठल्याही प्रकारे आणखी जमीन संपादित केली जाऊ नये. (४) शेतमालाचे किमान भाव आणि लेव्हीची सक्ती उत्तरबंगालमध्ये लागू होऊ नयेत, कारण उत्तरबंगालमध्ये शेतीसाठी कुठल्याही प्रकारची सिंचनव्यवस्था नाही आणि इथे पीक कमी प्रमाणात येते.

पण हे झाले नीतिमूलक प्रस्ताव. कार्यकारी असे दोन प्रस्तावं मांडण्यात आले.

पहिल्या प्रस्तावात म्हणण्यात आलंय् - तिस्ता बंधारा ज्या प्रकारे तयार होतो आहे, त्या प्रकारबद्दल हे सम्मेलन गंभीर नाराजी नोंदवू इच्छिते. सरकारने आपल्या इच्छेप्रमाणे जमीन यासाठी संपादन केली आहे. संपादन करताना जमिनीवर उभ्या असलेल्या

पिकाचाही विचार करण्यात आल नाही. तिस्ता बंधारा कोणत्या दिशेने, कसा बांधण्यात येणार आहे याचा एखादा नकाशा आधीच प्रकाशित करण्यात आला असता, तर शेतकरी सावध झाले असते आणि ज्या भागातील जमीन संपादित केली जाईल असं त्यांना वाटलं असतं, त्या जमिनीवर त्यांनी पेरणी केली नसती. त्यावरही तिस्ता बंधाऱ्याच्या कामात स्थानिक लोकांना नोकऱ्या देण्यात आलेल्या नाहीत. शिवाय तिस्ता बंधाऱ्यामुळे कुठे आणि कशा प्रकारे पाणी जाणार याचा कुठलाही हिशेब, कल्पना साधारण लोकांना देण्यात आलेली नाही. त्यामुळेच लोकांमध्ये असा संशय दिसून येतो आहे, की उत्तरबंगालमधील शेतमालाच्या उत्पादनात घट होणार, त्यावर विपरीत परिणाम होणार. तरीसुद्धा सरकारला तिस्ता बंधाऱ्याचं काम लवकरात लवकर सुरू करायचं आहे. 'अगदी लवकरच पश्चिमबंगालचे मुख्यमंत्री तिस्ता बंधाऱ्याच्या पहिल्या टप्प्याचं उद्घाटन करणार आहेत.' अशी जी घोषणा करण्यात आली आहे, तिच्या संदर्भात हे संमेलन गंभीर नाराजी व्यक्त करीत आहेत. तिस्ता बंधाऱ्याचं काम कुठपर्यंत आलं आहे याबद्दल साधारण जनतेला काहीच कल्पना न देता एकदम उद्घाटन करणं ही अन्याय्य घटना असून हा प्रकार लोकशाहीत बसणार नाही. पण, तिस्ता बंधाऱ्याचं काम अद्याप उद्घाटन करण्याइतपत झालेलं नाही. अशा परिस्थितीत हे सम्मेलन उत्तरबंगालवासियांना सावध करीत आहे- या उद्घाटनाविरुद्ध गर्जून उठा. म्हणूनच हे सम्मेलन आवाहन करीत आहे-मुख्यमंत्री तिस्ता बंधाऱ्याचं उद्घाटन करायला आल्यास आपण निर्दिष्ट दिवशी संपूर्ण उत्तरबंगालमधून मोर्चे घेऊन यावेत आणि या उद्घाटनाला विरोध करावा, मुख्यमंत्री उद्घाटन करू शकणार नाहीत अशी परिस्थिती निर्माण करावी.

दुसरा प्रस्ताव अधिक व्यापक होता. त्यात म्हणण्यात आलं होतं-उत्तरबंगालच्या विकासासाठी कोणतेच सरकार कधीही मन:पूर्वक प्रयत्न करीत नाही. उलट उत्तरबंगालमधून चहा, तंबाखू आणि लाकूड यांच्यावर राज्य आणि केंद्र सरकारला जकातीच्या रूपाने कोट्यावधी रुपयांचे उत्पन्न मिळत असते. उत्तरबंगालबाबत दाखवल्या जाणाऱ्या या उपेक्षेचा विरोध करण्यासाठी आगामी विधानसभा निवडणुकांवर उत्तरबंगालवासियांनी बहिष्कार टाकावा, असं आवाहन हे संमेलन करीत आहे. या निवडणुकीत उत्तरबंगालवासियांनी मतदान करू नये, असे हे संमेलन आवाहन करीत आहे. उत्तरबंगालमधून कुणीही उमेदवार या निवडणुकीसाठी उभा रहाणार नाही. उत्तरबंगालमधील कुणीही रहिवसी मत देणार नाही. उत्तरखंड पक्षाचा हिंसेवर विश्वास नाही हे, हे सम्मेलन जाहीर करू इच्छिते. त्यामुळेच हिंसक उपायांनी ही निवडणूक बंद पाडण्याचे आवाहन आम्ही करीत नाही, फक्त शांततामय मार्गांनी आगामी विधानसभा निवडणुकीवर बहिष्कार घालण्याचं आवाहन हे सम्मेलन करीत आहे.

## एकशे बहात्तर

# सांस्कृतिक फंक्शनचं विवरण : जात्रानाटक

सांस्कृतिक कायक्रमांमध्ये शनिवारी कलकत्त्याच्या 'नवरंजन ऑपेरा' कंपनीचं 'कुलटार कुल' हे नाटक होतं, रविवारी त्याच कंपनीचं 'प्रमोदतरणी' हे नाटक होतं. सोमवारी होती गाण्याची मैफल. त्यासाठी चित्रा सिंग शेवटी एकट्याच आल्या. जगजीत काही आले नाहीत. पण अनूप जलोटा आला, मन्ना डे होते, त्याशिवाय इतर कलाकार तर होतेच. मंगळवारी कलकत्त्याच्या 'ग्रूप थिएटर' नावाच्या एका नाट्यसंघाने ब्रेख्तचं 'कॉकेशियन चॉक सर्कल' हे नाटक केलं. बुधवारचा कार्यक्रम संध्याकाळी सुरू न होता रात्री आठला सुरु झाला आणि पहाटे चार वाजता संपला- संपूर्ण रात्रभर व्हिडिओवर चार चित्रपट दाखवण्यात आले. गुरुवारी एकच कार्यक्रम होता; आणि तोच या सम्मेलनातील शेवटचा सांस्कृतिक कार्यक्रम होता- श्रीदेवीचा नाच.

या कार्यक्रमांपैकी 'जात्रा' नाटकाचा कार्यक्रम दोन्ही दिवशी खूपच चांगला रंगला. तरीही एक जात्रानाटक पौराणिक असतं, तर जरा अधिक बरं झालं असतं. दोन्हीही नाटकं थोडी ऐतिहासिक आणि थोडी समाजिक होती. नबाबी अंमलात एक तरुणी आपलं घर सोडून नबाबाविरुद्ध कशा प्रकारे आंदोलन संघटित करते याची कथा 'कुलटार कुल' (कुलटेचं कूळ) या नाटकात होती. ही तरुणी हिंदू असते, हिंदू जमीनदाराच्या गावातली असते. ती एका रात्री एका तरुणाबरोबर आपलं घर आणि गाव सोडून जाते. म्हणूनच ती 'कुलटा.' नंतर हळूहळू असं समजतं की हा हिंदू जमीनदार त्या हिंदू मुलीला एका मुसलमान मनसबदाराला भेट म्हणून देणार असतो, आणि ही बातमी समजल्याने त्या मनसबदाराला एक तरुण सेनापती पळून येऊन त्या मुलीला तिच्या घरातून अन्यत्र नेऊन तिचं रक्षण करतो. पण दरम्यान जमीनदार आणि मनसबदार त्या तरुणाला 'गद्दार'- राजद्रोही- घोषित करतात आणि त्याचा शोध घेण्यासाठी सर्वत्र सैन्य पाठवतात. हे सैनिक गांवोगावी अत्याचार सुरू करतात - विशेषतः स्त्रियांवर. स्त्रियांना गटागटांनी पकडून जमीनदाराला आणलं जातं- त्या गटात ती पळून गेलेली तरूणी आहे की नाही हे ओळखण्यासाठी. इकडे ती पळून गेलेली तरुणी आणि तो तरुण सेनापती गांवोगाव फिरता-फिरता एकदा त्या नबाबाविरुद्ध सूड घेण्याच्या कारवाईचे संघटक बनतात, आंदोलनाचे संघटक बनतात. शेवटी हा मुसलमान सेनापती आणि हिंदू तरुणी यांच्या नेतृत्वाखाली संघटित झालेली गावकऱ्यांची सेना गनिमी काव्याने युद्ध करून त्या मुसलमान मनसबदाराच्या आणि हिंदू जमीनदाराच्या भाडोत्री सैन्याचा पराभव करतात.

या नाटकाच्या कथेचं देवी चौधुरानीच्या कथेशी थोडं साम्य आहे, 'जोन ऑफ् आर्क' शीसुद्धा थोडं साम्य आहे. ज्या प्रेक्षकांना ऐतिहासिक नाटकांची आवड होती, असे प्रेक्षक

मनसबगार, जमीनदार आणि ती मुलगी यांच्याशी थोड्याच वेळात समरस होतात. त्यानंतर हिंदू-मुस्लिम ऐक्यावर नाटकाच्या मध्येच चर्चा सुरू होते. गनिमी काव्याने लढले-जाणारे युद्ध स्टेजवर पहाताना नक्षलवाद्यांच्या 'खतम-अभियाना'ची तसेच पंजाबमधल्या आतंकवाद्यांची प्रेक्षकांना आठवण होतं. या सगळ्या घटकांमुळे हे जात्रानाटक सर्व प्रकारच्या दर्शकांपर्यंत सहज 'पोचतं.' एवढंच काय, ज्यांना इतिहासाचं तितकंसं ज्ञान नाही अशा आधुनिक तरुणांनाही अत्याचारी राज्यकर्त्यांविरुद्ध साधारण जनतेने केलेल्या संघटीत विद्रोहामध्ये आपलीच समस्या दिसते. एकीकडे मनसबदार आणि जमीनदार यांच्या अत्याचाराची कल्पना प्रेक्षकांना यावी, म्हणून त्या निमित्ताने स्त्री-पुरुषांची काही घनिष्ठ दृश्येही होती; शिवाय गझलगायनही होतं, त्यावर एका तरुणीचं नृत्यही होतं. या मोना गुप्ता नांवाच्या तरुणीने चित्रपटांत कॅबरे-नर्तकी म्हणून खूप नाव कमावलंय. मनसबदाराच्या एका मद्यपान-दृश्यात मोना गुप्ताचा कॅबरे नाचही होता. हा नाच या जात्रानाटकात आहे हे अनेकांना ठाऊक आहे. खरं तर या कॅबरे नाचामुळेच 'कुलटार कुल' जात्रानाटक म्हणून हिट झालंय. या कॅबरेमध्ये बराच वेळ बेलीडान्सही आहे. नाचाच्या शेवटी एका क्षणी नर्तकी आपल्या शरीराची जवळजवळ कमान करून स्टेजच्या मध्यभागी फिरते, त्यावेळी तिच्या पोटावर, ओटीपोटावर आणि स्तनांवर प्रकाश पडतो, बाकी सगळा प्रकाश विझून जातो, आणि नर्तकी कमान करूनच संपूर्ण स्टेजवर फिरते - सगळीकडच्या प्रेक्षकांना नीट पहाता यावं म्हणून. प्रेक्षकांमधून टाळ्या, चीत्कार, शिट्ट्या येतात. जेव्हा त्या बाजूच्या प्रेक्षकांना तिचं पोट आणि स्तन दिसतात, तेव्हा त्या बाजूच्या प्रेक्षकांमधून टाळ्या, चीत्कार आणि शिट्ट्या सुरू होतात. पण हे स्टेज काही इतर जात्रानाटकांच्या स्टेजप्रमाणे चारी बाजूंनी उघडं नाहीय्, फक्त एकाच बाजूने उघडं आहे. मोना गुप्ता शरीर फिरवत असल्याने सगळ्याच प्रेक्षकांना तिचे स्तन आणि तिचं पोट वेगवेगळया कोणांमधून दिसतं. त्यामुळे पुन्हा-पुन्हा प्रेक्षकांमधून टाळ्या, चीत्कार आणि शिट्ट्या उमटतात.

हे दृश्य जरा अधिकच वेळ चालतं. त्यानंतर लगेच बाहेर बॉम्बचा आवाज होतो, अचानक झालेल्या अंधारात मोना गुप्ता उठून उभी रहाते, एका काळ्या कापडाने आपलं शरीर ती संपूर्ण झाकून घेत असतानाच पुन्हा स्टेजवरचे दिवे लागतात आणि नायक-नायिकेने गोळा केलेली गनिमी काव्याने लढणारी फौज स्टेजवर प्रवेश करते. तेव्हा लक्षात येतं, की ही नर्तकीसुद्धा वेशांतर करून आलेली त्या फौजेमधलीच एक स्त्री-सैनिक असते. त्यानंतर थोडी धावपळ, थोडी तलवारबाजी होते आणि मनसबदाराचा पराजय होऊन त्याचा वध होतो आणि हे जात्रानाटक संपतं.

'प्रमोदतरणी' हे जात्रानाटकही 'कुलटार कुल' प्रमाणेच थोडं ऐतिहासिक आणि थोडं सामाजिक नाटक आहे. 'कुलटार कुल' नाटकातल्याप्रमाणेच 'प्रमोदतरणी' या

नाटकामध्येही नायक-नायिकेचं नक्की नातं काय- भाऊ-बहीण, पति-पत्नी की प्रेमिक-प्रेमिका - हे शेवटपर्यंत स्पष्ट होत नाही- अशा प्रकारच्या ठराविक नात्यांपेक्षा नायक-नायिका यांचं एकत्र रहाणं आणि जगणं यालाच अधिक महत्त्व दिलेलं आढळतं. 'प्रमोदतरणी'मध्ये अगदी सुरुवातीलाच मोना गुप्तासह इतर नर्तकींचा एक नाच आहे. या नाटकात मोना गुप्ता हातात माईक घेऊन विदेशी चित्रपटातल्याप्रमाणे स्टेजवर फिरत-फिरत गाणंही म्हणते. निळीची शेती करणाऱ्या साहेबाच्या बंगल्यावरच्या नाताळ-उत्सवाच्या निमित्ताने हा नाच आणि गाणं दाखवलं जातं. क्षेत्रमणीवरील बलात्काराचं दृश्य दोनदा आहे. बलात्कार एकदा साहेब करतो, एकदा त्याचा सहायक असलेला एक बंगाली. इथंही असं लक्षात आलं की बऱ्याच प्रेक्षकांना सुरुवातीचा हा नाच आणि नंतरचं बलात्कारदृश्य यांच्याबद्दल माहीत आहे. म्हणूनच ते नृत्य संपल्याबरोबर मंडपातून अनेकजण बाहेर पडतात आणि बलात्काराच्या दृश्याआधी मंडपात परत येतात. नाचाच्या वेळी प्रकाश खूप प्रखर, रंगीत आणि फिरता असतो - प्रकाशाच्या त्या फिरण्यामुळे दृश्यात थोडी मादकता येते. ती मादकता प्रेक्षकांमध्ये संचारित होते खरी, पण त्याचबरोबर 'पुढे काय होणार' असी उत्सुकताही प्रेक्षकांना असल्यामुळे ते आपली जागा सोडून नाचायला सुरुवात करीत नाहीत. पण हे घडतं दोन बलात्कार-दृश्यांमध्ये. दोन्हीही दृश्ये जरा सविस्तरपणे दाखवली जातात. त्यांच्यामध्येही प्रकाशयोजना खूपच कल्पकपणे करण्यात येते. बलात्काराचं दृश्य दोन वेळा कशासाठी, याचं एक उत्तर कथानकामधूनच मिळतं- नाट्यकाराने प्रादेशिक ताबेदार श्रेणीचं एक पात्रही दाखवलं आहे - ते अर्थात् वेगळ्या प्रकारे नक्कीच दाखवता आलं असतं! पण प्रेक्षकांच्या प्रतिक्रियांवरून असं लक्षात येतं, की पहिल्या वेळचा बलात्कार थोडा अपेक्षित आहे आणि थोडा अपघात आहे. त्या दृश्याला असलेली अत्याचाराची पार्श्वभूमी प्रथमापासून शेवटपर्यंत कायम रहाते. परंतु एकाच तरुणीवरील दुसऱ्या बलात्काराचं दृश्य प्रेक्षकांना नाट्यमय आणि अनपेक्षित वाटतं. एखाद्या वारांगनेवर काही लैंगिक अत्याचार झाल्यास ज्याप्रमाणे प्रेक्षकांचा पावित्र्यबोधाला धक्का पोचत नाही, त्याचप्रमाणे एकदा जिच्यावर बलात्कार झाला आहे, अशा तरुणीवर दुसऱ्यांदा बलात्कार होताना पहात असताना दर्शकांच्या सामाजिक सुरक्षिततेच्या जाणिवेला धक्का पोचत नाही. उलट या दुसऱ्या बलात्काराच्या दृश्याला जात्रानाटकातलं दृश्य म्हणून बऱ्याच निरपेक्षभावाने पहाता येतं. त्यामध्ये प्रकाशयोजनेची मदतही घेता येते. पहिली घटना घडते साहेबाच्या कोठीत. साहेबाला आवश्यक वाटतं तोपर्यंत, बराच वेळ त्या दृश्याच्या वेळी प्रकाश रहातो, तसंच त्या दृश्याच्या वेळी पाश्चात्य पध्दतीचं पार्श्वसंगीतही वाजतं. दुसऱ्या वेळी बलात्कार होतो तो त्या तरुणीच्या घरी, अंधारात. तेव्हा प्रेक्षक नट-नटीचे श्वास, दीर्घश्वास, कातर आवाज खूपच स्पष्टपणे ऐकू शकतात.

असं दिसलं, की प्रत्येक सांस्कृतिक कार्यक्रमात काय आहे हे बऱ्याचशा प्रेक्षकांना आधीपासूनच ठाऊक आहे. अशा प्रेक्षकांची टक्केवारी एकूण प्रेक्षकांच्या संख्येच्या हिशेबात जास्त आहे की नाही ते सांगता येणार नाही; पण ती जास्त नसावी असं वाटतं. कारण मंडपातल्या इतक्या साऱ्या प्रेक्षकांपैकी कितीतरी महिला आसपासच्या गावांमधून आल्या आहेत, अनेक प्रेक्षक दूर अंतरावरून बसने आले आहेत. त्याशिवाय ज्यांनी ही जात्रानाटकं, चित्रपट आधी पाहिले नाहीत अशा प्रेक्षकांची संख्याही काही कमी नाही. अर्थात सिनेमातली काही गाणी त्यांनी आधी रेडिओवर ऐकली आहेत. पण संख्येच्या दृष्टीने ही नाटकं आणि चित्रपट ठाऊक असलेल्या व पाहिलेल्या प्रेक्षकांची संख्या मोठी नसली, तरी एवढ्या मोठ्या मंडपामध्ये हे प्रेक्षकच प्रामुख्याने आहेत. ते वेगवेगळ्या जागांवर बसलेले असले, तरी एकाच वेळी बाहेर जातात आणि बाहेरून आत येतात. त्यांची वयोमर्यादाही बरीच आहे- वीस बावीस पासून चाळीस पंचेचाळीसपर्यंत या बाजूच्या विजेचं व्होल्टेज कमी असल्याने, हे सगळे लोक स्थानिकच आहेत की काय हे कमी प्रकाशात स्पष्टपणे लक्षातही येत नाही. त्याशिवाय या कार्यक्रमांची तिकिटविक्री झालीय, ती पहाडी प्रदेशात, आसामजवळच्या भागात, बिहारमधल्या काही भागात, बालुरघाट, रायगंज, शिलिगुडी आमि जलपाइगुडी या सगळ्या शहरांमध्येसुद्धा. त्यामुळे थंडीच्या रात्री अंधुक प्रकाशात चाललेल्या या कार्यक्रमात स्थानिक राजवंशी प्रेक्षकांबरोबर चहाच्या मळ्यातले मदेशिया लोक, गोर्खा लोक, बिहारी आणि आसामी लोकही मिसळून गेले होते. पॉलिथिनची जाकिटं, टोप्या आणि एकाच प्रकारचे जोडे घातलेल्या शहरी तरुणांमध्ये ट्रक आणि बसेसचे ड्रायव्हर्स-क्लीनर्स आणि ट्रकमधून आलेले नाना पेशांमधले नाना लोक मिसळून गेले होते. ही गर्दीच प्रेक्षकांमधील महत्त्वाचा भाग होती. कुठं आणि किती शिट्या वाजवायच्या, किती आवाज करायचा, कुठं शांतपणे ऐकायचं आणि कुठं एका सुरात चीत्कार करायचे आणि टाळ्या वाजवायच्या हे त्या गर्दीनेच जणू आधी ठरवेलेलं होतं.

## एकशे त्र्याहत्तर

# सांस्कृतिक फंक्शनचं विवरण-गायन

प्रेक्षकांमधल्या या भागाचं कार्यक्रमांबद्दलचं पूर्वज्ञानच या सांस्कृतिक अधिवेशनाचा प्रमुख पैलू होता. लहान मुलांना ज्याप्रमाणे आधी ऐकलेली गोष्टच पुन्हा-पुन्हा ऐकावीशी वाटते आणि गोष्ट ऐकता-ऐकता आपल्या मनाच्या परिचित प्रतिक्रियांचा आस्वाद घेत-घेत ती पुढे जातात, त्याप्रमाणे या प्रेक्षकांनाही कार्यक्रमातील आधी ठाऊक असलेले भाग

परत-परत पहावेसे आणि ऐकावेसे वाटतात. असंही असू शकेल की या प्रेक्षकांपैकी बराचसा भाग चित्रपट-दूरदर्शन पहात असेल, किंवा नाना ठिकाणी हे सगळे कार्यक्रम पाहून तो मुरब्बी प्रेक्षकवर्ग बनला असेल.

कार्यक्रमांबद्दल प्रेक्षकांचं पूर्वज्ञान सर्वात अधिक लक्षात आलं ते गाण्याच्या मैफिलीत. केवळ पुरुषच नव्हेत, तर महिलांमध्यही अनेक जणींना या सगळ्या गायकांच्या आवाजाची आणि त्यांच्या विशिष्ट गाण्यांची चांगलीच माहिती होती. महिलांची गर्दी ही अर्थातच पुरुष प्रेक्षकांच्या गर्दीप्रमाणेच विचित्र होती. संख्येच्या प्रमाणात राजवंशी आणि मदेशिया महिलांचीच गर्दी अधिक होती. पण गाण्याच्या कार्यक्रमासाठी शहरातूनही अनेक महिला आल्या होत्या- जलपाइगुडी, सिलिगुडी, धूपगुडी, अलीपुर-दुवार हून सुद्धा. गायकांची संख्या काही फार मोठी नव्हती- चित्रा सिंग, अनूप जलोटा, मन्ना डे. त्यांच्या शिवाय तितकेसे ख्यातनाम नसलेले आणखी तीन कलाकार होते. त्यांच्या गायनानेच कार्यक्रम सुरु होतो. अद्याप पुरेशी गर्दी झालेली नाही. बरेचजण बाहेरच्या मैदानात, एवढंच काय. रस्त्यातही गप्पा मारीत. चहा-सिगारेट पीत उभे आहेत. मैदानात इमिटेशन ज्युवेलरीच्या दुकानाजवळ एक ताडीचं छोटंसं दुकानही उभं राहिलंय. बरेचजण चोरट्यासारखे अंधाराच्या दिशेने जाऊन त्या ताडीच्या दुकानातून ताडी पिऊन येतात. बाहेरगावचे लोक तर अगदी मोकळेपणाने मोठमोठ्याने गप्पा मारीत तिकडे जातात आणि ताडी पिऊन येतात.

मन्ना डे यांच्या गायनानेच खरा कार्यक्रम सुरू झाला. त्यांनी एका भजनाने सुरुवात केली. त्यानंतर एक रवीन्द्र-संगीत गायलं. या दोन गाण्यांनंतर त्यांनी थोडं मध्यंतर घेतलं, काही वेळ हार्मोनियम वाजवला; तबला, गिटार सुरात लावण्यात आले; त्यानंतर थोडं गुणगुणले - तेही माईकवर ऐकू आलं, त्यानंतर एकदम अचानक गाण्याची एक ओळ गाऊन थांबले, प्रेक्षकांनी टाळ्या वाजवल्या. टाळ्या संपल्यावर त्यांनी गाणं गात असल्यासारखा आविर्भाव करून, माइकपासून चेहेरा जरा बाजूला घेऊन गायला सुरुवात केली. ते गाणं काही फार तालातलं गाणं नव्हतं, त्यामध्ये वरच्या सप्तकातल्या सुरांचा वापर होता. त्यामुळे प्रेक्षकांमध्ये उत्तेजना संचारली; पण तेवढ्यात ते गाणं जणू अचानकच संपवून मन्ना डे यांनी बंगाली लोकसंगीताच्या चालीतल्या एका आधुनिक गीताचं पहिलं कडवं गायिलं. पहिली ओळ सुरू होताच प्रेक्षकांमधून 'ईऽऽस्सऽ' सारखा एक आवाज सुरू होतो. पण त्या आवाजामध्ये आकस्मित उत्तेजनेपेक्षा अचानक ते गाणं आठवल्याचा विस्मय होता. या प्राथमिक प्रतिक्रियेनंतर प्रेक्षक गाण्याचा आनंद घेतात. आणि, या गाण्यातूनच मन्ना डे यांना जणू समजतं, की लोकांना जरा आगळं काही संगीत असेल तर आवडतं. हे गाणं ते आळवून आळवून म्हणतात आणि ही प्रक्रिया द्रुत झाली, तरी

गाण्यामधून नाट्यमयता पाझरते.

मन्ना डे यांच्यानंतर चित्रा सिंग आल्या. पण वादकांसह मन्ना डे यांचं प्रस्थान, त्यानंतर पडदा खाली येणं, प्रेक्षकांपैकी अनेकाचं बाहेर निघून जाणं, या सगळ्या गोष्टी मिळून जणू एक मध्यंतरच होतं. नंतर बऱ्याच वेळानंतर, चित्रा सिंग मंचावर बसल्यानंतर पडदा वर जातो. त्यानंतर वाद्यं लावणं सुरू होतं. प्रेक्षक आता बऱ्यापैकी स्थिर बसले आहेत असं दिसल्यावर चित्रा सिंग माईकवर थोडं गुणगुणतात. बऱ्याच मुलायम आवाजातल्या त्या गुणगुणण्यानं सारा मंडप भरून जातो. त्यानंतर गुणगुणणे थांबतं आणि अचानक वादक वादन सुरू करतात, ते अर्धा मिनिट चालतं. ते थांबल्यावर माईकवर घोषणा ऐकू येते, 'सर्व श्रोत्यांना श्रीमती चित्रा सिंग यांच्या वतीने विनंती करण्यात येत की हा कार्यक्रम कुणीही टेप करू नये. हा कार्यक्रम टेप केला जात आहे असं लक्षात आलं तर श्रीमती सिंग तत्काळ कार्यक्रम थांबवतील.' ही घोषणा दोन वेळा करण्यात येते. चित्रा सिंग हारमोनियम जरा जोराने वाजवून, दोन हात जोडून नमस्कार करतात. त्यानंतर त्या पहिलं गीत गायला सुरवात करतात.

त्यांना गायला सुरुवात केल्याबरोबर महिलांमधून अस्पष्ट असा समवेत गुणगुणण्याचा आवाज येतो. तो लगेच थांबतो. पण त्यावरून लक्षात येतं, की अनेकजणी गायिकेबरोबर मनातल्या मनात गाताहेत. प्रेक्षकांच्या या सक्रियतेला गायिकेने जणू प्रोत्साहनच दिलं असं वाटतं, कारण चित्रा सिंग यांनी श्रोत्यांचे गुणगुणणं ऐकून मंदस्मित केलं. त्यानंतर ते गाणं पूर्ण झाल्यावर एक द्रुत लयीतलं भजन गायला सुरुवात करून, श्रोत्यांकडे हात पसरून त्या म्हणतात, 'तुम्हीही गा,' त्यानंतर एक ओळ गाऊन, जणू श्रोत्यांच्या प्रतिध्वनीची त्या वाट पहातात. आणि प्रतिध्वनी येतो सुद्धा-जरा हळू आवाजात खरा, पण खूपच उल्हसित प्रतिध्वनी. आणखी दोन-तीन चरण याप्रमाणे गायिल्यानंतर चित्रा सिंग अचानक हार्मोनियम सोडून उठून उभ्या राहतात-भजनाच्या लयीत, दोन हात दोन बाजूंना पसरून स्वतः तर जणू भजनाच्या भावनेत मग्न होतातच, पण त्याबरोबर श्रोत्यांनाही हातांच्या खुणांनी गायला सांगतात, विंगमधून पळत येऊन एकजण त्यांच्या हाती माईक देतो, त्या डाव्या हातात माईक घेऊन, उजव्या हाताने हवेत टाळ्या वाजवतात, डोकं भजनाच्या तालावर डोलवतात, त्यांच्या अर्धोन्मीलित डोळ्यांमध्ये भजनाचे भाव दिसतात, त्यांच्या केसांच्या डोलण्यामध्येही तोच भक्तीचा उन्माद दिसतो. प्रेक्षक आधी-आधी चित्रा सिंग यांच्या मानेच्या डोलण्याशी ताल राखून हळू आवाजात टाळ्या वाजवीत असतात, पण गाणं जसं द्रुत लयीत होत जावं, तसं टाळ्यांचा आवाजही वाढतो आणि त्यांची तालही द्रुत होतो - बराचसा कीर्तनातल्याप्रमाणे. क्लायमॅक्सच्या वेळी चित्रा सिंग बराच वेळ गाणं थांबवून फक्त मान हलवीत रहातात आणि प्रेक्षक टाळ्या

वाजवीत गात रहातात. प्रेक्षकांचं गायनही लय वाढत-वाढत क्लायमॅक्सला पोचतं आणि थांबतं. चित्रा सिंग उभ्याउभ्याच वाकून अभिवादन करतात. हळूहळू पडदा खाली येतो. सगळे श्रोते जणू थोडे भारावून जातात.

तो भारावलेपणा नष्ट व्हायला वेळ लागतो. पण प्रेक्षक फारसे बाहेर जात नाहीत, बहुतेकजण आपापल्या आसनावरच बसून रहातात. पडदाही थोड्याच वेळात वर जातो. स्टेजवरचा प्रकाश आणि चित्रा सिंग यांचा पोशाख थोडा बदललाय. आता त्यांच्या गायनात एक वेगळाच सूर आहे- बालगोपाळांसाठीचा विनवणीचा सूर. पण तो बालगोपाळही लोकांना ठाऊक आहे. दुसऱ्या बैठकीत चित्रा सिंग यांच्या आवाजात आपला आवाज मिसळायला मनाई आहे हे सुद्धा प्रेक्षकांना ठाऊक आहे, आणि ती गाणीही समवेत स्वरात गाण्यासाठी नाहीत.

अनूप जलोटांच्या वेळी ही प्रेक्षकांचं हे पूर्वज्ञानच वेगळ्या प्रकारे प्रकाशित होतं. चित्रा सिंग यांच्यानंतर त्यांची मैफल सुरू होण्यापूर्वी एक मध्यंतर होतं. पडदा वर गेल्यावर ते ही प्रेक्षकांशी आपल्या उपस्थितीचा एक संयोग तयार करण्यासाठी थोडा वेळ घेतात. वारंवार हार्मोनियम वाजवतात आणि प्रेक्षकांकडे पहातात, जणू त्यांच्यामध्ये आपल्या ओळखीचे कुणी आहेत का हेच शोधताहेत. पण हा केवळ एक अभिनय असतो. मंचावरचा सगळा प्रकाश त्यांच्यावरच आहे. त्या प्रकाशाचा पडदा पार करून अनूप जलोटांना पलीकडचं काही दिसणं शक्यच नाही! पण प्रेक्षक मात्र त्यांचा हा आविर्भाव पहातात आणि गाण्यासाठी आवश्यक असं वातावरण तयार करण्यासाठी त्याला प्रतिसादही देतात. तो आविर्भाव करीत-करीतच अनूप जलोटा खूप दबल्या आवाजात एक उर्दू गझल सुरु करतात- जणू कुणी स्वतःशीच काही खाजगी बोलतोय, अशा स्वरात. मयनागुडीसारख्या एका गावी मुख्यतः राजवंशी श्रोत्यांना उर्दू शायरच्या शैलीतली अनूप जलोटाची ती गझल कशी काय आकर्षित करणार? तिथे आसाम-बिहारचे किती का प्रेक्षक असेनात, सिलिगुडी-बालूरघाटचे किती का प्रेक्षक असेनात- त्यांच्यामध्ये हिंदीभाषी लोकांची संख्या अगदीच कमी आहे. पण उर्दूभाषी प्रदेशापासून इतक्या दूरवर रहात असलेले हे प्रेक्षक उर्दूमधल्या काव्याने मोहित होऊन जातात आणि गायकाला उर्दू रिवाजाप्रमाणेच दाद देतात, त्याची वाहवा करतात. अनूप जलोटा या उर्दू गझलमध्येच अडकून रहातात असं नाही. पण पहिल्या दोन गझला या पद्धतीने गाऊन, काही वेळापूर्वी चित्रा सिंग यांनी मोहित केलं होतं हे जणू विसरायला लावतात. त्यानंतर स्मितहास्य करून अनूप जलोटा हिंदीत म्हणतात, 'मी आपणा सर्वांसाठी इथं आलो आहे. आपण हुकूम कराल, त्याप्रमाणे मी गाईन. पण सगळ्यांनी मिळून हुकूम केला, तर मला ऐकू येणार नाही. माझं एक गाणं पूर्ण झाल्यानंतर मी विचारीन. तेव्हा आपणापैकी ज्याचा आवाज मला ऐकू येईल, त्याच्या

फर्माइशीप्रमाणे मी गाईन.' अनूप जलोटा आपल्या एकेका गाण्याने प्रेक्षकांना स्तिमित करून, रुमालाने चेहरा पुसतात आणि हसून म्हणतात, 'फरमाइये!' लोकांचे चीत्कार शांत होण्याआधीच ते एक गाणं सुरू करतात. बहुधा कोणतं गाणं गायचं हे त्यांनी आधीच ठरवलेलं असावं, पण प्रेक्षकांच्या फर्माइशीच्या अधिकारामुळेच एवढ्या मोठ्या मंडपातल्या हजारो प्रेक्षकांशी गायकाचा घनिष्ठ संबंध तयार होतो. अनूप जलोटा हसून प्रेक्षकांच्या दिशेने एक हात पुढे करतात, तर कधी ज्या प्रेक्षकांना ते पाहू शकत नाहीत, ते प्रेक्षक आपल्या गाण्याचा कसा आस्वाद घेतात, हे पहाण्यासाठी गाण्याची एखादी ओळ पुन्हा-पुन्हा गात रहातात. जोपर्यंत गाणं चालू असतं, तोपर्यंत प्रेक्षक आणि गायक यांच्यामधल्या संपर्काचे असे. विविध पैलू दिसत रहातात.

## एकशे चौऱ्याहत्तर

# सांस्कृतिक फंक्शनचं विरवण- व्हिडिओ

जे लोक हे सांस्कृतिक कार्यक्रम करताहेत, ते उत्तरखंड पक्षाचे नसले, तरी हे सांस्कृतिक कार्यक्रम होताहेत, ते उत्तरखंड मेळाव्याच्या निमित्तानेच. पण जर उत्तरखंडाबद्दल त्यांना एका प्रकारची सहानुभूती वाटत नसती, तर स्वतःच पैसे गुंतवून या प्रकारचा कार्यक्रम करू शकत होते. ही सहानुभूती बहुधा राजनैतिक नाही, किंवा फक्त राजनैतिकच नाही. ही सहानुभूती तयार झाली आहे, ती बहुधा उत्तरबंगाल बरोबरच्या त्यांच्या व्यवसायाच्या निमित्ताने. एवढंच काय, वैयक्तिक ओळखींमुळेही-कुठल्याही कारणामुळे का होईना, ही सहानुभूती तर खरी आहे. दुसरीकडून पाहिलं, तर उत्तरखंडाचा हा इतका मोठा मेळावा ज्यांनी आयोजित केला आहे, त्यांना हा सांस्कृतिक कार्यक्रम म्हणजे या मेळाव्याचाच एक भाग आहे हे चांगलं ठाऊक आहे. एक सांस्कृतिक कार्यक्रम केला, तर उत्तरखंड मेळाव्याची माहिती किमान उत्तरबंगालमधल्या सगळ्यांना नीटपणे ठाऊक होईल. प्रचाराचा एक सोपा मार्ग म्हणून ही आयोजक या सांस्कृतिक कार्यक्रमाकडे पहात असतील.

पण प्रथम असं वाटतं की उत्तरखंड मेळावा आणि हा सांस्कृतिक कार्यक्रम जणू परस्परविरोधी कार्य करताहेत. उत्तरखंड म्हणजे राजवंशी लोकांचं स्वातंत्र्य, भूतकाळातील गौरव, वर्तमानकाळातील वंचना, विद्रोह आणि भविष्यकाळातील कार्यक्रम असं मेळाव्यात सांगितलं जातं, आणि संध्याकाळच्या कार्यक्रमात प्रामुख्याने हिंदी-उर्दू गाणी, किंवा बंगाली संस्कृतीचा भाग म्हणून ऐतिहासिक नाटकांच्या नावाखाली जात्रा, किंवा एवढंच काय, ब्रेख्तच्या नाटकांचे बंगाली अनुवाद, आणि वर व्हिडिओ फिल्मस् यांचा

समावेश असतो. या कार्यक्रमांपैकी प्रत्येकी कार्यक्रम भारताची बृहत्तर सत्ता, एवढंच काय, विश्वाच्या सत्तेची प्रेक्षकांना आठवण करून देतो. असं असेल, तर मग सकाळी संमेलनात जी स्वातंत्र्याची मागणी केली जाते, ती संध्याकाळच्या कार्यक्रमात मूढपणाची ठरते, आणि राजवंशी समाजाचं भारतीय संस्कृतीशी असलेलं सामंजस्यच अधिक ठळकपणे प्रस्थापित होतं. मग, या मेळाव्याशी असा सांस्कृतिक कार्यक्रम का जोडला गेला?

या गोष्टीचा जरा वेगळ्या पैलूनेही विचार करता येतो. सांस्कृतिक कार्यक्रमांमध्ये प्रेक्षकांचं पूर्वज्ञान हे आता इतकं आहे, की वाटतं, हे कार्यक्रम झाले नसते, तरी प्रेक्षक सर्वकाळ या कार्यक्रमांच्या विचारातच गढून राहिले असते. असं असेल, तर मग या उत्तरखंडाला उभं राहण्यासाठी काही आधारभूमीच नाही असं म्हणावं लागेल.

की कुठेतरी एखादा संयोग अदृश्य राहून जातो? कुठंतरी कुठलातरी संयोग अदृश्यपणेच दृढ होऊन जातो? ज्या प्रक्रियेने ओळखीच्या ऐतिहासिक गोष्टीमुळे मुंबईतल्या सिनेमातील कॅबरे आणि बेलीडान्ससाठी जागा तयार होते, ज्या कारणामुळे सामूहिक बलात्काराच्या बातम्या वाचण्याची सवय झालेल्या प्रेक्षकांसमोर एकाच तरुणीवर दोन वेळा दोन प्रकारे बलात्कार होतो, ज्या कौशल्यामुळे चित्रा सिंगच्या भजन-गायनातली उन्मादना आणि अनूप जलोटाच्या दरबारी गायनातली कारागिरी लोकांना चांगली वाटते, एवढंच काय, ज्या मुक्तपणे व्हिडिओसारख्या आधुनिक यंत्राचा उपयोग या दूरवरच्या प्रदेशात होतो, त्या प्रक्रियेत, कारणात, कौशल्यात आणि मुक्तपणातच फुटीरतेची एक प्रबळ ओढ लपलेली असते. नदीमध्ये ज्याप्रमाणे अनेकदा वरचा प्रवाह जितक्या वेगाने वहात असतो तितक्याच वेगाने खालच्या पातळीवरील एक प्रवाह विरुद्ध दिशेने वहात असतो, तसाच प्रकार मनुष्यसमाजातही होत असतो. ही सगळी जात्रानाटकं गाणंबजावणं जितक्या अधिक प्रमाणात सगळ्या माणसांना एक करतात, तितक्याच मोठ्या प्रमाणात माणूस आपल्या कोशामध्ये लपून राहू इच्छितो. तेही गोगलगायीप्रमाणे नव्हे, कारण गोगलगायीच्या लपून रहाण्यात फक्त आत्मरक्षण हाच हेतू असतो, कुठल्याही प्रकारच्या प्रति-आक्रमणाची इच्छा किंवा हिंस्रता नसते.

बुधवारी संपूर्ण रात्रभर व्ही. सी. आर. वर चार चित्रपट दाखवण्याची व्यवस्था करण्यात आली होती. दुसऱ्या दिवशी श्रीदेवीचा कार्यक्रम होता. त्यामुळे त्याआधीचा दिवस जरा हलका रहातो. कारण, व्हिडिओवर चित्रपट पहाण्यासाठी दूरचे प्रेक्षक नक्कीच येणार नाहीत, खेड्यातले प्रेक्षकही येणार नाहीत स्थानिक प्रेक्षकच संपूर्ण रात्रभर जितके चित्रपट पहाता येतील तेवढे पाहतील. खरं तर एखाद्या दिवशी संध्याकाळी आणि रात्री काहीच कार्यक्रम ठेवले नसते तर चाललं असतं, पण ते बरं दिसत नाही म्हणूनच व्हिडिओ-फिल्मची व्यवस्था केली होती. या चार चित्रपटांमध्ये 'ड्रॅक्युला' हा एक इंग्रजी, 'शोले' आणि 'शहेनशाह' हे दोन हिंदी आणि 'प्रतिकार' हा बंगाली असे चित्रपट होते.

आता जलपाइगुडीतल्या डूयार्समध्ये बाजार खूपच वाढलाय. मोठमोठ्या काही बाजारांमध्ये व्हिडिओ-पार्लर्सही सुरू झाली आहेत. कलकत्त्याच्या एखाद्या व्हिडिओ-पार्लरच्या मालकाला सांगून चित्रपट दाखवण्याची व्यवस्था करावी, असं आधी ठरलं होतं. सगळ्याच गोष्टी बाहेरून येत असताना व्हिडिओ तेवढा 'लोकल' ठेवण्यात काय हशील? पण हलदीबाडी हाटच्या व्हिडिओ-पार्लरचा मालक इथे येऊन धावपळ करतो. त्याचे वडील हलदीबाडीचे प्रख्यात जोतदार होते. जमीनजुमला विकून टाकून त्यांची जवळजवळ सगळीच मुलं बाहेर निघून गेली. एक मुलगा तर विदेशातच रहातो. हा एकच मुलगा तेवढा इथं राहिलाय. पैतृक घराचा वाटा आहे. नाना वेळी नाना प्रकारचे व्यवसाय करतो- काही दिवसांपूर्वीच व्हिडिओ-पार्लर सुरू केलंय्. अर्थात सध्या कज्जेखटले काहीही नसले, तरी त्याचं कुटुंब वीरेनबाबूंचं जुनं अशील. त्याने येऊन वीरेनबाबूंना धरलं. वीरेनबाबूंनी त्याचा नकुलबाबूंशी परिचय करवून दिला. त्याने नकुलबाबूंना वचन दिलं, की त्यांच्या लिस्टप्रमाणे मी कलकत्याहून नव्या प्रिंटस् घेऊन येईन. या मामल्यावर प्रायोजकांनाही फार डोकेफोड करायची नव्हती. शेवटी, याच गृहस्थाचा प्रस्ताव मंजूर झाला.

पण, कोणकोणते चित्रपट आणायचे हे ठरवण्यात खूप वेळ जातो. शेवटी एक ब्ल्यू फिल्म दाखवावी अशा एका गुप्त प्रस्तावावर खूप खडाजंगी झाली. इतक्या रात्री फारसे लोकही नसतील, असले, तरी झोपी जातील. पण, शेवटी असं ठरलं की ब्ल्यू फिल्म दाखवायची नाही, कारण त्यावरून पोलीस आक्षेप घेऊ शकतील. त्यापेक्षा 'ॲडल्ट-हॉरर' चित्रपट फारच सुरक्षित. अधूनमधून थोडेसे ब्ल्यू सीन्स असतात, एवढंच. पण 'हॉरर'च त्याचा प्रमुख असतो. काही 'ॲडल्ट-हॉरर'वर चर्चा ही झाली. शेवटी ठरलं, की 'ड्रॅक्युला' हाच चित्रपट मागवावा. या व्हिडिओपार्लर मालकानेच खबर दिली, की हा नवीन ड्रॅक्युला आहे. संपूर्ण नवीन प्रकारे फक्त व्ही.सी.आर. साठीच तयार केलाय. 'शोले'च्या बाबतीत सर्वात लवकर मतैक्य झालं. पार्लर-मालकानेच विचारलं होतं, 'शहेनशाह'ची एक प्रिंट मिळाली, तर आणू की नको? 'शहेनशाह'ची पोस्टर्स वारंवार झळकली असूनही तो रिलीज होण्याची तारीख पुढे-पुढे जात होती. बंगाली चित्रपटाबाबत प्रायोजकांची काही खास आवडनिवड नव्हती. 'बायकांना आवडेल असा एखादा बंगाली चित्रपट आणा, म्हणजे त्या बंगाली चित्रपट पाहिल्यावर निघून जातील' अशी त्यांची सूचना होती.

शेवटी हेच चार चित्रपट आले. पार्लर-मालकानेच ठरवून दिलं, की आधी बंगालीच चित्रपट व्हावा, त्यानंतर 'शोले'. त्यानंतर 'ड्रॅक्युला' शेवटी 'शहेनशाह.' पण नंतर त्यात बदल करावा लागला. 'शोले' हा अधिक वेळ चालणारा आणि बऱ्याच जणांनी पाहिलेला चित्रपट तो शेवटी दाखवावा. शेवटी तेच ठरलं. पण ते ठरण्याच्या मार्गातही नाना

अडचणी कारण, चांगली जाग असताना 'शोले' मधले ओळखीचे संवाद ऐकावेत, अशी अनेकांची इच्छा होती. पहाटेपहाटे थंडीत, आणि डोळ्यांवर झोप दाटून आली असताना 'शोले' पहाण्यात काही रंगत नाही. तेव्हा तो केवळ वेळ घालवण्यासाठी डुलक्या घेत-घेत पाहिला जाईल.

'शोले' आधी पहाण्यामागे आणखी एक मतलब होता. ताडीचं दुकान तोपर्यंच चालू राहील. दारू पीत-पीत 'शोले' पाहणं - अशी संधी क्वचित येते! पण 'शहेनशाह'च्या बाजूनेच अधिक मतं पडली. जे आधी 'शोले'च्या बाजूने होते, तेही या प्रस्तावाला राजी झाले. काहीही असंल, तरी 'शहेनशाह' हा अमिताभ बच्चनचा नवा सिनेमा होता- तेव्हा तोच सुरुवातीला दाखवावा. तो वाईट थोडाच असणार?

बंगाली चित्रपट साडे दहाच्या आतच संपला. मध्यंतर वगैरे करण्यात आलेलं नव्हतं. बंगाली चित्रपट प्रामुख्याने महिलांनीच पाहिला. पण तो चित्रपट संपल्यावर मंडप जवळजवळ भरून गेला. इतके लोक येतील अशी अपेक्षा नव्हती. टेलिव्हिजन सेट एका उंच स्टुलावर ठेवला होता. पत्र्याच्या कुंपणाचे वरचे स्क्रू लावण्यासाठी तो स्टूल तयार केला होता. पण स्टेजऐवजी हा स्टूल मंडपाच्या मध्यभागी ठेवला होता. पूर्वेच्या बाजूच्या कुंपणाला लागून. प्रेक्षक टी.व्ही.ला घेरून बसले होते. जे पुढे बसले होते, ते फार जवळ जाऊ शकत नव्हते, पण जे मागे बसले होते, तेही खूप विस्कळित असे विखरून असे, बसले होते.

अशा पडद्याच्या प्रकाशातून वारंवार मंडपात भारतवर्षातील नाना प्रदेशातील नाना दृश्यं दिसत होती, हिमालयापासून समुद्रापर्यंत, मध्ययुगापासून आधुनिक युगापर्यंत ती विस्तारत जात होती. त्या सुमारे तीन तास चालणाऱ्या वास्तवावर उतरतो मध्ययुगातील एक पाश्चात्य प्रासाद - त्यात मृत्यूनंतर एक निर्विकल्प, मुखवट्याप्रमाणे चेहरा असलेला एक अगडबंब माणूस, त्याचं वय काय हे लक्षात येत नाही, त्याच्या डोळ्यांच्या दृष्टीवर पापण्यांची छाया पडत नाही. मयनागुडीतल्या या मंडपाच्या छतावर पहाटेचं दंव टुप्-टुप करीत पडतंय्, आणि मंडपातल्या प्रेक्षकांच्या झोपेने जड झालेल्या डोळ्यांसमोर एकामागून एक खून होतात. प्रत्येक हत्याकांड अगदी बारीकसारीक तपशिलांसहित दाखवलं जातं. ज्याचा खून होतो, त्याच्या शरीराचा प्रत्येक अवयव नाना क्लोज-अप्समधून प्रेक्षकांसमोर फिरतो. खुनामागून खून, खुनामागून खून; रक्तपातामागून रक्तपात- यात मानवशरीर जेव्हा अवान्तर होऊन जातं, तेव्हा त्याच यांत्रिक अवांतरतेमध्ये महिलांची शरीरं मेणाच्या शरीरांप्रमाणे पडद्यावर फिरतात. जणू काहीच उच्चारण नाही, भाषा नाही, बाँबने उद्ध्वस्त झालेल्या कुण्या शहराप्रमाणे नाही शरीर आहे, फक्त शरीर. त्या संपूर्ण अनोळखी गोष्टीच्या शेवटी गब्बरसिंगचा चिरपरिचित आवाज आणि अगदी ड्रॅक्युलाही उत्तरखंड मेळाव्याचा आत्मीय होऊन जातो.

## एकशे पंचाहत्तर

# श्रीदेवीच्या नाचासाठी ट्रॅफिक-कंट्रोल

गुरुवारी सकाळी दहाच्या सुमारास मयनागुडी शहरात पोलिसांनी प्रवेश केला. तिस्ता पुलापासून जो रस्ता मयनागुडीत प्रवेश करतो, आणि मयनागुडीपासून जे दोन रस्ते मालबाजार आणि आसामकडे गेलेले आहेत- त्या तीनही रस्त्यांवर पोलीसांनी भरलेल्या गाड्या निघून गेल्या. मालबाजारच्या रस्तावर एक, आसामच्या रस्त्यावर तीन, आणि पुलाच्या रस्त्यावर दोन. त्याशिवाय एन जीपगाडी घेऊन डी.एस.पी. साहेब चौपत्तीवर उभे राहिले. आसामच्या रस्त्यावर मयनागुडी ठाण्याचे ओ.सी. आणि उभे राहिले आणि जलपाइगुडीच्या बाजूला जगपाइगुडीचे ओ.सी. थांबले. दहा वाजल्यापासून ते बारा वाजेपर्यंतचा वेळ या धावपळीतच गेला. बारा वाजल्यानंतरच दिसलं, की पोलिसांनी सगळ्या ट्रफिकची जबाबदारी घेतली आहे. आसामच्या रस्त्यावर पुढे तीन मैलपर्यंत, कुठल्याही गाडीला थांबू देत नाहीत, पण कुठलीही गाडी अडवीतही नाहीत. मिनि-बसेस किंवा रांगेतल्या बसेसना स्पीडही कमी करायला सांगत नाहीत. - उतारूंना उतरण्या-चढण्यासाठी कार्यक्रमाच्या जागी, चौपत्तीवर, चौपत्तीनंतर एका ठिकाणी फक्त एकेक मिनिटासाठी या मिनि-बसेसना व बसेसना थांबू देतात. मालबाजाराच्या बाजूने गाड्यांना शहरात शिरूच देत नाहीत- 'भारती' चित्रपटागृहाजवळून त्यांना शहराबाहेर जायला सांगतात. त्यामुळे, मयनागुडीच्या चौपत्तीवर माणसांची गर्दी खूप वाढलेली असली, तरी इतर दिवसांच्या तुलनेने गाड्यांची गर्दी जवळजवळ नाही असं म्हटलं तरी चालेल तिथलं वातावरण बरंचसं 'बंद'च्या दिवसासारखं वाटतं.

दुपारी एक-दीड वाजल्यापासून बाहेरचे ट्रक आणि बसेस यायला सुरुवात होते. पोलिस कुठल्याही ट्रकला किंवा बसला शहरामध्ये प्रवेश करू देत नाहीत. कार्यक्रमाच्या जागेपासून सुमारे मैलभर अंतरावर आसामच्या रस्त्यावर एका मोठ्या मैदानात त्या ट्रक-बसेसना पार्किंगसाठी पाठवताहेत. रांगेत उभ्या असलेल्या ट्रक-बसेसना एक टोकनही दिलं जातंय- त्यावर गाडीचा नंबर आणि ड्रायव्हरचं नांव लिहिलेलं असतं. सुरुवातीच्या काही बसेस-ट्रक्सनां परमिट आहे की नाही हे पाहाण्यात आलं. त्यात काहीतरी गोलमाल दिसल्याबरोबर डी.एस्.पी. साहेब येऊन मयनागुडीच्या ओ.सी.ला म्हणाले, परमिट पहाण्याची गरज नाही. डी.एस.पी. साहेब निघून गेल्यावर दोन हेडकॉन्स्टेबल्सनी मैदानात उभ्या राहिलेल्या गाड्यांची परमिट्स पहायला मागितली- गुपचूप परमिटच्या ऐवजी ड्रायव्हर्सनी त्यांना दहा-दहा रुपये दिले. आधी ते पाच-पाचच रुपये देऊ लागले होते. पण त्यात किती वाटेकरी असतील हे कॉन्स्टेबलनी त्यांना समजावून सांगितलं. तेव्हा दहा रुपये हा दर ठरला. काही ट्रक-बसेस येता-येताच हा वाद मिटला. नवीन गाडी

मैदानात आल्याबरोबर ड्रायव्हरला समजे- कॉन्स्टेबलला दहा रुपये द्यावे लागतात. या दोन कॉन्स्टेबल्सना इतर कुणीही हाका मारीत नाही. ते दोघेही एका बसच्या सावलीत सतरंजी अंथरून तिच्यावर बसून रहातात.

थोड्या वेळानंतर, दुपारी तीनच्या सुमारास तिस्ता ब्रिजवरून गाड्या यायला सुरुवात होते. त्या बाजूला जवळपास मोकळं मैदान नसल्याने या गाड्यांना बरंच दूर, जवळजवळ दीडेक मैल अंतरावरच्या एका मैदानात उभं रहावं लागतं. ते मैदानही जरासं खचलेल्या भागात. त्यामुळे रस्त्यावरून मैदानात उतरताना गाड्यांना जरा सांभाळूनच उतरावं लागतं. मैदान विस्तीर्ण असलं, तरी त्यापासून जवळच जंगली झाडा-झुडुपांची गर्दी-गचपण सुरु होतं. त्यामुळे तिकडं जाण्यासाठी कुठलीही ट्रक किंवा बस राजी होत नाही.

तिस्ता ब्रिजवरून अनेक खाजगी गाड्या आणि टॅक्सीज येतात. या मैदानात गाड्या पार्क करून इतक्या दूर कार्यक्रमाच्या ठिकाणी पायी चालत जाण्याला त्यातला उतारूंचा आक्षेप असतो. तिथे दुपारी चारच्या सुमारास एक बराच मोठा गोंधळ होतो. डी.एस.पी. साहेबांनाही यावं लागतं. डी.एस.पी. साहेबांशी वाद घालणारांपैकी बरेचजण दार्जिलिंग, शिलिगुडी, जलपाइगुडीचे व्यापारी किंवा चाकरमाने लोक आहेत. कॉलेजमधले शिक्षकही दोन टॅक्सीज करून आले आहेत. वाद अधिक वाढण्याआधीच डी.एस.पी. सांगून टाकतात, 'हे पहा, ट्रक, बस किंवा मिनिबसला इथंच थांबायला हवं. प्रायव्हेट गाड्यांसाठी आणि टॅक्सीजसाठी आम्ही समोर एक पॉइंट केलाय. तिथे उतारूंना उतरवून त्याही गाड्यांनी याच मैदानात यायला हवं. हे आपणाला मान्य असेल तर बोला, नाहीतर सर्वांना इथंच उतरावं लागेल.'

समर्थन आणि आक्षेप यांच्या कोलाहलात अचानक एकजण विचारतो, 'म्हणजे परत जायच्या वेळी परत इथेच येऊन गाड्यांत चढायचं? इतकं दूर चालत येऊन?'

डी.एस.पी. धमकीच्या स्वरात म्हणतात, 'बस-ट्रकच्या प्रवाशांना इथूनच चालत जावं लागतंय हे पहाता आहात ना? आपण वेळ घालवू नका. जे काय करायचंय ते आत्ताच करा.' दरम्यान आणखी एक आवाज येतो- 'एवढ्या रात्री इतका दूरचा रस्ता चालून येताना काही चोरीबिरी झाली तर तिची जबाबदारी कोण घेणार?'

डी.एस.पी. साहेब म्हणतात, 'या रस्त्यावर उद्या सकाळपर्यंत पोलीस रहातील.'' एवढं बोलून रस्त्यावर उभ्या राहिलेल्या एका 'मारुती'कारला सरळ पुढे जायला सांगतात. 'मारुती'चा ड्रायव्हर सरळ पुढे जातो. तिच्या मागे उभ्या राहिलेल्या गाड्याही 'मारुती'च्या मागे-मागे जातात. जलपाइगुडीच्या ओ.सी.ला त्या आधीच्या पॉईंटवर पाठवून देऊन डी.एस.पी. आपल्या गाडीत बसतात.

जगपाइगुडीचे ओ.सी. आपली जीपगाडी रस्त्याजवळ उभी करून खाली उतरतात, त्यानंतर डी.एस.पी. च्या गाडीच्या दिशेने चालत जातात. डी.एस.पीं.नी गाडी

थांबवल्याबरोबर ओ.सी. म्हणतात, 'सर, आधी जी व्यवस्था होती तीच ठेवा सर, नाहीतर या रस्त्यावर माणसं आणि गाड्या यांचा गोंधळ होईल.'

डी.एस.पी. गाडीतून उतरतात. नंतर ओ.सींना. घेऊन पुन्हा पहिल्या ठिकाणी चालत येऊ लागतात. खाजगी गाड्यांमुळे उडणाऱ्या धुळीने रस्ता अंधारला आहे. डी.एस.पी. दबल्या आवाजात म्हणतात, 'बरोबरच म्हणालात तुम्ही, गाड्यांवरून इथं एखादं स्टॅम्पेड व्हायचं!'

पार्किंगच्या मैदानात येऊन डी.एस.पी. बाकीच्या खाजगी गाड्यांना अडवून मैदानात जायला सांगतात. या सगळ्या नवीन गाड्यांतल्या लोकांना, इथं एवढ्यात काय झालंय हे ठाऊकच नसतं. त्यामुळे ते मैदानात जातात. ज्या इतर खाजगी गाड्यांतल्या लोकांनी मैदानात उतरायला आक्षेप घेतला होता, त्यांच्यापैकीही अनेकजण मैदानात उतरले आहेत. कारण, गाड्यांमध्ये काहीचे चहा-कॉफीचे फ्लास्क्स् आहेत, काहींच्या दारूच्या बाटल्याही आहेत. गाडी त्यांना पुढे सोडून पुन्हा मागे येणार असेल, तर फायदा काय? त्यापेक्षा गाडी इथं मैदानात पार्क करून चालत पुढे गेलेलं चांगलं- असा विचार करून तेही मैदानातच उतरतात. या मुद्द्यावर आता आणखी वादावादी होत नाही. ज्या गाड्यांना आधीच सोडून दिलं होतं, त्या परत आल्यावर डी.एस.पी. साहेब ओ.सीं.ना म्हणतात, 'तुम्ही इथंच थांबा.'

तोपर्यंत तीन दिशांहून आलेले ट्रक्स, बसेस आणि गाड्या तीन ठिकाणी उभ्या राहिल्या आहेत. आकाशातून जर पाहिलं असतं, तर तिस्ता पुलापासून, आसाम रोड पासून, डूयार्सच्या रस्त्यावरून, त्याशिवाय मैदानातून, कच्च्या वाटांवरून पायी चालत-चालत माणसं एका केन्द्राच्या दिशेने चालली आहेत- एखाद्या मोठ्या यात्रेच्या वेळी यात्रेकरू जसे चालत येतात, त्याप्रमाणे. त्यांच्या चालण्यामुळे धूळ उडतेय. आकाश जमीन यांच्यामध्ये धुळीचा एक पडदाच तयार होतो. त्या पडद्यांतून माणसं थोडी अस्पष्ट दिसतात. पण इतकं माणसं एकाच गतीने एकाच केन्द्राकडे चालत असल्यामुळं अशी धूळ उडणं स्वाभाविक आहे. त्या धुळीचाही जणू एक प्रवाह-पथ तयार झालाय.

## एकशे शहात्तर

# श्रीदेवीचा नाच : अपेक्षा आणि प्रतीक्षा

मयनागुडी गावाच्या जवळच दर वर्षी शिवरात्रीला जल्पेशाची यात्रा भरते. जल्पेश देवस्थानाजवळचं मयनागुडी हेच सर्वात मोठं शहर आहे आणि ही यात्राही महिनाभर

चालते. त्यामुळे नाना ठिकाणचे तीर्थयात्री मयनागुडीमार्गेच यात्रेला जातात. मयनागुडीच्या मोकळ्या मैदानांमध्ये, झाडांच्या तळाशी, व्हरांड्यांमध्ये ते तात्पुरते निवारे उभारतात. शिवरात्रीच्या दिवशी मयनागुडीमार्गे आधी पायी जाणारे तीर्थयात्री जात, आणि त्यानंतर बस-मिनिबस वगैरे वाहनांची गर्दी होई. हे सगळं पहाण्याचा मयनागुडीच्या लोकांना अनुभव आहे.

पण श्रीदेवीच्या नाचाच्या कार्यक्रमादिवशी दुपारी चार वाजल्यापासून मयनागुडी आणि परिसराचा चेहरामोहरा असा काही झाला, की त्याचा मेळ मयनागुडीच्या रहिवाशांच्या या दरवर्षीच्या अनुभवाशी बसत नव्हता. असं वाटू लागलं, की मयनागुडी आणि परिसरात अनेक जल्पेशयात्रा एकाच वेळी भरल्या आहेत.

आसाम आणि बिहारच्या दिशेने जे प्रेक्षक ट्रक्स-बसेसमधून आले आहेत, त्यांच्या वाहनांतच त्यांचं खाणं-पिणं-बिछाना-कपडे आहेत. जे प्रवासी डीलक्स बसेसमधून एखाद्या ट्रॅव्हल कंपनीमार्फत आले आहेत, त्यांचं तर जणू घरच त्या बसमध्ये आहे. त्यामुळे, गाडी मैदानात लावल्यावर गाडीतले प्रवासी आपले आप्त-मित्र घेऊन, एक-दोन सतरंज्या टाकून त्यांच्यावर बसतात. काहीजण खाण्याचे डबे उघडतात. त्यांनी केळीची पानं आणि पाण्याच्या हंड्याही बरोबर आणलेल्या आहेत. कुठे पंप मारायच्या केरोसीनच्या स्टोव्हवर कढया चढलेल्या दिसताहेत- भजी तळण्यासाठी. एवढंच काय, एवढ्या कमी वेळात कुठे-कुठे पत्त्यांचे अड्डेही रंगले आहेत. महिलाही आहेत, पण त्यांची संख्या कमी आहे. अशा प्रकारच्या सगळ्या कार्यक्रमांना महिलांचीच संख्या जास्त असते, तशी नाही. तरीही तळण तळणं, खाद्यपदार्थ वाढणं यासाठी तर महिलांची आवश्यकता असते. काही-काही डीलक्स बसेसमध्ये महिलांची संख्या खूपच अधिक दिसते. त्यांच्याकडे मोठमोठ्या कळशीच्या आकारांच्या फ्लास्कमध्ये चहा आहे, त्याप्रमाणे थंड पाणीसुद्धा आहे.

ट्रक-बस, गाड्या पार्किंग करण्याच्या ठिकाणी खाद्यपदार्थांचा गंध वाऱ्याबरोबर पसरतोय, त्याचप्रमाणे थोडा-थोडा दारूचा गंधही येतोय. पण खाद्यपदार्थांचा गंध इतका संमिश्र आहे, की दारूचाही गंध त्यात मिसळून गेला आहे. त्याला वेगळं काढता येत नाही. पण आवाजांना वेगवेगळं ओळखता येतं. यात्रेप्रमाणे खूप गलबला नाही- माणसं आपसातच गप्पा मारताहेत. तो आराज कितीसा दूर जाणार? त्यांच्या आवाजाबरोबरच कॅसेटसवरून श्रीदेवीच्या सगळ्या प्रसिद्ध गाण्यांचेही सूर ऐकू येताहेत. लोक टेपरेकॉर्डर्स खांद्यावर किंवा हातात झुलवीत फिरताहेत. काही टेपरेकॉर्डर्सवर इतरही गाणी वाजताहेत. काहीजण त्या गाण्यांच्या सुरात आपले सूर मिसळताहेत. पण तरीही फारसा गलबला तयार होत नाही. कॅसेट्सही कुणी फार मोठ्या आवाजात लावलेल्या नाहीत. किंवा, मोठ्या आवाजात लावलेल्या असल्या, तरी एवढं मोठं मैदान आणि एवढी मोठी गर्दी या

कारणांमुळे त्यांचा आवाज फारसा येत नाही.

ही हजारों माणसं अपेक्षेपेक्षा शान्त, अनुत्तेजित मनस्थितीत मैदानात फिरताहेत, हळू आवाजात कॅसेट्स वाजवताहेत, खाण्या-पिण्यामध्येही जरा अधीर होताहेत, दारूमुळेही कुणी लास होऊन पडत नाहीय, कारण ही हजारो माणसं एकाच अपेक्षेने इथे फिरताहेत. सगळेजण श्रीदेवीची वाट पहाताहेत. श्रीदेवीचे चित्रपट पाहून, चित्रपटातील तिचे नाच पाहून, आजच्या कार्यक्रमात आपल्याला काय पहायला मिळणार हे गर्दीतल्या प्रत्येकाला निश्चितपणे ठाऊक आहे, कारण श्रीदेवी या गर्दीतील प्रत्येकाला ठाऊक आहे. आता तीच पाहिली- न पाहिलेली श्रीदेवी त्यांना प्रत्यक्ष पहायची आहे. श्रीदेवी या मैदानातून एखाद्या खुल्या गाडीत उभी राहून या सगळ्यांसमोरून गेली, तर श्रीदेवी ही एक रक्तामांसाची व्यक्ती आहे हे समजल्यानेही या गर्दीचं बरंचसं समाधान होईल. श्रीदेवी तिच्या रक्तामांसाच्या शरीरामुळेच या सगळ्या गर्दीला ओळखीची आहे. त्या रक्तामांसाच्या शरीरामुळे जे सेक्स अपील निर्माण होतं, त्या सेक्स अपीलच्या आकर्षणामुळेच हे सगळे प्रेक्षक येताहेत. या गर्दीला जणू असं एक चित्रपटात दिसणाऱ्या सेक्स अपीलचं एक मानवी उगमस्थान आहे, एवढं जाणणं सुद्धा पुरेसं आहे. पण या शहाणपणाची सीमारेषा खूपच पुसट आहे. या गर्दीमध्ये अशी एक असंभव गोष्टीची प्रस्तुतीही आहे, की सिनेमाच्या पडद्या व्यतिरिक्तसुद्धा रंगमंचाच्या वास्तवतेत रक्तमांसाच्या श्रीदेवीला पहाणं म्हणजे त्यांच्या या सिनेमाहॉलमधील अनुभवाचंच संप्रसारण, त्याप्रमाणे श्रीदेवीच्या रक्तमांसाच्या शरीराला स्पर्श करता येणार नाही, तरी जवळजवळ स्पर्श करता येईल. सिनेमाच्या पडद्यावर श्रीदेवीचे मांसल दंड, तिच्या बगला आणि पाठींच्या स्नायूंचं कंपनसुद्धा ज्यांना परिचयाचं आहे त्यांना तिचं शरीर तेवढंसं स्पर्शातीत वाटणारही नाही-संधी मिळाली तर. म्हणूनच शांतपणे व अनुत्तेजितपणे या गर्दीची श्रीदेवीसाठी जी प्रतीक्षा चालली आहे, तिच्यामध्ये हिंस्रतेची इच्छाही मिसळलेली नाही असं नाही. गर्दी इतकी शान्त आणि अनुत्तेजित नसती, तर त्या हिंस्रतेचा अंदाज करता आला नसता.

किंवा, त्या हिंस्रतेला नेहमीच सत्य धरून चालावं लागतं.

म्हणूनच, पोलिसांच्या सल्ल्यानुसारच श्रीदेवी शिलिगुडीच्या हॉटेलपासून तिच्या तीन गाड्या घेऊन जलपाइगुडी मार्गाने, तिस्ता ब्रिजवरून मयनागुडीला आली नाही. कारण, याच रस्त्याने प्रेक्षक येताहेत. एखाद्या ठिकाणी गाडी रहदारीत अडकली असती, तर प्रेक्षकांनी श्रीदेवीला ओळखलं असतं. म्हणूनच, श्रीदेवी मयनागुडीला आली, ती शेवक ब्रिजवरून, ओदलाबाडी पार करून, चालसा वळणावरून, लोटागुडीवरून. कारण या मार्गावरून प्रेक्षकांच्या गाड्या सर्वांत कमी आहेत; ज्या येताहेत त्याही चहाच्या मळ्यांच्याच. रस्ताही जरा रुंद आहे, बराचसा पहाड फॉरेस्ट आणि चहाच्या मळ्यांतून

गेलेला आहे. त्यामुळे अचानक जरी कुणी श्रीदेवीला ओळखलं, तरी गर्दी जमा होण्याची भीती या रस्त्यावर तितकीशी नाही.

श्रीदेवीच्या तीन गाड्यांपैकी पहिल्या गाडीत तिचे अंगरक्षक, दुसऱ्या गाडीत ती स्वत: आणि बहुधा अन्य काहीजण. त्या गाड्यांच्या काळ्या काचा वर चढवलेल्या आहेत. तिसऱ्या गाडीत तिचे इतर सहकारी-वादक, मेक-अपमन इत्यादी. या तीन गाड्यांच्या मागूनच थोड्या अंतरावर एक पोलीस-जीपही होती.

मयनागुडीच्या जवळ आल्यावर पोलिसांची जीप दूर रहात नाही. पहिल्या गाडीच्या पुढेच रहाते. मयनागुडीच्या रस्त्यावर आता अक्षरश: हजारोंनी लोक चालताहेत. पोलिसांची गाडी सायरन वाजवते. त्या अचानक आलेल्या सायरनच्या आवाजाबरोबरच चार-चार गाड्यांच्या हेडलाईटसचा प्रकाश रस्त्यावरच्या लोकांवर पडतो. त्यामुळे इतके लोक असले, तरी ते इतक्या वेगाने रस्त्याच्या बाजूंना होतात की गाड्यांना आपला वेग कमी करावाच लागत नाही. चारीही गाड्या समान वेगाने कार्यक्रमाच्या जागी येऊन नवीन बांधलेल्या कल्व्हर्टवरून मंडपाच्या डाव्या बाजूला एकदम ग्रीनरुमच्या दरवाजासमोर पोचतात. पोलिसांची गाडी बाजूला जाते, तिच्यामागे पहिली गाडीही बाजूला जाते. दुसरी, काचा वर चढवलेली गाडी पुढे येते. तिसऱ्या गाडीचा दरवाजा उघडून काही लोक उतरतात, उतरून उभेच रहातात. दुसऱ्या गाडीचा दरवाजा उघडून, कोलॉप्सिबल गेटमधून श्रीदेवी कधी आत गेली हे कुणालाच समजत नाही. गाड्यामधून लोक नाना यंत्र, वाद्यं वगैरे बाहेर काढू लागतात.

## एकशे सत्त्याहत्तर

# श्रीदेवीच्या आगमनाची प्रतिक्रिया

श्रीदेवी आलीय् हे लोकांना लक्षात येण्याआधीच ती कोलॅप्सिबल् गेटच्या आत निघून जाते. फक्त सर्वात बाहेरच्या कोलॅप्सिबल गेटच्या बाहेर श्रीदेवीच्या व्यक्तिगत अंगरक्षकांच्या बरोबर उत्तरखंड मेळाव्याच्या सांस्कृतिक कार्यक्रमाच्या कार्यकर्त्यांपैकी एकजण थांबतो - आत आणि बाहेर सगळीकडे श्रीदेवीचीच माणसं आहेत. ग्रीनरूमचा किंवा मंडपाचा जो मुख्य दरवाजा पूर्वेकडे आहे, त्या दिशेने मंडपात प्रवेश करण्यासाठी कुठलाच मार्ग नाही. बाहेरच्या मोठ्या रस्त्याच्या खाली असलेल्या नाल्याच्या वर जो कल्व्हर्ट या दोन दिवसांमध्ये तयार करण्यात आलाय्. त्यावरून या पूर्व बाजूला येता येतं. आता या पूर्वेच्या बाजूने थेट - ग्रीनरूमच्या मागून पुन्हा मंडपाच्या पश्चिमेकडे जाता

येतं खरं, पण तो फारच लांबचा हेलपाटा पडतो. एक गाडी रस्त्याच्या दिशेने तोंड करून ग्रीनरूमच्या मुख्य कोलॅप्सिबल गेटला खेटून उभी करण्यात आली आहे. आणि या मुख्य गेटच्या अगदी विरुद्ध बाजूला असलेल्या, ग्रीनरुमबाहेर जाण्याच्या छोट्या दरवाजाला लागून बाकीच्या दोन गाड्या उभ्या केल्या आहेत. काही पोलिस कॉन्स्टेबल्स आणि एक ऑफिसर दर्जाचा माणूस या संपूर्ण भागावर लक्ष ठेवण्यासाठी फिरताहेत.

तीन गाड्या आणि पोलिसांची गाडी कल्व्हर्टवरून आत आल्यावर आणि गाड्यांमधील माणसं उतरल्यावर सगळ्या रस्त्यावर आवाज सुरू होतो : 'आली, आली, श्रीदेवी आली!' श्रीदेवी या गर्दीमधून आली, पोलिसांच्या गाडीने सायरनही वाजवला, लोकांनी ताबडतोब सरकून गाड्यांना जाण्यासाठी जागासुद्धा दिली - पण श्रीदेवीच आली आहे, हे तेव्हा लोकांच्या लक्षात आलं नाही. कारण, या सांस्कृतिक कार्यक्रमाचे प्रेक्षक म्हणून आल्यानंतर या लोकांना ज्या अनुभवातून जावं लागतंय्, तसा अनुभव पूर्वी त्यांना कधी आलेला नव्हता. त्यामुळे मयनागुडीला आल्यानंतर श्रीदेवी-मामला त्यांच्यादृष्टीने मुख्य नव्हता, तर व्यवस्था हाच मामला मुख्य होता. बस किंवा ट्रक्स कुठे थांबतील, कुठं उतरावं लागेल, कधी आणि किती चालत जावं लागेल, कोणत्या वाटेने चालत जावं लागेल, कोणत्या मार्गाने मंडपात जावं लागेल इत्यादी इत्यादी. शेवटी व्यवस्था हाच मामला इतका महत्त्वाचा बनला, की आपण इथं एका खास कार्यक्रमासाठी आलो आहोत हे ते लोक जणू विसरूनच गेले. हा सगळा प्रकार एखाद्या मंत्र्यांचं भाषण ऐकण्यासाठी आलेल्या लोकांचा होतो, तसा झाला. घरापासून निघणे आणि घरी परत जाणे इथपर्यंत त्यांची सगळी व्यवस्था आयोजकच करीत असतात. त्यांच्याशी मोर्च्यातल्या किंवा मीटींगमधल्या लोकांचा काहीच संबंध नसतो. ज्या रस्त्याने एरवी वाहनांना बंदी असते, त्या रस्त्याने तीन-तीन गाड्या आणि मागे एक पोलिसांची गाडी एकाच वेगाने धावत येतात, लोकांना ताबडतोब त्यांना जाण्यासाठी जागा द्यावी लागते, तेव्हा ज्या व्यक्तीसाठी इथे माणसंच माणसं जमली आहेत, त्या व्यक्तीशिवाय त्या गाडीत दुसरं कोण असणार? हा साधा तर्क माणसांना करता आला नाही.

पण श्रीदेवी आली आहे ही बातमी पसरल्याबरोबर रस्त्यावर एकच गडबड उडाली. रस्त्यावर एरवीही लोक रांगेने चाललेले नव्हतेच. प्रत्येकजण आपापल्या मर्जीने, गतीने चालत होता. सगळेच रस्ते जवळजवळ वन-वे झाल्याने धक्काबुक्कीही नव्हती. आसामहून येणारे लोक पूर्वेकडून पश्चिमेकडे येत होते. तिस्ताब्रिजच्या रस्त्यावर लोक येत होते पश्चिमेकडे पूर्वेकडे आणि डुर्यासच्या रस्त्यावर येत होते उत्तरकडून दक्षिणेकडे.

पण या सगळ्याच लोकांना ब्लॉक ऑफिसच्या कल्व्हर्टवरूनच मैदानात प्रवेश करायचा होता. मेळाव्याच्या तीन दरवाज्यांपासून लोकांच्या रांगा रस्त्यावर खूप दूरपर्यंत

गेलेल्या होत्या. रस्त्यावरच्या लोकांनाही रांगेत उभं रहावं लागत होतं. त्यामुळे रस्त्यावरून जे येत होते, तेही पाचसहा जणांच्या छोट्या छोट्या रांगांमधूनच येत होते. श्रीदेवी आल्याची बातमी पसरल्याबरोबर रस्त्यावरच्या या छोट्या छोट्या रांगांमध्येही धक्काबुक्की सुरु झाली. जणू इथं धक्काबुक्की केल्याने मंडपात लवकर प्रवेश करता येणार होता.

जिथं इतकी मोठी गर्दी असते, तिथं छोट्याशा धक्काबुक्कीवरुनही हुल्लड सुरु होते. पण मंडपाजवळ आणि रस्त्यावर पोलिसांनी खूप धावपळ केली. एका ठिकाणी थोडी धक्काबुक्की सुरू झाल्याबरोबर तीन पोलिस ऑफिसर्सनी त्या लोकांना आपल्या बॅटन्सच्या सहाय्याने वेगवेगळं केलं, दूर केलं. डी.एस.पी. साहेबही तिथे पोचले. त्यांनी विचारलं, 'पोलिसांचा माईक कुठंय?'

'तो पेट्रोल पंपाजवळ आहे सर, त्या बाजूला!'

डी.एस.पी. साहेब स्वतःच तिकडे पळत जातात. इकडची धक्काबुक्की अर्थातच थांबते- लोक पुन्हा चालायला सुरुवात करतात. थोड्या वेळानंतर माईकवरून आवाज येतो- 'मी पोलिसांच्या वतीने बोलतोय्- आपण धक्काबुक्की - गडबड गोंधळ करू नये. रांग मोडू नये. रांगेत चालावे. आपणापैकी प्रत्येकजण स्थानापन्न झाल्याशिवाय कार्यक्रम सुरू होणार नाही. तुम्ही जर धक्काबुक्की केलीत, तर तुम्हालाच पोचायला उशीर होईल.' यानंतर आवाज जरा वाढतो, चीत्कारतच बोलल्याप्रमाणे आवाज येतो 'गेटवर तिकिटं तपासणारांनी आपलं काम झटपट करावं. उशीर करू नये. रस्त्यावर गर्दी वाढत चाललीय. . .' पुन्हा याच सूचनेचं आवर्तन.

पोलिसांचं नांव ऐकल्याबरोबर लोकांनी धक्काबुक्की बंद केली. 'तिकिटं झटपट तपासावीत' अशी सूचना पोलिसांनीच केल्याने लोक जणू आश्वस्त होतात.

डी.एस.पी. साहेब पोलिसांच्या गाडीतून उतरून, पुन्हा ज्या ठिकाणी तीन बाजूंनी येणारे रस्ते मिळतात, त्या कल्व्हर्टपाशी येतात. तिथेच सर्वात अधिक गर्दी आहे. तिथे दरम्यान दोन सेकण्ड ऑफिसर्सही आलेले आहेत. ते तीन दिशांनी येणाऱ्या लोकांना एका रांगेत करून पाठवताहेत आणि मध्ये - मध्ये एकेका दिशेकडच्या लोकांना अडवताहेत. डी.एस.पीं.ना पाहून एकजण ओरडतो, 'सर, सर, अजूनही इतके लोक आहेत, लवकर आत सोडले नाहीत तर ते इथेच अडकून रहातील.'

डी.एस.पी. म्हणतात, 'थांबा, मी जाऊन पहातो आणि परत येऊन सांगतो.' डी.एस.पी. त्या रांगेजवळून, आत अगदी मैदानात पोहोचतात. ते सर्वात शेवटच्या दरवाजातून आत जात असताना दरवाजावरचा पोरगा त्यांना न पहाताच अडवतो आणि गेटवरचा कॉन्स्टेबल त्याचा हात पकडतो. आपण कुणाला अडवलं हे पहाताच पोरगा 'सॉरी सर!' म्हणून जीभ चावतो. 'पटापट करा, काम पटापट करा!' म्हणत डी.एस.पी.

जागेची अवस्था पहाण्यासाठी आत जातात. त्यांना पाहून नकुल राय, बटुक बर्मन धावत येतात.

'हे पहा, तुम्ही आम्हाला जो हिशेब दिलाय त्याव्यतिरिक्त आणखी तिकिटं तर विकली नाहीत ना?' डी.एस.पी. विचारतात.

'नाही, सर. पण हे का विचारताहात, सर?' नकुल विचारतात.

'नाही, नाही, दुसरं काही कारण नाही. बाहेरची गर्दी पहा जरा-सगळ्यांना बसायला जागा मिळेल ना?'

'हो, सर. अजून तर अर्धा मंडप रिकामाच आहे, सर. आम्ही तर तुम्हाला अगदी स्क्वेअर फुटाप्रमाणे प्लॅन करून नीट हिशेब दिलाय्, सर.'

'अरे बाबा, ते कुणी विचारलंय तुम्हाला? बाहेर लोकांना अगदी दम निघेनासा झालाय. किती दूर-दूरच्या ठिकाणांहून आले आहेत ते, म्हणून म्हटलं की तुम्ही आहे त्या जागेपेक्षा आम्हाला अंधारात ठेवून जास्त तिकिटं विकलेली असतील तर गोंधळ व्हायचा. तुम्ही तर काही सीटनंबर्स दिलेले नाहीत-नाही का?' डी.एस.पी. म्हणतात.

'नाही सर, पण तुम्हाला जो हिशेब दिलाय तेवढीच तिकिटं विकली आहेत सर. रिस्क कोण घेणार सर?' नकुल डी.एस.पीं.चा हात धरतो. डी.एस.पी. म्हणतात, 'मग तिकिटं पंच कशासाठी करता? प्रत्येकाला तिकिट दाखवून आत जायला सांगा- त्यामुळं बाहेरची गर्दी जरा लवकर कमी होईल.'

नकुल बटुककडे पहातो. बटुक म्हणतो, 'सर, आत गेल्यावर कुणी तिकिटं पाठवली तर?'

'अरे, कुणाला मुळात या गर्दीत नीट आत जाता येत नाहीय आणि तिकिटं बाहेर पाठवणार? आम्ही माईकवरून अनाऊन्स करतो कुणाला बाहेर पाठवून नका म्हणून तुम्हीही अनाऊन्स करा.'

'आपणच जे करायचं ते करा सर. आम्हाला तर स्टेजवर चढूच देत नाहीत.' नकुल म्हणतो.

'कोण देत नाहीत?'

'स्टेजवर तर सर आता श्रीदेवीचं कंट्रोल आहे, कुणालाच आत येऊ देत नाहीत तिथे' बटुक समजावतो.

'इथून काय श्रीदेवी दिसणार आहे का मग?' डी. एस. पी. हसून विचारतात.

'थर्ड क्लासमधून यापेक्षा जास्त दिसणार नाही सर!' नकुल 'हे-हे' करीत हसतो. डी.एस.पी. म्हणतात, 'मग गेटकीपर्सना सांगा तिकिटं फक्त पाहून लोकांना आत सोडायला. आम्ही बाहेर माईकवरून सांगतो.'

नकुल, बटुक आणि डी. एस. पी. मंडपाबाहेर जातात. डी. एस. पी. पुन्हा लोकांच्या गर्दीमधून वाट काढीत-काढीत रस्त्यावर येतात. त्यानंतर माईकवर ऐकू येतं 'पोलिसांच्या वतीने बोलतोय. जे गेटस्वरती तिकिटं पंच करताहेत त्यांनी तिकिटं पंच करू नयेत. प्रेक्षकांच्या हातातील तिकिटं पाहून त्यांना आत जाऊ द्यावं.' या घोषणेबरोबर एकच आवाज होतो. तो थांबल्यावर माईकवर पुन्हा ऐकू येतं, 'प्रेक्षकांना एक विनंती आहे. आपण आपल्या हातात तिकिटं उंच धरून आपापल्या गेटमधून प्रवेश करावा. आपल्या हातातली तिकिटं गेटकीपरला दिसली पाहिजेत अशी धरावीत.' या घोषणेबरोबर पुन्हा एकंदा गर्दीतून एक समवेत आवाज येतो. समर्थनाचा माईकवर आवाज येतो. 'रांग मोडू नका, गडबड गोंधळ करू नका, आपलं तिकिट स्वत:च्या हातात उंच धरून निर्दिष्ट गेटमधून मंडपात प्रवेश करा. मंडपात प्रवेश केल्यावर कुणालाही बाहेर सोडण्यात येणार नाही. लक्ष देऊन ऐका, मंडपात प्रवेश केल्यावर कोणालाही बाहेर सोडण्यात येणार नाही.'

या घोषणेनंतर काही क्षणांतच रांग खूपच वेगाने पुढे जात रहाते. घोषणेनंतर लोकांच्यामध्ये दोन प्रकारची घाई-गडबड दिसते. जे मोठमोठ्या गटांनी आले आहेत किंवा सहपरिवार आले आहेत अशांनी आपली सर्व तिकिटं गटातील एका व्यक्तीकडे ठेवली होती. या घोषणेनंतर प्रत्येकाच्या हाती त्याचं-त्याचं तिकिट द्यायला सुरुवात होते. हजारो लोकांच्या हातात त्यांची-त्यांची तिकिटं देणंही सुद्धा एक मोठी घटनाच म्हणायला हवी. दुसरी गोष्ट म्हणजे, 'मंडपात प्रवेश केल्यावर बाहेर सोडण्यात येणार नाही' ही घोषणा ऐकल्याबरोबर बरेच जण अचानक रांगेतून बाहेर पडून लघवी करण्यासाठी रस्त्याकाठी उभे रहायला किंवा बसायला सुरुवात होते. ही सुद्धा एक घटनाच नाही का?

## एकशे अठ्ठ्याहत्तर

# श्रीदेवी : परिचित व अपरिचित

श्रीदेवीच्या नृत्याचा कार्यक्रम मात्र खूपच सहजपणे सुरू होतो. ते पाहून वाटतच नाही, की याच कार्यक्रमासाठी गेल्या दोन महिन्यांपासून इतकी जाहिरात झाली आहे, बंगाल - बिहार - आसाम पासून प्रेक्षकांनी येण्यासाठी नाना प्रकारची व्यवस्था, सुमारे महिनाभरापासून राजकीय आणि प्रशासकीय पातळीवर मिटिंगा, कलकत्ताहून मंत्र्यांचं येणं आणि आता सुमारे एक लाख लोकांची उपस्थिती! कार्यक्रमाची सुरुवात पाहूनच हताश होण्यासाठी तर काही इतके प्रेक्षक आलेले नाहीत त्यामुळे ते हताश नक्कीच होत नाहीत. सुरुवातीपासूनच श्रीदेवी या प्रेक्षकांना आपल्यामध्ये दिसेल असं काहीसं वातावरण वेगवेगळ्या प्रकारे प्रेक्षकांच्या गटांमध्ये तयार झालेलं होतं. पण या मंडपात बसल्यावर

दिसतं, की प्रेक्षकांपैकी बहुतांशी लोक राजवंशी आणि चहाच्या मळ्यांमध्ये काम करणारे मदेशिया लोक आहेत. त्यांना श्रीदेवीकडून काही विशिष्ट अशा अपेक्षा नव्हत्या, त्यामुळे सुरुवात पाहून ते हताश होत नाहीत. म्हणूनच, कार्यक्रम सुरू झाल्याबरोबर मंडपातील लोक शांत बसतात, पण या त्यांच्या नीरवतेमध्ये थोडासा संभ्रमही होता.

या प्रकारचा कार्यक्रम नाना ठिकाणी नाना प्रकारच्या प्रेक्षकांसमोर सादर करता-करता जिला हिंदी सिनेमातलं सेक्स सिम्बॉल म्हणून ओळखलं जातं, त्या पहिल्या क्रमांकाची नटी असलेल्या प्रमुख कलावतीने एक पद्धत प्रक्रिया ठरवलेली दिसते. म्हणूनच तिच्यासंबंधी प्रेक्षकांमध्ये जर काही ज्वर तयार झाला असेल, तर तो नष्ट करणं हा तिचा पहिला प्रयत्न होता.

स्टेजवरचा पडदा वर गेल्यावर हळू-हळू खूप कमी प्रकाश प्रेक्षकांच्या डाव्या बाजूने स्टेजच्या मागे प्रेक्षकांच्या डाव्या बाजूला पडतो. संपूर्ण स्टेज काहीवेळ रिकामं रहातं. फक्त त्या गवाक्षातून येणाऱ्या प्रकाशाशिवाय स्टेजवर काहीही नसतं. तेवढ्या वेळात प्रेक्षक शांत होतात आणि प्रत्येकजण आपला पहाण्याचा मार्ग ठरवून घेतो. तेवढ्यात एका घुंगराचा आवाज येतो. त्यानंतर स्टेजवर एक तरुणी येते. तिच्या मागोमाग अंधुळसा प्रकाशही येतो. त्या प्रकाशात ती दिसते. तरुणी दिसल्याबरोबर मंडपात नि:श्वासांचा एकच आवाज येतो. पण या प्रेक्षकांमध्ये हजारोजण असे आहेत, की त्यांना श्रीदेवीची उंची ठाऊक आहे, तिच्या चालण्याची पद्धत ठाऊक आहे. त्यांच्या प्रतिक्रियेवरून क्षणातच सगळ्यांच्या लक्षात येतं, की ही तरुणी काही श्रीदेवी नव्हे. पण हे ओळखतानाच सगळ्यांना दिसतं, की जिथे आतापर्यंत प्रकाश टाकलेला होता, त्याठिकाणी ती तरुणी गुडघे टेकून बसते. ती एक आगकाडी पेटवते, तिच्या सहाय्याने एक दीप पेटवते, स्टेजवरचा प्रकाश थोडा वाढतो आणि दिसतं, की ती तरुणी नटराजाच्या छोट्या प्रतिमेपुढे दीप प्रज्वलित करते आहे. प्रणाम करून आता संपूर्ण प्रकाशित झालेल्या मंचावरून ती तरुणी घुंगरांचा आवाज करीत-करीत निघून जाते. तिच्या घुंगरांचे आवाज संपूर्ण ऐकू येईनासे होण्यापूर्वीच दुसऱ्या पैंजणांचे आवाज स्पष्ट होत जातात-कुणीतरी चालत येतंय. प्रेक्षकांच्या डाव्या बाजूने स्टेजच्या अगदी समोरच्या बाजूने येऊन श्रीदेवी प्रेक्षाकांच्याकडे एकदाही न पहाता स्टेजवरून चालत स्टेजच्या मागी प्रेक्षकांच्या उजव्या बाजूला असलेल्या कोपऱ्यात निघून गेली. त्याच बाजूला प्रथम प्रकाश पडला होता आणि त्या तरुणीने दीप पेटवला होता. श्रीदेवी त्या ठिकाणी येते, गुडघे वाकवून बसते आणि कमरेतून वाकून, मस्तक जमिनीवर टेकून नटराजाला प्रणाम करते. तिच्या पाठीवर आणखी उजेड पडतो. तिची लांब वेणी तिच्या मानेवरून उजवीकडे पडते.

श्रीदेवीच्या विविध चित्रपटांमधून जे श्रीदेवीला ओळखतात, त्यांना श्रीदेवीच्या चालण्याची लय ठाऊक आहे, चालताना तिने नितम्ब कसे हलतात हे ठाऊक आहे.

चालताना तिच्या शरीराचं ऊर्ध्वांग थोडं-थोडं हलतं हे ठाऊक आहे, वाकून प्रणाम करताना ती अशीच वेणी उजवीकडे घेऊन प्रमाण करते हे ठाऊक आहे.

प्रमाण करून श्रीदेवी उठते, स्टेजच्या मध्यभागी येऊन उभी रहाते आणि मानेच्या झटक्याने वेणी पाठीवर टाकते. तिच्या या हालचालींची पद्धतही खूप जणांना चांगली ठाऊक आहे. तोपर्यंत स्टेजवरचे सगळे दिवे लागतात. कुठेच तिळमात्रही सावली नाही. श्रीदेवी दोन्ही हात जोडून नमस्कार करते व थोडी हसते. सस्मित वदनाने ती प्रेक्षकांकडे मान वळवून वळवून पहाते- उजवीकडे, डावीकडे, समोर, उजवी कडे - आणि नमस्कार करते. श्रीदेवीच्या गोल चेहऱ्यावरच्या छोट्या ओठांवरचं हसू काही फार मनमोकळं असं नाही. पण या हास्यामुळेच तर ती लोकांना परिचित आहे. तो परिचय लोकांना अ वावा, म्हणूनच श्रीदेवी लोकांना ठाऊक असलेल्या आपल्या हालचालीनुसार मान थोडी ह वते, कपाळावर थोड्या आठ्या आणते, - जणू या हालचालीतूनच प्रेक्षकांना ती आपली ओळख देऊ पहातेय् - 'हो, हो'. मीच ती - मीच ती!' प्रेक्षक टाळ्या वाजवतात- त्या टाळ्या जणू थांबणारच नाहीत असं वाटतं. श्रीदेवी दोन्ही हात वर उचलून टाळ्या थांबवायला सांगते, तेव्हा तर त्या आणखीच वाढतात, तेव्हा ती आपले हात खाली घेते आणि 'मिस्टर इंडिया' मधील नृत्याच्या हालचालीप्रमाणे खांदे उडवते. यावर प्रेक्षकांच्या टाळ्या अधिकच वाढतात, त्यांच्यामध्ये आता त्यांच्या हसण्याचाही आवाज मिसळलेला आहे. जणू आता त्यांनी आपल्या प्रिय अभिनेत्रीपूर्णपणे ओळख पडली आहे. ही च जणू श्रीदेवीची पहिली जबाबदारी होती. प्रेक्षकांना परिचित असलेल्या चित्रपटांतील श्रीदेवीशी स्वतःचं तादात्म्य प्रस्थापित करणं. त्यानंतर ती स्टेजवरून निघून जाते. टाळ्यांचा आवाजही हळू-हळू कमी होतो. तो थांबण्याआधीच माईकवरून गंभीर आवाजात निवेदन केलं जातं- 'श्रीदेवी प्रथम आपणासमोर भरतनाट्यम सादर करतील.' या घोषणेबरोबरच संस्कृत श्लोकांचं पठन सुरू होतं आणि श्रीदेवी मस्तकावर मुकुट परिधान करून, पोशाख बदलून मंचावर प्रवेश करते.

श्रीदेवीने मंचावरील प्रवेश, नटराज-वंदना आणि नमस्काराच्या नाना भंगिमांमधून प्रेक्षकांच्या मनातल्या आपल्या स्मृती जाग्या केल्या होत्या, आता भरतनाट्यम् नृत्यातील नाना भंगिमांच्या सहाय्याने जणू ती त्या स्मृती नष्ट करू लागली.

काहीकाही चित्रपटांमध्ये श्रीदेवीने भरतनाट्यम् नृत्य केलं आहे, प्रेक्षकांना ज्याप्रमाणे एकेकाळी वैजयंतीमाला किंवा तिच्यानंतर हेमामालिनीसुद्धा त्यांच्या भरतनाट्यम् साठी परिचित होत्या, ती गोष्ट श्रीदेवीची नाही. त्यामुळे भरतनाट्यमच्या नान्दीपासूनच तिने आपला अभिनय दाखवायला सुरुवात केली व तबला-मृदुंग व बोलांच्या साथीवर आपलं अभिनय-सामर्थ्य दाखवायला केली, तरी प्रेक्षकांच्या मनात संभ्रम निर्माण झाला. पहिल्या

परिचयात स्वत:ला प्रेक्षकांच्या मनांत त्यांच्या परिचित नायिका म्हणून प्रतिष्ठित करून त्यानंतर लगेच ती स्वत:ला वेगळा, अलग करून घेते. सिनेमात तिच्या एकाच नाचाला थोडक्यात फरकाने वारंवार पाहून, तिच्या शरिराची नाना वैशिष्ठ्ये वारंवार पाहून-पाहून जे प्रेक्षक तिच्यामधल्या यौनतेलाच तिचं प्रमुख किंवा एकमात्र वैशिष्ठ्ये म्हणून ओळखतात, ते प्रेक्षक तिचं भरतनाट्यम् पाहून हताश होणार. भरतनाट्यम् बराच वेळ चालतं. भरतनाट्यम् करताना ती जणू सूड घेतल्याप्रमाणे प्रेक्षकांच्या मनात चित्रपटांतल्या श्रीदेवीची जी प्रतिमा होती, ती संपूर्णपणे पुसून टाकते-ज्या श्रीदेवीला तुम्ही पहाता, पहा, ती काही श्रीदेवी नाही.

पण श्रीदेवी नाचत-नाचत स्टेजबाहेर निघून जात नाही. ती स्टेजवरत थांबवते-स्टेजच्या मागच्या बाजूला. त्यानंतर, तिथून धापा टाकीत, चालत-चालत ती स्टेजच्या एकदम पुढील बाजूला येते. थोडावेळ तशीच उभी रहाते. बऱ्याच चित्रपटात दिसते, त्याप्रमाणे दिसणाऱ्या या श्रीदेवीला सगळेजण पहातात, तिला घाम आलाय्, छाती वरखाली होतेय्, ओठ थोडे विलग झाले आहेत, केस थोडे कपाळावर आले आहेत. भरतनाट्यमचा अडथळा ओलांडून पुन्हा एकदा प्रेक्षकांच्या मनात त्यांच्या परिचित श्रीदेवीच्या आठवणी जागृत करून श्रीदेवी स्टेजवर परत जाते.

## एकशे एकोणऐंशी
## श्रीदेवीचे अंगप्रदर्शन

इतक्या महागड्या दराची तिकिटं काढून जे लोक श्रीदेवीचा नाच किंवा श्रीदेवीलाच पहायला आले आहेत, आणि इतके पैसे खर्च करून जे श्रीदेवीचा हा कार्यक्रम करताहेत त्यांना मात्र या काही वेळांच्या कार्यक्रमात खरी श्रीदेवी ही त्यांच्या परिचित त्या श्रीदेवीपेक्षा किती वेगळी आहे हे पहाण्यासाठी किंवा दाखवण्याची इच्छा नाही-चित्रपटांतल्या श्रीदेवीशी रक्तमांसाच्या रूपातली श्रीदेवी ताडून पहाणं, एवढीच त्यांची इच्छा आहे. ते ताडून पहाणं कितपत शक्य आहे ते ठाऊक नाही, आणि ठाऊक नाही म्हणूनच इच्छाही जास्त प्रबळ. श्रीदेवीलाही नक्कीच हा हिशेब खूप चांगला ठाऊक आहे. ती जर स्वत:ला आपल्या चित्रपटातील प्रतिमेप्रमाणे सादर करू शकली नाही, तर अशा लाख-लाख रुपयांच्या कार्यक्रमांच्या ऑर्डर्स तिला कशासाठी मिळणार? पण चित्रपटाच्या पडद्यावर जे दाखवलं जातं ते तर काही स्टेजवर सगळ्यांच्या डोळ्यासमोर दाखवलं जात नाही. तिचाही, कधी कोणतं नृत्य सादर करायचं याचा हिशेब आहे. तो हिशेब म्हणजे प्रेक्षकाला

थोडी ओळख दाखवायची, आणि थोडी अनोळख राखायची. फक्त एवढ्याच मर्यादित वेळेच्या कार्यक्रमात प्रेक्षक तिला आपापल्या कुवतीप्रमाणे ओळखतात-कॅमेऱ्याच्या लेन्समधून श्रीदेवीला पडद्यावर जितकं पहाता येतं, जितक्या वेळा पुन:पुन्हा पाहाता येतं, तितकं स्वत:च्या दोन डोळ्यांनी पहाणं शक्य नाही. पण, पडद्यावरची श्रीदेवी आणखी कितीतरी विलोभनीय आहे, अशा लोभाच्या एका सीमेपर्यंत प्रेक्षकांना न्यायला हवं. त्यामुळे श्रीदेवीच्या फिल्मस् हिट होतील, सुपरहिट होतील, सुपर-सुपर हिट् होतील. चित्रपटाच्या पडद्यावरून रंगमंचावर पहाण्याचा लोभ जागवायचा, आणि रंगमंचावरून चित्रपटाच्या पडद्यावर पहाण्याचा लोभ जागवायचा-यांच्यामध्ये श्रीदेवीचा स्वत:चं सौंदर्य दाखवण्याचा हिशेब काम करतो.

भरतनाट्यमनंतर थोडा वेळ जातो, पडदा मात्र टाकला जात नाही. त्यानंतर स्टेजवरच्या मायक्रोफोनवर गाणं वाजू लागतं-'हवा हवाई'. त्याचबरोबर प्रेक्षकांच्या टाळ्या, चित्कार, दोन-चार शिट्ट्या-'मिस्टर इंडिया' मधलं गाणं. श्रीदेवी काळ्या काचोळीवर गुलाबी ओढणी घेऊन नाचतानाचं 'मिस्टर इंडिया'मधलं दृश्य प्रेक्षकांच्या डोळ्यासमोर तरळू लागतं. चित्रपटातील गाण्यात श्रीदेवीच्या शब्दांनंतर मुलं कोरसमध्ये 'उई उई उई उई उई' म्हणतात. मायक्रोफोनवरील गाण्यात जी जागा येताच, श्रीदेवी अद्याप स्टेजवर आलेली नसतानाही प्रेक्षक कोरसमध्ये गातात-'उई उई उई उई उई' - आणि त्याचबरोबर स्टेजच्या एकदम पुढील बाजूने श्रीदेवी गुलाबी ओढणी उडवीत नाचत येते-'हवा हवाई!' पुन्हा टाळ्या, चित्कार आणि शिट्ट्या. त्या संपेपर्यंत श्रीदेवीच्या स्टेजवर दोन चकरा होतात. प्रेक्षक जरा शांत होतात, आणि चित्रपटातल्याप्रमाणेच इथेही श्रीदेवीने काळी काचोळी घातली आहे का हे पाहू लागतात. पण नाना ठिकाणी बसलेल्या नाना प्रेक्षकांना एकच ब्रा एकाच प्रकारे कशी दिसणार? तरीही प्रत्येकजण आपापल्या जागेवरून तिची ब्रा पहाण्याचा प्रयत्न करतो-तिच्या गुलाबी ओढणीमागे तिच्या काचोळीचा गळा दिसतोही. पण हे नृत्य गतिमान आहे. श्रीदेवी साऱ्या स्टेजवर धावत आहे. चित्रपटात ज्यप्रमाणे ती हॉल, बाग यांच्यामध्ये बागडत फिरते, 'हवा हवाई' गाते आणि तिच्याबरोबर मुलं ही कोरसमध्ये 'उई उई उई उई' करतात, त्याचप्रमाणे इथेही ती संपूर्ण रंगमंचावर पळते आहे. मंचाच्या वरच्या भागात तिची गुलाबी ओढणी उडते आणि पुन्हा तिच्या अंगाजवळ येते. चित्रपटात श्रीदेवीची पळापळ इतकी स्पर्शग्राह्य वाटत नाही. तिची काळी ब्रा मात्र चित्रपटात इथल्यापेक्षा खूपच स्पष्ट दिसते. प्रेक्षक कोरसमध्ये 'उई उई उई' म्हणतात, आणि श्रीदेवी प्रेक्षकांकडे पाहून पुढच्या ओळींवरचं नृत्य सुरु करते.

या वेगातच नाच संपवून श्रीदेवी मंचावरून रंगपटात गेल्याबरोबर पुन्हा टाळ्या,

चित्कार, शिट्ट्या सुरू होतात. प्रेक्षक आता गरम झालेले आहेत. त्यांचे चित्कार थांबत नाहीत. नाना जागांवरून आवाज येतात-'सोलवां सावन', 'नगीना', 'मिस्टर इंडिया' हे सगळे चित्कार थांबतात-न-थांबतात तोच स्टेजवरच्या मायक्रोफोनवरून एका गीताचा मुखडा वाद्यावर वाजवणं सुरु होतं. टाळ्यांच्या कडकडात घागरा परिधान केलेली श्रीदेवी मंचावर उडी मारून प्रवेश करते आणि एक गिरकी घेते-घागरा त्यामुळे फुलून उडतो, श्रीदेवीच्या अंगावरचा जरीचा पोशाख चमचमतो आणि घूंघट म्हणून केसांसोबत लहणारी ओढणी वाऱ्यावर उडते. 'औलाद!औलाद' असं ओरडून, आपण ते गाणं ओळखलं आहे असं प्रेक्षक दाखवतात. एक छोटी उडी घेऊन श्रीदेवी प्रेक्षकांकडे चेहरा करून उभी रहाते, डावा पाय पुढे करते घागरा फुलतो, आणि श्रीदेवी डाव्या तळव्यावर उजव्या हाताचा तळवा ठेवून पुन्हा एकदा उलटी गिरकी घेते. 'औलाद' चित्रपटात सुरुवातीलाच रस्त्यावर नाचत-नाचत वस्तू विकण्याचं एक दृश्य आहे. मंचावर रस्ता नाही, वस्तू नाहीत, पण श्रीदेवीचा पोशाख मात्र यावेळी अगदी 'औलाद' चित्रपटातल्यासारखाच आहे. जरीच्या पोशाखावर प्रकाश चमकतो आहे, श्रीदेवी जेव्हा स्टेजच्या एका विंगकडून येऊन दुसऱ्या विंगकडे जाते, तेव्हा प्रेक्षकांच्या बाजूने आपल्या शरिराची पार्श्वरेषा धरून ठेवते आणि चेहरा कधी शरीराच्या रेखेशी मिळवून, कधी शरीराशी समकोन करून प्रेक्षकांकडे वळवून पहाते, तेव्हा छातीवरच्या वस्त्राची जर चमकते, त्या चमकीमुळे तिच्या वक्षाचं दोलन लक्षात येतं. प्रेक्षक टाळ्यांचा प्रचंड गजर करतात. त्यांची टाळ्या वाजवण्याची क्षमता संपवण्यासाठीच जणू श्रीदेवी पुन्हा दुसऱ्या विंगमधून फिरून यायला सुरुवात करते. प्रेक्षकांनी जणू तिला आपल्या इच्छेप्रमाणे, जितकं आणि जिथं पहायचं आहे तितकं पाहून घ्यावं, म्हणून हे फिरणं संपल्यावर श्रीदेवी पुढील भागात येते, त्यानंतर दोन गिरक्या घेऊन, स्टेजवर अगदी पुढच्या भागात येऊन प्रेक्षकांसमोर चेहरा करून उभी रहाते. तेव्हा त्या फेरीवालीच्या गाण्याच्या द्रुत लयीसोबत ताल राखून श्रीदेवीचे स्तन प्रेक्षकांसमोर वरखाली होतात. प्रेक्षकांनी जणू याची आशाच केली नव्हती. चित्रपटाचं असं होतं की नाही हे ते विसरून जातात-हे तर जणू चित्रपटातल्या दृश्यापेक्षाही थोडं अधिकच आहे. श्रीदेवी आपलं कमनीय शरीर झुकवून गाण्याच्या तालावर टाळ्या वाजवीत-वाजवीतच विंगमधून बाहेर जाते. त्याबरोबरच प्रेक्षकातील बरेच जण उत्तेजनेमुळे उठून उभे रहातात आणि टाळ्या वाजवीत-वाजवीत जणू नाचायलाच सुरुवात करतात. काही-काहीजण चित्कार करीत श्रीदेवीचं गाणं टाळ्या वाजवीत गाऊ लागतात, काही-काहीजण पुन्हा टाळ्या वाजवीत नाचू लागतात. असं वाटतं की, जणू कार्यक्रम आता संपलाय. पण या सगळ्या गोष्टी घडतात त्या मंडपाच्या आतच, मंडपातून कुणी बाहेर असं जात नाही. राजवंशी मुली-महिलांपैकी काही-काही जणी गोंधळून प्रेक्षकांचं हे टाळ्या वाजवणं, गाणं आणि नाच पहात रहातात. त्यांच्या चेहऱ्यावर भीती दिसत नसली, तरी एक प्रकारची

अनिश्चितता दिसते. मंचावरती प्रकाश असणं, जिथं नाच, गाणं, हेणं या गोष्टी त्या बायका समजू शकतात. पण प्रेक्षकांचं हे नाच-गाणं त्यांना समजत नाही-विचित्र वाटतं. चहाच्या मळ्यात मजुरी करणाऱ्या मदेशिया तरुणी तर प्रेक्षकांचा हा नाच पाहून खळखळून हसू लागतात आणि एकमेकींच्या अंगावर पडतात-त्यांच्यापैकी काहीजणी टाळ्याही वाजवतात.

या दरम्यान पोलिसांचे लोक आणि आयोजक मंडपात अगदी मागच्या बाजूचं टिनाचं कुंपण वेगाने काढू लागतात. त्याचा आवाज येऊ लागतो, त्यामुळे प्रेक्षकांचं नाचणं, गाणं थांबत. प्रेक्षकांना आपल्या जागेहून हलण्याची इच्छा नसते. पण हा अद्‌भूत आवाज कसला, याचं कुतुहलही असतं. समोरच्या बाजूला दोन्ही दिशांना खुर्च्यांवर जिल्ह्यातल्या सगळ्या ऑफिसर्सना आणि प्रतिष्ठित मंडळींना बसलेले पाहून प्रेक्षकांना थोडं आश्वस्तही वाटतं. एवढ्या वेळातच सगळ्यांना समजतं, की पोलिस अधिकाऱ्यांच्या सांगण्यावरून मागच्या बाजूचं कुंपण काढून टाकलं आहे. म्हणूनच स्टेजही रिकामं आहे.

ज्यांनी कार्यक्रमाची तिकिटं विकत घेतली आहेत अशा प्रेक्षकांव्यतिरिक्त इतर नवीन दर्शनार्थींची संख्या वाढत वाढत अशी काही परिस्थिती निर्माण होते, की त्यांना कार्यक्रम दिसेल अशी व्यवस्था करणं अपरिहार्य बनतं. डी. एस. पी. साहेब आयोजकांना म्हणतात, आता तिकिटविक्री करणं योग्य होणार नाही, कारण मंडपात मुळीच जागा नाही. तेव्हा, कार्यक्रम निम्मा संपल्यावर मागचं कुंपण काढून टाकण्यात यावं असा निर्णय घेतला जातो. श्रीदेवीच्या माणसांनाही हा निर्णय कळवला जातो.

## एकशे ऐंशी

# समवेत नृत्य

या अघोषित मध्यंतरानंतर श्रीदेवीचा कार्यक्रम पुन्हा सुरू होतो, आणि थोडा थंड, थोडा गरम या छंदात चालत रहातो. एक दोन नृत्यगीतांनंतर श्रीदेवी 'नगीना' या तिच्या सुपरहिट चित्रपटातील एका गाण्यावर स्टेजवर थोडी चालते.-'भूल जाओ तुम यह कहानी' चित्रपटात एका ठिकाणी श्रीदेवी भग्न शिवमंदीराच्या पायऱ्यांवरून, सज्जातून, मैदानातून, कधी आपादमस्तक जांभळा तर कधी गुलाबी रंगाचा पोशाख घालून, फक्त चेहरा उघडा ठेवून थोड्या संथ गतीने 'भूल जाओ तुम यह कहानी' हे गीत म्हणत जाते. हे जणू पूर्वजन्माची गोष्ट सांगण्यासारखंच असतं. चित्रपटात या दृश्यात श्रीदेवीजवळून ऋषिकपूर पळत-पळत जातो, आणि श्रीदेवी कधी आपला घूंघट अर्धा वर करून, तर कधी वर न करता, त्याला आपल्या पूर्वजन्माची कहाणी सांगत रहाते. इथं मंचावर श्रीदेवी

एकटीच आहे-शिवमंदिराचा सज्जा नाही, प्रासाद नाही, ऋषिकपूरही नाही. पण श्रीदेवी अशा काही पद्धतीने चालतेय् की तिचं ते चालणंही नृत्य होऊन उठतं, घूंघट ती अशा पद्धतीने वरखाली करते की प्रेक्षकांना वाटतं, आपण आहोत ऋषिकपूर! या गीतामध्ये उल्हास नाही, विषण्णता आहे.

या प्रकारच्या आणकी एक-दोन गाण्यांनंतर स्टेजवरचा प्रकाश कमी होतो. त्यामुळे मंडपातला प्रकाशही अंधुक होतो. श्रीदेवी एकूण किती तासांचा कार्यक्रम करणार आहे हे प्रेक्षकांपैकी अनेकांना ठाऊक असतं. रात्री नऊ ते साडेअकरा, म्हणजे आता मुश्किलीने दोन-तीन नाचगाणी होतील. आपल्या या कार्यक्रमातून जे हवं होतं, ते मिळालं का याचा हिसेबही प्रेक्षक या दरम्यान करतात. आता जणू त्यांची अपेक्षा खूपच वाढली आहे-प्रकाश कमी झाल्याने व त्या मंद प्रकाशात मंचही रिकामा आणि नीरव असल्याने प्रेक्षकांच्या अपेक्षा इतक्या वाढतात, की कुणीही एक शब्दही बोलत नाही. अचानक खूप दबलेल्या स्वरात माईकवर अत्यंत द्रुत लयीत एक धुन सुरू होते. थोड्या वेळानंतर त्यांच्यासंगे आणखी दबलेल्या आवाजात, जणू कुजबुतच गाणं ऐकू येतं-'तक तक धिऽन्!' 'तक तक धिऽन्!' माईकवरून जणू कानात बोलल्याप्रमाणे हा आवाज येतो. मंद प्रकाश, दबलेला स्वर आणि द्रुत लयीतलं गाणं यांच्यामुळे प्रेक्षकांचे श्वास जणू रुद्ध होतात-'तक तक धिऽन्!' 'तक तक धिऽन्!' काही काही प्रेक्षक कुजबुजतात -'हिम्मत और मेहनत!' त्या मंद उजेडात श्रीदेवी एखाद्या मांजरीप्रमाणे उडी घेऊन मंचावर प्रवेशते. तिच्या गळ्यापासून तर गुडघ्यापर्यंत एक तंग पोशाख आहे-त्याचा रंग या अंधुक प्रकाशात ओळखू येत नाही. मांजरीसारख्या एक-दोन उड्या मारून श्रीदेवी गुडघे आणि कंबर यांना हेलकावे देत गाण्याच्या तालावर नाचू लागते.

प्रकाश वाढत नाही, गाण्याचा आवाजही वाढत नाही. श्रीदेवी एक-एक उडी मारीत मंचावर एका जागेवरून दुसऱ्या जागेवर जाते. मग त्या जागेवर उभी राहून, कमरेला हेलकावा देऊन स्वत:चं संपूर्ण शरीर थरथरते. स्टेजच्या मागच्या भागातच ती या उड्या मारते. प्रेक्षकांना फारसं स्पष्ट दिसत नाही. पण त्याबद्दल कुणीच तक्रारीचा आवाज काढीत नाही. हे नृत्य इतकं स्पष्ट दिसणार नाही हे प्रेक्षकांना जणू ठाऊकच आहे. म्हणून जितकं पहाणं शक्य आहे तितकं पाहून घेण्याची एक ताणलेली उत्तेजना प्रेक्षकांमध्ये संचारित होते. बहुधा प्रकाश थोडा वाढतो; किंवा प्रेक्षक थोडं अधिक पाहू शकतात-तेव्हा दिसतं की श्रीदेवी स्टेजच्या मध्यभागी उभी राहिली आहे, कंबर तशीच लचकवलेली, पण शरीराच्या कंपनामुळे कधी तिचे स्तन शरीराहून जणू अलग होऊन कापताहेत-थोड्याशा सावलीत स्तनांची बाह्यरेखा इतकी स्पष्ट होऊन उठते, की वाटतं, जणू ते स्तन अनावृत्तच आहेत. आता 'तक तक धिऽन्!' च्या तालावर श्रीदेवीच्या नितंबांची बाह्यरेखा स्पष्ट दिसू लागते. त्या नितंबांच्या कंपनांवरून वाटतं, की श्रीदेवीच्या शरीरावर कुठलंही वस्त्र नाही.

एवढ्या मोठ्या मंडपातल्या सुमारे एक लाख लोकांमध्ये या शांततेत एक दबलेली उत्तेजना संचारते-जणू ते सारेजण आतापर्यंत याच क्षणाची वाट पहात होते. प्रकाश थोडा वाढतो, किंवा प्रेक्षकांनाच थोडं अधिक दिसू लागतं. श्रीदेवी आपले दोन्ही हात डोक्यावर सरळ उभे करते, तिच्या संपूर्ण शरीराची बाह्यरेखा प्रेक्षकांसमोर स्पष्ट होते. त्यानंतर प्रेक्षकांना सम्मुख असलेलं ते शरीर जणू अनंत संभोगाच्या भंगिमेत स्वत:ला हेलकावे देतं. श्रीदेवीच्या कमरेपासून तर पायाच्या नखांपर्यंतचा भाग त्या संभोगात फिरत रहातो, फिरत रहातो. त्याला जणू शेवटच नाही. माईकवरून दबलेल्या स्वरात सीत्काराप्रमाणे गीताचे शब्द ऐकू येतात-'तक तक धिऽन्!' 'तक तक धिऽन्!'

मंडपामधले सुमारे एक लाख पुरुष तेव्हा एकमेकांपासून अलग होऊन जातात आणि एका विच्छिन्न-निषिद्ध अशा संभोगात रममाण होतात. सगळे अगदी अधीर होतात-जणू या संभोगासाठी आणखी अधिक वेळ नाही. माईकवरच्या दबलेल्या सीत्कारांच्या आणि जोरदजोराने टाकलेल्या नि:श्वासांच्या आवाजाने या दृश्यातील निषिद्ध व्यक्तिगत भाग सार्वजनिक होतो. एक मूल अचानक किंचाळून रडायला सुरुवात करतं-त्याला या अंधुक प्रकाशामुळे, दबल्या आवाजामुळे, मंचावरच्या अंधुक दिसणाऱ्या दृश्यामुळे आणि आसपासच्या दबलेल्या उत्तेजनेमुळे भीती वाटते. ते एकदाच किंकाळी मारू शकतं. त्याची आई तीव्र पण दबल्या आवाजात त्याच्यावर रागावते, 'चूप बस, चूप बस ना!' त्यामुळे मुलाच्या रडण्यामधून फक्त व्याकुळ नि:श्वास तेवढे ऐकू येतात. पण त्यानेच प्रेक्षकांमधील अचलता नष्ट होते. सावलीत असलेले काही तरूण दूरवर श्रीदेवीच्या नाचाबरोबर मंडपात रमणनृत्यात मग्न होतात-'तक तक धिऽन्!' 'तक तक धिऽन्!' तरुणांचा आणखी एक गट दुसऱ्या एका कोपऱ्यात नाचायला सुरुवात करतो. पण त्यामुळेही कुठे अडचण येत नाही. 'हिम्मत और मेहनत' चित्रपटात श्रीदेवी या गीतावर जितेन्द्रबरोबर नाचली होती. आता मंचावर ती एकटी नाचतेय्. या मंडपातल्या नाना कोपऱ्यांमध्ये अनेकजण आपल्या जागेवरून उठून या दबल्या सीत्कारच्या तालावर श्रीदेवीबरोबर नाचू लागतात.

माईकवर नृत्याचे काल्पनिक शब्द द्रुत तालात तेव्हा आणखी दबल्या आवाजात येताहेत-तक तक धिऽन्!' 'तक तक धिऽन्!' दबलेले नि:श्वास, द्रुत नि:श्वास.

श्रीदेवी मंचाच्या आणखी पुढील भागात येते. आता उभ्या-उभ्याच तिने आपल्या शरीराचा कमरेपासून वरचा भाग धनुष्यासारखा वाकवला आहे-त्यामुळे तिच्या स्तनांची वक्ररेषा अधिक स्पष्ट होते, आणि कमरेपखालचा भाग पुढे येतो-त्यामुळे तिचे स्तन कठीण आणि स्पष्ट दिसतात. या अवस्थेतही तिच्या शरीरात या सीत्काराचं प्रबळ आन्दोलन आहे. त्या आंदोलनात कुठलंही वैचित्र्य नाहीय्, पण ते आंदोलन जणू कधीच थांबणार नाही.

आता कुंपण काढून टाकल्यामुळे मंडपाचा विस्तार रस्त्यापर्यंत झाला आहे. एक गट मंडपाच्या अगदी मागील बाजूकडून बाघारूला मध्ये घेऊन नाचत-नाचत पुढे येतो. गयानाथ आणि असिन्दिर सहकुटुंब सहपरिवार कार्यक्रम पहायला आले आहेत-कामासाठी त्यांनी बाघारूला बरोबर आणलं होतं, पण बाघारूने मंडपात प्रवेश केला नाही. तो रस्त्यावरच होता, पण जणू त्याला कार्यक्रमाच्या ठिकाणी ओढून आणण्यासाठीच मागचं कुंपण काढून रस्त्यावरही मंडपात आणण्यात आलंय्. काही तरणे लोक रस्त्यावर आणि रस्त्याच्या उतारावर बसून, घटाघटा दारू पीत-पीत कार्यक्रम पहात होते. आता ते जॅकेट-जीन्स या पोशाखात रस्त्यावर नाचू लागतात-'तक तक धिऽन्!' ते कुठलाही आवाज करीत नाहीत, पण आपल्या शरीराला वेगाने झटके देत नाचताहेत-रस्त्यावर आणि रस्त्याच्या उतारावर. बाघारू त्या गटात सापडतो किंवा तो गटच बाघारूला आपल्यामध्ये ओढून आणतो. एवढ्या वेगाने इतकी दारू प्याल्याने त्यांचे पाय वेगाने पुढे जाताहेत किंवा रस्त्यावर व रस्त्याच्या उतारावर नाचताहेत म्हणून ते वेगाने खाली उतरतात-बाघारूला घेऊनच. खाली जाणं म्हणजेच मंडपात प्रवेश करणं. तेव्हा मंडपातही नाना ठिकाणी नाना गट नाचताहेत, आवाज न करता नाचताहेत, माईकवरच्या दबल्या-अधिक दबल्या आवाजातल्या सीत्काराबरोबर नाचताहेत. हा गट बाहेरून नाचत-नाचत या सगळ्या गटांमध्ये मिसळून जातो. मिसळून जातो आणि मंचाच्या दिशेने पुढे जातो. त्यांच्यामध्ये आपादमस्तक जवळजवळ नग्नच असा बाघारू.

## एकशे एक्याऐंशी

# श्रीदेवी आणि बाघारू

बाघारूला घेऊन तरुणांचा तो गट मंडपाच्या जवळजवळ मध्यभागी येतो. इतर अनेकजण अनेक ठिकाणी नाचत असल्याने या गटाच्या मंडपात पुढे येण्याला काही अडथळाही होत नाही, जणू त्यांच्या इतक्या पुढे येण्यासाठी जागा तयारच होती.

पण, आपण आता काय करायचं हे बाघारूला समजत नाही. या गटाने तर काही त्याला ओढून आपल्यामध्ये आणलेलं नाही. एवढंच काय, बाघारू आपल्यामध्ये आहे याची जणू त्या गटाला कल्पनाही नाही, अशा पद्धतीने त्यांचे पाय मद्यापानामुळे वाकडे तिकडे पडताहेत. ते लोक काही किंचाळणं, आरडाओरड करणं असले प्रकारही करीत नाहीयेत-बाघारू एखाद्या खुंटीप्रमाणे उभा आहे आणि हे लोक जणू या खुंटीभोवती फिरत-फिरत नाचताहेत.

बाघारूला दिसतं की, मंचावर तेव्हा 'बिजलीवाणी' प्रकाश चमकतोय. आणि त्या बिजलीवाणी चमकणाऱ्या प्रकाशात एक पोरगी पहुडलीय. पडल्या-पडल्या ती आपलं शरीर उलथंपालथं करतेय्. उलथंपालथं करतेय आणि गिरक्या घेतेय्. गिरक्या घेतेय् आणि तिचं ओटीपोटी जमिनीवरून वरती घेतेय्. 'तक तक धिऽन्', 'तक तक धिऽन्!' माईकवरच्या दबल्या सीत्काराच्या आवाजाची गती एवढी वाढलीय् की असं वाटतं, कुठल्याही क्षणी हा आवाज थांबेल, मंचावर तेव्हा श्रीदेवी आडवी पडून लोळतेय्. तिच्या ओटीपाटावर स्पॉटलाईटचा प्रकाश आहे-तिचं ओटीपोट काल्पनिक संभोगाच्या कल्पनेत वरखाली होतंय्. कुठल्याही क्षणी हे नृत्य थांबू शकतं. पण थांबत नाही. त्यामुळे मंडपामधल्या राजबंशी-मदेशिया-नेपाळी आणि हिंदू लोकांच्या गर्दीचा काही भाग उत्तेजनाच्या चरम बिंदूवर आल्याने बसल्या-बसल्या ताठ झाला आहे, तर काही भाग नाचतो आहे.

इथे उभे राहून श्रीदेवीकडे पहाता पहाता बाघारू विसरूनच जातो, की तरुणांचा एक गट त्याला जणू खुंटीप्रमाणे उभं करून त्याच्याभोवती नाचतेय्. जणू त्याला इथं उभं राहून केवळ श्रीदेवीचे अंगविक्षेपच पहायचे आहेत. बाघारू असा उभा राहिल्या-राहिल्या आपल्याला घेरून नाचणाऱ्या तरुणांच्या नाचाचा भेद करून जणू केवळ मंचावरच्या श्रीदेवीलाच पहातोय्. पहातोय्-पोरगी ओटीपोटी कसं वर करतेय्-खाली करतेय्. या आविर्भावाचा एक अर्थ जणू बाघारूच्या आपादमस्तक जवळजवळ नग्न अशा शरीरात संचारू पहातो, पण मंचावरल्य त्या शरीरावरचा प्रकाशाचा खेळ, माईकवरचा अधिक दबला व अधिक द्रुत सीत्कार आणि आसपास चाललेला लोकांचा नाच हा अर्थ बाघारूमध्ये संचारित होण्यात बाधा आणतोय्. त्यामुळे बाघारू त्या विमूढतेत तो आपल्य शरीरामध्ये हे मंचावरचं आवाहनही जाणवून घेऊ इच्छितो. बाघारूच्या शालवृक्षासारख्या राजवंशी नग्नतेबरोबर मुंबईच्या सिनेमातली सेक्स सिम्बॉल नायिका श्रीदेवी जिवंत शरीराचा एक अर्थगत संयोग स्थापित होण्याच्या क्षणीच गीत अचानक थांबतं. - खूप आधीच थांबू शकलं असतं, तसं. श्रीदेवी एवढ्या वेळात सरळ उभी राहून चालत मंचावरून निघून जाते, मंचावरचे दिवे लागतात, दिर्घ निश्वास सोडून प्रेक्षक आपली उत्तेजना मुक्त करतात, पण बाघारू जिथे उभा होता तिथेच उभा रहातो. आता मंचावरच्या प्रकाशात आणि बाहेरून येणाऱ्या प्रकाशात दिसतं - बाघारू मंडपात या लाखो लोकांच्या मध्ये जवळजवळ नग्न असा उभा आहे - लंगोटीही जणू असून नसल्यासारखीच आहे. बाघारूच जेव्हा दिसू लागतो, तेव्हा अनेकजण जणू त्याला पाहूनही पहात नाहीत. पण पाहूनही न पहाण्याची वेळ निघून जाते - सगळेजण जिथे बसलेले होते, तिथे स्वत:ची नग्नता घेऊन बाघारू असाच बराच वेळ उभा रहातो. ज्या क्षणी पुढचा कार्यक्रम घोषित होईल, त्या क्षणी बाघारू अवान्तर होऊन जाईल - ही वेळही निघून जाते. तेव्हा श्रीदेवीहीन

मंचाचा रिकामेपणाही जणू बाघारूच्या या निर्लज्ज नग्नतेमुळे, अपनामित व्हायला सुरुवात होते. आत्ता जो नाच संपलाय्, त्या नाचाच्या वेळी तर संपूर्ण मंडपच मंच होऊन गेला होता. म्हणूनच बाघारूची ही नग्नता प्रेक्षकांचाही अपमान आहे.

नग्नपणे बाघारू मंचाकडे पहात असा काही अचल उभा आहे, की जणू असं उभं रहाणं हाच एक विद्रोह आहे. शेवटी, या निर्लज्ज राजवंशी नग्नतेमुळेच मंच असा रिकामी आहे, श्रीदेवी बाहेर येत नाहीय्, जणू या नग्नतेसमोर श्रीदेवी मंचावर येणं शक्य नाही असं जेव्हा वाटू लागतं, तेव्हा डी.एस्.पी. साहेब मागच्या बाजूने येऊन दुरुनच आपल्य बॅटनने बाघारूच्या खांद्याला स्पर्श करून म्हणतात, 'बस, खाली बस.' पण हेसुद्धा बाघारूला न समजल्यामुळे डी.एस्.पी. साहेबांना शेवटी बाघारूचा हात धरून त्याला मागे ओढून आणावं लागतं. टोपीपासून तर बुटांपर्यंत पूर्ण युनिफॉर्ममध्ये असलेल्या डी.एस्.पीं. बरोबर चालत-चालत बाघारू मंडपाच्या बाहेर निघून जातो.

माईकवरून ऐकू येतं, 'आता आजच्या कार्यक्रमातील शेवटचं गीत प्रस्तुत करणार आहेत मुंबईच्या प्रख्यात चित्रतारका श्रीदेवी. त्याचबरोबरच आपल्या उत्तरखंड मेळाव्यातील सांस्कृतिक कार्यक्रमही समाप्त होईल. उद्या सकाळी जल्पेश्वर शिवमंदीर मोहिम. आपणा सर्वांना आग्रहाची विनंती आहे की आपण या शोभायात्रेत गटागटांनी सामील होऊन उत्तरबंगालमधील पवित्रतम तीर्थक्षेत्र असलेल्या जल्पेश्वर मंदिरात जावे आणि जल्पेश्वर शिवाची पूजा करावी. 'नगीना' चित्रपटातील शेवटच्या दृश्यात श्रीदेवी यांनी शिवलिंगासमोर जे नृत्य सादर केले होते, तेच नृत्य त्या आता सादर करतील. पोलिस अधिकाऱ्यांची आपणास अशी विनंती आहे की ज्याप्रमाणे आपण मंडपात प्रवेश केला, त्याचप्रमाणे रांगेने कार्यक्रम संपल्यावर बाहेर जावे.'

या घोषणेबरोबर माईकवर गाणं सुरु होतं, 'मै तेरी दुश्मन, दुश्मन तू मेरा। मै नागिना तू सपेरा.' गाण्याचा मुखडा दोन वेळा झाल्यावर श्रीदेवी मंचावर प्रवेश करते. आता स्टेजच्या मध्यभागी प्रकाश आहे. श्रीदेवी चित्रपटातल्यासारख्या खवले असलेला, सापाच्या कातीसारखा तंग पोशाख घातलेल्या नाहीय्. एका ढिल्या झब्ब्यासारखा वेश घातला आहे-त्यावर ठिपके आहेत. श्रीदेवी चित्रपटातील नाचही संपूर्ण नाचत नाही, मधून मधून टाळ्या वाजवते, मधून मधून डोलते. या गाण्यांचं संगीतही तसचं आहे. मंचावर याप्रमाणे थोडं इकडेतिकडे फिरल्यानंतर श्रीदेवी समोरच्या बाजूला स्टेजच्या मध्यभागी चक्क बसते-जोडासनात, आणि गाण्याच्या तालावर फक्त टाळ्या वाजवीत रहाते. त्याच वेळी एक मुलगी डोक्यावर एक थाळी घेऊन मंचावर येते. श्रीदेवीसमोर गुडघे टेकून बसून ती थाळी खूप भक्तिभावाने ती मूलगी श्रीदेवीसमोर ठेवते, तेव्हा दिसतं, की त्या थाळीत एक मोठं शिवालिंग आहे. एक नाग शिवलिंगावर आपली फणी उभारून बसला

आहे. तो नाग बहुधा पत्र्याचा असावा. 'नगीना' चित्रपटातही शिवलिंग होतं. ती मुलगी शिवलिंगाला प्रणाम करून उठताच हळूच एक आवाज येतो, - 'जय बाबा जल्पेश्वर!' सगळे प्रेक्षक हात जोडून प्रणाम करतात. यामध्येच गाणं चालू असतं-'मै तेरी दुश्मन, दुश्मन तू मेरा। मै नागिन तू सपेरा' या गाण्याच्या तालावर श्रीदेवी शिवलिंगासमोर डोळे बंद करून आणि मान डोलवीत-डोलवीत टाळ्या वाजवीत रहाते-जणू हे गाणं म्हणजे जल्पेश्वराचं भजन आहे-तिच्याप्रमाणेच प्रेक्षकही डोळे मिटून टाळ्या वाजवीत रहातात, पण गाण्यासोबत कुणी गात नाही. गाण्याच्या नियमाप्रमाणे गाणं संपतं, पण श्रीदेवी मंच सोडून उठून उभी रहाते. ओठांवर कृतज्ञतेचं हास्य आणून श्रीदेवी डावीकडे, उजवीकडे, समोर, पुन्हा डावीकडे पाहून नमस्कार करते. प्रेक्षक टाळ्यांचा प्रचंड कडकडाट करतात. श्रीदेवी पुन्हा वळून वळून नमस्कार करते. प्रेक्षक पुन्हा टाळ्या वाजवीत-वाजवीत उठून उभे रहातात. श्रीदेवी खाली वाकून शिवलिंग उचलते व ते डोक्यावर घेऊन विंगकडे चालू लागते-तेव्हा 'जय बाबा जल्पेश्वर' या घोषणांनी मंडप दुमदुमून जातो. मोकळ्या, प्रकाशित मंचावर पडदा पडतो.

## एकशे ब्याऐंशी

# जल्पेश मोहिमेतील काही अडचणी

दुसऱ्या दिवशी पासून शुक्रवारी जल्पेश मोहिमेसाठी सकाळी सात वाजल्यापासून लोक जमायला सुरुवात होते. गुरुवारी रात्री श्रीदेवीचा कार्यक्रम पहायला जे स्थानिक लोक आले होते, त्यातले काहीजण हे दोन्हीही कार्यक्रम लक्षात घेऊन आले होते, किंवा, या दोन्हीही कार्यक्रमांसाठी त्यांच्यापैकी अनेकांना आणण्यात आलं होतं. ते श्रीदेवीच्या कार्यक्रमानंतर बाहेर जाऊन, खाणं वगैरे आटोपून पुन्हा मंडपात येऊन झोपले होते. सकाळी उठल्यावर पुन्हा जल्पेश मोहिमेसाठी ते तयार झाले.

जल्पेश मोहिमेसाठी जे थांबलेले आहेत, त्यांच्यापैकी जवळजवळ सगळेच उत्तरखंड-नेत्यांमुळे प्रभावित झालेल्या इलाख्यातले लोक आहेत. उत्तरखंड-नेत्यांपैकी जवळजवळ प्रत्येकजण थोड्या-थोड्या जमिनीचा-जिरायती शेतीचा मालक आहे- काही - काही जण तर एकेका प्रदेशात जोतदार म्हणूनही प्रतिष्ठित आहेत. विशेषतः गयानाथ जोतदार आणि त्याचा जावई असिन्दिर उत्तरखंड पार्टीत आल्यानंतर संमेलनाच्या सुरुवातीलाच उत्तरखंड-सर्मथकांची संख्या खूपच वाढली. पण फालाकाटा, अलिपूरदुवार, संतालपुर, किंवा कूचबिहारपर्यंत नाना ठिकाणी उत्तरखंडाचे नेते किती का असेनात, तिथून तर काही जल्पेश मोहिमेसाठी अधिक लोक घेऊन येणं शक्य नाही. नक्षलबाडीत

सम्पत राय हे मोठे नेते आहेत, पण जल्पेश मोहिमेसाठी नक्षलबाडीहून सगळे मिळून पंचवीस-तीस-जणांपेक्षा अधिक लोक काही आले नाहीत. तेही आले नसते-काल श्रीदेवीचा कार्यक्रम होता, म्हणून आले.

ही गोष्ट अर्थात उत्तरखंड-नेत्यांना ठाऊक होती. म्हणूनच त्यांनी मयनागुडी, बाकाली, पदमती, जोडपाकुडी, बार्नेश या सगळ्या ठिकाणांहून लोक जमवण्यावर विशेष भर दिला. संघटनेच्या दृष्टीनेही मयनागुडी हे उत्तरखंड आंदोलनाचं केंद्र आहे, त्यामुळे मयनागुडीला केंद्रस्थानी ठेवून लोकसंग्रह करणं सोपंही आहे.

प्रचार करतानाही लोकांना एकच गोष्ट अनेकदा सांगण्यात आली होती- 'श्रीदेवीचा नाच पाहून मंडपातच थांबा, जल्पेश करून मगच घरी परता.' याचा परिणामही चांगला झाला होता. इथल्या आसपासच्या लोकांना आज घराबाहेर पडून उद्या दुपारी घरी परतण्याची कल्पना खूपच विलोभनीय वाटली होती- त्यात मयनागुडीत मुक्काम करण्यासाठी मंडप तर आयताच तयार होता.

ही सुविधा होती हेच काही एकमेव कारण नव्हतं. दुसऱ्या दिवशी जल्पेश मोहीम नसती, तरीही या सर्वांना रात्रीच परतणं शक्य नव्हतं- रात्र त्यांना मयनागुडीतच काढावी लागली असती. जल्पेश मोहीमेचा कार्यक्रम घोषित झाल्यावर मंडपात रात्र काढणे, आणि त्यानंतर सर्वांनी मिळून जल्पेश मंदिराकडे जाणे हेच करावं लागणार होतं. जल्पेश मंदिराला जाण्याची संधी येऊनही न जाणारा असा माणूस इथं होता कोण?

उत्तरखंड पक्षाच्या लोकांना प्रयत्न करून दूर-दूरच्या ठिकाणांहून लोक आणता आले नसते, असं नाही. सुरुवातीला त्यांनी बहुधा असा विचार केलाही होता. पण गयानाथ जोतदार पक्षात आल्यानंतर तिस्ता बंधाऱ्याच्या उद्घाटनाच्या दिवशी विरोधी मोर्चा काढण्याची जबाबदारी खूपच वाढली. जल्पेश मोहिमेचं मुख्य उद्दिष्ट होतं- उत्तरबंगालमधल्या प्राचीनतम आणि पवित्रतम तीर्थाचं नाव आंदोलनाशी जोडून उत्तरखंडाच्या बाजूने सर्वांना आकर्षित करणं. त्या प्रचारासाठी श्रीदेवीला आणणं. श्रीदेवीला आणणं यात थोडासा व्यवसाय साध्य होत असला, तरी उत्तरखंडाशी संबंधित कार्यक्रमासाठीच तिला आणणं. महिनाभरात पश्चिमबंगालचे मुख्यमंत्री जेव्हा तिस्ता बंधाऱ्याचं उद्घाटन करतील, तेव्हा नाना ठिकाणांहून ट्रकने, बसने लोकांना जुलूसासाठी यावं लागणार हे पक्कं झाल्यावर जल्पेश मोहिमेसाठीही बाहेरून लोक आणण्याचा विचार इतर कुणी करीत नाही. एकाच महिन्यात दोन-दोन जुलूस करणं काही शक्य नाही.

सरकारी मीटिंगमध्ये उत्तरखंडाच्या बाजूने समर्थन म्हणून जे काही बोललं गेलं होतं, त्याचं पोलीस तंतोतंत पालन करतात. म्हणजेच, कार्यक्रम संपल्याबरोबर बाहेरच्या सगळ्या ट्रक्सना व बसेसना मयनागुडी सोडायला हवी. उत्तरखंड मेळाव्याशी त्यांचा काही संपर्क तयार होऊ नये, अशा पद्धतीनेच त्या ट्रक्स-बसेसना उभं करण्यात आलं होतं.

श्रीदेवीचा नाच पहायला आलात ना, श्रीदेवीचा नाच पाहून परत जा. रात्री तीनच्या आत मयनागुडी रिकामी करून द्यायला हवी. आसाम आणि बिहारहून जे लोक आले आहेत, त्यांच्यापैकी काहीजण जल्पेशांच दर्शन घेण्यासाठी, जल्पेश मोहिमेत भाग घेण्यासाठी श्रीदेवीच्या नाचानंतर थांबतील, अशी उत्तरखंड-नेत्यांना आशा होती. पण ज्लपेश मोहिमेचा प्राचार करण्याची चांगली संधी गुरुवारी उत्तरखंड पक्षाला मिळालीच नाही.

सगळा दोष पोलिसांचाच, असं ही काही नव्हतं. श्रीदेवीच्या कार्यक्रमासाठी हजारो लोक येणार हे तर सर्वांनाच ठाऊक होतं. पण ठाऊक असणं वेगळं आणि ते हजारो लोक डोळ्यांनी पहाणं वेगळं. गुरुवारी संपूर्ण दिवसभर आणि संपूर्ण रात्रभर मगनागुडीसारख्या छोट्या शहराची जी अवस्था झाली होती, तिच्यामुळे उत्तरखंडाचे नेतेही परस्परांमध्ये फारशी चर्चा करून शकले नाहीत. तरीही कार्यक्रम सुरू झाल्यानंतर मंडपामध्ये आणि मंडपाबाहेर नेते आपासात काही चर्चा करू शकतात. त्यांना जर मंडपामध्ये किंवा रस्त्यावर जल्पेश्वर मोहिमेबद्दल काही निवेदन करायचं असतं, तर त्याला पोलिसांनी मनाई नक्कीच केली नसती. खरं तरला जनसमुद्र पाहून नेते इतके भांबावून गेले होते, की ते दुसऱ्या कशाचाच विचार मनात आणू शकत नव्हते.

जल्पेश मंदिराकडे ज्यांना जायचं होतं, ते पहाट झाल्याबरोबर जुलूसाच्या जागी जमा झाले होते. सातच्या सुमारास जुलूस सजायला सुरुवात होते. तेव्हां दिसतं, की त्यांच्यापैकी अनेकजण बसमधून जल्पेश मंदिरापर्यंत जाऊन तिथे जुलूसात सामील व्हायचा विचार करताहेत. मयनागुडीहून जल्पेशापर्यंत बसने जाण्याचा विचार आधी करताच येत नव्हता, बसेसही नव्हत्या. आजकालही फारशा बसेस नाहीत. पण एका लाईनची बस आज सकाळीच गेली. त्याशिवाय मयनागुडीत कालच्या कार्यक्रमासाठी काही मिनिबसेस आल्या होत्या, त्या दोनेक बसेस शटल्-ट्रिपच्या आशेने 'जल्पेश-जल्पेश' म्हणून ओरडत होत्या.

एक भगवा फलक जमिनीत रोवलेला होता. त्यावर लिहिलेलं होतं- 'निखिल बंग उत्तरखंड समिती.' उत्तरखंड पक्षाचा एक मोठा त्रिकोणी ध्वजही रोवलेला आहे. तो एका उंच बाबूंच्या शेंड्यावर फडफडतोय. आणखी काही छोट्या-छोट्या पताका जमिनीत रोवलेल्या आहेत.

सगळे जणू कशाची तरी वाट पहाताहेत असं वाटत होतं. बहुतेक लोक गटागटांनी एकत्र येऊन आधीच्या रात्री झालेल्या श्रीदेवीच्या कार्यक्रमाबद्दलच चर्चा करीत होते. एका ठिकाणी कुणीएक माणूस खूप रागाने ओरडतो, 'अरे तुम्ही लई सिनेमेबिनेमे बघता, मी काही बघत नाही; साल्यांनो, कुठलं गाणं कुठल्या सिनेमातलं न् कुठला नाच कुठल्या सिनेमातला ते मला रे काय ठाऊक?'

'अरे चिडतोस कशाला भाऊ! तू सिनेमा नसशील बघत तर नको बघूस! नाच बघ ना!'

'नाच काय बघू? अंगात आल्यावाणी जमिनीवर लोळतीय! तुम्ही तर लई वाऽ - वाऽ करता! माझ्या तर काही हे लक्षातच येत नाही!'

हे तो माणूस ज्याला म्हणतो, तो होः होः करून हसू लागतो- 'अरे, जमिनीवर पडून एक जवान पोरगी अशी कशापायी लोळतीय हे नाही समजत तर चूप बस ना तू! याच्यात समजायचं काय रे! बघायची चीज आहे, बघायची! काय, काय वाईट दिसतं का? भले रे भले उत्तरखंड पार्टीची! जे काँग्रेसला जमलं नाही, कम्युनिस्ट पार्टीला जमलं नाही, ते उत्तरखंड पार्टीला जमलं- साल्यांनी डायरेक्ट मुंबईहून श्रीदेवीला मयनागुडीला आणलं. उत्तरखंड पार्टी आता श्रीदेवीची पार्टी झाली.' तो माणूस अचानक उठून चीत्कार करतो, 'श्रीदेवीची पार्टी जिन्दाबाद!'

याला कुणीही प्रतिसाद देत नाही- प्रतिसाद देण्यासाठी कुणी तयारच नसतं. पण या कारणामुळेच सगळे हसू लागतात, एकमेकांना टाळ्या देतात- जणू आणखी एकदा त्याने घोषणा दिली असती, तर सगळ्यांनी 'जिन्दाबाद!' म्हणून प्रतिसाद दिला असता.

## एकशे त्र्याऐंशी

# बाघारूच्या हाती झेंडा देताना सुस्थिरची द्विधावस्था

थोड्याच वेळानंतर दूरवरून एक आवाज तरंगत येतो. तो आवाज कुठून येतोय हे पहाण्यासाठी सगळेजण उठून उभे रहातात. काही मोटरसायकली आणि सायकली घेऊन सुस्थिर पुढे येतोय- 'उत्तरखंड पार्टी ज़िन्दाबाद!'

सुस्थिरचं दल आल्याबरोबर सगळेजण झडपडून उठतात. सुस्थिरच्या दलात एकूण पन्नासेक सायकली, आणि मोपेड-स्कूटर्ससह दहाएक मोटरसायकली आहेत. दल रस्त्यावरून पुढे जाऊन त्या भगव्या फलकापलीकडे थांबतं, पण स्टार्ट बंद करीत नाही. एका मोपेडमागून उतरून सुस्थिर ओरडतो, 'मिरवणूक सुरू करा, मिरवणूक सुरू करा!'

सुस्थिर मोठा झेंडा जमिनीतून उपटून हातात घेऊन उभा रहातो, 'या, या काही तरणे लोक पुढे येऊन हा झेंडा धरा!' पंचाननबाबू आणि गयानाथ जोतदार येऊन सुस्थिर जवळ थांबतात. सुस्थिर ओरडतो, 'एऽ नवीन, फलक धरून उभा काय राहिलास! मिरवणूक सजव, मिरवणूक सजव!'

नवीन आणि तिलक फलक जमिनीवरून उचलून आणून रस्त्याच्या दोन टोकांना

दोघे उभे रहातात. सुस्थिर ओरडतो, 'अरे, तुम्ही कशासाठी धरलात फलक? दोन पोरींच्या हातात दे! एऽ, दोन पोरींना बोलाव बरं!' पंचाननबाबू पुढे जातात. सुस्थिर आता गयानाथना म्हणतो, 'अहो, एखाद्या तरण्या पोराला यायला सांगा ना पुढं, झेंडा धरायला!'

गयानाथ तातडीने मिरवणूकीसाठी उभ्या राहिलेल्या लोकांच्या दिशेने जाऊन ओरडतो, 'हेऽ बाघारू, बाघारू रेऽ!' पण बाघारू आसपास कुठं दिसत नाही. गयानाथला तेव्हा आणखी थोडं पुढं जावं लागतं- 'हेऽ बाघारू, बाघारू रेऽ!'

इथे बरेचसे लोक याच भागातले आहेत. तेही गयानाथला ओळखत नाहीत. नाव बहुतेक त्यांना ठाऊक असावं एवढंच. गयानाथही त्यांना ओळखत नाही. त्यामुळे गयानाथची हाक ऐकूनही कुणी बाघारूला शोधून देण्यासाठी पुढे येत नाही. नेहमी प्रमाणे कुठंतरी बाघारू एकटाच 'बैलासारखा' उभा असेल, या विचाराने गयानाथाला 'हेऽ बाघारू, बाघारू रेऽ' अशा हाका मारीत मारीत बाघारूला शोधीत पुढे यावं लागतं. गयानाथची हाक त्याला ऐकू येत नाही, किंवा, ऐकूनही ही हाक आपल्यासाठीच आहे हे त्याच्या लक्षात येत नाही. काल रेगयानाथच्या घरच्या लोकांना इथे घेऊन आल्यानंतरपासूनच बाघारू आळशीपणाने इकडेतिकडे फिरतोय. इथं तर त्याचं कुठेच निर्दिष्ट असं काही काम नाही. म्हणून तो गर्दीपासून दूर कुठंतरी एखाद्या ओंडक्यासारखा पडून रहातो.

बाघारू दिसल्यानंतर सवयीप्रमाणे गयानाथ थोडा दूरच उभा राहतो. बाघारू त्याच्यापेक्षा इतका उंच आहे, की समोर गेल्यानंतर गयानाथला मान उंचावूनच त्याच्याशी बोलावं लागतं.

'हेऽ बाघारू, इथं नुस्तं उभं राहून काय करतोयस?' बाघारूने दचकून पाहिल्याबरोबर गयानाथ म्हणतो, 'चल, इकडं ये!' गयानाथ आता अगदी वेगाने पावलं टाकीत मिरवणुकीच्या सुरुवातीच्या टोकाशी जातो आणि गयानाथच्या हाकेने चमकून बाघारू त्याच्या मागे-मागे चालू लागतो.

दरम्यान मिरवणूकीच्या सुरुवातीला असलेल्या सुस्थिरच्या मोटर-सायकलच्या ताफ्यातील लोक रस्त्यावर गाड्या थांबवून इकडे-तिकडे विखुरले आहेत. समोर दोन तरुणी फलक धरून उभ्या आहेत. नवीन आणि तिलक त्या दोघींच्या मागे-मागे सर्वांना रांगेत उभे करताहेत. आधी स्त्रिया, नंतर पुरुष.

सुस्थिरने मोठा ध्वज उपटून स्वतःच्या हातात धरून ठेवला होता. त्याच्यासमोर जाऊन, बाघारूकडे अंगुलिनिर्देश करून गयानाथ सुस्थिरला म्हणतो, 'तो झेंडा याच्या हातात दे.' सुस्थिर तेव्हा उजवीकडं वळून बोलत असल्याने त्याला गयानाथचा आवाज ऐकू येत नाही. सुस्थिरचं बोलणं संपेपर्यंत गयानाथला थांबावं लागतं. सुस्थिरने मान सरळ केल्यावर तो म्हणतो, 'ह्याला दे ते निशाण!'

'आँ?' म्हणून सुस्थिर लंगोटीधारी बाघारूचा विशाल देह पहातो. त्यासाठी सुस्थिरला बाघारूच्या माथ्यापासून पायापर्यंत आणि पायापासून माथ्यापर्यंत डोळे फिरवावे लागतात. तशाप्रकारे पाहिल्यानंतरही सुस्थिर झेंडा देत नाही, जणू काहीतरी विचार करतो. बाघारूची अशी उंचीपुरी नग्न शरीरयष्टी राजवंशी समाजात काही सुस्थिरने या प्रकारे निरखून पहावी इतकी विरळ नाही. राजवंशी लोकांची मिरवणूक राजवंशी समाजात अजून नवीन आहे. हो लोक राजवंशी असल्यानेच या मिरवणूकीसाठी आले आहेत आणि या मिरवणूकीत ते इतर मोर्च्या-मिरवणुकांमध्ये दिल्या जात नाहीत, अशा काही घोषणा देणार आहेत. म्हणूनच खास राजवंशी समाजाच्या अशा या मिरवणूकीला सुस्थिर शहरातल्या इतर पक्षांच्या मोठमोठ्या मिरवणुकांप्रमाणे सजवू इच्छितोय्- इतर पार्ट्यांच्या मिरवणुकांप्रमाणे ही मिरवणूक सजवली, म्हणजेच जणू उत्तरखंड पक्ष हा पक्ष म्हणून अस्तित्वात येणार आहे. इतर कुठल्या पक्षाने बाघारूसारख्या, त्याच्या शरीरयष्टीच्या, लंगोटीवाल्या एखाद्या माणसाला सुरुवातीला पक्षाचा झेंडा देऊन उभं केलं असतं का? बाघारूने लंगोटी घातलीय याचं सुस्थिरला काही वाटत नाही, तो शरीराने एवढा लंबा-चौडा आहे याचंही काही वाटत नाही, पण मिरवणुकीच्या सुरुवातीलाच तो असणं हे कितपत योग्य दिसेल, याचा जरा शांतपणे विचार मिरवणूका काढायला सराव असता, तर सुस्थिरने असा विचार केला नसता, तर तो सराव या मिरवणूकीपासूनच आपल्याला होणार असं सुस्थिरला वाटतंय. सुस्थिर विचारात जितका वेळ घालवतो, तेवढ्यात मिरवणूक चांगलीच सजून तयार होते. कसं उभं रहायला हवं हे जेव्हा सगळ्यांना लक्षात येतं, तेव्हा प्रत्येकजण त्या पद्धतीन उभा रहातो.

गयानाथ म्हणतो, 'अरे निशाण दे ना याला, धरील ना हा!' सुस्थिर तो बांबू बाघारूकडे देऊ करतो. बाघारू धरीत नाही. सुस्थिर म्हणतो, 'धर ना!' बाघारू जिथं उभा होता, तिथेच उभा राहून तो बांबू उजव्या हातात धरतो. या बांबूवर कुठला झेंडा फडकतोय, हे तो मान वर करून बघतही नाही.

बांबू बाघारूच्या हाती देऊन सुस्थिर नेत्यांना हाका मारायला सुरुवात करतो- 'अहो-काका, काका, अवनी काका, इकडं या-' सुस्थिरला त्या नेत्यांकडे जाऊन, त्यांना ओढत-ओढत आणून त्या फलकापूढे उभं करावं लागतं. तेव्हा मिरवणुकीला जरा चेहरामोहरा येतो. समोर मोटर-सालकलींचा ताफा. त्यांच्यानंतर नेते. त्यांच्यानंतर फलक, त्यांच्यानंतर स्त्रिया, त्यांच्यानंतर पुरुष. या इतक्या उंच बांबूवरचं निशाण कुठं असावं, निशाण बाघारूच्याच हाती असावं का, आणि असलं, तर बाघारूने कुठं उभं रहावं हे जणू सुस्थिर अजूनही पक्कं करू शकत नाही. सुस्थिर ओरडून म्हणतो. त्यांच्या नंतर-सायकलींचा जरा आस्ते- आस्ते चलावं. त्यांच्या नंतर- सायकलींचा ताफा घोषणा, देत-देत पुढे जाईल. जल्पेश मंदिराजवळ आपण शपथ घेऊ आणि तिस्तामाईची पूजा करू.'

थांबून सुस्थिर मिरवणुकीकडे एकदा पहातो आणि थोड्याश्या अन्यमनस्कपणेच बाघारूचा हात धरून त्याला ओढीत आणून मिरवणुकीच्या सुरुवातीला, नेत्यांच्या पुढे उभं करतो. निशाण तर मिरवणुकीच्या सुरुवातीच असावं लागतं. मोटारसायकली निघून गेल्यावर हा एवढा मोठा झेंडा हाती धरून बाघारू मिरवणुकीच्या सुरुवातीला असेल, त्याच्यानंतर नेते, त्यांच्यामागे फलक, त्याच्यानंतर स्त्रिया आणि त्यांच्यामागे पुरुष.

सुस्थिर आवाज उंचावून घोषणा देतो- 'उत्तरखण्ड पार्टी'-'झिंदाबाद.' कुठल्या घोषणेला काय प्रतिसाद द्यायचा हे ठाऊक असलेले लोक मिरवणूकीत ठिकठिकाणी विखुरलेले असल्याने मिरवणुकीतून पुरेशा जोराने प्रतिसाद येत नाही, पण सायकली आणि मोटारसायकलींवरच्या लोकांना घोषणा खूप चांगल्या ठाऊक आहेत. ते जोरजोरात ओरडून घोषणा देतात- 'कामातपूर राज्य - कायम करो, कायम करो!' 'उत्तरखण्ड दिच्छे डाक - भोटेर बॉक्स खाली जाक!' (उत्तरखंड देतोय हाक - मतपेट्या रिकाम्या जावोत!) 'कृषकेर जमि काडि-तिस्ता बॅरेज चलिबेना!' (शेतकऱ्यांच्या जमिनी घेऊन-तिस्ता बॅरेज बांधणं चालणार नाही!)

## एकशे चौऱ्याऐंशी

# मिरवणुकीच्या सुरुवातीला बाघारू

मयनागुडी सोडल्याबरोबर मिरवणुकीचे तीन तुकडे होतात. घोषणा देत-देत मोटरसायकलवाले वेगाने पुढे जातात. सायकलवरचे लोक प्राणपणाने सायकल मारीत मोटरसायकलवाल्यांबरोबर रहाण्याचा प्रयत्न करतात, पण त्या सगळ्यांना इतक्या जोराने सायकल चालवणं शक्य होत नाही. त्यामुळे ते मोटरसायकलचा ताफा आणि पायी जाणारी मिरवणूक यांच्यामध्ये साकवासारखे विखरून रहातात- तिस्ता, तोर्सा, जलढाका या अनेक ठिकाणी पावसाळ्याच्या सुरुवातीला दिसणाऱ्या खचलेल्या - तुटलेल्या साकवांसासारखे. कन्स्ट्रक्टर लोकांच्या भाषेत अशा साकवांना 'फेअर वेदर ब्रिज' असं म्हणतात- म्हणजेच, पावसाच्या पहिल्याच सपाट्याने ते साकव भंगून नदीच्या पात्रावर असेच विखुरल्यासारखे दिसतात.

पण, मयनागुडीच्या बाहेरच्या बाजूला, जल्पेशाकडे जाणाऱ्या पक्क्या रस्त्यावर ही मिरवणूक तितकी काही विस्कळित वाटत नाही. रस्त्याच्या दोन्ही बाजूंना शेतीवाडी आहे, शेतीचं काम थोडं-थोडं सुरू झालं आहे, पण मोठ्या प्रमाणावर जमीन रिकामीच आहे. रस्ता ज्या प्रकारे पुढं गेलेला आहे, त्यामुळे खूप दूरवरचा रस्ता एका नजरेत दिसतो. अधूनमधून एखादं ताडीचं दुकान किंवा एखादी झोपडी मध्ये आली असली, तरीही तिच्या

पुढचा रस्त्याचा भाग दिसतो. हा इतका लांब जवळजवळ संपूर्ण रस्ता या मिरवणुकीच्या सुरुवातीसह पहाता येतो. हा इतका दीर्घ रस्ता एकाच वेळी दिसत असल्याने मिरवणुकीचे तुकडे जोडल्यासारखे वाटतात, कारण रस्त्यावर इतर कुठलीही गाडी नाही किंवा इतर कुठले लोकही नाहीत. इतक्या मोटरसायकलींच्या आवाजामुळे कुठे-कुठे लोक बाहेर डोकावतात, पण ते रस्त्यावर येत नाहीत. वेगवेगळ्या निष्प्रभ करण्याझपत मोठ्याने भुंकत-भुंकत मोटरसाकलींमागे आपल्या स्वनिर्धारित सीमेपर्यंत धावत येतात; पण त्यानंतर नवीन वाडीवरची कुत्री भुंकायला सुरुवात करतात. आधीच्या वाडीची कुत्री तेव्हा परतता-परतता सायकलवाल्यांच्या दिशेने माना उंचावून भुंकतात. पण सायकलवाल्यांची रांग इतकी लांबवर पसरलेली आहे, की ही कुत्री माना खाली घालून उभी रहातात आणि पायी येणारी मुख्य मिरवणूक तिथपर्यंत येण्याआधीच वाडीत परत जातात.

पण, मूळ मिरवणूक विस्कळित होत नाही. अगदी ज्याप्रकारे ती मयनागुडीहून जल्पेशाच्या रस्त्याला लागली होती, त्याच प्रकारे जल्पेशाचा रस्ता धरून पुढे जाते. मिरवणुकीच्या चालण्याचा जणू एक छन्द तयार होतो. तो छंद कुणी भंग करीत नाही. रस्त्याच्या किंवा चालण्याच्या पद्धतीमुळे अशा प्रकारचा छंद-लय दूरच्या ठिकाणी चालत जाणाऱ्यांच्या चालण्यामध्ये तयार होतो. बाजाराला किंवा यात्रेला जाण्याच्या वेळी किंवा बाजाराहून वा यात्रेहून परत येण्याच्या वेळी लोकांच्या चालण्यात हा छंद दिसतो- प्रत्येकजण आपापल्या पद्धतीने चाललेला असतो, पण पहाताना वाटतं, की सगळेजण एकत्र मिळून चालले आहेत. मयनागडीहून जल्पेशला जाणारा हा रस्ता एखाद्या मोठ्या बांध्यासारखा नाही. हा रस्ता बांधलेला आहे, एवढाच काय तो फरत. पण बांधावरून ज्याप्रमाणे माणसांची रांग एखादी गाडी किंवा घोडा मोडू शकत नाही, त्याप्रमाणे या रस्त्यावरूनही कुठली गाडी या मिरवडूकीमधून जात नाही. अनेक लोक खूप दूरचा मार्ग जेव्हा एकत्र येऊन क्रमू लागतात, तेव्हा ते या मिरवणूकीप्रमाणेच दिसतं.

या रस्त्यावर मिरवणूकीला स्वतःचं असं स्वरूप येतं. संपूर्ण रस्ता दिसत नसला, तरी जितका दिसतोय त्यावरून या इतक्या माणसांचं एकसाथ चालत येणं ही घटना जणू अर्थपूर्ण होऊन उठते. पुढे किती दूरपर्यंत जायचंय हे सर्वांना दिसतं. ज्या दोन 'पोरीं'नी कापडी फलक धरला होता, त्यांना तो नीट ताणून धरता येत नाहीय. काही क्षणांनंतरच त्यांचे हात परस्परांच्या दिशेने झुकतात. यावर कुणी काही न म्हटल्याने त्यांचे हात आणखी खाली येतात. फलकाचं कापड मागच्या दोन रांगांच्या मध्यभागी जवळजवळ खाली येतं. पण वाऱ्यामुळे पूर्णपणे खाली जात नाही. फलक तसाच जर झेंड्याप्रमाणे एकाच व्यक्तीच्या हातात दिला असता, तर इतक्या वाऱ्याने तो त्या एका व्यक्तीच्या हातातून संपूर्ण मिरवणूकीच्या डोक्यावर, हातभर उंचीवर एखाद्या स्रोताप्रमाणेच उडत राहिला असता.

बाघारूच्या हातीही झेंडा सुरुवातीला जसा होता, तसाच शेवटीही होता. उंच बांबूच्या शेंड्याशी त्रिकोणी आकाराचा झेंडा बाघारूने दोन्ही हातांनी खांद्याच्या आधारावर पेलला आहे. आता जसा वारा वहातोय, तसा वारा मोकळ्या मैदानात वहातोय, पण तशा जोरदार वाऱ्यात बाघारूपेक्षा कमी मजबूत असलेला माणूस तो झेंडा मयनागुडीपासून जल्पेशापर्यंत नेऊ शकला नसता. या मिरवणुकीला फक्त चालत-चालत जल्पेश मंदिरापर्यंत पोचायचं होतं, पण असल्या वाऱ्यामध्ये त्या झेंड्याला पेलत जल्पेशापर्यंत नेण्याची जबाबदारी होती, ती एकट्या बाघारूवरच. त्यामुळे मिरवणुकीच्या सुरुवातीला त्याचं लंगोटीधारी शरीर असं प्रासंगिक होऊन उठतं, की त्यामुळे बाकीच्या मिरवणुकीला अर्थ प्राप्त होता. बाघारूच्या शरीराचा अर्थ समजणं, किमान पहाणं तरी सुस्थिरला शक्य होत नाही, कारण तो शपथग्रहण आणि तिस्तामाईची पूजा वगैरे कार्यक्रमांच्या व्यवस्थेसाठी जल्पेशाकडे मोटरसायकलवर पुढे निघून गेलाय. मिरवणुक बाघारूच्या शरीरापासूनच सुरू झालीय. बाघारूच्या मागे आणि फलकाच्या पुढे होते पंचानन मल्लिक, वीरेन बसुनिया, गयानाथ जोतदार, देवमोहनबाबू, नवीन, तिलक, धैर्यमोहनबाबू आणि सम्पत राय. यांच्याशिवायही आणखी सहा-सात जण. यांच्यामध्ये आणि मिरवणुकीतल्या लोकांमध्ये फरक दिसत होता तो पोशाखामुळेच. कपडे आणि पादत्राणं घातलेले इतरही अनेक लोक होते खरे, पण ज्यांनी सदरे घातले होते त्यांपैकी अनेकांनी धोतरं घातली नव्हती, तर ज्यांनी धोतरं घातली होती त्यांच्यापैकी अनेकांनी सदरे घातलेले नव्हते. मयनागुडी सोडून या रस्त्यावर आल्याबरोबर मिरवणुकीचे पोशाखाप्रमाणे हे दोन भाग लक्षात येत होते.

बाघारू मिरवणुकीच्या सुरुवातीला असल्याने आणि त्याच्यामागे हे जोतदार-देउनिया लोक जात असल्यामुळे ही मिरवणूक म्हणजे जणू आचारांप्रमाणे साजऱ्या केलेल्या एखाद्या उत्सवाप्रमाणेच वाटते- नाहीतर बाघारू असा पुढे कशासाठी राहिला असता? बांबूच्या वजनाच्या अंदाजावरून या प्रश्नाचं उत्तर सहज मिळतं खरं, पण हे इतके जोतदार-देउनिया लोक बाघारूचं नेतृत्व मानतात त्यामुळे या प्रश्नाचं उत्तरही थोडं जटिल बनतं. 'मेचेनी खॅला' किंवा 'हुदमार नाच' हे उत्सव ज्याप्रमाणे फक्त महिलांचेच असतात, किंवा होळी पौर्णिमेच्या दुसऱ्या दिवशीच्या धुळवडीच्या उत्सवासारखे काही उत्सव ज्याप्रमाणे पुरुषांचेच असण्याचा रिवाज आहे, जणू त्याचप्रमाणे हा बाघारू आपल्या बाहूंचे मनगटांचे छातीचे आणि पाठीचे स्नायू असे स्पष्टपणे दाखवीत हा झेंडा वाहून नेणार आणि त्याच्या मागे-मागे ही 'बडी-बडी माणसं' चालणार, हाच जणू या मिरवणूकीचा एक आचार आहे, असं वाटतं.

बाघारू तर काही या आधी कुठल्या मिरवणुकीत सामील झाला नव्हता. पण त्याला बोलावून आणून त्याच्या 'गिरी' जोतदाराने हा बांबू त्याच्या हाती दिल्याबरोबर तो

'मिरवणुकीचा माणूस' झाला. आता दोन्ही बाजूंना पसरलेला शेतांच्या मधून जाणाऱ्या या रस्त्यावर बाघारू मिरवणुकीचा दिग्दर्शक आहे. जर झेंडा धरणे ही काही विशेष भूमिका असेल, तर दिग्दर्शनात त्याची काही विशेष भूमिका असण्याचं तसं काही प्रयोजनही नव्हतं- जे त्याच्या मागून येत होते, त्यांच्या विशेष-विशेष भूमिकांना महत्त्व होतं, प्रयोजन होतं. जे बाघारूच्या मागून येत होते, त्यांनी ठरवल्याप्रमाणेच तर बाघारू त्यांच्यापुढे चालतोय, तो या मिरवणुकीच्या म्होरक्या झालाय. पण त्यांच्यापैकी एकाने जरी आपलं मत बदललं, तर तो किंवा ते बाघारूच्या पुढे येऊ शकतात- आणि या पुढे येण्यासाठी त्यांना एक पाऊलही हलवावं लागणार नाही. बाघारूला मागे जायला सांगितल्याबरोबर ते आपोआपच पुढे होतील.

पण ते तर काही सांगता येत नाही. ही मिरवणुक आता ज्या अर्थाने स्वतःला सार्थ बनवू पहातेय, त्यासंगे बाघारूचं हे सर्वांच्या पुढे असणं मिसळून गेलंय. हे मिश्रण या मिरवणुकीच्या दृष्टीने खूप आवश्यक आहे. हे मिश्रण आता नष्ट करता येत नाही. म्हणूनच, बाघारू अजाणताच या मिरवणुकीचं प्रतीक बनतो, या मिरवणुकीचा प्रतिनिधी बनतो. जल्पेशापर्यंत या प्रतीकाचं आणि प्रतिनिधीचं रक्षण करायला हवं.

बाघारूच्या चालण्यामध्ये कुठलंही नावीन्य नव्हतं. मिरवणुकीच्या पुढे चालणं तर सोडूनच द्या, एखाद्या मिरवणुकीत त्याला यापूर्वी कधीही चालावं लागलेलं नाही, हे त्याच्या चालण्यातल्या स्वच्छंदतेवरून लक्षात येत नाही. त्याला थोडं अवघडल्यासारखं वाटतं, नाही असं नाही. डांबरी रस्त्यावरून चालायचा तर काही त्याला सराव नाही, त्यामुळे त्याच्या तळपायांना थोड्या वेदना होतात. जो बाघारू एकेका दिवशी मैलोनमैल पायी चालतो, त्याच्या पायतळी दगडगोटे फुटून जातात पण बाघारूला वाचवतो, तो हा निशाणाचा बांबू. त्याला जर या डांबरी रस्त्यावरून फक्त स्वतःच्याच शरीराचा भार वहायचा असता, तर यापेक्षा खूप दगडगोटे त्याच्या पायतळी फुटले असते. एक तर सराव नसलेला, बांधीव रस्ता, त्यात पुन्हा सराव नसलेली भावहीनता बांबूचा भार असल्याने आणि इतका उंच बांबू सरळ ठेवण्यासाठी शक्ती लावावी लागत असल्याने बाघारू काही क्षणांतच या रस्त्यावरून सराव असल्याप्रमाणे चालू शकतो, आणि हे निशाणही सराव असल्याप्रमाणे खांद्यावर नेऊ शकतो. याचा अर्थ, अशा मिरवणुकीचं नेतृत्व त्याच्याकडे देण्याच्या अभूतपूर्व प्रसंगालाही बाघारू आपल्या सत्त्वामध्ये आणू शकतो. त्याच्या मागे त्याचाच जोतदार आहे, तसंच इतरही अनेक जोतदार त्याचं अनुसरण करीत आहेत- ही गोष्ट त्याच्या डोक्यातच शिरत नाही.

बाघारूला नेता बनवून जे नेते त्याचं अनुसरण केल्याच्या आविर्भावात चाहताहेत, तेही चालण्यात काही कमी नाहीत. त्यांच्यापैकी जवळजवळ प्रत्येकाला रोज मैलोनमैल

चालवं लागतं. या डांबरी रस्त्यामुळेच त्यांनाही जरा अडचण वाटते. त्यांच्या सर्वांच्या पायात बूट आहेत- कॅनव्हासचे, रबराचे, चायनीज-जरा कमी वयाच्या नेत्यांनी सँडल्सही घातले आहेत. म्हणून त्यांना दगडगोटे लागत नाहीत. पण जेव्हा ते मैदानातून किंवा बांधावरून मैल-मैल चालतात, तेव्हा मातीवर पाय टाकल्यावर लक्षात येतं, की पाय मातीवर टाकला आहे. माती थोडी दबली जाते, किंवा वाळू थोडी सरकते, किंवा गवत थोडं वाकतं. पणं या डांबरी रस्त्यावर पावलं टाकल्यावर पायांना त्या प्रकारच्या कुठलाही प्रतिसाद मिळत नाही. आपण चालत आहोत, हे स्वतःच्या पायांच्या अंदाजाने लक्षात येत नाही.

तरीही ते चालतच आहेत. बाघारूच्या मागे-मागे, किंवा त्याने धरलेल्या निशाणाच्या अनुसार. बाघारूचं निशाण आकाशात किती उंच फडफडतंय ते सगळे नेते चांगलं पाहू शकतात व पहातात. त्यामुळे त्यांना थोडा अभिमानही वाटतो. सवर्ण हिंदूंशी केलेल्या तुलनेतून राजवंशी समाजात काही शतकांपासून एक न्यूनगंड तयार झाला आहे. आता या बाघारूने आपल्या हाती धरलेल्या निशाणामागे तराईतल्या सम्पत रायपासून पुण्डिबाडीच्या कालिप्रसन्नच्या थोरल्या मुलापर्यंत सगळे उघड्या मैदानातून असे एकसंगे चालत जाताहेत-त्यातच जणू राजवंशी लोकांचं अभीष्ट सिद्ध होऊन जातं. किमान इथे तरी 'राजवंशी' शिवाय त्यांना दुसऱ्या कुठल्याही उपाधीने ओळखलं जात नाही. इथे ते केवळ राजवंशी आणि राजवंशीच आहेत. या परिचयामुळेच तर ते गेले काही दिवस मेळावा करू शकले, काल रात्री श्रीदेवीला आणून कार्यक्रम करू शकले आणि आता इतक्या मोठ्या रस्त्यावर मिरवणुकीने जल्पेशाला जाऊ शकताहेत.

## एकशे पंच्याऐंशी

# हातात झेंडा घेऊन, तिस्तामाईची पूजा पहाणारा बाघारू

परंतु जल्पेशावर शपथग्रहण आणि तिस्तामाईची पूजा हे कार्यक्रम तितकेसे 'जमले'नाहीत.

मिरवणुकीत बहुतांशी इकडच्या बाजूचेच लोक होते. ज्यांच गाव किंवा गाडी या मिरवणुकीच्या मार्गावर होती, ते लोक मधूनच मिरवणुकीतून निघून गेले. ज्यांची गांवं किंवा गाड्या जल्पेश मंदिराच्या पुढे होती, ते लोक मात्र जल्पेश मंदिरात बसले, निघून गेले नाहीत. सुस्थिरच्या मोटर-सायकल ताफ्यामधलेही अनेकजण मोटर सायकल चालवण्याच्या आनंदात जल्पेश मंदिराच्याही पुढे निघून गेले आहेत. त्यातील काही-काही परत आले खरे, पण त्यांच्याशी या मिरवणुकीचा किंवा कार्यक्रमाचा काही संपर्कच तयार

होत नाही. फक्त सायकलस्वार तेवढे इथपर्यंत येऊन, थकून इकडे-तिकडे विश्रांती घेत पडतात. जेव्हा मूळ मिरवणूक बाघारू आणि नेतृवृंदासहित जल्पेशावर पोचते, तेव्हां वाटतं की केवळ इथं येऊन पडणं हाच त्यांच्या उद्देश होता, यानंतर आणखी काही कार्यक्रम नाही.

परंतु सुस्थिरने सगळी व्यवस्था केली होती. मिरवणूक इकडेतिकडे न जाता सरळ जल्पेश मंदिराच्या दिशेनेच जावी, म्हणून सुस्थिर बाघारूला अगदी हात धरून रस्ता दाखवतो. बाघारू यापूर्वी गयानाथच्या कामासाठी जल्पेश मंदिरात आला होता बहुधा, पण आपण अगदी गाभाऱ्यातल्या शिवलिंगापर्यंत जाऊ शकतो असं त्याला कधी वाटलंच नव्हतं. पण त्याचे दंड धरून सुस्थिर त्याला अगदी मंदिराच्या जिन्यापर्यंत घेऊन जातो. जेव्हा बाघारू मंदिराच्या जिन्यापाशी पोचतो, तेव्हा त्याला वाटू लागतं, शेवटी सुस्थिर आपल्याला पायऱ्यांवरून वरतीही ओढणार की काय? जर वरती नेलं, तर झेंड्याचं काय करायचं? मग तो असा विचार करतो, की जर जिन्यावर ओढलं, तर तो वर जाणारच नाही. पण या जिन्याच्या सुरुवातीला येताच सुस्थिर त्याला सोडून देतो, त्याचबरोबर 'जय बाबा जल्पेश्वर!' अशी घोषणा होते. बाघारू दोन्ही हातांनी बांबू धरून, त्या बांबूसमोरच भक्तिभावाने वाकून त्यावर आपलं कपाळ टेकवतो. त्याला नेहमी असं कपाळ टेकवावं लागत नसल्याने, ते किती वेळ टेकवलेलं ठेवावं हे त्याला कळत नाही. कळत असत, तरी फार सोय झाली असती असं नाही, कारण त्याची वेळेची जाणीव इतकी चांगली नाहीय. पण इतक्या दूर इतक्या मोठ्या मिरवणुकीच्या अग्रभागी राहून झेंडा वाहून आणल्याची प्रतिक्रिया म्हणून त्याला वाटतं, की आपण अधिक वेळ प्रणाम करणं उचित आहे. एक तर बाबा जल्पेश्वर, त्यात मिरवणूक, त्यात निशाण-त्याशिवाय जल्पेश्वर मंदिरासमोर अशा प्रकारे डोकं टेकवण्याची संधी पुन्हा कदाचित त्याच्या जीवनात येणारही नाही. माथं झुकवून बाघारू आपल्या गतकालीन आणि आगामी जीवनाच्या परिप्रेक्ष्यात विचार करतो असं काही नाही - तो खूप वेळ बांबू मजबूतपणे धरून त्यावर डोकं टेकवून ठेवतो. डोकं बांबूवर टेकवल्यावर तो आसपासच्या कुणालाही पाहू शकत नाही, मागच्याही कुणाला पाहू शकत नाही. इतका वेळ डोळे बंद ठेवल्याने त्याच्या डोळ्यांना जरा अवघडल्यासारखं वाटतं. तो एक हात बांबूपासून काढून डोळे थोडे चोळून घेतो, थोडं हळूच पाहून घेतो. पण तरीसुद्धा त्याला आसपास वा मागे कुणीही दिसत नाही.

बाघारू आता त्याच्या मिरवणुकीचा हा एवढ्या उंच बांबूच्या माथ्याशी निशाण घेऊन एकटा-एकटा मिरवणुकीला शोधतो. मागे लोक नाहीत, पण निशाण असं फडफडतंय-हे बाघारूला विसंगत वाटतं. हातात हा बांबू आणि निशाण असल्याने त्यालाही एकट्यानेच फिरता येत नाही. 'मिरवणुकीचा हा बांबू आणि झेंडा माझ्या खांद्यावर देऊन गेली कुठं ही गयानाथची मिरवणूक?' मंदिराच्या प्रांगणामधून बाघारू बाहेर पडतो.

बाहेर आल्याबरोबर त्याला दिसतं, की सगळे लोक विस्कळीतपणे तळ्यासाठी इकडे-तिकडे बसलेले आहेत, 'मिरवणूक' असं काही स्वरूप त्या समूहाला उरलेलं नाही. बाघारूने तर काही या मिरवणुकीतील कुणाचंच तोंड पाहिलेलं नाही. त्याने फक्त मिरवणूक पाहिलेली आहे. मिरवणुकीत जे चेहरे होते, ते मिरवणुकीबाहेर ओळखायचे कसे? पण तरीही हे तळ्याकाठी इकडे-तिकडे बसलेले लोक मिरवणुकीतलेच आहेत. कारण आधी मंदिराच्या आसपास मिरवणुकीतले लोक वगळता इतर कुणीही नव्हतं असा अंदाज बाघारू करू शकतो.

हा बांबू घेऊन कुठं जावं हे न समजल्याने बाघारू बांबू धरूनच उभा रहातो. तिथे उभा असतानाच त्याच्या लक्षात येतं, की थोड्या अंतरावर एके ठिकाणी गयानाथ, असिन्दिर असे देउनिया लोक उभे आहेत आणि तरुणींच्या एका गटाने समूह-स्वरात गाणं सुरू केलं आहे. थोड्याच वेळ्यात त्याच्या लक्षात येतं की तिस्तामाईची पूजा सुरू झालीय. नक्कीच तिथं काठीला कापडं वगैरे बांधून तिस्तामाईची मूर्ती उभारली असणार. ते गाणं आता खूपच रंगात आलं आहे. बाघारू ते गाणं फार मनापासून ऐकतो असं नाही, पण जन्मापासून ऐकता-ऐकता ते गाणं त्याच्या इतकं ओळखीचं झालंय, की ऐकायची इच्छा नसली, तरी ते कानावर पडतंय.

'सगग हते नामिलो तिस्ताबुडी
मोनचे दिया पांव
मोनचो हते नामिल तिस्ताबुडी
च्यातन करिलो गाव
काचा दूध आलोवा क्यालो
भईक्षण कोरो।'

पहाता पहाता तिस्तामाईची पूजा संपते. बाकीच्या पूजा जशा कंटाळवाणेपणे खूप वेळ चालतात, तसं काहीही होत नाही. पंचानन मल्लिक उभे राहून म्हणतो, 'तिस्तामाई आपली देवता आहे. त्या तिस्तामाईला बंधन घातलेलं आम्ही सहन करणार नाही. आणखी एक महिन्यानंतर तिस्ता बंधाऱ्याच्या उद्घाटनाच्या दिवशी आपण विरोधी मोर्चा घेऊन तिस्ता बंधाऱ्याकडे जाऊ. तिस्ता बंधाऱ्याच्या विरोधात आपण सर्वजणांनी आपापल्या वाडीत, बाजारात, गावांत, गंजांत प्रचार करावा आणि उद्घाटनाच्या दिवशी सगळ्या ठिकाणांहून मोर्चा घेऊन जावा, आता शपथग्रहणाचा कार्यक्रम होईल. मी वाचीन, माझ्यामागे आपण सर्वांनी म्हणावं. 'जय बाबा जल्पेश्वर! जय तिस्तामाई!'

अद्यापही सभेप्रमाणे सगळेजण एका ठिकाणी जमा झालेले नाहीत. जो तो आपल्या मताप्रमाणे हवं तिथं उभा आहे. माईकही नाही-त्यामुळे काय भाषण होतंय, काय वाचलं जातंय त्याकडं कुणी फारसं लक्षही देत नाही. ज्या ठिकाणी तिस्तामाईची पूजा होत होती, तिथे जे काही नेते होते, गयानाथही होता- ते समवेत स्वरात काहीतरी वाचतात किंवा

बोलतात. तरीही जेव्हा जरा मोठ्या आवाजात 'जय बाबा जल्पेश्वर!' आणि 'जय तिस्तामाई जय!' अशा घोषणा झाल्या, तेव्हा प्रत्येकाने आपापल्या जागेवरून प्रतिसाद दिला. हा प्रतिसाद फार जोरात नसला, तरी दिला गेला.

उत्तरखंड मेळाव्याच्या आयोजकांनी ज्या नाटकीय क्रमाने हा कार्यक्रम आखला होता, तसा काही झाला नाही. एकापाठोपाठ एक काही दिवस मेळावा, त्यात विविध प्रकारची चर्चा; एकापाठोपाठ एक काही दिवस कार्यक्रम, त्यात नाना प्रकारचे प्रोग्रॅम्स. शेवटच्या दिवशी श्रीदेवीचा नाच-हा तर या नाटकाच्या क्लायमॅक्सच. त्याच्या दुसऱ्या दिवशी जल्पेश्वर मोहिमेत उत्तरखण्डात आणि एक नाटक.

पण 'जल्पेश्वर मोहीम', 'शपथग्रहण', 'तिस्तामाईची पूजा' - या सगळ्या गोष्टी कागदावरच्या छापील शब्दांत जशा दिसतात किंवा भाषणातल्या शब्दांत जशा ऐकू येतात, तशा वास्तवात मात्र दिसत नाहीत किंवा ऐकू येत नाहीत. श्रीदेवीचा नाच होता म्हणून, त्याला इकडून इतके लोक गेले म्हणून, आणि त्यांना मंडपात रात्री रहाण्याची जागा देण्यात आली म्हणूनही मिरवणूक मयनागुडीहून जल्पेश मंदिरापर्यंत चालत येऊ शकली. नाहीतर तेही होऊ शकलं नसतं. फारतर सुस्थिरची सायकल किंवा मोटर-सायकलींची मिरवणूक झाली असती. पण सायकलवर किंवा मोटारसायकलींवर येऊन तर काही तिस्तामाईची पूजा, जल्पेश्वराची पूजा, शपथग्रहण हे सगळं करता आलं नसतं. नसतं कसं-करता आलंही असतं; पण तो कार्यक्रम फक्त ज्यांनी हा कार्यक्रम केला त्यांच्यामध्येच मर्यादित राहील. आणखी दहाजणांमध्ये त्याचा प्रचार होणार नाही. पण इथे इथे जल्पेश्वर मोहीम, तिस्तामाईची पूजा आणि शपथग्रहण कसंही झालं असलं, तरी वर्तमानपत्रांच्या वार्ताहरांजवळ हे सांगितल्याने या कार्यक्रमाला जरा वजन येईल, त्याचा चेहेराच बदलेल.

उत्तरखण्डच्या नेत्यांनी जल्पेश्वर मंदिरात वर्तमानपत्रांसाठी एक बातमी तेवढी तयार केली.

सगळं संपल्यावर हा बांबू आणि त्यावरच्या झेंड्यांचं काय करायचं हे बाघारूला समजत नाही. त्याला स्वत:लाच एक उपाय सुचतो - 'मिरवणूक नसल्याने झेंडा कशाला पाहिजे? मिरवणूक नाही, तर झेंडाही नाही!' तो जल्पेश मंदिराजवळच्या एका झाडाला झेंडा टेकवून ठेवतो.

## एकशे शहाऐंशी

# उत्तरखण्डचा बाजार - मोर्चा

उत्तरखंडाचा उंच झेंडा बाघारूने जरी जल्पेश मंदिराच्या भिंतीला ठेकवून ठेवून दिला, तरी त्या झेंड्याने मात्र नंतरचा एक महिना बाघारूला सोडलं नाही.

तिस्ता बंधाऱ्याच्या उद्‌घाटनासाठी विरोध प्रदर्शित करण्यासाठी उत्तरखंड पक्षाचा मोर्चा आयोजित करण्याची सगळी जबाबदारी जणू गयानाथ आणि असिन्दिर यांच्यावरच येऊन पडली. किंवा, त्यांनी स्वतःच ती जबाबदारी आपली आहे असं मानलं. इतर लोकांसाठी तिस्ता बंधारा ही केवळ एक बातमी होती, पण गयानाथ-असिन्दिरसाठी मात्र हा बंधारा काही तितकी क्षुल्लक गोष्ट नव्हती-दहा-बारा वर्षापूर्वीच्या त्या छावणीपासून या दहा-बारा वर्षातल्या नाना कज्जे-खटल्यापर्यंत तर हा बंधारा त्यांच्या डोळ्यासमोर उभा राहिला. आणि तो जितका उभा राहिलाय तितक्या प्रमाणात त्यान गयानाथ-असिन्दिरला मागे ढकललंय. त्यासंदर्भात आजव केवळ कज्जे-खटलेच चालले होते, पण आता उत्तरखंडाच्या निमित्ताने तिस्ता बंधाऱ्याला थांबवण्यासाठी त्यांच्या हाती जणू एक हत्यारच मिळालं. तिस्ता बंधाऱ्याचं काम थांबवता येणार नाही, हे गयानाथ-असिन्दिर यांना आपापल्या बुद्धीप्रमाणे समजलं आहे. बंधाऱ्याचं काम थांबवता आलं नाही, हे तर त्यांनी आपल्या स्वतःच्या डोळ्यांनीच पाहिलय्. तिस्ता बंधाऱ्याचं काम स्थगित ठेवण्याच्या संदर्भाला खटला जिंकता येणार नाही हे समजायला काही फार बुद्धिमत्तेची आवश्यकता नाही, तरीही तिस्ता बंधाऱ्याच्या उद्‌घाटनाच्या वेळी नेण्याच्या मोर्च्याबद्दल गयानाथ आणि असिन्दिर इतके उत्तेजित झाले आहेत त्याचं एक कारण बहुधा हे असावं, की खूप लोक एकत्र करता आले, तर एखादं काम करवून घेता येतं याची चव उत्तरखंड मेळाव्याच्या प्रसंगी त्यांनी, विशेषतः गयानाथने चाखली आहे.

आजवर या लोकांना एकत्र आणण्याच्या बाबतीत गयानाथला संशयच होता. एवढंच काय, काँग्रेसशिवाय मत द्यायला कुणी नसलं तरी या माणसांना एकत्रित करून गडबड करण्याच्या बाबतीत गयानाथला काँग्रेसवरही विश्वास नव्हता, मग इतर पक्षांचं तर सोडूनच द्या. 'पद्मा', 'आय. आर.' प्रकारची बियाणी वापरून शेती करणं जसं एखादा शेतकरी शिकून घेतो, त्याचप्रमाणे या माणसांना एकत्रित करून आंदोलन करणं आता गयानाथ शिकला आहे. गयानाथ यासाठी सरकारकडे धडे घ्यायला गेला नव्हता. ही नव्या प्रकारची बियाणी वापरून शेती करायला वेळ कमी लागतो, पीक अधिक येतं हे जेव्हा त्याने स्वतःच्या डोळ्यांनी पाहिलं, तेव्हा ती बियाणी वापरूनच तो शेती करू लागला. माणसांच्या सहकार्याशिवाय आता उपाय नाही हे लक्षाता आल्यावर तो उत्तरखंड पार्टीत सामील झालाय् आणि 'तिस्ता बंधारा - बंद करा, बंद करा!' सुरू केलंय्.

पण हे सुरू केलं, तरी मोर्चा-मीटिंग वगैरेंचे नियम वगैरे त्याला ठाऊक नव्हते. उत्तरखंड पक्षाचे वजनदार नेते त्याच्या या घरात बसूनच मीटिंगमध्ये त्याला सांगून गेले, की प्रत्येक वाडीवर, प्रत्येक बाजारात, बाजाराच्या दिवशी मोर्चा काढायला हवा, त्यांची तशी लिस्टसुद्धा तयार करण्यात आली. आजकाल इथं-तिथं बाजार भरतात. कुठल्या बाजारात मोर्चा काढायला हवा, कुठल्या बाजारात नको हे ठरवण्यातच खूप वेळ गेला.

गोचिमारीचा बाजार जुना आहे, कुमारपाडाचा बाजार नवीन असूनही मोठा आहे. शेवटी असं ठरलं, की वीस बाजारांमध्ये मोर्चे काढायला हवेत.

'मोर्चे तर काढायचे, भाषणं ठेवायची का?' या गयानाथच्या प्रश्नावर चर्चा करून त्या बड्या नेत्यांनी ठरवलं, की सात बाजारांमध्ये त्यांच्यापैकी कुणीतरी येऊन 'वक्तव्य देईल.' 'मग बाकीच्या तेरा बाजारांमध्ये काय बैलांकडून "हाम्बा" करवून घ्यायचं का?' गयानाथच्या या तिखट प्रश्नावर पुन्हा एकदा चर्चा झाल्यावर ठरण्यात आलं, की त्यासाठी याच भागातल्या दोनेकजणांना घ्यायला हवं. यावर गयानाथचं म्हणणं होतं-हे सगळं फेका तिस्तेत! एखादा मास्तरमाणूस द्या सायकलवाला! तो माणूस बाजारांमध्ये मोर्चे काढील, लेक्चर देईल. मी तुम्हाला माणसं देतो, पण मी त्यांचे मोर्चे काढू शकत नाही. माझी माणसं घेऊन मोर्चे काढावे लागतील, ते तुम्हाला!'

गयानाथच्या घरी झालेल्या या मीटिंगला सुस्थिर हजर होता. शेवटी त्याच्या सांगण्यावरून असं ठरलं, की तिलक रायबर्मन काही दिवस गयानाथच्या घरी राहून बाजारांमध्ये मोर्चे काढील, त्यानंतर सुस्थिर स्वतःच येऊन राहील, त्याचबरोबर आणखी दोनेकजण येऊ शकतील-शेवटी बंधाऱ्याच्या उद्घाटनाच्या दिवशी विरोध-मोर्चा झाल्यानंतर सुस्थिर परत जाईल-त्याआधी नाही.

तिस्ता-बंधाऱ्याविरुद्धच्या मोर्चासाठी मुख्यतः गयानाथच्या भागातल्याच लोकांना एकत्रित करावं लागणार, हे सुस्थिरच्या आणि त्याच्या गटातल्या लोकांच्या लक्षात आलं.

हे सगळं ठरल्यानंतर मग तिलक रायबर्मन याच्या नेतृत्वाखाली सगळ्या बाजारामध्ये गयानाथच्या माणसांचं मोर्चे काढणं सुरू झालं.

आणि गयानाथची 'माणसं' म्हणजे सर्वात आधी बाघारू. नेवडावस्तीतल्या बाजाराच्या दिवशी दुपारी एकच्या सुमारास तिलक आपली सायकल आणि बाघारू आपला झेंडा घेऊन गयानाथच्या घरून निघतात. गयानाथने सांगितल्याप्रमाणे बाघारू तिलकला एकेका वाडीमधून असं फिरवीत घेऊन जातो. प्रत्येक वाडीच्या मध्यभागी, बाघारू एका बांबूला (किंवा त्याला वेत म्हटलं तरी चालेल) बांधलेला आपला झेंडा घेऊन उभा रहातो आणि तिलक सायकल एका ठिकाणी टेकवून ठेवून एका-एका घरासमोर जाऊन हळी देतो. नवीन आवाजातलं हे हाका मारणं ऐकून सगळे बाहेरही येतात. त्यानंतर तिलक त्यांना जणू आदेश दिल्याप्रमाणे सांगतो, की बाजारात जाऊन त्या सर्वांनी, बाघारूने हाती धरलेल्या झेंड्याजवळ जमा व्हावं. त्यानंतर बाजारात मोर्चा निघेल.

तिलकला जवळजवळ कुणीच ओळखीत नाही, पण बाघारूला तर सगळेच ओळखतात. त्यामुळे गयानाथचा आदेश समजण्यात कुणालाही कुठली अडचण येत नाही. लहान मुलं तर 'चालणार नाही! चालणार नाही!' अशा घोषणा सुरूच करतात. पण बाजारात बाघारूच्या झेंड्याजवळ कुणीच जमा होत नाही. बाजारात फिरून लोकांना

हाका मारमारून आणावं म्हटलं, तर तिलकही कुणाला ओळखीत नाही. त्यामुळे काही वेळ वाट पाहिल्यानंतर तिलकला आपल्या सायकलीसहीत बाघारूबरोबर चालत-चालत बाजारात फिरावं लागतं.

बाघारूच्या खांद्यावर झेंडा असल्याने त्याला पुढे रहावं लागतं. त्याच्या मागे, सायकल ढकलीत-ढकलीत तिलक. तिलक घोषणा देतो-'तिस्ता बंधारा सुरू करणं-' पण बाघारू ती घोषणा पुरी करीत नाही. पहिल्यांदा बाघारूला दोन तीनदा घोषणेला प्रतिसाद कसा द्यायचा हे सांगूनही बाघारू प्रतिसाद देत नसल्याने तिलकच संपूर्ण घोषणा देत रहातो-'तिस्ता बंधारा सुरु करणं-चालणार नाही, चालणार नाही!' तिस्ता बंधारा उद्‌घाटनाच्या वेळी विरोध मोर्चात-सामील व्हा, सामील व्हा!' अशा प्रकारे झेंड्यांसह एका माणसाचा मोर्चा निघाला, तरी बाजारात लोक त्याच्याबरोबर जमा होत जातात, त्याचप्रमाणे तिलक-बाघारू या दोघांच्या मोर्चाबरोबरही जमा होतात. संध्याकाळच्या सुमारास बाघारू आणि तिलक या दोघांचा मोर्चा एकटा-एकटा गयानाथच्या घरी परततो. दुपारी एकच्या सुमाराला बाघारूच्या हातात जो झेंडा ताठपणे फडफड फडकत असतो, तो संध्याकाळनंतर एखाद्या केळीच्या पानाप्रमाणे लुळा पडतो. पण बांधा-बांधावरून खूप दूरपर्यंत दिसतं-तो झेंडा आणखीच दूर चालला आहे. गोलाबाडीचा उतार उतरून वरच्या बाजूला ते गेल्यानंतर तिलकच्या सायकलचे स्पोक्ससुद्धा छायांप्रमाणे दिसतात, बाघारूचं संपूर्ण शरीर जणू आकाशावर कोरल्याप्रमाणे वाटतं.

अशा प्रकारे दोन-चार बाजारातून परत येताना तिलक आणि बाघारू यांच्यामधे काही संवाद होतात. या सगळ्या गप्पा एखाद्या विशिष्ट संध्याकाळी झाल्या, असं नाही. या दोन-तीन संध्याकाळी वेगवेगळ्या अशा या गप्पा होतात. पण अशा प्रकारे वेगवेगळ्या ठिकाणी या गप्पा नोंदवण्याची संधी या वृत्तांतात नाही. त्यांच्यामधून-या कथोपकथनातून-काही नवीन अर्थ निघणार नाही अशी आशा आहे. हे कथोपकथन बाद केलं असतं तरी चाललं असतं, पण तसं केलं असतं, तर या दोन-चार बाजारांच्या अनुभवानंतर गयानाथने क्रान्तिहाटामध्ये काय केलं ते समजलं नसतं.

## एकशे सत्त्याऐंशी

# बाघारूचा तिसरा संवाद

'तुमची माणसं येत का नाहीत हो?' तिलक विचारतो.

'आमची कुणीही माणसं नाहीत,' बाघारू उत्तरतो.

या प्रश्नोत्तरांमध्ये कुठलाही नाटकीपण नाही. बांधबांधावरूनच त्यांचा जावं लागतं.

अशा रस्त्यावरून एकदा जो पुढे जातो, त्याला पुढेच जावं लागतं. बाघारूच्या हाती झेंडा असल्याने बहुधा बऱ्याच वेळा बाघारूला पुढेच असावं लागतं. त्याशिवाय, तिलक काही या भागातला माणूस नाही, त्यामुळे कोणत्या वाटेने गेल्यास लवकर पोचता येईल हे बाघारूलाच चांगलं ठाऊक आहे. त्यांच्यामध्ये बोलणं होतं, ते सारं प्रश्नोत्तरांच्याच स्वरूपात होतं, असंही नाही. एकजणाच्या बोलण्यावर प्रतिक्रिया म्हणून दुसरा बहुधा गप्पच रहातो. आपापसात गप्पा करताना ते काही चर्चा करतात, असंही नाही. अनेकदा या गप्पा परस्पर-निरपेक्ष आणि स्वतंत्र असतात.

'इथली माणसं गयानाथबाबूंचं सांगणं ऐकत नाहीत?'

'माझी कुणीही माणसं नाहीत.'

'गयानाथबाबूंची तरी माणसं आहेत ना? एवढे मोठे जोतदार!'

'आहेत, गयानाथची माणसं आहेत.'

'तुम्ही तर गयानाथचा माणूस आहात.'

'हो. मी गयानाथचा माणूस आहे.'

'तुम्ही एकटे-एकटेच झेंडा घेऊन वाडीतून बाहेर पडता, आणि बाजार संपल्यावर एकटे-एकटेच परतता. तुमची आणखी कुणी माणसं नाहीत?'

'माझी आणखी कुणीही माणसं नाहीत. माझा फक्त एकटा मीच आहे.'

'तुम्ही उत्तरखंड जॉईन केला की काय?

'माझं कुठलंही खण्ड नाही, मी कशालाही जॉईन नाही.'

'नाही नाही; मी म्हणतोय, तुमच्या जोतदारांनी उत्तरखंड पार्टी जॉईन केलीय ना?'

'ठाऊक नाही.'

'ठाऊक नाही, तर मग असा खांद्यावर झेंडा घेऊन बाजारा-बाजारांतून एकटे-तिकटे फिरता कशासाठी?'

'गयानाथ म्हणाले मला, म्हणून फिरतोय्. झेंडा तर मला आधीच दिलाय गयानाथनी.'

'आधीच झेंडा दिला? कुठं?'

'साला त्या जल्पेश मोहिमेत-'

'तुम्ही जल्पेशात गेला होता होय? म्हणजे तर साला तुम्ही पक्के उत्तरखंड पार्टीवाले.!'

'नाही हो. माझं खंडबिंड काहीही नाही, माझी पार्टीबिर्टीही नाही!'

'नाही तर मग धरलात कशाला झेंडा जल्पेशात?'

'गयानाथनी दिला.'

'अरे, गयानाथनी दिला, पण धरला आपणच ना! झेंडा तर आपला!'

'नाही. माझा झेंडा नाही.'

'जाऊ द्या झेंड्याची गोष्ट. सांगा बरं, माणसं कशाला एकत्र करायची? मोर्चा काढायचाय. तिस्ता बंधाऱ्याचं उद्घाटन होणार, त्या दिवशी मोर्चा न्यायचाय.'

'गयानाथनी सांगितलं. मोर्चा काढायचाय हे गयानाथनी सांगितलं.'

'म्हणजे गयानाथ तुमच्याशिवाय कुणालाच सांगत नाहीत?'

'ठाऊक नाही.'

'गयानाथनी सांगितलं तर सगळेजण बाजारात मोर्चा काढतील?'

'काढतील.'

'गयानाथनी सांगितलं तर सगळी माणसं मोर्चा काढतील- तिस्ता बंधाऱ्याच्या दिवशी?'

'काढतील.'

'याच्यानंतर आता कुठला बाजार मोठा बाजार आहे?'

'क्रान्तीचा बाजार. क्रान्तिहाट.'

'त्या बाजारात यायला सांगू गयानाथना?'

'सांगा.'

'गयानाथ तिस्ता बॅरेजच्या दिवशी मोर्च्यात असले, तर माणसं येतील?'

'येतीलही बाबा!'

'तर मग सांगतो गयानाथना. पण तुम्ही उत्तरखंड पार्टी जॉईन नाही केलीत?'

'मी जॉईन नाही.'

'अरे तुम्हीसुद्धा एक वेगळे गृहस्थ आहात, माणूस आहात. राजवंशी माणूस!'

'मी राजवंशी नाही.'

'हत् मूर्खा! इथं काही जितकी माणसं आहेत, इथलेच आदिवासी आहोत-'

'मी इथला नाही.'

'हत् वेड्या! तू इथला नाहीस तर काय मग युरोपातला आहेस का रे?'

'नाही, मी युरोपातला नाही!'

'युरोपातला नाहीस म्हणजे इथलाच ना? आणि इथला म्हणजे राजवंशी- हो की नाही?

'मी राजवंशी नाही.'

'हत् गाढवा! राजवंशी नाहीस तर काय तू भाटिया आहेस का रे?'

'नाही. मी भाटिया नाही.'

'हत् मूर्खा! तुला काहीतरी एक असायलाच हवं- एकतर राजवंशी, नाहीतर भाटिया.'

'नाही. मी राजवंशी नाही. मी भाटिया नाही.'

'आहेस, आहेस. तू एकटाच वेगळा कसा काय? राजवंशी नाहीस, भाटिया नाहीस-अन् मग धाडकन उत्तरखण्ड पार्टीचा झेंडा घेऊन जल्पेशला जातोस! झेंडा घेऊन बाजारा-बाजारांतून फिरतोस! तू उत्तरखंड पार्टीचाच आहेस हे तर इथं सगळ्यांनाच ठाऊक आहे!'

'नाही. माझी कुठलीही पार्टी नाही. माझी कुणीही माणसं नाहीत.'

'आहेऽत. तू फसवतोयस्. तुझा हा झेंडा आहे की!'

'नाही! माझा एकही झेंडा नाही.'

'आहे! झेंड्याचा तू आहेस.'

हा संवाद नक्कीच आणखी पुढे चालू राहू शकेल-पण, एवढ्यावरूनच तर तिलक आणि बाघारूचं नाना बाजारांतून फिरणं समजू शकतं. त्यापेक्षाही अधिक म्हणजे गेल्या दहा-बारा वर्षांमध्ये फक्त तिसऱ्यांदाच बाघारूला नाईलाजाने स्वतःच्या परिचयाच्या संदर्भात संवादात भाग घ्यावा लागला. दहा-बारा वर्षांपूर्वी एका एम.एल.ए.ला नदी पार करवताना बाघारूने स्वच्छेने एक प्रदीर्घ असा आत्मपरिचय दिला होता. तेव्हा त्याची एक छोटीशी मागणीसुद्धा होती, की एम.एल.ए. त्यासंदर्भात काही करू शकला नाही. आणि बाघारूचं नांव पुन्हा पुन्हा बदललंय. तिस्तेच्या एका पुराच्या वेळी चार-चार झाडं घेऊन बाघारू जेव्हा रंधामालीच्या बांधावर पोचला, तेव्हा त्याला एका ऑफिसरच्या प्रश्नांना उत्तरं द्यावी लागली. तिथल्या ऑफिसरला फक्त त्याचं नांव आणि गाव यांची माहिती हवी होती. पण बाघारूला तेवढी माहितीही देता आली नाही. आता इथं उत्तरखण्ड पार्टीच्या वेळी उत्तरखण्डाच्या नेत्यांबरोबर त्याला या प्रकारच्या संवादांमध्ये भाग घ्यावा लागला. आता बाघारू जणू आपल्या स्वतःच्या बाबतीत आणखी काही बोलू शकत नाही. आता फक्त आपण कोण-कोण नाही, आपलं काय-काय नाही एवढंच तो सांगू शकतो. दहा-बारा वर्षांमध्ये फक्त तीनच संवाद- तेही संक्षिप्त. दहा-बारा वर्षांमध्ये फक्त तीन-तीनच संवाद तेही नेतिवाचक. बाघारू आपल्या आयुष्यात टप्प्याटप्प्याने स्वतःशीच अनोळखी होत गेलाय की काय?

## एकशे अठ्ठ्याऐंशी

# पुन्हा क्रान्तिहाट, पुन्हा गयानाथ

क्रान्तिहाटमध्ये गयानाथ स्वतः हजर होता. तो येण्यापूर्वीच हातात झेंडा घेऊन बाघारूला बाजारातल्या लिंबाच्या झाडाखाली उभं रहावं लागलं होतं. नंतर, तिलकही तिथे येऊन उभा रहातो. बाजार खूप वेळ आधीपासून सुरू होतो- बाघारू उभाच रहातो,

तिलकही लिंबाचं झाड बाजाराच्या एका बाजूला आहे- हाट-कमिटीच्या खोलीच्या जवळ असलेल्या मैदानाच्या आणि बाजाराच्या सीमेवर- जिथं हांडिया दारूची विक्री होते, तिथं बाघारूकडं पहात, बाजारासाठी आलेले लोक बाजारात निघून जातात. एवढंच काय, तिलकही किराणा दुकानाजवळ आपली सायकल उभी करून, तिला कुलूप लावून बाघारूपासून खूप दूर, एका मिठाईच्या दुकानाजवळ उभा रहातो. या बाजाराचा, या बाजारातील लोकांचा बाघारूशी जणू काहीच संबंध नाही. लिंबाच्या झाडाखाली बाघारू आणखी एका झाडाप्रमाणेच उभा रहातो. त्याचा झेंडा नारळाच्या झाडाच्या फांदीप्रमाणे वाऱ्याने हलत रहातो.

गयानाथ त्या मिठाईच्या दुकानासमोरच्या रस्त्यावरून तणतणत येऊन बाघारूला विचारतो, 'मोर्चासाठी माणसं आलीत का?'

बाघारू थंडपणे उत्तरतो, 'कुणीच येत नाही.'

'कुणीच आलं नाही? बैलोबा सारे! तुझा तो उत्तरखंडाचा नेता कुठंय?'

गयानाथला पाहून तोवर तिलक त्याच्यासमोर आलाय. त्याला पाहून गयानाथ चित्कारतो, 'इथं काय नुस्तं उभं रहायला आलात? मोर्चा कोण काढणार? मी? आणि तुम्ही लीडर होणार काय?'

तिलक म्हणतो, 'मी तर इथं कुणालाही ओळखीत नाही. कुणीही येत नाहीय.'

'येत नाहीय? बैलोबा सगळे!' गयानाथ आल्यांने आणि त्याने आरडाओरडा सुरू केल्याने बाजारात गर्दी जमते. त्या गर्दीकडे पाहून गयानाथ ओरडून एकाला बोलावतो - 'ए कानकाटू, जा बरं, बाजारात जेवढे लोक आलेत त्या सगळ्यांना बोलावून आण! बैलोबा साले सगळे!'

कानकाटू बाजाराच्या दिशेने पळतो. खरं तर बाजारात गयानाथचे जेवढे लोक आले आहेत, त्या सर्वांना बोलावून आण असं गयानाथला सांगायचं होतं. पण मागून एकजण आपलं तोंड लपवून ओरडतो, 'बाजार सोडून सगळे या रे! फटफटी जोतदाराचा मोर्चा निघायचाय!'

'साल्या, तुझ्या बापाच्या मौतीचा मोर्चा निघायचाय!' गयानाथ गर्दीच्या दिशेने ओरडतो.

तिलक बाघारूचा हात धरून आणून त्याला एका ठिकाणी उभं करतो, आणि गर्दिकडे पाहून म्हणतो, 'रांग लावा, रांग लावा, मोर्चा काढायचाय!'

तिलकने एक गफलत गेली होती. त्याला वाटलं होतं, या गर्दीतले सगळेजण मोर्चात सामील होणार. पण गर्दी झाली हाती ती गयानाथच्या आरडाओरड्यामुळे, गयानाथला पहाण्यासाठी. त्याशिवाय क्रान्तिहाटमध्ये उत्तरखंडाचा मोर्चा निघणार- यात थोडी उत्सुकता - उत्तेजनाही होती. त्या गर्दीतले दोनेकजण बाघारूमागे येऊन उभे रहातात खरे,

पण बाकीचे बहुतेकजण हळूच पसार होतात. त्याशिवाय, जे तिथे होते त्यांना जेव्हा तिलक 'या, या; मोर्चात सामील व्हा!' असं म्हणून बोलावतो, तेव्हा त्यांच्यापैकी एकजण थंड आवाजात सांगतो,'आम्ही उत्तरखंडाचे नाही. आम्ही डाव्या आघाडीचे. वाम फ्रन्ट.'

गयानाथ गर्दीकडे पाहून ओरडतो, 'साल्यांनो, फन्ट? डाव्या आघाडीचे तर मग इथं कशाला आलात? वाम साले!'

आपण वाम-फ्रन्टचे म्हणून ज्याने स्वतःचा परिचय दिलेला असतो, तो पूर्वीच्याच थंड आवाजात म्हणतो, 'उगाच अद्वतद्वा बोलू नका देउनिया-'त्याच्या या प्रतिवादात दृढता होती खरी, पण थोडी द्विधा अवस्थाही होती- गयानाथ जोतदाराला तोंडावर काहीतरी अपमानकारक बोलण्याची द्विधा अवस्था.

दरम्यान बाजारातून काही लोक गयानाथच्या दिशेने यायला सुरुवात करतात. त्यांच्यापैकी जवळजवळ प्रत्येकाकडे बाजारासाठी आणलेली पिशवी किंवा झोळी आहे. ते येतात खरे, पण बाघारूमागे रांग करून उभे रहात नाहीत. इकडे-तिकडे विखरून उभे रहातात. काही काही जमिनीवर बसतात. गयानाथ डावीकडून उजवीकडे नजर फिरवीत त्या सगळ्यांना म्हणतो, 'साल्यांनो, इथं काय आपल्या बापाचं लगीन बघायला आलात का रे बैलांनो? चला, मोर्चा तयार करा! चला!' गयानाथ थोडा पुढे जातो, पण लोक विखुरलेले असल्याने कुठून मोर्चा सुरू करावा हे ठरवू शकत नाही.

गयानाथच्या या ओरडण्यामुळे, जे बसलेले होते ते फक्त उठून उभे रहातात, आणि जे आधीपासूनच उभे होते ते मान वळवून बाघारूच्या बाजूला गेल्यासारखं करतात.

गयानाथ आता तिलकला म्हणतो, 'इथं नुस्तं उभं काय राहिलायस? सगळ्यांना उभं कर नीट रांगेत. मोर्चा काढायचाय.'

तिलक थोडासा अवघडतो. थोड्याशा संकोचानेच तो बाजूला उभ्या असलेल्या एका माणसाकडे जातो आणि म्हणतो, 'उभे रहा तिकडे, रांग लावा.' तो माणूस तिलकच्या सांगण्याप्रमाणे रांगेत उभा राहिल्यावर आणखी काहीजण त्याच्याजवळ व मागे रांगेत उभे रहातात.

'ए भादुवा, ए कातुरा, तिकडं काय चाललंय रे? बापाच्या इस्टेटीचा लिलाव करताय काय? चला, इकडं या!' भादुवा आणि कातुरा मनाविरुद्ध आल्यासारखे येतात आणि रांगेत उभे रहातात. काहीतरी विकण्यासाठी म्हणून ते बाजारात आले होते.

गयानाथ हुकूम देतो, 'चला, मोर्चा सुरू करा. आणि आपले जेवढे लोक बाजारात आहेत, त्या सर्वांनी मोर्चात सामील व्हावं!'

तिलक खूप जोरात घोषणा देतो, 'उत्तरखंड पार्टी-' पण त्याला कुणीच प्रतिसाद देत नाही. गयानाथ आरडत-ओरडत रांग करून उभ्या राहिलेल्या लोकांमध्ये घुसतो- 'साल्यांनो, वाम फ्रन्टच्या नांवाने तर जिंदाबाद करता, अन् इथं मुक्यासारखे काय उभे

राहिलात?' गयानाथचं हे संपूर्ण वाक्यच जणू घोषणेचा पूर्वार्ध वाटावं, अशा पद्धतीने जमलेले लोक क्षीण अशा कोरसमध्ये म्हणतात. 'झिन्दाबाद!'

तिलक पुन्हा ओरडतो, 'उत्तरखंड पार्टी-' पण इथं जमलेल्या मोर्चातील लोकांपैकी मागच्या बाजूने एकजण तिलकपेक्षाही मोठ्या आवाजात घोषणा देतो- 'डावी आघाडी झिन्दाबाद! वाम फ्रन्ट झिंदाबाद!' त्या 'झिंदाबाद' मध्ये आणखी तीन-चार जणांचे आवाज मिसळतात.

गयानाथ तिलकला म्हणतो, 'मोर्चा बाजारामध्ये घेऊन चल. एऽ बाघारू, इकडून, इकडून!'

'डावी आघाडी झिंदाबाद!' या घोषणेनंतर मोर्चा ताबडतोब चालू लाग याणे मोर्चाच्या मागील बाजूने कुणीतरी नेतृत्वाच्या आत्मविश्वासाने आवाहन करतं, 'एऽ! सगळ्यांनी डाव्या आघाडीचा मोर्चा काढा. उत्तरखंड पार्टीचा मोर्चा चालणार नाही - चालणार नाही!' या आव्हानाबरोबर या गर्दीमधले अनेकजण मिठाईचं दुकान आणि किराण्याचं दुकान यांच्यामधून जाणाऱ्या बाजारातल्या पक्क्या रस्त्याच्या दिशेने पळत जातात.

गयानाथ मोर्चापासून जरा दूर राहून, मोर्च्याच्या मागून बाजारात प्रवेश करतो. मोर्च्यात आणखी काही लोक सामील झाल्यावर तो एखाद्या दुकानात बसेल. पण बाजारात प्रवेश केल्यावर मोर्चाचा आवाज जणू ऐकूच येत नाही- केवळ बाघारूच्या हातातल्या उंच झेंड्यावरूनच, हा काहीतरी मोर्चा असावा असं वाटतं. 'उत्तरखंड पार्टी झिंदाबाद!' 'तिस्ता बॅरेज बंद करो!' 'बॅरेजविरोधी मोर्चात सामील व्हा!' - आधी ठरवलेल्या या सगळ्या घोषणा मोर्च्यामधून जणू अर्थहीन होऊन गळून पडतात.

## एकशे एकोणनव्वद

# तोच क्रान्तिहाट, तोच राधावल्लभ

इकडं सगळ्या बाजारात खबर पसरते की उत्तरखंडाने मोर्चा काढला, आता डावी आघाडी मोर्चा काढणार. त्यामुळे बाजाराच्या गलबल्यातही काही-काही ठिकाणी पळापळ सुरू होते. पण उत्तरखंडचा मोर्चा कुठंय हे कुणालाच समजत नाही. या अनिश्चिततेच बाजाराच्या एका कोपऱ्यामधून हृषिकेश ओरडतो - 'तिस्ता बॅरेज झिंदाबाद - झिंदाबाद!' - आणि पहाता-पहाता आसपासच्या ठिकाणांहून अनेकजण पळत येऊन हृषिकेशमागे उभे रहातात आणि चालायला सुरुवात करतात. एका छोट्या लाठीवर एक लाल झेंडासुद्धा कुठूनतरी पैदा केला जातो. राधावल्लभ आणि आलबिश भगत रस्त्याकडेच्या एका पान सिगारेटच्या दुकानाच्या बेंचवर बसलेल होते. एकजण पळत येऊन त्यांना म्हणतो, 'मोर्चा,

मोर्चा, उत्तरखंडाचा मोर्चा काढायचाय! चटकन उठून उभे रहात राधावल्लभ आणि आलबिश आसपास पहातात. डाव्या आघाडीचा आणखी एक छोटा मोर्चा सुधन साहाने काढलाय. राधावल्लभ आणि आलबिश जवळजवळ पळतच त्या मोर्चासमोर जातात. मोर्चासमोर गेल्याबरोबर राधावल्लभ आपली छत्री डाव्या बगलेत ठेवतो, डावा हात कोपरात वळवून, बोटं डोक्याच्या वर मागच्या बाजूला घेऊन मोठ्या आवाजात म्हणतो, 'बन्धुगण!' सुधन साहा त्याला ओढून मोर्च्यामध्ये घेत म्हणतो, 'बन्धुगण' नंतर, आता मोर्चा काढा, मोर्चा!' राधावल्लभ आपली मूठ वर करीत घोषणा देतो - 'क्रान्तिहाटात उत्तरखंड-चालणार नाही!' क्षणार्धात सगळेजण ही घोषणा उचलतात - जणू मोर्चाला या वेळी हीच घोषणा द्यायची इच्छा होती. राधावल्लभ दुसरी घोषणा देतो-'गयानाथ जोतदाराच्या वाम-फ्रन्टविरोधी कारवाया-बंद करा, बंद करा!'

दरम्यान, बाजारातल्या आणखी काही ठिकाणांहून चहाच्या मळ्यातील मजूर, फूलबाडी वस्तीचे रहिवासी असे सगळे वाम-फ्रन्टच्या (डाव्या आघाडीच्या) मोर्च्यात सामील होतात. या मोर्च्याची क्षिप्रता, शिस्त आणि घोषणा राजनैतिक दृष्टीने इतक्या ठराविक होत्या की, एवढ्या मोठ्या क्रान्तिहाटात फक्त डाव्या आघाडीचाच मोर्चा निघालाय्, असं वाटतं.

उत्तरखंड मोर्चा शोधूनही सापडत नाही. एरवीही गयानाथने आरडाओरडा केल्याने जे लोक उत्तरखंड मोर्चासाठी जमले होते, ते सगळे डाव्या आघाडीच्या या प्रचंड मोर्चाची भीती वाटून पसार होऊन जातात. गयानाथ जर त्यांच्याबरोबर राहिला असता, तर भीती वाटूनही ते लोक पसार झाले नसते. पण गयानाथ त्यांच्या थोडं मागे होता-त्याच्या दृष्टीने त्याने मोर्च्यात चालणं शक्य नव्हतं. पण त्याने याला-त्याला बोलावून मोर्चात पाठवलं होतं, आणि ते लोक जाऊन मोर्चात उभेही राहिले होते. एवढ्यात डाव्या आघाडीचा एवढा मोठा मोर्चा बाजारात येईल अशी गयानाथ, तिलक आणि त्यांच्या लोकांना अपेक्षाही नव्हती. कारण, ते सगळे उत्तरखंडचा मोर्चा तयार करण्यातच गुंतलेले होते-घोषणा काय द्यायच्या ते कुणालाच ठाऊक नव्हतं, लोक धड शिस्तीत चालूही शकत नव्हते, फक्त बाघारूच्या खांद्यावरचा झेंडा पाहून ते त्या जमावाला मोर्चा म्हणत होते, एवढंच. पण त्या वेताला बांधलेल्या त्रिकोणी झेंड्यानेही काही कमी गोंधळ केला नाही. बाजारातल्या दुकानांच्या छतावरचं प्लॅस्टिक किंवा चटई दोऱ्यांनी इकडे तिकडे बांधलेल्या होत्या. त्यांच्याखालून डोक्यावर गाठोडी-पिशव्या घेतलेली माणसं फारतर जाऊ शकत होती, पण एवढा उंच झेंडा घेतलेला बाघारू जाणं शक्य नव्हतं. बाजारातल्या मोर्चासाठी झेंडा हा उंचीने कमी असायला हवा होता. आणि, बाघारूच्या खांद्यावरचा हा झेंडा अधून मधून जमिनीला समांतर होऊन एका-एका अडथळा पार जात होता-त्यात अगदी दोन-दोन पावलांवर असे अडथळे होते. या सगळ्या गोष्टींमुळे उत्तरखंडाचा मोर्चा किंवा गयानाथचा मोर्चा सुरू झाला कधी आणि विखुरला कधी ते लक्षातही आलं नाही. डाव्या आघाडीचा

मोर्चा जेव्हा गोहाटापासून हांडियापर्यंत लांबीचा झाला, आणि आत्मविश्वासाने पुढे जाऊ लागला, तेव्हा बाघारू आधी जसा त्या लिंबाच्या झाडाखाली उभा होता, तसा आता तो तामाकहाटी आणि गमछाहाटीच्या मधल्या वळणावर एकटाच झेंडा घेऊन उभा होता. इथे झेंडा अर्थात् उभाच होता. बाघारूपासून थोड्या अंतरावर तिलक उभा होता. आणखी थोड्या अंतरावर गयानाथ - तिघांच्याही उभे राहण्याच्या जागा अद्‌भूतच होत्या, हे सोडलं तर त्या तीनजणांच्या उभे राहण्यामध्ये कुठलाही संबंध, ताळमेळ नाही. डाव्या आघाडीच्या मोर्चातले लोक वेगाने जात-जात उत्तरखंडाच्या झेंड्याकडे पहातात-कमरेला लंगोटी लावलेला एक माणूस उत्तरखंडाचा झेंडा घेऊन उभा आहे.-जणू एखाद्या वडाच्या उंच फांदीवर कुणी नवसासाठीचा झेंडा बांधलाय्. दोनेकजण बाघारूला धक्का देत नाहीत असं नाही, पण बाघारू दिसतात इतका अवांतर होता, की त्या धक्क्यांमध्येही काही जोर नव्हता. त्यापेक्षा गयानाथ जोतदारला पाहून, त्याच्या दिशेने मोर्चा नेणं मोर्चेवाल्यांना अधिक चांगलं वाटतं. तरीही गयानाथ आपला उभा तो उभाच रहातो.

## एकशे नव्वद

# बाघारूची मोर्चातून मुक्ती आणि मोर्चापर्वाचा शेवटचा अध्याय

तिस्ता बंधाऱ्याच्या उद्‌घाटनाच्या दिवशी बंधाऱ्याविरोधी मोर्चासाठी उत्तरखंड-पार्टीच्या लोकांनी च्यांगमारी-बंधाऱ्याचा रस्ताच निवडला, कारण, क्रान्तिहाटाचा पक्का रस्ता त्या दिवशी डाव्या आघाडीच्या आणि सरकारच्या ताब्यात होता. गयानाथची जी माणसं होती, ती तर मुख्यत: या रस्त्याच्याच या ना त्या बाजूची होती. यापेक्षा दूर-दूर असलेल्या गयानाथच्या जोतजमिनीतील लोकांशी तर काही गयानाथची रोज भेट होत नव्हती, म्हणूनच ते सारे लोक काही या संदर्भात गयानाथची 'माणसं' नव्हती.

सुस्थिर नाना ठिकाणांहून पोरंसोरं गोळा करून एक सायकलमोर्चा घेऊन येतो. पन्नासेक सायकली, त्यामुळे दिसायला मोर्चा लांबलचक दिसतो, तो मोर्चा च्यांगमारी बाजाराच्या पक्क्या रस्त्यावरून, च्यांगमारी फॉरेस्टजवळून, गोलाबाडी आणि पश्चिम दोलाईगावच्या मधून, नेवडाबस्तीवरून सरळ बंधाऱ्याच्या दिशेने जातो.

आणखी शंभरेक लोकांचा मोर्चा पायी चालत त्याच दिशेने निघतो, पण ते लोक पायी चालत असल्यामुळे पक्क्या रस्त्यावरूनच जाण्याचं बंधन काही त्यांच्यावर नाही. पक्का रस्ता सोडून ते लोक मैदानातून पश्चिम दोलाईगांव पासून, डावीकडे वळून

नेवडाबस्तीत पोचतात. नेवडाबस्तीत सायकल-मोर्चा आणि पायी चालणारांचा मोर्चा काही वेळ एकमेकांबरोबर जातात. पण त्यानंतर सायकल-मोर्चाला सरळच जायला हवं, आणि पायी चालणाऱ्यांचा मोर्चा डावीकडे सरळ तिस्तेच्या दिशेने जुन्या सिदाबाडीपाशी जातो. तिथून, तिस्तेच्या काठाने चालत आपलंचादच्या तोंडाशी पोचतो. तिथे पुन्हा सायकल-मोर्चा आणि पायी चालणारा मोर्चा एकत्र येतात. त्यानंतर ते, मोर्चे एकमेकांबरोबर आपलचांदमधून गाजोलडोबा-तिस्ता बंधाऱ्याच्या दिशेने जातात.

मोर्चाची गोष्ट तर एका शब्दातच संपवता येईल, कारण उत्तरखंडचा मोर्चा असा असेल, असं शेवटपर्यंत कुणालाच वाटलं नव्हतं, त्याशिवाय हा मोर्चा चाललाय्, तोही जवळजवळ लपत-छपतच. सगळा जिल्हा आज उत्तेजित झालाय्. नॅशनल हायवे, लॅटरल रोड, क्रान्ति-फाटा-ओदलावाडीचा रस्ता या मार्गांनी ट्रक भर-भरून माणसं चालली आहेत, आणि ही उत्तरखंडाची माणसं जणू सर्वांत गुप्त रस्त्याने लपत-छपत कशीतरी आपला विरोध दाखवायला चालली आहेत. पण, मोर्चा-पर्वाच्या या शेवटच्या अध्यायात आपल्याला एक गोष्ट ठाऊक असणं आवश्यक आहे-ती म्हणजे, त्या वेळी बाघारू कुठे होता? या मोर्चातही उत्तरखंडाचा तो विराट त्रिकोणी झेंडा उंच बांबूवर फडकत बाघारूच्या खांद्यावरच होता.

फक्त शंभरेक लोकांचा मोर्चा या नेवडाबस्तीच्या बरमतल या ठिकाणी किंवा सिदाबाडीच्या तिस्ताकाठावर खूपच तुच्छ वाटत होता. त्यात हे लोक धड रांगेनेही चाललेले नव्हते. फक्त बाघारू आणि त्याच्या खांद्यावरच्या उंच झेंड्यानेच या विशाल निसर्गदृश्यात या लोकांना एका सूत्रात बांधलं होतं.

आपलचांदमध्ये शिरल्यावर दोन्ही मोर्चे एकत्र येतात. हेसुद्धा आपल्याला जरा मोर्चाप्रमाणे सजवतात. सर्वांत पुढे बाघारू-झेंड्यासह. त्यानंतर पायी चालणारांचा मोर्चा. शेवटी सायकली. सायकलींवरचे अनेकजण खाली उतरून सायकली ढकलीतच चालताहेत.

आपलचांद बाघारूचं. बाघारू आपलचांदचा. त्याच्या पावलांखाली पाचोळा वाजतोय, विस्कळित होतोय्. त्याच्या हातांमुळे इथले, एरवी अवघड वाटणारे अडथळे दूर होतात. या फॉरेस्टमध्येच कुठेतरी त्याचा जन्म झाला होता. या फॉरेस्टमध्येच कुठेतरी वाघाने त्याच्या पाठीवर आणि छातीवर शिक्का उमटवला होता-की तो आपलचंदचा आहे. इतके लोक त्याच्यामागे असतानाही बाघारू आपलचंद जंगलातून जणू एकाकीच चाललाय्. फक्त खांद्यावरच्या त्याच्या मोठ्या झेंड्यामुळे त्याच्या पावलांचा छंद जरा वेगळा झाला आहे.

तिस्तेच्या काठा-काठाने तर बाघारू अनेकदा आलाय्-आता तिस्ता आपल्या काठांपासून खूपच सरकली आहे. वाळू चमकतेय्, पाणी चमकतंय्, आणि वारा

तिस्तेसारखाच संथपणे वहातोय. आपलचंदच्या झाडांमधल्या मोकळ्या जागांमधून काही-काही ठिकाणी तिस्ता दिसत होती, झाडांआड दिसेनाशी होत होती. पण वारा मात्र तिस्तेवरून अव्याहत वहात होता.

ज्याला बाघारूचं जन्मस्थान, किंवा देश, किंवा पृथ्वीच म्हणता येईल, अशा आपलघांद जंगलातून या प्रकारे जात असताना बाघारूच्या नजरेस पडतो तिस्ता बंधारा, बाघारू आपलचांदच्या सगळ्या दृश्यांना सरावला आहे. पण हे दृश्य त्याला नवीनच आहे. या गोष्टीला तो ओळखत नाही. एकदा दिसल्यानंतर ते दृश्यही अधूनमधून झाकलं जात होतं, पण क्रमश: अधिक स्पष्ट होत होतं. त्यानंतर तर तो डोळ्यांसमोर उभं रहातं- तिस्तेमध्ये आडवी उभी केलेली विराट भिंत-जणू एक विराट असा काठच-त्यामध्ये नाना रंगाचे दरवाजे, नाना रंगांच्या निशाणांसारखं काहीतरी उडतंय्.

असं दृश्य बाघारूला थांबवीत नाही. आपलचांदमधलं कुठलंही दृश्य चकित करीत नाही. फक्त ते दृश्य आपलचांदचाच एक भाग म्हणून समजून घेण्यासाठी त्याला थोडा वेळ लागतो. बाघारूकडे शरीराशिवाय तर दुसरं काही नाही. त्या शरीराने तो आपलचांद आणि तिस्ता बंधारा यांना एकत्रित करू इच्छितो. बाघारूच्या दृष्टीने कुठलंच दृश्य आपलचांदमध्ये विलग राहू शकत नाही. तो बंधाऱ्याला आपलचांद जंगलासंगे व स्वत:संगे संलग्न करून घेण्याची इच्छा करतो.

ही प्रक्रिया काही क्षण चालते आणि बाघारू मोर्चाला घेऊन ही नवी भिंत, नाना रंगाचे झेंडे आणि नाना रंगाच्या मंचाच्या दिशेने पुढे चालत रहातो. चालता-चालता रस्ता जवळजवळ संपत येतो. समोर जरी जंगलांतही काही झाडं-झुडुपं शिल्लक असली, तरी तिथून स्पष्ट दिसतो-तिस्ता बंधारा. जरा उजवीकडे पहाडासारखी भिंत. त्याच्यावर जवळजवळ आकाशाला टेकलासा वाटणारा मंच. लाल-निळे कितीतरी रंग. कितीतरी दरवाजे. माणसं मात्र इथून दिसत नाहीत, कारण ही जवळजवळ मागची बाजू आहे. मंचासमोर नक्कीच माणसांचा महासागर पसरलेला आहे. एवढे मोठे दरवाजे आणि मंच पाहिल्यावरच, त्यांच्यासमोर किती लोक असतील हे समजतं.

सुस्थिर मागून ओरडतो, 'इथं थांबा!' त्यानंतर सायकलला दोनदा पॅडल मारून मोर्च्याच्या समोर येत-येत म्हणतो, 'चांगले उभे रहा आणि घोषणांची थोडी प्रॅक्टिस करून घ्या.' सायकल डाव्या हाताने धरून सुस्थिर उजवा उंचावतो आणि घोषणा देतो, 'उत्तरखंड पार्टी, झिंदाबाद!'

सुस्थिर म्हणतो, 'बघताय ना केवढी मोठी सभा होणार आहे ते? आणखी मोठ्या आवाजात म्हणा - 'उत्तरखंड-' तो मंच, निशाणं या साऱ्यांना उत्साहित करतात. सगळेजण खूप मोठ्या आवाजात प्रतिसाद देतात, 'झिंदाबाद!'

'तिस्ता बॅरेज', 'बंद करो, बंद करो!'

'बामफ्रंटेर पौष मास्', 'राजवंशीदेर सर्वनाश!'

'तिस्ता बॅरेजेर जले भासिबे काय,' 'राजवंशी समाज हाय हाय!' (तिस्ता बंधाऱ्याच्या पाण्यात वाहून जाणारा कोण-राजवंशी समाज, हाय हाय!)

'तोमार आमार सर्वनाश' 'तिस्ता बॅरेज निपात जाक्!' (तुमचा आमचा सर्वनाश करणाऱ्या तिस्ता बॅरेजचा नि:पात होवो!)

सगळे ही सारी स्लोगन्स पक्की करीत असताना मंचाच्या बाजूने एक जीप वेगाने त्यांच्याकडे येते. आपल्या स्वत:च्या घोषणांच्या आवाजामुळे त्यांना जीपचा आवाज ऐकू येत नाही. तिस्तेकाठच्या या जंगलमय भागात गाडीचा आवाज तसा ऐकूही येत नाही.

गाडी एकदम बाघारूसमोर येऊन थांबते. सुस्थिर बाघारूमागे थोड्या अंतरावर उभा राहून मोर्च्याकडून घोषणांचा सराव करवून घेत होता. गाडी थांबल्याबरोबर गाडीच्या मागच्या दरवाज्यातून हातात लाठ्या आणि बंदुका घेतलेले काही पोलिस उतरून पुढे येतात आणि ड्रायव्हरशेजारून एक ऑफिसर उतरून ड्रायव्हरला गाडी मागच्या मोकळ्या जागेत थांबावायला सांगतो-बॅरेजकडे निर्देश करून. जीप मागे जाऊन तिस्तेच्या काठावरील वाळवंटात उजवीकडे वळते, वळून पुन्हा थोडी मागे येऊन तिस्ता बंधाऱ्याकडे तोंड करून थांबते, स्टार्ट बंद केला की नाही हे समजत नाही. आणि, तो ऑफ़िसर येऊन बाघारूच्या समोर पण जरा डावीकडे उभा राहून सुस्थिरला म्हणतो, 'मोर्चा इथेच विसर्जित करा, घोषणा देऊ नका.'

असे अचानक पोलिस, लाठ्या, उंचावून नव्हेत, लाठ्या खाली करून, मोर्च्यातल्या लोकांच्या 'आता पळायला हवं,' असं लक्षात यायच्या आत पोलिस मोर्चाच्या दोन्ही बाजूंना उभे राहून, लाठ्या डोक्याच्या वर उचलून मोर्चात उभ्या असलेल्या लोकांवर लाठीमार करू लागतात. क्षमार्धात मोर्चा बारा वाटांनी पळायला लागतो-ज्याला जिकडे वाट मिळेल तिकडे तो पळू लागतो, सायकलवाले सायकली टाकून पळतात. पोलिस फारशी पळापळ करीत नाहीत, पण सगळ्यांना लाठीमाराच्या आवाक्यात आणतात आणि एकेकाला लाठीने मारीत-मारीत जमिनीवर लोळवतात. तो ऑफिसर एका पोलिसाला बोलावतो आणि सुस्थिरकडे निर्देश करतो. पोलिस अगदी चांगला नेम धरून सुस्थिरच्या पाठीच्या मध्यभागी लाठी मारतो. सुस्थिर पालथा पडल्यावर लाठीच्या सहाय्यानेच त्याला उताणा करून, लाठी पुन्हा आपल्या डोक्यावर उचलून सुस्थिरच्या गुडघ्यावर प्रचंड जोराने मारतो, अगदी काही मिनिटांतच जंगलातल्या या जागी, तिस्ता बंधाऱ्याच्या इतक्या जवळ, उद्घाटन-मंचाच्या मागे इतकी माणसं इकडे-तिकडे विखरून पडतात. अगदी काही आरडाओरडासुद्धा होत नाही. एका जीपमध्ये असे कितीसे पोलीस असणार? पण ते उत्तरखंडाच्या स्वतंत्र राज्याची मागणी आपलचांद जंगलाच्या थोड्याशा जागेवर मारून, विखरवून निघून जातात.

बाघारू आधी जिथे उभा होता, तिथेच उभा रहातो. झेंडा त्याच्या खांद्यावर असतो. तो पळू शकत नाही, किंवा पळू शकला नाही, किंवा पळाला नाही, किंवा पोलिसांसमोर त्याच्या शरीराची पळण्याची प्रतिक्रिया झाली नाही. जीप त्याच्या अगदी समोर येऊन थांबली होती. ऑफिसरही त्याच्या समोर, त्याच्या थोड्या डावीकडे उभा होता. पोलिसांनी त्याला सोडून त्याच्या मागच्या मोर्च्यातल्या लोकांनाच धरलं. जाताजाता त्यांनी बाघारूलाही लाठीचा प्रसाद दिला, पण त्याला आपलं प्रमुख लक्ष्य बनवलं नाही. बहुधा बाघारू इतका उंच असल्याने पोलिसांच्या लाठ्या त्याच्या शरीराच्या कुठल्याच अंशाला आपल्या आवाक्यात आणू शकल्या नाहीत. बहुधा आपल्या इतक्या उंच शरीरामुळे बाघारू पोलिसांसमोरही अयोग्य ठरला. मोर्चासाठी गयानाथने बाघारूला एखादा सदरा आणि धोतर दिलं असतं, तरी पोलिसांनी बहुधा त्याला ओळखलं असतं.

पोलिस बाघारूला मारीत नाहीत, किंवा माराचं प्रमुख लक्ष्य करीत नाहीत. बाघारूसुद्धा पोलिसांच्या लाठ्या-बंदुका-गाडी पाहून पळून जात नाही. बहुधा हे आपलचांद जंगल असल्याने तो पळून जात नाही. हा जंगलातील सगळी ठिकाणं, इथली जमीन, इथली झाडं-झुडुपं-या सगळ्या गोष्टी त्याच्या अगदी इतक्या परिचयाच्या आहेत, की आपण या जंगलात कुठेतरी लपू शकतो हेच त्याच्या डोक्यात येत नाही. एखाद्या माणसाला आपल्या घरातच लपण्यासाठी जागा सापडत नाही, इतकं आपलं घर कुठल्याही माणसाच्या परिचयाचं असतं. त्यामुळेच त्याला पोलिस आणि मोर्चा यांच्यामध्ये उभं रहावं लागलं. गयानाथने त्याला झेंडा देऊन उभं केलंय्. झेंड्याच्या मागे मोर्चा. तो मोर्चा असा उधळला गेल्यानंतरही बाघारू उभाच रहातो.

मोर्चा-पर्व इथेच पूर्ण होवो. यानंतरच्या पर्वात पोलिसांच्या मागे-मागे जावं लागणार-पोलिस का आले, कोठून आले. . .

मोर्च्यातले लोक आपापल्या परीने परत गेले आहेत. सायकलवाले सायकली घेऊनच परत गेले आहेत. कुणीही बाघारूला विचारलं नाही. पण ते सारे परत गेल्यावर हे आपलचांदचं जंगल, त्यातली झाडं-झुंडुपं, जमीन, समोरची तिस्ता पुन्हा संपूर्णपणे बाघारूजवळ परत येते. फक्त तिस्तेमधली ती विराट भिंत, भिंतीवरती इतके दरवाजे, झेंडे - या सगळ्या गोष्टी बाघारूच्या या स्वदेशाशी नीट मेळ खात नाहीत.

पण मेळ बसवायला हवा. बाघारूलाच तो मेळ बसवायला हवा. इथे, या आपलचांद जंगलात बाघारूने पाहिलं नाही, तर भव्य असं देवदाराचं झाडही वाढायचं थांबावं. बाघारूच पहाणार नसेल तर वाढण्यात काय लाभ? इथे तिस्तेचा प्रवाहसुद्धा बाघारूने पाहिलं नाही, तर पुढे सरकत नाही. बाघारूने पाहिलं नाही, तर पुढे सरकरण्यात काय लाभ? आणि या आमलचांद जंगलाजवळ तिस्ता नदीमध्ये एकं आणखी पहाडासारखी भिंत उभारून नदीच्या उत्तर आणि दक्षिण भागांना वेगळं करणार-बाघारूला न दाखवताच?

त्या भिंतीवर एवढे दरवाजे, इतके मंच, इतकं मोठं स्टेज होणार तेही बाघारूला न दाखवताच? हे आपलाचांद फॉरेस्ट आणि तिस्ता नदी मिळून झालेल्या त्याच्या स्वदेशात या तिस्ता बंधाऱ्याला समाविष्ट करून घेण्यासाठी बाघारू उद्घाटनाच्या मंचाच्या दिशेने पुढे जातो. दोन पावलं टाकल्याबरोबर त्याच्या लक्षात येतं, की त्याच्या खांद्यावर अजूनही तो झेंडा आहे. तो आपला डावा हात बांबूपासून दूर करतो आणि डाव्या खांद्याला एक झटका देतो. झेंडा मातीत पडतो, बांबूचा पुढचा भाग बाघारूच्या नंतरच्या पावलाखाली येतो. झेंडा तुडवून बाघारू पुढे जातो.

आता बाघारूचे दोन्ही हात मोकळे आहेत, खांदा मोकळा आहे, सारं शरीर हलकं झालं आहे. एक छोटीशी लंगोटी सोडली, तर त्याच्या अंगावर दुसरं काहीही आवरण नाही. इथे, आपलचांदमध्ये, तिस्तेच्या काठी, ज्याप्रकारे चालण्याची त्याला जन्मापासून सवय आहे, सराव आहे, त्याच छंदात त्याचं शरीर डोलू लागतं. डोलत रहातं. वाऱ्यात डोलता-डोलता बाघारू तिस्ता बंधाऱ्याच्या उद्घाटनासाठी बांधलेल्या रंगीबेरंगी स्टेज आणि मंडपाच्या दिशेने जात रहातो-'जरा बघायला पाहिजे-तिथं खरंच एखादी नवीन नदी करण्याचं काम होणार आहे, की मयनागुडीला झाला, तसा कुणा पोरीचा नाचबीच होणार आहे!'



## एकशे एक्याण्णव

# मदारीच्या आईचं स्वतंत्र राष्ट्र

बाजारातून परतल्यावर मदारी म्हणतो, 'आई, उद्या जुलूस निघणार आहे, बाजारात ट्रक येणार. . .'

जुलूस निघणार आणि जुलूस म्हटला की ट्रक येणारच. नाहीतर लोकजुलूसात सामील होण्यासाठी जाणार कसे? त्यामुळे मदारीची आई त्याला आणखी काही विचारीत नाही. मदारीकडेही बोलण्यासारखं आणखी काही नाही.

बाजाराच्या दिवशी त्यांना झोपायला जरा उशीरच झाला. बाजारातून परतणाऱ्या बैलगाड्या खडखड-खडखड करीत रस्त्याने जातात. त्यांच्या रांगेला जणू अंत नाही; आणि चाकांच्या खडखड आवाजालाही. संध्याकाळपासून ही गाड्यांची खडखड सुरू होते, ती कधी थांबते हे कुणी पाहिलंय्?

मदारीच्या आईचं घर आहे फॉरेस्टच्या सीमेवर-रस्त्यावरून पाहिल्यावर ती फॉरेस्टची सीमाच वाटते. नॅशनल हायवेनंतर थोडीशी जमीन आणि त्यानंतर फॉरेस्ट. फॉरेस्ट तर काही नदीसारखं पात्रामधून जात नाही. ते काहीही असलं, तरी इथं थोडी शेतजमीन असल्याने फॉरेस्ट काही अगदीच नॅशनल हायवेवर आलेलं नाही. याच ठिकाणी फॉरेस्ट आणि नॅशनल हायवे यांच्यामध्ये थोडंसं अंतर दिसतं. पण पुढे दोन्ही बाजूंना फॉरेस्टचं जंगल रस्त्याच्या इतकं नजीक आलेलं आहे, की त्या जंगलामधून एखादा वाघ झेप घेईल, किंवा हत्तीची सोंड बाहेर येईल, किंवा कुठल्याही क्षणी गेंडा धावत येईल अशी भीती वाटते. या अवस्थेमध्ये जरा शांत वाटतं ते मदारीच्या आईच्या झोपडीसमोर, या जागीच. असं वाटतं, की फॉरेस्टच्या तावडीतून वाचलो गड्या! पण हा उतार पार करून थोडं चढावर जाऊन काही अंतर पुढे गेल्याबरोबर फॉरेस्ट पुन्हा रस्त्यावर येतं.

या उतारामुळे ही थोडी जागा मोकळी राहिलीय् असं वाटतं. जमिनीचा उतार लक्षात येत नाही, रस्त्याचा उतार लक्षात येतो. अगदी याच ठिकाणी रस्त्याला खूप उतार आहे, आणि त्यानंतर पुन्हा चढ आहे. या ठिकाणचा सगळा उतार रस्त्यावर दिसतो. जमीन-जंगल, साल-खैराचे वृक्ष यांच्यासह सगळी जमीन इथं उताराची आहे. त्याचं एक कारणही आहे. जंगलामधून एक छोटा झरा वहात येतो आणि या ठिकाणी रस्ता पार करतो. वर्षभर झऱ्याचं पात्र दिसतं, फक्त पावसाळ्यातच पाणी असतं किंवा पाणी येतं. त्यामुळे पावसाचं पाणी झऱ्याच्या पात्रातून जंगलामधून वहात येऊन रस्त्यावरून पलिकडे जाईल अशा प्रकारे रस्ता तयार केला आहे. रस्त्यावर कधीही पाणी साचून रहात नाही; पण रस्ता मात्र नेहमीच ओला असतो. फक्त ओलाच नव्हे, संपूर्ण पावसाळाभर रस्त्यावरून झरझर करीत

झऱ्याचा प्रवाह वहात असतो. जंगलामधून थोडं ऊन जमिनीवर पडलं, किंवा ट्रकच्या हेडलाईटचा प्रकाश पडला, की ह्या प्रवाहाच्या छोट्या छोट्या रेखा खूप दूरवर दिसतात. रस्ताही या ठिकाणी रुंद, चांगलाच रुंद आहे - एक ट्रक रस्त्याकडेला उभा असला, तरी दोन ट्रक एकमेकांना 'साईड' देऊ शकतील, एवढा. बरेचदा अनेक ड्रायव्हर्स तसं करतातही. गाडी थांबवतात. गाडीत थोडं पाणी भरतात. स्वत:सुद्धा झऱ्यात उतरून डोळ्यांवर-तोंडावर थोडं पाणी मारतात, आणि मग निघून जातात. गाडी स्टार्ट-बंद करण्याइतपत वेळ नसतो, अगदी थोडावेळ, तोही क्वचित्.

तरीही, पावसाळा म्हटला तरी सहा ते आठ महिने असतो. फक्त हिवाळ्यातल्या चार-पाच महिन्यांतच झऱ्यात पाणी नसतं किंवा रस्ता ओला नसतो. रस्त्याच्या अगदी जवळच, झऱ्याच्या मधून उगवलेल्या एका बाभुळझाडाच्या तळाशी काही दगड रचून मदारीच्या आईने एक वेदी तयार केली आहे. फॉरेस्टची जमीन सोडून झरा ज्या ठिकाणी रस्त्यावर आला आहे, त्याच ठिकाणी झाड उगवलं आहे. साधारणतः अशा ठिकाणी झाडं नसतात, किंवा माती धुपून गेल्यावर अशा सीमेवरच्या ठिकाणी झाड उगवत नाही. कदाचित रस्ता बांधण्याच्या वेळीच हे झाड तिथे असेल, कामगारांनी ते तसंच राहू दिलं असेल. आणखी एक कारण म्हणजे रस्त्याचा हा उतार तयार करण्यासाठी, रस्ता इतका रुंद करण्यासाठी रस्ता तयार करणाऱ्या कामगारांना बरेच दिवस इथं रहावं लागलं असेल. त्यामुळेच समोर एवढी जमीन मोकळी करण्यात आली असेल - कदाचित तिथे या कामगारांना रहाण्यासाठी तंबू उभारले असतील. हे झाडही त्यासाठीच ठेवलं असेल- रात्री त्याच्या फांद्या तोडून पेटवल्या जात असतील- हत्तींचा कळप येऊ नये म्हणून. रस्त्याच्या पलीकडे दोन फांद्या अजूनही रोवलेल्या दिसतात. डांबर गाळण्यासाठी म्हणून. त्या फांद्याच्या मध्ये असलेल्या खड्ड्यात अजूनही अंगारांचे अवशेष दिसतात.

मदारीची आई तेव्हा कुठे होती हे तिचं तिलाच आठवत नाही. पण तिने जेव्हा इथं येऊन फांद्या-पानं वगैरे वापरून झोपडी उभारली आणि तिच्यामध्ये रहाणं सुरू केलं, तेव्हा ती आणि आसपासचे लोक या जागेला बाभुळझरा म्हणून ओळखू लागले - झऱ्यामध्ये या झाडाचं एकाकीपणही या निर्जन प्रदेशात इतकं एकाकी आहे.

या झाडाचं वय लक्षात येत नाही. जे झाड दिसायला चार वर्षांचं दिसतं, ते प्रत्यक्षात तीस-चाळीस वर्षांचं असू शकतं. हे झाडही काही तेवढं तरुण नव्हतं. उलट फॉरेस्टपासून थोडंसं अलग उभं राहिलेलं हे झाड त्याच्या जागेमुळे, तसंच त्याच्या फांद्या-डहाळ्यांमुळे नजरेत भरतं. नाहीतर अशा जागी झाड हरवून गेलं असतं. हे झाड केवळ वाढतंय एवढंच नाही, तर त्याची एक फांदी रस्त्याच्या दिशेने पुढे आलीय - त्या फांदीतून पुन्हा एक शाखा सरळ रेषेत वरच्या दिशेने वाढली आहे. आणखी एक शाखा खालच्या दिशेने

वाढलीय्-पाण्याच्या दिशेने. तिचं टोक पाण्यावर डोलतंय्, कधीमधी त्याचा पाण्याला स्पर्शही होतो. वरच्या फांदीचं टोक वाऱ्याने डोलतं. या जंगलात, या कोपऱ्यात, आकाशात डोलणारी ही फांदी पाहून अगदी हटकून हत्तीची आठवण होते. मागे जंगलाचा दाट अंधार, आणि वरच्या दिशेला आकाशाचं स्वच्छ निळेपण असताना अंधुक उजेड या फांदीचं डोलणं पाहून तो हत्ती असावा असं भयही वाटू शकतं. पाणी, पाण्यात सावली, आडबाजूचं ठिकाण अशी वैशिष्ट्य असलेलं हे झाड जणू वृक्षदेवता किंवा पथदेवता होण्यासाठी तयारच उभं होतं - फक्त कुणीतरी ओळखून त्याला तसं देवपण देण्याच्या प्रतीक्षेत.

मदारीच्या आईने त्या झाडाला ओळखलं होतं. पण ते झाडाला पाहून किती, आणि तिथे ट्रक थांबतात म्हणून किती हे काही नक्की सांगता येत नाही. पण दोन हातांनी उचलून आणता येतील, असे दगड उचलून आणून-आणून ती त्या झाडाच्या पायथ्याशी ठेवते. त्या दगडांची पातळी आता पाण्याच्या पातळीच्या वर आलीय्-एकावर एक असे झाडाच्या भोवती ते दगड तिने रचले आहेत-प्राचीन इजिप्शियन लोक ज्याप्रमाणे 'ओरेलिस्क' बनवीत, किंवा अजूनही इकडचे पहाडी लोक महायानी बौध्दचैत्य तयार करतात, त्या पद्धतीने.

## एकशे ब्याण्णव

# बाभुळझरा राष्ट्राचं उद्देश्य

मदारीच्या आईने विचार केला, की देवतेसारख्या दिसणाऱ्या या झाडाभोवती आपण दगडांचा पार तयार केला, तर येणाऱ्या-जाणाऱ्या ट्रकमधून ड्रायव्हरलोक दहा-वीस पैसे फेकीत जातील. ट्रकड्रायव्हर्सप्रमाणे बसमधले प्रवासीही अशा ठिकाणी पैसे फेकतात हे तिने पाहिलंय्. या रस्त्याने बस जाते खरी, पण पैसे टाकण्याची आणखी एक जागा वाढवावी असं बसमधल्या प्रवाशांना वाटणार नाही; पण हे एवढे ट्रक इकडून तिकडे आणि कलकत्त्याहून आसामला जातात हेसुद्धा मदारीच्या आईला ठाऊक आहे. त्या ड्रायव्हरलोकांना तर काही या बाजूची संपूर्ण माहिती नाही, मग या देवतेसारख्या दिसणाऱ्या झाडापुढं ते दहा-वीस पैसे का बरं टाकणार नाहीत? नक्कीच टाकतील.

अशा एका फॉरेस्टच्या सीमेवर, या झाडाप्रमाणेच मदारीची आई का रहाते याला काही इतिहास नाही. इतर कुठे रहाण्यासाठी जागा नाही, म्हणूनच इथे रहाते. पण इथं येऊन रहायला सुरुवात केल्यावर ती संपूर्ण वेळ या झाडाला देवता बनवण्याच्या कामात गुंतून गेली. तेव्हा मदारीचा जन्म झालेला नव्हता. मदारीच्या आधीचा भाऊ, किंवा त्याच्या

आधीचा भाऊ-कोण तेव्हा मदारीच्या आईबरोबर होतं, हे आठवणं खूप अवघड आहे. पण त्या मुलाला मदारीच्या आईने काही मैल अंतरावरच्या गणेशमोडावरून एक गणेशमूर्ती चोरून आणायला सांगितलं होतं. मदारीची आई तेव्हा तिच्या ज्या मुलाच्या नांवाने ओळखली जात होती, त्या मुलाने जवळजवळ ते काम पुरं करीत आणलं होतं, पण नंतर त्याच्या डोक्यात प्रकाश पडला, की इतक्या जवळची मूर्ती चोरून आणली, तर सगळ्यांच्या लक्षात येईल!

मग? दुसरा काही उपाय मदारीच्या आईला सुचत नव्हता. सलग काही वर्षे गणेशमोडावर हत्तीच्या कळपाने रस्ता अडवल्यावर त्या ठिकाणी मातीची गणेशमूर्ती स्थापन करून तिची पूजा झाली. आता ट्रक-बस अशा सगळ्या वाहनातले लोक तिथं पैसे टाकतात. मदारीच्या आईला तर काही हत्तीच्या कळपाला सांगता येत नाही, की बाबांनो, जरा इथंसुद्धा येऊन रस्ता अडवा! किमान एखाद्-दुसरा ट्रक जरी इथं अपघात होऊन उलटला असता, तरी लोकांना या जागेची दहशत वाटली असती, आणि देवतेसारख्या दिसणाऱ्या या झाडाला त्यांनी पैसे वाहिले असते. पण एवढे मोठमोठे ट्रक कसे उलटवायचे हे मदारीच्या आईला बिचारीला काय ठाऊक? रस्त्याने ट्रक चालले, की तिच्या झोपडीची जमीन थरथरून कापते.

पण एखाद्या उन्हाळ्याच्या संध्याकाळी जेव्हा मदारीची आई रस्याकडेला येऊन वाऱ्यात बसते, तेव्हा तिला दिसतं, की झाडाची वरची फांदी अगदी हत्तीच्या सोंडेसारखीच हलते- नक्कीच हलते. 'कुणालाच दिसत नाही हो, कुणालाच दिसत नाही!'

मदारीच्या आईला काय वाटत असे, ते तिलाच ठाऊक. पण तिच्या विचार करण्याच्या शक्तीलाही एक मर्यादा आहे. साऱ्या जगातली एवढी जागा सोडून जिला या फॉरेस्टच्या जवळ, किंवा फॉरेस्टमध्येच या एका नगण्य झऱ्याकाठी, नॅशनल हायवे तयार करताना साफ केलेल्या जमिनीवर येऊन रहावं लागतंय्, तिच्या विचार शक्तीची झेप नक्कीच काही मोठी नाही.

पण हा झरा, हे झाड, ही मदारीची आई-या तिघांपैकी नक्की कोणामुळे मैलोमैल चाललेल्या या नॅशनल हायवेवरच्या या जागेचं नांव 'बाभुळझरा' असं पडलं?

हे बाभळीचं झाड तर आहेच, झराही आहे, पण इथे या थोड्याशा मोकळ्या जागेवर, नाना प्रकारच्या पानांनी झाकलेली ही मदारीच्या आईची झोपडी नसती, त्या झोपडीसमोर झाडाच्या फांद्यांनी केलेलं कुंपण नसतं, तर या झऱ्याचं किंवा या झाडाचं नामकरण करण्याचं काही प्रयोजन होतं का? मदारीच्या आईचं हे घर ज्यांना 'घर' वाटतं, तेच बहुधा

इथं ट्रक थांबवतात, गाडीत थोडं पाणी भरतात, स्वतःही हातपाय धुतात. त्यांच्यामुळेच या ठिकाणाच्या नामकरणाची गरज पडली असावी.

पण एवढं सगळं होऊनही मदारीच्या आईला जे हवं होतं ते मुळीच घडलं नाही. पार असलेलं हे बाभळीचं झाड देवस्थान आहे असं वाटत नाही. पाहिल्याबरोबर जर हे ठिकाण एखाद्या देवस्थानासारखं वाटलं असतं, तर हजार-हजार मण माल घेऊन देशाच्या एक टोकापासून दुसऱ्या टोकापर्यंत जाणाऱ्या ट्रकड्रायव्हर्सनी नक्कीच इथं दहा-वीस पैसे टाकले असते. पण मदारीच्या आईला काही अजून या जागेला देवस्थानाचं स्वरूप देता येत नाही.

त्यामुळे एखादी गाडी थांबली की मदारीलाच पळत जावं लागतं. त्याच्या उ पुढे पहाडासारख्या दिसणाऱ्या गाडीच्या चाकाजवळ उभं राहून तो वरच्या दिशेला पहात मान हलवतो, पैशांसाठी हात पुढे करतो. मदारीचं आपल्या आईच्या घरापासून तो छोटा उतार उतरून या रस्त्यावर येणं आणि ट्रकच्या दिशेने पळत येणं खूपच अनैसर्गिक वाटतं. पण त्यानंतर मालवाहतूक करणाऱ्या पहाडासारख्या ट्रकच्या चाकाजवळ उभं राहून त्याचं ते आपले वाळलेल्या काटक्यांसारखे दिसणारे हात पसरणं ओळखीचं वाटतं-जे सगळ्या देशातली अशी जंगलं, नद्या, पहाड पार करीत वाहतूक करतात, अशा ट्रकड्रायव्हर्स ना ते ओळखीचं वाटतं. हात-तोंड धुवून, ट्रकमध्ये पाणी भरल्यानंतर ड्रायव्हर आपल्या भल्यामोठ्या खिशातून काही सुटे पैसे काढून मदारीच्या हातावर ठेवतो. त्यानंतर पुन्हा गाडीत चढून स्टार्ट देण्याआधी पहातो-परतताना मदारी रस्त्याचा चढ किंवा मैदानातला उंच भाग पळत पार करू शकत नाही, हळूहळू चालतच तो पार करतो. मदारीच्या आईच्या घरासमोर मदारीची आईसुद्धा कधीमधी दिसते. सगळ्या देशातली नाना दृश्यं पहात जो ड्रायव्हर जंगल, नदी, समुद्रकाठ पार करीत वाहतूक करतो, त्यालाही हे दृश्य संपूर्ण पाहल्याशिवाय पुढे जावंसं वाटत नाही - मदारी गाडीपासून दूर होऊन, हा नॅशनल हायवे पार करून हळू हळू पावलं टाकीत कसा आपल्या घराकडे जातो.

पण या बाभुळझऱ्याजवळ ट्रक थांबणं खूपच अनिश्चित असतं. ट्रकगाड्या जरा नियमित थांबत असत्या, तर मदारीला पैसेही आणखी नियमितपणे मिळाले असते.

पण, ट्रक नियमित थांबत असते तर मदारीला अशा प्रकारे ट्रकच्या चाकाजवळ थांबून हात पसरून पैसे मागावे लागले नसते. आता तर मदारी बाजाराच्या दिवशी मिठाईवाल्याच्या दुकानातून एक फडकं आणून, ट्रकगाड्यांची धुडं पुसतो. ट्रकचं एवढं मोठं बॉनेट दोन्ही हातांनी रगडून-रगडून पुसतो, बॉनेटवर चढून ट्रकच्या वरच्या भागावरची नक्षी पुसतो, काच पुसतो, ड्रायव्हरचा दरवाजा पुसतो, चाकांवर उभं राहून ट्रकची बॉडी पुसतो. सुरुवाती-सुरुवातीला ट्रकचे क्लीनर त्याच्यावर ओरडत, पण

हळूहळू मदारीने ट्रक पुसायचं हे काम आपल्याकडे खेचून आणलं. एका चहाच्या मळ्यातले ट्रक दोन्ही बाजारांमध्ये येत. चहाच्या मळ्यांमध्ये ट्रकमधून माल येत नाही, माणसं येतात. ते ट्रक पुसले, तर कुणी पैसे देत नाही. ते ट्रक वगळले, तरी मदारीच्या ट्रकगाड्यांची संख्या अगदीच कमी नाही. एकेका बाजारात तो चार-पाच रुपयांपर्यंत कमाई करतो. त्या ट्रकपैकी काही ट्रक्स तर जणू त्याचे स्वत:चेच आहेत- एम्.पी.सिंगचा ट्रक, हरियाणाचा ट्रक, जॉन क्लीनरचा ट्रक. बाभूळझऱ्यावर नियमित ट्रक थांबले असते, तर मदारीने तेसुद्धा पुसले असते.

## एकशे त्र्याण्णव

# मदारीहाटात जुलूसाची दवंडी

जुलूस निघणार आहे हे मदारीने बाजारात ऐकलं होतं. एक पत्र्याचा डबा वाजवीत वाजवीत लाल शुकरा बाजारात दवंडी देत होता. अजूनपर्यंत बाजार बसला नव्हता. मदारी शुकराच्या मागे-मागे थोडं फिरतो. लाल शुकरा टिन बडवीत बडवीत ओरडत होता, 'उद्या तिस्ता बंधाऱ्यावर जायचं आहे हो, जुलूस निघणार आहे होऽ!'

शुकराच्या घशात कफ झाल्याने त्याचे शब्द नीट उच्चारले जात नव्हते आणि दवंडीसाठी म्हणून त्याने आवाजही चढवला नव्हता. त्यामुळे तो काहीतरी बोलयोय असं जाणवलं, तरी नक्की काय बोलतोय हे समजत नव्हतं. पण त्याची बाजारातल्या लोकांना काही चिंता नव्हती-बहुधा त्या सर्वांना ही गोष्ट ठाऊक असावी, किंवा कुणालाच ती ऐकण्याची इच्छा नसावी.

पण, 'जुलूस' हा शब्द ऐकल्यावर मदारीला शुकराचा पिच्छा सोडवत नाही. 'जुलूस' सुद्धा वेगवेगळ्या प्रकारचे असतात हे त्याला ठाऊक आहे. नुसत्या बाजारातसुद्धा छोटासा 'जुलूस' असतो. चहाच्या मळ्यांकडेही 'जुलूस' निघतो - तिथे मदारीचं काही काम नसतं. आणखी मोठमोठे जुलूस अधूनमधून निघतात. तेव्हा ट्रकमधून शहरांमध्ये माणसं नेतात, कधी अलीपूरदुवार तर कधी जलपाइगुडी, गेल्या वर्षी मदारी अशा एका 'जुलूसा'बरोबर अलीपूरदुवार शहरी जाऊन 'जुलूसा' बरोबरच परत आला होता. जलपाइगुडी शहर त्याने अद्याप पाहिलेलं नाही.

लाल शुकरा खूप काटकुळा आहे. चालता चालता आत्ता पडेल, असं वाटतं. त्यात तो सकाळीच हातभट्टीची घेतो. नशा किंवा अशक्तपणा त्यांच्यामुळेच त्याची पावलं ठीक पडत नाहीत. पण तसंच, झोकांड्या खात-खात तो दवंडी देतोय, 'जुलूस निघणार, जुलूस निघणार!' तो हे नशेतच बोलतोय असं त्याच्याकडे पाहिल्यावर वाटतं.

लाल शुकराच्या मागे-मागे फिरता-फिरता मदारी त्याच्या पुढे येऊन विचारतो, 'मोठा जुलूस की छोटा जुलूस?' पुन्हा एकदा समोर येऊन विचारतो, 'ट्रक येणारेत, ट्रक?'

हे प्रश्न विचारताना सरावानेच मदारी शुकरापासून थोडं अंतर ठेवतो. कारण, उत्तराऐवजी शुकराच्या हातातली काठी आपल्या पाठीवर पडण्याची शक्यता आहे, हे त्याला ठाऊक आहे. तसाही शुकरा अर्धा वेडा, अर्धा दारुडा-तो काय करील हे कुणी सांगू शकत नाही.

पण मदारीने दुसऱ्यांदा प्रश्न विचारल्यावर शुकरा एक अद्‌भुत गोष्ट करतो. तो टिन आणि काठी मदारीच्या दिशेने पुढे करतो. मदारी आणखी थोडी मागे सरकतो. 'ले, ले. . .' म्हणत म्हणत झोकांड्या खात मदारीमागे येतानाच शुकराला खोकल्याची उबळ येते. त्यानंतर टिन-आणि काठी पुढे केलेल्या अवस्थेतच तो खोकत रहातो, खोकत रहातो. त्याच्या तोंडातून लाळ गळू लागते, आणि डोळे जणू आत्ता बाहेर पडतील इतके मोठे होतात.

शुकराच्या हातातून टिन आणि काठी घेतल्यावर त्याला जरा बरं वाटेल या आशेने मदारी पुढे जाऊन टिन आणि काठी आपल्या हात घेतो, पण तरीही, पुढे केलेले आपले हात शुकरा खाली घेऊ शकत नाही, एवढी प्रचंड खोकल्याची उबळ त्याला आलेली असते.

ती उबळ थांबल्यावर, आवंढा गिळून, हात खाली घेऊन, डाव्या हाताच्या पंजाने तोंडावरचा घाम पुसून, उजवा हात बाजाराच्या दिशेने फिरवून शुकरा म्हणतो, 'जा रे मदारी, दवंडी दे-उद्या तिस्ता बंधाऱ्यावर जुलूस होणार, मिनिस्टर येणार, ट्रक येणार...'

'ट्रक येणार?' मदारी विचारतो.

'नक्कीच येणार. ट्रक नक्की येणार. सगळ्यांना जावं लागणार. जाओ, ढोलाई लगाओ मदारी!' एवढं बोलून शुकरा उजवीकडे वळतो आणि मडक्यांच्या दुकानांमागच्या झाडाखाली आधी बसतो, नंतर आडवा होतो.

आणि, मदारी उड्या मारीत मारीत, टिनाच्या डब्यावर काठी वाजवतो- 'जुलूस जुलूस, उद्या जुलूस, ट्रक येणार, समदे जाणार, समदे जाणार!'

मदारीच्या मानाने टिनाचा डबा खूप मोठा आहे. वारंवार हात पुढे करून त्याला तो डबा सावरावा लागतो. आणि तशाच वाकलेल्या अवस्थेत तो काठीने बडवावा लागतो. पण तो इतक्या घाईने सगळ्या बाजारातून पळतोय, की त्याला कुठेतरी हा टिनाचा डबा सापडलाय आणि तो गंमत म्हणून काठीने बडवीत बाजारभर पळतोय् असं वाटतं. एखाद्या

पक्ष्याच्या आवाजाप्रमाणे त्याचा 'जुलूस जुलूस' असा कोवळा आवाज अद्याप न बसलेल्या बाजारात चहूकडे ऐकू येतोय.

बाजार तो पर्यंत बसलेला नसल्यामुळे दुकानांच्या रांगांमधून धावपळ करणं शक्य होतं. अद्याप सजवलेल्या दुकानांपुढे गिऱ्हाईकं आली नव्हती. त्यामुळे दुकानदार त्याची दवंडी ऐकू शकत होते, आणि याची मदारीला मजाच वाटत होती.

पण ही मजा उपभोगत तो घोषमशाईंच्या मिठाईच्या दुकानासमोर आल्याबरोबर घोषमशाई ओरडून त्याला हाक मारतात, 'एऽ मदारी!' आपल्या डब्याच्या आवाजामुळे मदारीला ती हाक ऐकू येत नाही. त्यामुळे घोषमशाईंना आणखी मोठ्या आवाजात हाक मारावी लागते- 'अरे एऽ मदारी!'

ती हाक ऐकून मदारी दचकतो, थांबतो, वळतो आणि मिठाईच्या दुकानाकडं बघतो. बगलेतून टिन खाली घेऊन दोन्ही हातात तो समोर धरून, हळूहळू चालत मदारी घोषमशाईंच्या समोर जातो.

घोषमशाई धमकीच्या सुरात विचारतात, 'कुणी सांगितलं रे तुला दवंडी द्यायला?'

'शुकराने.'

'कोण शुकरा?'

'लाल शुकरा'

'जा, ताबडतोब त्याचा टिन परत देऊन ये. दवंडी देतोय! जुलूस जाणार की जाणार नाही याचं तुला काय रे? जा, टिन देऊन ये अन् कप धुवून ठेव-'

ऐकलं नाही तर आपल्याला झापड खावी लागेल अशी मदारीला भीती वाटते. मार वाचवण्यासाठी तो पळत लाल शुकराला शोधायला निघतो. अर्थातच त्याला फार शोधावं लागत नाही. लाल शुकरा त्याच झाडाखाली झोपलाय आणि जोरजोराने श्वास घेतोय.

मदारी हळूहळू पावलं टाकीत शुकराजवळ जातो. थोडं थांबतो. त्यानंतर लाल शुकरा आणि झाड यांच्यामधल्या जागेत, आवाज होणार नाही इतक्या हळुवारपणे टिन ठेवतो - लाल शुकराला धक्का लागून तो जागा होणार नाही, इतक्या अल्लादपणे. टिन त्याला नीट ठेवता येतो. त्यानंतर काठी त्या टिनावर ठेवतो. पण काठी टिनावर अगदी मध्यभागी ठेवता येत नाही. थोडीशी बाहेर रहाते. मदारी काठी नीट ठेवण्यासाठी पुन्हा हात पुढे करतो, तेवढ्यात काठी टिनावरून शुकराच्या पोटावर पडते आणि त्याच्या श्वासाबरोबर वरखाली होत रहाते. मदारी लगेच परत घोषमशाईंच्या दुकानाकडे धूम ठोकतो.

घोषमशाईंच्या दुकानात मदारी दोन बाजारांच्या वारी गरजेप्रमाणे कपबशा धुवून देतो. एकदोनदा गिऱ्हाईकांना चहासुद्धा देतो. चहा तयार करतो बहादुर - तो म्हणतो, मदारीला चहा बनवायला शिकवीन. घोषमशाई त्याला प्रत्येकवेळी चारदोन पैसे देतात. बहादुरने

खरोखरच त्याला चहा बनवायला शिकवलं, तर त्याला घोषमशाईंच्या दुकानात नोकरीही मिळेल. पण चहा ज्यावर तयार करतात, ते टेबल अद्याप मदारीच्या हनुवटीइतकं उंच आहे. चहा तयार करायला शिकण्याआधी त्याला आणखी उंच व्हायला हवं.

बाजार उठण्याआधी दिसलं, की 'जुलूस' एक नाही, किमान दोन-तीन आहेत. हातुडिपाटीच्या मळ्यातले लोक मिरवणुकीने आले, पहाडी लोकांनी फॉरेस्टमधून लोक आणले, स्थानिक लोकांचंही एक दल तयार झालं. सगळे म्हणताहेत - उद्या तिस्ता बंधाऱ्यावर 'जुलूस'!

## एकशे चौऱ्याण्णव

# तिस्ता बंधारा कशा प्रकारे झाला

ही कहाणी आता 'जुलूसा'बरोबर तिस्ता बंधाऱ्याकडेच जाणार आहे. म्हणूनच, तिस्ता बंधाऱ्याची कथा इथेच सांगून टाकणं योग्य होईल.

तिस्ता बंधाऱ्याची परिकल्पना काय, कधीपासून त्याचं काम सुरू झालंय, काम सुरू होण्याआधी काय गोंधळ-गुंतागुंत झाली, राज्यातलं सरकार आणि केंद्रातलं सरकार या संदर्भात काय करतंय- हे सगळं एक मोठंच महाभारत आहे. तिस्ता नदीचं पाणी कुठेतरी अडवून तिथे जलविद्युत प्रकल्प उभारता येईल की नाही- यावर बरेचदा बरीच चर्चा झालीय, आणि त्यासंदर्भात सरकारी कचेऱ्यांत कागदपत्रंही काही कमी जमा झाली नाहीत. पण जलढाका जलविद्युत प्रकल्पाची अवस्था पाहिल्यानंतर उत्तर बंगालच्या या पहाडी नद्यांबद्दल छातीठोकपणे बोलण्याची कुणाचीही हिम्मत राहिली नाही.

किंवा बहुधा तसंही काही नाही; कारण, जलढाका जलविद्युत प्रकल्पाचा जो विचका झाला, त्याबद्दल कुणालाही ठामपणे जबाबदार धरण्यात आलं नाही. एखाद्या सरकारी प्रकल्पाच्या संदर्भात कुणाही एका विशिष्ट व्यक्तीला जबाबदार धरता येत नाही. इतक्या विविध टप्प्यांवर, इतक्या प्रकारचे लोक इतक्या प्रकारची कामं करीत एखाद्या प्रकल्पाला मूर्त स्वरूप देत असतात, की कुठल्या एखाद्या विशिष्ट टप्प्यावर काम करणाऱ्या कोणा एका विशिष्ट व्यक्तीला कोणा एका विशिष्ट कामाबद्दल जबाबदार धरता येत नाही. जलढाका प्रकल्पाच्या संदर्भातले सगळे हिशेब बरोबर होते - पाणी वर्षातील कोणत्या वेळी किती प्रमाणात असतं, पाण्याचा वेग किती असतो, त्या वेगाच्या आघातामुळे टरबाइन किती जोराने फिरू शकतं, त्यामुळे किती ऊर्जा तयार होऊ शकते- या सगळ्या हिशेबात कुठल्याही ठिकाणी काही चूक नव्हती. ज्या आकडेवारीच्या आधारावर पृथ्वीवर सगळीकडे जलविद्युत प्रकल्प उभारले जातात, त्या प्रकारची जलढाका प्रकल्पाच्या संदर्भातली आकडेवारी अगदी अचूक होती. पण या ठिकाणचा 'लोकल फॅक्टर' मात्र

विचारात घेण्यात आला नव्हता. त्यामुळे या पहाडी भागाचं स्थानिक उपादान या हिशेबात अंतर्भूत करण्यात आलं नाही. इथल्या पहाडांमध्ये दगडापेक्षा माती अधिक असते. पाणी जेव्हा डोंगरावरून उतरून नदीच्या पात्रात येतं, तेव्हा पाण्याबरोबर पहाडावरची मातीही त्यात येते. पहाडांवरून इतक्या मोठ्या प्रमाणात माती वाहून येत असल्यामुळेच इथल्या पहाडांची उंची कमी होत आहे. आणि हीच पाण्यात मिसळून आलेली माती टर्बाईनचं फिरणं थांबवू शकते, हे टर्बाईन थांबल्यावरच लक्षात आलं.

जलढाकाच्या या अनुभवानंतर उत्तर बंगालमधल्या पहाडी नद्यांबद्दल सगळंच जरा अनिश्चित झालं. या नद्यांबद्दल अगदी सांगोपांग अशी माहिती नाही. या नद्यांचा स्वभावही नदीविज्ञानातील पुस्तकी माहितीशी मेळ खाणारा नाही. किंवा अशा प्रकारच्या भौगोलिक ठिकाणच्या नद्यांबद्दल, त्यांच्या वैशिष्ट्यांबद्दल आजवर विश्वासार्ह असं एखादं पुस्तक लिहिलं गेलेलं नाही. म्हणून जोपर्यंत हे होत नाही, म्हणजेच या सगळ्या नद्यांचे गुणधर्म ठामपणे ठाऊक होत नाहीत, तोपर्यंत नद्या या नद्यांप्रमाणेच राहोत. मे पासून ऑक्टोबरपर्यंत, मॉन्सूनच्या वाऱ्यांच्या आगमनापासून तर ते परत जाईपर्यंत सहा-सहा महिने नद्या नाना पात्रांमधून वाहोत, नाना प्रकारच्या पुरांमध्ये नाना ठिकाणं वाहून नेवोत, एकाच नदीला लहान-मोठे असे नाना पूर येवोत. असे प्रकल्प उभारण्यापेक्षा पुराच्या तावडीतून माणसांना वाचवण्याचे प्रयत्न करणं चांगलं, पुरांमुळे माणसांचं जे नुकसान होतं, त्याची भरपाई देणं ठीक; पण, उगाच नदीच्या अंगाला हात लावायची गरज नाही.

नदीच्या अंगाला हात लावण्याचं, तिच्यावर संस्कार करायचं कधी ठरलं त्याचं वर्ष-तारीख शोधण्याची गरज नाही. साधारपणे असं म्हणता येईल की १९६८ साली तिस्तेला आलेल्या सर्वात मोठ्या महापुरानंतर, १९६९ सालच्या दुसऱ्या संयुक्त आघाडी सरकारच्या वेळी तिस्ताप्रकल्पाचा मुद्दा पहिल्यांदा वर्तमानपत्रांच्या पानांवर झळकला. तिस्ता-महानंदा मास्टरप्लॅनची गोष्टही त्याच वेळची. पण तेव्हा या सगळ्या गोष्टी कागदोपत्री येता-येताच युक्तफ्रण्टचं सरकार गेलं. त्यानंतर पुन्हा या संदर्भात काही विशेष असं ऐकू आलं नाही.

काही वर्षानंतर पुन्हा या गोष्टीने उचल खाल्ली. आधी तिस्ता प्रकल्पाच्या कामाला हात घातला जाणार, तिस्ता-महानन्दा मास्टरप्लॅन मूर्तरूपात येणार, तिस्ता बॅरेज डिव्हिजन तयार होणार - अशा सगळ्या बातम्या तेव्हा वर्तमानपत्रातून धूमधडाक्याने प्रकाशित होऊ लागल्या. मालदाचे एक मंत्री या सर्वांमागे होते. त्यांनी न्यू जलपैगुडीला तिस्ता बंधाऱ्याचं एक ऑफिस आणि क्वार्टर उघडलं, आणि तिस्ता बंधाऱ्याचं मुख्य कार्यालय मालदा इथं उघडलं. या साऱ्या बातम्या येऊ लागल्या एका स्कॅंडलच्या संदर्भात.

आणि ही कार्यालयं मालदा आणि न्यू जलपैगुडी इथं उघडण्यात आल्यानंतर तर हे स्कॅंडल चांगलंच गाजू लागलं, कारण, न्यू जलपैगुडी किंवा मालदा यापैकी एकाही ठिकाणी तिस्तानदी नाही! ज्या ठिकाणी तिस्ता नदीचा गंधही नाही, अशा ठिकाणी

प्रकल्पाचं मुख्य कार्यालय उघडण्याचा एकच उद्देश होता. तो म्हणजे, मंत्र्यांच्या गावच्या लोकांना या प्रकल्पात अधिक नोकऱ्या मिळाव्यात. त्यामुळे बंधाऱ्याचं ऑफिस या नद्या ज्या जिल्ह्यामध्ये आहेत, त्याच जिल्ह्यात सुरू करण्यात यावं असा प्रतिवाद जलपैगुडी आणि कूचबिहार या ठिकाणांहून सुरू झाला.

पण आपल्या जिल्ह्यातल्या किंवा शहरातल्या लोकांना नोकऱ्या मिळाव्यात असं जर मंत्र्याला वाटत असतं, तर त्याने महानन्दा नदीवरच्या बंधाऱ्याचं काम आधी हाती घेतलं असतं. तसं तर काही त्याने केलं नाही. खरं तर, मालदाला मुख्य ऑफिस झाल्यावर ते नियमितपणे कामात लक्ष घालू शकले असते. त्यांच्या प्रत्यक्ष नजरेखाली उत्तर बंगाल आणि पश्चिम बंगालमधल्या तिस्ता या सर्वात मोठ्या नदीवरील प्रकल्प कमीत कमी वेळात पूर्ण व्हावा, म्हणूनच त्यांनी प्रकल्पाचं मुख्य ऑफिस मालदा शहरात उघडलं. त्याशिवाय ऑफिसात असे कितीजण काम करणार? नवीन लोकांची भरती होणार बांधाऱ्याच्या ठिकाणी, आणि ती भरती करणार कॉंट्रॅक्टरलोक. त्यात मंत्र्याचं काय काम?

या दोन मतांच्या मध्ये एक तिसरं मतही होतं. स्वतःच्या अधिकारात काहीही करता येतं असं त्यांना वाटत नाही. म्हणूनच ते म्हणतात- ऑफिस कुठे का असेना, बंधारा तर तिस्तेवरच होणार! तिस्तेवर बांध बांधण्यात मंत्र्याचा काय फायदा? म्हणूनच त्याने ऑफिस मालदाला नेलं. मंत्र्याचा एवढा फायदा होऊ देण्यात वाईट काय? नाहीतर मंत्री संतापेल आणि बंधाऱ्याचं कामच होऊ देणार नाही.

पण ही सगळी भांडणंतंडणं आणि तर्कवितर्क शांत होण्याआधीच 'आणीबाणी', १९७७ची निवडणूक आणि इंदिरा गांधींचा पराभव या घटना घडल्या. केन्द्रात जर कॉंग्रेसचाच पराभव होत असेल, प्रधानमंत्रीच जर निवडणुकीत आपटी खात असतील, तर त्यापुढे तिस्ताबॅरेज किस झाडकी पत्ती! महानन्दा किस झाडकी पत्ती! १९७७ सालच्या निवडणुकीत बंगालमध्ये डाव्या आघाडीचं सरकार झालं. ६७ आणि ६९च्या राजकारणाची धारावाहिकता जणू पुन्हा परत आली - मधल्या दोनेक निवडणुका आणि दोनेक सरकारं जणू आली अन् गेली असं झालं, जरी या स्थित्यंतराला दहाएक वर्षं लागली, तरीही.

स्पेशल सेटलमेंटच्या जमीनजमोजणीचं काम १९७७ सालच्या सुरुवातीलाच सुरू झालं. मालदाला बंधाऱ्याचं ऑफिस होण्याचा प्रश्नच आता उद्भवत नाही. पण एक ऑफिस न्यू जलपैगुडी स्टेशनजवळ सुरू झालं, क्वार्टर्सबिर्टर्स उभी राहिली. पत्रापत्री करणं, सामान वगैरे आणणं, कलकत्त्याच्या वाऱ्या - या सगळ्यांसाठी अशा एखाद्या जागी असं एखादं कॅम्पस आवश्यक आहे असं सर्वांनाच वाटलं - विशेषतः बंधाऱ्याचं काम संपल्यावर त्याच्या संरक्षणाची वगैरे जबाबदारीसुद्धा आहेच ना!

या सगळ्यामधून तिस्ता-महानन्दा मास्टरप्लॅनचा एक पर्याय म्हणून तिस्ता

बंधाऱ्याचं काम खूप तातडीने होऊ लागलं. गाजोलडोबा खेडं हे त्या कामाचं प्रमुख केन्द्र बनलं. पहाता-पहाता, या तटावर गाजोलडोबा गाव आणि त्या तटावर वैकुंठपूर फॉरेस्ट यांच्यामध्ये, तिस्तेवरच्या बंधाऱ्याचं काम सुरू झालं. स्लुइस् गेटस्, रिझरव्हॉयर यांच्यासह तिस्ता बंधारा उभा राहू लागला. ते काम अद्याप पूर्ण झालेलं नाही. पण त्याचं उद्‌घाटन एवढ्यातच होणार आहे- किमान आंशिक उद्‌घाटन. त्या उद्‌घाटन-समारंभासाठीच एवढे 'जुलूस' चालले आहेत.

## एकशे पंच्याण्णव

# पूर्ण होण्याआधीच उद्‌घाटन

पण या अर्धवट बंधाऱ्याच्या उद्‌घाटनाची गरज का भासली?

हाच सांप्रतच्या इतिहासापुढील प्रश्न आहे आणि या कहाणीसाठी आवश्यक आहे.

एवढ्या मोठ्या प्रमाणावरच्या कर्मयज्ञात स्थानिक लोकांना काही संधी-सुविधा मिळतातच. पण त्या संधी-सुविधांच्या बाबतीतही पहिल्यापासूनच गोंधळ आहे. बंधाऱ्याचं काम होतंय नदीच्या पात्रात - रुंदीच्या मध्ये या बंधाऱ्यामुळे तिस्तेच्या पाण्याला तिच्या पात्रात शिस्तीने ठेवता येईल. या पावसाळ्यात एक पात्र, पुढच्या पावसाळ्यात दुसरं पात्र; किंवा, एकाच पावसाळ्यात सुरुवातीला डावीकडे घुसणं, पुढे उजवीकडे घुसणं- असले प्रकार आता होणार नाहीत.

परंतु तिस्तेच्या या स्वभावामुळे तिचं जे अत्यंत रुंद असं पात्र तयार झालं आहे, त्यात मधूनमधून छोटीछोटी अनेक वाळवंटं तयार झाली आहेत. ही सगळी वाळवंटं थोडी उंचही झाली आहेत. तिस्ता बंधाऱ्यामुळे या वाळवंटांवर आता मनुष्यवस्ती होणार नाही किंवा शेतीही होणार नाही-कारण, तिस्तेला तिच्या पात्रातच ठेवायचं आहे. साठवलेलं पाणी बंधाऱ्यातून जेव्हा सोडलं जाईल, तेव्हा त्याच्या धक्क्याने पात्रामधील ही सगळी वाळवंटं वाहून जातील.

नदीच्या पात्रामधल्या या सगळ्या वाळवंटांवर मुख्यतः पूर्व बंगालमधील नमशूद्र लोक वस्ती करून आहेत. काही काही वाळवंटांत, उदाहरणार्थ मउवामारीच्या चरात तर अगदी त्यांच्या सहकारी संस्थासुद्धा आहेत. तिस्ता बंधाऱ्यातलं पाणी कधी सोडलं जाणार याचा अंदाज सध्या कुणी करीत नाही हे खरं; पण ते पाणी सोडलं जाण्याआधीच या सगळ्या वस्त्या आपापल्या जागेहून उठतील. एवढ्यातच त्या लोकांनी दुसऱ्या जागांचा शोध सुरू केलाय. त्यांचं दुसरीकडे कुठे पुनर्वसन करणं शक्य आहे की नाही यासंदर्भात

सरकारशीही बोलणी चालू आहेत.

भविष्यात काय होणार या संदर्भात विविध प्रयत्न चालू असले, तरी वर्तमान तर काही हे लोक बाद करू शकत नाहीत. म्हणून तिस्ता बॅरेजच्या सुरुवातीलाच त्यांची मागणी होती-ज्या बंधाऱ्यामुळे त्यांना निर्वासित व्हावं लागणार होतं, त्या बंधाऱ्याच्या कामावर त्यांनाच घ्यायला हवं - विशेषत: माती आणण्याच्या प्राथमिक कामावर.

बंधाऱ्याच्या कामाच्या सूत्रधारांना याबद्दल बोलण्याचा काही हक्क नाही. कारण हे काम करवून घेणार कॉन्ट्रॅक्टर. तो कुठून लोक आणून काम करवून घेणार हा पूर्णपणे त्याचा प्रश्न आहे. पण कामाच्या सुरुवातीलाच काही गोंधळ होऊ नये म्हणून इंजिनियर लोक समझोत्याचा प्रयत्न करताहेत.

समझोत्याच्या मार्गात अडचण होती, कारण या कन्स्ट्रक्शन कंपनीचं काम संपूर्ण भारतभर चालते. त्यांचे सब-कॉन्ट्रॅक्टर्स, लेबर-सगळं बांधलेलं आहे. एवढंच काय, गाजोलडोबात येऊन, जंगल साफ करून त्यांनी तंबू उभारलेत. इलेक्ट्रिक लाईन आणण्यासाठी सालाच्या झाडाच्या फांद्या-पानं तोडलीत. या टप्प्यावर त्यांची अभ्यस्त व्यवस्था बदलण्यासाठी कंपनी कशी राजी होणार? हा मुद्दा आधी काही उपस्थित झाला नव्हता. त्यामुळे कंपनीचे सब-कॉन्ट्रॅक्टर्स आपापल्या लोकांना आणण्यासाठी पैसे घेऊन नाना ठिकाणी निघून गेले. रोजच अनेक मजूर इथे येऊन हजर होऊ लागले आहेत. आपलचांद फॉरेस्टमध्ये त्यांच्या तात्पुरत्या वस्तीची सीमा रोजच वाढत चाललीय्. एवढंच काय्, ट्रक इथपर्यंत यावेत म्हणून जो रस्ता तयार झालाय्, त्याच्या बाजूला असलेल्या जागेवर एक छोटासा बाजारही काही दिवसांपासून बसू लागलाय्. आता या टप्प्यावर, सब-कॉन्ट्रॅक्टर्सनी आणलेल्या या साऱ्या लोकांना बसून रहायला सांगून कंपनी काय या चरातल्या लोकांना काम देणार?

खरं तर, कंपनीने गुप्त असा एक हिशेब केलाय्. जे शेतीचं काम करीत नाहीत, असे जवळपासच्या चरांमधले लोक बंधाऱ्याच्या कामावरती येणार. दूरच्या चरांवरून काही कुणी या कामावर येणार नाही. दुसरं म्हणजे, या आसपासच्या सगळ्या चरांमधून जितक्या संख्येने लोक येतील, त्यांच्याहीपेक्षा अधिक लोक कंपनीच्या संपर्कामुळे इथे येतील, या चरांमधल्या लोकांनी कामात काही अडथळा आणण्याचा प्रयत्न केला, तर केवळ संख्याबळावर कंपनीचे लोक त्यांना हरवू शकतील. ही परिस्थिती तयार करण्यासाठी कंपनीला आणखी काही दिवसांची आवश्यकता होती. इंजिनिअर लोकांशी चर्चा करून, चरांमधल्या लोकांशी चर्चा करून, नंतर बोलणी करण्याची तारीख नक्की करून कंपनीने हा वेळ घेतला.

ही कंपनी भारतामधल्या वेगवेगळ्या ठिकाणी अशाच प्रकारची मोठमोठी कामं

वर्षानुवर्षे करीत असते. त्यामुळे अशा प्रकारची समस्या सोडवण्याच्या संदर्भाच तिचा अनुभव आणि दक्षता - दोन्हीही पुरेशा प्रमाणात आहेत.

हा अनुभव आणि दक्षता ती सब-कॉन्ट्रॅक्टर्सच्या खालच्या टप्प्यावर वापरते.

सब-कॉन्ट्रॅक्टर्सच्या कामासाठी आणखी काही सब-कॉन्ट्रॅक्टर्सची आवश्यकता असते, किंवा एकेक सब-कॉन्ट्रॅक्टरसाठी एकेका सप्लायरची आवश्यकता असते असं म्हटलं तर अधिक बरोबर होईल. हे सगळे सप्लायर स्थानिक लोक असले म्हणजे चांगलं आणि निर्विघ्न असतं, कारण इथल्या कुठल्या गोष्टी कुठे मिळतात हे त्यांना ठाऊक असतं, त्या गोष्टी ते नीटपणे मिळवू शकतात, एखाद्या सप्लायरला जमलं नाही तर दुसरा मदत करू शकतो.

स्थानिक अशा छोट्यामोठ्या सब-कॉन्ट्रॅक्टर्सचे पत्ते काढून, त्यांच्याशी कामाच्या संदर्भात चर्चा करण्याच्या उद्योगात कंपनी सब-कॉन्ट्रॅक्टर्सना लावून देते. माती काढण्याच्या कामी सुरुवातीलाच गाड्या भरभरून बांबूंची आवश्यकता असते. साल-बरगा लागतात - किती लागतील हे नक्की सांगता येत नाही. पाण्याचा प्रवाह अडवण्यासाठी मोठमोठे दगड मोठ्या प्रमाणावर पात्रात टाकावे लागतात. अशा प्रकारच्या एका बंधाऱ्याच्या कामातल्या काही भागातलाही छोटासा भाग म्हणजे बांबू विंवा साल किंवा दगड यांचा पुरवठा करण्याचं काम जर एखाद्या स्थानिक कॉन्ट्रॅक्टरला मिळालं, तर त्याला चंद्र हातात आल्यासारखं वाटतं.

सब-कॉन्ट्रॅक्टर्स मालबाजार, ओदलबाडी, जलपैगुडीच्या सब-कॉन्ट्रॅक्टर्सशी याच संदर्भात चर्चा करतात, आणि बंधाऱ्याचं काम चरातले लोक सुरु करू देत नाहीयेत हे त्या सब-कॉन्ट्रॅक्टर्सपैकी प्रत्येकाला समजतं. या सगळ्या ठिकाणच्या पन्नासजणांना, किंवा शंभरदीडशे जणांना सप्लायरचं काम नक्कीच दिलं जाणार हा कंपनीचा हिशेब पक्का होता.

या सगळ्या चर्चेच्या संदर्भात जिल्ह्यातले कॉन्ट्रॅक्टर्सही कंपनीचे समर्थक म्हणून उभे राहिले. त्यांच्यापैकी ज्यांचं थोडं राजकीय वजन आहे, असे कॉन्ट्रॅक्टर्स 'अशा एका मोठ्या प्रकल्पाच्या कामात अडथळा आणणं योग्य नाही' असा दबावही इथल्या लोकांवर आणू शकत होते.

परंतु कंपनी सर्वात अधिक तत्परता दाखवते आसपासच्या गावांमधल्या राजबन्शी लोकांची एक संघटना तयार करण्यामध्ये. चरांमधल्या नमशूद्र लोकांशी राजबन्शी लोकांचे संबंध कधीच सलोख्याचे नाहीत. कशी कुणास ठाऊक, ही बातमी सगळीकडे-अगदी क्रान्तिहाट आणि ओदलबाडी पर्यंत पोचली कोण जाणे, की चरांमधले लोक कंपनीला म्हणताहेत की त्यांनाच कामावर घेतलं पाहिजे. राजबन्शी लोकांना कामावर घेतलेलं

आम्हाला चालणार नाही.

मामला कायद्यामध्ये, कोर्ट-कचेऱ्यांमध्ये अडकतो.

कंपनीने स्पष्टपणे जाहीर केलं-चरातील लोकांना काम दिलं तर राजबन्शी लोक अडथळे आणतील, उलट राजबन्शी लोकांना काम दिलं तर चरांमधले लोक उपद्रव देतील. दोन्ही प्रकारच्या लोकांना कामावर घेतलं तर कामाच्या ठिकाणी दंगे होतील. त्यामुळे कंपनी सरकारच्या अनुमतिनुसार आपले लोक घेऊन काम सुरू करते.

## एकशे शहाण्णव

# बंधाऱ्याचा आधीचाही इतिहास आहे

परंतु हे तर काम सुरू करण्याबद्दल झालं. त्यांच्याशी या आताच्या उद्‌घाटनाचा संबंध काय? उद्‌घाटनाचा अर्थ म्हणजे काम संपलं. आंशिक उद्‌घाटन म्हणजे किमान आंशिक काम पूर्ण झालं. पण या बंधाऱ्याशिवाय सुद्धा इतिहास आहे. तो इतिहास तर दर दिवशी, दर वर्षीच्या नाना घटनांद्वारा नियंत्रित असा आहे. आता ज्याप्रमाणे तिस्तेवर बंधारा बांधून तिचं पात्र पक्कं करणं चाललंय्, त्याप्रमाणे इतिहासावर बांधारा बांधून त्याचं पात्र काही पक्कं करता येत नाही, त्याच्या प्रवाहावर नियंत्रण घालता येत नाही. इतिहासाचं पात्र तर नेहमीच मुक्त अवस्थेतल्या तिस्ता नदीच्या पात्राप्रमाणे असतं. कधी ते डाव्या बाजूला घुसेल, कधी उजव्या. एकाच पावसाळ्यात ते आपली दिशा दोन वेळा बदलून वाहील. पावसाळ्याशेवटी पुन्हा नवीन पात्र निर्माण करून वहात जाईल. मग तो इतिहास या संपूर्ण भारताचा असो, किंवा त्याचं एक राज्य असलेल्या पश्चिम बंगालचा असो, किंवा पश्चिमबंगालचा भाग असलेल्या या उत्तरबंगालचा असो. वर्तमानपत्रं, किंवा रेडिओ, किंवा टी.व्ही. वाचून, ऐकून, पाहून मनात एक धारणा जवळजवळ पक्की होते की इतिहासासारखा महत्त्वाचा प्रकार, महत्त्वाची ऐतिहासिक घटना दिल्ली-मुंबईसारख्या मोठ्या शहरांमध्ये, किंवा कलकत्त्यासारख्या राजधानीतच घडू शकतात आणि त्यानंतर त्यांचे पडसाद इतरत्र उमटतात. पण कधीकधी असं ही दिसतं की उत्तरबंगालसारख्या एका नगण्य भागातही इतिहास एक निर्दिष्ट आकार घेऊ इच्छितो. किंवा बहुधा देशाच्या सगळ्या भागातल्या इतिहासाची स्वत:ची अशी एक गती असते. मोठ्या इतिहासाच्या गतीसाठी ती अनुकूलही असू शकते, किंवा प्रतिकूलही असू शकते. मोठा इतिहास स्वत:च्या मोठेपणाच्या दबावाखाली कधी त्या प्रतिकूलतेला दुमडू शकतो, किंवा कधी त्या प्रतिकूलतेला नाना वळणांनी फिरवून अनुकूलतेच्या प्रवाहात मिसळून टाकू शकतो.

परंतु कधी-कधी असंही दिसतं की विविध प्रदेशांच्या इतिहासाची नागमोडी वाट ही कुठल्याही प्रकारे पुन्हा सरळ होत नाही, शेवटपर्यंत ती मूळ इतिहासाच्या तोलामोलाची नसली, तरी प्रबळ अशी विरोधी शक्ती म्हणून उभी रहाते. १९३५ सालापूर्वी कुणाला कधी वाटलंही नव्हतं की भारतीय इतिहासाच्या मूळ प्रवाहाविरुद्ध मुसलमानांचा एक अलग प्रवाह निर्माण होईल आणि त्याला स्वीकृती मिळेल. १९३५ साली शासन करीत असलेल्या भारत सरकारने कायद्याने त्या फुटीर प्रवाहाला आणखी मोठा असा प्रवाहपथ दिला. आणि त्यामुळेत केवळ दहा वर्षांमध्ये स्वातंत्र्याच्या मागणीइतकीच पाकिस्तानची मागणीही प्रबळ ठरली. १९४७ साली पाकिस्तानची स्थापना होण्यापूर्वी त्या मागणीचं वय फक्त सात वर्षांचं होतं-मार्च १९४० मध्ये लाहोरच्या अधिवेशनात पहिल्यांदा पाकिस्तानची मागणी करण्यात आली-तरीही या सात वर्षांतच ती अखण्ड भारताच्या स्वातंत्र्याच्या सुमारे शंभर वर्षांच्या स्वप्नांची, कल्पानांची आणि प्रयत्नांची जी परंपरा होती, त्या परंपरेच्या विरुद्ध एक प्रबळ विरोधी शक्ती म्हणून उभी राहिली.

तिस्ता-बंधाराही त्याप्रमाणे एका प्रदेशाच्या इतिहासाशी संबद्ध झाला. त्या प्रादेशिक इतिहासाचा चेहराही एक प्रकारचा नाही पण सगळ्या चेहऱ्यांमध्येच त्यांच प्रादेशिक स्वरूप अत्यंत स्पष्ट आहे. उदाहरणार्थ, मालदह-दिनाजपूच्या पोलिया-राजबन्शी-पासून तर कुचबिहार-जलपाईगुडीच्या राजबन्शी लोकापर्यंत सर्वांची इच्छा आदिवासींची सत्ता असावी अशी आहे; आणि तशी मागणी त्यांच्याकडून अधूनमधून होत असते.

त्या 'उत्तरखंड पार्टी'चं, किंवा 'उत्तरखंड आंदोलना'चं थोडं विवरण आपल्याला याच्या आधीच्या पर्वातच मिळालंय्. हे उत्तखंड आंदोलन किंवा पार्टी खूप मोठी होईल की नाही हा वेगळा प्रश्न आहे. किंबहुना, या आन्दोलनामध्ये इतके नाना प्रकारचे स्वार्थ आणि मतलब येऊन मिसळले आहेत, की सगळे कार्यकर्ते आणि नेते एकजुटीने कार्य करणं मुश्लिलच आहे. परंतु कितीही मुश्किल असलं, तरी गरज किंवा वेळ पडली तर हे लोक मुंबईची नटी श्रीदेवी आणि जल्पेश मंदिरातील शिवलिंग एकाकार करून असा देखावा निर्माण करू शकतात, की खरंच, यांच्यामागे खरोखर अनेक लोक आहेत असं पाहणाऱ्यांना वाटतं. संख्याबळ किंवा जमाव हाच जर शक्तिप्रदर्शनाचा प्रमुख उपाय असेल, तर त्या मार्गाचा वापर नाना प्रकारे केला जाऊ शकतो.

प्राचीन इतिहास, जनवैशिष्ट्यं इत्यादी मिळून एखाद्या प्रदेशाची विशिष्टता जेव्हा त्याच्या फुटीरपणाचं, विच्छिन्नतेचं साधन बनते, तेव्हा, इतिहासाच्या सगळ्याच साधनांचा अशा वेळी वापर होतो. उत्तरबंगाल केवळ मैदानी प्रदेश नाही-त्यातील विस्तृत असा डोंगराळ प्रदेश हा पश्चिमबंगालचाच भाग आहे. हा डोंगराळ भाग मुख्यत: दार्जिलिंग जिल्ह्यात सुरू होऊन त्याचा काही भाग जलपाईगुडी जिल्ह्याच्या उत्तर भागापर्यंत उतरला आहे. खरं तर जलपाईगुडी जिल्ह्यात जसजसं उत्तरेकडं जावं, तसतसं तिथल्या

रहिवाशांच्या चेहेऱ्याची ठेवण बदलत जाते. जलपाईगुडी जिल्ह्याच्या मध्यभागी पूर्व-पश्चिम अशी एक रेघ आखून जिल्ह्याचे दोन भाग केले, तर वरच्या भागापैकी दोन-तृतीयांश भाग राजबन्शी इलाख्याच्या बाहेर येतो. या भागात प्रमुखत: चहाचे मळे आहेत-त्यामुळे कोल, मुण्डा आणि संताळ हेच या भागातले मुख्य रहिवासी आहेत. आणखी थोडं उत्तरेकडे गेलं, तर नेपाळी लोकच मुख्य रहिवासी आहेत. जलपाइगुडी जिल्ह्यातला हा उत्तर - दक्षिणेतील रहिवाशामधला फरक इलेक्शन कमिशननेसुद्धा मान्य केला आहे. दार्जिलिंगचा मतदारसंघ म्हणून जो ओळखला जातो, त्यामध्ये जलपाइगुडी जिल्ह्यातल्या उत्तरेकडील बराचसा भाग येतो. म्हणजेच जलपाइगुडी जिल्ह्याच्या उत्तर भागातले नेपाळी, कोल, मुण्डा आणि संताळ हे सारे दार्जिलिंग लोकसभा सीटचे मतदार आहेत. ही व्यवस्था दोन-तीन निवडणुकांपासून चालू झाली आहे. त्यामुळे डोंगराळ प्रदेशाशी जलपाइगुडीचा संपर्क पक्का झाला आहे.

## एकशे सत्त्याण्णव

# पहाडामधून मैदानी प्रदेशात

जलपाइगुडीमध्ये डोंगराळ भाग व मैदानी भाग यांचा संयोग होण्याचं एक भौगोलिक कारणही आहे.

दार्जिलिंगशी शिलिगुडीच्या मैदानी प्रदेशाचा संपर्कच ठळकपणे डोळ्यांत भरतो, आणि त्याचा आता लोकांना सरावही झाला आहे. शिलिगुडीपासून हिलकार्ट रोडनेच दार्जिलिंगशी मुख्यत: संयोग आहे. पण तोच काही डोंगराळ भाग आणि मैदानी भाग यांच्यामधला एकमेव संयोग नाही. जलपाइगुडी जिल्ह्यातील ओदलाबाडीहून एक गुरांचा रस्ता सरळ लाभा-आलगाडा मार्गे कालिम्पाँगकडे चढत गेला आहे. दार्जिलिंग पहाडापेक्षा कालिम्पाँगचे पहाड वेगळे आहेत. आणि या कालिम्पाँगच्या पहाडांशी जलपाइगुडीचा संपर्क खूप जुना आहे. या गुरांच्या रस्त्यांच्या बाजूने, किंवा लाभा-आलगाडाच्या रस्त्याच्या बाजूने, किंवा सरकारी भाषेत बोलायचं झालं, तर ओल्ड मिलिटरी रोडच्या बाजूने जलपाइगुडीतील अनेक चहाचे मळे हळूहळू, पायऱ्या पायऱ्यांनी पहाडांवरती गेले आहेत, पहाडांमध्ये काना-कोपऱ्यात दडले आहेत, तर कुठे आडोशांमागून खाली उतरत आले आहेत. पाथरझोरा, शुडिबाडी, छोटो फागु, बडो फागु ही त्या पहाडांची नावं. त्याशिवाय, या पहाडांना लागूनच जलपाइगुडी डिव्हिजनमधल्या फॉरेस्टच्या नाना रेंजेस आहेत. कुठेतरी एका विशिष्ट ठिकाणी जलपाइगुडी जिल्हा संपून दार्जिलिंग जिल्हा सुरू होतो

हे खरं असलं, तरी बाह्य लक्षणांवरून ते लक्षातच येत नाही. सगळीकडेच नेपाळी मजूर आणि नेपाळी रहिवासी दिसतात. माणसांच्या चेहरेपट्टीत आणि बोलीभाषेत कुठलाही फरक दिसत नाही.

समान वंश आणि समान भाषेच्या सूत्रामुळेच या पहाडी माणसांची स्वातंत्र्याची मागणी पहाडी भाषांतून जलपाइगुडीच्या या मैदानी भागात उतरून आली आहे. त्यांनी मागणी केलेल्या स्वतंत्र प्रदेशाला गोर्खालॅण्ड असे कागदोपत्री म्हटलं जातं, कारण 'पाकिस्तान', 'खलिस्तान', 'झाडखांड' यांच्यानंतर कुठल्याही स्वतंत्र प्रदेशाची मागणी 'स्तान' किंवा 'लॅण्ड' हा प्रत्यय लावून समजावणं सहज असलं, तरी या गोर्खालॅंडच्या मागणीमागे असलेले घटक आहेत-पश्चिमबंगालच्या या पहाडी प्रदेशाबद्दल अनेकानेक वर्षांची उपेक्षा, पश्चिमबंगालमधील मोठ्या समाजामध्ये असलेला पहाडी लोकांबद्दल योग्य अशा भूमिकेचा अभाव, पहाडी लोकांच्या स्वत:च्या मातृभाषेला सरकारने दिलेली अस्वीकृती, आणि सर्वात महत्त्वाची गोष्ट म्हणजे या लोकांची अपमानित झालेली अस्मिता.

अस्मितेला एकदा धक्का पोचला, की तिच्यामध्ये ज्याप्रमाणे नाना विकार दिसून येतात, त्याचप्रमाणे या आहत अस्मितेमधूनच आत्मपरिचय होण्याची संधीही मिळू शकते.

पहाडी लोक जेव्हा पहाडी प्रदेशातून किती लाकूड, किती चहा खालच्या मैदानी प्रदेशात जातो, आणि त्यामधून सरकारला किती उत्पन्न मिळतं, तरीही सरकार पहाडी लोकांसाठी दरडोई किती कमी रक्कम खर्च करतं याची आकडेवारी सादर करतात, तेव्हा त्यांच्या मनात सरकारने त्यांना दिलेली आश्वासनंच असतात, सरकारचीच भाषा त्या आवाहनामागे असते.

राज्यसरकारही त्याच भाषेत हिशेब देतं-पश्चिमबंगालमधून किती रुपये केंद्र सरकारला मिळतात, तरीही केन्द्रसरकार पश्चिमबंगालसाठी किती कमी रकमेची तरतूद करतं, राज्यसरकार जेव्हा मातृभाषेबद्दलच्या अभिमानाचा प्रचार करतं, मातृभाषेलाच राज्य सरकारच्या कामकाजाची भाषा म्हणून मान्यता देण्याच्या आश्वासनाचं स्मरण करतं, मातृभाषेलाच उच्च शिक्षणाचं माध्यम करण्याची इच्छा प्रकट करतं, तेव्हा या राज्यातील ज्या एका प्रमुख भागातील रहिवाशांची भाषा बंगाली नाही, त्यांना आपल्या उपेक्षित भाषेबद्दल दु:ख वाटणं अगदीच स्वाभाविकच आहे.

त्यात अशा अवघड परिस्थितीत पहाडी भागातून एक संशय व्यक्त केला जातो-पहाडी प्रदेशातल्या नदीचं पाणी मैदानी प्रदेशाकडे ओढून घेणं हा तिस्ता बंधाऱ्याचा खरा मतलब आहे.

या मुद्यात काही दम नाही, कारण संपूर्ण पहाडी प्रदेश पार करूनच तर पाणी बंधाऱ्याच्या जागी येणार. हा मुद्दा इतिहासाच्या संदर्भात बरोबर नाही-कारण उत्तर बंगालमध्ये सर्वात अधिक नद्यांवरील प्रकल्प झाले आहेत, ते दार्जिलिंग जिल्ह्यातच. या प्रकल्पामुळे पहाडी प्रदेशाचाही फायदाच होणार आहे.

पण हा मुद्दा राजकारणाच्या दृष्टीने खूपच उपयुक्त आहे. डोळ्यासमोर दिसतंय्, की खाली तिस्तेच्या पाण्याला एका ठिकाणी अडवून, तिस्तेला तिच्या मुख्य पात्रातूनच जाऊ देण्याचं काम चाललंय् आणि त्याची प्रगती होतोय्. त्या कामाच्या वेगामुळे पहाता-पहाता फॉरेस्टच्या मध्ये, एका निर्जन जागेचा चेहरामोहरा त्या कामाच्या वेगामुळे बदलून गेला. पहाता-पहाता तिस्ता नदीजवळ अंधाऱ्या रात्री प्रकाश उजळला-रात्रीही काम चालू रहातं. तिकडे बोट दाखवून म्हणता येतं-ते पहा, तिस्ता बंधाऱ्याचं काम चाललंय्. तिस्ता तर पहाडामधली नदी, आमची नदी; पण ही आमची नदी जोपर्यंत पहाडामधून वहात जाते तोपर्यंत तिच्याकडे राज्य सरकारचं लक्ष नाही; एवढंच काय, पहाडी प्रदेशात इंग्रज राज्यकर्त्यांनी जे काही साकव बांधले होते, त्यानंतर एकही साकव या देशी सरकारने बांधला नाही; पण हीच नदी खाली मैदानी प्रदेशात गेल्यावर पहा, तिच्यावर केवढा मोठा तिस्ता ब्रिज बांधला गेला, ते आमची नदीसुद्धा लुटताहेत; आम्ही हे होऊ देणार नाही, तिस्ता बंधारा तोडला पाहिजे.

या सगळ्या युक्तिवादांनी खूपच लवकर लोकांची मनं काबिज केली. वंचित माणूस खूपच लवकर हिंसक होऊ लागतो. त्यामुळे त्याच्या मनाला किमान एक दिलासा मिळतो. त्यात, डोळ्यांसमोर उभ्या रहात असलेल्या एखाद्या गोष्टीची विनाश करण्याचं आवाहन अशा माणसांना केलं, तर संघर्षाला मूर्त स्वरूप येतं. या आवाहनाचा आवाज सहस्रावधि प्राचीन मार्गांनी जाऊन जलपाइगुडीच्या समतल भागात रहाण्याऱ्या पहाडी माणसांना मुखातूनही ध्वनित झाला-तिस्ता बंधारा तोडला पाहिजे!

उत्तरखंड, कामतापूर, गोर्खालँड आणि जुन्या चरांमधल्या नमशूद्रांची संघटना- या एवढ्या सगळ्या आंदोलनांचा विरोध असताना सरकारने त्यांच्या नाकावर टिच्चून तिस्ता बंधाऱ्याच्या कामाचा वेग वाढवला. प्रथमतः या सगळ्या विरोधी घटकांमध्ये कुठल्याही प्रकारचं ऐक्य नाही. प्रत्येकाचा विरोध वेगवेगळ्या कारणांसाठी आहे आणि ती कारणंही परस्परविरोधी आहेत. उत्तरखंड आंदोलनवाल्यांना 'भाटिया'ना शिक्षा व्हावी असं वाटतं. नमशूद्र लोकांना योग्य असं पुनर्वसन हवं आहे. उत्तरखंड आंदोनलनाला हवं आहे स्वतंत्र राज्य. कामतापूरला आसामच्या एका भागात विलीन व्हायचंय. गोर्खालँडला हवं आहे स्वातंत्र्य-आपलं एक वेगळं राज्य झालं तर चांगलंच होईल असं त्यांना वाटतं.

हे वेगवेगळे विरोधक एकत्र येणं, त्यांचं ऐक्य होणं असंभव असल्याने राज्य सरकार आपली स्वतःची राजकीय शक्ती एकवटू शकतं. डाव्या आघाडीमधले पक्ष तर आहेतच,

बाहेरच्या पक्षांपैकी कॉंग्रेसच्या दृष्टीने या सगळ्या विरोधकांना उघडपणे राजकीय पाठिंबा देणं शक्य नाही. म्हणूनच, या अभूतपूर्व अशा राजनैतिक ऐक्याबरोबर तिस्ता बंधाऱ्याचं आंशिक काम पूर्ण करून त्याचं उद्‌घाटन घडवून आणलं, तर सरकार आपल्याबद्दल किती विचार करतंय याचा प्रत्यक्ष पुरावा उत्तरबंगालच्या लोकांना मिळेल.

याचबरोबर सरकार, दार्जिलिंग आणि जलपाइगुडी जिल्ह्यातल्या चहाच्या मळ्यांमधून, जिथेजिथे त्यांच्या संघटना आहेत तिथून, मुख्यतः पहाडी लोकांना एकत्रित करतं. जलपाइगुडी - कुचबिहारमध्ये आपल्या शेतकरी संघटनांना ते प्रचारात उतरवतं. राजकीय दृष्ट्या ते बरेच संघटित आणि सुसंहत आहेत. ते पहाडी लोकांमध्ये आणि राजबन्शी लोकांमध्ये सुमारे एका वर्षापासून फुटीरतावादाविरुद्ध प्रचार करताहेत. संघटनेच्या दृष्टीनेही ते बहुसंख्यांक आहेत.

म्हणूनच, तिस्ता बंधाऱ्याच्या उद्‌घाटनाला उत्तरखंड, कामतापूर, गोर्खालँड यांची दलं विरोध दाखवीत असली, तरी त्यांचा हा विरोध तिस्ता बंधाऱ्यापर्यंत पोचणार नाही. तो पोचू दिला जाणार नाही. सरकारची दलंसुद्धा सगळ्या जिल्ह्यांमधून मिरवणुकीने आपलं समर्थन दाखवण्यासाठी बंधाऱ्याच्या ठिकाणी तयार आहेत, आणि म्हणूनच बंधाऱ्याभोवती पोलीस, सी.आर.पी., बी.एस्.एफ्. यांच्या जवानांच्या रांगांमधून रांगा तैनात केलेल्या आहेत.

## एकशे अठ्ठ्याण्णव

# निवडणूक आणि उद्‌घाटन

म्हणूनच, तिस्ता बंधाऱ्याचं उद्‌घाटन हे केवळ एका सरकारी प्रकल्पाचं उद्‌घाटन नाही, तर ती एक राजनैतिक घटना बनली आहे.

सरकार आणि सरकारमध्ये अंतर्भूत असलेली दलं अगदी स्पष्टपणे आणि उघडउघड शक्तिप्रदर्शनात उतरली आहेत. त्यांना हे सिद्ध करून दाखवायचंय की कामतापूर, उत्तरखंड, गोर्खालँड इत्यादी सगळ्या चळवळींना कुठलाही राजकीय पाया म्हणून नाही. केवळ सरकारला विरोध करायचा म्हणूनच कुठेही चार-पाचजण एकत्र येताच एखाद्या 'स्तान' किंवा 'लँड'च्या घोषणा देतात. ते तर स्लोगन देतच खलास होतात. त्या सगळ्यांना जेलमध्ये टाकणं तर काही सरकारला शक्य नाही. त्यांना जेलमध्ये टाकणं म्हणजे त्यांना महत्व देणं, नेते बनवणं. सरकार आणखी एक गोष्ट करतं - कुठेही बाजारात - मैदानात या लोकांनी सभा-मिरवणूक असं काही केलं, की तिथे पोलिसांकडून त्यांना बेदम मार देणं. पोलिसांच्या माराचा खूपच चांगला परिणाम होतो. पण पोलिसांना 'हाणा यांना!'

अशी आज्ञा दिली, म्हणजे पोलीस काही साधासुधा मार देत नाहीत. त्यांच्या मारामुळे जर दोन तीन आंदोलन दगावले, तर त्यावरून संपूर्ण देशात गोंधळ होतो. दगावले नाहीत, तरी पोलिसांनी केलेल्या मारहाणीची बातमी वर्तमानपत्रात अशी काही रंगवून प्रकाशित केली जाते, की त्यामुळे आंदोलन थांबण्याक्षऐवजी अधिकच भडकतं.

त्यापेक्षा या प्रकारचा कार्यक्रम चांगला अनेक दिवसांपासून सरकारची दलं प्रचार करताहेत, स्वतःचे मुद्दे लोकांना समजावून सांगताहेत, सरकारच्या पक्षातील नाना नेते नाना ठिकाणी नाना वेळा सभा घेताहेत. त्याच वेळी तिस्ता बंधाऱ्याच्या कामामध्ये थोडा बदल केला जातो- चीफ इंजिनियर आणि मंत्र्यांसमवेत मुख्यमंत्र्यांची मीटिंग होते - एका वर्षाच्या आत प्रकल्पाचं उद्घाटन करायचं ही गोष्ट पक्की होते. राज्य सरकार यासंदर्भातच केन्द्र सरकारशी बोलणी करतं. सरकारी पक्षाची आधी इच्छा होती की पंतप्रधानांच्या हस्ते प्रकल्पाचं उद्घाटन करायचं. तसं झालं, तर कामतापूर, उत्तरखंड, नमशूद्र समिती, गोर्खालंड याच्या पाठीशी ज्या काँग्रेसी लोकाचं समर्थन आहे, ते लोक द्विधावस्थेत सापडतील. कारण या व्यासपीठावरून पंतप्रधानांना फुटीरतावादाविरुद्ध बोलावंच लागणार. पंतप्रधान आणि मुख्यमंत्री राजकीयदृष्ट्या एकच गोष्टी बोलले, तर त्याचा एक वेगळ्या प्रकारचा प्रभाव नक्कीच पडणार. हा प्रस्ताव राज्यातले दोन-चार बडे बडे अधिकारी फेटाळून लावतात. ते प्रथम म्हणतात - अशा वेळी पंतप्रधानांच्या सुरक्षिततेची जबाबादारी त्या प्रकारच्या भौगोलिक ठिकाणी सांभाळणं राज्य सरकारला शक्य होणार नाही. किंवा, ती जबाबदारी घेणं योग्य होणार नाही. दुसरी गोष्ट म्हणजे, पंतप्रधानांकडून या प्रकल्पाचं उद्घाटन करवलं, तर त्या घटनेला राष्ट्रीय महत्त्व मिळेल. त्या महत्त्वामुळे या आन्दोलनकर्त्यांना आणखीनच चेव येईल. त्या संदर्भात ते बहुधा सक्रिय विरोध दाखवतील. ते लोक म्हणजे विशेषतः गोर्खा लोक. पण पंतप्रधान हासिमाराच्या धावपट्टीवर विमानातून उतरोत किंवा बागडोगराच्या धावपट्टीवर उतरोत - त्यांना मोटारीतून इतक्या लांबचा प्रवास जंगलातून आणि पहाडांतून करावा लागेल, की त्या मार्गाच्या दरम्यान असलेल्या पहाड आणि जंगलातील झाडावर कुणी अतिरेकी गुप्तपणे लपून रहाणं अशक्य नाही.

पण पंतप्रधान तर हेलिकॉप्टरमधून थेट तिस्ता बंधाऱ्यावरच उतरू शकतात!

इतक्या चर्चेनंतर दोन-चार ऑफिसर्स आपलं खरं म्हणणं एकमेकांच्या पाठीमागे मुख्यमंत्र्यांपुढे मांडतात - तिस्ता बंधाऱ्यासारख्या एका महत्त्वाच्या प्रकल्पाच्या यशाचं श्रेय राजकीय दृष्ट्या केन्द्राला देणं योग्य होणार नाही. कारण, पंतप्रधानांनी उद्घाटन केलं, तर सारी प्रसारमाध्यमं त्यांच्यावरच अधिक लक्ष केन्द्रित करतील. तेव्हा यावेळी, विशेषत: निवडणुकीला फक्त काही महिनेच राहिले असताना असं काही करणं अनुचित होईल.

निवडणुका जवळ आल्यामुळेच तिस्ता बंधाऱ्याचं उद्‌घाटन, त्या उद्‌घाटनासाठी गर्दी जमवणं, 'फुटीरतावाद्यां'चे वेगवेगळे सर्व गट मिळून जी संख्या होईल, त्या जनसंख्येपेक्षाही अधिक संख्येने लोक कार्यक्रमासाठी एकत्रित करून सरकार आणि सरकारी दलांच्या शक्तीचं प्रदर्शन करणं खूपच आवश्यक आहे. सरकारी पक्ष असं ठरवतात, की बंधाऱ्याचा समारंभ हा मुळात निवडणूक प्रचारमोहिमेची सुरुवात असेल. सरकारच्या या लोक एकत्र करण्याच्या शक्तीला, तिस्ता बंधाऱ्याच्या यशाला अशा प्रकारे त्या दिवशी प्रक्षेपित करायचं, की त्याचा प्रभाव फेब्रुवारीपर्यंत राहील. सत्ताधारी पक्षाला जर उत्तरबंगालच्या सर्वात जास्त आसनसंख्या जिंकता आल्या, तरी पुरेसं आहे - अर्थात एकदोन ठिकाणी पराभवाची शक्यता असतेच, ती अलाहिदा. आणि सध्या जितक्या जागा सत्ताधारी पक्षाकडे आहेत, त्यापेक्षा दोन-तीन जागा अधिक जिंकता आल्या, तर मग बोलायलाच नको! जर सरकारने व सत्ताधारी पक्षाने आपली प्रचारमोहीम अधिक तीव्र केली, आणि काँग्रेसशी या 'फुटीरतावाद्यां'चा उघड किंवा धुपा कसा खुठलाही समझौता होऊ दिला नाही, तरच हे शक्य आहे. तसं झालं, तर या सगळ्या उपटसुंभ आदोलकांचा सत्ताधारी पक्षाला निवडणूक जिंकण्याच्या संदर्भात फायदाच होईल. काँग्रेस-समर्थकांची मतं जर सरकारी काँग्रेस उमेदवार आणि या सगळ्या उपटसुंभ पक्षांच्या उमेदवारांमध्ये विभागली गेली, तर उत्तरबंगालमध्ये डाव्या आघाडीला गेल्या निवडणुकीपेक्षाही जास्त जागा मिळतील. त्यामुळे, तिस्ता बंधाऱ्याच्या उद्‌घाटनासाठी डावी आघाडी आपल्या पक्षांची आणि आपल्या सरकारची संपूर्ण शक्ती वापरतं आहे.

भूतान सीमेजवळच्या चहाच्या मळ्यांतले कोल, मुण्डा, संताळ मजूर, संताळपूर, कालचिनी, रांगालिबाजाना, राजाभातखावा या ठिकाणांहून ते राजबन्शी लोकांसमवेत ट्रक भरभरून मिरवणुकीने येतील. एक खूपच चांगली सोय झालीय-चहाच्या मळेवाल्यांनी आपले स्वतःचेच ट्रक दिले आहेत. दुसरीकडून जयन्तीच्या रस्त्याने आणि चिन्नागुडीहून सुरुवात करून या भागातले झाडून सगळे लोक इथे आणले जाणार आहेत. मयनागुडीपासून तर लोटागुडीपर्यंन्तचे लोक तर मिरवणुकीनेच येतील. हे तर त्यांचं घरचंच कार्य आहे. मदारीहाट, बीरपाडा, हासिमारा या ठिकाणांहून लटरला रोडवरून ट्रक येतील. मेटेलीपासून सुरू करून मेटेलीमागे अनेक मैल दूर असलेल्या गरुबाखान रोडच्या चहाच्या मळ्यांमधून नेपाळी मजुरांना खूप संघटितपणे आणायला हवं.

राजबन्शी किंवा मदेशिया लोक एकत्र येतील; पण नेपाळ्यांना संघटितपणे आणलं नाही, तर ते कदाचित एकत्र येणारही नाहीत. या बाजूचे चहाचे मळे क्षेत्रफळाच्या दृष्टीने छोटे-छोटे आहेत - त्यामुळे नेपाळी मजूर असले, तरी त्यांची संख्या काही फार मोठी नाही. म्हणूनच सरकारने आणि सरकारी पक्षांनी दुसरी व्यवस्थाही केलीय. काही वर्षांपूर्वी फॉरेस्टमधली पडीक जमीन हस्तगत करण्यासाठी नेपाळी लोक मिरवणुका करून एकेका

फॉरेस्टमध्ये घुसले होते. तेव्हा या मामल्यावरून खूपच गदारोळ झाला होता. नंतर मात्र सरकार गप्प बसलं - जणू यांच्या घुसकोरीला सरकारचा काहीच आक्षेप नव्हता. खरं तर फॉरेस्ट डिपार्टमेंटला निर्देश देण्यात आला - तीन-चार महिन्यानंतर नवीन झाडं लावण्याच्या कामाच्या निमित्ताने डिपार्टमेंटने या घुसखोरांना हुसकावून लावावं - अगदी सगळ्या ठिकाणांहून. पण सगळ्या ठिकाणांहून एकाच वेळी नव्हे. मोठ्या प्रमाणावर घुसखोरी कॉलनीमध्ये आधी नव्हती. त्यानंतरही नव्हती. जणू घुसखोरांनी विचार केला असावा, गोंधळ करणं ठीक नव्हे - त्यापेक्षा एकाच फॉरेस्टमध्ये नवीन ठिकाणी वस्ती करणं बिनधोक आहे. गरज पडली, तर फॉरेस्ट डिपार्टमेंट पोलिसांचं सक्रिय सहाय्य घेईल. याच पद्धतीने नवीन घुसखोरी रोखण्यात आली, पण आधीच्या घुसखोरांना र ळ्या ठिकाणांहून हुसकावून लावण्याचं काम अद्यापही संपलेलं नाही. तसं पाहि तरी घुसखोरांची संख्या आता काही हजार आहे. फॉरेस्ट डिपार्टमेंटच्या आणि त्या डिपार्टमेंटच्या कॉन्ट्रॅक्टर्सच्या ट्रकगाड्यांमधून या घुसखोरांना बंधाऱ्याच्या उद्‌घाटनासाठी आणता येईल. सरकारचं समर्थन केलं, तर वस्ती करण्यासाठी आपल्याला जमिनीचा एखादा पट्टा कायमचा मिळून जाईल अशी त्यांना आशा वाटते.

'फुटीरतावाद्यां'ना या मोहिमेत विक्षोभ प्रदर्शित करण्याचं धाडसच होऊ नये, असं सरकारला आणि सरकारी पक्षांना वाटतं.

## एकशे नव्व्याण्णव

# मदारीची आई जुलूसात जाणार कशासाठी?

'परंतु कुणाचा जुलूस कुठेही जावो, मदारीची आई जुलूसात कशासाठी जाणार? मदारीने बाजारातून जुलूसाची बातमी आणली म्हणून काही त्याची आई जुलूसात - मिरवणुकीत जाऊ शकत नाही. ज्या मिरवणुकीत लोकांची आवश्यकता असते, जास्तीत जास्त लोकांची आवश्यकता असते, त्या मिरवणुकीतील मातब्बरांना मदारीची आई कशी काय आठवणार? एखाद्या मोठ्या आणि दाट फॉरेस्टमधल्या कुणाएका झऱ्यापाशी जिला एक 'बाभुळझरा' तयार करावा लागतो, तिला कुठल्याही जुलूसात स्थान नसतं. मदारीच्या आईच्या दृष्टीने एक दिवस जुलूसात जाणं म्हणजे एक दिवस न खाता रहाणं. एक दिवस खायला न मिळणं किंवा न खाता रहाणं ही मदारीच्या आईसाठी काही अजब गोष्ट नाही. आपली किती जेवणं चुकली यावरून ती आपले किती दिवस वाया गेले हे ठरवते असंही काही नाही. पोटातली भूक किंवा श्रमाचा पैसा - यापेकी काहीही मदारीच्या आईचं दिवस मोजण्याचं माप नाही. तर मग तिचा दिवस वाया गेला की गेला नाही हे ठरवायचं

कशावरून?

या जंगलात, या बाभुळझऱ्यात तिला रोज, अगदी दररोज, आपलं अन्न गोळा करण्यासाठी भटकावं लागतं - अगदी ज्याप्रमाणे जंगलातल्या कोंबड्या भटकतात, पक्षी भटकतात, हत्ती, गेंडे यांच्यासारखे मोठमोठे प्राणीसुद्धा भटकतात, त्याचप्रमाणे. त्यात तिच्या स्वतःच्या खाण्याचं परिमाण तर काही नक्की नाही - की बाबा इतकं इतकं अन्न जमलं म्हणजे तिचं काम संपलं! संपूर्ण दिवसभर तिला जंगलामधून भटक-भटक भटकावं लागतं - अगदी खाली मातीकडे डोळे ठेवून. जंगलात तर काही खालची माती दिसत नाही - तिथं फक्त जंगली वेली, झुडुपं आणि गवत असतं. कधीकधी या वेली, झुडुपं आणि गवताच्या गचपणात माणूस बुडून जातो, अगदी त्यातून पुढे वाटही काढता येत नाही. कुठे कुठे मोकळ्या वाटा दिसतात, रस्ते दिसतात - ते सगळे रस्ते फॉरेस्ट डिपार्टमेंटने तयार केलेले - प्राण्यांना फिरण्याची सोय व्हावी, आणि कापलेली झाडं ठेवता यावीत यासाठी या प्रकारचे काही खूप रुंद असे मोठे रस्तेही जंगलामध्ये आहेत. या सगळ्या रस्त्यांवरून ट्रक जातात, या रस्त्यांवरून फिरण्याची हत्तीच्या कळपांनादेखील सवय झाली आहे. मध्ये मध्ये मातीचे छोटे छोटे उंचवटे मिठाचं आवरण देऊन तयार केलेले आहेत. प्राणी तिथं येऊन मीठ चाटतात.

त्यामुळेच मदारीच्या आईला दोन गोष्टींची कधी ददात पडत नाही - चूल पेटवण्यासाठी सुकलेल्या काटक्या आणि मीठ. पण या काटक्या पेटवण्यासाठी तिच्याकडे कधीही आगपेटीतली काडी नसते. तिच्याकडं एक फुटकंतुटकं भांडं आहे खरं, पण त्या भांड्यात शिजवण्यासारखं काही नसतं. मदारीच्या आईला इतकं मीठ मिळतं, पण हे मीठ वापरून एखादा पदार्थ करण्यासाठी तिला रोज भाजीपाला कुठून मिळणार?

सकाळपासून जमिनीकडे पहात जंगलात ती ज्या वाटांनी फिरते, त्यांचाही एक नकाशा तिच्या मनात आहे. फार दाट जंगलात घुसलं तर काही सापडत नाही - जंगल चारीकडून असं काही दाब देतं की पाण्यामध्ये जसं श्वास घेण्यासाठी नाक वर ठेवावं लागतं तसं नाक वर ठेवून चालावं लागतं. मग खालच्या बाजूला कसं पहाणार? या सगळ्या जंगली झुडुपांतच अचानक काहीतरी सापडण्याची आशा दिसते - जंगली कोंबडीचं अंडं, किंवा त्या अंड्यातून बाहेर पडलेलं पण अद्याप ज्याला पळता येत नाही असं कोंबडीचं पिल्लू; उंदरांच्या बिळात हात घालून उंदरांची छोटी-छोटी पिल्लंही मिळवता येतात. त्यामुळे या झाडाझुडपात शिरण्याशिवाय मदारीच्या आईला तरणोपाय नसतो. तिच्या शरीरालाही आता या दाट जंगली झुडुपांमधून फिरण्याची सवय झालीय. चेहरा थोडा वर ठेवला, तरी ती खालच्या दिशेला पाहू शकते, पाहता-पाहता हव्या त्या गोष्टी शोधूही शकते. मदारीच्या आईचे डोळे हनुवटीखाली असते, तर बरं झालं असतं.

हेच तिचं संपूर्ण दिवसभराचं काम असतं. तिच्या हातात एक मजबूत, सालाच्या झाडाच्या फांदीपासून तयार केलेली काठी असते. खूप भुकेलेली असताना तिला या काठीचा भार वाटतो. त्याशिवाय या लाठीचा अस्त्र म्हणूनही उपयोग होतो. काठीच्या

तळाशी चांगलं टोक आहे. असं टोक ठेवूनच तिने काठी तोडलीय. त्यामुळे काठीच्या आवाक्यात जर मदारीच्या आईचं खाद्य होऊ शकेल असा एखादा प्राणी आला, तर काठी हमखास त्याच्यावर आदळते. कधी कधी चालत्या प्राण्याला काठीने बरचीसारखं भोसकता येतं, आणि कधीकधी काठी उंच उचलून शरीरातूल सगळा जोर वापरून खाली आणून कुदळीप्रमाणे तिचा आघात करता येतो. या सगळ्या वेळी मदारीच्या आईचं संपूर्ण शरीर जागृत होतं. जंगलातील या वातावरणात साल-खैर अर्जुन वृक्षांच्या सहवासात मदारीची आईसुद्धा जणू काही एक झाडच बनून जाते - एखाद्या झाडाच्या फांद्यांप्रमाणेच तिचे हात डोक्यांवर उठतात, आणि वादळी वाऱ्यात एखादं झाड पहावं, तसे वेगाने आघात करण्यासाठी खाली येतात. उठण्या-वाकण्याच्या अशा वेळी मदारीच्या आईचं शरीर ताठ होतं-हे शरीर केवळ शरीराच्या जोरावरच जगलं आहे, शरीराच्या जोरावरच या शरीराने आठ की नऊ अपत्यांना जन्म दिला आहे.

खरं तर या जंगलात खूप चांगले साप सापडतात. सापांच्या मांसात तेल खूप असतं आणि ते भाजायला आगीची आचही फार लागत नाही. चार 'मुखउंचू'जातीचे साप मिळाले तर बोलायलाच नको - अमृत! पण छोटे छोटे सापही काही अगदीच कमी नाहीत. मदारीच्या आईला विषारी साप ओळखू येतात. म्हणूनच डोळ्यांसमोर अद्याप मुंग्या न लागलेला एखादा मेलेला ससा किंवा उंदीर दिसला, तरी ती त्याला स्पर्श करीत नाही; एवढंच काय, काठीने उलटूनही पहात नाही. जंगलात जे मरतं, त्याला मातीत मिसळू द्यायचं असतं. शिवाय मेलेले प्राणी खाऊनच जे जगतात, असेही काही पक्षी आणि कीटक जंगलात असतानाच ना!

मदारी आजकाल ट्रक धुण्याबद्दल आणि घोषमशाईंच्या दुकानात कपबशा विसळण्याबद्दल मिळणारे काही पैसेही अधूनमधून, किमान एकाआड एक अशा बाजाराच्या वारी तर नक्कीच आणतो. म्हणूनच मदारीची आई एखाद्या बाजारातून तांदूळ विकत घेऊ शकते. चहाच्या मळ्यातले जे मजूर रेशनवर मिळणारे तांदूळ बाजारात विकून टाकून हाडिया दारू पिऊन गाणं म्हणत म्हणत मळ्यांकडे परत जातात, त्या मजुरांकडून ती तांदूळ विकत घेते.

पण तांदूळ विकत घेणं जितकं सोपं आहे, तितकं अग्नी विकत घेणं सोपं नाही. एखादी आगपेटी विकत घेणं काय किंवा एखादा ज्वालामुखी विकत घेणं काय, मदारीच्या आईला दोन्ही गोष्टी सारख्याच मुश्किल आहेत. तांदूळ तिला मिळू शकतात, पण अग्नी कुठून मिळणार?

मदारीच्या आईला त्यासाठी किती धूर्तपणा, किती कौशल्य वापरावं लागतं!

बाजारात एखाद्या ठिकाणी ती चुपचाप टेकून बसते. साधारणतः एका मोठ्या झाडाखाली दोन-तीन छोटीछोटी दुकानं बसतात. तरीही तिथे, त्या झाडाच्या खोडाला टेकून बसता येईल इतकी जागा मदारीच्या आईला मिळते. मदारीची आई तिथे टेकून बसते. बसूनच रहाते. बसते असं नव्हे, पहुडते. जंगलामध्ये जी रोज रानकोंबडीसारखी

सावध, सापासारखी गुप्तपणे फिरणारी, गोखरूसारखी कालान्तक असते, तीच मदारीची आई इथे मात्र एखाद्या म्हातारीप्रमाणे आपलं शरीर सैल सोडून देते.

माणसाशी माणसाची आत्मीयता अगदी रहस्यमय अशा कारणांनी तयार होते किंवा नष्ट होते. मनुष्यसमाजापासून दूर जात जात जी व्यक्ती जंगलातली रहिवासी झाली आहे, ती इतका वेळ एकाच झाडाच्या बुंध्याला टेकून पहुडलेली असल्यामुळे त्या दुकानदारांची आत्मीय बनते, आणि एखादा दुकानदार तिच्याकडे न पहाताच एखादी बिडी तिच्यापुढे करतो - हात मागे करून एक काडी पेटवून तिने स्वतःची बिडी पेटवून, कमरेत थोडं वाकून तो ती काडी मदारीच्या आईकडे देतो. काडी विझून गेली, तर स्वतःची पेटलेली बिडी तिच्याकडे देतो. अशाप्रकारे दोन वेळा बिड्या घेतल्यानंतर मदारीची आई त्याच्याकडून काडीपेटीचा दारू लावलेला भाग आणि दोन आगकाड्या मागून घेऊ शकते. अशी मागणी केल्यावर पाच-सात काड्यांसहित एखादी आगपेटी कुणी दिली, तरी या काड्या सतेज असेपर्यंत वापरण्याची संधी मिळेल की नाही अशी मदारीच्या आईला काळजी वाटते. कुणा दुकानदाराने तिची पहिलीच बिडी लायटरने पेटवून दिली, तर मदारीची आई आपली टेकून बसण्याची जागा बदलते. आणि आगकाडी अगदीच कुठे मिळाली नाही, तर त्या दिवशी मदारी घोषमशाईंच्या दुकानातून बरेचसे निखारे घेऊन जातो.

## दोनशे

# मदारी अग्नी कसा घेऊन जातो

हे निखारे घेऊन जाण्याची मदारीची खास अशी एक पद्धत आहे.

केळीच्या पानावर तो काही न पेटलेले कोळसे ठेवतो. त्यांच्यावर काही पेटते निखारे ठेवतो. त्यानंतर त्यांच्यावर पुन्हा काही न पेटलेले कोळसे ठेवतो. अशा प्रकारे दोन हातात त्या केळीच्या पानांवर अग्नी घेऊन ते मायलेक बाजाराच्या मैदानातून बाभुळझऱ्याकडे जायला निघतात.

हे त्यांना करावं लागतं ते घोषमशाई दुकानातून घरी गेल्यानंतर - म्हणजेच केवळ बाजार संपल्यावर नव्हे, तर बाजार अगदी निर्जन झाल्यानंतर. बहादुर चुलाणातले निखारे फेकून देतो. त्यानंतर बहादूरच चांगले निखारे निवडण्यात त्यांना मदत करतो.

पण अग्नी असा दोन हातांच्या पंजांमध्ये घेऊन इतके मैल घेऊन जाणं खूपच त्रासदायक असतं. हात अवघडून येतात- त्याचं काही फारसं वाटत नाही. खरी परीक्षा असते निखारे विझू न देण्यामध्ये. पाऊस आला की संपलं. तरीही पानावरच्या झाकण्याखाली अग्नी तेवता ठेवण्याची त्यांची पराकाष्ठा चालते. थोडासा जरी वारा

असला, एवढंच काय, शेजारून एखादा ट्रक गेल्यामुळे जरी वारा लागला, तरी निखारे उडतात, अंगावर पडतात, डोळ्यांवर ठिणग्या उडतात, जमिनीवर पडतात. म्हणूनच अशा वेळी मदारीला वाऱ्याच्या दिशेने, किंवा समोरच्या ट्रकच्या दिशेने पाठ फिरवावी लागते. ट्रक निघून गेल्यावर परत सरळ होता येतं; पण वाऱ्याच्या दिशेने पाठ फिरवायची असेल तर संपूर्ण रस्ताभरच निखारे वाचवण्यासाठी उलटं चालावं लागतं. त्याला खूप वेळ लागतो. एक झोप येणं सोडलं, तर मदारीला त्यात काही अडचण वाटत नाही. त्याला घरी जाऊन विस्तव तेवता ठेवणं हे जितकं अवघड काम वाटतं, तितकंच रस्त्याने विस्तव नेताना तो तेवता ठेवण्याचं कामही तितकंच आणि तसंच अवघड वाटतं. अशा प्रकारे नेल्या जाणाऱ्या अग्नीची परिणती नाना प्रकारे होऊ शकते - विझून राख होऊन जाण्याशिवायही अनेक प्रकारे वाऱ्याच्या किंवा ट्रकच्या येण्याजाण्यामुळे वरच्या बाजूचे कोळसे लगेच पेटू शकतात. लगेच पेटणं म्हणजेच लगेच राख होणं. आणि अग्नी जर एखाद्या वेळी असा आतून वरच्या दिशेला प्रज्वलित व्हायला लागला, तर जळते नखारे विखरून उडायला सुरुवात होते, तेव्हा ते फेकून देण्याशिवाय दुसरा उपाय नसतो. याच्या अगदी उलटही एक आफत येऊ शकते. अग्नी ताबडतोब खालच्या बाजूने गेला आणि निखांऱ्याखालचे कोळसे पेटले, तर तो अग्नी त्यांच्याखालच्या पानांपर्यंत येतो. तेव्हा अर्थातच मदारी आपल्या आईला जवळच्या झाडांची काही पानं तोडून आणायला सांगतो. खाली पानांचं पलिस्तर आणखी वाढवल्यावर तळहाताला आगीची धग जास्त लागत नाही.

ज्या नॅशनल हायवेवरून या भारतवर्षातील एका राज्यामधून माल घेऊन रात्रंदिवस ट्रक दुसऱ्या राज्यांमध्ये कितीतरी नवे-नवे साकव पार करून, कितीतरी नवनवीन मार्गांवरून, कितीतरी नवीन-नवीन पद्धतीने वेग वाढवीत जात असतात, त्या नॅशनल हायवेच्या एकूण लांबीच्या एका अति क्षुद्र किंवा अगदी आणविक अशा एका अंशावरून पूर्व गोलार्धातील या रात्रीच्या पहिल्या प्रहारातील काही तासांपासून एक आई आपल्या मुलासह अग्नी घेऊन मार्ग चालते; किंवा एक अग्निवह बालक आपल्या आईसह आपल्या अरण्यनिवासाकडे परत जात असतो. काळा नॅशनल हायवे काळाच रहातो, पण आसपासच्या अंधारात तो रस्ता आता दिसत नाही, केवळ तळपायांनी जाणवून घेता येतो- पाण्यामधून चालताना तळाची माती जशी फक्त तळपायांनी जाणवून घेता येते, त्या प्रकारे. जमिनीवर असा अंधार असला, म्हणजे साधारणतः नक्षत्रांची दीप्ती वाढते, इतकी वाढते, की वाटतं, नक्षत्रांचा प्रकाश जमिनीपर्यंत पोचू शकेल. पण या बाजूला तीसुद्धा सोय नसते. कारण, भारतातील एका अतिशय घनदाट अशा अरण्यामधून हा राष्ट्रीय महामार्ग जातो. अगदी याच मार्गावरून ती मायलेकरं रात्री जातात. दोन्ही बाजूंच्या दाट आणि उंच झाडांमुळे अंधार पडतो. त्या झाडांच्या पानांच्या घट्ट विणीमधून कुठेकुठे बुट्टीदार असं आकाश दिसतं खरं, पण ते जणू नदीच्या पैलतिरासारखं - त्याच्या वास्तवतेशी या

वास्तवतेचा काही संपर्क नाही - मुळीच काही संपर्क नाही. उलट अशा वेळी एक - दोनवेळा डोळे वर उचलून आकाशाकडं पहाणं धोक्याचंच असतं. कारण नंतर डोळे खाली वळल्यावर या अंधारात परत काहीच दिसत नाही. त्यापेक्षा रस्त्याना दोन्ही बाजूंकडून, फॉरेस्टच्या झाडा-पेडांमधून जो अंधकार खाली उतरतो, तो यांना थोडा ओळखीचा वाटतो. निश्छिद्र काळ्या अंधारात मदारीच्या हातात फक्त लिंबाच्या पिवळ्या रंगाचा दाबून ठेवलेला अग्नी. हा अग्नी बाभुळझऱ्यापर्यंत पोचला, तर मदारीच्या आईने आणलेल्या काटक्या धडाडून पेटतील, आणि घरातलं ते एकमेव भांडं घेऊन मदारी झऱ्यामधून पाणी घेऊन येईल. याच अग्नीतून, धुरामधून येणारा, भात शिजल्याचा आदिम गंध या आरण्यक रात्रीला कोमल करून टाकील, अंधार तेव्हा अंधार रहाणार नाही. त्या अग्निशिखेपाशी मुलाशी आईचा आणखी एक संवाद सुरू होऊ शकेल. पण त्या वेगळ्या संवादापर्यंत पोचण्यासाठी या रस्त्याने काही मैल त्या दोघांची नीरवता अशी प्रकारच्या नाना शब्दांनी खचित होत रहाते; नाहीतर त्यांची नीरवताही नैसर्गिक होऊन गेली असती.

'माय गऽ'

'हे. . .'

'एऽ मदारी. . .'

'हे. . .'

'. . .'

'माय गं. . .'

'हं. . .'

'मी विसरूनच गेलो गं'

'काय विसरलास?'

'लाडू अन् शेव. . .'

'कुणी दिली तुला?'

'घोषमशाई म्हणाले होते - दुकान बंद व्हायच्या आधी एक लाडू आणि थोडी शेव घे म्हणून. म्हणाले होते. मी विसरलोच घ्यायला.'

'कसा काय विसरलास? का विसरलास?'

'तुझ्या या आगीपायी. . .'

'आगीसाठी लाडू खायचा विसरलास? लाडू तर गोड लागतो.'

'हो. खूप गोड. मागच्या बाजारवारी खाल्ला होता मी एक. . .'

'प्रत्येक बाजारवारी तुला लाडू देतात खायला?'

'नाही. फक्त एकदाच दिला होता. पुढच्या वारी तुझ्यासाठी एक आणीन'

मदारीची आई चवींच्या आठवणी काढते आणि 'गोड' कशाला म्हणतात याचा आपल्या स्मृतीत शोध घेते.

'माय गं'

'हं'

'बहादुर म्हणतो की तो मला चहा बनवायला शिकवणार आहे.'

'मग त्यानंतर?'

'मग मला नोकरी देणार - चहाच्या दुकानात.'

'मग शिकवीत का नाही?'

'टेबल अजूनही माझ्या डोक्याच्या वरती आहे.'

मदारीची आई त्या अंधारात जणू पहिल्यांदाच आपल्या मुलाच्या उंचीचा अंदाज घेते. त्याची उंची टेबलाएवढी झाली, की मग मदारी इथं रहाणार नाही. मदारीचे थोरले भाऊ, मदारीच्या आईची या आधीची आठ की दहा मुलं - कुणीही थांबली नाहीत. मदारीही थांबणार नाही. मग मदारीची आई मिरवणुकीत जाणार कशासाठी?

## दोनशे एक

# मदारीची आई किती वेळा आई

मदारीची आई आता मदारीची आई आहे. फार फार तर आठ-दहा वर्षांपासून. त्याआधी ती आणखी बरेचवेळा आणखी अनेकांची आई होती. किती वेळा किती मदारींची ती आई होती, ते आता ती हिशेब करून ठरवू शकत नाही. इथे, या बाभुळझऱ्यापाशी ती किती वर्षांपासून रहातेय त्याचाही हिशेब तिला ठाऊक नाही. परंतु मदारीच्या जन्माच्या आधीपासून मदारीच्या आईला जे ओळखतात, असे अनेकजण अजूनही मदारीहाट भागात आहेत. ज्याला पाहिल्याबरोबर परिचयाचा सारा इतिहास आठवावा, असा काही मदारीच्या आईचा चेहरा नाही: पाहिल्यावर 'ओळखीचा वाटतोय्' असं वाटावं - इतकंच. मदारीची आई मदारीच्या जन्माआधी आणखी कुणाकुणाची आई होती हे त्यांनाही आता आठवत नाही. किंवा, हे त्यांना आठवणं शक्यच नाही. कारण, सध्या मदारीच्या आईबरोबर जो मदारी फिरतोय्, किंवा एकटा-एकटा बाजारात येतो, तो मदारीच्या जन्माच्या आधी त्याच्या आईबरोबर फिरणारा मुलगा तर नाही ना, हे त्यांना कसं कळणार? मग तर केवळ मदारीच्या आईलाच ओळखून चालणार नाही, तिच्या सगळ्या मुलांनाही ओळखायला हवं - ते शक्य तरी आहे का?

पण मदारीच्या आईला तर नेहमीच एका ना एका मुलाची गरज असते. एका विशिष्ट अशा प्रमाण आकाराचं पुरुषमाणूस तिला नेहमी हवं असतं की नाही हे कधीच तिच्या मनात येत नाही. पण एक मूल मात्र तिला अगदीच आवश्यक असतं. दुसरं म्हणजे आईवर संपूर्णपण अवलंबून असलेल्या अशा मुलाखेरीज कोण तिच्याजवळ रहाणार?

मदारीच्या आईने एक परिमाण ओळखलंय्. तिला ठाऊक आहे, की जेव्हा मूल चहाच्या दुकानातल्या टेबलाइतकं उंच होतं, किंवा स्वतः ट्रकच्या चाकावरून ट्रकमध्ये चढू शकतं, किंवा त्याला जो पैसा मिळतो, तो सगळ्याच्या सगळा ते आईकडे देत नाही, तेव्हापासून काही दिवसातच ते मूल हा बाभुळझरा सोडून निघून जातं. ते कुठं जातं हे मदारीच्या आईला कळत नाही. पण तिला अंदाजाने समजतं की ते मदारीहाटहून बीरपाडा किंवा हासिमाराला जातं. तिथे ते बस-ट्रकच्या डेपोतलं काम किंवा दुसरी काहीतरी काम थोडंफार शिकूही शकतं. या सगळ्या ठिकाणी मिलिटरीचे मोठमोठे कॅम्पस् आहेत. तिथे चोरट्या मालाच्या आडत-व्यवहारात अशा अनेक मुलांना काही ना काही काम मिळतंच. तिथून हीच मुलं एकूण पद्धतीने शिलिगुडीला पोचतात. तिथे बहुधा चोरट्या मालाचा आणखी मोठा आडत-व्यवहार चालतो. आणखी मोठ्या ट्रकगाड्यांमधून आणखी अधिक माल बहुधा तिथे येतो. त्याशिवाय तिथे रेल्वेयार्ड आहे, वॅगन्स आहेत - तिथे ही मुलं ठिकठिकाणी विखरून जातात. एवढंच काय, तिथून अनेक मुलं नेपाळमध्ये जातात, आणि तिथून अनेक प्रकारचा नवीन माल आणून इकडे भरमसाठ किंमतीला विकतात. हा सगळा माल चांगले लोकही विकत घेतात. त्यांच्यापैकी काही-काही वस्तू-शर्ट, छत्र्या इत्यादी-मदारीहाटामध्येही विकल्या जातात.

मदारीच्या आधी आपली किती मुलं जरा उंच झाल्याबरोबर, किंवा ट्रकमध्ये एकट्याने चढता यायला लागल्याबरोबर निघून गेली हे मदारीच्या आईला आठवत नाही. पण, असं निघून जाण्यापूर्वी मुलं रोज घरी परतणं सोडून देतात. पहिल्यांदा अन्नाच्या शोधात फिरणं सोडून देतात. त्यानंतर बाजारच्या मैदानातच रात्रंदिवस रहाणं सुरू करतात. बरेच दिवस आपलं मूल परतलं नाही, की मदारीची आई उमजून घेते-निघून गेलं.

पण तिचं तर काही मुलावचून चालत नाही. म्हणूनच, एक मूल उंच होणं सुरू झालं, की ती दुसरं मूल आणते - म्हणजे आधीचं मूल अन्नाच्या शोधात फिरणं किंवा बाभुळझऱ्या जवळ थांबणाऱ्या ट्रकजवळ जाऊन हात पसरणं थांबवतं, तोपर्यंत दुसरं मूल त्याची जागा घेण्याच्या वयाचं झालेलं असतं.

इतका सगळा हिशेब करून पोर पोटात धारण करण्यासाठी पोराचा एक बाप तर मदारीच्या आईला नेहमी हाताशी असणं आवश्यक असतं.

पहिल्यांदा-पहिल्यांदा तिला कुठलीच अडचण आली नाही. आणि, तेव्हा तर ती या बाभुळझऱ्यापर्यंत पोचलीसुद्धा नव्हती. पहिल्या मुलाची गोष्ट तिला सर्वात स्पष्टपणे

आठवते, कारण मुलही निघून जाईल आणि मुलाचा बापही निघून जाईल हे काही तेव्हा तिला ठाऊक नव्हतं. बाजाराच्या अगदी समोर एका प्रौढ नेपाळी माणसाचं किराणा मालाचं दुकान होतं. त्याला बायकापोरं नव्हती. त्या दुकानाच्या लांबलचक व्हरांड्यात मदारीची आई पोचली. स्वत: होऊनच ती तो व्हरांडा-बिरांडा झाडून देई. एकदा दुकानदाराने तिला दुकानाच्या आतला भागही झाडून घ्यायला सांगितलं. आणखी एके दिवशी तिला एक साबण देऊन तो म्हणाला, आतल्या आडावर जाऊन चांगली आंघोळ कर. त्यानंतरही मदारीच्या आईने साबण वापरला; पण त्या दिवशी साबण लावून आंघोळ करणं तिला जसं रोमांचकारी वाटलं, तसं नंतर कधी वाटलं नाही. स्नानानंतर तिला साडी-कपडेही मिळाले. त्या रात्रीपासून दुकानदार आधी तिला घेऊन बिछान्यात झोपे. नंतर तिला दुकानदाराचा बिछाना सोडून आपल्या बिछान्यात येऊन झोपावं लागे, कारण आणखी एका व्यक्तीबरोबर इतक्या छोट्या बिछान्यात दुकानदाराला झोप येत नसे. पण पहिलं मूल झाल्याबरोबर दुकानदाराने आणखी एक खाट आणून ती आपल्या खाटेला जोडली. मुलाबरोबर ती त्या दुकानदाराबरोबर अनेक दिवस आणि काही वर्षं राहिली. दुकानदारही मुलावर इतकं प्रेम करीत असे, की त्याला दुकानात गादीवर बसवून ठेवीत असे. मदारीच्या आईचा जो काळाचा बोध आहे, त्याच्याशी दिवस-महिने-वर्ष यांचा हिशेब मेळ खात नाही. किती दिवसांनंतर कोण जाणे - दुकानदार दुकानबिकान विकून टाकून एक पेटी हातात घेऊन तिला म्हणाला, 'चाललो गं!' मुलाच्या गालावरून हात फिरवून तो निघाला आणि बसमध्ये बसला. बाकी सगळे लोक हसत हसत त्याला निरोप द्यायला गेले. मदारीच्या आईच्या लक्षात आलं - आपण बसपर्यंत गेलेलं चालणार नाही.

पण दुकानाबरोबर आपलीही व्यवस्था नवीन मालकाकडं गेली की काय हे तिला समजलं नाही. अर्थात समजायला काही फार वेळ लागला नाही. नवीन मालकाच्या माणसाने त्याच रात्री दुकानाला कुलूप लावलं आणि तिला म्हणला, 'आजची रात्र इथं रहा. उद्या सकाळी सामानसुमान अन् पोरगं घेऊन वाटेला लागा!'

इतके दिवस घरात राहून, घरचं अन्न खाऊन तिचा चेहरा चांगला झाला होता. नवीन माणसाची जी माणसं तिला आधीच्या रात्री 'उद्या वाटेला लागा' म्हणून सांगून गेली होती, त्यांच्यापैकीच एकजण - सहराई उराँव - दुसऱ्या दिवशी पहाटे कावळे ओरडायच्या आधीच तिच्याकडे आला आणि म्हणाला, 'चल, पोराला घेऊन माझ्याबरोबर रहा.'

त्या माणसाच्या घरी जाऊन रहायला लागल्यानंतर दोन दिवसांनी तिच्या लक्षात आलं, की तो सॉ-मिलमध्ये काम करतो, आणि त्या सॉ-मिलचा मालकच दुकानाचाही नवा मालक आहे. सहराई उराँव आधी चहाच्या मळ्यात मजुरी करीत असे. तिथून कपात झाल्यानंतर सॉ-मिलमध्ये आलाय्. त्या माणसाचं घर सालाच्या लाकड्याच्या फळ्यांनी तयार केलेलं होतं. थंडीच्या दिवसात खूप थंडी वाजे. तिला आणखी एक मूल झाल्यावर

त्याने लाकडाच्या छोट्या-छोट्या तुकड्यांनी फटी बंद केल्या.

आधी सहराई निघून गेला, की तिचा पहिला मुलगा निघून गेला - हे आता मदारीच्या आईला आठवत नाही.

त्या घरात मात्र ती अनेक दिवस राहिली होती. सॉ-मिलमच्या मालकाने तिला तिथून जायला सांगितलं नाही. खूप पावसामुळे, उन्हामुळे, थंडीमुळे घराच्या फळ्या सडू लागल्या. जे लाकूड छप्पर म्हणून वापरलं होतं त्यातलं काही सडून खचलं, घराच्या फळ्याही एक-एक करीत मोडून पडल्या. हे सगळं होता-होता काही वर्षं गेली. जितके दिवस ती या घरात राहिली, तोपर्यंत तिच्याकडे एक म्हातारा राजबन्शी जोतदार आठवड्यातून एकदा संध्याकाळी येई, एक चहाच्या मळ्यातला बंगालीबाबूही काही दिवस आला, एके दिवशी मिलिटरीतला एक माणूस आला होता - आणि तिला तेव्हा नियमितपणे मुलं होत होती आणि निघून जात होती. नंतर कधीतरी ते घर संपूर्णपणे मोडून गेलं.

## दोनशे दोन

# मदारीची आई आणि मदारी यांना जाग येते

अगदी पहाटे-पहाटे कोंबड्याच्या आरवण्याने आणि मोराच्या ओरडण्याने मदारीला आणि त्याच्या आईला जाग येते. झऱ्याजवळच्या एका झाडावर मोर रात्र काढतो आणि सकाळी जाग आल्यावर निघून जातो. उन्हाळ्यात कधीकधी तो मोर संध्याकाळच्या आधीच येऊन त्या वठलेल्या झाडावर बसलेला दिसतो. ते झाडं तसं खूप दिवसांपूर्वीच मरायला हवं होतं, पण जणू काही या मोरासाठीच ते मरत नाही, वर्षानुवर्षे जिवंतच रहातं.

आणि रानकोंबडे व रानकोंबड्या तर जवळ जवळ त्यांच्या घरात येऊनच आरवून जातात.

थंडीच्या दिवसांत त्रास होतो. झाडाच्या पानांपासून तयार केलेल्या या घरात लाकडं बिकडं पेटवून शेकोटी पेटवणं शक्य झालं, आणि शक्य करावचं लागतं, तरीही पहाटे-पहाटे ती शेकोटी विझून जाते. सूर्याचा प्रकाश तर या फॉरेस्टमध्ये कुठेही सरळ असा येत नाही. पण झाडांच्या फटींमधून रस्त्याच्या पलिकडच्या बाजूला उतारावर ऊन्ह येतं. ते ऊन्ह येण्यापूर्वी मदारी आणि त्याची आई या घराच्या बाहेर पडू शकत नाहीत; जिथं पडलेली असतील, तिथंच दगडासारखी पडून रहातात.

आता पावसाळा जवळजवळ संपलाय्, थंडीचे दिवस अद्याप आलेले नाहीत. आकाश स्वच्छ होतच आलंय्. पण कधीमधी अचानक पाऊस पडतो. दुपारच्या वेळी

फॉरेस्टमध्ये साठलेल्या पाण्यावरून येणाऱ्या वाऱ्यामुळे श्वास घुसमटल्यासारखा होतो. अशा वेळी शरीर खूप गरम होतं. आणि सकाळी सगळी झोंझुडपं दंव पडल्याने जणू पावसात भिजल्यासारखी वाटतात. अशा एका दंवभरल्या सकाळी मदारीला जाग येते, 'ए, माय, चल, जाऊ की जुलूसात!'

मदारीला अजूनही वाटतं, आई जुलूसात गेली, तरच आपल्यालाही जायला मिळेल. मदारीच्या आईला वाटतं, पोराला म्हणावं, तू जा बाबा, मी काही येणार नाही. पण, त्यामुळे तर मदारीला खुद्द आपल्या आईकडूनच समजेल, की आईशिवायसुद्धा तो जुलूसात, एवढ्या मोठ्या जुलूसात जाऊ शकतो. जोपर्यंत ही गोष्ट मदारीच्या स्वत:च्याच लक्षात येत नाही, तोपर्यंत मदारीची आई ती त्याच्या लक्षात आणून देऊ इच्छीत नाही. या वेळी बहुधा तिच्या हिशेबात जरा गोंधळ झाला आणखी एक मूल पोटात येण्याआधीच आधीचं मूल निघून जाण्याइतकं उंच झालं. पण पोट तर तिचं आहे-आता या ठिकाणी पोटात मूल धारण करण्यासाठी त्याचा बाप कुठे मिळणार? झाडापासून, रानकोंबड्यांपासून, मोरांपासून तर काही कुठल्या बाईला गर्भ राहू शकत नाही. किंवा असंही होऊ शकेल की तिला आता आणखी मुलाची गरज पडणार नाही. बहादुरने मदारीला चहा तयार करायला शिकवल्यावर त्याला घोषमशाईच्या दुकानात चहा तयार करण्याची नोकरी मिळेल, किंवा या बाजारातच त्याचं ट्रक पुसण्याचं काम वाढेल.

तिला हे सगळे विचार या प्रमाणे सुचतात असं काही नाही, पण अशीच काहीशी भावना तिच्या मनात असतेच.

म्हणूनच, मदारीने हाक मारल्याबरोबर ती प्रतिसाद देते, 'तू खरंच जाणार होय रे?'

मदारीने पडल्यापडल्या आईला हाक मारली होती. आईच्या या प्रश्नावर तो धडपडून उठून बसतो. म्हणतो, 'हे काय म्हणतेस आई? काल बाजारात कितीवेळा त्यासाठी मारामारी आणि कितीवेळा दवंडी! तीनचार ट्रक जाणार असं ठरलंय्. सगळ्यांनी जायचं ठरलंय्. मारामारी होणार---'

मदारीची आई उठून बसते. थोडं हसून विचारते, 'तू काय मारामारी करणार की मार खाणार?'

'कोण मारणार? मला? एक घोषमशाई सोडून दे, दुसरं कुणीही मला मारू शकणार नाही. चल, चल, ट्रक निघून जातील,' मदारी घरामध्येच उठून उभा रहातो आणि त्या अंधुक उजेडात, मदारीला अजूनही एकट्याने घर सोडावसं वाटत नाही हे पासून मदारीच्या आईला हायसं वाटतं. मदारीची आई पडूनच रहाते आणि मदारी बाहेर जाऊन लघवी करतो. लघवी करत-करता ओरडतो - 'माय गंऽ'

'हं'

'धुकं पडलंय्, दाट धुकं!'

'तर मग आत ये ना!'

'या असल्या धुक्यात ट्रक येतील का?'

मदारी हाताची घडी घालतो, मग डाव्या हाताने उजवा खांदा धरतो, उजव्या हाताने डावा खांदा धरतो आणि थंडीने थोडा कुडकुडतो. मदारीची आई मनातल्या मनात तोपर्यंत जुलूसात जाण्यासाठी तयार झालीय्. पण तिला हे जाणवंतय्. त्यांना बरेच मैल अंतर चालून बाजाराच्या मैदानावर पोचायचं असल्याने तिथं पोचण्यासाठी लवकर निघायचं असलं, तरी इतक्या लवकर नक्कीच नाही. तीसुद्धा आता जुलूसात जाणार - या विचाराने तिच्या मनात थोडा उत्साह संचारतो. कुठेतरी जाण्याचा उत्साह. पण बाहेर जाण्याच्या तयारीची आत्ताच सुरुवात करायला ती राजी नाही. त्यासाठी अजूनही थोडा वेळ तिच्या हाती आहे.

'मदारी, अजून थोडा वेळ झोप ना, जायला थोडा उशीर आहे.'

'मी जातो आधी, तू ये मागून!' मागे वळून, घरात जाण्याच्या वाटेकडे पहात, पुन्हा एकदा कुडकुडत मदारी म्हणतो :

'तर मग मी नाही जाणार!' मदारीची आई म्हणते.

मदारी आपल्या आईजवळ येतो आणि म्हणतो, 'अच्छा, अच्छा, मी आलो परत. आता येणार ना, माय?'

मदारीची आई काहीच उत्तर देत नाही.

'माय गंऽ!'

'हं'

'कधी निघायचं?'

'उगाच उभा कशाला राहिलायस? अजून तर रात्र संपली नाही. तुझा जुलूस काय अंधारातच निघणार होय रे?'

'नाही. रात्र संपलीय्, धुकं पडलंय्. दाट धुकं!'

'थोडा उजेड होऊ दे, नाहीतर बाजारात जाऊन उगीच बसून रहावं लागेल!'

'काल मी ऐकून आलोय्-ट्रक लवकर निघणार आहेत. खूपऽप-खूऽप दूर जायचंय् ना! इथूनच उशीर केला तर पोचणार कधी?

'ट्रकमधून कुठं जायचंय्-तुला ठाऊक आहे?'

'आहे तर! तिस्ता नदीच्या उगमाजवळ - तिथं बंधाऱ्याच्या उद्‌घाटनासाठी सगळे मंत्रीलोक येणार आहेत. मग इथूनच लवकर निघालो नाही, तर पोचणार कधी?'

'पोहोचू, पोहोचू. . :ट्रकगाडी किती जोरात जाते पाहिलंयस् ना?'

हो. ट्रकगाडी जोरात जाते. पाहिलंय् मी.'

मदारी बोलणं थांबवतो, ट्रकगाड्यांशी आईपेक्षा त्याचा संपर्क अधिक आहे. आता बोलणं थांबवून तो ट्रकगाडीच्या गतीची कल्पना करतो. त्याच्या या घरामधून, त्याच्या घरासमोरच्या रस्त्यावरून, बाजारासमोर उभा राहून तो ट्रकगाड्या किती वेगाने धावतात ते नेहमी पहातो. ट्रक जवळून गेला तर अंगाला वाऱ्याचा झोत जाणवतो. अनेकदा वळून अशा वेळी तोल सांभाळावा लागतो. मदारी आपल्या आईजवळ, पाचोळ्याच्या जाड थरावर अंथरलेल्या चटईवर पडतो. पडल्याबरोबर तो त्या नरम बिछान्यात बुडून जातो. हीच या घरातली एकमेव चैन आहे - पाचोळा आणून गादी तयार करणे. पाचोळा आणून पसरावा लागतो. त्यामुळे जमिनीमूळे पाण्याची ओलही लागत नाही.

परत येऊन आपल्या ट्रकचा विचार करता-करताच मदारीला बहुधा थोडी डुलकी लागते. पण त्याच्या आईला जणू आणखी काही माहिती हवी आहे. ती पुन्हा एकदा अगदी हळुवारपणे हाक मारते, 'एऽ मदारी!' पण मदारीने उत्तर न दिल्याने गप्प होते. गप्प होऊन बाहेरचे आवाज ऐकते. जोराचा पाऊस थांबल्यावर जंगलामधून टुप्-टाप् असा आवाज बराच वेळ ऐकू येत रहातो. ज्याला हा आवाज ठाऊक नाही, त्याला हा पावसाचाच एक छंद आहे असं वाटू शकतं. त्या आवाजाचेही वेगवेगळे पैलू असतात, परिमाणं असतात किती उंचावरून हे थेंब कोणत्या झाडावर किंवा पानांवर पडतात यावर पैलू अवलंबून असतात. मदारीची आई ऐकते - जंगलामधून तोच टुप्-टाप् आवाज सुरु होतोय्, पसरतोय्, पुढे येतोय् - दंव पडतय्. ती आणखी दोन-तीन आवाजांची वाट पहातेय् - इथून निघण्यासाठी.

## दोनशे तीन

# मदारी प्रथमच चहा करतो

पण एवढं करूनही जेव्हा मदारी आणि मदारीची आई इतके मैल अंतर चालून जेव्हा बाजाराच्या मैदानात पोचतात, तेव्हा तिथे एक मोठा ट्रक दंवात भिजत उभा असलेला दिसतो खरा, पण आणखी कुणीही माणूसबाणूस दिसत नाही. मैदान इतकं निर्जन पाहून मदारी म्हणतो, 'ए माय गंऽ, जुलूस, गेला गं निघून-'

मदारीची आई म्हणते, 'एकबी मानूस नाही आन् तुझा जुलूस निघून गेला व्हय रे? असला कसला तुझा जुलूस? हे काय इथं एक ट्रक दवांत भिजत उभाय्!'

मदारी धमकीच्या स्वरात आईला म्हणतो, 'एऽ चूप बस्! हा ट्रक तर नेहमी इथंच असतो-सिंगबाबूंचा ट्रक-लाकूड जात असतं याच्यातून.'

मदारीची आई म्हणते, 'चल, जरा बसू. मान्सं येतील आता. तुला सारखं सांगत व्हते ना, की आजून टाईम झाला नाही, टाईम झाला नाही. . .'

असं बोलत-बोलत ती दोघं बाजाराच्या मैदानात शिरतात. शिरल्याबरोबर बघतात, की घोषमशाईंच्या दुकानाचा दरवाजा अर्धा उघडा आहे. मदारी पळत-पळत दुकानाच्या मागे जाऊन पहातो - बहादुर ट्यूबवेलसमोर उकिडवा बसून बोटाने दात घासतोय्.

'अरे ए बहादुर दादा, जुलूस कधी निघणार इथून?'

बोटं तोंडाबाहेर काढून डोळ्यांच्या खुणेनेच बहादुर मदारीला ट्युबवेलमधून पाणी काढायला सांगतो. या ट्युबवेलचं हँडल अवजड आहे - वरतीच रहातं. एकदा खाली दाबलं, की उसळी घेऊन पुन्हा वर जाऊ पहातं. बहादुरने खूण केल्याबरोबर पळत येऊन मदारी हँडल धरतो. हँडल थोडं लांब आहे आणि उंचावर आहे. लोकांचा हात जिथे लागतो, तेवढी जागा स्टीलसारखी चकचकीत आहे, बाकीचा भाग काळसर रंगाचा आहे - वापराच्या उज्वलतेसह काळसर. स्टीलसारख्या रुपेरी दिसणाऱ्या त्या भागाच्या अगदी छोट्या अंशावर मदारीचा हात पडतो.

हँडल वरून खाली ओढण्यासाठी मदारी त्याला एक जोरदार झटका देतो. पण पहिल्या झटक्याने काही हँडल खाली येत नाही. त्यावर आणखी एक झटका दिल्याबरोबर हँडल थोडं खाली येतं आणि मदारी उडी मारून आपल्या पोटावर हँडलच्या वरच्या भागावर झुलू लागतो - त्याचा डाव्या पायाची बोटं जमिनीला स्पर्श करतात, उजवा पाय अधांतरी तरंगतो, त्यांची पँट कमरेवरून घसरते, हँडल खाली येतं आणि ट्युबवेलमधून धबधबा पाणी पडतं. या ट्युबवेलची हीच मजा आहे. हँडल एकदा खाली केल्याबरोबर एक बादली पाणी बाहेर पडतं. बहादुर पाण्याजवळ येतो, ओंजळीत पाणी घेऊन साऱ्या चेहेऱ्यावर शिंपडतो, तोंडात घेतो, जोरजोरा गुळण्या करतो, 'ह्याक थू:' म्हणून जोरजोरात घसा साफ करतो आणि मदारीच्या हातातलं हँडल खटास् करून वर जातं.

मदारी पुन्हा दोन्ही हातांनी हँडल झटका देऊन खाली करतो. या वेळी एकाच झटक्यात हँडल खाली येतं, पुन्हा मदारी पोटाचा भार हँडलवर देऊन हँडलला खाली आणतो आणि खालीच केलेल्या अवस्थेत ठेवतो. धबाधबा करीत पाणी पडायला सुरुवात झाल्यावर बहादुर तोंड धुणं संपवून हातांचाही काही भाग धुवून ट्युबवेलपासून दूर सरकतो. मदारीने हँडल सोडल्यावर आवाज करीत ते वरती जातं. अनाडी लोक ट्युबवेलचं पाणी काढायला गेले, तर हनुवटीवर किंवा कपाळावर हँडलचा फटका खातात.

मदारीची आई दरम्यान पायीच येऊन रस्त्याच्या या बाजूला येऊन थांबलीय्-तिथून ही ट्युबवेल स्पष्ट दिसते. पण मदारीची आई इकडे पहात नव्हती-ती आपल्या डाव्या बाजूला पहात होती. या दिशेने ती दोघं मायलेकरं आली आहेत. हा रस्ताच त्यांच्या अधिक

परिचयाचा आहे.

बहादुर दुकानाच्या आतमध्ये जातो, मागे-मागे मदारी. तेवढ्यात मदारीची आई रस्त्यावर बेचैनपणे थोडं चालल्याने दृष्टीआड गेलेली आहे. मदारी बहादुरला विचारतो, 'एऽबहादुरदा, जुलूस कधी जाणार?'

बहादुर एका छोट्या टॉवेलने हात पुशीत-पुशीत म्हणतो, 'जाईल, जाईल - तुझा जुलूस काय पाखरासारखा पंख पसरून उडत जाणार आहे होय? अरेऽ, माणसं उठणार, चहा पाणी घेणार, नाष्टाबिष्टा करणार, आंघोळ करणार, भांगबिंग पाडणार, फलाणं करणार, बिस्तानं करणार, अन् मग जुलूसात जाण्यासाठी चालत इथं येणार-तुला काय वाटलं-सगळे आपले तुझ्यासारखे झोपेतून उठल्याबरोबर लगेच धावतपळत इथं येणार, होय रे?' हे सगळं बोलता बोलता एका छोट्या आरशासमोर उभा राहून बराच वेळ बहादुर भांग पाडतो, कंगव्यावर अंगठा फिरवून आवाज काढतो, नंतर कंगवा आपल्या छोट्या हाफपँटच्या मागच्या खिशात ठेवून देतो.

'एऽ मदारी, इकडं बघ, चुलीवर पाणी उकळून चहा कर तीन कप-तुझ्या आईसाठी एक,' म्हणून दुकानातल्या एका फडताळातून एक छोटं गाठोडं खाली काढून बहादुर त्यातून एक रंगीबेरंगी कपडा बाहेर काढतो. केस विस्कटणार नाहीत अशा बेताने त्यातून डोकं बाहेर काढून नंतर बाह्यांमध्ये हात घालतो. तो कपडा त्याने कमरेपर्यंत ओढल्यावर लक्षात येतं, की पुढच्या बाजूला एक खूप रंगीबेरंगी चित्र असलेला तो एक गोल गळ्याचा बनियान आहे.

आता पुन्हा त्याच आरशासमोर येऊन, मान थोडी वाकवून बहादूर आपली छबी त्यात पहातो.

'पाणी तर उकळतंय्, एऽ बहादुरदा!' - विझत चाललेल्या विस्तवावर रात्रभर उकळत असलेल्या पाण्याच्या भांड्याजवळून मदारी विचारतो.

'टेबलावर बघ, तिथं मग आहे. तो अर्धा भरेल इतकं पाणी ओत त्याच्यात.' म्हणून बहादुर दुकानाच्या दुसऱ्या एका कोपऱ्यातून एक फुलपँट काढतो, आणि तिथेच पँट घालीत उभा रहातो. प्रथम पँट कमरेपर्यंत ओढतो, नंतर ती नीट बसावी म्हणून पुढे वाकतो. कंगवा हाफपँटमधून बाहेर काढून हातात ठेवतो. त्यानंतर तो कमरेचं बटण लावतो, चेन वर ओढतो आणि कंगवा मागच्या खिशात ठेवतो. तोपर्यंत मदारी आपल्या पायांच्या बोटांवर उभा राहून टेबलावरून मग आणतो. त्या हंडीतून एका ॲल्युमिनियमच्या ग्लासने पाणी काढून मग अर्धा भरतो. दोन ग्लास पाणी मगमध्ये ओतल्यावर त्याला वाटतं, अर्धं काम झालं. मग दुकानाच्या आतल्या भागात डोकावून तो म्हणतो, 'ए बहादुरदा, आता काय करू?'

बहादुर तेव्हा कमरेला एक रुंद चकचकीत बेल्ट बांधीत असतो. बेल्ट टाईट करीत-करीत तो म्हणतो, 'थांब, येतोच!' मग बेल्ट बांधीत-बांधीतच तो चुलाणाकडे येतो. त्याला पाहून मदारी चित्कारतो, 'एऽ बहादुरदा, तू तर एकदम मिलिट्रीतल्या जवानासारखा दिसतोयस्!'

बहादुर एक डबा आणून त्यातून तीन-चार चमचे साखर मगमध्ये टाकतो, नंतर एका कढईतून एका छोट्या ओगराळ्याने दूध घेऊन ते त्यात ओततो. ओगराळं परत कढईत ठेवून बहादुर दुसऱ्या एका डब्यातून थोडा डस्ट चहा बाहेर काढतो आणि तो चहाने भिजलेल्या, तांबूस रंगाच्या एका छोट्या फडक्यात टाकून, त्याची पोटली करून ती मदारीच्या हाती देतो - 'ही त्यात घालून हलव. चहाला रंग आली की ही पॉवडर टाकून देऊन मग चमच्याने हलव.'

'चमचा कुठंय?'

'टेबलावर' म्हणत बहादुर परत दुकानाच्या आतल्या बाजूला जातो. मदारी चहाच्या पॉवडरची पोटली घेऊन परत टेबलाजवळ जातो, पायांच्या बोटांवर उभा राहून एक ॲल्युमिनियमचा चमचा घेऊन येतो. मगमध्ये चमचा घालून ढवळताना जो आवाज येतो, त्या आवाज करण्यामुळेच तर मदारीला बहादुर एवढा थोर वाटतो. आज जुलूसाच्या संधीमुळे मदारीला प्रथमच मगमध्ये चमचा हलवण्याचा अधिकार मिळालाय.

चहाची पोटली दूध-साखर घातलेल्या गरम पाण्यात घातल्याबरोबर मदारी चमचाचा आवाज करायला सुरुवात करतो. बहादुर जसा जोरजोराने आणि मोठ्याने चमचाचा आवाज करतो, त्याचप्रमाणे. त्यामुळे मग हलून थोडा चहा जमिनीवर सांडतो. तेव्हा मदारी डाव्या हाताने मग आणखी जोराने दाबून धरतो.

## दोनशे चार

# बहादुरचा नट्टापट्टा व एकत्र चहापान

'एऽबहादुरदादा, ग्लासात ओतू? चहा?' चमचाने मनसोक्तपणे ढवळून झाल्यावर मदारी विचारतो.

'नको ओतूस. मी आलो. थांब जरा.' बाहादुर चित्कारत म्हणतो.

मदारी थोडावेळ गप्प बसतो, मगमध्ये आपण तयार केलेल्या चहाकडे पहातो-खरोखरच, बहादुरने तयार केलेल्या चहासारखाच रंग आलाय्. तो बहादुरकडे पहातो आणि पुन्हा चित्कारतो, 'टेबलावर ठेवून देऊ का हा चहाचा मग?'

'दे, ठेवून दे,' बहादुर हळू आवाजातच म्हणतो.

घोषमशाईंचं दुकान थोडं मोठं आहे. गवताचं छप्पर, मातीची जमीन, फक्त चूल आणि कपाट ठेवायची जागा तेवढी बांधलेली. ती बांधलेली खरी, पण मातीने इतकी मळलेली आहे की सिमेंट आता दिसत नाही. दुकानात रांगेने बेंच ठेवलेले, एक उंच बेंच, एक कमी उंचीचा असे शाळेतल्या वर्गात असतात, तसे. दुकानाच्या खोलीत एकेका जागी एकेक वस्तू कोंबून ठेवलेली. खाली वाक-वाकून बहादूर नट्टापट्टा करीत होता. घराच्या या बाजूलाही झाप आहे. ते उघडलं की वाटतं, जणू डोक्यावर छप्परच नाही. फक्त मागचं झाप बाजाराच्या दिवशी उघडलं जात नाही-कुणी पैसा न देता त्या रस्त्याने पळून जाऊ नये, म्हणून. आता सगळी झापं खाली केलेली आहेत. फक्त चुलीजवळचं छोटं झाप उघडलेलं आहे. त्यामुळे एवढ्या मोठ्या दुकानात अंधारच वाटतोय्. म्हणूनच बहादुर आणि मदारी असे चित्कारत बोलताहेत.

किंवा बाजारच्या दिवशी दुकानात असं चित्कारत बोलण्याच्या सवयीमुळेच आताही ते त्याच पद्धतीने बोलत आहेत.

मदारी दोन्ही हातांनी 'मग' उचलतो. त्यानंतर, पुन्हा खाली ठेवतो-मग घेऊन उभं रहाताना चहा सांडला तर? मदारी मगचा कान दोन्ही हातांनी धरून उचलतो, पण सरळ होण्याआधीच काहीतरी झाल्याने मग खाली ठेवतो. या प्रकारे कान धरून मग उचलून तो टेबलावर ठेवू शकत नाही. तिथे तर त्याला पुन्हा पायाच्या बोटांवर उभं रहावं लागेल. पुन्हा खाली वाकून मगच्या कडेला दोन हातांनी गच्च धरून तो मग उचलतो. गरम असला, तरी अर्धा मगच चहा असल्याने हातांना एवढा चटका बसत नाही. उजवा हात थोडा घसरतो, तरी मदारी तसाच टेबलपर्यंत जातो आणि दोन्ही हात आपल्या डोक्यावर उचलून, 'ठक्' करून मग टेबलवर ठेवतो.

दोन्ही हात आपल्या शरीराजवळ सोडून मदारी एखाद्या वयस्कर माणसाप्रमाणे निःश्वास टाकतो. त्यानंतर पुन्हा श्वास घेऊन ओरडतो, 'एऽ बहादुरदा-'

बहादूर आता अगदी जवळून बोलत असल्यासारख्या स्वरात म्हणतो, 'काय रे?'

'ठेवला. 'मग' टेबलावर ठेवला.'

'थांब, येतो-'

ज्या जागेवर बसून आपण चहा केला, त्या जागेकडे मदारी पहातो. चमचा तिथंच पडलेला आहे. चमचा उचलून टेबलावर ठेवेपर्यंत बहादुर येऊन हजर. मदारी जणू आपल्या इतक्या साधनेने तयार केलेला चहा विसरून जातो - मुग्ध होऊन बहादुरकडे पहातो. गोल चित्र काढलेला बनियान, लोखंडाची नाल लावलेला रुंद बेल्ट, निळ्या रंगाची नॅरो पँट आणि पायात बूट - अगदी घोट्याच्या वरपर्यंत पाय झाकणारे बूट. मदारीला बहादुर इतका वेगळा आणि अनोळखी वाटतो, की दोन-तीन पावलं मागे जाऊन मदारी

त्याच्याकडे पहातो.

बहादुर येऊन तीन काचेचे ग्लास काढतो आणि मगमधून त्यांच्यात चहा ओततो. मान न वळवता, एक ग्लास मदारीच्या दिशेने पुढे करीत म्हणतो, 'हा तुझ्या आईला देऊन ये-'

मदारी ग्लास घेऊन बाहेर जायला निघतो, तेवढ्यात मदारी म्हणतो, 'जरा थांब!'

त्यानंतर मिठाईच्या कपाटाचं कुलूप उघडून ते घोषमशाईंच्या खुर्चीवर ठेवून, आतून एक प्लॅस्टिकचा डबा बाहेर काढून, तो उघडून, त्यातून एक लांब 'कुकीज' बिस्किट मदारीच्या हाती देऊन म्हणतो, 'जा, आईला देऊन ये.'

दोन पावलं गेल्यावर काही शंका आल्याप्रमाणे थांबून मदारी विचारतो, 'चहा आणि बिस्किट दोन्हीही आईला देऊ?'

'हो, हो. तुझं बिस्किट ठेवलंय् इथे.' म्हणून बहादुर आपला चहाचा ग्लास आणि बिस्किट घेऊन त्या झापातून बाहेर येतो.

घोषमशाईंचं दुकान बाजाराच्या मैदानाच्या अगदी दक्षिण सीमेवर, रस्त्याला लागूनच आहे. नैऋत्य कोपऱ्यात. पण ट्यूबवेल दुकानाच्या दक्षिणेला आहे. ट्यूबवेल नसती, तर ही दक्षिण बाजूच दुकानाची मागची बाजू झाली असती.

बाहेर आल्याबरोबर लक्षात येतं, जणू अचानक सकाळचा प्रकाश खूप वाढलाय्. धुकं कुठेच राहिलेलं नाहीय्. बाजारमैदानाच्या नाना पडक्या छपरांवर, अंगणांमध्ये, रस्त्यावर ऊन पडलंय्. मैदानातली असमतल जमीन दंवाने भिजलेली आहे. मदारीची आई रस्त्याजवळ, थोडी उन्हात बसलीय्. रस्त्यावरच आणखी दोनचार माणसं फिरताहेत. मैदानात एका ठिकाणी दहा बारा लोकांचा एक समूह उभा आहे, उन्हातच.

अशा प्रकारे प्रकाशित झालेल्या जागेमधून, एवढे लोक पार करून, मदारी इतकं अंतर चालून येऊन आपल्या आईला चहा-बिस्किट देतोय् यावर विश्वास बसत नाही. हे ठाऊक नसलेला मदारी घोषमशाईंच्या दुकानातून या बाजूला येऊन आईला शोधण्यासाठी इकडे-तिकडे पहाताना जरा बावरतो. का बावरतो हे त्याला समजत नाही. म्हणूनच आई दिसल्यावर चहाचा ग्लास आणि बिस्किट घेऊन तो तिच्याकडे जातो.

आईला चहा देऊन मदारी म्हणतो, 'मी केलाय्, बहादुरदाने मला शिकवलंय्.'

चहाचा ग्लास घेत मदारीची आई विचरतो, 'टेबलावर?' जणू जुलूसाच्या या दिवशी मदारीची उंची अचानक टेबलावर चहा करण्याइतकी वाढलीय् की काय हे समजून घेणं तिच्या दृष्टीने सर्वात महत्त्वाचं आहे.

मदारी हसत म्हणतो, 'नाही, जमिनीवर. तिथे चूल आहे. जमिनीवर. तिच्यासमोर- जणू खोलीच्या जागेचा नकाशा त्याला आईला नीट समजावून सांगायचाय्, अशा स्वरात तो बोलतो.

मदारीची आई बिस्किट त्याला देऊ करते. मदारी आपले दोन्ही हात कमरेवर ठेवून म्हणतो, 'हे तुझं आहे, बहादुरदाने दिलंय्, तू खा ना आई-चहा, बिस्किट दोन्ही घे. बिस्किट बहादुरदाने दिलंय् आणि चहा मी केलाय्, घे.' आई चहा पितेय् हे पाहणंच जणू त्याचं सर्वात महत्त्वाचं काम आहे, अशा थाटात तो अचल उभा रहातो.

मदारीची आई बिस्किट चहात भिजवून त्याचा एक तुकडा तोडते आणि तिचं तोंड चहाच्या कोमट, तरल स्वादाने भरून जातं. बिस्किटाच्या एक अखंड तुकड्याने तिचं तोंड भरून जातं. ती तो तुकडा चावीत नाही. तोंडातल्या सगळ्या भागांनी-टाळूने, गालांच्या आतल्या भागांनी, दातांनी, जिभेने-ती त्या नरम अखंड तुकड्याचा आस्वाद घेत रहाते. बहादुर हाक मारतो, 'एऽमदारी, तुझा चहा घे.'

बाहेरच्या गर्दीमधला एकजण विचारतो, 'काय, चहा मिळणार का?'

बहादूर हात वर करून घोषणा करतो, 'आज जुलूस, आज दुकान बंद!'

## दोनशे पाच

# हाट-मैदानात नाचगाणं

सकाळी आठ-साडेआठच्या सुमारास संपूर्ण बाजार-मैदानाची 'कमाण्ड' जणू बहादुरच्या हाती जाते.

तेव्हापासूनच लोक एकत्र व्हायला सुरुवात होते. रस्त्याने रांगा-रांगांनी तर लोक येतातच, रस्त्याव्यतिरिक्तही नाना दिशांनी लोक येतात. बाजारमैदानाच्या उत्तरेकडून गाणं गात गात देवपाडा इथल्या चहाच्या मळ्यात मजुरी करणाऱ्या महिला मजूर येतात. त्यांच्या मागे मागे ढोल वाजवीत पुरुष मजूर. प्रत्येक व्यक्तीने आंघोळ केलीय, डोक्याला तेल लावलंय्. महिला तरुणींनी केसांमध्ये फुलं माळली आहेत-जी फुलं हाताशी सापडली, ती फुलं. हे लोक नदी, टेकडी आणि फॉरेस्ट पार करून आले आहेत हे त्यांच्या पायांकडे पाहून लक्षात येत होतं. पण बाजारमैदानात आल्यावरही त्यांचा नाच थांबत नांही-उलट जणू आतापर्यंत फॉरेस्टमधून चालत यावं लागलं असल्यामुळे त्यांना नाचण्यासाठी चांगली जागा मिळाली नव्हती. त्याशिवाय, वेळेवर बाजारमैदानात पोचण्याची घाईसुद्धा होती. इथं आल्यावर त्यांना दिसतं की अजून निघायला वेळ आहे, मैदानात जागाही बरीच मोकळी आहे आणि येता-येता नाचही पायांमध्ये चांगला जमला आहे-ते गात-गात नाचायला सुरुवात करतात. महिला, तरुणी नाचतात, त्यांच्या मागे पुरुष ढोल वाजवतात आणि डोलतात, ढोल वाजवतात आणि डोलतात. एकजणाने एक बासरीही आणलीय्.

पण त्याने इतकी हाडिया दारू घेतलीय् की त्याला बासरी धडपणे ओठांना लावता येत नाही. बासरी ओठांना लावायच्या प्रयत्नात तो ती एकदा हनुवटीला, एकदा गालांना, एवढंच काय, एकदा गळ्यालाही लावतो. लावून फुंकर मारतो. बासरी वाजत नाही-मग ती नीट निरखून तिची परीक्षा करतो. परत बासरी ओठांना लावायचा प्रयत्न करतो.

देवपाडाहून आलेल्या मजुरांच्या दलामध्ये हामिरपाडा, खयेरबाडी आणि मुत्तामबाडीहून आलेले मजूर कधी मिसळून जातात, ते समजतही नाही. एक दल बरंच मोठं झालं की आणखी एक दल तयार होतं. त्यांचा ढोल वाजत रहातो, वाजतच रहातो. बुडितोरसारच्या चरामधून एक संताळांचं दल आलंय् - ते या मजुरांपैकी कुणाला ओळखत नाहीत, पण त्यांचा नाच आणि ढोल संताळांच्या लक्षात येतो-तेही मजुरांबरोबर नाचायला सुरुवात करतात. वाटतं, आज बाजारमैदानात नाच होणार असंच ठरलं होतं की काय?

जवळच्या खेड्यांमधून राजबन्शी लोकांचं दल येतं-तेही आपापले सर्वात चांगले आणि स्वच्छ कपडे घालून सजले आहेत. महिला, तरुणी आणि वयस्कर पुरुष आंघोळ करूनच-किंवा डोक्याला, तोंडाला तेल माखूनच आले आहेत. ते नाचत नाहीतेय-गोल उभे राहून हा नाच पहाताहेत.

बहादुरने कुठूनतरी एक बॅटनही मिळवलाय्.

तो बॅटन घेऊन बहादूर नाच पहाणाऱ्यांना रांगेत आणि शिस्तीत उभं करण्यात गुंतलाय्. लांब-लांब पावलं टाकीत एखाद्या लष्करी जवानाच्या ऐटीत फिरतोय्. लहान मुलांना खाली बसवतोय, बायकांना एका बाजूला उभं रहायला सांगतोय तो एखाद्या लष्करी जवानाच्या ऐटीत फिरतोय्. लहान मुलांना खाली बसवतोय, बायकांना आणि अधूनमधून विनाकारण, 'एऽ मागं व्हा! मागं व्हा!' असं ओरडतोय्. बहादुरला इथे जमलेल्या लोकांपैकी जवळजवळ प्रत्येकजण ओळखतो. त्यामुळे त्याच्यातलं हे परिवर्तन सगळ्यांना खूप नाटकीय वाटतं. नाच आणि ढोल तर काय, ते नेहमीच पहात असतात.

गर्दीमधून कुणीतरी ओरडतं, 'एऽ बहादुर! घोषमशाई बोलवताहेत तुला!'

बहादुर त्याच्या दिशेने बॅटन उंचावीत म्हणतो, 'आज जुलूस, आज दुकान बंद!'

अचानक मागून 'है-है, आवाज आल्याने सगळेजण मागे वळून पहातात-रस्त्यावर तीन ट्रक येऊन उभे राहिले आहेत. त्यांच्यामध्ये स्त्री-पुरुष भरलेले आहेत, झेंड्यासारखंही काहीतरी आहे. ते नाच पाहाताहेत. बहादुर पळत त्यांच्याजवळ जातो. एकजण ड्रायव्हरजवळच्या सीटवरून, खिडकीतून तोंड बाहेर काढून काहीतरी विचारतो, बहादुर त्याला उत्तर देतो-'ट्रक तर काही अजून आलेले नाहीत, यायचा टाइम झालाय्.' तो ट्रक आवाज करीत निघून जातो. बहादुर मागच्या ट्रकजवळ जाऊन उभा रहातो, आणि ड्रायव्हरला उद्देशून म्हणतो, 'चला, आम्ही येतोच मागून! तिसऱ्या ट्रकला तो हात वर

करून, बॅटन वर करीत पुढे जायची आज्ञा देतो. तो ट्रक निघून गेल्यावर बहादुर चित्कारतो, 'हान्टुपाडा टी इस्टेट निघून गेली, आता लंकापाडा येणार-'

''मग तुम्ही कधी येणार रे? बहादुर?'' एक बुटका म्हातारा येऊन बहादुरला विचारतो.

'ते सगळे चहाच्या मळ्यातले लोक,मळ्यांचे स्वत:चे ट्रक आहेत-बसले अन् निघाले! आता तुमच्यासाठी कुणीतरी कॉंट्रॅक्टर ट्रक देणार, तो ट्रक तिथून इथं येणार, मग तुम्ही जुलूसात जाणार. साला जुलूस लई शानदार. हेऽ पॅंक पॅंक करीत मुख्यमंत्री येतील. आमचा वनमंत्रीही असेल, आणि आम्ही साले जाणार, तर बघणार बांबू उभे आहेत, मंत्रीही नाहीत अन् तिस्ताही नाही! बहादुर पुन्हा त्या नाचणाऱ्यांच्या दलाकडे जातो. जे आधी नाच पहात होते, त्यांची गर्दीही आता विस्कळित झालीय्. मागच्या बाजूने बहादुर चित्कारतो, 'हेऽलाईन ठीक ठेवा ना, लाईन ठीक करा. एऽ इकडंतिकडं जाणाऱ्यांनो, देऊ का एक ठेवून? बस, ट्रक आल्यावर सगळ्यांनी लाईनीत जायचं, वन्-टू-थ्री!'

आता ही गर्दी पाहून असं वाटू शकतं, की जुलूस बहुधा एकच होतोय् आणि त्याच्यात कामतापूर, उत्तरखंड, गोर्खालॅंड, नमशूद्र समिती - हे सगळे तुकडेतुकडे जणू नाहीतच. सरकार आणि सत्ताधारी पक्ष ज्या पद्धतीने तिस्ता बंधाऱ्याच्या उद्घाटन-समारंभाला आगामी निवडणुकीच्या पहिल्या मीटिंगमध्ये परिणत करू पहाताहेत, त्यात या फुटकळ पक्षांचं अस्तित्त्व लक्षात येणंसुद्धा मुश्किल आहे. त्यात फॉरेस्ट डिपार्टमेंट, ॲग्रो इंडस्ट्रीज आणि चहाच्या मळ्यांचे ट्रक सगळ्या जिल्ह्यातून लोक गोळा करून बंधाऱ्याच्या ठिकाणी आणणार. सकाळ झाली-न-झाली तोच ते काम सुरू झालंय्. लोक एकत्रित करणं हेच जर सरकारचं आणि सत्ताधारी पक्षाचं एकमेव उद्दिष्ट असतं, तर ते तिस्ता बंधाऱ्याच्या जवळच्या ठिकाणांहून सुद्धा पुरेसे लोक जमवू शकले असते. पण सरकार आणि सत्ताधारी पक्षांची अशी इच्छा आहे, की या मेळाव्यातून सगळ्यांच्या मनावर ठामपणे असं बिंबवायचं की, या जिल्ह्यात या सगळ्या फुटकळ पक्षांचं अस्तित्त्व तर नाहीच, एवढंच काय, कॉंग्रेसचंही नाही. म्हणूनच इतक्या दूरदूरच्या ठिकाणांहूनही लोक तिथे नेण्याचं काम चाललंय्.

पण या ट्रकमधून जे लोक चाललेतय, त्यांच्यामध्ये कामतापूर, उत्तरखंड, नमशूद्रसमिती किंवा गोर्खालॅंडचे दोनचारजण इथे-तिथे असू शकतात. तसं तर त्यांना निवडूनही काढता येत नाही. उलट उत्तरखंड किंवा गोर्खालॅंडचे लोक सरकारी कार्यक्रमांना येणं हे तर फारच चांगलं. पंचायतीची निवडणूक असो की लोकसभेची, मतदानाच्या दिवशी जी उत्तेजना आणि संदेहाची परिस्थिती असते, तशी या बाजारमैदानातील धावपळीबद्दल कुठलीही उत्तेजना नाही, कुणाला कुणाबद्दल संशयही नाही. झाडांखाली

जी दोन ऑफिसं उघडली जातात, तीही नाहीत. एकेका मतदानकेंद्रावर तिथल्या एकूण सातशे-आठशे मतदारांपैकी मतदान करतात फक्त तीन-चारशे जण; पण तेवढ्या लोकांची आवड-नावड नियंत्रित करण्यासाठी संपूर्ण भागातच एक उद्वेग-उत्तेजना, कधीकधी हिंस्रताही दिसते. हे प्रकार दबलेलेही राहू शकत नाहीत. विशेषत: चहाच्या मळ्यांच्या भागांमध्ये तर हे हटकून दिसतात.

त्याशिवाय, कामतापूर-गोर्खालँड-उत्तरखंड-नमशूद्र समिती या सगळ्यांशी तिस्ता-बंधाऱ्याच्या उद्‌घाटनाच्या घटनेचा अंतर्गत संदर्भ काय आहे हे तर त्यांना ठाऊक असण्याचा प्रश्नच नाही, त्यांना हे ठाऊकही नाही. परंतु त्यांना हे ठाऊक नसलं, तरी चहाच्या मळ्यांचं आंदोलन किंवा जमिनीच्या संदर्भातील गोंधळामधील सरकार आणि सत्ताधारी पक्षांच्या सहभागाबद्दल जी भावना तयार झाली आहे, तिच्यामधून हे सगळे पक्ष आपली भूमिका योग्य ठिकाणी ठरवू शकतील.

आठ वाजल्यानंतर धूपगुडीहून दोन बसेस आणि सिंजीहून प्रचंड मोठा ट्रक येऊन थांबतो.

## दोनशे सहा

# लोक बस - ट्रकमध्ये बसतात

एक ट्रक आणि दोन बसेस येऊन आधी रस्त्यावर थांबतात. ड्रायव्हर खिडकीतून तोंड बाहेर काढून लोकांना काहीतरी विचारतो.

बहादुर तेव्हा नाचाच्या ठिकाणी, गर्दीच्या पाठीमागे होता. बहुधा त्यालाही थोडासा थकवा आला होता. बस आणि ट्रक उभे रहाताना पाहून तो पळत रस्त्याकडे जातो उजव्या हातात बॅटन वर धरून-त्याच्यामागे पोरासोरांचं एक दलही पळतं. तो पर्यंत बसेसमधून दोन पोरं रस्त्यावर उतरून मागच्या ट्रकला जरा मागं जाण्याची खूण करतात, आणि बसवर एक थाप मारतात. मागच्या ट्रकमधला पोरगा ड्रायव्हरच्या डोक्यावरच्या पत्र्यावर थाप मारतो, आणि नंतर आस्ते-आस्ते थपडा मारीतच रहातो. ट्रक थोडा मागे जातो; बसही थोडी मागे जाते.

बहादुर येऊन रस्ता आणि बाजारमैदान यांच्या मधल्या ठिकाणी उभा राहून, बॅटन वर करून चित्कारतो, 'इकडं, इकडं; बस, ठीक है, सीधा, सीधा, सीधा-'

ट्रक आणि दोन्ही बसेस आता रस्त्यावर मागे जाऊन अशा प्रकारे थांबतात, की बाजारमैदानाच्या समोरील जागेतून एकेकाने येऊन त्यांच्यामध्ये बसावं. बहादुर बॅटन उंच करून पोरासोरांना रागावतो, 'ए ऽ, हटा, हटा, बसगाड्यांना येण्यासाठी रस्ता द्या बरं!

- सरका - सरका -'

ट्रक आणि बसेस खरोखरच जणू बहादुरच्या सांगण्यावरून आपल्या दिशा ठरवतात. त्यानंतर रस्त्याच्या उतारावर येऊन थांबतात आणि पहिली बस हळूहळू बाजारमैदानावर उतरते, हळू-हळू येऊन थोडी थांबते, ड्रायव्हर खिडकीतून मागे कोण जाणे काय पाहून बस आणखी पुढे घेऊन येतो.

मागची बस जणू पुढच्या बसच्या चाकांच्या खुणांवरूनच उतारावरून बाजारमैदानात येते. पहिल्या बसच्या मागे थांबून, दोन्ही हात वर करून बहादूर तिला निर्देश देत उभा रहातो - त्याच्या उजव्या हातात बॅटन आहे.

ट्रक जरा दूर होता. तो एक मोठा आवाज करीत डाव्या बाजूला उतरतो - या बसेसच्या थोड्या डाव्या बाजूला. त्यानंतर पुन्हा एक आवाज करून थांबतो.

बसेस आणि ट्रक रस्त्यावरून मैदानात येत होते, तोपर्यंत गर्दीतले लोक नाचणाऱ्यांकडे पाठ करून, स्थिर उभे राहून पहात होते. फक्त नाचणारे तेवढे जणू नशेत नाचत होते, जणू ही गर्दी निघून गेल्यामुळे जी निर्जनता निर्माण होईल, तिच्यामध्ये त्यांना अधिकच गहनपणे नृत्यसमाधीत उतरता येईल.

पण बस आणि ट्रक येऊन थांबल्याबरोबर नाचणाऱ्यांनी ताबडतोब परस्परांशी बांधलेले हात मोकळे केले आणि ते या बस व ट्रककडे पळू लागले. गावातल्या राजवन्शी लोकांचा समूह तर या नाचाच्या बाहेर, बस-ट्रकच्या आसपास विखुरलेला होता. त्यांच्या काही लक्षात यायच्या आतच नाचामधल्या तरुणी त्यांच्यामधल्या जागांमधून पळत बस आणि ट्रकमध्ये बसतात. त्यानंतर त्यांच्यापैकी एकेकजण जागा मिळाल्याच्या आनंदाने हसू लागते. जिथे जिला जागा मिळेल, तिथे ती बसते. जिला जेव्हा जागा मिळते, तेव्हा ती हसू लागते. एकटी नव्हे, चारपाच जणी. त्याना सर्वांनाच तर काही गर्दीमुळे जागा मिळत नाही. त्यामुळेच काहीवेळ हसण्याचा आवाज चढतो आणि उतरतो. इतके चालत येऊन, इतके तास नाचल्यानंतर अशा प्रकारे भागदौड करीत बस-ट्रकमध्ये बसल्यामुळे त्यांच्या हसण्यात थोडी धाप लागल्याचे निःश्वासही होते.

या तरुणी बस-ट्रकमध्ये बसल्यानंतर बाकीच्यांच्या लक्षात येतं, की यांनी घाईगर्दी करून चांगल्या जागा पटकावल्या आहेत. तेव्हा ग्रामीण लोक, पोरसोरं, म्हाताऱ्याकोताऱ्याही पळतपळत येऊन बस-ट्रकमध्ये चढायला सुरू करतात. चढताना कुणाचा कुणाला धक्का लागतो, एकीचा हात दुसरीच्या पोटाला लागतो. कुणाच्या हातातून पोर निसटतं - ते पोर तारस्वरात रडायला सुरुवात करतं.

इकडे, बहादुर आपला बॅटन उंचावून एकदा पहिल्या बसच्या पुढे उभा राहतो - 'ए खबरदार, सावधान! लाईन लगाओ!' - आणि हेच शब्द उच्चारीत-उच्चारीत एकदा दुसऱ्या बसपुढे, तर एकदा ट्रकपुढे जाऊन उड्या मारतो.

तोपर्यंत पुरुषमाणसं बसेसच्या टपांवर आणि ट्रकच्या आतमध्ये चढायला सुरुवात करतात - ट्रकमध्ये अद्यापही थोडी जागा होती.

दरम्यान पुन्हा बस आणि ट्रकमध्ये लोकांचं एकमेकांना हाका मारणं सुरू होतं. प्रत्येकजण आपल्या ओळखीच्या माणसासाठी जागा राखून ठेवून त्याला किंवा तिला हाक मारतोय. एका वाडीतल्या लोकांना एकत्र बसावंसं वाटतं, एका खेड्यातल्या लोकांनाही एकत्र बसावंसं वाटतं.

पण गाडीत चढताना मात्र कुणीही मागे वळून पहात नव्हतं - तेव्हा मात्र प्रत्येकाने मिळेल तिथे - पुढे किंवा मागे - जागा मिळेल तिथे बसून घेतलं होतं. म्हणूनच आता बसच्या आत-बाहेर अशा प्रकारचे अनेक आवाज येत होते -

'ए ऽऽ आई गं, इकडं ये की!'

'काका हो, हे ऽऽ काका, काका होऽ!'

'ए ऽ बहादुर, माझी पोरगी कुठं बसली जरा सांग बरं!'

'चूप बसा! चूप बसा! आणखी लोकांना बसायचंय!'

'इथं बसला आणि आता लगेच उतरायला लागलात? का बरं?'

'अरे असू दे, बसू दे, माझी बहीण लागते ती, बसू दे!'

'या, इकडं या, आता उतरू नका. बॅरेजवर गेल्यावर बघू!'

'टपावरच्यांनो, सावध रे! फांद्या लागतील झाडांच्या - जरा जपून!'

परंतु एवढं होऊनही दोन बस आणि एका ट्रकमध्ये सर्वांनाच काही जागा मिळत नाही - बरेचजण बाहेर उभे रहातात - त्यांच्यामध्ये मुलं आहेत, म्हाताऱ्या आहेत; काही धोतर-शर्ट घातलेले, हातात छत्री असलेले शेतकरी आहेत - ते बसच्या टपावर बसणं शक्य नाही.

इतका वेळ रस्त्यावर शहरातले दोन तरुण उभे होते ते कुणाच्या लक्षातच आलं नाही. आता ते पुढे आल्यावर लक्षात येतं, की ते या बस-ट्रकबरोबरच आले आहेत. ते येऊन ट्रकजवळ उभे राहतात. एक तरुण चाकावरून वरती ट्रकमध्ये चढतो. चढल्याबरोबर आतल्या लोकांना धमकवायला सुरुवात करतो. 'काय, स्वत: बसलं की संपलं होय? दुसऱ्या कुणाला चढूच द्यायचं नाही का? चला, सरकून बसा, पुढे व्हा, पुढे व्हा. अहो आजीबाई, तुम्ही त्या कोपऱ्यात, हो, त्याच कोपऱ्यात बसा - म्हणजे लोकांचे धक्के लागणार नाहीत!'

तो तरुण म्हातारीला धरून, जवळजवळ उचलूनच कोपऱ्यात बसवून देतो. त्यामुळे हास्याची एक लहर उठते. तरुण म्हणतो, 'हं ऽ ! हसत हसत पुढं सरका, पुढं सरका!'

तरुणींच्या संदर्भातील त्याच्या मनातील स्वाभाविक संभ्रमामुळे तो तरुण ट्रकमधल्या तरुणींना तर काही हातांनी ढकलू शकत नाही, पण 'सरका, सरका' म्हणत तो ज्या प्रकारे

पुढे चाललाय, त्यामुळे त्याच्या ढोपराच्या टोचणीच्या भीतीने बऱ्याचजणी खरोखरच थोडं सरकून बसतात.

तरुण अचानक तोंड पुढे काढून खालच्या तरुणाला म्हणतो, 'बसमधल्या लोकांना पोरांना मांडीत घेऊन बसायला सांग बरं, बघ, जागा होऊन जाईल!'

हा तरुण एकेका मुलाला वर उचलून विचारतो, 'हा कुणाचा मुलगा?'

मुलाची आई 'माझा, माझा!' म्हणताच सगळ्यांना हसू फुटतं. विशेषतः चहाच्या मळ्यातल्या तरुणींना. शहरातल्या तरुणाशी बोलायला मिळतंय् याचं त्यांना अप्रूप वाटतं.

इकडे दुसरा तरुण दोन्ही बसेसच्या खिडक्यांमधून आतल्या लोकांना उद्देशून ओरडतो - 'पोरांना मांडीवर घ्या, पोरांना मांडीवर घ्या!' त्यानंतर बहादुरला बोलावून म्हणतो, 'पोरांना मांडीवर घेऊन बसायला सांगा लोकांना - आणि या पोरांना बसमध्ये बसवा!' - काही मुलांना मैदानात ओढून तो बहादुरसमोर आणून सोडतो. पण तो बाजूला गेल्याबरोबर मुलं आपल्या बाबा-काका-आई-मावशी यांच्या दिशेने पळायला लागतात. बहादुर तेव्हा बसच्या खिडकीतून आपला बॅटन हलवीत असतो -'ए पोरा, सीट सोड, चल उठ - आपल्या आईच्या मांडीवर बस!'

तेव्हा कुठं ट्रकच्या मागच्या बाजूला थोडी जागा मोकळी होते. शर्ट-धोतर-छत्रीवाले काहीजण लोक आणि काही तरुणी ट्रकमध्ये चढतात.

## दोनशे सात

# मदारीच्या आईचं ट्रकारोहण

मदारीची आई कुठल्याच गाडीत चढू शकत नाही. मदारी कुठल्याही गाडीत चढून कुठेही बसू शकला असता, पण आईला सोडून तो कसा काय बसणार?

जुलूस म्हणजे तर सगळ्यांनी एकत्र जाणे. खेड्याचे लोक आपला गट करतात, वाडीचे लोक आपला गट करतात, वस्तीचे लोक आपला गट करतात, मळ्यातले लोक आपला गट करतात. एखादा इकडेतिकडे गेला, तर त्याच्या गटातले लोकच त्याला हाका मारून पुन्हा आपल्याबरोबर घेतात.

पण मदारीची आई मात्र तिच्या या मुलाबरोबरच आलीय्. 'मदारीची आई!' म्हणून तिला हाक मारायला ती कुठल्याही खेड्यातली किंवा वाडीतली नाही. ती बसकडे न जाता जर ट्रककडे पळाली असती तर कदाचित तिला जागा मिळाली असती. पण बसमध्ये तर तिला बसायला एक जागा मिळालीसुद्धा होती, तेवढ्यात एक धष्टपुष्ट तरुणी येऊन तिला म्हणाली, 'ही तर धुपगुडीच्या भट्चाजजींची बस आहे, आमच्यासाठी पाठवलीय

त्यांनी. तुम्ही कशाला बसलात हिच्यात? उतरा, उतरा!'

मदारीच्या आईला तिचं म्हणणं खरं वाटतं, पण ती बसूनच रहाते.

ती बाई जरा मागे जाऊन ओरडायला सुरुवात करते - 'ए ऽ विश्वास, जरा बघ बरं तिथं कोण बसलंय् ते!' त्यानंतर परत आपलं तोंड मदारीच्या आईकडे करून ती म्हणते, 'उठा, सीटवरून उठा' - यावेळी ती मदारीच्या आईचा हात धरून एक हिसडाही देते.

'अहो ऽ बाई, उठा ना! तुमची माणसं असतील त्या बसमध्ये जा - आमच्या बसमधी कशाला बसता? चला - उतरा!' मदारीच्या आईच्या दोन्ही बाजूंनी असे शब्द सुरू झाल्यावरही मदारीची आई हलत नाही. त्या बाईला या आवाजांमुळे समर्थन मिळतं आणि म्हणूनच ती मदारीच्या आईचा एक हात धरून परत असा एक जोरदार हिसडा देते, की मदारीची आई उठून उभी राहते. आणखी काही हिसडे दिल्यानंतर मदारीची आई उठेल या हिशेबाने त्या बाईने तो हिसडा दिलेला होता आणि पहिल्याच हिसड्यात मदारीची आई उठून उभी राहिल्याने ती बाई धडपडून मागे पडते. पण बसमध्ये त्यावेळी इतकी गर्दी, की कुणीही पडलं, तरी ते पोरासोरांच्या अंगावर किंवा समोरच्या किंवा मागच्या बेंचवर बसलेल्यांच्या अंगावरच पडणार.. ती बाई पडल्याबरोबर 'अगं आई गं-!' 'अगं माई गं!' असं म्हणून आरडाओरड सुरू होताच मदारीची आई बसमधून उतरते आणि त्या बाईला मागच्या बायका ढकलून उभं करतात. ती बाई मग मदारीच्या आईने मोकळ्या केलेल्या सीटवर जाऊन बसते.

मदारी बसच्या बाहेरून आईला विचारतो, 'माई गं ऽ, उतरतीस कशापाई?'

मदारीची आई खूप हळू आवाजात म्हणते, 'मला या बसमध्ये घेत नाहीत, खाली व्हा म्हणून सांगताहेत, म्हणून -'

'का खाली उतवलं?' मदारी त्याच्या आईसमोर येऊन, तिच्या पोटावर हात ठेवीत विचारतो, 'कुणी उतरवलं?'

'सगळ्यांनी उतरवलं - म्हणताहेत, या बसमधी आपल्याला घेणार नाहीत - मदारीची आई अशा निरासक्तपणे म्हणते, की जणू आपल्याला खाली उतरवून देण्यामागचं कारण तिला पटलंय्. जुलूस म्हणजे सगळ्यांनी एकत्र मिळून जाणं. मदारीची आई तर तिथं खरोखरच एकटी होती, ती कुठल्याही गटातली अशी नव्हती. कुठल्याही गटाने तिला आपल्यात घेतलं नसतं. कसं घेणार? मदारीची आई तर काही कुठल्या वाडी-वस्तीवर रहात नव्हती - वस्तीच्या लोकांना वाटलं, ती एखाद्या चहाच्या मळ्यावरची असावी. कुणी तिच्याशी थोडं काहीतरी बोललं असतं, तरीही त्या गावच्या लोकांना ती आपल्यातली आहे हे जाणवलं असतं का? फक्त बोलण्यावर त्यांनी विश्वास ठेवला असता का?

मदारी गडबडीत विचारतो, 'तू जुलूसात जाणार नाहीस?'

मदारीची आई थोडं हसून म्हणते, 'कशी काय जाणार? कुणीच मला बसमधी बसू देत नाही!'

मदारी पुन्हा गडबडीने तिचा हात धवून ओढतो, 'चल, आपण दुसऱ्या बसमधी बसू!'

मदारीची आई त्याच्याबरोबर जाते. पण त्या बसच्या दरवाजाला माणसं लटकलेली असतात - बस निघण्याच्या आधीच. खिडकीतून चहा-मळ्यातल्या काही मुली तोंड बाहेर काढून पहात असतात. मदारी त्यांच्याकडे पाहून म्हणतो, 'ए ऽ दीदी, मला न् माझ्या मायला तुमच्यात घ्या की ऽ, मला घ्या की, माझ्या मायला घ्या की!'

इतक्या आरडाओरड्यात मदारीचा आवाज कुणाच्याही कानात शिरत नाही. पण एक मुलगी हाताने पुढे निर्देश करीत म्हणते, 'ही तर मळ्याची बस आहे, त्या ट्रकमध्ये चढ!' ती ट्रक दाखवतेसुद्धा.

मदारीच्या आईला पाहून मळ्यातल्या बायकामुलींना वाटतं, ही बाई एखाद्या खेड्यातून आली असावी.

आईचा हात धरून ओढीत ओढीत मदारी ट्रकच्या दिशेने पळत निघतो. तो पळत निघाल्यामुळे त्याच्या आईलाही जरा वेगाने पावलं उचलावी लागतात. पुन्हा पहिली बस मागे टाकून ट्रकजवळ जाताच मदारीला दिसतं, बहादुर हातात बॅटन घेऊन बसमध्ये लोकांना बसवतोय्.

'हे ऽ बहादुरदा.' एका हाताने आईचा हात आणि दुसऱ्या हाताने बहादुरचा बेल्ट धरून मदारी तो ओढतो, 'हे ऽ बहादुरदा, हे ऽ - '

बहादुर मदारीकडे न पहाताच ओरडतो; 'चोप् रहो!' त्यानंतर बसच्या शिडीच्या मध्यापर्यंत पोचलेल्या परंतु बसच्या टपावर पाय ठेवायला जागा न मिळालेल्या एका माणसाला आपल्या बॅटनने डिवचीत म्हणतो, 'चढा, चढा ना! चढा!'

तो इसम संकटात सापडतो. बॅटनने डिवचल्याबरोबर तो ताबडतोब एक पाय बसच्या टपावर ठेवतो. तो पाय एकजणाच्या अंगावर पडतो, तो माणूस 'कोण रे हे?' म्हणून पाय दूर सरकवतो, पण पाय टपावरच पडतो. माणूस ताबडतोब उडी घेऊन त्यावर चढतो आणि मागं वळून बहादुरला विचारतो, 'मागनं काठीनं काऊन डिवचता वो?'

बहादुर खालूनच ओरडतो, 'जा, पुढं जा!'

तो माणूस तेव्हा अत्यंत बिकट परिस्थितीत पायांवर बसायला गेला, तर तो बसवरून मागे पडेल; पण पुढेसुद्धा बसायला जागा नाही.

बहादुर 'चढा! चढा!' असं ओरडत, बॅटन फिरवीत मागे पहातो, तर मदारी. बहादुर त्याला म्हणतो; 'अरारा! अजूनबी चढला नाहीस का रं?'

मदारी बहादुरकडे चेहरा उंचावून म्हणतो, 'मला खाली उतरावलं, मायला बी खाली उतरावलं, आमाला जायला बस नाही वो!'

'कुणी उतरावलं?' बहादुर ओरडतो. पण तोपर्यंत तिकडची बस स्टार्ट झालेली असते. त्या बसचा क्लीनर बसच्या पत्र्यावर जोरजारात थापडा मारतो. बहादुर म्हणतो, 'निघणार, निघणार, सगळे निघणार, चल ना, च ऽ ल!'

बहादुर बॅटन डाव्या हातात घेऊन उजव्या हाताने मदारीचा हात ओढतो. मदारी आपल्या आईचा हात ओढतो. बहादुरच्या हात ओढण्यामुळे मदारीला आणि त्याच्या आईला पळत-पळतच ट्रकजवळ जाऊन थांबावं लागतं.

ट्रकच्या मागची फळी तोपर्यंत लावून घेतली गेलेली असते. बहादुर त्या फळीवर आपला बॅटन मारीत ओरडतो, 'हे ऽ य्, उघडा बरं, माणसं आहेत बाहेर, आत घ्या त्यांना. उघडा, खोला!'

ट्रकमध्ये अनेकजण उभे असतात. मळ्यातली काही पोरं त्या मागच्या फळीवर बसलेली असतात. खालून कोण ओरडतंय हे ऐकण्याच्या अवस्थेत कुणीही नाही. बहादुर पुन्हा मदारीचा हात धरून ट्रकच्या पुढे येतो, आणि ड्रायव्हरच्या दरवाजाला धक्का देत ओरडतो, 'हे ऽऽ, अरे उघडा ना! मान्सांना आत घ्या!'

इकडे पहिली बस तोपर्यंत मागे जात-जात रस्त्यावर येऊन उभी राहिलीय्. स्टार्ट चालूच आहे - ती बस इतर बस आणि ट्रकची वाट पहात थांबलीय्, की एकटीच पुढे जाणार हे काही समजत नाही. दुसरी बस आणखी मागे जात नाही. मैदानात थोडं थोडं वळून ड्रायव्हर तिचं तोंड रस्त्याच्या दिशेने वळवतो. ट्रक ड्रायव्हर आपल्या सीटवर बसलाय आणि त्याने स्टियरिंग हातात धरलंय् - बस रस्त्यावर गेल्याबरोबर तो स्टार्ट देणार.

ड्रायव्हर बहादुरला वरच्या दिशेने हात दाखवतो आणि त्याचवेळी वरून एक पोरगा ओरडतो, 'काय प्रकार काय आहे? आरडता कशापायी?'

मान हलवून बहादुर म्हणतो, 'यांना खाली उतरवलंय् - कुणीही चढू देत नाही.'

'आता सांगता व्हय हे! द्या, पोराला वर द्या!' - वरचा मुलगा हात पुढे करतो. बहादुर बॅटन खाली टाकतो. मदारीला त्याने आपल्या डोक्याच्या वर उचलल्याबरोबर मदारी ट्रकमध्ये पाय टाकतो आणि पायाखाली त्याला फळीचा आधार सापडतो. 'त्यांना इथून वर चढवा!' म्हणून तो मुलगा ड्रायव्हरच्या दरवाजाजवळची लोखंडी पायरी बहादुरला दाखवतो.

## दोनशे आठ

# ट्रकमध्ये घोषणा आणि निर्जनता

ट्रक रस्त्यावर आल्याबरोबर तो मुलगा ट्रकवर घोषणा देतो 'इन्किलाब झिंदाबाद!'

या घोषणेला उत्तर म्हणून सगळेजण जोरात 'झिंदाबाद!' असं ओरडतात. यानंतरही सगळ्यांच्या ओळखीच्या घोषणा दिल्या जातात - 'डावी आघाडी - झिंदाबाद!' 'गरीबांचं सरकार - डावी आघाडी सरकार!' 'पंचायत कायदा केला कुणी - डाव्या सरकारने, आणखी कुणी?' 'आपलं सरकार - डावं सरकार!'

बराच वेळपर्यंत ट्रकवरून अगदी उत्साहाने हात उंचावीत लोक घोषणा देत राहतात. ज्यांना या घोषणा ठाऊक नव्हत्या, ते लोकही एक-दोनदा या घोषणा ऐकल्यावर आपला सूर त्या घोषणांमध्ये मिसळवू लागले. ट्रक जोरात चाललाय्, डोक्यावरून वारा वहातोय्, रस्त्याच्या दोन्ही बाजूंना असलेल्या फॉरेस्टमधल्या झाडांचे शेंडे कुठे-कुठे लोकांच्या डोक्यावर झुकताहेत - विशेषत: बांबूच्या झाडांच्या स्पर्शापासून वाचण्यासाठी बसच्या टपावरील लोकांना एकमेकांच्या पाठीवर डोकं ठेवावं लागतं. घोषणा देताना खूप बरं वाटतं - आणि इतक्या माणसांच्या आवाजात घोषणासुद्धा जोराच्या वाऱ्यात जणू ताबडतोब उडून जातात - जड होऊन वातावरणात अडकून पडत नाहीत.

तोच तरुण त्या घोषणांना साधारण आणि परिचित घोषणांकडून विशिष्ट अशा घोषणांपर्यंत घेऊन येतो. या नवीन घोषणा तिस्ता बांधाऱ्याच्या उद्‌घाटनसमारंभासाठीच तयार केलेल्या आहेत. सरकारी पक्षांनी वस्त्या-वस्त्यांवर, वाड्या-वाड्यांवर, मळ्या-मळ्यांवर गेला महिनाभर छोट्या सभा घेतल्याहेत, स्क्वाड्स तयार केली आहेत, युनियनच्या सभा झाल्या आहेत, बाजारात सभा झाल्या आहेत, हाट-स्क्वाड (मार्केट-स्क्वाड) तयार केलं आहे. त्यामुळे या नवीन घोषणासुद्धा काही लोकांच्या सरावाच्या झाल्या आहेत, परिचित झाल्या आहेत. पण नेहमीच्या घोषणा जशा त्यांना अर्थ ठाऊक नसतानासुद्धा तोंडातून उमटतात, तशा या घोषणा नाहीत. या नीट आठवून, लक्षात ठेवून द्याव्या लागतात. लक्षात ठेवल्यानंतर मागच्या घोषणा एकामागोमाग एक आठवतात.

तो तरुण या सर्व घोषणा सुरुवातीला संपूर्ण स्वरूपात स्वत:च देतो - एक एक करीत. पहिल्यांदा नवी घोषणा देताना तो हाताने सर्वांना खूण करतो - दुसऱ्यांदा सर्वांनी एका सुरात ही घोषणा द्यावी. त्यानंतर तीच घोषणा - पाठ होण्याआधी काही काळ पुन्हा पुन्हा देण्यात येते. त्यानंतर पुन्हा 'डावं सरकार - झिंदाबाद,' 'आणखी कुणी?' या सगळ्या नेहमीच्या घोषणांनंतर पुन्हा नवीन घोषणा.

तरुण म्हणतो, 'उत्तरखंड, गोर्खालँड - नही चलेगा, नही चलेगा!' हिंदी घोषणा असल्यामुळे मळ्यातले लोक आधी सूर मिळवतात. ही आपल्याला अनुकूल घोषणा आहे की नाही याचा अर्थ लावेपर्यंत खेड्यातले लोक काही क्षण चुळबूळ करतात, इतस्तत: करतात. त्याशिवाय हेच स्लोगन गावात दिलं होतं, ते असं - 'उत्तराखंड, गोर्खालँड - चोलबे ना, चोलबे ना!' ज्यांना हे समजतं ते बंगालीतच प्रतिसाद देतात. ही घोषणा काही क्षण घोटवल्यावर तो तरुण त्याच आशयाची नवी घोषणा देतो, 'उत्तरबंगे बिच्छिन्नोताबाद - रुखबोई रुखबो' ('उत्तरबंगालमधला फुटीरपणा - थांबवणारच

थांबवणार!) याच चालीत या घोषणेचा हिंदी अवतारसुद्धा आहे - 'रोकना होगा, रोकना होगा!' परंतु 'बिच्छिन्नोताबाद' (फुटीरपणा) या शब्दामुळे घोषणेचा छंद बिघडतो. यानंतरची घोषणा हिन्दी-बंगाली दोन्हीमध्ये चांगली जमलीय् - 'बंगाल को पंजाब बनाना - रोकना ही रोकना!' 'रुखबोई रुखबो!'

घोषणा देण्याची या लोकांची स्वत:ची अशी एक खास पद्धत आहे. मग ते लोक ग्रामीण भागातले असोत वा चहाच्या मळ्यातले असोत. प्रथम काही क्षण आरडा-ओरडा करून काही तरुण मुलं घोषणांमध्ये गरम-गरम भाव आणतात; पण जेव्हा बराच काळ सलगपणे घोषणा देण्याची वेळ येते, तेव्हा मात्र त्यांचे आवाज एकदम एखाद्या खड्ड्यात पडल्याप्रमाणे खाली उतरतात आणि अगदी गुणगुणण्यासारख्या हळू आवाजात यांच्या घोषणा चालू राहातात, चालूच राहातात. एकीकडे यांना आवाज चढवता येत नाही, तर दुसरीकडे घोषणा देणं थांबवताही येत नाही.

त्या तरुणाला घोषणांमध्ये आता आणखी नेमकेपणा आणायचाय्. नेहमीच्या घोषणा थांबवून आता तो म्हणतो, 'तिस्ता बॅरेज बांधला कुणी - डाव्या आघाडीने, आणखी कुणी?'

'तिस्ता बॅरेजका पानी ले के - नया दिन आया है!'

'पहाड-मैदान ऐक्य - झिंदाबाद-झिंदाबाद!' 'गोर्खा-राजवंशी भाई भाई - झिंदाबाद झिंदाबाद!' 'गोर्खा-मदेशी-देशिया एकच - झिंदाबाद झिंदाबाद!' 'चाय-बगीचा का मज़दूर बस्तीलोग का दोस्त - भूलो मत, भूलो मत!'

पण या घोषणांच्या मध्ये असं काही राजकारण निहित आहे, की ते कुठल्याही प्रकारे स्वच्छन्द होऊ इच्छित नाही. बराच वेळ घोषणा देववल्यानंतर तो तरुण थांबतो, खिशातून रुमाल काढून तोंड पुसतो. पण, तो थांबल्यानंतरही ट्रकच्या आतमधून घोषणांच्या उत्तरांचं गुंजन चालूच रहातं - तो तरुण घोषणा द्यायचा थांबलाय् हे लक्षात न येऊन काही काही जण 'झिन्दाबाद झिन्दाबाद!' 'नहीं चलेगा - नही चलेगा' असं म्हणतच जातात. असं तीन-चार वेळा झाल्यावर त्यांच्या लक्षात येतं की घोषणा देणं थांबलंय्.

मघाच्या त्या नाचणाऱ्या गटातला तो प्यालेला बासरीराला याच ट्रकमध्ये बसलेला आहे. या शांततेचा फायदा घेत तो याच घोषणा अचानक हात वर करून द्यायला सुरू करतो - 'झिन्दाबाद, झिन्दाबाद!', त्यानंतर पुन्हा शांत होतो. आणखी काही काळ घोषणा चालतील अशी बहुधा त्याची आशा होती असं वाटतं, पण घोषणा थांबल्यामुळे त्याला जणू काहीतरी करण्याचा उत्साह वाटतो. तो उठून उभं रहाण्याचा प्रयत्न करतो, पण मध्येच तोल जातो आणि तो बसल्या बसल्याच खाली पडतो. तो बसलेला होता महिलांच्या जवळ - पडल्याबरोबर त्याची पाठ धरून त्याल सरळ करीत एक म्हातारी म्हणते, 'बासरी वाजव ना, वाजव की बासरी!' - सगळ्या बायका यावर खळखळून हसतात. म्हातारी त्या माणसाचा हात धरून त्याच्या ओठांपर्यंत आणते, 'ए ऽ आवारा, वाजव ना बासरी;

ए राजा, बासरी वाजव, आम्ही समदे नाचू, वाजव!'

तो माणूस बासरी धरलेला हात बाजूला घेऊन म्हणतो, 'हम बांसुरी नही बजायेगा, हम लेक्चर देगा, बडा लेक्चर!'

'तो देना, लेक्चर दे, बैठके दे, झुबरू, बैठके दे,' म्हातारी मागून त्याला हळू हळू समर्थन देते.

'हां, देगा! हम युनियन तोड देगा! काहे? ना, हम और इ लाल युनियन नहीं करेगा. हम झारखण्ड पार्टीका मदद करेगा. समझे? देवपाडा बागानमें सब झारखण्ड पार्टीका हो गया. हो गया कि नहीं हुआ, कहो, कहो - हुआ कि नहीं हुआ?'

तीच म्हातारी मागल्या बाजूने म्हणते, 'हो गया, हो गया; बस, लेक्चर खतम कर दे.'

एक तरुणी म्हणते, 'हे ऽ झुबरू, खडा होके लेक्चर लगा दे!'

बासरीसह आपला हात हवेत उडवीत झुबरू म्हणतो, 'नहीं, हम और लेक्चर नहीं देगा. अभी हम प्रेसिडेण्ट हो गया. अब युनियन बाबू लेक्चर देगा. युनियन बाबू, बोल दो, लेक्चर दो!' बोलता-बोलता झुबरू आडवा पहुडतो. मागची म्हातारी जरा सरकते आणि झुबरूला नीट पहुडण्यासाठी जागा करून देते. झुबरूला संपूर्णपणे पहुडता येत नाही खरं, पण यांच्या हातांच्या अंतरामधून, त्याच्या पायाच्या अंतरामधून आपलं शरीर तो बरंचसं सैल सोडू शकतो. ट्रक आता जिथं नेऊन सोडणार आहे, तिथे उतरल्यावर पुन्हा जर झुबरूने हाडिया दारू घेतली नाही, तर सकाळी घेतलेल्या हाडियाची नशा या अर्धझोपेत, विशेषत: ट्रकवरून वहाणाऱ्या वाऱ्यामुळे उतरून जाईल.

घोषणा थांबल्याबरोबर एक प्रकारचा एकसुरीपणा ट्रकमधल्या वातावरणात पसरतो. खूप दूर जायचं असल्यामुळे कुणालाही कसलीही उत्तेजना नाही. झुबरूच्या भाषणामुळं थोडासा बदल येतो-ना-यतो, तोच संपूनही गेला. झुबरू इतक्या चटकन आपलं भाषण संपवील, असं कुणालाही वाटलं नव्हतं. आता ट्रकमधली गर्दी, ट्रकवरून वेगाने वहाणारा वारा आणि फांद्या डोक्याला लागू नयेत म्हणून डोकी खाली वाकवणे या सगळ्या गोष्टी, एवढंच काय, अधूनमधून चहा-मळ्यात काम करणाऱ्या तरुणींचं हसणंही जणू या सगळ्यात एकसुरी झालंय.

आधी आधी दोन बसेसच्या मागे ट्रक आस्ते-आस्ते जात होता. थोडं दूर गेल्यावर लक्षात आलं, की बसेसना आता वेग अधिक वाढवणं शक्य नाही; आणि याच गतीने जात राहिलं, तर बंधाऱ्याच्या ठिकाणी तिथला कार्यक्रम संपवल्यावरच पोचता येईल. हे लक्षात आल्यावर ट्रक ड्रायव्हर काही वेळा हॉर्न वाजवून दोन्ही बसेसना मागे टाकून पुढे जातो. तेव्हा दोन्हीही बसेसमधून पुन्हा घोषणा दिल्या जातात, हात हलवले जातात, विशेषतः बसच्या टपावर बसलेले लोक हात हलवतात. त्यानंतर पुढे हा ट्रक एकटाच पुढे जातोय.

दलगांव मागे पडलं.

## दोनशे नऊ

# चहाच्या मळ्यांनी घेरलेलं लष्कर

गयेरकाटाच्या जवळ आल्यावर उजवीकडे वळण घेऊन नॅशनल हायवे सोडावा लागला. हा चामुर्चीचा रस्ता- बिन्नागुडी-बानारहाट मार्गे हा रस्ता चामुर्चीला जातो. या रस्त्याने बरंच पुढे गेल्यावर ट्रक डावीकडे वळेल. आणखी थोडं पुढे गेल्यावर लॅटरल रोड धरील - दोन राष्ट्रीय महामार्गांना हा लॅटरल रोड जोडतो.

हा रस्ता अरुंद आहे, त्यावर खड्डेखुड्डेही जरा जास्तच आहेत. त्यामुळे गचके आणि हेलकावे कमी बसावेत, म्हणून ट्रकही जरा आस्ते-आस्ते चाललाय. हा रस्ता एकदम निर्जन आहे. नजर जिथपर्यंत जाते, तिथपर्यंत नुस्ता झकझक रस्ता दिसतो- समोर काहीच नाही. अधूनमधून समोरच्या दिशेने चहाच्या मळ्याचा एखाद-दुसरा रिकामा ट्रक येतो. त्या ट्रकमधले दोनतीन कूली माना वळवून-वळवून माणसांनी गच्च भरलेल्या या ट्रककडे पहातात. त्यांना आश्चर्य वाटण्याचं कारण नाही, पण अशा विस्तीर्ण दृश्यामध्ये इकडे माणूस क्वचितच दिसत असल्यामुळे एखादा माणूस जरी दिसला, तरी तो लक्ष वेधून घेतो.

रस्त्याशेजारून गयेरकाटा नदी खूप दूरपर्यंत जाते. ती नदी अशी वाटत नाही, शिवाय झाडाझुडुपांमुळे अनेक ठिकाणी ती झाकलीही गेलेली आहे. अचानक एखाद्या ठिकाणी झाडंझुडुपं नसल्यामुळे ती दिसते. अशा ठिकाणी ती एखाद्या छोट्या नाल्यासारखी दिसते. एका उंच ठिकाणाहून बऱ्याच मोठ्या धारेने ती खाली येतेय्, आणि तिथून पाणी घेऊन कुणी-कुणी कुठे-कुठे जातंय. काही अंतर असं गेल्यावर नदी पुन्हा झाडाझुडुपांमध्ये लपून जाते.

पण अधूनमधून नदीच्या पात्राकडे पाहिल्यावर लक्षात येतं, की गाडी जरा वरच्या बाजूला चढतेय. अगदी पहाडावर नाही, पहाडाच्या तळाशी. नदीच्या प्रवाहाच्या विरुद्ध दिशेने ट्रक चाललाय, त्यामुळे इतकं कमी पाणी आणि इतकं अरुंद पात्र असूनही नदी जरा अधिकच वेगाने कशी खळाळत चाललीय, हे लक्षात येतं.

ड्रायव्हरच्या डोक्यावरील टपावर मदारी बसलाय. तो लहान असल्यामुळे लोकांनी त्याला सर्वांच्या मध्यभागी, जरा मागेच बसवलाय - अचानक धक्क्याने तो पुढे कोलमडू नये, किंवा गाडी खड्ड्यातून गेल्यास तो मागे पडू नये, म्हणून. मागच्या बाजूला पडल्यास तो ट्रकमधील लोकांच्या अंगावरच पडणार, पण डावी - उजवीकडे पडल्यास सरळ रस्त्यावर पडणार.

ट्रक-बस यांच्यामध्ये होतं तसंच इथेही झालंय - गाडी सुरू होण्याआधी वाटतं की आता आणखी एकाही व्यक्तीला जागा शिल्लक नाही; पण गाडी सुरू झाल्यावर

प्रत्येकाला जागा मिळते, शिवाय थोडीशी जागा रिकामीही उरते. पण सगळंच एका मर्यादेत घडतं. उदाहरणार्थ, जे ट्रकमध्ये डालग्यांवर रांगेने बसले आहेत, ते डालग्यांना दोन्ही हातांनी दाबून, ट्रकचं हिंदकळणं पुढे वाकून सहन करताहेत. अशा प्रकारे थोडं अंतर जाता येतं. गयेरकाटारपर्यंतचं अंतरच वीस मैल आहे, त्यानंतर हा रस्ता आणखी किती मैल जातो कोण जाणे! डालग्यांवर बसून-बसून अंग दुखायला लागतं. तेव्हा पाय जरा ताणावेत असं वाटतं - ताणण्यासाठी जागाही आहे, पण लगेच ट्रक असा काही गचका खातो की लगेच पाय जवळ घेऊन शरीराचा तोल सांभाळावा लाग ा. दरम्यान दोनतीन जण डालग्यांवरून उठून मागे फळ्यांवर बसले. जागाही झाली आहे. बरेचजण उभे र्‍हिले आहेत - पुढच्या एखाद्याच्या खांद्यावर हात ठेवून तोल सांभाळताहेत. परंतु ट्रकमध्ये उभं राहून तोल सांभाळणं अवघड असतं - एखादा मजबूत लोखंडी रॉड असता म्हणजे बरं असतं. ड्रायव्हरच्या केबिनच्या मागच्या भिंतीला टेकून बसलेल्यांना लोखंडाचे रॉडस् धरता येतात.

या रस्त्यावर एकूणच ट्रक आणि बसेसपेक्षा लष्कराच्या गाड्यांचं प्रमाण अधिक वाटतं. खाकी रंगाचे लष्कराचे ट्रक रिकामेच वेगाने जाताहेत. एका ठिकाणी लष्कराचा तंबू पडलाय, अनेक ट्रक्स मैदानाच्या एका बाजूला रांगेत उभे आहेत, एका ठिकाणी लष्कराचे जवान वर्तुळ करून बसले आहेत, आणि एक जवान आपल्या भाषणातून त्यांना काहीतरी सांगतोय.

बिन्नागुडीच्या जवळ आल्याबरोबर रस्त्याचं स्वरूप बदलतं - रस्ता आता अधिक रुंद आणि अधिक चकचकीत आहे. रस्त्याच्या टोका-टोकांना चहाच्या मोठमोठ्या पेट्यांसारखे दिसणारे लाकडी बॉक्स पालथे ठेवलेले आहेत, त्यांच्यावर एका ठिकाणी लाकडी फळ्यावर बरंच काहीतरी लिहिलेलं आहे. हे असे बॉक्स आणि त्यावरच्या फळ्यांवरचा मजकूर बऱ्याच ठिकाणी आता दिसतो. बरंचसं मैदान स्वच्छ आणि झकपक आहे. त्यात रंगीत खुंट्या रोवलेल्या आहेत- एकेक खुंटी एकेका प्रकारे. त्यांचा रंग जणू नुकताच दिल्याप्रमाणे चमचम करतोय. असं मैदान बरेचदा दिसतं.

बिन्नागुडीच्या वळणावरच आणखी एक रस्ता पूर्वेकडे वळालाय - ज्या मदारीहाटहून हा ट्रक आला त्या मदारीहाटच्याच दिशेला, पण मदारीहाटच्या थोडं उत्तरेला. हा रस्ता खूप जुना आहे. जुलूस, बस किंवा बाजारचा वार यांच्याव्यतिरिक्त ज्यांना जंगल-नदी पार करून या ठिकाणी कधी पायी, कधी सायकलवर फिरावं लागतं, त्यांना हा रस्ता शोभाराम मार्गे, तिनी नदी आणि बानगुडी नदी पार करून देवबुडापाडा आणि पुढे टोपाभासा या ठिकाणी जातो हे ठाऊक आहे. या मार्गावर मदारीहाटहून नियमित ये-जा करणारे दोन-चारजण या ट्रकमध्ये आहेत. आजकाल या रस्त्याने लोकांचं पायी आणि सायकलवर फिरणं खूपच कमी झालंय. आता बसमार्ग खूप वाढलाय. एक बस बदलून,

दुसऱ्या बसमध्ये चढून प्रवास करायला लोकांना आवडतं.

पण अनेक दिवसांपासूनच हा रस्ता डांबरी आणि अधिक करण्याबाबत चर्चा चाललीय. तसं झालं, तर बिन्नागुडीबरोबरच हासिमाराकडे जाणारा एक सरळ रस्ता सुरु होईल. बिन्नागुडी आणि हासिमारा या दोन्हीं ठिकाणीं गरज पडली तर अगदी विमानसुद्धा उतरतं. हा रस्ता तयार झाला, तर नॅशनल हायवेवरून अशा सगळ्या कुणालाही कळू न देता सहजच हा रस्ता वापरला जाईल.

शिवाय या रस्त्यामुळे बिन्नागुडी-हासिमारा ही गांवं जोडली जातील एवढंच काही नाही. खरं तर चालसाच्या वळणावरून लॅटरल रोड धरून बिन्नागुडीपर्यंत येऊन ज्या गाड्यांना जावं लागतं, त्या गाड्या सरळ हासिमाराला जाऊ शकतील- कुणाच्याही नजरेस न पडता. शिबक डोंगरापलीकडे, तिस्तेच्या पश्चिमेकडील तिरापलीकडच्या फॉरेस्टमध्ये प्रचंड कॅम्प-फॉरेस्टमधून एकदा बागडोगरा प्लेन दरीजवळ बंगडुबीपर्यंत गेलं. पश्चिमेकडे बंगडुबी आणि पूर्वेला हासिमारा - शिलिगुडीपासून जलपाइगुडीच्या पूर्व सीमेपर्यंत लष्कराच्या व्यवस्थेखाली असलेला प्रदेश मग आपले स्वतःचे रस्ते आणि वाहने-विमाने यांच्यामुळे स्वावलंबी होऊ शकतो. सध्या बिन्नागुडीपर्यंत हे स्वावलंबन झालंय, पण तिच्या पुढे मात्र काही ते सरकत नाहीय. किंवा इच्छा असूनही पुढे येत नाहीय. असं म्हणतात की काही नद्यांवर पूल नसल्याने रस्ते अडकले आहेत. या प्रदेशातला तर कुठलाही रस्ता पूल किंवा कल्व्हर्टशिवाय पूर्ण करता येत नाही. लष्कराने मनावर घेतलं, तर डाबडूब आणि शुखातिती यांच्यासारख्या नद्यांवर कल्व्हर्टस् बांधायला कितीसा वेळ लागणार आहे?

बिन्नागुडी पाहून डोळे थोडे दिपतात हे खरं आहे. पण इकडच्या फॉरेस्टमध्ये किंवा चहाच्या मळ्यांमध्ये जे लोक फिरतात, या फॉरेस्ट आणि मळ्यांवरच ज्यांची उपजीविका अवलंबून आहे, त्यांना फक्त लष्कराचा खाकी रंग हीच तेवढी नवीन गोष्ट वाटते. बाकीच्या अनेक गोष्टी सवयीच्या आणि ओळखीच्या आहेत. फॉरेस्टचं रेंज ऑफिस, रेंजर आणि इतर कर्मचाऱ्यांची क्वार्टर्स तर एरवीही झकपक दिसतात. ही विटा-सीमेंट वापरून बांधलेली, तर इतर घरं लाकडाची असतात. पण प्रत्येक घरासमोर तारेचं कुंपण असतं. लाकडी भिंतींना दरवर्षी रंग दिला जातो. छताला लाल रंग असतो.

लष्कराचे कँपस् दिसायला फॉरेस्टच्या इमारतींसारखे नाहीत, बरेचसे चहाच्या मळ्यांसारखेच दिसतात. चहाच्या मळ्यामधल्या इमारतीही विटा-सिमेंटच्या असतात. छपराला लाल रंग दिलेला असतो. शाळा, इस्पितळ, फॅक्टरीचं ऑफिस, वजन करण्याची जागा - या सर्वांच्या समोरच बरीच हिरवी शेतं असतात, आणि शेतांभोवती तारेची कुंपणं. दोनेक जागी फुलांच्या बागासुद्धा. रस्ते डांबरी, किंवा किमान खडीचे तरी असतात.

एकसारख्याच दिसणाऱ्या या चहाच्या मळ्यांनीच लष्कराच्या छावण्यांना वेढलंय, की लष्कराच्या छावण्यांनीच चहाच्या मळ्यांना वेढलंय?

## दोनशे दहा

# ट्रकमध्ये निर्जनतेचं गीत

गयेरकाटाहून उजवीकडे वळून हा रस्ता धरल्यावर काही क्षणांमध्येच ट्रकवर जणू निर्जनतेचं सावट पसरतं- दूरच्या प्रवासाला निघालेल्या ट्रेनच्या कंपार्टमेंटमध्ये असते, तशी निर्जनता. नॅशनल हायवेवरून येताना अनेक गाड्यांजवळून जावं लागतं, अनेक गाड्या आपल्या गाडीशेजारून जातात, समोरून येऊन कित्येक गाड्या वाऱ्याचा झोत अंगावर टाकीत निघून जातात. पण या रस्त्यावर तसं काहीच नाही, एकाकीपणेच मैलांमागून मैल गाडी चाललीय, मैलांमागून मैल. कधीमधी दिसणाऱ्या मळ्याच्या किंवा लष्कराच्या ट्रकमुळे ते एकाकीपण नष्ट होत नाही. उलट मनात येतं, ते या निर्जनतेमधून अधिकच निर्जनतेमध्ये जाणार आहेत. फॉरेस्टमधून मैलांमागून मैल चालताना, किंवा पहाडावरून उतरताना, किंवा चहाच्या मळ्यामधून कुठे जाताना, किंवा पावसाळ्यात येणाऱ्या पाण्यामुळे वाहून जाणाऱ्या नदीच्या कोरड्या पात्राच्या कडेकडेने चालताना अशाच प्रकारचं निर्जन, एकाकी वाटतं. या ट्रकमध्ये बसून एकत्रपणे जी माणसं आता तिस्ता बंधाऱ्याकडे चालली आहेत, त्या सर्वांनाच अशा निर्जनतेचा, एकाकीपणाचा आजन्म सराव आहे. ही निर्जनता, हा एकाकीपणा कसा घालवायचा हे यांच्यापैकी प्रत्येकाला आपापल्या परीने ठाऊक आहे. ज्या तरुणी बाजारमैदानात नाचत होत्या, त्या आता एकमेकींच्या खांद्यावर डोकी टेकून ट्रकमध्ये बसलेल्या आहेत. काहीजणी अद्यापही एकमेकींच्या आधाराने तोल सांभाळताहेत. कुणीतरी रुदनाच्या सुरात गुणगुणत गाणं सुरू करते. कोण गातंय हे समजत नसलं, तरी सूर ओळखू येतो. हा सूर एकाकीपणे चाललेल्या दूरच्या यात्रेला साथसंगत देतो.

ट्रकच्या हिंदकळ्यामुळे सूर कधीकधी खंडित होतो, अचानक एखाद्या ठिकाणी वरच्या पट्टीत जातो, तर दुसऱ्या ठिकाणी खालच्या पट्टीत उतरतो, पण सूर हा सूरच रहातो. जिने गाणं सुरु केलं, तिचा सूर पुढे कुणी उचललाय, कधी उचललाय ते लक्षातच येत नाही - गुणगुणण्याच्या सुरांमधला फरक हा इतका कमी असतो. पण, त्याहीनंतर कधीतरी, देवपाडा चहामळ्यातल्या या तरुणी एकमेकींच्या खांद्यांवर किंवा पाठीवर डोकी टेकवून, ट्रकमध्ये झुलत-झुलत रुदनाच्या सुरात ते गाणं गात रहातात -

'मावशी, तू यापेक्षा चांगलं कांबळं शोधू नकोस
साऱ्या कांबळ्यांत एकच लोकर.
साऱ्या लोकरींत सारख्याच पिसवा.
सारी रात्र मी जागी आहे आणि पिसवा चाव-चाव चावताहेत
की पिसवा चावताहेत म्हणून मी सारी रात्र जागतेय?

मावशी, तू परत बाजारातून
पिसवा मारायचं तेल आणू नकोस
अशा पिसवा मला पुन्हा कुठे मिळतील?
अशा पिसवा मला पुन्हा कुठे मिळतील?'

हे गाणं बराच वेळ चालतं. कधी दहाजणी एका सुरात गातात, कधी दहाही जणी एकाच वेळी थांबतात; नव्या दोघीजणी नवीन ओळ गाऊन सोडून देतात; पुन्हा अचानक साऱ्याजणी मिळून जुनी ओळ म्हणायला सुरु करतात - सगळ्यांना जणू पिसवांची आठवण होतेय; पुन्हा साऱ्याजणी नवीन एखाद्या मुलीकडे गाण्याची नवी ओळ देऊन गप्प होतात. हा जणू त्यांचा रिकामा वेळ आरामात घालवण्याचा एक विरंगुळा आहे; लांबचा मार्ग कापताना जो आळस येतो, तो आळस घालवण्याचा एक उपाय आहे.

अचानक एक तरुणी सरळ होऊन बसत म्हणते. 'चहाच्या मळ्यातल्या गॅमाक्सिनने तर आता पिसवाही मारून टाकल्यात. रहाण्यासाठी किड्यांना आता झाडांची पानंही मिळत नाहीत - हाय रे! आता हे किडे रहाणार तरी कुठं!'

हे वाक्य ती तरुणी आपल्या मातृभाषेत म्हणते, पण तिच्या बोलण्याचा अर्थ या वृत्तांताच्या वाचकांच्या भाषेत समजावून सांगावा लागणार. हाय, ती तरुणी तर काही या वृत्तांताची वाचक नाही. तिच्या बोलण्याचा आशय त्या गाण्याच्या आशयाशी इतका एक होऊन जातो, की वाटतं, या तरूणीला आपली आई-आजी, आजीची आजी यांच्याकडून मध्यप्रदेशापासून तर बिहारपर्यंतच्या जंगला-पहाडांत प्रसृत झालेलं हे जे गाणं मिळालं आहे, त्या गाण्यात तिने आणखी एका नव्या ओळीची भर घातली आहे. किंवा या ट्रकमध्ये ते प्राचीन गाणंसुद्धा एकसुरी वाटतंय, ते गाणं गाण्यामुळेसुद्धा ट्रकमधला एकसुरीपणा संपत नाहीय; म्हणून हे वाक्य बोलून जणू त्या तरुणीने त्या गाण्याला बाद करून टाकलंय. गाण्याचा विस्तार किंवा संकोच ही संकल्पना न समजूनसुद्धा तरुणींच्या गटातील सगळ्याजणींना एकाच वेळी हसू फुटतं, हसता-हसता त्या सरळ होऊन बसतात; पुन्हा हसतात; आणि त्याचबरोबर त्यांचं एकाकीपणही हसतं.

काही काळ हसल्यानंतर त्या तरुणी गाणं थांबवतात. आता गाण्यापेक्षा त्यांना हसण्यात जास्त आनंद मिळतोय. त्यानंतर एका क्षणी ते हसणंही थांबतं. ट्रकमध्ये काही क्षणांसाठी जे परिवर्तन आलं होतं, ते बसच्या हिंदकळण्यात, वाऱ्यात संपून जातं. पुन्हा तेच गचके, पाय ताणणं, पाय जवळ घेणं, कशाचा तरी आधार घेऊन तोल सांभाळणं. पुन्हा एकदा ट्रक त्या निर्जनतेमध्ये, त्या एकाकीपणामध्ये प्रवेश करतो.

राजबन्शी तरुणी ट्रकच्या मागच्या बाजूला बसलेल्या होत्या. तिथून एकीच्या गुणगुणण्याचा आवाज येतो. गाण्याच्या चालीमुळे सर्वांना वाटतं, बहुधा देवपाड्याच्या तरुणींनीच जणू पुन्हा गाणं सुरू केलंय. पण गाण्याची चाल पुढे ऐकल्याबरोबर लक्षात

येतं - नाही, आता राजबन्शी तरूणी गाताहेत. हळूहळू एकेक राजबन्शी तरुणी आपला सूर या गाण्यामध्ये मिसळू लागते. खाली मान घातलेल्या, घूंघट घेतलेल्या राजबन्शी तरुणींच्या गटामधून वृंद-स्वरात गाणं आकार घेऊ लागतं. आईच्या मांडीवर डोकं ठेवून पहुडलेली एक मुलगीही आपला सूर या गाण्यात मिसळते.

'रात्र पहा सरून गेली,
काळी मुर्गी सफेद झाली,
की काळ्या मुर्गीला झाकून
पांढऱ्या मुर्ग्याने पंख फुलवले,
तुरा उभारला. . .
आणि सारी रात्र संपल्यावर तुला वेळ झाला का रे
पान - सुपारी देऊन माझा राग काढायला?'

दबल्या, रुदनाच्या सुरातलं हे गाणं ट्रकच्या गचक्या-हेलकाव्यांबरोबर चालूच रहातं. पण बानारहाट आल्याबरोबर 'राग संपतो.' उजवीकडे सरळ चामुर्चीचा रस्ता गेलाय, समोर बानारहाट बाजार, रेल्वे स्टेशनच्या खुणा दिसताहेत, प्यँक-प्यँक करीत काही रिक्षा जातात, त्यानंतर लगेच एका खुल्या मैदानावर तीन ट्रक आणि अनेक माणसं, झेंडे, पताका, फेस्टूनस. या ट्रकला पाहिल्याबरोबर माणसं पळतपळत रस्त्याजवळ येतात, चित्कारत हात हलवीत रहातात- या ट्रकची गती थोडी कमी होते. इतकी कमी, की ट्रकमधल्या आणि मैदानातल्या लोकांना वाटतं, ट्रक आता बहुतेक थांबणारच. ट्रकमधले लोकही उभे रहातात आणि मैदानातल्या लोकांच्या दिशेने पाहून हात हलवतात.

मैदानात जाण्याचा कल्व्हर्ट मागे टाकल्याबरोबर लक्षात येतं, की ट्रक थांबणार नाही. तेव्हा मैदानातले लोक पुन्हा पळत पुढे येऊन हात हलवतात.

मैदानातून अचानक घोषणा सुरु होतात - 'डावी आघाडी सरकार - झिन्दाबाद!' 'चलो, चलो - बॅरेज चलो!' 'बॅरेजमें आज क्या होगा - लहर लहर लहर देगा!'

ट्रकमधले लोकही उभे राहून घोषणा देत रहातात. कोण घोषणा देतंय हे समजत नाही, पण इतक्या लोकांच्या कोरसमधील आवाजामुळे आतापर्यंतची निर्जनता संपते, एकाकीपणा नष्ट होतो. बानारहाटचा अर्धशहरी चेहरा, त्यात रांगेने उभे राहिलेले, एकाच मेळाव्यासाठी चाललेले ट्रक, मैदानभर लोक - या सगळ्या गोष्टी मिळून बाजारमैदानातली ती सकाळची अवस्था जणू परत आल्यासारखी वाटते - सर्वांना मिळून जणू कुठेतरी जायचंय, काहीतरी करायचंय. या ट्रकमधली ही इतकी माणसं आतापर्यंत जणू खूप एकाकी होती, आता त्यांना वाटणारं ते एकाकीपण निघून गेलंय.

बानारहाट मागे टाकल्यानंतर पुन्हा चहाचे मळे सुरु होतात. त्याच चहाच्या

मळ्यांमजवळून एक ट्रक रंगांनी झगमगत पुढे जातोय. नदीमध्ये जसं पुढल्या नौकेबरोबर जाण्यासाठी मागची नौका गती वाढवते, त्याप्रमाणे हा ट्रक आपला वेग वाढवतो, आणि ट्रकवरचे लोक घोषणा सुरू करतात - 'झिन्दाबाद झिन्दाबाद!' पण वारा तर या घोषणा मागे उडवून घेऊन जातो.

## दोनशे अकरा

# मदारीची आई माणसांचा गंध हुंगते, आवाज ऐकते

सुरुवातीचा रस्ता वगळला, तर बाकीच्या रस्त्यावर त्यांना संगतीचा अभाव कधीही वाटत नाही. बानारहाटहून सरळ जाऊन लॅटरल रोडवर यावं लागतं. बानारहाटनंतर लगेच त्यांना दिसतं की समोर दूर एक ट्रक चाललाय, किंवा त्यांच्या मागून एक ट्रक येतोय. गयेरकाटा पासून लॅटरल रोडचं पंधरा सोळा मैल अंतरानंतर बानारहाट मागे पडल्यानंतर दूर दूर बिखूरलेल्या संख्येमुळे नव्हे, पण आणखी एक ट्रक पाहिल्याबरोबर कसा उत्साह वाटतो! सगळे ट्रक एकाच दिशेने चालले आहेत, सगळे लोक एकच घोषणा देताहेत, ट्रक्सची अदलाबदल झाली तरी काही फरक पडणार नाही - त्यामुळे दूरत्व हे दूरत्व रहाणार नाही.

मदारीच्या आईला खूप चांगलं वाटतं.

तिला उचलून ट्रकमध्ये जिथं बसवलं गेलं होतं, त्याच ठिकाणी ती अद्यापपर्यंत बसलेली आहे. तिची जागा होती देवपाडाच्या स्त्रियांमध्येच, एका कोपऱ्यात. कोपऱ्यामुळे मदारीच्या आईची खूपच सोय झाली होती. ती ड्रायव्हरच्या पाठीमागच्या लाकडी पार्टिशनला टेकून बसू शकत होती. नाहीतरी तिने कुणाच्या अंगावर आपली पाठ, आपलं डोकं टेकवलं असतं? आणि मदारी आहे तिच्या डोक्याच्या वरच्या दिशेला. वाटेल तेव्हा ती हाक मारून त्याचा चेहरा पाहू शकत होती, किंवा उभी राहून त्याला स्पर्श करू शकत होती.

हे इतके लोक, इतके ट्रक, इतका मोठा मेळावा, इतके शब्द, इतके आवाज - यांना मदारीच्या आईच्या दृष्टीने काहीच अर्थ नाही. तिला जर आजच्या या मेळाव्यात सामील होण्यासाठी कुणी बोलावलं नसतं, तरी ती या मेळाव्याला आलीही नसती - मुळीच आली नसती. या मेळाव्याशी तिचा काही संबंधच नाही. फॉरेस्टमधले अजस्र वृक्ष, वेली, पानं या सगळ्यांशी जसा तिचा सर्वांगीण संपर्क आहे; रोजचा संपर्क, संबंध आहे, त्या संपर्काबाहेर येणं तिला शक्यच नाही. इथे ती आलीय ते केवळ मदारीच्या हट्टामुळे.

त्याशिवाय मदारीला एकट्याला असं तिला या मेळाव्याला जाऊ द्यायचं नव्हतं. मदारी एकटाच जर मेळाव्याला निघून गेला असता, तर तिला आणखी एक मुलगा कुठून मिळाला असता? एखाद्या मुलाशिवाय तर काही तिचं चालत नाही. एक मूल व्हायला एक वर्ष लागतं, पण आता आणखी एक मूल गर्भात धारण करणं तिला अवघडच झालंय.

आणखी एक गोष्ट मदारीच्या आईला आठवते. ती यापूर्वी कधीही इतक्या दूर आलेली नाही, इतक्या मोठ्या मेळाव्यात सामील झालेली नाही. इतक्या दूर-दूरच्या ठिकाणांहून इतके लोक येताहेत, त्यांच्यामध्ये तिची आठ किंवा दहा मुलं-किमान काही मुलं तरी - नक्कीच असणार. तीही दूर-दूर गेलेली मुलं होती ना!

मदारीच्या आईच्या दृष्टीने हा मेळावा, हा आरडाओरडा, इतके लोक हे एका परीने अर्थहीन असलं, तर बाजारमैदानापासूनच तिला खूपच चांगलं वाटतंय. सुरुवातीला-जेव्हा तिने आणि मदारीने चहा घेतला, तेव्हा काही इतकं चांगलं वाटलं नव्हतं, पण देवपाडाहून माणसं आल्यानंतर त्या गर्दीत फिरताना तिला चांगलं वाटलं. रोजच तिला असं भटकावं लागतं, पण ते असतं झाडाझुडुपांमधून, लतावेलीमधून भटकणं. एखाद्या दिवशी सकाळी जरी तिने जंगलात फिरायला उशीर केला, तरी बाभुळझऱ्याच्या तिच्या घरात जंगलाचा गंध काही तिला तिची पाठ सोडत नाही - एवढंच काय, अगदी झोपेतही तो गंध तिला सोडत नाही. पानांचा एक तीव्र असा कडवट गंध, त्यात मिसळलेला कितीतरी गोष्टी सडल्याचा गंध - पाचोळा सडतो, मेलेल्या जनावरांची प्रेतं सडतात, झाडांखाली अडकलेल्या वेली सडतात. या सगळ्यांमध्ये अमोनियाचाही वास मिसळलेला असतो. मदारीच्या आईला या सगळ्या मिश्र वासांच्या मध्येच चोवीस तास श्वास घ्यावा लागतो.

तिला या सगळ्या वासांची जाणीव असते, असं नाही. एवढंच काय, 'वास' नावाचा काहीतरी प्रकार असतो, याचीसुद्धा तिला जाणीव नसते. अशा प्रकारच्या आवश्यक जाणिवा ठेवण्याइतका वेळ तिच्या जीवनपद्धतीत तिला नाही. पण त्या बाजारमैदानापासूनच, इतक्या लोकांच्या गर्दीतून फिरताना तिला कुठल्या तरी एका क्षणी हलकं-हलकं वाटायला सुरुवात झाली, ती जणू श्वासही अगदी हलके-हलके घेऊ लागली. त्यानंतर या ट्रकमध्ये इतक्या माणसांमध्ये बसून मैलांमागून मैल जाताना तिचा श्वास आणखी हलका झाला, आणखी हलका. दुःखाच्या आठवणी काढणं तिच्या जीवनपद्धतीत बसत नाही. सध्याच्या तिच्या उन्मुक्त अवस्थेची तुलना ती बाभुळझऱ्याशी करीत नाही, एवढंच काय, तिला बाभुळझऱ्याची आठवणही येत नाही. इतक्या माणसांमध्ये, इतक्या माणसांच्या त्वचेच्या गंधामुळे तिला खूप चांगलं वाटतंय.

मदारीच्या आईला माणसांचा असा सहवासच कधी एरवी मिळत नाही. आता, हा मेळावा, या ट्रकमधली माणसं हीच तिच्या दृष्टीने महत्त्वाची आहेत. ज्या माणसांकडून आपल्याला रोजची जीविका मिळत नाही म्हणून ती फॉरेस्टमध्ये जाऊन झाडंझुडुपं,

पशुपक्षी, किडेमकोडे आणि नदी-झऱ्यांबरोबर रहातेय, त्याच माणसांच्या शरीराचा गंध तिला एक प्रकारच्या मुक्तीची चव देतो, आजपर्यंत तिच्यावर असलेल्या जंगलातल्या दैनंदिन गंधाच्या सावटातून तिला बाहेर आणतो. मदारीची आई मधूनमधून दीर्घ श्वास घेतेय, या मुक्तीचा आस्वाद घेतेय. ती ज्याच्याशी बोलू शकेल, असं एकही माणूस इथं नाही. बाजारातले दोन-तीन दुकानदार आले, तर बहुधा तेच तिला 'मदारीची आई' म्हणून ओळखतील; आता फक्त एकटा बहादुरच तिला ओळखतोय, किंवा गरज पडली, तर हाक मारू शकतोय. तिला तिच्या नावाने हाक मारू शकणारा एकही जण या गर्दीत नसल्याने तिला एका कोपऱ्यात चुपचाप बसून रहावं लागणार; किंवा बाजारमैदानात जशी ती गर्दीमधून एकटीच भटकत फिरली होती, तशीच हा जुलूस जिथे उतरणार, तिथे भटकत फिरणार, पण तिला इथं माणसांची साथ-सोबत मिळणार.

माणसाच्या शरीराच्या गंधामधून जशी मदारीच्या आईला साथसोबत मिळते, तशीच माणसांच्या आवाजामधूनही तिला साथसोबत मिळते. फॉरेस्टमधील सगळे आवाज तिच्या ओळखीचे आहेत. फक्त बाभुळझऱ्याला असलेल्या तिच्या गवताच्या घराच्या आसपासचेच आवाज नव्हेत, तर तिच्या घरापासून खूप दूर असलेल्या फॉरेस्टमधले आवाजही तिच्या ओळखीचे आहेत - अगदी मदारीच्या श्वासांइतके ओळखीचे आहेत. फॉरेस्टमध्ये कुठलाही आवाज अकारण होत नाही. प्रत्येक आवाजाला काहीतरी कारण असतं, इतिहास असतो. फॉरेस्टमधल्या पशुपक्ष्यांना, किड्यामुंग्यांना या प्रत्येक आवाजाचं कारण ठाऊक असतं, इतिहास ठाऊक असतो. हे त्यांना शरीरामुळे ठाऊक असतं, शरीरानेच ते आवाजांची कारणं व इतिहास ओळखू शकतात. आणि, या आवाजाच्या अर्थाच्या संगतीनुसार ते आपल्या शरीराच्या सहाय्यानेच स्वतःमध्ये बदल घडवून आणतात. शरीराने जे फॉरेस्टचा आवाज ओळखू शकत नाहीत आणि शरीराच्या सहाय्याने त्या आवाजाला प्रतिक्रिया व्यक्त करू शकत नाहीत, ते फॉरेस्टमध्ये राहू शकत नाहीत. पण मदारीची आई ही तर काही पशु-पक्षी, किडेमुंग्या यांच्यापैकी नाही. जंगलातले हे आवाज ऐकण्या-न-ऐकण्याची तिच्या मानवी शरीराला एक सीमाही आहे. गाव-शहर यांच्यापैकी कुठेही मनुष्यवस्तीत रहाण्यासाठी मदारीच्या आईला जागा मिळाली नाही, आणि शेवटी एका जंगलानेच तिला रहायला जागा दिली, म्हणून काही मदारीच्या आईच्या शरीरात लक्षावधी वर्षापूर्वी मानवजातीच्या शरीरातून जो आवाज ऐकण्याचा अनुभव लुप्त होऊन गेला, तो अनुभव संचित आणि सुरक्षित राहू शकत नाही. सगळीच वानरं काही माणसं झाली नाहीत, त्याचप्रमाणे सगळीच माणसं काही खेड्यांत किंवा शहरांत रहायला गेली नाहीत - याच न्यायाने मदारीची आई आपल्या शरीरामध्ये लक्ष वर्षांपूर्वीची आरण्यक स्मृती वहन करू शकत नाही. मेळाव्यातला मानवी कल्लोळ तिला खूप चांगला वाटतो. पावसाळ्यातल्या नदीपेक्षाही, किंवा, आकाशातल्या मेघांपेक्षाही, लोकांचा हा आकाशापर्यंत

वर जाणारा गुणगुण असा आवाज तिला चांगला वाटतो.

रात्रंदिवस, दिवसरात्र; मासवत्सर, वत्सरमास रातकिड्यांच्या स्वरांनी आच्छन्न अशा मदारीच्या आईच्या कानांत हे आवाज एक परिचित विभ्रम निर्माण करतात - जागेपणीच स्वप्न पहात असल्यासारखा विभ्रम. इथं इतक्या माणसांचे इतके आवाज तिच्या मनात तोच विभ्रम निर्माण करतात.

आता, या क्षणीं हाच आवाज आणखी दूर-दूर पसरतो. एखाद्या पहाडाची खूण समोरच्या फॉरेस्टमधल्या झाडाझुडुपांमधूनही नजरेस पडते. ट्रकच्या चाकांखालची माती बहुधा एवढ्यातच उडू लागते. अचानक उजवी-डावीकडे हेलकावे खात एक ट्रक निघून जातो. चहाच्या मळ्याच्या किंवा शेताच्या हिरवाईत ट्रकचा हिरवा रंग मिसळून जातो, फक्त ट्रकवरचा झेंडा आणि त्यातल्या माणसांचे रंगीत कपडे तेवढे ठळक दिसतात. मध्ये हिरवाईचं अंतर ठेवून हा ट्रक आणि तो ट्रक बराच काळ जणू समांतर धावतात.

त्यानंतर एकमेकांना दिसेनासे होतात.

## दोनशे बारा

# पहाड, पात्र, नदी, पूल

ट्रक एक आवाज करून थोडा वर उठतो, त्यानंतर वळून डावीकडे गेल्याबरोबर समोर एक चकचक काळा रस्ता आणि उजवीकडे, हात पसरल्याबरोबर स्पर्श करता येईल इतक्या जवळ डोंगर, निळा डोंगर. मदारी त्याच्यापुढे बसलेल्या दोघाजणांना दोन हातांनी थोडं बाजूला सारून मधून डोकं पुढं काढतो, आणि मान फिरवीत एकदा पहाड पहातो, एकदा रस्ता पहातो. आपल्याला पहाड आणि रस्ता यांच्यापैकी नक्की काय अधिक आकर्षक वाटतं हे जणू मदारीला समजत नाही. रस्ता तर त्याला काही नवीन नाही- अगदी फॉरेस्ट इतकाच परिचयाचा आहे, पण हा रस्ता नवीन का वाटतो? खुला रस्ता - वरती आकाश आणि खाली रस्ता हे दृश्य तर तो अगदी बिन्नागुडीपासून पहात आलाय. पण इथे रस्ता जणू आणखी मोकळा, खुला होतो- कारण डाव्या बाजूला दरी आहे, त्या दरीमधूनच नदी वाहाताना वृक्षराजीमधून दिसते, ती दरी खूप दूरवर पसरलेली आहे - दूरवर निळसर फॉरेस्ट. त्याबरोबर मदारीच्या लक्षात येतं की पहाड काही खूप जवळ नाहीत. . . पण पहाडांवरचं जंगल ओळखू येत असलं, तरी त्याचा हिरवा रंग ओळखू येत नाही. ट्रक नवीन रस्त्यावर इतक्या वेगाने चाललाय, की त्याच्याबरोबर पहाडही दिशा बदलताहेत असं वाटतं. मदारी समोरच्या दोन माणसांच्या अंतरामधून आपली मान इतकी बाहेर काढतो, की आपले दोन्ही हात पुढे टेकवून त्याला आपला भार सांभाळावा लागतो.

डावीकडचा तरुण विचारतो, 'काय बघतोयस रे?'

'पहाड, पहाड!'

'आधी कुठे पहाड बघितले नव्हतेस का?'

'नव्हते पाहिले. त्या एवढ्या उंच पहाडावर कोण रहातं?'

'माणसं रहातात-'

'त्यांना खाली उतरावं नाही लागत? चढउतार कसा करतात? या फॉरेस्टमध्ये तर नदीलाही शिरता येत नाही एवढं दाट जंगल -' मदारी म्हणतो. तो माणूस हसतो, 'इथं दिसतंय जंगल. इथं तुलाही जंगलात घुसता येईल-'

मदारी स्वतः अशाच प्रकारच्या एका जंगलाच्या अगदी मध्यभागी रहातो, पण ते जंगल त्याने कधीही इतक्या दूरवरून पाहिलेलं नाही.

'घुसता येईल?' मदारी जणू ही शक्यता आजमावून पाहू इच्छितो. त्यानंतर त्याच पहाडांकडे पहात एक गंभीर प्रश्न विचारतो - 'एवढ्या उंचावरून मी उतरणार तरी कसा काय?'

'रस्ता आहे, रस्त्याने उतर, इथेही माणसं रहातात.'

'रहातात? माणसं? इथं?' मदारी विचारतो. त्यानंतर थोडं गप्प राहून, अपरिवर्तित राहूनच ओरडतो, 'अगं माय गऽ, मा ऽऽय गऽऽ!'

मदारीची आई सरळ होऊन विचारते, 'काय रे?' पण मदारीला ते ऐकू येत नाही. तो वरतून ओरडतो, 'ए माय, माऽय गऽ, पहाड दिसताहेत का, उंच पहाड?'

मदारीच्या या प्रश्नावर ट्रकमधले सगळेच हसतात. मदारीची आई हळू आवाजात उत्तरते, 'दिसताहेत, पहातेय.' मदारीच्या प्रश्नानंतर सगळेजण मदारीच्या आईकडे एकदा पाहून घेतात. मदारीच्या आईला थोडं अवघडल्यासारखं वाटतं - इतके सारे लोक तिच्याकडे पहाताहेत. ती डोळे खाली वळवते. पुन्हा वर उचलते.

मदारीची आई जिथे बसली होती, त्या ठिकाणाहून पाहिलं, तर पहाड मागून पळत येताहेत असं वाटतं. त्या जागेहून बरेचदा डोंगरांची शिखरं दिसत नाहीत - वाटतं, जणू डोंगरांनी अगदी आकाशही झाकून टाकलंय. पुन्हा एखाद्या क्षणी जणू पहाडांची भिंत भंगल्यासारखी वाटते. डावीकडे पाहिलं, तर दरी दिसते. त्या दरीमध्येही नदी, झरा, चहाचे मळे, शेतं, दूर फॉरेस्ट दिसतं. नागरकाटाच्या जरा जवळ आल्यावर दिसतं, आणखी दोन-तीन ट्रक एकाच पद्धतीने चालले आहेत. त्यांच्यापैकी एखाद्या ट्रकला हा ट्रक कधी मागे टाकतो, तर कधी या ट्रकला त्या ट्रक्सपैकी एखादा ट्रक मागे टाकतो. मागे टाकण्याच्या वेळी आधीप्रमाणेच ट्रक्समधील लोक एकमेकांकडे पाहून हात उंचावतात, है-है आरोळ्या देतात, कधी घोषणांची देवाणघेवाण होते, पण या ट्रकमधले लोक तर तोपर्यंत चाळीस मैल मागे टाकून आलेले असल्यामुळे बरेचदा फक्त हात

उंचावतात आणि पुढे जातात.

बानारहाट मागे टाकल्यानंतर दूर दूर अंतरांवर ट्रक दिसले होते, पण या रस्त्याला लागल्यावर वाटलं, की सगळे ट्रक याच रस्त्याने जाताहेत. अनेक ठिकाणी उभ्या राहिलेल्या ट्रक्सजवळही माणसं उभी आहेत. ती ट्रकने बंधाऱ्यावर जाणार, की कुणा बाजारला जाणार, की इथल्या शेतातल्या काही वस्तू ट्रकमध्ये भरून वजन करण्याच्या ठिकाणी जाणार हे काही समजत नाही. पण त्यांच्याजवळून जाताना एकमेकांकडे पाहून हात हलवणे, ओरडणे या गोष्टी होतातच.

मदारीहाट मागे टाकून या रस्त्यावर आल्यानंतर वाटतंय, की ते सगळे लोक जणू तिस्तानदीवरच्या बंधाऱ्यांच्या जवळपास येऊन पोचले आहेत. जेव्हापासून इथल्या लोकांनी तिस्तानदीवरच्या बंधाऱ्याच्या उद्‌घाटन-दिवशी होणाऱ्या या जुलूसाबद्दल ऐकलंय, तेव्हापासूनच ते ताडीच्या बैठकीत, लाईन मिटिंगमध्ये, बाजार-मिटिंगमध्ये, ही नदी, बंधारा, पाणी यांच्या कल्पनेला कुरवाळताहेत. हा ट्रक तर येतोय तोर्सापलीकडून. तोर्साहून तिस्ता नदीकडे. तिस्ता नदीशी तर त्यांची रोजची काही गाठभेट नाही. तिस्ता नदी ही तोर्सा नदीपेक्षा मोठी आणि भयंकर आहे - पहाडबिहाड भेदून, वनं-जंगलं उन्मळून टाकून, खेडी-शहरं बुडवून टाकून ती पुढे जाते.

अगदी प्रत्येक वर्षी त्यांना तिस्तेच्या महापुराची बातमी ऐकावी लागते. हे सगळं ऐकल्यापासून तिस्ता बंधाऱ्यासंबंधी त्यांची जी कल्पना तयार झालीय्, त्या कल्पनेला हा डोंगर, ही दरी, हा अपरिचित निसर्ग जणू सत्य करतो आहे. असं वाटू लागतं, की या सगळ्या डोंगरांच्या एका वळणामधून तिस्ता थेट आभाळामधून उतरतेय्. त्यांचा ट्रक अचानक त्या दिशेला तोंड करून उभा राहील आणि त्यांना उभ्या-उभ्याच तिस्ता बंधारा या डोंगराप्रमाणेच पहावा लागेल.

ते लोक तिस्ता बंधाऱ्याच्या जवळपास आले आहेत असं वाटण्याचं आणखी एक कारण म्हणजे या मार्गावर नद्यांमागून नद्या आणि पुलांमागून पूल आहेत. उजव्या बाजूला डोंगर आणि चढ, तर डाव्या बाजूला दरी. त्यामुळे थोड्या-थोड्या अंतरांवर उजवीकडून पाण्याचे शुभ्र फेस असलेले प्रवाह दगडांवरून उड्या घेत घेत एकेका रंगीत पुलाखालून डावीकडच्या दरीत पडताहेत आणि पुढे वहात जाताहेत असं दृश्य दिसतं. इतक्या साऱ्या नद्यांचं झरा होऊन झरणं आणि नदी होऊन वहाणं पहाता-पहाता एक-एक पूल सूं-सूं करीत मागे जातो - लोंगती, चुना, पाथांग, डायना, जलढाका, मूर्ती, नेवारा, जुर्ती : असं वाटतं, की जिथे तिस्ता डोंगरावरून खाली येते, त्या ठिकाणी जाऊनच हा रस्ता थांबणार.

चालसाच्या वळणावर पोलिसांनी ट्रक थांबवला. मदारीहाट सोडल्यानंतर ट्रक प्रथमच थांबला. समोरही अनेक ट्रक उभे होते. ट्रक थांबला म्हणून अनेकजण उभे रहातात

आणि हात-पाय ताणतात. दोनेकजण उतरायलासुद्धा लागले होते, पण पोलिस दिसल्यामुळे उतरले नाहीत.

पोलिस येऊन विचारतो, कुठून येतोय् हा ट्रक? कुठून?' त्याच्या आवाजामधून त्याची लगबग, घाई जाणवते.

डालग्यांवर बसलेले लोक आता उभे राहून, जवळजवळ एकाच सुरात म्हणतात. 'मदारीघाट!'

'ड्रायव्हर कुठंय्? परमिट बघू?' पोलिस आता ड्रायव्हरच्या केबिनजवळ जाऊन उभा रहातो. ड्रायव्हर एक कागद पुढे करतो. तो पाहून परत देतानाच पोलिस ओरडून विचारतो, 'लिडर कोण आहे ट्रकमधी, लीडर?' याचं उत्तर काय असणार हे जणू समजावून सांगण्यासाठीच पोलिस जिथून बोलत होता, तिथले लोक त्या तरुणाकडे पहातात. तरुण दुसऱ्या टोकाला उभा होता. तो बायकापोरींच्या एका माणसाच्या मानेवरून डोकं बाहेर काढीत विचारतो, 'काय प्रकार आहे?'

'आपण घेऊन चाललात काय हा ट्रक? नांव सांगा.'

'सुखेन्दु राय.'

'हे सगळे लोक मळ्यातले; की वस्तीवरचे?'

'दोन्ही ठिकाणचे आहेत.'

'नाव सांगता येईल का?'

'कुणाचं? या प्रत्येकाचं?'

'नाही, गावाचं आणि मळ्याचं. अच्छा, नंतर सांगा. ओदलाबाडीला तुम्हा सर्वांना चहा मिळेल. घ्या, ही स्लिप ठेवा तुमच्याजवळ -' पोलिसाने पुढे केलेल्या हातातून एकजण कागद घेतो.

## दोनशे तेरा

# शताब्दी-सहस्राब्दीचा स्वाद

चालसाच्या वळणावर पोलिस सगळ्या गाड्यांना अडवून चेक करीत असल्यामुळे तिथे गाड्यांची जरा गर्दी झाली होती. या लॅटरल रोडवर आणि तिकडच्या नॅशनल हायवेवर गाड्यांची रांग तयार होते - मटियालीकडच्या बाजूला रस्ता मात्र रिकामाच. बाकी सगळ्या गाड्या तर माल वरून ओदलाबाडीला जाणार म्हणून त्या दिशेने इकडे येणाऱ्या गाड्यांना पोलिस अडवीत नाहीत.

अर्थात् पोलिस या गाड्यांना फार वेळ अडवीत नाहीत. मेळाव्याव्यातिरिक्त एखादा

ट्रक असेल तर त्याला साईड देऊन मेळाव्याचे ट्रक सहकार्य करीत व पुढे जाऊ देत. पण इथे थांबायला लागल्याने व पोलिसांच्या स्लिप देऊन सोडण्यामुळे चालसापासून मालबाजारापर्यंत रस्ता मेळाव्याच्या ट्रकांनी भरून जातो. वाटतं, आज या रस्त्यावर दुसरं काहीच घडणार नाही. शिवाय, इतके ट्रक एकसंगे चालले आहेत, आणि कुठलाही ट्रक आता पुढच्या ट्रकला मागे टाकण्याचा प्रयत्न करीत नाही, त्यामुळे वाटतं की ट्रक्सनीच हा जुलूस सजवला आहे. मालबाजाराच्या मध्ये तर काही हा ट्रक्सचा जुलूस शिरत नाही- नॅशनल हायवेवरून सरळ बाहेर जातो. मालबाजाराच्या वळणावर एक प्रचंड गेट तयार केलाय्, त्यावर डाव्या आघाडीचा लाल झेंडाच फडकतोय्. शिवाय वळणाच्या सुरुवातीलाही लोक रांगा करून उभे आहेत. तिथेही काही-काही ट्रक, काही-काही गट तयार झाले होते खरे, पण तेव्हा रस्त्यावरचा हा ट्रक्सचा मेळावाच मुख्य बनला होता. मालबाजारापासूनच पुन्हा घोषणा सुरू झाल्या.

पण यावेळच्या घोषणांचा जोरच निराळा आहे, अधूनमधून एखाद्या ट्रकमध्ये सगळेच उभे आहेत - कुणीही बसलेले नाही. प्रत्येकाने एक हात शेजारच्या व्यक्तीच्या खांद्यावर तोल सांभाळण्यासाठी ठेवला आहे, आणि दुसरा हात आकाशाच्या दिशेने उभारून प्रत्येकजण घोषणा देतोय्. सगळेजण अशा प्रकारे वर्तुळ करून उभे आहेत, की त्यांचे चेहरे वर्तुळाच्या बाहेरच्या दिशेला रहातील. घोषणांच्या बरोबरच सगळेजण आपल्या कमरेवरचा शरीराचा भाग आणि हात नृत्याच्या भंगिमांमध्ये हलवताहेत.

काही-काही ट्रक्समध्ये पुन्हा फक्त स्त्रियाच आहेत. त्या उंच पट्टीच्या आवाजात गाणं गात चालल्या आहेत - घोषणांच्याच आशयाची गाणी की काय ठाऊक नाही, पण त्या ट्रकच्या रांगेमधून ऐकू येणाऱ्या नाना प्रकारच्या घोषणांच्या मध्ये मधूनच ऐकू येणाऱ्या या स्त्रियांच्या कोरसमधील गाण्याने जरा वेगळंपण वाटतं, बरं वाटतं. त्यांच्या कोरसची तीव्रता वाऱ्याला छेदून जाते.

दोन-तीन ट्रक्समधून एन्. सी. सी. चे छात्रसैनिक गणवेशात चालले आहेत. दोन-तीन ट्रक्समध्ये शाळेचे विद्यार्थी-विद्यार्थिनी आपापल्या शाळेच्या गणवेशांमध्ये निघाले आहेत.

आता वाटतंय्, ते बंधाऱ्याच्या जवळपास आले आहेत - सगळे मिळूनच तिथे पोचायला हवं आहे. आणि, या पोचण्यामध्ये जणू एक नियमावली आहे, एक छंद आहे कुणीही आपल्या इच्छेप्रमाणे ती नियमावली किंवा छंद बिघडवू शकत नाही. मदारीहाटच्या ट्रकमध्ये त्यांनी मालबाजारपासून एका प्रचंड आयोजनामध्ये स्वतःला हळूहळू विलीन करणं सुरू केलंय्.

ओदलाबाडीला येऊन ट्रक थांबतो. कारण, आधीचा ट्रक थांबलाय्. थांबल्यावर या ट्रकच्या वरतून मान वर कर-करून पाहिल्यावर दिसतं, कि त्याच्या आधीचाही

थांबलाय्. चालसाचा अनुभव असल्यामुळेच बहुधा एक एकजण ट्रकच्या चाकावरून खाली उतरण्याचं धाडस करतो, पण पुढे जात नाही. ट्रकच्या जवळपास रस्त्याकडेला लघवी करायला सुरुवात करतो. लघवी करताना उद्विग्नपणे अधूनमधून डावीकडे पहातो - पुढचे ट्रक्स स्टार्ट झालेत की नाही. ट्रकच्या मधून एकजण ओरडतो, 'ए, बेंगू, यंत्र चालू ठेवून परत ये.' आणखी एकजण झोपेने जडावलेल्या आवाजात म्हणतो, 'बेंगूचं यंत्र काही पब्लिक हेल्थचं यंत्र नाही. त्याचं यंत्र म्हणजे घोषमशाईंची ट्युबवेल, हँडल उभंच असतं, खाली येतच नाही.' पण, बेंगूची लघवी पूर्ण होते-ना-होते तोपर्यंत आणखी काहीजण ट्रकवरून उतरतात - काही डालग्यांवरून उड्या मारून उतरतात. एका म्हाताऱ्याशा देउनियाला उतरता येत नाही. त्याला चाकावर पाय ठेवता येत नाही. तो पाय परत वर घेतो - त्याला फळीला धरून लटकताही येत नाही. खालून एकजण म्हणतो, 'एऽ तालई, तुम्हाला खाली उतरण्याची गरज नाही. तिथूनच सोडून द्या. आईच्या कुशीत छोट्या बाळाला लाज कशाची?'

तोच तरूण हाक मारतो, 'इकडून उतरा!' असं म्हणून मदारीच्या आईजवळून, ड्रायव्हरच्या दरवाजाजवळून खाली उतरण्याची वाट दाखवतो. देउनिया जराशा शरमिंद्या चेहेऱ्यानेच स्त्रियांच्या गर्दीतून जपून एकेक पाऊल टाकीत मदारीच्या आईजवळ येतो आणि खाली कसं काय उतरता येईल हे पुढं वाकून पहातो. त्याच्या मंद हसण्यावरून लक्षात येतय की उतरण्याची ही वाट निर्धोक वाटतेय्. उजव्या हाताने ड्रायव्हरच्या सीटवरील छपराचा मागचा भाग आणि डाव्या हाताने ड्रायव्हरच्या दरवाजाच्या वरचा भाग धरून देउनिया दोन पायऱ्या उतरल्याबरोबर पुढचा ट्रक सुरू होतो. या ट्रकमधले लोक ओरडायला सुरुवात करतात, 'एऽतालई, वरती या, वरती या!' देउनियाने तत्परतेने ड्रायव्हरच्या दरवाजाच्या वरचा भाग धरून पायरीवर डावा पाय दिल्याबरोबर त्याच्या पायातलं धोतर मागे अडकतं. लगेच तो तरुण तोंड पुढे करून म्हणतो, 'आपण जा ना, गाडी जाणार नाही, जा!' देउनियाला मुख्यत: धोतरासाठीच उतरावं लागतं. तरुणाने आश्वासन दिल्यावर देउनिया रस्त्यावर उतरून जरा दूर जाऊन बसतो.

तोपर्यंत समोरचा ट्रक बराच पुढे जाऊन डावीकडे वळला. मागचा ट्रक हॉर्न देतोय्. समोरचा पोलीस हाताने खूण करून बोलावतोय्. तरुण डालग्यावर उभा राहून पोलिसाला हात दाखवून इशारा करतो.

ट्रकमधून पुन्हा आरोळी येते, 'एऽतालई! बाकीची पुढे करा. आता वरती चला' ड्रायव्हरही खट्याळपणा करायचा म्हणून हॉर्न देतो. देउनिया उठून उभा रहातो, तातडीने वळून ट्रकच्या दिशेने चेहरा करून कपडे खाली करतो. त्यानंतर पळत येऊन ड्रायव्हरचा दरवाजा धरून पायरीवर चढतो.

देउनिया ट्रकमध्ये आल्यानंतर तो नेता तरूण हात पुढे करून ड्रायव्हरच्या

दरवाजाच्या वरच्या पत्र्यावर आवाज करून म्हणतो, 'चला!'

ट्रक थोडा पुढे जाऊन कॅम्पजवळ येऊन थांबतो. पोलीस येऊन विचारतो 'परमिट?'

तरुण पुढे जाऊन, हात पुढे करून चालसाला मिळालेली स्लिप दाखवतो. 'कितीजण आहेत - एक्झॅक्ट नंबर सांगा!' स्लिपकडे न पहाताच पोलीस म्हणतो. तरूण तिथे उभ्या-उभ्याच मोजणी सुरु करतो. मोजणी होतेय हे समजल्याबरोबर सगळे जरा सरळ होऊन बसतात. एकदा मोजणी झाल्यावर तरुण विचारतो. 'कुणी खाली उतरलेलं नाहीय् ना? ड्रायव्हरच्या कॅबिनमध्ये कितीजण आहेत?' - एवढं विचारल्यावर पुन्हा एकदा गणती सुरु करतो - सत्याऐंशी. त्यानंतर तोंड पुढे करून म्हणतो, 'एऽटी से न.'

पोलीस शेजारच्या तरुणाला म्हणतो, 'एऽटी सेव्हन.' त्यानंतर एक मोठा गद पुढे करीत म्हणतो, 'हा समोरच्या काचेवर लावून घ्या, नाहीतर ट्रकला आत येऊ देणार नाहीत.' तरुणाने हात पुढे केल्याबरोबर पोलिसाशेजारचा तरुण बॅजेसचं एक बंडल पुढे करून म्हणतो, 'प्रत्येकाला बॅज लावायला सांगा, नाहीतर एन्क्लोजरच्या आत येऊ देणार नाहीत. आणखी, जरा थांबा.'

दरम्यान पोलीस मोठा कागद तरुणाच्या हातात देतो. पोलिसाच्या शेजारचा तरुण एक टोपली पुढे करीत म्हणतो, 'टिफिन. सत्याऐंशी आहेत.'

तरुणाच्या हातातून ट्रकमधील काहीजण टोपली उचलून घेतात. त्यानंतर, टोपली कुठं ठेवायची म्हणून इकडे-तिकडे पहातात. तो नेता तरुण म्हणतो, तिथेच ओतून घ्या आणि टोपली परत घ्या.'

सगळेजण ट्रकमध्ये थोडी जागा करून देतात. पोत्यातील टिफिन ओतून घेऊन ते पोतं परत देतात. ट्रकचा अंतर्भाग बटाटे आणि कणीक यांच्या वासाने भरून जातो. ट्रक चालू होतो. मानाबाडीचं वळण घेतो.

ट्रक आपलचांद फॉरेस्टमध्ये घुसतो, तेव्हा मदारी आणि मदारीची आई यांना वाटतं, की ते जणू बाभुळझऱ्याला परत आले आहेत.

त्याच वेळी मदारीच्या आईला बॅज मिळतो. बरोबरच्या सेफ्टिपिनने तो बॅज ती पदरावर छातीजवळ लावून घेते. टिफिनचा द्रोणही मिळतो. जणू कितीतरी शतकांनंतर मदारीच्या आईच्या जिभेला माणसाने पिकवलेल्या गव्हाची आणि त्याच्या कणकेची चव चाखायला मिळते. कितीतरी सहस्त्राब्दीनंतर मदारीच्या आईला आपल्या जिभेमार्फत कळतं- पृथ्वीवर कितीतरी वेगवेगळ्या चवी आहेत. मदारीच्या आईच्या तोंडात बटाटा आणि रोटीचा तुकडा तोंडातल्या सहस्त्रावधी ग्रंथींच्यामधून स्त्रवलेल्या लाळेत जेव्हा भिजतो आणि पोटात जातो, अगदी त्याच क्षणी तिला दिसतं - आकाशापर्यंत पसरलेल्या एका विशाल नदीचे आडवे दोन भाग करून एक भिंत जणू आकाशाच्या दिशेने उंच, उंच गेली आहे - तिस्ता बंधारा.

## दोनशे चौदा

# नेता आणि जुलूस

बंधाऱ्याचे फक्त चारच स्लूइस्-गेटस् पूर्ण झाले आहेत. तेवढ्यावरच आता हा उद्घाटन समारंभ करवायचा आहे. बंधाऱ्याचे सर्वच्या सर्व स्लूइस्-गेटस् बांधून पूर्ण झाल्याशिवाय त्याला काही अर्थच नाही, पण इथं उद्घाटनासाठी तिस्ता बंधाऱ्याला खूप कौशल्याने सजवलं आहे.

तरीसुद्धा स्लुइस्-गेटस् उघडण्याची घटना लोकांना दाखवणं आवश्यक आहे, कारण त्यावरूनच, तिस्ता नदीला अडवून तिला तिच्या मूळ पात्रामध्ये फिरवण्याची संकल्पना म्हणजे नक्की काय आहे हे लोकांना समजेल. पण सारा पावसाळाभर तर तिस्तानदी निर्दीष्ट पात्रामधूनच वहात गेली. आता तर काही तिच्या वाहून गेलेल्या पाण्याला ओहोटीतून मागे फिरवून आणून केवळ उद्घाटनाच्या सोयीसाठी रिझर्व्हायरमध्ये पुन्हा भरता येणार नाही.

त्याच कारणामुळे, उद्घाटन-कार्यक्रमासाठी, बॅरेजच्या उत्तरेला तिस्तेच्या पाण्याला कृत्रिम बांध घालून-ते पूर्वेच्या किनाऱ्याकडे आपलचांद फॉरेस्टच्या बाजूला सरकवून आणलंय्. उद्घाटन झाल्यावर हा बांध फोडून पुन्हा पाणी सोडावं लागणार, नाहीतर बॅरेजचं काम पुढं जाणार नाही. बांध म्हणजे पूर अडवण्याचे बांध नव्हेत, पाण्याला दिशा देण्यासाठीचे बांध. त्यासाठी गेल्या सुमारे महिनाभरापासून, विशेषत: वीस दिवस, बंधाऱ्यावरच्या सगळ्या कूलींना याच बांधाच्या कामी लावलं आहे. जरा वरपासून तिरप्या दिशेने आणून बांधाच्या तोंडाला बंधाऱ्याच्या पहिल्या दोन स्लूइस्-गेटसच्या दिशेने फिरवण्यात आलंय्. चार स्लूइस् पूर्ण झाले असले, तरी स्लूइस् मधून पाण्याचा प्रवाह दाखवायचा असेल, तर दोन स्लूइस मधूनच पाण्याचा प्रवाह सोडावा लागेल. चार स्लूइस् मधून समान गतीने वहात जाईल इतकं पाणी सध्या तिस्ता नदीत नाही.

बंधारा जितका उंच आहे, तितका उंच दिसत नाही- याचं कारण म्हणजे तिस्ता नदीचा मैलोन् मैल पसरलेला विस्तार आणि किनाऱ्याशी असलेलं गगनचुंबी फॉरेस्ट. एखादी गोष्ट आकाशाच्या किती जवळ गेली आहे, त्यावरूनच तर जिची उंची मोजता येते ना! इथे सर्वांना गगनचुंबी सालवृक्षांच्या तळाशी उभे राहून बंधारा पहावा लागतो, काठाजवळ बंधाऱ्याच्या वर एक विराट स्टेज बांधलं आहे - इतकं उंच, की किनाऱ्यावररूनही डोळे जरा वर करूनच ते पहावं लागतं. स्टेजच्या दोन बाजूंना दोन मोठे राष्ट्रध्वज आणि मध्यभागी सत्ताधारी पक्षांच्या स्वतःच्या पताका लावलेल्या आहेत. स्टेजच्या डाव्या बाजूला आणखी जरा अधिक उंचीचा एक मंच आहे. तिथून भाषणं दिली

जातील. उजवीकडे त्याच आकाराचा आणखी एक मंच-तिथून बटन दाबून स्लुइस गेटस् उघडले जाणार. तिस्ता नदीवर नेहमीच जोराचा वारा वहात असतो. त्या वाऱ्यामुळे स्टेजचं कापड वारंवार फुगून उठतं, झालरी डावीकडून उजवीकडे उडतात, दोन राष्ट्रध्वजांसह इतर साऱ्या पताकासुद्धा डावीकडून उजवीकडे उडतात. असं वाटतं, की ज्या दिशेला तोंड करून मंच तयार करण्यात आलाय् ती सरळ नाही, सरळ दिशा आहे तिस्ता नदीच्या पात्रामध्ये.

तिस्ता बंधाऱ्याकडे येणारा रस्ता आहे एकच-मानाबाडीच्या वळणावरून येणारा रस्ता. आणखी एक रस्ता येतो लाटागुडीहून क्रान्तिहाट मार्गे, आपलचांद फॉरेस्टमधून पण बंधाऱ्याचं उद्घाटन म्हणजे काही मंत्र्याने येऊन फीत कापणं किंवा बटण दाबणं एवढंच नाही. क्रान्तिहाटच्या रस्त्यावर लोक पहातील - कशा प्रकारे मंत्री बंधाऱ्याच्या उद्घाटनासाठी येताहेत.

पण व्ही.आय्.पी. लोकांसाठी तर काही वेगळ्या स्वतंत्र रस्त्याची व्यवस्था केलेली नाही. पोलिसांनी जिल्हाधिकाऱ्यांना वारंवार सांगितलंय, की कुठल्याही परिस्थितीत व्ही.आय.पी. लोकांच्या आगमनाची वेळ बदलली, तर तिच्यानुसार बंदोबस्त करणं हे या तिस्तेच्या वाळवंटात, डोंगरांच्या पायथ्याशी, फॉरेस्टच्या मध्ये शक्य नाही.

म्हणूनच, पूर्वी ठरवलेल्या वेळीच, व्ही.आय्.पी. लोकांच्या गाड्यांचा ताफा राष्ट्रीय महामार्गावरून वेगाने येतो - त्याच्या सुरुवातीला असलेला सहा मोटर-सायकलींचा एस्कॉर्ट ताफा गेल्यानंतर जितक्या वेगाने गाड्या चालवता येतील, तितक्या वेगाने हा ताफा येतोय.

निर्दिष्ट वेळेच्या अर्धा तास आधी चालसाच्या वळणाच्या सर्वच बाजूंनी मिरवणुकीचे ट्रक रस्त्याकडेला उभे करण्यात आले आहेत. रस्त्याजवळ रायफलधारी सैनिक उभेच होते-ट्रक थांबल्याबरोबर एकेकजण एकेका ट्रकमध्ये चढून, रस्त्याच्या दिशेने रायफल रोखून उभा रहातो.

चालसाच्या वळणावर, उंचवट्यावर झाडाझुडुपांच्या हिरव्या रंगात, त्याच रंगाचे कामूफ्लाज युनिफॉर्म्स घातलेले कमांडो-फोर्समधले काहीजण विखरून थांबतात- पोलिसांच्या दृष्टीने या दोन पॉइंटस्वर 'सिक्युरिटी रिस्क' आहे - थांबलेल्या ट्रक्सच्या जवळूनच तर व्ही.आय.पी. लोकांच्या गाड्या येणार आहेत.

व्ही.आय.पी. लोकांच्या गाडीचा ताफा चालसाच्या वळणावर पोचण्याधीच एस्कॉर्टस्च्या मोटरसायकली आपली गती वाढवतात. त्या वाढलेल्या गतीशी संगती राखून ताफ्यातल्या सगळ्या मोटारींची गती वाढते. त्याच प्रचंड वेगाने चालसाच्या वळणावर सहा मोटरसायकलींच्या मागे किमान चाळीस गाड्या वळण घेतात - रस्त्याशी होणाऱ्या टायर्सच्या घर्षणाचा आवाज काही सेकंदांच्या अंतराने पुन्हा - पुन्हा येत रहातो

काटकोणात थांबलेल्या ट्रक्समधून स्तंभित लोक ही मिरवणूक पहातात. व्ही.आय.पीं. च्या गाड्यांच्या ताफ्यामागची पोलिसांची गाडी निघून गेल्यानंतर तीन मिनिटांनंतर रस्ता जेव्हा खुला होतो, तेव्हा नेत्यांच्या मागे-मागे मिरवणूक जाणार हे लक्षात आल्यावर पुन्हा सगळ्याच ट्रक्समधून घोषणा सुरू होतात.

मानाबाडीच्या वळणावरही पुन्हा तसंच घडतं. तिथे त्याच प्रकारे ठरलेल्या वेळेच्या पंधरा मिनिटं आधी सगळ्या ट्रक्सना रस्त्याच्या कडेला उभं करण्यात येतं. मानाबाडीपासून तिस्ता बंधाऱ्यापर्यंतच्या रिकाम्या रस्त्यावर त्या चाळीस मोटरगाड्या आणि सहा मोटरसायकल्सना नाईलाजाने जरा हळू वेगाने वळण घ्यावं लागतं, कारण रस्ता अरुंद आहे. परंतु तरीही थांबलेल्या लोकांमधून एकही घोषणा येत नाही. एका गाडीच्या खिडकीतून कुणीएक नेता हात बाहेर काढून थोडा हलवतो. तरीही आपणाकडून आता काय प्रतिसाद अपेक्षित आहे हे रस्त्याकडेला उभ्या केलेल्या लोकांना समजत नाही. एका अद्भुत द्विधावस्थेत हे लोक आणि नेत्यांना घेऊन आलेल्या चाळीसही गाड्या सापडल्या आहेत. मिरवणुकीचा एक भाग म्हणून नेत्यांना या मिरवणुकीजवळून, किंवा मधून किंवा त्यांच्यासमवेतच बंधाऱ्याकडे येण्याची इच्छा होती, म्हणून तर हा रस्ता निवडला होता. आपले नेते भेटल्यामुळे उत्तरबंगालच्या दृष्टीने या सर्वात मोठ्या कर्मयज्ञाच्या निमित्ताने आलेल्या या सर्वात मोठ्या जनसमुदायालाही उल्हसित व्हायला निमित्त आहे. पण, खरोखर मेळावा अडकवून, रायफलधारी पोलीस आणि गुप्त कमांडो तुकडीच्या पहाऱ्यात त्याला उभं ठेवून, नेत्यांची सुरक्षितता पक्की करण्यात आली. हे तर समर्थनीय आहे - उत्तरखंड किंवा गोर्खालँडच्या लोकांच्या हातून नेत्यांना वाचवण्याची जबाबदारी तर घ्यायलाच हवी. पण मनुष्यस्वभावच असा आहे, की ज्या कोणाबद्दल एकदा संशय घेतला, किंवा संशयाच्या जाळ्यात एखाद्याला जेव्हा ओढून आणायचं असेल, तर तो ताबडतोब स्वतःच्याच नजरेत संशयास्पद होऊन जातो. एवढ्या मोठ्या मेळाव्यातील एखादा तरी अतिरेकी लपून राहू शकतो. पण या खऱ्याखुऱ्या शंकेचा आणखी एक अर्थ तर असाही आहे की आमच्या या मेळाव्यामध्येच अतिरेकी लपून राहू शकतो. एकदा हे सत्य स्पष्ट झाल्यावर मेळाव्याच्या मुळावरच आघात होतो, तेव्हा नेत्यांच्या चाळीस गाड्या आणि मेळाव्याच्या शेकडो ट्रक्समध्ये पक्कं अंतर पडतं. नेते तर मेळाव्यासाठीच येताहेत, नेत्यांसाठीच मेळाव्यातली माणसं येताहेत, एकाच कर्मकाण्डात - कार्यक्रमात नेते आणि मेळाव्यातली माणसं सहभागी होतील, त्यानंतर या कार्यक्रमाची 'वाणी' हे मेळाव्यातील लोकच उत्तरबंगालच्या कानाकोपऱ्यात घेऊन जाणार, त्यामुळे 'फुटीरतावाद्यां'न खरोखरच जरब दाखवली जाईल, त्यांचा 'काळा हात' तोडून चूर्ण केला जाईल. पण खरं तर नेत्यांसाठीच मेळावा अडकवून ठेवला आहे. नेत्यांसाठीच मेळाव्यातील लोकांना उघड किंवा गोपन रायफलींसमोर किमान काही क्षण तरी स्तब्ध थांबावं लागलंय. मेळाव्यातील

लोकांपासून नेत्यांचं हे निश्चित व निरापद दूरत्त्व प्रस्थापित करणं जोपर्यंत पूर्ण होत नाही, तोपर्यंत, पोलिस या मेळाव्यातल्या लोकांनाच आपल्या संशयाचं लक्ष्य बनवतात. मेळावा आपल्या नेत्यांची सुरक्षितता निश्चित करू शकत नाही, नेते त्यांच्या मेळाव्यातील लोकांच्या आश्रयाने निश्चिंत राहू शकत नाहीत- या चाळीस गाड्या मेळाव्यातील लोक आणि नेते यांच्या मध्ये असलेल्या पोलिसांच्या पहाऱ्यात खूपच अधिक सुरक्षित रहातात. नेते आणि प्रजा आता अलग पडले आहेत.

## दोनशे पंधरा

# नदीच्या बक्षावरून चालणे

मानाबाडीपासून आपलचांदपर्यंत रस्ता मोकळा ठेवण्यात आलाय्.

व्ही.आय.पी. लोकांना घेऊन चाळीस गाड्या सहा मोटरसायकलींच्या पहाऱ्यात त्या अरुंद रस्त्यावरती प्रवेश करतात. इथे डोंगर नाही आणि जंगलही नाही. त्यामुळे सुरक्षिततेचा प्रश्न थोडा सोपा झालाय. मोटरसायकलींवरचे पोलीस आपली गती थोडी कमी करतात. इथं व्ही.आय्.पी. लोक जरा निवांतपणे निसर्ग आणि परिसर पाहू शकतात. मागच्या गाड्यांचाही वेग स्वाभाविकपणेच कमी होतो. काही क्षणांसाठी सगळ्या जथ्यावरच एकप्रकारची शिथिलता पसरते.

आपलचांदजवळ पोचल्यावर रस्त्याचे दोन भाग होतात. एक रस्ता सरळ पुढे जातो, दुसरा उजवीकडे जातो. हा उजवीकडचा रस्ता खास बंधाऱ्यासाठी म्हणून नवीन बांधला आहे. सरळ रस्ताही बंधाऱ्याकडेच जातो, पण थोडा फॉरेस्टमध्ये फिरून जातो. व्ही.आय्.पी. पाहुण्यांच्या गाड्या बंधाऱ्याकडे जाणाऱ्या नव्या रस्त्यावर जाऊन अलग झाल्या - मानबावाडीहून ट्रक सोडण्यात आले. मिरवणुकीचे ट्रक जुन्या रस्त्यावरून बंधाऱ्याच्या ठिकाणी पोचतील.

व्ही.आय्.पीं च्या गाड्यांचा जथा सरळ बंधाऱ्याच्या तोंडाशी जाऊन पोचतो. गाड्यांमधून उतरून ते मंचाकडे जाणाऱ्या रस्त्यावर पाऊल ठेवतात. गाड्या सरळ जाऊन पार्किंगच्या ठिकाणी उभ्या रहातात. छोटे-छोटे फलक लावून जागा निर्दिष्ट केल्या आहेत - 'सी.एम्.स्. कार', 'युनियन मिनिस्टर ऑफ स्टेट'स् कार', 'पी. डब्ल्यू.डी. मिनिस्टर्स कार' इत्यादी.

गाडीपासून मंचापर्यंत जाण्याचा रस्ता या उद्घाटन समारंभासाठी खास नवीन तयार करण्यात आला आहे. तिस्तेच्या सुकलेल्या पात्रातून वाळू आणून या रस्त्यावर टाकण्यात आली आहे. पाण्याखाली असताना वाळूच्या या कणांचे वेगवेगळे रंग दिसू शकतात;

पण उन्हात ते नष्ट होतात. किमान काही रंग तरी दिसावेत, म्हणून काल रात्री ही वाळू पात्रातून आणून इथे टाकण्यात आली आहे. फॉरेस्ट डिपार्टमेंटनेही काल रात्रीच दोन ट्रकभरून झाडं दिली, ती या रस्त्याच्या दोन्ही बाजूंना पुरण्यात आली आहेत. ही सगळी आख्खी आख्खी झाडं-दोन दिवसांतच झुकून मरून जातील, पण, आता अशी दिसताहेत, जणू किती काळजीपूर्वक यांचं लालन-पालन केलं आहे! झाडं तर काही रातोरात मोठी होत नाहीत - त्यामुळे एकेक झाड अनेक वर्षांच्या परिश्रमांची ग्वाही देतंय.

व्ही.आय्.पी. लोक गाड्यांतून उतरून थोडा वेळ उभे रहातात. बरेचजण दोन्ही हात वर उचलून आळस देतात आणि मोठ्या आवाजात जांभया देतात. निसर्गदृश्य पाहून तृप्त व्हावं, म्हणून दोनेकजण आसपास नजर फिरवतात. मुख्यमंत्री जरा बेचैनपणे तयारीत रहातात. नक्कीच कुणीतरी येऊन त्यांनी आता काय करायचं आहे हे सांगेल. तेवढ्यात इंजिनियर लोक येतात आणि प्रत्येकाच्या छातीवर मोठे-मोठे बॅजेस लावतात. मुख्यमंत्र्यांचा बॅज सर्वांत मोठा आणि सर्वांत अधिक रंगीत आहे.

यात थोडा वेळ जातो. केन्द्राचे कालवेमंत्री मुख्यमंत्र्यांजवळ येतात. डोंगर इथून किती दूर आहे, म्हणजेच, नदी डोंगरांमधून मैदानी प्रदेशात कोणत्या ठिकाणी उतरते ही माहिती त्यांना हवी आहे. मुख्यमंत्री नदीच्या पल्याडच्या काठाकडे पहातात. तिकडं पहाण्यासाठी त्यांना थोडं वाकून पहावं लागतं, कारण स्टेजमुळे सरळ पहाता येत नाही. त्यानंतर जरा अन्यमनस्कपणे मुख्यमंत्री उजव्या हाताने एका जागेकडे निर्देश करतात. उत्तर परिपूर्ण झालं नाही असा विचार करून हात जरा फिरवून सांगतात- पश्चिमबंगालचा डोंगराळ प्रदेश, सिक्किम आणि भूतान या जागेला घेरून उभे आहेत.

मुख्यमंत्र्यांच्या हाताचं आपल्या डोळ्यांनी अनुसरण करीत केन्द्रीय मंत्री मुख्यमंत्र्यांना विचारतात, 'हे ठिकाण दिसायला अगदी गढवालसारखं आहे. आपण कधी गढवालला गेला आहात?'

मुख्यमंत्री हसून म्हणतात, 'इतकं वय झालंय की आता भारतातलं एकही ठिकाण पहायचं राहिलेलं नाहीय. गढवालला तर गेलो होतोच. त्यावेळी बहुगुणांच्या इलेक्शनच्या संदर्भात बऱ्याच मिटिंग्जसाठी आलो होतो. ते इलेक्शन म्हणजे स्थगित झालेलं इलेक्शन - मिसेस् गांधीचं प्रेस्टीज इलेक्शन. आपण गढवालचे की काय?'

'नाही, नाही. मी आपला मैदानी भागातला माणूस. पण गढवालला गेलेलो आहे, मुक्कामही केलेला आहे.'

'कशासाठी?'

'माझ्या काकांची तिथं मोठी बागायत आहे.'

तेवढ्यात इंजिनियर्स पैकी एकजण (हाच मुख्य इंजिनियर आहे हे मुख्यमंत्री ओळखतात) येऊन म्हणतो, 'सर, डायसवर चढण्याआधी एकदा बॅरेज पाहून घ्या.'

'हो. गढवालला पळांचा उद्योग खूप वाढलाय, हिमाचल प्रदेशातही खूप वाढलाय. या उद्योगाने तिथल्या पहाडी लोकांना एक आर्थिक पाया दिलाय. म्हणूनच पहा, उत्तर प्रदेशातल्या पहाडी प्रदेशात कुठलंच फुटीरतावादी आन्दोलन नाही - मुख्य भूखंडामध्येच रहाण्याची तिथल्या लोकांची इच्छा आहे, त्यातच त्यांचा फायदा आहे' - बोलत-बोलत मुख्यमंत्री केंन्द्रीय मंत्र्यांना घेऊन पुढे जातात.

'तसं काही आपण हसू शकणार नाही - आर्थिक दृष्ट्या सर्वात पुढारलेल्या राज्यातूनच तर खलिस्तानची मागणी पुढे आली ना!' केंद्रीय मंत्री म्हणतात.

खडीचा थर इतका जाड आहे, की त्यावरून चालणं अवघड वाटतंय. बूट त्यात बुडून जाताहेत. मागून एकजण शेरा मारतो, 'एवढी खडी कशासाठी टाकलीय - मंत्र्यांना पाडण्यासाठी की काय?'

'जरा हळू - हळू चाला सर, आम्ही तर हा रस्ता चांगला बांधूनच देणार होतो, पण सिक्यूरिटीने खडी टाकायला सांगितलं. . .' एक इंजिनियर भाष्य करतो.

मुख्यमंत्री आणि केन्द्रीय मंत्रीच सर्वात पुढे-पुढे चालले होते - हळू-हळू पण निश्चितपणे. जणू खडीवरून कशा प्रकारे चालायचं असतं याची त्यांना काहीतरी खास माहिती आहे. मुख्यमंत्री म्हणतात, 'पंजाब म्हणजे तर तुमच्या पक्षातल्या गोंधळाचं प्रतीक. . .तुम्ही अकालींच्या राजकारणात ढवळाढवळ सुरू केलीत आणि तिच्यासंगे पाकिस्तान जोडलं गेलं.

केंन्द्रीय मंत्र्यांनी काहीही उत्तर दिलं नाही. खडीचा स्तूप त्यांनी जवळ जवळ ओलांडला आहे.

मंचाच्या तळापासूनच त्यांना बंधाऱ्यावर जायचंय म्हणूनच मंचाचा तळही झाकून घेतलेला, आणि मागे जिथून ते बंधाऱ्याकडे जाणार आहेत, त्या जागेवरही पडदा झुकतोय. दोन बाजूंनी दोन इंजिनियर पडदा बाजूला सरकवतात आणि मुख्यमंत्री व केंन्द्रीय मंत्री बंधाऱ्यावर पाय ठेवून उभे रहातात.

मंचाच्या मागे टी.व्ही. कॅमेरामेन, प्रेस फोटोग्राफर्स आणि बातमीदार तयारच होते. जो पडदा बाजूला करून ते आले, त्याच्याच दोन्ही बाजूंना बातमीदार, जमिनीवर उकिडवे बसलेले फोटोग्राफर्स, थोड्या दूर अंतरावर टी.व्ही. कॅमेरा, त्याच्या डावीकडे सरकारच्या प्रसिद्धी विभागाचा कॅमेरा, या दोन्हींच्या मध्यभागी, जरा मागे फिल्म्स डिव्हिजनचं दल. कॅसेट-रेकॉर्डर खांद्यावर अडकवून, एक लांब वायरचा मायक्रोफोन घेतलेला ऑल इंडिया रेडिओचा एक कर्मचारी.

मुख्यमंत्री आणि केंद्रीय मंत्री येऊन उभे राहिल्याबरोबर एकाच क्षणी अनेक फ्लॅश उडतात, टिकटिक करीत तीन मूव्ही कॅमेरे चालू होतात. मुख्यमंत्री जरा उजवीकडे पहातात- तिकडे तिस्तेचं पाणी उसळतंय. त्यानंतर काही पावलं पुढे जातात- कारण

तोपर्यंत मागचा पडदा सरकावून बाकीचे व्ही.आय्.पी. लोकसुद्धा आलेले आहेत, त्यामध्ये काही मंत्री आहेत. मुख्यमंत्री मध्यभागी जिथे उभे होते, तिथेच उभे रहातात. त्यांच्याजवळ केंन्द्रीय मंत्री. इतर काही मंत्री या दोघांच्या दोन्ही बाजूंना स्वतःसाठी जागा करून घेतात, मागे ऑफिसर्स उभे रहातात. कुणी काही म्हणायच्या आधीच ग्रूप फोटोसाठी उभे असल्याप्रमाणे सगळेच उभे रहातात आणि नंतर लगेच काही सेकंदांनी हे सारं दल चालायला सुरुवात करतं.

जे फोटो घेताहेत आणि ज्यांचे फोटो घेतले जाताहेत अशा दोन्ही दलांच्यामध्ये चांगलाच समन्वय दिसतो; कधी काय करायचं हे जणू प्रत्येकाला ठाऊक आहे. एवढंच काय, फोटो काढण्यासाठी जेव्हा प्रेस फोटोग्राफर्स पुढे जातात. तेव्हा ते आपण मूव्ही कॅमेऱ्याच्या कामात अडथळा ठरणार नाही याची काळजी घेतात. जणू रोजच्या सरावाप्रमाणे ते या सरावाच्या नसलेल्या मार्गावरून चालताहेत, तिस्तेच्या वक्षावरून तिस्ता पार करताहेत, पण ही गोष्ट जणू कुणाच्याच लक्षात येत नाहीय.

## दोनशे सोळा

# अभिनयाने स्लुइस गेट उघडणे

उद्घाटन कार्यक्रम सुरू होतो.

उत्तरबंगालच्या दार्जिलिंग पासून मालदहपर्यंतच्या आमदारांपैकी काहीजण भाषणं करणार आहेत. उत्तरबंगालचे खासदार बोलणार आहेत. काँग्रेसचा कुणीही खासदार आलेला नाही, त्यामुळे मुख्यतः राज्याच्या सत्ताधारी पक्षाचे खासदार बोलतील. त्यानंतर ज्यांची-ज्यांची कार्यालयं या कार्याशी संबंधित आहेत, ते लोक बोलतील - राज्याचे जलसिंचनमंत्री, पी.डब्ल्यू.डी मंत्री. शेवटी खास पाहुणे केन्द्रीय मंत्री बोलतील. त्यानंतर मुख्यमंत्री बोलतील आणि भाषणाच्या शेवटी दुसऱ्या एका मंचावरून बटण दाबून स्लुइस-गेट उघडतील. दुपारी दोनच्या आत सगळा कार्यक्रम संपवायचा आहे. त्यानंतर व्ही.आय्.पी. निघून जातील, आणि मग आलेले लोक परतायला सुरुवात होईल.

जुलूसातून आलेले लोक बसले आहेत बंधाऱ्याच्या दक्षिणेला- व्ही.आय्.पी. लोकांच्या कार-पार्किंगच्या मागल्या बाजूपासून तर जिथपर्यंत नजर जाते तिथपर्यंत जागा आधीच साफ करण्यात आली होती, पण इतकी जागा नव्हे. बंधाऱ्याच्या पाण्यासाठी ती मोकळी ठेवायची असंच ठरलं होतं. नंतर या मोकळ्या जागेसह या भागाला नक्कीच काटेरी तारेने कुंपण घातलं जाईल किंवा इतर कुठल्यातरी प्रकारे पहाऱ्याखाली ठेवलं जाईल - कारण माणसांच्या दृष्टीने हीच जागा सर्वात धोकादायक आहे. स्लुइस उघडल्यावर

इथूनच सर्वात अधिक जोराने पाणी वहाणार - जवळजवळ एखाद्या धबधब्याच्या वेगाने. त्याशिवाय बंधाऱ्याच्या सुरक्षिततेच्या दृष्टीनेही कुणाला इतक्या जवळ येऊ दिलं जाणार नाही.

दोन दिवसांपासून फॉरेस्टच्या खालचं जंगल कापून हे मैदान आणखी मोठं करण्यात आलंय. त्याच्याही मागे एका जागी रांगेत ट्रकगाड्यांना उभं करण्यात आलंय. मंचावरून असं दिसतंय, की जणू माणसांची डोकी आणि फॉरेस्टमधली झाडं एकमेकांत मिसळून गेली आहेत. मंचावर एका इंजिनियरच्या हातात एक 'मेड इन हाँग काँग' बायनॉक्युलर होता- तोच सगळ्यांच्या हाती फिरतो आहे. मुख्यमंत्र्यांनीही त्यातून नीट पाहून घेतलं त्यांनी मग बायनॉक्युलर केंन्द्रीय मंत्र्यांना दिला. केंन्द्रीय मंत्री तरुण असल्याने त्यांना इतका मोठा जनसमावेश पहाण्याची फारशी सवय नाही. हा एवढा जनसमावेश एकत्र करण्यासाठी जे श्रम, निष्ठा आणि धैर्य आवश्यक असतं, त्याचा त्यांच्या पक्षातील कामाच्या अनुभवाशी काही मेळ बसत नाही. हा प्रकार नक्की काय आहे हे सुद्धा त्यांना नीटपणे समजत नाही. फिरवून-फिरवून पाहिल्यानंतर ते बायनॉक्युलर परत देण्यासाठी हात पुढे केल्यावर मागून एकजण तो घेतो. मुख्यमंत्र्यांकडे पहात ते म्हणतात, 'आपली लोकप्रियता इतकी आहे हे काही मला ठाऊक नव्हतं!'

मुख्यमंत्री सस्मित चेहऱ्याने केन्द्रीय मंत्र्यांकडे पहातात आणि पुन्हा नजर वळवून जनसमावेशाकडे पहातात. लोकांच्या घोषणा, गोंधळ-सगळं काही ऐकू येतंय् पण त्यांचे चेहरे दिसत नाहीत - कारण मंच खूप उंचावर आहे आणि लोक खूप दूर अंतरावर आहेत. कुठूनतरी थोडी विषण्णता येते. मान वळवून मुख्यमंत्री केन्द्रीय मंत्र्यांना म्हणतात, 'आपणासाठीच आम्हाला हा मेळावा बोलवावा लागला.' 'आम्हाला' आणि 'मेळावा' या दोन शब्दांवर मुख्यमंत्री जरा अधिक जोर देतात. नंतर म्हणतात, 'पश्चिम बंगालचा तर काही आम्ही पंजाब होऊ देऊ शकत नाही!' या वाक्यावरही जोर होता, जणू मुख्यमंत्री आपल्या भाषणातली ओळ म्हणताहेत. हा जोर हेच त्यांच्या वक्तृत्त्वाचं वैशिष्ट्य आहे- ते ऐकल्यावर ज्याप्रमाणे आत्मविश्वास वाटतो, त्याचप्रमाणे त्यांच्यावर निर्भर असल्याची जाणीवही श्रोत्यांमध्ये निर्माण होतो. केन्द्रीय मंत्री मुख्यमंत्र्यांचा मुद्दा जरा समजावून सांभाळून घेतात. वाटतं, मुख्यमंत्र्यांच्या बोलण्यामध्ये त्यांच्या पक्षाच्या किंवा सरकारच्या विरुद्ध टीकेचा जो सूर होता, तो काही ते काढून टाकू इच्छित नव्हते. त्यांना विषय ठाऊकही नाही; आणि मुख्यमंत्र्यांचं बोलणं त्यांनी बरंच ऐकलेलंही आहे, सगळ्यांची त्यावर बरीच श्रद्धा आहे. त्यांची ओळख होण्याचा केंन्द्रीय मंत्र्यांचा हा पहिलाच प्रसंग. उगाच एका उद्‌घाटन-समारंभाला येऊन वादविवादात सापडण्याची केंन्द्रीय मंत्र्यांनी इच्छा नाही. चतुरपणे त्यांनी इंग्लिशमध्ये या मुद्याला बगल देण्याचा प्रयत्न केला, 'मंत्री झाल्यावर माझा सर्वात अधिक वेळ कशात खर्च होतो हे आपणाला सांगावंसं वाटतंय.'

मान वळवून मुख्यमंत्री म्हणाले, 'सांगा ना! आपण नवीनच मंत्री झाला आहात का?'

'हो. सध्या माझा सर्वात अधिक वेळ खर्च होतो तो द्वितीयपुरुषी बहुवचनी सर्वनामाचा अर्थ समजून घेण्यात. उदाहरणार्थ, कधी लोक मला म्हणतात, ''तुमची गोष्ट सोडा, तुम्ही भारताचे नवे शासक आहात!'' तेव्हा समजून घ्यावं लागतं, की आम्ही म्हणजे यू.पी.चे लोक. कधी म्हणतात, 'पंतप्रधानांचा नवीन मुलगा.' तेव्हा समजून घ्यायचं असतं, की मी पंतप्रधानांचा माणूस. कधी म्हणतात, ''तुम्ही ब्राह्मण''. . .' इथपर्यंत बोलून मंत्री थांबले.

मुख्यमंत्री थोडसं हसून म्हणाले, 'तुमच्या पक्षाची एक राजकीय समस्या आहेच - या राज्यात. पण उत्तरबंगालसारख्या ठिकाणी समस्येला वेगळंच वळण लागतं. आपले लोक गटा-गटांनी गोर्खालँड, उत्तरखंड अशा सगळ्या फुटीतरतावादी आंदोलनांमध्ये सामील होतात, आणि आपले स्थानिक नेते त्यांच्याबरोबर जातात. त्यामुळे एक संकटच उभं रहातं.'

मंचावरती माईकवरून घोषणा देणं सुरू होतं आणि पहाता-पहाता समोरच्या गर्दीला जोर येतो. मंचावरच्या स्लोगनला प्रतिसाद म्हणून गर्दीतले हजारो-हजारो लोक एकाच वेळी हात उंचावून घोषणा देतात. एवढ्या माणसांचा कंठस्वर एकाच वेळी आला की समजत नाही. या घोषणाच जणू हा मंच, हे फॉरेस्ट, ही नदी - या सर्वांसगे माणसांना जोडून टाकतात. इतकी माणसं जिथं इतक्या पोटतिडिकीने, मोठ्या आवाजात आपलं समर्थन व्यक्त करू इच्छितात, तेव्हा राजकारणाचं तत्त्व जणू दोन हातांमध्ये धरता येईल, स्पर्श करता येईल इतकं इंद्रियग्राह्य बनतं.

मंचावरचे हे नेते तर नेहेमीच मिटिंगा करतात, आणि वर्ष-दोन वर्षांतून किमान एकदा आपल्या जनतेला मंचावरून पहातात. पण इथे, या सभेत, त्या सगळ्या अनुभवांच्या बाहेरची एक घटना घडते. तिस्ता नदीचा गंभीर आवाज इथे सतत ऐकू येत होता. गाडीतून उतरल्यापासून सततच हा आवाज येतो आहे. हा आवाज जणू दूर कुठेतरी मेघगर्जना चालली असावी, तसा वाटतो. त्याबरोबरच जोरात वारा वहात असतो - तिस्ता नदीच्या पाण्यावरून हा वारा जोरात वहात जातो. नदीच्या पात्राला समातंर, इतक्या मोठ्या आकाशाच्या खाली ती जणू वाऱ्याची आणखी एक तिस्ता आणि त्याबरोबरच आहे फॉरेस्टच्या मधून वहाणाऱ्या वाऱ्याचा सतत चाललेला दीर्घ असा निश्वास त्या तिस्तेचा, फॉरेस्टच्या वाऱ्याच्या आवाजाच्या मध्ये मिसळून घोषणांचा नाद बदलून जातो. आदिवासी उच्चारांमध्ये या घोषणा जणू अधूनमधून टंकार जागवतात. या घोषणांमध्ये जणू एक विषादही आहे- पहाडाच्या गाण्यात असतो, तोच विवाद.

या कार्यक्रमाचं चित्रीकरण करणारे टी.व्ही. फिल्म्स डिव्हिजनचे काही लोक सरळ मुख्यमंत्र्यांच्या खुर्चीमागे काहीतरी बोलण्यासाठी येऊन उभे रहातात. चाहूल लागल्याने

मुख्यमंत्री मागे पहातात. ज्या कॅमेरामनला वेगवेगळ्या कार्यक्रमांच्या निमित्ताने मुख्यमंत्री ओळखतात, असा एक वयस्कर कॅमेरामन म्हणतो, 'सर, एका अडचणीत सापडलो आहोत. . .'

'काय झालं?'

'खरं तर आम्ही फक्त एकच कॅमेरा आणलाय, आणि या लोकांनी डायस असं काही बनवलंय की आपण बटन दाबता हा शॉट घेतल्यानंतर पळत खाली येऊन लगेचच स्लुइस गेटस् उघडतात हा शॉट घेता येणार नाही.'

'मग, काय करायला पाहिजे?'

'स्लुइसचा शॉट घेण्यासाठी तर आत्तापासूनच तिथे कॅमेरा फिट करून ठेवायला हवा. तो शॉट सर या जनसमूहातूनच घ्यायला हवा. धक्काबिक्का लागू शकतो.

'मग जाऊन फिट करा ना!'

कॅमेरामन गृहस्थ पुन्हा थोडं हसून म्हणतात, 'सर, आपण जर इथपासून चालत ते बटन दाबण्याच्या डायसपर्यंत गेलात, तिथं थोडावेळ उभं राहिलात, तर आपला बटन दाबण्याचा शॉट आत्ताच घेऊन आम्ही खाली जाऊ शकतो.'

'अच्छा! म्हणजे ॲक्टिंग करायला हवं! जा, तुम्ही जाऊन कॅमेरा लावा!'

'आम्ही लावूनच आलो आहोत सर!' हे एकून मुख्यमंत्री उभे राहिले, त्यानंतर जलद पावलांनी उजवीकडच्या त्या मंचाकडे चालत गेले, त्यांनी बटन दाबतो आहोत असा आविर्भाव केला. अनेक घड्याळ एकाच वेळी सुरु झाल्यावर होईल असा कोरसमध्ये 'टिकटिक' आवाज करीत कॅमेरे सुरु होतात. 'सर, जरा हात हलवा सर!'

मुख्यमंत्र्यांनी हात हलवला.

## दोनशे सतरा

# मदारीच्या आईचा मुलांसाठी शोध

भाषणं सुरू होतात आणि सभा रंगू लागते.

मंचावर एकेक वक्ता येई; कुणीही फार वेळ बोलत नसे, पण एकामागून एक भाषणं होत असल्याने आणि मुद्दयांची पुनरावृत्ती होत असल्याने एकच भाषण बराच वेळ चाललंय् असं वाटतं.

नदीचा कल्लोळ, हवेचं गर्जन आणि फॉरेस्टची जोरदार सळसळ यांनी जसा घोषणांचा ध्वनी बदलवून टाकला होता, त्याचप्रमाणे भाषणांचाही आवाज बदलवून टाकलाय. वारा नदीच्या प्रवाहाला अनुकूल अशा दिशेने, पूर्वेकडून पश्चिमेकडे वहातोय्,

आणि मोठमोठ्या स्पीकर्सची तोंडंही पश्चिमेच्या दिशेने आहेत. त्या भोंग्यांमधून आवाज़ बाहेर पडल्याबरोबर वारा तो आवाज लोकांच्या गर्दीवरून, मधून, उडवून नेतोय. शिवाय नदीवरचा वारा तर काही पाण्याच्या प्रवाहाप्रमाणे उतारावरून वहात जात नाही. पूर्वेकडचा वारा नदीवरच्या एवढ्या मोकळ्या जागेत जरा आडवातिडवा वहात जातो. त्यामुळे सगळ्याच भोंग्यांचे आवाज अशा प्रकारच्या वाऱ्यामुळे वाऱ्याच्या धक्क्याने आडवेतिडवे वहात जातात. त्यामुळे वक्त्याचा एकच शब्द वेगवेगळ्या भोंग्यांतून वेगवेगळ्या प्रकारे येऊन या गर्दीवर आदळतो आणि नंतर क्षणार्धात वाऱ्यावर उडत निघून जातो - तिस्तेच्या पाण्यात एखादं कुसळ पडल्यावर वहात जावं, तसा.

मदारीची आई या मेळाव्यातल्या गर्दीमधून भटक-भटक भटकते. इथं इतकी माणसं आली आहोत, की वाटतं, दहा मदारीहाट या मेळाव्यात सामावून जाऊ शकतील. बाजारात तरी दुकानं उभारण्यासाठी जागा सोडावी लागते, ग्राहकांना फिरण्यासाठी रस्ता ठेवावा लागतो; पण इथं तर माणसं माणसांच्या खांद्यांना खांदे लावून, अगदी एकमेकांना चिकटून बसली आहेत, उभी राहिली आहेत - अगदी फॉरेस्टमधल्या झाडांसारखी : एका झाडाशी दुसऱ्या झाडाचा काही-ना-काही संपर्क-संयोग असतोच.

माणसावरच तर मदारीच्या आईचं प्रेम होतं- माणसाचा आवाज, माणसाच्या त्वचेचा गंध, माणसाचं सगळं काही. जणू, आता ती या मेळाव्यात येऊन पडलीच आहे, आणि बराच वेळ तिला या माणसांबरोबर थांबावं लागणारच आहे, तर तिला माणसांबद्दल जे प्रेम वाटतंय, ते ती पूर्णपणे वसूल करून घेणार आहे.

पण माणसावर प्रेम करता-करता, माणसाचा आवाज ऐकता-ऐकता, माणसाचा गंध हुंगता-हुंगतानाही मदारीची आई आपल्या मुलांना शोधीत होती. इथं तर साऱ्या दुनियाभरची माणसं आली आहेत. मदारीच्या आईने एकाच ठिकाणी इतकी माणसं यापूर्वी कधीही पाहिली नाहीत. तिच्या उरलेल्या आयुष्यातही ती पुन्हा कधी इतक्या मोठ्या मेळाव्याला येऊ शकणार नाही. आजचा मेळावा हा इतका प्रचंड असेल, आणि त्यासाठी तिला मदारीहाटहून इतक्या दूर यावं लागेल - असं तिला वाटलंही नव्हतं. हे ठिकाण जरी तिला इतकं अपरिचित वाटण्यासारखं नसलं, तरी येता येता रस्ता पाहून तिला वाटलं की खरोखर ती आता इतक्या दूर चालली आहे की तिथून बाभुळझऱ्याला परतणं अशक्य आहे. मदारीच्या आईला देश म्हणजे काय हे ठाऊक नसलं, तरी विदेश म्हणजे काय हे ठाऊक आहे. इतक्या दूर विदेशात ती पुढे कधी येईल? तर मग इथं तिने आपल्या मुलांना का शोधू नये? तिच्या आठ की दहा मुलांपैकी दोन-तीन मुलं तर नक्कीच या मेळाव्याला आलेली असणार.

मदारीची आई काही अगदी काटेकोरपणे आपली मुलं शोधतेय् असं नाही. या मेळाव्यासाठी कोणकोणत्या ठिकाणाहून माणसं आली आहेत, हे तर काही तिला ठाऊक

नसणार. तिची मुलं कुठे-कुठे निघून गेली आहेत, हे सुद्धा तिला ठाऊक नाही. त्यामुळे जागेचा नक्की वेध घेऊन ती त्यांना इथं शोधणार तरी कशी? तिला याच हजारों-हजारो माणसांमधून हळूहळू फिरत शोधायला हवं- रोज तो अन्नाच्या शोधात जमिनीकडे नजर लावून फॉरेस्टमध्ये फिरते, तसं. याप्रकारे एकाकीपणे फिरणं आणि शोधणं, शोधण्यासाठी फिरणं हेच तर तिचं दैनंदिन जीवन आहे.

पण इथे फॉरेस्टचा अंधार नाही, इथे कुजलेला पाचोळा नाही, इथे वेलींच्या जंगलाचा आडोसा नाही, इथं भिजलेली माती नाही. इथं आकाशातून ऊन्ह सरळ जमिनीवर येतं- अगदी एका मेघाच्या सावलीची सुद्धा बाधा नाही. इतक्या विशाल आकाशातून इतकं ऊन्ह इतक्या दूरपर्यंत जमिनीवर पडतंय, की त्याच्याकडे फार वेळ टक लावून पहाता येत नाही. इथे, समोरच्या क्षितिजापर्यंत रुंद पात्र असलेल्या नदीचे दोन तुकडे करून सुक्या सिमेंटची भित आकाशापर्यंत उंच गेली आहे. इथे पायांखाली कठीण जमीन आहे, हिरव्या मातीची जमीन आहे. इथे या उन्हात आणि या हवेत, या नदीपुढे आणि या पाण्यापुढे हे हजारो-हजारो चेहेरे आहेत. सगळे चेहेरे एकाच दिशेकडे मान उंचावून पहाताहेत-समोरच्या मंचाकडे पहाण्यासाठी मान थोडी उंचवावीच लागते. मंचावरच्या माणसांचे डोळे इथून दिसत नाहीत, पण त्यांचे हातवारे समजतात. या मेळाव्यातल्या हजारो-हजारो उंचावलेल्या चेहेऱ्यांपैकी जवळजवळ प्रत्येकाला नीट पहाण्याची अशी संधी मदारीच्या आईला दुसरीकडे कुठे मिळणार?

म्हणूनच मदारीची आई फिरते, आपलं रोजचं फिरणं फिरते. दररोजच्याच वेगाने फिरते. हळू-हळू. घाई नाही. जे शोधतेय, ते शोधायला पाहिजे, घाईगर्दी केली म्हणजेच ते सापडेल, असं काही नाही. फक्त जगण्यासाठी जेवढं आवश्यक आहे, तेवढं अन्न फॉरेस्टमधून मिळवण्यासाठी जे प्रयासहीन, न थकता चालावं लागतं, तसं चालणंच ती चालतेय. फक्त यावेळी तिच्या हातात ती अस्त्र म्हणून वापरायची, तळाच्या टोकाशी काटकोनात वळवलेली ती काठी नाही. यावेळी तिच्या हाती कुठलंही अस्त्र नाही, फक्त दोन डोळे आहेत, डोळ्यांची तीच दृष्टी आहे. इतक्या प्रकाशमान, हवेशीर अशा मुक्त ठिकाणी इतक्या माणसांच्या गर्दीत जंगलात ती ज्या बारीक नजरेने शोधते, त्या बारकाईने शोधलं नसतं, तरी चाललं असतं.

मदारीची आई फिरते आणि मेळाव्यातल्या व्यग्र चेहेऱ्यांकडे दबल्या उत्सुकतेने पहात जाते. तिने किती गर्भ धारण केले होते याचा नक्की हिशेब देणं तिला शक्यच नाही. तिने कधीही त्या प्रकारे आपल्या अपत्यांचा हिशेब ठेवला नाही. पण, एखाद्या मुलाशिवाय तर तिचं कधीच चालत नाही. आणि मुलं तर जरा उंच झाल्यावर लगेच दूर निघून गेली. एक निघून जाईपर्यंत दुसरं मूल आलेलं असे.

मदारीची आई आता तिच्या त्याच सगळ्या मुलांना शोधतेय.

ती एकामागून एक चेहेरा पहात जाते-हे चेहेरे म्हणजे तिच्या ओळखीचे राजबन्शी चेहेरे. आपल्या मुलांची वयं आता काय असतील याचा एक अंदाज तर तिला आहे. त्यामुळे त्या वयापेक्षा अधिक वयाचे चेहेरे ती एका दृष्टीक्षेपात बाद करून पुढे जाते. आणखी, तिच्या मुलांच्या अंदाजे वयांच्या सीमांमध्ये येणाऱ्या चेहेऱ्यांकडे ती थोडावेळ काळजीपूर्वक पहाते.

अशा प्रकारे पहाता-पहाता ती आपल्या मनातल्या मनात आपल्या मुलांच्या गोष्टींची उजळणी करते- थोरल्या नेपाळी मुलाची आणि त्यानंतरच्या मदेशिया मुलाची गोष्ट तिला एकामागोमाग एक आठवते. पण त्यानंतर मात्र आठवणीत सगळी गुंतागुंत झालीय. आधीचा मुलगा कोणता - त्या लष्करी जवानापासून झालेला की त्या राजबन्शी देउनियापासून झालेला - हे काही तिला निश्चितपणे आठवत नाही. तिची नंतरची मुलं कुठल्याही वयाची असू शकतील.

मदारीची आई एकामागोमाग एक गोर्खा चेहेरे पहात जाते. बारीक डोळे आणि वैशिष्ट्यपूर्ण हनुवट्या. वय नक्की ओळखता येत नसल्याने ती जवळजवळ प्रत्येक चेहेरा पहाते आणि अचानक एखादा चेहेरा पाहून थबकते. तिची मुलं कुठं आणि किती दूर गेली आहेत - या एवढ्या मोठ्या मेळाव्यामध्येही त्यांच्यापैकी कुणी आलं नाही! तिची दोन-तीन मुलं तर नक्कीच या मेळाव्यात आहेतच- फक्त नीट शोधत जायला हवं, रोजचं अन्न शोधण्याप्रमाणे हळू-हळू, अत्यंत हळू, बारकाईने, नजरेला थकवा न येऊ देता, या उन्हाने तळपणाऱ्या मैदानातही थकवा न येऊ देता.

दरम्यान प्रचंड आवाजातल्या जयजयकारांच्या घोषणांमध्ये, स्लुइस-गेटस्‌मधून कृत्रिम बंधाऱ्यात प्रवाहित केलेलं तिस्तेचं पाणी आपल्या नेहमीच्या वेगापेक्षा अनेकपट वेगाने स्वतःच्याच पात्रात झेपावतं, त्याचा फेस आकाशात उडतो: मेळाव्यातल्या हजारो लोकांपुढे तो फेस भविष्याचं प्रतीक म्हणून उसळतो. मदारीची आई त्या मुक्त, फेसाळलेल्या जलराशीकडे पहात नाही. तिच्या दृष्टीने हा बंधारा, हे स्लुइस गेटस्, हे नदीनियंत्रण, हा मंच, हा जयजयकार या सगळ्या गोष्टी अवान्तर आहेत. एरवीही तिस्तेचं हे पाणी काही तिच्या बाभुळझऱ्याला जात नाहीच. बंधारा झाला, तरी जाणार नाही. पण या जलप्रवाहाचं, या नवीन तिस्तेचं अभिनंदन करणारे जयध्वनिमुखर चेहेरे तिच्या दृष्टीने फारच प्रासंगिक आहेत, महत्त्वाचे नाहीत. या चेहेऱ्यांच्या जंगलातच तिच्या पुत्रांचे चेहेरे आहेत. ते शोधायला हवेत. मदारीच्या आईला हळू-हळू पावलं टाकीत फिरत ते शोधायचे आहेत. फॉरेस्टमध्ये ती रोज ज्या पद्धतीने हळूहळू फिरत आपलं अन्न शोधते, त्याच पद्धतीने फिरत शोधायला हवेत.

मदारीची आई एकामागोमाग एक मदेशिया चेहेरा-आपल्या मुलाच्या वयाचा चेहेरा-पहात पुढे जाते. हे चेहेरे आहेत उभट वळणाचे, मोठ्या कपाळाचे, जबड्याचं हाड मोठं असलेले-तिच्या खूप परिचयाचे.

## दोनशे अठरा

# मदारीच्या आईचं स्वराष्ट्रात पुनरागमन-अन्त्यपर्वाचा शेवटचा अध्याय

मध्यरात्र उलटून गेल्यावर एक ट्रक नॅशनल हायवेवरून येऊन मदारीहाटच्या बाजारमैदानात येऊन थांबतो, पण स्टार्टर बंद करीत नाही. ट्रकमधील बायकापुरुष ट्रक असा अचानक थांबल्याच्या गचक्याने अर्ध-झोपेतून जागे होतात. ट्रकमधल्या एका कोपऱ्यातून क्लीनर झोपेने जड झालेल्या आवाजात म्हणतो, 'मदारीहाटला कुणाला उतरायचंय- उतरा!'

मदारीची आई ट्रकच्या मागच्या बाजूला बसली होती. ती उठून आपल्या जागेवरून जमिनीपर्यंतच्या अंतराचा अंदाज करते. क्लिनर जरा कमी निद्रित आवाजात म्हणतो, 'इकडच्या बाजूनं उत्तरा, इकडच्या बाजूनं!' असं म्हणून तो उठून उभा रहातो. संपूर्ण ट्रक पार करून मदारीच्या आईला समोरच्या बाजूने उतरायला हवं.

ती डाव्या बाजूने पुढे येत येत चाकाजवळ येऊन उभी रहाते. त्यानंतर फळी धरून डावा पाय खाली करून चाकावर ठेवून, 'अरे, अरे, पडाल, पडाल-' हे क्लीनरचे शब्द ऐकता-ऐकता उजवा पायसुद्धा ती चाकावर ठेवते- ट्रकची फळी धरलेला हात काढून घेते आणि धप् करून जमिनीवर बसते. क्लीनर तिकडून इकडे येऊन वाकून पहातो, तोपर्यंत मदारीची आई उठून उभी रहाते. क्लीनर तिला नीटपणे पाहून घेतो आणि ड्रायव्हरमागच्या फळीवर थापड मारतो. आसमंत भरून टाकणारा आवाज करीत ट्रक सरळ बाहेर जातो- आवाजाच्या प्रतिध्वनीला दीर्घ-दीर्घ करीत. ट्रकने वळण घेतल्यानंतर त्याचा लाल दिवा मदारीच्या आईला दिसणं बंद होतं, पण आवाज मात्र बराच वेळपर्यंत ऐकू येतो. तो ती ऐकते.

उद्घाटनाच्या ठिकाणी मदारीच्या आईला आपला हा ट्रक सापडत नव्हता. शेवटी एका सभ्य तरूणाने बरोबर येऊन, हा ट्रक शोधून काढून तिला त्यात बसवून दिलं हा ट्रक मदारीहाटमार्गे फालाकाटाकडे जाणार होता.

ट्रक निघून गेल्यावर मदारीची आई त्या गहन रात्री मदारीहाटमैदानात एकाच जागी उभी राहून इकडे-तिकडे पहाते. मदारी आधी येऊन कुठेतरी बसलेला असू शकेल, आपल्याला पाहून 'माय गंऽ' अशी हाक मारून त्याला आपल्याकडे येता यावं, म्हणून या अंधारात स्वतःला जितकं दृश्यमान करणं शक्य आहे, तितकं दृश्यमान करीत मदारीची आई उभी रहाते.

मदारी या बाजारमैदानात आईची वाट पहात कुठेतरी बसला असता, तर एव्हाना तो तिच्याकडे आला असता. नक्कीच तो इथे येऊन कुठेतरी झोपून गेला असावा.

मदारीची आई रस्ता सोडून रस्त्याकडेच्या एक-दोन दुकानांचे व्हरांडे पहाते. घोषमशाईंच्या दुकानाची झाप बंद आहे. तिच्याबाहेरून मदारीची आई हाक मारते, 'एऽ मदारी, मदारी एऽ मदारी!' अंधारात एक कुत्रं आवाज न करता येतं आणि मदारीच्या आईच्या कमरेच्या दिशेने हुंगू लागतं. त्याचे निःश्वास मदारीच्या आईच्या कमरेला, छातीला जाणवतात. त्याला काही खायला हवंय्, की सोबत हवीय्, की आक्रमण करायचंय - काही समजत नाही.

मदारीची आई हाक मारते, 'एऽमदारी, मदारी रेऽ, मदारी!'

या वेळी आतून बहादुरच्या झोपेने जड झालेल्या आवाजात उत्तर येतं, 'मदारी गाडीतून आला नाही.'

मदारी आला नाही. आला असता, तर तो बहादुरच्या गाडीतूनच आला असता. म्हणजे मदारी आणि बहादुर यांची चुकामूक झाली की काय? कुत्र्याचे आणखी जोराचे निश्वास मदारीच्या आईला आपल्या अंगावर जाणवतात. मदारीची आई कुजबुजत्या आवाजात विचारते, 'गेला कुठं मदारी?'- एकदाच विचारते. या प्रश्नाचं काहीही उत्तर मिळणार नाही हे तिला ठाऊक आहे, म्हणून थोडा वेळ थांबून ती पुन्हा रस्त्यावर येते.

आता ती बाभुळझऱ्याच्या दिशेने चालत निघालीय. आपल्या रोजच्या गतीने काही, कारण आता, या गहन रात्रीच्या अंधारात तिला काहीही शोधायचं नाहीय. आता तिला अनेक मैल चालून बाभुळझऱ्याला पोचायचंय - तोपर्यंत रात्र आणखी काही तासांनी कमी होईल. आणखी किती मैल चालावं लागणार आहे हे काही तिला ठाऊक नाही - पोचत नाही तोपर्यंत ती चालत रहाणार.

कुत्रं आपल्याबरोबर येतंय हे तिला ठाऊक आहे-कुणाच्या वासाने कोण जाणे! ते एकदाही भुंकत नाही. अधूनमधून दोनतीन पावलं मागं पडतं-बहुधा माती हुंगतंय- मदारीची आई हे अनुमान काढते ते कुत्र्याच्या मातीवर पडणाऱ्या श्वासांच्या प्रतिध्वनींवरून. अधूनमधून आपली मान उंचावून ते मदारीच्या आईच्या अंगाचा गंध हुंगतं.

मदारी परतला नाही. बस किंवा ट्रकचा गोंधळ होऊ शकतो-खुद्द मदारीच्या आईचा झाला, तसा. तसं झालं असेल, तर तिच्याप्रमाणे काय तो इकडं येणाऱ्या दुसऱ्या एखाद्या गाडीत येऊ शकला नसता? मदारीने बहादुरची सोबत का सोडली? एरवीही एवढ्या प्रचंड गर्दीत चुकामूक होऊ शकते. मदारीकडे लक्ष ठेवून त्याला सुखरूप परत आणण्याची जबाबदारी तर काही कुणी बहादुरवर सोपवली नव्हती.

एक शक्यता आहे- मदारी निघून गेलाय, आता तो परत कधीही परतरणार नाही. इतक्या ठिकाणांहून तिथे इतक्या गाड्या आल्या होत्या, इतकी माणसं, इतकी कामं. पहाडासारखी प्रचंड भिंत बांधून पुराला अटकाव करता येतो, इच्छेप्रमाणे ते पाणी सोडता येतं, पुराचं पाणीही नदीचं पात्र सोडून बाहेर जाऊ शकत नाही - हे सारं एकद।

पाहिल्यानंतर मदारी आता परतू शकत नाही. मदारीच्या आईची मुलं हासिमारा, शिलिगुडी, नेपाळ-अशा दूर-दूरच्या ठिकाणी निघून गेली आहेत. मदारीला त्या प्रकारे निघून जावं लागलं नाही- तो आपल्या आईबरोबर त्या दूरच्या प्रदेशाच्या अगदी मध्यभागी जाऊन, तिथेच राहून गेलाय.

रस्ता जिथे फॉरेस्टमध्ये शिरला, तिथे फॉरेस्टमधली झाडंसुद्धा जणू रस्त्याच्या वर आलेली आहेत. झाडांनी-पानांनी कमानी धरलेला तो रस्ता अगदी गुहेसारखा, अंधाऱ्या गुहेसारखा वाटतो. तिथे, अगदी फॉरेस्टच्या सीमेवरती कुत्रं थांबलं. ओल्या फॉरेस्टचा, वनस्पतीचा, हिरव्या झाडांचा, अमोनियाचा तीव्र गंध मदारीच्या आईच्या नाकाला भिडला. कुत्रंही त्यामुळेच थांबलं. माणसाळलेल्या कुत्र्याला या गंधामध्ये जायची भीती वाटते. या गंधामध्ये अनेक अनेक छाया, अनेक अनेक आवाज, अनेक अनेक गंध. मदारीच्या आईच्या शरीराला तो जन्मांतरीचा आरण्यक गंध आल्यामुळेच तर हे कुत्रं तिच्याबरोबर आलं नसावं?

त्या अंधाऱ्या, गुहेसारख्या रस्त्याने मदारीची आई निघून जाते. त्या गंधाच्या आत, आणखी आत निघून जाते. तिच्या स्वतःच्या पायांच्या रस्त्याशी होणाऱ्या घर्षणाच्या आवाज इतका तीव्र होऊन तिच्या कानी येतो, की जंगलातील आवाज तिला ऐकू येत नाहीत. तीही ते ऐकण्याचा खास काही प्रयत्न करीत नाही.

एखाद्या निशाचर प्राण्याप्रमाणे सावध पावलांनी मदारीच्या आईला तो उतार आणि वळण पार करून तिने तयार केलेल्या बाभुळझऱ्याच्या भिजलेल्या नॅशनल हायवेवर थांबावं लागतं. तिच्या समोरचा अंधार एखाद्या दगडासारखा कठीण. काही क्षण पहात राहिल्यावर त्या दगडाचा आकार बदलतो. तिच्या बाभुळझाडाची जी फांदी वरच्या दिशेने गेलीय, ती अंधारात थांबलेल्या एखाद्या हत्तीच्या सोंडेसारखी झुलतेय आणि जी फांदी खालच्या दिशेने वाकली आहे, ती जणू अंधारातल्या हत्तीप्रमाणे झऱ्यातून जलपान करतेय.

या राष्ट्रीय महामार्गावरून रोज भारतवर्षातली वाहतूक चालते. आज मदारीची आई पाहून आली-माणसाने दगडांवर दगड ठेवून नदी बांधली, नदीचा पूर बांधला, तयार केलेल्या पुराचं ते पाणीही नदीच्या पात्रातून शहाण्यासारखं वहातं- पात्र सोडून जात नाही.

मदारीच्या आईला या सगळ्याच गोष्टी अवान्तर आहेत- हा राष्ट्रीय महामार्ग, या मार्गावरून रोज वाहतूक करणारा भारत देश, ही नदी, हा बंधारा, हा पूर. राष्ट्रीय महामार्गाजवळच तिने आपली स्वतःची नदी, स्वतःचा वृक्ष, स्वतःच्या दगडांनी स्वतःचा बाभुळझरा तयार करून घेतलाय, तिने स्वतः तयार केलेला शेवटचा माणूसही होता, आजपासून तो बहुधा राहिलेला नाही.

कंबर वाकवून चढाई पार करून मदारीची आई आपल्या पानांच्या घराच्या दिशेने चालायला सुरुवात करते.

खूप खूप मैल दूरवरून त्या कुत्र्याचं भयाण, भेसून, दीर्घ सुरातलं रडणं अंधाऱ्या गुहेसारख्या त्या राष्ट्रीय महामार्गावरून फॉरेस्टमध्ये ऐकू येतं- या फॉरेस्टमध्ये आता जणू माणसाळलेल्या प्राण्यालाही प्रवेशाची बंदी आहे.

उरलेली रात्र काढण्यासाठी मदारीची आई आपल्या पानांच्या घरात प्रवेश करते.

हा वृत्तांत इथेच संपवणं चांगलं-सगळेच वृत्तांत एखाद्या योग्य ठिकाणी संपवावे लागतात. हा वृत्तांत संपवण्यासाठी ही खूप चांगली जागा आहे- मदारीच्या आईच्या दृष्टीने पराकोटीच्या दूरच्या प्रवासानंतर घरी परत येणं - अगदी एकटीनं, मदारीशिवाय परत येणं.

संपवला नाही, तर हा वृत्तांत चालूच राहील- पुढचा दिवस, त्याच्या पुढचा दिवस, त्याच्याही पुढचा दिवस.

कारण, जे अगदी जंगलातल्या पशूंप्रमाणे जगतात, अशा भारतातील सहा-सात कोटी लोकांपैकी मदारीची आई ही एकजण आहे. 'दारिद्र्य-रेषा' इत्यादी इत्यादी शब्द तिला स्पर्शही करीत नाहीत.

पण यात अभिमान वाटण्यासारखं काहीही नाही. मदारीच्या आईच्या गरिबीमध्ये काहीही अभिमानास्पद नाही. असलाच, तर घोर अपमान तेवढा आहे.

अपमानामुळे निर्माण होणाऱ्या त्या फुटीरपणाला, विद्रोहामुळे निर्माण होणारा फुटीरपणा समजण्यामध्ये, त्याचं एवढं महाभारत लिहिण्यामध्ये, थोडंसं असत्य राहून जातंच. या भारतवर्षात, ज्यांना माझ्याप्रमाणे शाई-लेखणी वापरता येते, त्यांना भारतवर्षातील या सहा-सात कोटी दरिद्रतम लोकांची कथा कुठल्या अक्षरांत, कुठल्या शब्दांत लिहावी ते समजत नाही. म्हणूनच, हा वृत्तांत जितका अधिक लिहिला जाईल, तितका व्यर्थ होईल. म्हणच आहे - 'जो फार सांगतो, तो बरंचसं व्यर्थ सांगतो.'

म्हणूनच, हा वृत्तांत इथेच, अशाच एका योग्य ठिकाणी, संपूर्ण होवो.

मदारीची आई आपल्या पानांच्या घरात रात्रीचे उरलेले काही तास आपल्या शेवटच्या पुत्राशिवाय काढो.

❏❏❏

# परिशिष्ट

## दोनशे एकोणीस

## हा वृत्तांत लिहिण्यामागचा युक्तिवाद आणि वृत्तांतसमाप्तीचे कारण

तिस्तेकाठचा वृत्तांत संपला आहे.

डोंगरांमधून मैदानी प्रदेशात उतरल्यानंतर तिस्तो नदीची लांबी फक्त काही मैलांची आहे. तीसुद्धा पुन्हा भारतीय संघराज्य आणि बांग्लादेश यांच्यामध्ये विभागली आहे. पण त्या काही मैलांमध्येच जोतपर्व, वनपर्व, चरपर्व, फॉरेस्टचं वृक्षपर्व, मीटिंग-मेळावापर्व, तिस्ता बंधारा पर्व असे नाना भाग आहेत. ही खरं तर वेगवेगळी चिन्हंसुद्धा आहेत. ही सारी चिन्हं ठेवीत-ठेवीत ही एक नदी कादंबरीमधून वहात जाते. ही सगळी चिन्हं पहात-पहातच आपण कादंबरीतून वाहणाऱ्या एका नदीला ओळखून घेतो.

आदिपर्वातील अनेक लोक अन्त्यपर्वात तिस्ता बंधाऱ्याच्या उद्‌घाटन-समारंभाला उपस्थित होते. आदिपर्वात तिस्तेचा प्रवाह आपलचंद फॉरेस्टच्या मध्ये ज्या गाजोलडोबा गावात पहिल्यांदा या वृत्तांतात दिसला होता, पुढे त्याच गाजोलडोबात, त्याच आपलचांद-फॉरेस्टमध्येच तिस्तेच्या पात्रामध्ये मैनाकाचं शिखर-माणसाने तयार केलेल्या मैनाकाचं शिखर उभं राहिलं-ते शिखर म्हणजेच तिस्ता-बंधारा. तिथे खरोखरच जणू एक वृत्त-एक वर्तुळ संपूर्ण झालं. एका वृत्तांताची समाप्ती झाली.

खरं तर प्रत्यक्षात तसं झालं नाही. हा वृत्तांत लिहिण्याच्या वेळेपर्यंत तिस्ता-बंधाऱ्याचं काम चाललंय्. अजून ते काम पूर्ण झालेलं नाही. या वृत्तांतात जेव्हा प्रथम गाजोलडोबा गावातील तिस्तेकाठच्या प्रदेशाच्या सर्व्हेबद्दल लिहिलं होतं, तेव्हा गाजोलडोबा गावीच तिस्ता बंधाऱ्याचं प्रमुख कार्यालय होईल असं ठाऊकही नव्हतं. या

वृत्तान्तात तिस्ता बंधाऱ्याच्या उद्घाटनाची गोष्ट जेव्हा लिहिली, तेव्हा उद्घाटन होणार असं काहीच कुणी म्हणालं नव्हतं-उद्घाटनाचा विषयच निघाला नव्हता. काही दिवसांनंतर या वृत्तांतामधील वर्णनाप्रमाणेच एक उद्घाटन-समारंभ झाला. या वृत्तांतात कुठल्याही व्यक्तीला किंवा घटनेला किंवा इतिहासाला समाविष्ट केलेलं नाही. याउलट वारंवार या वृत्तांतातून बाहेर जाऊन एखादी घटना बाहेर कुठेतरी घडली आहे, बहुधा इतिहासही बनली आहे. कादंबरीप्रमाणेच हे सगळे बंधारे हेसुद्धा एक निर्मितीचंच कार्य आहे. त्यामुळे सृष्टीच्या, सर्जनाच्या दृष्टीने या दोन्ही घटना-हा बंधारा आणि ही कादंबरी-एकाच ठिकाणी वारंवार परत येतात. त्यामुळेच, तिथे परत येण्यापूर्वी हा वृत्तांत संपवता आला नसता.

हा वृत्तांत संपल्यानंतर आणखी नवीन असं कुठलंही पर्वान्तर शक्य नाही. बंधाऱ्याच्या उद्घाटनाबरोबरच या वृत्तांतामधली तिस्ता इतिहास होऊन गेली. आता तिस्ता ही काही तीच पुराणी तिस्ता राहिली नाही. आता निसर्गाच्या या नदीचा माणसाच्या हातून पुनर्जन्म होईल. हिमालयातील हिम वितळून झालेलं पाणी आणि मौसमी मेघांच्या पावसामुळे तिस्तेचं पाणी कितीही वाढो, ते माणसाने तयार केलेल्या, निर्दिष्ट केलेल्या पात्रातून, निर्देशित केलेल्या गतीने वहात जाईल. तेव्हा चर माणसाच्या इच्छेने जागे होतील. त्या चरांना हिरवंगार करून नदी त्याच्याजवळून वहात जाईल मनुष्यनिर्मित निसर्गामध्ये. तिस्तेसंबंधी कोणतीही दंतकथा पिढ्यानपिढ्या सांगितली जाणार नाही. तिस्ता बंधाऱ्यानंतर तिस्तेचं नैसर्गिक जीवन संपलंय, आता ती एक मानविक, मनुष्यनिर्मित नदी बनली आहे. तिस्ता आपल्या मानविक इतिहासाच्या पर्वात प्रवेश करील. तिस्तामाय आता कुमारी होणार.

हा 'तिस्तेकाठचा वृत्तांत' नैसर्गिक तिस्तेबरोबर माणसांच्या सहवासाच्या रीतीनीतीचा वृत्तान्त आहे. गयानाथबरोबर तिस्तेच्या सहवासाचा प्रकार एका पद्धतीचा आहे, नितार्इबरोबर आणखी एका प्रकारचा, तर बॉर्डर सिक्युरिटी फोर्सबरोबर आणखी वेगळ्याच प्रकारचा. बाघारूची रीतनीती म्हणून काही नाही. तिस्ता आपल्या नदीस्वभावाने नैसर्गिक आहे- ती म्हणजे पाण्याव्यतिरिक्त दुसरं काहीही नाही. बाघारू त्याच्या मानवस्वभावाने नैसर्गिक आहे- तो फक्त माणूस आहे. माणसाव्यतिरिक्त दुसरं काहीही नाही.

हे वृत्तांतलेखन इथेच पूर्ण झालं. तिस्ता बंधारा आणखी काही वर्षानंतर पूर्ण होईल. तेव्हा त्या नव्या, माणसाने तयार केलेल्या नदीशी माणसांच्या सहवासाची रीतीनीती आमूलाग्र बदलून जाईल. ती किती वेगाने आणि किती प्रमाणात आमूल अशी बदलेल, याची तो बदल होण्याआधी आपण कल्पनाही करू शकत नाही, आणि तो बदल झाल्यानंतर त्याचं मापनही करू शकत नाही.

बंधारा बांधून पाणी अडवल्यानंतर कितीतरी नवीन जमीन शेतीखाली येईल. दोन

नंबर कचुवा आणि मंडलघाटमध्ये मग कुठलाही फरक रहाणार नाही - दोन नंबर कचुवा मंडलघाटच्या अंतर्गतच येईल.

निताईचा चर बहुधा रहाणार नाही - बॅरेजच्या इतक्या जवळ इतका मोठा चर ठेवता येत नाही. पण त्याच्याऐवजी तिस्तेच्या डावीकडे किंवा उजवीकडे, तिस्तेला सरकवून, नवीन जमीन मिळवून निताईला बहुधा नवीन वाडी वसवावी लागेल. . .दहग्रामजवळच्या प्रदेशासंदर्भात बांग्लादेशाशी बोलणी करून बहुधा जमिनीच्या भागावरच सीमारेष नक्की केली जाईल आणि आखली जाईल!

तिस्ता बंधाऱ्यामुळे तिस्तानदीशी गयानाथच्या संपर्काची रीतीनीती सर्वात अधिक बदलेल. तो जुन्या कज्जेखटल्यांपैकी काही जिंकेल, काही हरेल. कदाचित काही नवीन कज्जेखटलेही दाखल करील. पण बंधाऱ्याचा अर्थ काय हे सर्वात लवकर त्यालाच समजेल. फॉरेस्ट डिपार्टमेंटशी चाललेला वाट्याचा खटला तो जिंकला, तरी त्याला थोडी जमीन आणि काही सालाचे वृक्ष मिळतील. आणि तिस्ता बंधाऱ्यामुळे त्याला एकाच जमिनीत तीन पिकं घेता येतील. बंधाऱ्यामुळे निश्चित प्रमाणात पाणी मिळेल, बंधाऱ्यामुळे पुराच्या भीतीपासून मुक्ती मिळेल, रासायनिक खतं आणि ट्रॅक्टरही मिळतील. तो तीन पिकं घेणार म्हणून गयानाथ पॉवर-टिलर विकत घेऊन फायदा मिळवील. गयानाथचे गायीबैल कमी होतील, जमीनही बहुधा थोडी कमी होईल, बाघारूही कामावरून कमी होईल - पण शेतीचं उत्पन्न वाढेल, विक्री वाढेल, फायदा वाढेल.

आणि, या बंधाऱ्यामुळेच राधावल्लभची 'कृषक समिती' गयानाथच्या कितीतरी जवळ येईल. राधावल्लभशी गयानाथचं भांडण-मारामारी होती ती खासजमिनीमधील अतिक्रमणावरून. जुन्या तिस्तेमध्ये, या वृत्तांतातल्या तिस्तेमध्ये संपत्तीची जोतदारी होती. नव्या तिस्तेमध्ये, या वृत्तातानंतरच्या तिस्तेमध्ये सुरू होईल पिकाची, उत्पन्नाची जोतदारी. संपत्तीच्या जोतदारीत राधावल्लभशी गयानाथचा संघर्ष होता. पिकाच्या, उत्पन्नाच्या जोतदारीत तर राधावल्लभ आणि गयानाथ सहकर्मी आहेत. गयानाथच्या पॉवरटिलर शिवाय राधावल्लभचं चारणार नाही. आता गयानाथच्या स्वतःच्या जमिनीतही तीन-चार पिकं निघणार आणि कृषक-समितीच्या व्हेस्टजमिनीतही तीन-चार पिकं निघणार. तेव्हा गयानाथ आणि कृषक समिती असे दोघेही नॅशनल हायवेवर बसून 'रास्ता रोको' आणि 'जेल भरो' आंदोलन करतील. आंदोलनाचे जे जे नियम राधावल्लभच्या कृषक समितीला ठाऊक आहेत, त्या साऱ्या नियमांनुसार सरकारकडून शेतीमालाला 'न्याय्य दर' मिळवण्यासाठी उत्तरप्रदेशात आणि महाराष्ट्रात 'शेतकरी संघटना' जसं आंदोलन करतात, तसं आंदोलन गयानाथ आणि कृषक समिती मिळून करतील.

बंधाऱ्यामुळे तिस्तेकाठचं फॉरेस्ट बदलून जाईल, आपलचांद बदलून जाईल. ते फॉरेस्ट तर काही माणसाच्या योजनेनुसार तयार झालेलं नाही. खूप खूप पावसामुळे आणि

तिस्तेच्या कच्छभूमीत तराई डुयार्समध्ये कधीपासूनच हे घनदाट जंगल तयार झालेलं आहे. वन जितकं दाट झालंय, तितके वृक्ष उंच-उंच झाले आहेत. साल, सेगुन, अर्जुन, उंच होत चालले आहेत. याप्रमाणे मोठं होत-होत, कायम होत-होत हे अरण्य पानगळीचं अरण्य होणं स्वाभाविक आहे. त्यातून झाडं तोडून त्यांची विक्री होते. देश-विदेशात इथल्या-सालाच्या झाडांची कीर्ती आहे. काही नवीन झाडंही नक्कीच लावली आहेत. पण आपल्या स्वातंत्र्यालाच केवळ चाळीस वर्ष झाली आहेत. सालाच्या झाडांचं वन तयार करण्यासाठी चाळीस वर्षं म्हणजे फारच थोडा वेळ आहे.

बंधारा पाणी देणार, बंधारा पुराला अटकाव करणार; मग हजार-हजार वर्षांचं आयुष्य असलेल्या या सालवृक्षांचं काय होणार? ही सारी झाडं तोडली जातील- त्यांच्या जागी दुसऱ्याच प्रकारच्या नवीन झाडांची लागवड होईल. ही सारी झाडं अत्यन्त वेगाने वाढतात, वेगाने पिकतात, त्यांची विक्रीही वेगाने होते. नीलगिरीची झाडं बहुधा या सगळ्या पावसाळी प्रदेशासाठी तेवढी फायदेशीर ठरणार नाहीत; पण दुसऱ्या कुठल्यातरी नरम झाडाचा शोध लागेल. त्या झाडाचा एखाद्या स्थानिक उद्योगाच्या उभारणीलाही उपयोग होईल.

वन बदललं की त्यातले जीवजंतूही बदलतील. हरणाला जर त्याच्या खाण्यायोग्य घास मिळाला नाही, त्याच्या नाकाला जर ओळखीचा वास आला नाही, या जंगलात स्वतःला लपवून टाकता येईल असं आवरण त्याला मिळालं नाही, तर ते इथं कशासाठी, कसं काय रहाणार? गेंड्यांना जर सावली मिळाली नाही, भिजलेला, सडलेला पाचोळा मिळाला नाही, विश्रांती घेण्यासाठी ज्यात पडावं असा चिखल मिळाला नाही, तर आपली उदासीन पावलं टाकीत-टाकीत तो दूर कुठेतरी निघून जाईल. हत्ती कळप करून फिरतात. डोंगरावरून कोणत्या शिशुवयाचे असतानाच कळपाबरोबर फिरताना डोंगरावरून कोणत्या वाटेने उतरायचं, कोणत्या नदीच्या काठाकाठाने पुढे जायचं, नदी कोणत्या ठिकाणी ओलांडायची, कुठल्या ठिकाणी चवदार 'चालता' फळं मिळतात, मोठमोठी वेळीची झाडं कुठं आहेत हे माहीत करून घेतात. त्यानंतर, स्वतः तरुण झाल्यानंतर आपल्या कळपाला वंशपरंपेरेने ठाऊक झालेल्या मार्गानेच नेतात. पण जर हे वनच राहिलं नाही, तस हत्तींच्या कळपांना कोणता मार्ग कुठे जातो हे कळणार कसं? शिवाय या नवीन जंगलातली झाडं वेगाने वाढणार आणि त्यांची वेगाने विक्री होणार. त्या जंगलात हत्तींना प्रवेश करू दिला जाणार नाही. एखाद्या सालाच्या झाडाची फांदी मोडली तर नवीन फांदी उगवेल. पण या साऱ्या झाडांच्या फांद्या मोडल्यावर मात्र आर्थिक नुकसान-रोख नुकसान! त्या नवीन वनात हत्तींचा कळप आपली वाट बदलेल.

तिस्तेकाठाच्या या सगळ्या वनांमध्ये वानरं खूप आहेत. इतक्या दाट वनात, इतक्या उंच-उंच झाडांवर आणि इतक्या गच्च जंगलात वानरांना सर्वच बाबतीत सोयीचं वाटतं.

ती एकाच भागात एका झाडावरून सहज दुसऱ्या झाडावर जाऊ शकतात. झाडांवरचंही खाऊ शकतात, झाडातळींचही कुरतडू शकतात. पक्षी आणि प्राण्यांबरोबर त्यांचे तऱ्हेतऱ्हेचे खेळही चालतात. पण नवीन फॉरेस्टमध्ये वन तर काही इतकं दाट असणार नाही - वानरांना दाट जंगलच हवं असतं, त्या नव्या जंगलात जी झाडं वेगाने वाढतील आणि वेगाने विकली जातील त्यांच्या फांद्या आणि पानं इतकी मौल्यवान असतात, की त्या ठिकाणी वानरांना जाऊ दिलं जाणार नाही.

या सगळ्या फॉरेस्टमध्ये असंख्य पक्षी आहेत. नवीन पक्षी येतात की नाही कोण जाणे - पण मोठमोठ्या वृक्षांमुळे जुन्या पक्षांची एक दुनियाच इथे तयार झालीय् आणि दाट जंगलामुळे नाना प्रकारचे साप, विशेषतः पायथॉनस्, इथे आहेत. त्यांना हे जंगल सोडावं लागेल.

पण तिस्तेकाठचा वृत्तांत हा असा आमूल बदलून जाणार - त्यामुळे बाघारू, मदारीची आई आणि मदारीचं काय होणार?

ते गयानाथ, राधानाथ-निताई यांच्याप्रमाणे नवीन तिस्तेबरोबर, नवीन फॉरेस्टबरोबर, नवीन शेतीच्या व्यवस्थेबरोबर, मिळून मिसळून जाणार का? की, गेंडे, हरणं, हत्तींचे कळप, वानरांच्या टोळ्या, पक्षी आणि साप यांच्याप्रमाणे ते वन बदलतील, सी नदी सोडून सुद्धा एखादा अपरिवर्तित नदीतीर शोधतील?

मानववंशशास्त्रात या प्रश्नाचं एक उत्तर नक्कीच आहे. वानरापासून माणूस अशी उत्क्रांती झाल्यानंतर पाच लक्ष वर्षांपासून मानवाचे जे वंश स्वतःला बदलत-बदलत आले आहेत, त्यांच्यामधील अनेक वंशांना आदिमानव समाजापासून आधुनिक मानवसमाजाच्या रूपांतराच्या फक्त पाचएक हजार वर्षांपर्यंत समन्वय, ताल राखता आला नाही. ते वंश त्या पाच हजार वर्षांमध्ये एका विशिष्ट टप्प्यावर अडकून पडले, त्यांची उत्क्रांती त्याच ठिकाणी स्थिर झाली. उदाहरणार्थ, अंदमान-निकोबारचे जारोवा, उंगी, सेण्टिनेल किंवा केरळमधले गुहामानव. त्याचप्रमाणे, नदी-अरण्य हे नैसर्गिक घटक बदलून जी उत्पादन-व्यवस्था तयार झालीय्, तिच्याशी बाघारू, मदारीची आई आणि मदारी यांना ताल राखता आला नाही, ते सारे या आदि अशा एका टप्प्यापाशीच अडकले. त्यांच्यासाठी अर्थशास्त्रात एक नवीन संज्ञासुद्धा तयार करता येईल- 'उत्पादन-व्यवस्थेतील आदिवासी जमाती.' पण या प्रकारे मानववंशशास्त्रातील तत्त्व किंवा तुलना यांच्या सहाय्याने बाघारूची समस्या सोडवता येणार नाही. अर्थात् एखादी गोष्ट ही समस्या आहे असं मानल्यानंतरच ती कशी सोडवायची हा प्रश्न येतो. या वृत्तान्ताचा कुणीही वाचक आता सहज अनुमान करू शकेल की नदी कितीही बदलो, फॉरेस्ट कितीही बदलो- बाघारू, मदारीची आई आणि मदारी बदलणार नाहीत. बदलाच्या आधीच कोण बदलेल आणि कोण बदलणार नाही हे आपण सांगू शकतो. परंतु, कोणकोणते वंश बदलाबरोबर गती आणि ताल राखू शकतील व

कोणकोणते वंश राखू शकणार नाहीत हे आधीच सांगता येईल अशी काही पद्धत मानववंशशास्त्रात आहे का? मदारीची आई आणि बाघारू हे तर जुन्या उत्पादन व्यवस्थेतही कुणीच नव्हते.

म्हणून अडकून रहाण्यासाठीही त्यांना जागा नाही. आणि, जुन्या उत्पादन-व्यवस्थेत ते कुठेही नव्हते म्हणूनच नवीन व्यवस्थेतही ते कुठेही असणार नाहीत. मदारीची आई जिथे आहे, तिथेच झाडपाल्यामध्ये ती मिसळून जाईल. पण बाघारू आणि मदारीचं काय होईल? हे दोघेहीजण या वृत्तांतात शेवटपर्यंत अमीमांसितच राहून जातात.

त्या दिवशी बाघारू स्वतंत्र पावलं टाकीत उद्‌घाटनाच्या मंचाचा दिशेने पावलं टाकीत आला. स्वतंत्र-कारण 'या उत्सवाला जा' असं गयानाथने काही त्याला सांगितलं नव्हतं. स्वतंत्र-कारण, या नदीमध्ये उभ्या राहिलेल्या पहाडाशी आपलं नातं काय हे जाणून घेण्याची मागणी त्याला आपल्या शरीरात जाणवली. एका तिरीमिरीतच गयानाथचा झेंडा त्याने फेकून दिला आणि तो नदीवरचा बंधारा आणि बंधाऱ्याजवळच्या मंडपाच्या दिशेने पुढे आला. जे बाघारूच्या शरीरनिरपेक्ष आहे, असं काहीही आपलचांद फॉरेस्ट आणि तिस्ता नदी यांच्यामध्ये घडू शकत नाही. पक्ष्यांचाही स्वभाव असाच असतो. उहाळ्याडहाळ्यांवर, ढोल्यांमध्ये किती विचित्र जागी किती प्रकारे ते आपली घरटी बांधतात, पिढ्यानपिढ्या त्या घरट्यांत रहातात. एका पक्ष्याचं जीवन एका महीरुहाच्या तुलनेत असं किती दिवसाचं! त्या महीरुहाला पक्षी पिढ्यानपिढ्या ओळखतात. नंतर महीरुह उपटला गेल्यानंतरही पक्षी आपली सवय, आपला सराव सोडू शकत नाहीत. आकाशाच्या त्या शून्यतेलाच ती फांद्या-पानं समजतात, घिरट्या घालीत घालीत येऊन त्यावर बसू पहातात. त्या ठिकाणी आता झाड खरोखरच नाही हे लक्षात येण्यासाठी त्या पक्ष्यांना दोनेक पावसाळे भिजावंच लागतं. आपल्या शरीरामुळे त्यांना समजतं- आपला जुना आश्रय आता नाही. तेव्हा ते नवीन झाड शोधतात.

बाघारू अगदी त्याचप्रमाणे दक्षिणेकडून उत्तरेकडे आला होता. जणू तो आहे, बंधारा आहे आणि बंधाऱ्याजवळचा मंडप आहे.

इथून मंचावर पोचण्यासाठी कुठलाही रस्ता नव्हता. व्ही.आय्.पी. लोकांच्या गाड्या ठेवण्याच्या जागेमागे जुलूसांच्या बसण्याची व्यवस्था होती - एकदम जंगलाच्या मध्ये. बऱ्याच दूरपर्यंत जंगल साफ करण्यात आलंय्. बाघारू सरळ येत होता. त्याच्या पावलं टाकण्यामध्ये मुक्तीचा छंदही होता बहुधा. त्याच्या खांद्यावर झेंडा नव्हता, हात-पाय मोकळे होते. तो आपादमस्तक मुक्त होता, मोकळा होता; पण एवढ्या नग्नतेतही तो दारिद्र्यापासून संपूर्णपणे मुक्त होता. बाघारूला आता शालप्रांशु म्हटलं तरी चालेल- सालाच्या झाडाइतका उंच माणूस! सरळ चालत-चालत पुढे येत बाघारू बांबूच्या कुंपणाला भिडतो. कुंपणावरून पलीकडे उडी मारू पहातो.

तेवढ्यात एक पोलीस येऊन त्याला समजावतो, की हे असं काही करायचं नसतं. पोलीस खूप सभ्यपणे बाघारूला रस्ता दाखवतो आणि कुठं बसायचं ते सागतो. बाघारूला आता उजवीकडे वळून, या बांबूच्या कुंपणाच्या बाजूने चालत-चालत जाऊन पुन्हा फॉरेस्टमध्ये शिरावं लागणार. तिथूनच भाषणं ऐकावी लागणार. कुंपणाच्या एका बाजूला पोलीस, एका बाजूला बाघारू- दोघेही बरोबरच पावलं टाकीत पुढे जातात. त्यानंतर एका ठिकाणी थांबून पोलिस बोटाने निर्देश करून दाखवतो - फॉरेस्टच्या मध्ये माणसांची अगणित डोकी. बाकीची वाट बाघारू एकटाच जातो. एका ठिकाणी कुंपण डावीकडे वळतं. तिथपासून लोक बसलेले आहेत.

बाघारू पहिल्या रांगेत घुसू पहातो.

बाघारू ज्या दिशेने जनसमूहात घुसला आहे, त्या दिशेने इतर कुणीही आलेलं नाही. मंचावरून उतरून जर कुणी सभेतल्या लोकांजवळ आलं, तर त्यालाही प्रथम पहिल्या रांगेतच यावं लागणार ना!

पण पहिली रांग दूरच राहिली, तोपर्यंत सारी जागा ठिकठिकाणांहून आलेल्या जुलूसांतील लोकांनी गच्चा भरून गेलीय. सगळेच जुलूस तिस्ता बंधाऱ्याच्या उद्घाटनानिमित्त सरकारचा 'झिन्दाबाद;' करायला आले आहेत; पण प्रत्येक ठिकाणच्या जुलूसाला वेगवेगळंच बसवायला हवं, थांबायला हवं. एका ठिकाणाहून आलेल्या जुलूसामध्ये जर दुसऱ्या ठिकाणचा जुलूस मिसळला, तर सगळेच हरवून जातील, सगळीच व्यवस्था विस्कळित होईल, त्यामुळे एकेका ठिकाणी अगदी अंगाला अंगस गुडघ्यांना गुडघे लावून अगदी एखाद्या भिंतीसारखे बसले आहेत. बाघारू कुंपण धरून प्रवेश करायला हवा, कारण बांबूचं कुंपण त्याच ठिकाणी डावीकडे वळतंय् आणि बाघारू तर कुंपण धरूनच पुढे येतोय्. पण बाघारू तिथे प्रवेश कसा करणार, तिथे त्याला प्रवेश कोण करू देणार? धक्के खाता-खाता हे त्याच्या स्वतःच्याच लक्षात यायला हवं. वेगवेगळ्या भाषांमध्ये त्याला एकच गोष्ट ऐकावी लागते- मागे जा, पीछे जाओ, पेछने जाओ; आपल्या जागी जा, स्वतःच्या जागी जा. . .बसलेल्या सगळ्या लोकांच्या छातीवर बॅजेस लावलेल आहेत. ते सारे बाघारूच्या बॅज नसलेल्या छातीकडे पहातात. बॅज लावण्यासाठी बाघारूच्या अंगात अंगरखा नाही. बाघारूशी कुणीही रागावून बोलत नाही. काही-काही जण तर सहानुभूतीने त्याला रस्ता दाखवतात. पण, आपल्या जुलूसाच्या गटात बाहेरचं कुणी येऊ नये याबाबतीत मात्र प्रत्येकजण अगदी रात्रीच्या पहारेकऱ्याइतका सावध असतो. याच कारणामुळे बाघारूला मागे जावं लागतं, आणखी मागे जावं लागतं, दूर जावं लागतं.

हा प्रसंग इथेच थांबो. जर हा प्रसंग वृत्तांताच्या मुख्य भागामध्ये अंतर्भूत असता, तर 'बाघारूचा मेळाव्यातील प्रवेशासाठी प्रयत्न' किंवा 'मेळाव्याकडून बाघारूस प्रतिबंध'

असा नांवाचा एक अध्याय लिहावा लागला असता. पण आता आम्ही या प्रकारच्या एखाद्या घटनेचं वर्णन देऊ शकत नाही. आम्ही फक्त काही बातम्या देऊ शकतो.

बाघारूला शेवटी त्या फॉरेस्टमधल्या या फॉरेस्टइतक्याच विराट जनसभेचा अगदी शेवटच्या टोकाला जावं लागतं, तोपर्यंत माईकवरून नाना प्रकारचं किंचाळणं, भाषणं सुरू झालेली असतात, तोपर्यंत, फॉरेस्टमध्ये या फॉरेस्टप्रमाणेच लाखो-लाखो माणसांनी, मंचावरच्या माणसाच्या आवाजात आवाज मिळवून घोषणा द्यायला सुरुवात केलेली असते. ही भाषणं आणि घोषणा चालू असताना बाघारू या मेळाव्याच्या अगदी शेवटच्या टोकाला येऊन पोचतो. तिथून तो पहाण्याचा प्रयत्न ही करतो- नदीमध्ये उभारलेल्या त्या पहाडाजवळचा मंडप दिसतो की नाही. मंडप तर दूरच, तिथून माणसांच्या माथ्यांचासुद्धा अंत दिसत नाही. बाघारू एका झाडाच्या बुंध्याला टेकून जमिनीवर बसतो. मेळाव्याच्या त्या अगदी शेवटच्या टोकालाही बाघारूच्या आसपास काही माणसं फिरत होतीच. म्हणजे इतक्या मागे गेल्यावरसुद्धा बाघारू मेळाव्याच्या मध्येच आहे. पण मेळाव्यातले लोक या ठिकाणी तेवढे सावध, आत्मरक्षाप्रवण नाहीत. बाघारूला तिथे केवळ उभे रहाण्याइतकीच नव्हे, तर एसपैस बसण्यापुरतीसुद्धा जागा मिळते.

पण बाघारू तर गयानाथचा जुलूस ध्वंस झाल्यावर तिस्ता नदीवरचा बंधारा, फॉरेस्ट आणि त्यांच्यामधलं साम्य समजावून घेण्यासाठी पुढे आला होता. एकदा समजावून घेण्यासाठी. एकदा समजावून घेतलेलं त्याला आयुष्यभर पुरेल; पण हे एकदा समजावून घेतलं पाहिजे ते शरीराद्वारे.

पण या मेळाव्याने, त्यातल्या रांगांमागून, रांगांमागून असलेल्या जुलूसांच्या रांगांनी त्याला बंधारा आणि बंधाऱ्याजवळचा मंडप यांच्यापासून इथे इतक्या दूर ढकलत-ढकलत आणलं होतं, की या ठिकाणी फक्त माईकचा आवाज पोचत होता, नदी किंवा बंधारा किंवा मंच यांच्यावर काय चाललंय ते काहीच दिसत नव्हतं. माईकवरच्या आवाजाचा तर बाघारूच्या दृष्टीने काहीच अर्थ नाही. त्यामुळे बाघारू झाडाखाली जिथे बसला होता, त्याच झाडाखाली झोपून गेला. झोपल्यावर डोकं काही सरळ उभं रहात नाही. छातीवर झुकतं, किंवा बाजूला खांद्यावर झुकतं. बाघारूचं डोकं उजव्या बाजूला झुकलं. तो झाडाच्या तळाशी आडवा होऊन झोपला. त्याचं शरीर झाडाच्या बुंध्याला असं वेढून आहे, की वाटतं, फॉरेस्टमधील या झाडाच्या बुंध्याला तो वेढून राहू पहातोय्.

पण हा प्रसंग इथेच असो. हा जर वृत्तांताच्या मुख्य भागात असता, तर कदाचित 'आपलचांदमध्ये बाघारूचं शेवटी झोपी जाणं' किंवा 'बाघारू आणि त्याचा शेवटचा वृक्ष' या शीर्षकाने एक अध्याय लिहिला असता.

किंवा, 'बाघारूचा निद्राभंग' किंवा 'मेळाव्याचं बाघारूवर्जन' शीर्षकाचा आणखी एक अध्याय. कारण, बाघारूला जेव्हा माग येते तेव्हा सांज उतरून आलीय, आसपास

कुठेच कुणी माणूस नाही, आपलचांद हे आपलचांदप्रमाणेच निर्जन आहे, बाघारूच्या आसपास काजवे लुकलुकताहेत, एक पक्षी बाघारूच्या माथ्यावर झाडामध्ये जागा बदलतो- पिंगळा असेल किंवा कदाचित मोरही असेल. बाघारू उठून उभा राहिल्यावर खूप दूर अंतरावर त्याला प्रकाशाची माळ दिसते. तो प्रकाश पहिल्याबरोबर बाघारूला समजतं- बंधारा - तो नदीमध्ये ठगवलेला पहाड, पहाडावर बांधलेला मंडप बाघारू सरळ त्या प्रकाशाच्या दिशेने चालायला सुरुवात करतो.

या चालण्याने बाघारूला बदललं? नंतर असंच वाटू शकतं, कारण तो पुन्हा परत आलाही नाही. पण त्याचं हे चालणं मेळावा-सभा यांच्या शेवटी त्याची झोप संपल्यावरच सुरू झालं का? आत्ता? की हे गयानाथचा झेंडा खांद्यावरून फेकून देऊन त्याने या बंधाऱ्याच्या आणि मंचाचा दिशेने चालायला सुरुवात केली तेव्हा हे चालणं सुरू झालं? त्यावेळी जर बांबूच्या कुंपणाचा आणि पोलिसाचा अडसर आला नसता, जर तेव्हा या मेळाव्याचा अडथळा आला नसता, तर फॉरेस्टच्या इतक्या आतपर्यंत बाघारू पोचलाही नसता! आता सगळे अडथळे संपले आहे, आता रात्र आहेत, आता रात्रीचे पक्षी आपल्या फांद्या बदलताहेत, आता बाघारूला घेरून काजवे लुकलुकताहेत आणि रातकिडे किरकिरताहेत, आता बंधाऱ्यावरच्या दिव्यांच्या माळा दिसताहेत, आता बाघारू आपलचांद जंगलातून सरळ गयानाथच्या घरी जाऊ शकला असता, पण तिकडे न जाता बाघारू सकाळी नाइलाजाने अर्धवट सोडून दिलेलं चालणं पुढे चालायला पुन्हा सुरुवात करतो. तेव्हा रस्ता मिळाला नाही म्हणून तो इतका वेळ झोपला. अशा प्रकारच्या रस्त्याने तर बाघारूला अनेकवेळा जावं लागलेलं आहे - नाहीतर गयानाथने तिस्तेमधली दलदलीची जमीन त्याच्याकडून कशी काय मापवून घेतली असती? तिस्तेत तरंगत सोडलेलं फॉरेस्टमधलं झाड त्याच्याकडून बाहेर काढवून कसं काय विकलं असतं? एरवीही बाघारूचा मार्ग जरा अद्भुतच आहे- ग्रहणात गायीचं बाळंतपण करणं, रमण-इच्छुक पाखराची साद ऐकून जागं होणं, पाण्यावरून चालणं, श्रीदेवीसमोर नाचणं, आता बाघारूला काजव्यांमधून बंधाऱ्याकडे चालत जायचंय.

पण हा प्रसंग असो. हा प्रसंग जर वृत्तांताच्या मुख्य भागात असता, तर कदाचित 'बाघारूचे काजव्यांसह चालणे' किंवा 'बाघारूला घेरून काजव्यांचा प्रवाह' या शीर्षकाने एखादा अध्याय लिहिला गेला असता. बाघारूला काजव्यांमधून जावं लागलं. त्यामुळे, दूरवरून कुणी पाहिलं, तर त्याला दिसलं असतं, की फॉरेस्टभरून असलेल्या काजव्यांमधून बाघारूच्या शरीराच्या आकाराचा एक अंधकार पुढे येतोय्. त्या अंधकाराच्या अंगावरही दोनेक काजवे बसलेले आहेत खरे, पण त्यातून काजव्यांमध्ये अंधकाराने तयार झालेल्या बाघारूला ओळखता येतंय्- आकाशातील अनेक अवान्तर ताऱ्यांमुळेच तर नाना ताऱ्यांच्या मधल्या अंधकाराने तयार झालेले 'सप्तर्षी' आणि 'कृत्तिका' हे तारकापुंज

ओळखण्यात आपली चूक होत नाही.

यावेळी बाघारू बांबूचं कुंपण उडी मारून पार करतो. बंधाऱ्याच्या मंडपावर काही फ्लड्लाईटस् टाकलेले आहेत. कुंपण ओलांडून बाघारू त्या फ्लड-लाइटसच्या प्रकाशात दोन-चार पावलं जाताच दोन-तीन ठिकाणांहून आरोळ्या उठतात, 'एऽ, एऽ, अरे थांबा! एऽ, कुठं चाललास? ए! एऽ!'

बाघारू उभा रहातो. आता तर फ्लड-लाईटसचा प्रकाश त्याच्या आपादमस्तक नग्न शरीराच्या मागच्या बाजूवर पडलेला आहे. त्याच प्रकारे प्रकाशाच्या वर्तुळात उभा राहून बाघारू पहातोय ते मात्र समोर, मंडपाकडे आता मात्र मंचावर कुठलेही झेंडे पताका नाहीत.

दोन पोलीस खांद्यावर बंदुका टाकून संथपणे बाघारूकडे येतात. त्यांच्या शरीराच्या पुढील भागावर फ्लडलाईटस पडतात. ते समोर येऊन, बाघारूला एकदा आपादमस्तक पाहून मान हलवून, खूपच शांत, निरुदवेग स्वरात विचारतात, 'कुठं चाललास?'

बाघारू हाताने निर्देश करून सांगतो, 'तिकडं, मंडपात!'

एक पोलीस मान वळवून बाघारू कशाला मंडप म्हणतोय् ते पहातो. दुसरा पोलीस तेवढ्यात मागे वळून, हात हलवीत बाघारूला म्हणतो, 'नीघ इथून, नीघ! आता तिकडं जायला बंदी आहे. तू हरवलास वाटतं तुझ्या मिरवणुकीतून!'

दोन्ही पोलीस जवळजवळ संपूर्ण मागे वळल्यावर बाघारू एकाच जागी थांबून म्हणतो, 'नाही' माझी कोणतीही मिरवणूक नाही. ' जणू हे सांगितल्यावर आपल्याला जाऊ देतील असं त्याला वाटत असावं, यावेळी एक पोलीस खूप जोराने म्हणतो, 'मिरवणूक नाही तर तयार कर जाऊन! नीघ, नीघ, आता इथं यायला बंदी आहे!'

बाघारू पुन्हा एकदा त्या रिकाम्या परंतु रंगीत झेंडे काढून टाकलेल्या प्रकाशित मंचाकडे पहातो, त्यानंतर मागे वळून चालायला सुरुवात करतो. जणू या बाजूने मंडपाकडे जायला मिळालं नाही, म्हणून त्याला दुसऱ्या एखाद्या मार्गाने जायचा प्रयत्न करायला हवा. प्रकाशाचं वर्तुळ जवळजवळ ओलांडून बाघारू जेव्हा कुंपण ओलांडायच्या बेतात होता. तेवढ्यात मागून आवाज आला, 'एऽ, एऽ, ऐक, एऽ, अरे ए भाऊ, जरा ऐक, एऽ!' कुंपणाजवळून बाघारू पहातो-तेच दोन पोलीस कपाळावर हात ठेवून त्याला शोधताहेत. प्रकाशामागे बाघारू त्यांना नीट दिसत नाही.

काहीही उत्तर देता बाघारू त्या प्रकाशाच्या सीमेत परत जातो-त्यामुळे पोलिसांना तो दिसू शकेल.

त्या दोन पोलिसांना बरच अंतर चालून त्याच्याकडे यावं लागतं. या जागेवर वाळू टाकलेली आहे. मंचावर प्रवेश करण्याचा मार्ग आणि सभेची सीमा यांच्यामधली ही नो-मॅन्स लॅण्ड आहे. त्यामुळे इथे दगडही टाकलेले नाहीत. तिस्तेची आदि वाळू फ्लडलाइटमध्ये चमचम करीत होती.

दोन्ही पोलिस समोर येऊन थांबतात. एकजण म्हणतो, 'ऐक - एक छोटं पोरगं हरवलंय्. इथंच आहे. त्याला काय पाहिजे ते आम्हाला समजत नाहीय्. त्याला घेऊन जा, त्याच्या ठिकाणी पोचवून दे, आणि काय बघायचंय् मांडवात ते बघून ये-फक्त एकच नजर बरं का!' त्यानंतर मान वळवून तो पोलीस मंचाकडे पाहून म्हणतो, 'एऽ च्यांग्डा, इकडं ये!' आणि बाघारूकडे पाहून म्हणतो, 'फक्त एकच नजर बरं का! त्यापेक्षा जास्त नाही.' त्यानंतर पुन्हा मान वळवून, त्या पोराच्या इकडे येण्याच्या संभाव्य मार्गाकडे पाहून घेऊन म्हणतो, 'म्हणजे तू सुद्धा हरवलास की काय? तुझा जुलूस गेला का?'

'माझा कुठलाही जुलूस नाही!' बाघारू उत्तर देतो.

'एकटाच आलास का?' पोलीस परत विचारतो, पण बाघारू उत्तर देत नाही. तेव्हा बाघारूला दिसतं, की जणू मंचाच्या पायथ्यामधून, किंवा जणू या बंधाऱ्यामधून एक छोटा मुलगा बाहेर पडून हळू-हळू या दिशेने पुढे येतोय. तो मुलगा किती छोटा आहे, याचा अंदाज बाघारूला अंतरामुळे करता येत नाही. परंतु मुलगा हळू हळू या अधिक प्रकाशात स्पष्ट होतो. त्या मुलाला बहुधा झोप लागून गेली असावी, आता तो जागा झाला असावा. इतक्या प्रखर प्रकाशात येताना तो आपले डोळे आकुंचित करतो, त्यानंतर बंद करतो. मुलगा आपल्याजवळ येऊन उभा राहिलाय हे त्या दोन पोलिसांच्या लक्षातच येत नाही. तो आलाय् की नाही, हे पहाण्यासाठी मान वळवल्याबरोबर मुलगा आपल्या शेजारी उभा असलेला त्यांना दिसतो. तेव्हा त्याच्या डोक्यावर हात ठेवून एक पोलीस म्हणतो, 'हे बघ, हा पण मिरवणुकीतलाच माणूस आहे, तुला तो तुझ्या ठिकाणी पोचवून देईल.'

बाघारू त्या मुलाकडं पाहून म्हणतो, 'मी मीटिंगमधला माणूस नाही.' पोलीस त्याची थट्टा करतो, 'अरे वा रे वा शहाजोग! मीटिंगच्या ठिकाणी आलाय् अन ''मी मीटिंगचा माणूस माणूस नाही'' असे म्हणतोय, वा रे वा!' त्यानंतर धमकीच्या स्वरात म्हणतो, 'नीघ, पोराला घेऊन बॅरेज-मॅरेज काय बघायचंय् ते बघ आन् फूट इथून! लवकर!' मुलाच्या डोक्यावर हात ठेऊन पोलिस त्याला बाघारूच्या दिशेने ढकलतो, मदारी येऊन बाघारूच्या लांब हाताची बोटं धरून विचारतो, 'तुम्ही हा बॅरेज पहाणार?' जणू या आमिषामुळेच तो बाघारूबरोबर जायला कबूल झालाय्.

कथेचा हाच भाग जर मूळ वृत्तांताचा भाग असता, एखाद्या पर्वात तो समाविष्ट असता, तर 'मदारी-हस्तांतर' किंवा 'बाघारू-मदारी यांची भेट' या शीर्षकाने एखादा अध्याय लिहिला गेला असता. या छोट्या वाळूच्या भूमीवर फ्लड-लाइटचा प्रकाश जणू ओसंडतोय. त्या प्रकाशाकडे चेहेरा करून उभं राहिलं की आसपासचा अंधार अधिकच दाट वाटतो. निर्जन, रंगीत मंचावरती प्रकाश आहे. दोन पोलिस आणि मदारी यांच्या डोक्यांपासून पायांपर्यंत पुढील भागावर उजेड आहे. बाघारूच्या डोक्यापासून पायापर्यंत मागच्या भागावर प्रकाश आहे. बाघारूची ती शालप्रांशु-सालाच्या झाडाइतकी उंच-नग्नता!

क्षणार्धात मदारी पोलिसाकडून बाघारूचा हात धरून बाघारूच्या बाजूला येतो. त्याचाही पुढचा भाग अंधुक होऊन जातो. मदारी बाघारूचा हात धरून ओढीत, त्या मंचाखालून दिशेने घेऊन जातो.

ज्या मार्गाने सकाळी राज्याचे मुख्यमंत्री आणि इतर मंत्री सुरक्षिततेच्या कारणांसाठी टाकलेल्या दगडांवरून, मंचाखालचा पडदा पार करून बंधाऱ्यावर गेले होते, त्याच मार्गाने मदारीही बाघारूचा हात धरून रात्रीच्या निर्जनतेत बंधाऱ्यापर्यंत पोचतात आणि त्याचबरोबर-बंधाऱ्याची प्रकाशहीन उंची, निर्जनता, विस्तार त्यांचा ग्रास घेऊन टाकतात. आपल्या परिचित रस्त्यावरून चुकलेला हत्तींचा कळप किंवा एकटा वाघ ज्याप्रमाणे थबकतात, त्याचप्रमाणे बाघारू आणि मदारी थबकतात. पण बाघारू जितका थबकतो, तितका मदारी नाही. मंत्री जिथे ग्रुप फोटोसाठी थांबले होते, त्याच जागी बाघारूलाही थांबावं लागतं. मदारी बाघारूचं मनगट गच्च धरतो. आपला हात सोडवून घेऊन बाघारू मदारीचं मनगट गच्च धरतो-जणू अकस्मात स्वत:चं संरक्षण करण्याची वेळ येणार आहे.

मंचाच्या पाठीमागे फक्त एकच अवान्तर असा जास्तीचा दिवा आहे. परंतु सर्वत्र एकप्रकारचा पांढरट प्रकाश आहे - आकाश आणि नदी यांच्यावर असतो, तसा. बाघारू पहातो - तिस्ता कुठेच दिसत नाहीय. मदारी आणि बाघारू जिथं उभे आहेत, तिथून सरळ पाहिलं, की पलीकडच्या बोदागंज फॉरेस्टमधली झाडं आपल्या पायाच्या खूप तळाशी आहेत, असं वाटतं - या पांढरट उजेडात बोदागंज फॉरेस्टमधली झाडं ओळखू येत नाहीत. असं वाटतं, की हा प्रकाश त्या झाडांजवळ जाऊन अंधारामध्ये मिसळून गेलाय्. पण बाघारूला या आकाशातल्या सावल्या, पांढरट प्रकाश, प्रकाश - अंधार सारंच पहाता येतं. तेच फॉरेस्ट बोदागंज फॉरेस्ट आहे हे त्याला ठाऊक आहे. तसं असेल, तर ते किती उंचीवर चढून आले आहेत? जिथून फॉरेस्टची झाडं त्यांच्या पायाच्या तळाशी दिसू शकतात, अशा किती उंचीवर? तिस्ता कुठंय्?

तिस्तेला शोधण्यासाठी बाघारूला काही पावलं चालावं लागतं. अनवाणी पायांनी दगडांवर चालण्यात त्याला काही त्रास होत नाही. बाघारू लांब पण संथ पावलं टाकतो-डावी उजवीकडे मान वळवून. पण त्याच्या डावी-उजवीकडे फक्त मोकळं आकाश आहे-बाघारूला ताबडतोब आत्मरक्षणासाठी पाऊल उचलावं लागेल, असं काही तिथं घडू शकतं?

मदारीचं मनगट बाघारूच्या हातात आहे. बाघारूने ते जोराने दाबून धरलं होतं-जणू काही कारणांनी मदारीला त्याच्या हातून पळून दूर जायचंय्, जणू या दाबामुळेच मदारीची आंतरिक ओढ जागी होऊ शकेल. बाघारूच्या मुठीच्या या दाबामुळेच मदारीमध्येही बहुधा बाघारूची आशंका संचारित होते. तो बाघारूच्या पायांना लपेटून घेतो.

काही पावलं गेल्याबरोबर बाघारू थांबतो. त्यानंतर हळू-हळू उजवीकडे सरकतो.

हळू-हळू बंधाऱ्याच्या जवळजवळ किनाऱ्याशी येऊन उभा रहातो.

''इथं गेट बांधले आहेत, पाणी अडकवून ठेवलंय्' बाघारू म्हणतो. आणि आपण स्वत:च बोललेलं वाक्य ज्याप्रमाणे उडून जातं, त्यावरूनच त्यांच्या लक्षात येतं की डावीकडून उजवीकडे, उत्तरेकडून दक्षिणेकडे वारा वहातोय्. बाघारू त्या वाऱ्यातच वाकून पहातो-कुठल्या पाताळात पाणी चकचक् करतंय. बाघारू आणखी थोडं थांबून पाहून घेऊ शकतो - आणखी बऱ्याच दूरपर्यंत पाणी चकचकतंय्. या एका स्लुइस गेटमधून पाणी बाहेर सोडून उद्घाटन करवण्यासाठी तिस्तेमध्ये नाना प्रवाहांमधून दूर दूरच्या ठिकाणी छोटी धरणं बांधून पाणी त्या गेटसमोर आणलंय्. बाघारूला ती धरणं पाहता येत नाहीत. त्याला दिसतं, काही अंतरापर्यंत पाण्याचा पांढरट, तरल, अस्पष्ट प्रकाश पसरला आहे. तिस्तेचा प्रवाह कुठल्या दिशेकडून कुठल्या दिशेकडे वाहातोय् हे आपल्याला समजत नाहीय् असं त्याला दिसतं. बाघारू तर तिस्ता नदीच्या अंतरंगातून तिस्ता पाहून आलाय्- आता इतक्या उंचावरून तळाकडे पहात तो तिस्तेला कसं काय ओळखणार?

बाघारू किनाऱ्यापासून दूर सरकतो. हाताच्या मुठीत धरून ठेवलेला मदारी त्याच्या उजव्या पायाला चिकटतो. बाघारू आता विरुद्ध बाजूला किनाऱ्याच्या दिशेने निघतो.

मदारी विचारतो, 'तिथं पाणी अडवून ठेवलंय्?'

'हो. अडवून ठेवलंय्.'

'का बरं अडवतात पाणी?'

'ठाऊक नाही.'

आता वारा त्यांच्या मागून वहातोय्. बाघारू हात मागे करून मदारीचा डावा हात धरतो. मदारी त्याच्या डाव्या पायाला चिकटतो. वारा जणू त्याला धक्का मारून पाण्यात टाकील, म्हणून बाघारू किनाऱ्याच्या तितकं जवळ जात नाही. शरीराचा तोल सांभाळण्यासाठी मदारी मधूनमधून बाघारूच्या कुल्ल्यावर हात ठेवतोय् असं बाघारूला जाणवतं. मदारीला त्यामुळे तोल सांभाळायला मदत होते.

स्लुइस गेट उघडून पाणी याच बाजूने बाहेर सोडलं होतं. फार वेळ नाही, कारण पाणी फार नव्हतं. तेच पाणी आता पावसानंतर जमिनीवर पसरतं, तसं इतस्तत: इकडं-तिकडं पसरलेलं दिसतंय्. बाघारूला इतक्या उंचीवरून एवढं काही पहाता येत नाही, पण पाणी इतस्तत: पसरलंय् हे त्याला समजतं.

'इथं पाणी सोडलं होतं, इथं,' स्वत:शीच बोलून बाघारू समजावून घेतो. पण बंधाऱ्याच्या पायथ्यापासून नजर वर उचलून, ती त्याच्या अनुमानित तिस्तेवरून पांढरट प्रकाशात फिरवावी लागते - तिस्ता नदी ओळखण्याच्या प्रक्रियेत. अनेक-अनेक वेळा, ओहोटीच्या रात्रीच्या आकाशातील ताऱ्यांच्या मध्ये जणू तो आपल्या शरीरातील तिस्तेला पहातो. पण निश्चित होत नाही. डावा हात आणखी मागे करून, मदारीला पुढे ओढून

बाघारू त्या किनाऱ्यापासून दूर होतो.

मदारी बाघारूच्या पायाला लपेटून विचारतो, 'पाणी का बरं सोडलं होतं?'

'ठाऊक नाही, ठाऊक नाही!' - बाघारू बंधाऱ्याच्या मध्यभागी येऊन थांबतो.

आता बाघारू बंधाऱ्यावरून समोर पहातो. बॅरेजच्या कडेकडेने तो समोरच्या दिशेला जाईल, त्यानंतर चालायला सुरुवात करीत. मदारीने बाघारूचा डावा हात धरलाय्, तो बाघारूच्या डाव्या पायाला लगटून उभा आहे. बाघारू पायातळीची तिस्ता आणि डोक्यावरचं आकाश जितक्या वेळा पहातो, तितक्यावेळा त्याला वाटतं, की ते आकाशामधून चालताहेत, आणि आकाशातील सारा वारा मदारी आणि बाघारू यांच्या शरीरावरून वहात चाललाय्. हा वारा म्हणजे खूप वरचा वारा - या वाऱ्याचा कुठलाही आवाज नसतो, पण त्याचा जोर किती आहे ते बाघारूला आपल्या शरीराच्या सहाय्याने जाणवतं. तो बंधाऱ्यावर आपले पाय रोवू पहातो, पण बॅरेजवर पाय रोवले जात नाहीत. बाघारू आपल्या गुढग्यांमध्ये वाकून वाऱ्याचा जरा अंदाज घेतो, या वाऱ्याने त्याला उलटवू पाहिल्याबरोबर तो मदारीला आपल्याजवळ ओढून खाली बसेल. दाट वनामध्ये वावरण्याची जी बाघारूच्या शरीराची पद्धत आहे, तीच तो या बंधाऱ्यावर शोधतोय. पण जंगलाचं दाटपणसुद्धा त्याच्या पायांना ओळखीचं आहे, बंधाऱ्याच्या या उच्चतेची मुक्ती त्याच्या परिचयाची नाही.

बंधारा किती लांब आहे, त्याची लांबी किती आहे हे बाघारूला ठाऊक नाही. बंधाऱ्याचं बांधकाम अद्याप पूर्ण झालेलं नाहीय् असं त्याने ऐकलंय् खरं, पण कुठपर्यंत बांधकाम झालं म्हणजे त्याला 'पूर्ण झालंय्' असं म्हणायचं, ते काही त्याला ठाऊक नाही. या वाऱ्याच्या धक्क्यात तोल सांभाळीत सांभाळीत, अंधुकशा उजेडात पुढे जाता-जाता त्याला वाटतं, की आपण खूप दूरवर येऊन पडलो आहोत. आणखी पुढे जाण्याचं साहस त्याला होत नाही. बाघारू समोर पाहून उभा रहातो. उभा राहिल्यानंतर दोन पाय फाकवतो- पुन्हा त्याच तयारीत. बाघारूला आपलं डोकं जरा मागे उंचवावं लागतं - वाऱ्याच्या वेगात तोल सांभाळण्यासाठी आणि समोरच्या दूर अंतराचा अंदाज घेण्यासाठी.

मदारी त्याच्या शरीरातून चीत्कारतो, 'इथंच संपला? हा बंधारा?'

'ठाऊक नाही.'

मदारीला ऐकू येत नाही. तो बाघारूच्या डाव्या पायाकडून डोकं बाहेर करून पुन्हा चीत्कारतो, 'इथंच संपला? हा बंधारा?'

आता बाघारू मदारीला मागून समोरच्या बाजूला ओढून आणतो - 'मला गच्च धरून ठेव. जोराचा वारा आहे.'

मदारी बाघारूला मिठी मारतो, पण त्याच्या दोन्ही हातांच्या मिठीच्या परिघात बाघारू येत नाही.

त्यामुळे आपले छोटे छोटे हात बाघारूच्या शरीरोभोवती वेढतो. त्यानंतर डावा हात मोकळा करून बाघारूच्या पाठीवरच्या, वाघनखांनी खरवडलेल्या त्या खोबणीत ठेवतो. तिथं बोटं अडकवून पक्की पकड येते. मदारीने बाघारूला ओळखून घेतलं आहे-तिस्ता बदलून टाकणाऱ्या संपूर्ण अनोळखी बंधाऱ्यावर, या अशा रात्री एकमेकांबरोबर राहिल्यावर ज्या वेगाने ओळख पटते, त्या वेगाने ओळखून घेतलं आहे.

मदारी मान हलवून बाघारूला विचारतो, 'इथंच संपला? हा बंधारा?

'ठाऊक नाही.'

'इथं तिस्ता आहे? तिस्ता नदी?

प्रश्नाचं उत्तर देण्यासाठी म्हणा किंवा स्वतःच त्या तिस्तानदीला शोधण्यासाठी म्हणा, बाघारू मान वळवून डावी-उजवीकडे पहातो.

'ठाऊक नाही.'

'तुम्हाला तिस्ता नदी ठाऊक नाही?'

'ठाऊक नाही.'

'इथं तिस्ता नदी उचललीय् म्हणे?'

'ठाऊक नाही.'

'नवीन नदी बनवलीय? इथे?

'ठाऊक नाही.'

'तुम्ही इथले रहिवासी नाहीत?'

बाघारू उत्तर देत नाही.

'जुलूसात आला होता?'

'माझा कुठलाही जुलूस नाही.'

बाघारू आपले दोन्ही हात मदारीच्या डोक्यावरच्या केसांवर ठेवतो आणि मदारी या जुलूसहीन आणि नदीहीन सर्वहारा माणसाला आणखीच उमाळ्याने कवळतो. त्यानंतर अर्धकौतुकाने विचारतो, 'तुम्हीपण माझ्यासारखेच हरवलात की काय?'

बाघारू खुक् करून हसतो.

मागून पोलिसांचं ओरडणं ऐकू येतं, 'एऽ चला परत, चला! टाईम संपला! चला!'

मदारी आणि बाघारू वळून पहातात - पोलीस टॉर्चचा उजेड टाकून त्यांना परत यायला सांगताहेत

पोलीस त्यांना हाक मारतो आणि ते परतताहेत हे पाहिल्याबरोबर निघून जातो. मंचाच्या तळाशी असलेला पडदा दूर करून बाघारू आणि मदारी जेव्हा त्या प्रखर प्रकाश असलेल्या वाळू टाकलेल्या ठिकाणी येतात, तेव्हा तिथं कुणीही नव्हतं. मदारी बाघारूला सोडून देतो, बाघारू मदारीच्या मुठी करून टाकतो. मदारी एका पायावर भार देऊन नाचत नाचत ती वाळू असलेली जागा पार करतो. मागे वळून बाघारूला हाक मारतो, 'चला!' पांढऱ्या वाळूवर त्यांच्या दोन सावल्या हळूहळू लांब-लांब होत जातात, शेवटी संपूर्ण

त्यांच्या दोन सावल्या त्या पांढऱ्या प्रदेशाला. व्यापून टाकतात. त्यांनी प्रकाशाचा स्तंभ पार केल्याबरोबर इतक्या दीर्घ सावल्या क्षणार्धात नष्ट होतात. तिथे बांबूंचं कुंपण आहे. बाघारू आणि मदारी ते ओलांडून आपलचांदमध्ये प्रवेश करतील. आपलचांदमध्ये आता जंगलभर काजवे आहेत. मंचाखालून, न्या फ्लड-लाईट्सचा प्रकाश पार करून मदारी-बाघारूला ते सारं काही दिसत नव्हतं.

आता आपण बाघारू-मदारीच्या मागे आणखी पुढे जाणार नाही.

बाघारू तिस्ताकाठ आणि आपलचांद सोडून निघून जातो. मदारीही त्याच्याबरोबर जातो. ज्या कारणासाठी तिस्तापार आणि आपलचांदचं सालवन उपटण्यात येणार आहे, उत्पाटित होणार आहे त्याच कारणासाठी बाघारू तिथून उपटला गेला. ज्या कारणामुळे आपलचांदच्या जंगलातले हरणांचे कळप, पक्ष्यांचे थवे, साप निघून जातील-त्याच कारणामुळे बाघारू निघून जातो. त्याचं तर फक्त एक शरीर आहे. ते शरीर या नवीन तिस्ताकाठी, नव्या फॉरेस्टमध्ये जगू शकणार नाही. हे नदीबन्धन, हा बंधारा देशाच्या अर्थकारणात बदल घडवून आणील, उत्पादन वाढवील. बाघारूचं कोणतंही अर्थकारण नाही. बाघारूचं काही उत्पादनही नाही. बाघारूने या बंधाऱ्याकडे, या अर्थकारणाकडे पाठ फिरवून परतीची वाट धरली. बाघारू थोडं-थोडं बोलू शकतो खरा, पण परतीची भाषा त्याला ठाऊक नाही. त्याला केवळ एक देह आहे. त्या देहाच्या सहाय्यानेच त्याने या सगळ्याकडे पाठ फिरवली आहे. परतीचा मार्ग धरला आहे.

तो आता रात्रभर चालत राहून हे फॉरेस्ट पार करील- या फॉरेस्टमध्येच तो जन्मला होता. दोनेक रस्तेही पार करील. उद्या सकाळी पुन्हा फॉरेस्ट पार करील. दोनेक हाटबाजारही पार करील. मदारीसुद्धा फॉरेस्टचंच एक सन्तान आहे ना! अशा प्रकारे चालता चालता जेव्हा नवीन असं एक जंगल आलं, नवीन अशी एक नदी आली असं बाघारूला वाटेल, तेव्हा बाघारू थांबेल. ते नवीन फॉरेस्ट, ती नवीन नदी बाघारू या शरीराने ओळखील. मदारी कोण आहे, कुठे रहातो, तो कसा परत जाणार-हे काही बाघारूला ठाऊक नाही. पण वाचकांना तर ठाऊक आहे - मदारी कोण आहे, तो कुठं रहात होता. आता, सारी रात्रभर, सारा दिवसभर फॉरेस्टमागून फॉरेस्ट, नदीमागून नदी, बाजारामागून बाजार पार करता-करता बाघारू आणि मदारी यांच्यामध्ये कितीतरी गप्पा होतील, त्या दोघांना एकमेकांबद्दल कितीतरी माहिती मिळेल, त्यांना कितीतरी वेळा झोप येईल आणि कितीतरी वेळा झोपेतून जाग येईल, ते दोघे एकमेकांसाठी किती अपरिहार्य होऊन जातील. तो तर आणखी एक वेगळाच वृत्तान्त.

हा वृत्तान्त इथेच पूर्ण होवो.

परतीची ही संपूर्ण रात्र बाघारू मदारीला घेऊन चालत राहो, चालत राहो, चालत राहो. . .

❑❑❑